# मराठा कुळांचा
# इतिहास.

भाग १–२–३.



लेखक —

रा. रा. गोपाळ दाजीबा दळवी.

# मराठा कुळांचा इतिहास

## भाग १ ला

# जाधव घराण्याची कैफियत.

हें पुस्तक,

श्रीयुत गोपाळ दाजीबा दळवी—संपादक " मराठा-मित्र "

यांनीं,

मुंबई येथें, " इंदुप्रकाश " प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केलें.

---

सन १९१२ इसवी.



किंमत २ रुपया.

---

" सुखामागून जसें दुःख आणि दुःखामागून जसें सुख प्राप्त होतें, त्याचप्रमाणें प्रगतीच्या मागून अवनति व अवनतीच्या मागून प्रगति ठेवलेलीच असते. "

हें पुस्तक घर नं. ४३४ ठाकुरद्वार रोड, मुंबई येथें " इंदुप्रकाश " छापखान्यांत मालकाकरितां रा० रा० दामोदर सांवळाराम यंदे यांनीं छापिलें व रा० रा० गोपाळराव दार्जीबा दळवी यांनीं भायखळा, चमेलीची वाडी येथें "मराठा-मित्र" ऑफिसांत प्रसिद्ध केलें.



श्रीमंत नामदार सरदार राजे शंभुसिंग अमरसिंग
जाधवराव, मालेगांवचे राजे साहेब.



श्रीमंत सौ० खाशिबाईसाहेब जाधवराव
मालेगांवच्या राणीसाहेब.

हें

# जाधव घराण्याच्या कैफियतीचें,

# पुस्तक.

ज्या यादव ऊर्फ जाधव घराण्यामध्यें, श्रीकृष्णासारखे परमात्मे, रामदेवासारखे विद्वानांचा
परामर्ष घेणारे महात्मे, लुखजी जाधवरावासारखे शौर्यवीर्यसंपन्न पुरुष, आईच्या
बाजूनें श्रीशिवाजी महाराजांसारखे स्वराज्यसंस्थापक, धनाजीसारखे
राजकारणपटु मुत्सद्दी व मराठ्यांची मर्दुमकी जगाच्या निदर्शनास
आणून देणारे वीर निर्माण झाले, त्याच घराण्यामधील, एक
थोर विभूती कीं, जीनें आपल्या वाडवडिलार्जित लौकि-
कांत मुळींच उणेपणा पडूं न देतां, आपल्या दयाळू
राज्यकर्त्यांकडून मान, यश व लौकिक मिळविला
आहे; त्याप्रमाणेंच मराठासमूहाची शिक्षणाच्या
बाबतीमध्यें ऊर्जितावस्था व्हावी ह्मणून जी
नेहमीं पुढारीपणा स्वीकारीत असते, ती
सन्माननीय विभूती जाधव कुलदीपक
श्री. नामदार सरदार राजे शंभुसिंग
अमरसिंग जाधवराव, माले-
गांवचे राजेसाहेब ही होय.
ह्या विभूतीस तिच्या गुणां-
वर लुब्ध होऊन हा
त्यांच्या पूर्वजांचा
इतिहास प्रेम-
पूर्वक सम-
र्पण करीत
आहें.

ग्रंथ प्रकाशक.

" बांधवहो ! आपल्या वाडवडिलांनीं शौर्यवीर्यादि पराक्रम करून जी कीर्ति मिळविली आहे ती हस्तलिखितांवरच वास करीत आहे, तीं हस्तलिखितें कसरीनें भक्षण करून नामशेष झाल्यास, आपल्या वाडवडिलांच्या कीर्तीवर, त्यांच्या मर्दुमकीचा, साहसाचा, सौजन्याचा, प्रकाश पडून तिचा दुदुंभी जो जगभर निनादित व्हावयाचा तो होणार नाहीं. तीं हस्तलिखितें छापून त्यांचा जीर्णोद्धार करणें म्हणजे ज्या कुलामध्यें त्यांनीं जन्म घेतलेला आहे, त्या कुलाचा व त्याबरोबरच त्या विभूतींच्या कीर्तीचाच जीर्णोद्धार करण्यासारखें आहे. आपल्या पूर्वजांच्या कीर्तीस चिरस्थायीपणा देणें हें किती पुण्यप्रद आहे, हें निरनिराळ्या कुळांतील पुरुषांस वेगळें सांगण्याची जरूरी नाहीं. ही आपणांवर एक प्रकारची जबाबदारी आहे, हें आपलें कर्तव्य आहे, असें सर्वत्रांनीं आपल्या लक्षांत वागविलें पाहिजे."



# प्रस्तावना.

Here are men who fought in gallant actions, As gallantly as ever heroes fought.
But buried in the heap of such transactions, Their names are rarely found nor often sought.

—Byron.

महाराष्ट्राचा इतिहास, इतक्या कांहीं अपूर्ण स्थितीमध्यें आहे कीं, त्यावर प्रकाश पाडणारी महत्त्वाची हकीकत अद्यापही गुलदस्तांत आहे. प्रसिद्ध इतिहास-संशोधक गुरुवर्य डॉ॰ भांडारकर, श्रीयुत पारसनीस, श्रीयुत राजवाडे, श्रीयुत साने, श्रीयुत सरदेसाई, मे॰ टॉड साहेब, मे॰ ग्रँटडफसाहेब, मे॰ अॅक्वर्थ साहेब, यांनीं अप्रसिद्ध कागदपत्रें व महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें गोळा करण्यासाठीं, जे अविश्रांत श्रम घेतलेले आहेत, त्या श्रमाचेंच द्योतक सध्यां प्रकाशांत असलेला महाराष्ट्राचा इतिहास हें होय.

ग्रँटडफ साहेबांनीं, ज्यावेळीं मराठ्यांचा इतिहास लिहिला, त्यावेळीं त्यांना प्रयत्न करून जीं जीं पत्रें मिळालीं, तीं व कांहीं कांहीं प्रमुख मराठ्यांच्या संग्रहीं असलेल्या कैफियती व सातारचें दफ्तर यांचाच आधार घेऊन त्यांनीं तो लिहिला. जरी तो इतिहास संपूर्ण माहितीनें लिहिला गेला नसला, तरी तो अनेक महाराष्ट्रीय इतिहास–संशोधकांस आधारभूत झाला यांत मुळींच संशय नाहीं. गुरुवर्य डॉ॰ भांडारकर यांचे या बाबतींतील प्रयत्न फारच वाखाणण्यासारखे आहेत. त्यांनीं प्राचीन इतिहास शोधण्याच्या कामीं, आपल्या बुद्धिसामर्थ्याचा, श्रमाचा, पैशाचा, तसेंच वेळेचा, जो उपयोग केलेला दिसून येत आहे, तो अवर्णनीयच होय. यादव ऊर्फ जाधव-मौर्य ऊर्फ मोरे, कदंब ऊर्फ कदम, शिलाहार ऊर्फ शेलार, चालुक्य ऊर्फ चाळके अगर साळुंखे, या महाराष्ट्रांतील प्राचीन घराण्यांचा इतिहास प्रचारांत यावयास सर्वांशीं गुरुवर्य डॉ॰ भांडारकर हेच कारणीभूत झाले आहेत. श्रीयुत मोडक यांनींही फेरिस्त्याच्या ग्रंथांचे तरजुमे करून विजापूर व निजामशाहीमधील मराठ्यांची मर्दुमकी जगाच्या निदर्शनास आणून दिलेली आहे. श्रीयुत सरदेसाई यांनीं मुसल्मानी रियासत, मराठी रियासत, व ब्रिटिश रियासत हे तीन ग्रंथ बाहेर पाडून, महाराष्ट्रेतिहासाची अवर्णनीय सेवा केलेली आहे. श्रीयुत पारसनीस यांच्या कामगिरीसंबंधानें कितीही लिहिलें तरी तें थोडेंच होणारें आहे. कारण त्यांचा इतिहासावरील व्यासंग इतका जबर आहे कीं, त्यांनीं महाराष्ट्राचा इतिहास प्रकाशांत आणण्यासाठीं आजपर्यंत बरींच उपयुक्त पुस्तकें प्रसिद्ध केलेलीं असून शिवाय इतिहास-संग्रहद्वारा त्यांचे प्रयत्न सुरू आहेत व त्यांतून कित्येक महत्त्वाचीं कारस्थानें, पत्रें, चरित्रें, वगैरे प्रसिद्ध होत असून, महाराष्ट्रेतिहासाच्या साधनांत भर पडत आहे. श्रीयुत राजवाडे यांच्या श्रमाचें फल महाराष्ट्रीय वाचकांच्या नजरेपुढें आहेच. राजवाड्यांचे इतिहासाच्या साधनांचे खंड पाहून व त्यांनीं श्रमसातत्यानें गोळा केलेलीं उपयुक्त पत्रें वाचून, एखाद्या आयत्या पिठावर रेघा मारणाऱ्या मनुष्यास अचंबा वाटल्यावांचून राहणार नाहीं. श्रीयुत केळुसकर यांनीं उपलब्ध माहितीच्या आधारें लिहिलेलें श्रीशिवाजी महाराजांचें चरित्रही उपयुक्त असून, त्यामुळें महाराष्ट्रेतिहासांत चांगलीच भर पडलेली आहे. याशिवाय काव्यसंग्रह, भारतवर्ष, विविधज्ञानविस्तार या मासिकांच्या द्वारें, तसेंच श्रीयुत वासुदेव वामन शास्त्री खरे, यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहांच्याद्वारें, बराच इतिहास

बाहेर आलेला आहे. ह्या सर्व विभूतींचे महाराष्ट्रावर अगणित उपकार आहेत. असो.

आम्हांस मराठाकुळांचा इतिहास प्रसिद्ध करण्याची स्फूर्ति उत्पन्न व्हावयास हे वरीलच महात्मे कारणीभूत झालेले आहेत. त्यांनीं श्रमसातत्यानें प्रसिद्ध केलेली माहिती वाचल्यावरूनच, त्या माहितीच्या आधारें व अद्यापहि मराठाकुळांच्या संग्रहीं जीं कागदपत्रें अगर ज्या कैफियती आहेत त्या मिळवून, प्रसिद्ध व अप्रसिद्ध माहिती संगतवार जुळवून प्रसिद्ध केल्यास प्रत्येक मराठा कुळांतील पुरुषाची कारकीर्द स्पष्ट होऊन, तीमुळें महाराष्ट्रेतिहासांत थोडी तरी भर पडल्यासारखें होईल, असें वाटल्यावरूनच आम्हीं ह्या उद्योगास लागलों. त्यापूर्वी म्हणजे इ० स० १९०१ यासालीं, भायखळा, चमेलीची वाडी येथील महाराष्ट्रीय ऐक्यवर्धक समाजातर्फे जो श्रीशिवजयंत्युत्सव झाला, त्या उत्सवामध्यें, आम्हीं, इतिहासप्रसिद्ध मराठा कुळांचा समग्र वृत्तांत, निरनिराळ्या पुरुषांच्या कारकीर्दीसह निबंधरूपानें लिहून वाचून दाखविला होता; तो निबंध मंडळींस इतका कांहीं पसंत पडला कीं, मंडळीनें आम्हांस तो छापून प्रसिद्ध करण्यास सांगितलें. परंतु दिवसेंदिवस अनेक विद्वान् ऐतिहासिक माहिती झपाट्यानें प्रसिद्ध करीत आहेत; तेव्हां हा तात्पुरत्या माहितीचा निबंध प्रसिद्ध व्हावा असें आम्हांस वाटलें नाहीं. परंतु त्यानंतर आम्हीं 'मराठा मित्र मासिक' सुरू केलें. त्यामुळें, आमचा बऱ्याच मराठा घराण्यांतील पुरुषांशीं संबंध घडून येऊं लागला. व मराठा-शिक्षण-परिषदेच्या बैठकी करितां, निरनिराळ्या प्रांतीं फिरण्याचा योग जुळून येऊं लागला, त्यावेळीं, पुष्कळ मराठा बांधवांनीं 'आपल्या कुळांची माहिती प्रसिद्ध झाल्यास बरें होईल. कोणी तसाच गृहस्थ जर प्रयत्न करील तर त्यास आम्हीं आपल्या संग्रहीं असलेले कागद पत्र देऊं' असे उद्गार काढले. त्यावरूनच आम्हांस हा प्रयत्न केल्यास वावगें होणार नाहीं, असें वाटलें व आम्हीं त्याप्रमाणें प्रसिद्धिपत्रकें काढून जाहिर केलें. त्याबरोबर, आमच्याकडे बऱ्याच कुळांकडून हकीकती येऊं लागल्या, प्रथम सर्व कुळांच्या हकीकती एकत्र छापाव्या असा आमचा हेतु होता; परंतु आलेल्या हकीकती इतक्या आहेत कीं, त्या एकाच भागीं प्रसिद्ध करणें हें आमच्या, तसेंच विकत घेणाऱ्यांच्याहीं, शक्तीबाहेरचें काम होईल असें वाटल्यावरून आम्हीं त्या एकत्र न छापतां, निरनिराळ्या भागानें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें हा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे. ह्या रॉयल आठ पेजी आकाराच्या १५० पृष्ठांच्या भागाची किंमत फक्त आठ आणे ठेविली आहे. ह्या येवढ्या अल्प किंमतीमध्यें एवढीं पृष्टें देणें हें अत्यंत खर्चाचें काम आहे तरी तें, आमच्या आश्रयदात्यांकडून आम्हांस विशेष प्रोत्साहन मिळेल ह्या आशेनें आम्हीं शिरावर घेतलें आहे. तें सिद्धीस नेणार श्री समर्थ आहे.

आज हा 'जाधव घराण्याच्या कैफियती' चा प्रथम भाग आपल्या सेवेस हजर केला आहे. हा ग्रंथ फारच मोठा झालेला आहे. कारण महाराष्ट्रामध्यें जीं जुनीं घराणीं होतीं, त्यांतीलच स्वतंत्र राज्यसुख अनुभविलेलें असें हें घराणें आहे. या घराण्यामध्यें महान् पराक्रमी असे पुरुष निर्माण झाल्याकारणानें त्यांची कारकीर्द वाढणें साहजिक होय. व ती आम्हांस प्रसिद्ध करण्याची संधि श्रीमंत नामदार सरदार शंभुसिंग अमरसिंग जाधवराव राजे मालेगांवकर, यांच्या कृपेनें लाभली, ह्याबद्दल आम्हीं त्यांचे आभार मानीत आहों. श्रीमंत शंभुसिंग यांचे आजे श्रीमंत रत्नसिंह जाधवराव यांस,—हिज़ एक्सलन्सी दि राइट् ऑनरेबल सर हेनरी बार्टल एड्वर्ड् फ्रीअर नाइट् ग्रँड् कम्यांडर ऑफ् दि मोस्ट् एक्झॉल्टेड् ऑर्डर ऑफ दी स्टार ऑफ् इंडिया ॲंड नाइट् कम्यॉंडर ऑफ दी ऑर्डर ऑफ बाथ, माजी गव्हर्नर साहेब बहादुर, इलाखा मुंबई, यांनीं-आपण आपल्या घराण्याचा इतिहास सरकारांत दाखल करावा म्हणून फर्माविलें. त्यावरून श्रीमंत रत्नसिंह जाधवराव यांनीं १८६७ सालीं आपल्या दफ़तराची जुनी माहिती घेऊन, संक्षेपरूपानें एक लहानसा इतिहास लिहून तो सादर केला. त्याचा इंग्रजी तरजुमा साहेब मजकुरांनीं स्वदेशीं नेला.

त्यानंतर मे० सी० ए० किंकेड साहेब बहादुर, दक्षिणेंतील सरदारांचे एजंट-यांची स्वारी १९०६ मध्यें मालेगांव बारामती कोर्ट तपासण्यासाठीं गेली होती; त्यावेळीं त्यांनीं, 'आपण आपल्या घराण्याच्या इतिहासाची एक प्रत आम्हांस द्यावी' म्हणून श्रीमंत नामदार शंभुसिंगजी यांजकडे मागणी केली, व

साहेब बहादुरांनीं जाधवरावांच्या घराण्याबद्दल फार अगत्य दाखविलें. इतकेंच नव्हे तर सन १९०६ चे जून महिन्यामध्यें हिज् म्याजेस्टी दि एम्परर ऑफ इंडिया, एडवर्ड दि सेव्हन्थ यांचे जन्मोत्सवानिमित्त भरलेल्या सरदार लोकांच्या दरबारचे प्रसंगीं सालाबादप्रमाणें, पोलिटिकल एजंट या नात्यानें भाषण करतांना श्री० नामदार शंभुसिंगजी जाधवराव यांच्या घराण्याचा मुद्दाम उल्लेख करून, त्यांच्या प्राचीनत्वाविषयीं अभिमानपूर्वक उद्गार काढले.

हिज् एक्सलन्सी दि राइट ऑनरेबल् सर हेन्री बार्टल एडवर्ड फ्रीयर, गव्हर्नर साहेब बहादुर, यांनीं जाधव घराण्याचा पुराणपणा जाणून मोठ्या कळकळीनें इतिहास मागविला, व सदर घराण्यासंबंधानें अभिमान प्रदर्शित केला; व त्याचप्रमाणें मेहेरबान किंकेडसाहेब यांनीं या घराण्याचा भर दरबारांत गौरव करून, या घराण्याविषयीं जी आस्था दाखविली, ती अवर्णनीय होती. ह्या उभय साहेबबहादुरांच्या आस्थेबद्दल श्रीमंत नामदार सरदार शंभुसिंगजी हे त्यांचे अत्यंत ऋणी आहेत; व ते ह्या उपकाराबद्दल नेहमीं आभार प्रदर्शित करीत असतात.

श्रीमंत नामदार शंभुसिंगजी यांच्या संग्रहीं असलेल्या कागदपत्रांवरून, तसेंच उपलब्ध झाली ती व नवी माहिती अशी सर्व एकत्र करून हा इतिहास तयार केलेला आहे. यांत कांहीं दोष राहिले असतील, अगर प्रकाशांत असलेली उपलब्ध माहितीही दाखल करण्याचें राहिलें असेल तरी ज्या कोणाजवळ, जाधव घराण्यासंबंधानें अधिक उणी माहिती असेल ती त्यांनीं पाठविल्यास त्यांचे आम्हीं अत्यंत आभारी होऊं. देऊळवाडकर घराण्याची वंशावळ व हकीकत आमचे मित्र, श्रीयुत ताम्हणे यांनीं महत्प्रयासानें पैदा करून पाठविली, याबद्दल आम्हीं त्यांचे अत्यंत आभारी आहों. शिवाय सदर ग्रंथ पूर्णपणें तपासण्यासाठीं श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे बी. ए. यांस आम्हीं विनंति करितां ती त्यांनीं मोठ्या आनंदानें स्वीकारिली, व अर्धे अधिक काम होतें न होतें, तोंच ते आजारी पडल्याकारणानें, त्यांच्यानें हें पुस्तक संपूर्ण पाहवलें नाहीं, ह्याबद्दल त्यांनीं खेद प्रदर्शित केला. थोडेचकां होईना! परंतु आमच्या विनंतीस मान दिल्याबद्दल वरील महाशयांचे आम्हीं अत्यंत आभारी आहों. तदनंतर सदर ग्रंथ तपासण्याचे कामीं आमचे मित्र श्रीयुत शिवराम सखाराम शिर्के यांनीं आम्हांस बरीच मदत केली, याबद्दल त्यांचेही ह्या ठिकाणीं आभार मानल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

यानंतर सदर ग्रंथाच्या कांहीं भागासंबंधानें थोडेसें विवेचन करावयाचें आहे. तें हेंच कीं, प्रसिद्ध हेमाद्रिपंतांनीं, व्रतखंडांतील ‘ राजप्रशस्ति’मध्यें जाधव घराण्याची जी वंशावळ दिलेली आहे, तीच गुरुवर्य डॉ० भांडारकर यांनीं आपल्या दक्षिणच्या प्राचीन इतिहासामध्यें पुरवणीदाखल जोडलेली आहे. जाधवघराण्याची परंपरा समजण्यास व्रतखंडाचाच मुख्य आधार आहे. अर्थात् प्रशस्तिवरच भरंवसा ठेवणें भाग पडत आहे. परंतु पूर्ण विचारांतीं तिजमध्यें आह्मांस जे दोष आढळून आले आहेत, ते येथें दिले असतां अप्रासंगिक होणार नाहीं. प्रथम आपणांस श्रीकृष्णाचा काल कोणता हें ठरविलें पाहिजे. महाभारतीय युद्धाच्या कालाचा निर्णय झाल्यास श्रीकृष्णाचा काल निश्चित् होण्यास विलंब लागणार नाहीं. राजतरंगिणीवरून महाभारतीय युद्धाला इ० स० २८९६ वर्षे झालीं असावींत असें दिसतें. ईवल्लीमध्यें, जो शिलालेख सांपडला आहे त्यावरून, इ० स० पूर्वी ३५०० वर्षे, भारतीय युद्धास झालीं असावींत असें दिसून येतें. प्रसिद्ध इतिहासकार एल्फिन्स्टन यांचें ह्मणणें असें आहे कीं, भारतीय युद्ध इ० स० पूर्वी १४५० व्या वर्षी अथवा ग्रीस देशाच्या प्रसिद्ध ट्रोजन युद्धापूर्वी दोनशें वर्षे झालेलें असावें. डॉक्टर हंटर इ० स० पूर्वी बाराव्या शतकांत झाल्याचें म्हणतात. कर्नल टॉड इ० स० पूर्वी ११७९ वर्षांपूर्वी झाल्याचें म्हणतात, ह्याप्रमाणें निरनिराळ्या विद्वानांचे जरी ह्या युद्धासंबंधानें मतभेद असले तरी आपण राजतरंगिणीवरून—कीं जी इ० स० १७४० मध्यें लिहिली आहे; तिचा काल इ० स० पूर्वी २८९६ वर्षे हाच धरून, एकेक पुरुषाची कारकीर्द तीस वर्षांची आहे असें धरून, हिशोब केल्यास श्रीकृष्णापासून दृढप्रहाराच्या कालापर्यंत इ० स० ७४५ वर्षांपर्यंत—म्हणजे इ० स० पूर्वी २८९६ पासून तो इ० स० ७४५ पर्यंत ३६४१ वर्षे होतात, ह्या ३६४१ वर्षांमध्यें प्रत्येक पुरुषाची कारकीर्द तीस वर्षांची धरिली तर १२१ पिढ्या होतात. परंतु ‘ राजप्रशस्ति ’ मध्यें दृढ प्रहारा-

च्या कारकीर्दीपर्यंत, श्रीकृष्णापासून एकंदर सहाच पुरुष दाखविले असून, सातवा दृढप्रहार दाखविला आहे. तेव्हां ह्या मधील पिढ्यांची वाट काय ? गुरुवर्य डॉ० भांडारकर यांसही ह्या पिढ्या मिळाल्या नसाव्या असें दिसतें. जाधवकुळाच्या ह्या पिढ्या सांपडल्यास यदुवंशाचा हा दुवा नीट बसेल. तोंपर्यंत आहे त्याच माहितीवर विश्वसून राहणें भाग आहे. दुसरें सदर ग्रंथामध्यें ' सूक्तिमुक्तावलि ' व ' संगीतरत्नाकर ' ह्या ग्रंथांचे उतारे दिलेले आहेत. ते संस्कृत श्लोक मूळ प्रतींत उतरतेवेळीं क्वचित् स्थलीं अशुद्ध उतरण्यांत आले आहेत. मूळ प्रती आम्हांस न मिळाल्यामुळें, ते शुद्ध केल्यावांचून आम्हीं तसेच ठेविले आहेत. त्याबद्दल मर्मज्ञवाचक आम्हांस क्षमा करितील अशी आशा आहे. कोणाच्या संग्रहीं हे ग्रंथ असल्यास, त्यांनीं त्यांतील, आम्ही ह्या ग्रंथामध्यें घेतलेले श्लोक उतरून पाठविल्यास येत्या भागीं ते शुद्ध करून त्यांचे आभार मानूं.

आतां आम्हांस 'मराठाकुळांच्या इतिहासा' चीं अप्रसिद्ध साधनें गोळा करण्यासंबंधानें ज्या ज्या कांहीं अडचणी दिसून आलेल्या आहेत, त्यांचेंही आम्हीं या ठिकाणीं थोडेंसें विवेचन करितों. तें विवेचन करण्या-पूर्वी 'मराठा-बांधवांसंबंधानें' दोन शब्द लिहिणें अगत्याचें आहे.

हल्लीं प्रत्येक मराठाबंधूची प्रवृत्ति आपणांस क्षत्रिय म्हणावें, ह्या गोष्टीकडे विशेष दिसून येत आहे. शिवाय मराठेतर मंडळींमध्येंही हें क्षत्रियत्वाचें बंड बरेंच पसरलें असून, ते आपआपल्या ज्ञातीच्या मागें विशेषणादाखल क्षत्रिय हें उपपद लावूं लागले आहेत. ह्या त्यांच्या कृतीचा आम्हीं निषेध करतों असें नाहीं: परंतु क्षत्रिय हें नांव नामधाऱ्याप्रमाणें लावण्यांत काय मौज आहे तेंच आम्हांस कळत नाहीं. क्षत्रिय याचाच मूळ अर्थ योद्धा असा आहे. मराठे हे जर योद्धे होते, त्यांचे वंशज मर्दुमकीचीं कामें करीत होते, तर ते क्षत्रियच होत. त्यांस निराळें उपपद लावून घेण्याचें कारणच नाहीं. 'मराठा' हें नांव त्यांस त्यांच्या कर्तबगारीवरूनच पडलें आहे व जो देश त्यांनीं काबीज केला, त्या देशासही, मऱ्हाठा ह्या शब्दावरून महाराठ, महाराष्ट्र अशी व्युत्पत्ति होऊन त्यांनीं संपादिलेला तो देश, म्हणून त्याचें नांव महाराष्ट्र असें पडलें आहे. अर्थात् मऱ्हाटे,—मराठे हे मूळचे क्षत्रियच असल्यानें त्यांस क्षत्रिय हें वेगळें उपपद लावण्याची मुळींच जरूरी नाहीं. ज्याप्रमाणें, रजपूत आपणांस क्षत्रिय हें उपपद लावीत नाहींत, परंतु त्यांच्या लढाऊ पेशावरून त्यांस क्षत्रियच म्हटलें जातें, व ते क्षत्रियच आहेत. राजपूत म्हणजे राजाचा मुलगा व त्यांनीं जो देश काबीज केला तें राजस्थान–राजपुताना. राजस्थान म्हणजे राजाचें ठाणें, अर्थात् ठिकाण, अगर राजपुताना,- राजाचे पूत म्हणजे मुलगे, राजपूत यांचा देश. ह्याप्रमाणें मराठे व रजपूत ह्या दोन्हीं जातींमध्यें सादृश्य आहे. म्हणून मराठे अगर रजपूत यांनीं ते स्वतःसिद्ध क्षत्रियच असतां, त्यांस ' क्षत्रिय ' हें निराळें उपपद लावून घेण्याची जरूरी नाहीं असें आम्हांस वाटतें. आतां ज्या दुसऱ्या ज्ञातींनीं कीं, जे खालच्या वर्गांतील आहेत व महाराष्ट्रीय म्हणजे महाराष्ट्रांत राहणारे म्हणून लौकिक-दृष्ट्या ज्यांस मराठे म्हणतात, त्या ज्ञातीही, मराठ्यां-पैकींच आहेत. त्या दुसऱ्या कोणत्याही सृष्टीमधून उत्पन्न होऊन आलेल्या नाहींत, परंतु त्यांच्या अंगीं मराठ्यांइतकी मर्दुमकी नसल्यामुळें, त्यांनीं निरनिराळे धंदे स्वीकारले. अर्थात् त्यांचें क्षत्रियत्व नष्ट झालें. पुढें ज्ञातिबंधारणें फारच कडक झाल्यामुळें, ह्या ज्ञाती साफ वेगळ्या झाल्या आणि मराठ्यांचा व त्यांचा जवळचा संबंध दूर झाला व ते एकमेकांस परकी लेखूं लागले. असो.

ज्याप्रमाणें ब्राह्मणत्वास ब्रह्म–चराचरसृष्टि एक-स्वरूपाची भासणें,–जाणण्याची जरूरी आहे. त्याच-प्रमाणें क्षत्रियांस 'क्षत्रियत्वाची' जरूरी आहे. ब्राह्मण अगर क्षत्रिय ह्या दोन्हीं वर्णांची स्थिति, सध्यां त्यांच्या गुणकर्मांवर नसून, वर्णाश्रम धर्मावरच अवलंबून आहे, अर्थात उभय वर्ण पंगु आहेत, तेव्हां ब्राह्मण ते ब्राह्मण व क्षत्रिय ते क्षत्रिय हा भाव नेहमीं असाच राहणार: तेव्हां उभयपक्षीं वाद करण्याची जरूरी आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. व क्षत्रि-यत्वाबद्दल कोणाच्या पुराव्याचीही जरूर नाहीं.

ज्याप्रमाणें प्रत्येक मराठा बंधूस आपणांस क्षत्रिय म्हणावें असें वाटत असतें: त्याप्रमाणें तें क्षत्रियत्व सिद्ध करून देणारा आपल्या कुळाचा इतिहास प्रसिद्ध व्हावा अशी इच्छा कां असूं नये ? आपण ज्या

माननीय कुलामध्यें जन्म घेतलेला आहे त्या कुलांतील थोर पुरुषांच्या मर्दुमकीचा इतिहास अगर त्याचीं साधनें गोळा करण्यासंबंधें प्रयत्न न केल्यानें, आपण आपल्या थोर कुलास व त्या कुलात जन्म घेतलेल्या आपल्या पूर्वजांस विसरण्यासारखें नाहीं काय? ज्या कुलांतील पुरुषांस, आपल्या कुलांतील थोर महात्म्यांच्या मर्दुमकीचा प्रकाश जगभर पडावा अशी इच्छा नसेल, त्यांनीं आम्हीं क्षत्रिय आहों म्हणून फक्त नांवांमध्येंच फुशारकी मारण्यांत मुळींच हंशील नाहीं. कारण ज्यांस आपल्या कुलाची चाड नाहीं, ते इतरांची कसे बाळगणार? आपल्या कुलाचा इतिहास लिहिलेला असला, तर तो आपल्या पिढीस किती उपयुक्त होईल! त्यापासून आपल्या कुलांतील तरुण व अज्ञान पिढीच्या हृत्पटलावर कोणत्या भावना उदय पावतील व त्यांस आपल्या थोर कुलाबद्दल कितपत अभिमान वाटेल! याचा त्यांनीं कधीं तरी विचार केला आहे काय? आमच्या माहितीमध्यें, अशीं कांहीं मराठ्यांचीं कुलें आढळलीं आहेत कीं, त्यांस आपण कोणाचे कोण हें सुद्धां माहीत नाहीं. तसेंच भाद्रपद महिन्यामध्यें अगर श्राद्ध वगैरे संस्कारांच्या वेळीं, आपला आजा, पणजा, भाऊ, बहीण, व इतर गोत्रांतील व संबंधी मंडळीच्या नांवें पिंडदान करतेवेळीं, त्यांचीं नांवें माहिती नसल्यामुळें कोणातरी वडील मनुष्यास बोलाविणें भाग पडत असतें अगर भटजीजवळ टिपण असल्यास ते त्या टिपणाचा उपयोग करीत असतात, नाहींतर भलत्याच नांवानें पिंडदान करितात. तसेंच गोत्रांचें, तेंही कित्येकांस माहीत नसतें, म्हणून उपाध्ये 'काशी गोत्रे' असें म्हणून कार्यभाग संपादितात. अशा प्रकारची स्थिति, आपला इतिहास संग्रहीं नसल्यामुळेंच होते. तो प्रसंग इतिहास व वंशवृक्षाच्या प्रसिद्धीनें निघून जाणारा आहे व तो इतिहास आपल्या भावी पिढीस आदर्शरूपानें उपयोगी पडणारा आहे, हें सर्व मराठा बांधवांनीं लक्षांत वागवावें. असो.

ज्यावेळीं आम्हीं मराठा कुळांच्या इतिहासाचीं साधनें गोळा करण्यासाठीं प्रवास केला त्यावेळीं, आम्हांस ज्या अडचणी आलेल्या आहेत त्या येथें नमूद करीत आहों.

१ पहिली अडचण ही कीं, अज्ञानावस्थेमुळें इतिहासप्रकाशनाचें महत्त्व न जाणणारे लोक आपल्या समाजांत पुष्कळ आहेत. त्यामुळें संग्रहीं असलेले कागद अगर कैफियती कसरीच्या स्वाधीन होत आहेत.

२ दुसरी अडचण ही कीं, "आम्हीं आहों ते आहों. आतां आमच्या कुलाचा इतिहास प्रसिद्ध होऊनच लोक आम्हांस थोडेच ओळखणार आहेत? आमचे बाप दादे येथील गांवचे वतनदार अगर इनामदार होते हें सर्व गांवांतील व सर्व सोयरे यांस माहीत आहे. मग आम्हांस इतिहास प्रसिद्ध करूनच काय करावयाचें आहे?" असें म्हणणारेही बरेच अज्ञानी लोक इंग्रजसरकारच्या राज्यांत विद्येचा इतका फैलाव झाला असूनही अद्याप आहेत.

३ तिसरी अडचण ही कीं, ज्यांना इच्छा आहे, त्यांच्याजवळ कागदपत्रें नसल्यामुळें, त्यांस आपल्या कुलासंबंधींचे कागदपत्र प्रसिद्ध करावयास देतां येत नाहींत.

४ चवथी अडचण ही कीं, ज्यांच्या संग्रहीं अद्याप भल्या मोठ्या पेट्या भरून कागद पत्रें असूनही, त्यांस केवळ भाऊबंदकीमुळें स्वतःच्या कुलाचा इतिहास प्रसिद्ध व्हावा अशी इच्छा होत नाहीं. कारण जेजे भाऊबंद आपलें वतन म्हणजे पूर्वजांनीं मिळविलेल्या जमिनी सोडून कांहीं कारणामुळें देशोधडीस लागले, त्यांचे वंशज इतिहास व वंशवृक्षाच्या प्रसिद्धीनें पूर्वींच्या समाइक जमिनींवर आपला हक्क शाबीत करतील ही निष्कारण भीती वाटत आहे. त्यांस एवढेंही कळत नाहीं कीं, जरी ते भाऊबंद आज आपल्या जमिनीवर हक्क सांगून पुढें आले तरी 'वहिवाटीचा' कायदा पुढें आल्यानें, त्यांचा हक्क शाबीत होणें जड जाईल. मग ही आपल्या कुलाच्या प्रसिद्धिची संधी त्यांनीं कां गमवावी? थोड्याशा स्वार्थासाठीं, प्रत्यक्ष भावास भाऊ न समजणारे लोक आपल्या ह्या हिंदुस्थानामध्यें निर्माण होऊं लागल्यामुळेंच, आज आम्हीं अन्नास महाग झालों आहों! पदोपदीं आमची जी इतरांकडून हेलना होत आहे याचें कारणही भाऊबंदकीच होय! या भाऊबंदकीनेंच मराठ्यांचे तसेंच मराठ्यांकडून मिळविलेलें पेशव्यांचें राज्य नाहींसें झालें आहे. स्वतः एका घरामध्यें, एका कुटुंबांतील

माणसांमध्यें, एका गोत्रांतील बंधूंमध्येंच एकी नाहीं! जो तो निव्वळ स्वर्थासाठीं एकमेकांच्या उरावर बसावयास पाहतो! अशा ह्या परंपरेनेंच आमची संघशक्ति लय पावलेली आहे. याउप्पर तरी आमचे बांधव, आपल्या संग्रहीं आपल्या कुलांतील पुरुषांची मर्दुमकी प्रकाशांत आणविणारे कागदपत्र असल्यास ते कसरींच्या भक्ष्यस्थानीं न पाडतां प्रसिद्ध करावयास देतील अशी आशा आहे. नाहीं तर ही वेळ गमविल्यास, कालांतरानें, ते कागदही नाहींसे होऊन, तेल गेलें तूप गेलें व हातीं धुपाटणें आलें अशी स्थिति होऊन परकियांच्या मतें आम्हीं मराठे म्हणजे निर्माल्यवत्, पराक्रमहीन, व त्याज्य असें ठरले जाऊं.

५ पांचवी अडचण ही कीं, आमच्याजवळचे कागदपत्र घेऊन जाऊन हे आमच्यावर कांहीं तरी लचांड आणतील अगर ज्याप्रमाणें कांहीं धूर्त मंडळींनीं आमच्या वाडवडिलांपासून कागदपत्रें नेऊन जमिनी गिळंकृत केल्या, त्याप्रमाणें गिळंकृत करतील म्हणून कागदपत्रें असूनही अज्ञानावस्थेमुळें न देणारे बरेच लोक समाजांत आहेत. आणखी तो त्यांचा समजही कांहीं खोटा नाहीं. कारण अशीं ' जमिनी गिळंकृत केल्याचीं बरींच उदाहरणें आमच्या ऐकण्यांत आहेत.'

६ सहावी अडचण ही कीं, आपल्या कुळाचा इतिहास प्रसिद्ध व्हावा ही इच्छा आहे, परंतु बेफिकीरीपणानें कागदपत्रें मागावयास केव्हांहीं गेलें तरी वेळ न मिळणारे अगर 'पाहूं मग एखादे वेळीं' असें बोलून सबंध वर्ष येरझारा घालावयास लावणारेही निष्काळजी लोक बरेच आढळून आले. यांस दुसऱ्याच्या वेळाची किंमतच समजत नाहीं असें दिसतें.

७ सातवी अडचण ही कीं, पदरीं मोठमोठे रुमाल आहेत, स्वतः जहागिरदार असल्यानें, तिकडे लक्ष कमी, त्यामुळें पायखान्यापर्यंतही रुमाल पोहोंचले आहेत तरी त्यांची दाद नाहीं. त्या रुमालांत पूर्वी स्वराज्याच्या अमदानींमध्यें मिळालेल्या इनाम जमिनींच्या सनदाही तशाच कुजत पडल्या आहेत तरी यांस माहीतही नाहीं. सनदा पाहिल्यावर डोळे उघडणारे! हरीचेलाल अहोरात्र व्यसनामध्यें गर्क झालेले आढळून आले. त्यांच्या दारीं पंचवीस खेपा घातल्या तरी 'काय करावें हो! आज मला मुलींचा वेळ नाहीं! ते आमचे स्नेही × × × × × × खामगांवाहून आले आहेत त्यांस आज मेजवानी आहे. पुढें केव्हांतरी या मग पाहूं! असें ह्मणून खेपा घातल्या असतां, शेवटीं कंटाळून आंगावर येणारेही बरेच लोक आढळले. पण ते उंच-श्रीमंत अशा वर्गांतील होते.

अशा प्रकारच्या अडचणी आम्हांस आढळून आल्या. ह्या येवढ्या अडचणी प्राप्त झाल्या असूनहि आह्मीं, आपलें हातीं धरलेलें कार्य शेवटास नेण्यासाठीं कंबर बांधिली. व आज तीन वर्षांच्या प्रयत्नाला ह्या पहिल्या भागाच्या प्रसिद्धीचें तरी यश प्राप्त झालें आहे.

खानदानी-पिढीजाद मराठा बांधव हो! आह्मीं हें इतिहास-प्रसिद्धीचें कार्य आमचें पोट भरावें ह्मणून हातीं घेतलेलें नाहीं. या इतिहास-प्रसिद्धीपासून 'मराठ्यांचा एक महाभारतासारखा' ग्रंथ व्हावा व त्यांत पूर्व व सध्यां अस्तित्वांत असलेल्या मंडळींचा इतिहास, त्यांचे फोटो त्यांची हुद्यासह नांवनिशी प्रसिद्ध होऊन तें एक मराठा ज्ञातीचें ह्या विसाव्या-शतकांतील इतिहासरूपी स्मारक व्हावें, हाच आमचा हा मराठा—कुळांचा इतिहास प्रसिद्ध करण्याचा हेतु आहे. आजपर्यंत अशाप्रकारचा प्रयत्न कोणीही केला नाहीं; म्हणूनच आपल्या पूर्वजांची एकंदर हकीकत मिळत नाहीं. ही उणीव सांप्रत आपण भरून काढण्याचा हस्तें परहस्तें प्रयत्न केला पाहिजे. आपण जर आम्हांस ह्या कामीं द्रव्यसाहाय्य व आपल्या कुळाच्या अस्तित्वांत असलेल्या हकीकती देणार नाहीं तर आमच्या हातून हें कार्य कसें सिद्धीस जावें? याचा आपणच विचार करा. मराठ्यांच्या कैफियती अगर जेननामे लिहून ठेवण्याची कांहीं कांहीं घराण्यांमध्यें अद्यापही वहिवाट आहे. कित्येक कुलांच्या संग्रहीं असलेलीं कागदपत्रें व बखरी अनेक दंग्याधोप्यांत वगैरे नाहींशी झालीं आहेत. तसा प्रसंग या पुढेंही न येण्यासंबंधानें आपण खबरदारी घेणें म्हणजे ते छापवून संग्रहीं ठेवणें हें अत्यावश्यक होय.

ज्या ज्या कुलांतील पुरुषांनीं आमच्या विनंतीस मान देऊन, आपल्या संग्रहीं असलेलीं कागदपत्रें व कैफियती तसेंच वंशवृक्ष त्याप्रमाणेंच फोटो पाठवून दिले, तसेंच आम्हांस हा ग्रंथ प्रकाशित करण्याच्या

कामीं द्रव्यसहाय्य व उत्तेजन दिलें, त्याबद्दल आम्हीं त्यांचे अत्यंत ऋणी आहों. त्याप्रमाणेंच सदर जाधव-घराण्याची कैफियत हा ग्रंथ श्रीमंत नामदार सरदार शंभुसिंगजी जाधवराव राजे मालेगांवकर यांस अर्पण करण्यासंबंधानें विनंति केलीं असतां, ती त्यांनीं मान्य करून परवानगी दिली, यावद्दल आम्हीं श्रीमंत शंभुसिंगजी राजे यांचे अत्यंत आभारी आहों.

आतां आम्हीं या पुढील भाग कसे प्रसिद्ध करणार तें थोडक्यांत दर्शवितों. आज आम्हीं ह्या पहिल्याभागीं फक्त जाधवघराण्याची हकीकत प्रसिद्ध केली आहे. यानंतर खालील माननीय कुलांतील पुरुषांच्या हकीकती येत्या भागीं प्रसिद्ध करणार आहों; करितां त्या त्या कुळांतील पुरुषांनीं, हा ग्रंथ पोहोंचल्यापासून एक महिन्याच्या आंत आपआपल्या हकीकती व वंशवृक्ष लिहून पाठविण्याची कृपा करणें. *जाधव घराण्याच्या इतर शाखा वाघोलीकर जाधव, आडवलकर, शिरगांवकर, त्र्यंबककर, वांदिवडेकर, साटम ऊर्फ जाधव, भोंसले–सातारकर, कोल्हापूरकर, तंजावरकर, नागपुरकर, अक्कलकोटकर, पेंडुरकर, आचरेकर, मानगांवकर, तरंदळेकर, वरवडेकर, आंब्रडकर, असारोंडकर, प्रभावळकर, वाडकर वगैरे, शिर्के, चिवेली, कुटरे, खोपड, दळवी भोंसले, होडावडेकर, मानगांवकर, तळेगांवकर, आंब्रडकर, दळवी, तळगांवकर, जानवलकर, पालवनकर; नाटळ, भिरंवडे, वरदें, आवळेगांवकर, मसूरकर, केसरकर, सावंत, आचिरणेकर, सांगळवाडकर, राव, पांवसकर, नारिंग्रेकर, मिटबांवकर, कांदळगांवकर, बिरवाडकर, रेडकर, सत्तरकर, राणे, वाडकर, इलयेकर तावडे, वागवे देसाई, वांदिवडेकर, वेंगुर्लेकर, प्रभु, मसूरकर मुळीक प्रभु. चिंदरकर पाताडे, वाटूळचे चव्हाण, फणसोपचे साळवी, भेलसईचे कदम, शृंगारपूरचे सुर्वे, तांबूळकर, परमेकर, आजरेकर देसाई, पेंढूरकर ताटे, तारळेकर माहाडिक, आंगरे वजारत महासरखेल, कदम बांडे, कागलकर घाटगे, मलवडीकर घाटगे, घोरपडे अमिरुल–उमराव, घोरपडे गजेंद्रगडकर, चव्हाण डफळे देशमुख, थोरात, पाटणकर–साळुंखे, निंबाळकर, फलटणचे पवार, देवास व जतचे पवार, सुकठणकर, पवार सुपेकर, शिंदे साहेब सुभा, शिंदे कनेरखेडकर, सेनासाहेब सुभा, चौधरी, अमिरुल-उमराव शितोळे, शिलाहार ऊर्फ शेलार, नांदवीकर सावंत, वडघरचे नाईक, पासलकर, मालसुरे, हिम्मत-बहाद्दर, ह्मसवडकर मान्यांचीं दोन घराणीं, शिंदे, गायकवाड, निकम, पांढरे, रणनवरे, बासडे, राव-रंभा, देवगडचे जगताप इनामदार, खळतकर वाघमारे, सेनापति दाभाडे, गुर्जर, खुळे, वाघ, भोयटे, भापकर, विचारे, पायघुडे, वाघमारे, खानवीलकर, मोहिते, घायगुंडे शेडगे, खल्लाटे, लोखंडे, भिसे, धुळप ( मोरे ) मिसाळ, पिसाळ, बोधे, बरगे, पोळ, लिगाडे, फडतारे आंगळे, निंगळे, सेवाळे, आंगणे, रणदिवे, बाबळे, गाढवे, रसाळे, सोनावणे, काकडे, काटकर, शिनगारे, ढमढेरे, मालप, फाकडे, भोगले, पालव, व इतरही निरनिराळ्या मराठा कुळांतील पुरुषांस कीं, ज्यांचीं नांवें स्थलसंकोचास्तव ह्या ठिकाणीं लिहिलीं नसतील त्या सर्वांसही आपआपल्या हकीकती पाठविण्यासंबंधानें आम्हीं जाहीर विनंति करीत आहों. त्यांनीं खालील गोष्टीकडे अवश्य लक्ष देणें.

१ आपल्या कुळासंबंधाच्या प्रचारांत असलेल्या दंतकथा, कैफियती व कागदपत्रें यांच्या आधारें आपला इतिहास लिहून पाठवावा. सोबत वंशवृक्षही रवाना करावा. महत्त्वाचे कागद, पत्रें यांच्या नकला प्रसिद्धीसाठीं पाठवाव्या. आपल्या संग्रहीं, आपल्या पूर्वजांचे फोटो, हस्ताक्षर, जन्मटिपणें अगर कुंडल्या असल्या तर त्यांचेही उतारे व मूळ कागद पाठवावे. ते परत करण्यांत येतील.

२ राजे, महाराजे, सरदार, जहागिरदार, इनामदार, देशमुख, मामलेदार, मुनसफ, वहिवाटदार, सुभे, पोलीस इन्स्पेक्टर, पोलीस सब इन्स्पेक्टर, मिलिटरी खात्यांतील, कर्नल, कमांडन्ट, कॅपटन, लेफटनंट, ए. डी. सी. सुभेदार, मेजर तसेंच निरनिराळ्या संस्थांचे जनक, प्रेसिडेंट, सेक्रेटरी, व्हाइस प्रेसिडेंट, प्रसिद्ध पुरुष कीं जे सावकारी शेती अगर धंदे करितात असे,

*ज्या ज्या कुलांतील पुरुषांनीं आपल्या हकीकती या पूर्वीच आमच्याकडे पाठविल्या आहेत त्या पुढील भागीं दाखल होतीलच. ज्यांनीं पाठविल्या नसतील त्यांनीं विलंब लावूं नये. फक्त, एक महिन्याची अवधि दिलेली आहे ती वाढविण्यांत येणार नाहीं. एप्रिल ३० तारखेपर्यंत हकीकती याव्या. कारण २ रा भाग जून अखेर प्रसिद्ध होणार आहे.

मेडिकल सर्जन, असिस्टंट सर्जन, पोस्टमास्तर, डॉक्टर की ज्यांनीं कोणत्याही कॉलेजची डिग्री मिळविली आहे असे, इलेक्ट्रिक इंजिनिअर, इंजिनिअर, प्रोफेसर, दिवाण, नायबदिवाण, फौजदार, नायबफौजदार, नेटिव्ह अ. कलेक्टर, असिस्टंट कलेक्टर, पदवीधर, एम. ए. एल एल बी ; एम. ए ; बी. ए, एल एल. बी.; बी ए.; रावबहादुर, रावसाहेब, जे. पी; एल. ए. जी. वकील; इत्यादि बंधूंस, सप्रेम विनंति करण्यांत येत आहे कीं, आपण आपआपले फोटो; आपला त्रोटक वृत्तांत, त्यांत जन्माची तारीख सन वगैरे, कुंडली असल्यास ती, कुळाची साधारण माहिती; गोत्रप्रवर; वतनी अगर वास्तव्याच्या गांवाचें नांव, नोकरीचा अगर पूर्वजांनीं मिळविलेले हुद्दे. सरासरी सालीना उत्पन्न, शरीर संबंध वगैरे माहिती अवश्य पाठविण्याची कृपा करणें. संस्थांच्या जनकांनीं संस्थेचा त्रोटक वृत्तांत, तिचा उद्देश, उत्पन्न कामें वगैरे अहवाल पाठविणें. दिरंगाई करूं नये. आमच्याकडून वेगळें पत्र येईल म्हणून वाट पाहूं नये. ते सर्व फोटो; मराठा कुळांच्या इतिहासांत प्रसिद्ध व्हावयाचे आहेत. डायरेक्टरीमध्यें प्रसिद्ध करण्यासाठीं, आम्हीं जे फार्म सदर ग्रंथाबरोबर ठेविले आहेत ते ज्यांनीं भरून पाठविले नसतील त्यांनीं अगत्य भरून पाठविणें. कारण त्या फॉर्ममधील नांवें मराठा-डायरेक्टरीमध्यें प्रसिद्ध करणार आहों. सदर फॉर्ममध्यें ज्या ज्या मराठा-पुढाऱ्यांची इच्छा मराठा-कुळांच्या इतिहासास वर्गणीदार व्हावयाची नसेल, अशा मराठा पुढारी मंडळींचीही नांवें आपण आपल्या नांवाबरोबर लिहून पाठविल्यास हरकत नाहीं. तींहीं नांवें डायरेक्टरीमध्यें प्रसिद्ध करण्यांत येतील. सर्व हकीकत सुवाच्य अशा बालबोध लिपीमध्यें, लिहून पाठवावी. मोडीमध्यें लिहून पाठविण्याची तसदी घेऊं नये.

खेरीज सर्वत्र बांधवांस अशी विनंति आहे कीं, त्यांनीं ह्या कार्यास हस्तेंपरहस्तें मदत करावी. हा जाधव-घराण्याच्या कैफियतीचा प्रथम भाग मराठा-मित्राच्या आश्रयदात्यांकडून थोडेंसें पारितोषिक घेऊन १९११ सालच्या भेटीदाखल दिला आहे. सदर पुस्तकाचा आकार पाहतां, आम्हीं त्यांजकडून घेतलेलें पारितोषिक कांहींच नाहीं, अशी त्यांची खात्री होईल. असो. तरी यानंतर प्रत्येक तिमाहीस प्रसिद्ध होणारे भाग, आपणांस सदर ग्रंथाच्या आश्रयदात्यांमध्यें नांव नोंदिल्याशिवाय मिळावयाचे नाहींत. आपण या ग्रंथाच्या आश्रयदात्यांमध्यें नांव नोंदिल्यासच यापुढें प्रसिद्ध होणारे प्रत्येक भाग आपणांस आठ आठ आण्यांस मिळतील. या साठीं या पुस्तकांत असलेला तक्ता भरून पाठविणें. तक्ता भरून पाठविल्यास अत्युत्तम होईल. कारण, त्यांत दुसऱ्या ज्या आपल्या आप्त स्वकीयांस अगर बंधूंस 'मराठा कुळाच्या इतिहासामध्यें' नांव नोंदणें असेल त्यांचींही नांवें भरून पाठवितां येतील. 'मराठा कुळांच्या इतिहासाच्या' आश्रयदात्यांमध्ये एप्रिल ता० ३० च्या आंत नांव नोंदणारांसच या ग्रंथाचे सर्व भाग प्रत्येकीं आठ आण्यांस मिळतील. नंतर नांवें नोंदणारास एक रुपया किंमत द्यावी लागेल. कोणताही विवक्षित भाग घेऊं इच्छिणारांस तो मिळणार नाहीं. त्यांस मूळपासूनचे भाग रवाना करण्यांत येतील.

शेवटीं, हा ग्रंथ छापण्याच्या वेळीं तांतडीनें छापिला गेल्यामुळें, यांत कांहीं अशुद्धें, ऱ्हस्व, दीर्घ वगैरे दोष राहिले आहेत. कित्येक ठिकाणीं, मात्रा, वेलांट्या वगैरे छापतेवेळीं उडून गेलेल्या आहेत. तरी त्यांचें शुद्धीपत्र न देतां तें वाचते वेळीं सहज समजण्यासारखें असल्यामुळें तसेंच ठेविलें आहे. याबद्दल सहृदय वाचक क्षमा करितील अशी आशा आहे.

अखेर ज्या जगचालकाच्या कृपेनें, आरंभिलेल्या कार्यास ह्या पहिल्या भागानें मूर्तस्वरूप आलें आहे, त्या जगचालकाचे सानंद आभार मानून, पुढील भागांही आपला कृपाकटाक्ष सदोदित असाच ठेव म्हणून त्यास नम्र विनंति करीत आहें.

आपला सर्वांचा नम्र दास,

**गोपाळ दाजीबा दळवी.**

प्रकाशक,

भायखळा चमेलीची वाडी, ता० ५-३-१२

## जाधव घराण्याची कैफियत रचनेच्या कामीं पुढील साधनांचा यथाकाल उपयोग करण्यांत आला आहे.

१ श्रीमंत नामदार सरदार शंभुसिंगजी यांचें दप्तर चाळून पाहतां, मागील काळच्या दोन बखरी मिळाल्या. सदरहू बखरी अगदीं जुनाट व दुर्बोध अक्षरांत लिहिलेल्या असून, जागजागीं अक्षरें उडालीं आहेत. मधून मधून सदर बखरीचे कागदही जळाले आहेत. ह्या बखरी पूर्वीच्या जमाखर्ची पद्धतीनें सुख्या कागदावर लिहिल्या आहेत; व मधून मधून कित्येक बंद विस्खलित झालेले आहेत. त्या योगानें इतिहासाचा संदर्भ लागण्यास फार कठीण गेलें.

२ नामदार डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर एम्. ए. पी. एच्. डी. एल्. एल्. डी. यांनीं ' एनशन्ट हिस्टरि ऑफ धि डेक्कन ' या नांवाचा एक बहुमोल ग्रंथ फार शोधपूर्वक लिहिला आहे. त्याचा, प्राचीन इतिहास लिहितेवेळीं आम्हांस बराच उपयोग झालेला आहे.

३ ' काव्येतिहाससंग्रह ' नांवाचें मासिक, पुणें गव्हर्नमेंट हायस्कूलचे माजी हेडमास्तर रा० सा० काशिनाथ नारायण साने बी. ए. हे काढीत असत. त्यांत सातारकर छत्रपतींच्या दप्तरांतले जुने कागद व पत्रें आणि मोठमोठ्या घराण्यांच्या बखरी वगैरे बऱ्याच प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांचाही प्रसंगवशात् उपयोग केलेला आहे.

४ श्रीयुत, गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए. बडोद्याच्या राजपुत्र विद्यालयाचे अध्यापक, यांनीं मराठी व मुसलमानी रिसायतीसंबंधानें स्वतंत्र दोन मोठालीं पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांचाहि बराच उपयोग करण्यांत आलेला आहे.

५ लेफ्टेनंट कर्नल जेम्स टॉड, माजी पोलिटिकल एजंट, राजपुताना, यांनीं राजस्थानचा इतिहास लिहिला आहे. त्याचाही प्रसंगवशांत् उपयोग करण्यांत आलेला आहे.

६ साताऱ्याचे पोलिटिकल एजंट कॅप्टन जेम्स ग्रँट डफ साहेब, यांनीं निरनिराळ्या मराठे घराण्यांपासून मिळविलेल्या व तसेंच सरकारी दप्तरांत सांपडलेल्या कागदपत्रांच्या आधारानें मराठ्यांचा बराच विस्तृत इतिहास इंग्रजींत लिहिला आहे, त्याचा बराच उपयोग करण्यांत आलेला आहे.

७ नेक नामदार सर बार्टल फ्रियर साहेब बहादुर यांच्या सांगण्यांवरून श्री० रत्नसिंहजी यांनीं तयार करविलेली संक्षिप्त इतिहासाची प्रत.

८ तसेंच, सुक्तिमुक्तावली, संगीत रत्नाकर, गंगावाकिली, ज्ञानेश्वरी, विजापूरचा इतिहास, निजामशाही, इतिहास संग्रहाचे कांहीं अंक, मे. ॲक्वर्थ साहेबांचें पोवाड्याचें पुस्तक, भारतीय साम्राज्य, भारतवर्ष, कांहीं अंक, विविधज्ञानविस्ताराचे कांहीं अंक, श्री० शाहू छत्रपति यांची रोजनिसी व पेशव्यांच्या दप्तरांमधील पत्रें-वगैरे.

ह्या सर्व ग्रंथकर्त्यांचे आम्हीं अत्यंत आभारी आहों.

---

ह्या जाधव घराण्याच्या कैफियतीचे चार भाग केले आहेत.

**भाग पहिलाः**—श्रीकृष्णापासून शंकरदेवापर्यंत—( इ० स० १३१३ ) देवगिरीच्या राज्याच्या आस्तित्वापर्यंत.

**भाग दुसराः**—गोविंददेवापासून लुखजी व शिंदखेडच्या दत्ताजीरावापर्यंत.

**भाग तिसराः**—सुजनसिंहापासून, धनाजी जाधवापर्यंत ( इ० स० १७१० ).

**भाग चवथाः**—चंद्रसेनापासून, हल्लींच्या शंभुसिंग जाधवरावांपर्यंत ( इ० स० १९१० ).

### धनाजी जाधवरावांचा शिक्का.

राजाराम चरणीं दृढ भाव ।
सेनापति धनाजी जाधवराव ॥

### रतनसिंग जाधवराव मालेगांवकर यांचा शिक्का.

श्रीशंभोरमरसिंहस्य सुवर्णपदपंकजम् ।
यादवस्य कुलोत्तंसो रत्नसिंहो विराजते ॥

# मराठी ग्रंथप्रकाशक मंडळ.

## मराठा-मित्र पुस्तकमाला.

ह्या मालेंत आजपर्यंत सहा पुष्पें गुंफिलीं असून, यानंतरही अनेक मनोवेधक, चित्ताकर्षक व प्रगतिपर-सामाजिक, ऐतिहासिक, धार्मिक-पुस्तकें, अनेक विद्वान् मंडळींकडून लिहवून घेऊन प्रसिद्ध करण्यांत येतील. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांवर विद्वानांचे अत्युत्तम अभिप्राय मिळाले असून, पहिल्याच पुष्पास दक्षिणा प्राइझ कमिटीनें दहा रुपयांचें बक्षिस दिलें आहे. यानंतर सदर मालेंत, मराठा कुळांचा इतिहास व इतर सामाजिक ऐतिहासिक कादंबऱ्या, धार्मिक व उपदेशपर ग्रंथ विद्वान् मंडळींकडून पसंत करून प्रसिद्ध करण्यांत येतील. ज्या ज्या ग्रंथकर्त्यांकडून प्रसिद्धीकरितां पुस्तकें येतील, तीं कमिटीकडून तपासवून पसंत असल्यास ग्रंथकर्त्यास मोबदला देण्यांत येईल. नापसंत पुस्तकें ग्रंथकर्त्याच्या खर्चानें परत करण्यांत येतील.

## मालेचे नियम.

**सदर मालेचा उद्देशः**—बहुजनसमूहामध्यें ज्ञानाचा फैलाव व्हावा, त्यांस ऐतिहासिक वाङ्मय कंटाळवाणें न वाटतां तें वाचण्याची उत्कंठा लागावी, त्यांच्या आचारविचारांत ( सामाजिक व धार्मिक ) आवश्यक असे फेरफार व्हावे, अल्पमोली व बहुगुणी अशा पुस्तकांचा त्यांस संग्रह करितां यावा. हाच मालेचा उद्देश आहे.

**हितचिंतकः**–मालेस शंभर किंवा त्यापेक्षां जास्त रकम देणारांस हितचिंतक समजण्यांत येईल. त्यांचीं नांवें मंडळाच्या हितचिंतकांमध्यें नोंदिलीं जाऊन, कमिटीमध्येंही दाखल केलीं जातील त्यांस मराठा-मित्र एक प्रत व मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें ( लायब्ररी एडीशन ) प्रत्येकीं दोन प्रती पाठविण्यांत येतील. व त्यांचीं नांवें मालेच्या प्रत्येक पुस्तकाच्या आरंभीं प्रसिद्ध करण्यांत येतील.

**तहाहयात आश्रयदातेः**—मालेस पंचवीस रुपये किंवा शंभराच्या आंत रकम देणारास मंडळाचे तहाहयात आश्रयदाते समजण्यांत येईल. त्यांस मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें (लायब्ररी एडिशन) प्रत्येकीं एक प्रत पाठविण्यांत येईल व त्यांचीं नांवें मालेच्या प्रत्येक पुस्तकाच्या आरंभीं प्रसिद्ध करण्यांत येतील.

**कायमचे आश्रयदातेः**—मालेस एक रुपया देणारास मंडळाचे कायमचे आश्रयदाते समजण्यांत येईल. त्यांस मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें निम्या किमतीनें मिळून योग्य तें टपाल हांशील आकारण्यांत येईल. व्ही. पी. चा चार्ज प्रत्येक वेळचा एक आणा आकारण्यांत येणार नाहीं. त्यांचीं नांवें साल अखेरच्या मालेच्या पुस्तकांत प्रसिद्ध करण्यांत येतील.

**आश्रयदातेः**—मालेमध्यें नांवें नोंदणारांस मंडळाचे आश्रयदाते समजण्यांत येईल. त्यांस मालेमध्यें प्रसिद्ध होणारी सर्व पुस्तकें निम्या किंमतीनें मिळून योग्य टपाल हांशील व व्ही. पी. चार्ज एक आणा आकारून पुस्तकें रवाना करण्यांत येतील.

मालेमध्यें नांवें नोंदणारांनीं, हितचिंतक, तहाहयात आश्रयदाते, कायमचे आश्रयदाते, व आश्रयदाते ह्या चार वर्गांपैकीं ज्या वर्गात नांव नोंदणें असेल, त्या वर्गाचा अवश्य खुलासा करावा.

## लक्षांत ठेवावयाचे नियम.

१ कमिटीनें जें पुस्तक पसंत केलें असेल तें प्रत्येक आश्रदात्यास कबूल करणें भाग पडेल.

२ कोणत्याही सबबीवर व्ही. पी. परत न करण्याची खबरदारी घेणें.

३ व्ही. पी. पाठविण्यापूर्वी प्रत्येकास एक अलाहिदा कार्ड रवाना करण्यांत येईल.

सर्व पत्रव्यवहार—**श्रीयुत गोपाळ दाजीबा दळवी.**

व्यवस्थापक, मराठी ग्रंथप्रकाशक मंडळ, मुंबई नंबर ११ ह्या पत्त्यावर करणें.

# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

### अनुक्रमणिका.

देवगिरी येथील

# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

### श्रीकृष्णापासून–सुबाहु-

ख्रिस्ती शकापूर्वी अडीच हजार वर्षांचे सुमारास हिंदुस्थानांत मध्य-आशियांतून 'आर्य' नांवाच्या लोकांच्या टोळ्या येऊं लागल्या व त्यांनीं उत्तर-हिंदुस्थानांत प्रथम प्रवेश करून पंजाव, काश्मीर, अयोध्या, दिल्ली लखनौ, लाहोर व कनोज वगैरे ठिकाणी वसाहती केल्या. तेथील मूळचे भिल्ल; कोळी वगैरे अडाणी लोकांशीं युद्ध करून, त्यांस त्यांनीं जंगलांत हांकून दिलें व निरनिराळ्या ठिकाणीं आपलीं राज्यें स्थापन केलीं. आर्यावर्तांत या अडाणी व बिनसुधारलेल्या लोकांचीं जागोजाग राज्यें होतीं; तीं आर्यांनीं क्रमाक्रमानें जिंकून आपला अंमल तेथें कायम केला; व आपला धर्म, रीतरिवाज, कलाकौशल्य इ० गोष्टींचा प्रसार केला.

आर्यांनीं मोठमोठीं विद्यामंदिरें उभारलीं; राजवाडे व देवालयें बांधलीं; तलाव, विहिरी, धर्मशाळा इ० लोकोपयोगी कृत्यें केलीं व मोठमोठीं शहरें वसवून आणि व्यापार वाढवून, भरतखंडाला वैभवशाली व संपत्तिमान् करून सोडलें. प्रत्येक राजधानीमध्यें व्यापारी, शेतकरी, शिपाई, कारागीर, पंडित, न्यायाधीश, मुत्सद्दी, साधु, गवयी, शास्त्री आणि वैद्य वगैरे हरएक व्यवसायाचे लोक सुखानें नांदत असत. त्याकालीं आर्यावर्तांत अनावृष्टि क्वचित् होत असून, बहुतेक सर्वकाल सुवत्ताच होती. लोक उद्योगी, पाणीदार, सधन, सुखी, सत्त्वस्थ, निगर्वी, परोपकारी, सदाचारी, सत्यव्रती, धार्मिक, निष्कपटी, देशाभिमानी, शूर, स्वातंत्र्याभिलाषी आणि नीतिमान् असे होते. सारांश, राष्ट्रांत जे गुण पाहिजेत, ते सर्व त्या वेळच्या लोकांच्या अंगीं होते. आर्यावर्त अशा तऱ्हेचा सुधारलेला होता. या भरतखंडांत एकंदर छप्पन्न देशांची गणना होत होती; व त्यांजवर शहाण्णव कुलांचे राजे राज्य करित असत. हीं शहाण्णव कुलें पुराण-प्रसिद्ध आहेत. त्यावेळीं समाजामध्यें गुण–कर्मानुसार चार वर्ण असत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार जातींचे लोक आपआपल्या धंद्यांप्रमाणें जात ठरवून घेऊन, वर्तन करित असत. या चारही जातींत एकमेकांमध्यें अन्नव्यवहार व क्रमशः शरीरसंबंध होत असत. त्या कालीं देशांत कोणतेही प्रकारची दुही नसून, एकंदर राष्ट्रांत संघशक्ति चांगली होती. ज्याची शरिरसंपत्ति सुदृढ असून, जो शूर, धाडसी व बुद्धिवान् असे, तो शिपाईगिरीचें काम करून आपल्यास क्षत्रिय म्हणवून घेत असे. जो तत्त्ववेत्ता, विद्वान्, धार्मिक, सत्त्वस्थ, निरभिमानी व ईश्वर-साधन करून धर्मप्रसार करणारा असे, तो आपणास ब्राह्मण म्हणवून घेई. शेती, कलाकौशल्य, उदीम, व्यापार करून व राष्ट्राची संपत्ति वाढवून, जो धनसंचय करी, तो आपणास वैश्य म्हणवून घेत असे. आणि मोलमजूरी, गायन–वादन, व तिन्ही वर्णांची नोकरी करून जो निर्वाह करी तो आपणांस शूद्र म्हणवून घेत असे. असें त्या काळीं समाजाचें वर्गीकरण होतें. त्या कालीं सर्व राष्ट्राची नीतिमत्ता चांगली असून, शरीर–संपत्तीही उत्तम होती. खाण्यापिण्याची वगैरे कोणत्याही प्रकारें ददात नसून, शरीरास अवश्य असे लागणारे सर्व पदार्थ मुबलक मिळत असत. पतीवर निष्ठा ठेवून गृहसंबंधीं कामें दक्षतेनें करणाऱ्या अशा सत्त्वशील स्त्रिया होत्या. मुलांबाळांचें उत्तम संगोपन करून, त्यांस विद्यादान देणाऱ्या अशा माता होत्या. भावांवर उत्तम प्रीति ठेवणाऱ्या भगिनी होत्या. राष्ट्रकार्यांत मदत करणाऱ्या मुत्सद्दी व शूर अशा स्त्रियाही होत्या. स्त्रियांना सर्व तऱ्हेचे गृहसंबंधीं स्वातंत्र्य व योग्य अधिकार होते. सारांश, अशा

राष्ट्रांत जशा तऱ्हेच्या स्त्रिया असाव्या, तशा तऱ्हेच्या होत्या व त्यांस सर्व तऱ्हेची धर्मसंबंधीं व इतर मोकळीक होती. ज्या काळीं या देशांत अशी लक्ष्मीची पूर्ण कृपा व लायक आणि थोर स्त्री-पुरुषांची समृद्धि होती, त्या काळचें या देशांतलें सुख काय वर्णावें ? तें स्वर्गतुल्य सुख होतें: असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

परंतु कोणत्याही गोष्टीचा अतिरेक वाईटच. रहाटगाडगें वर गेलें कीं, कांहीं वेळानें तें खालीं तळास जावयाचेंच; असा सृष्टीचा नियम आहे. त्याप्रमाणें या भरत-खंडाचीही लवकरच स्थिति झाली. आम्हीं जीं वर शहाण्णव कुळें क्षत्रिय राजांचीं होतीं म्हणून सांगितलें, त्यांचे आपआपसांत तंटे उपस्थित झाले. पुराणांत ( म्हणजे महाभारत वगैरे ग्रंथांत ) क्षत्रियांच्या उत्पत्तीचें वर्णन देण्यांत आलें आहे. तें असें:— "क्षत्रियांच्या मुख्य दोन शाखा आहेत. एक सूर्य-वंशी व दुसरी सोम-वंशी ( चंद्रवंशी ). ज्या क्षत्रियांची उत्पत्ति सूर्य या देवतेपासून झाली, ते आपल्यास सूर्यवंशी मानित असत; व ज्यांची उत्पत्ति चंद्रापासून झाली, ते आपल्यास चंद्रवंशी म्हणवीत. सूर्य-वंशामध्यें श्रीरामचंद्र यांनीं अवतार घेतला, व त्याचप्रमाणें प्रसिद्ध श्रीकृष्ण यांनीं चंद्रवंशांत अवतार घेतला.श्रीरामचंद्रांनीं अवतार घेण्यापूर्वी क्षत्रिय व ब्राह्मण यांचेमध्यें तंटे सुरू झाले होते. प्रसिद्ध भार्गवराम (परशुराम) व त्याचे समकालीन क्षत्रिय यांच्यामध्यें पुष्कळ वर्षे युद्ध होऊन, परशुरामानें क्षत्रियांचा नाश एकवीस वेळां केला. ब्राह्मणांपैकीं वसिष्ठ व क्षत्रियांतला विश्वामित्र यांचाही धर्म-संबंधीं तंटा लागला होता. विश्वामित्र हा कान्यकुब्ज ( कनोज ) देशाचा राजा असून, स्वतःस वेदोक्त विधी करण्याचा अधिकार आहे, व गायत्री क्षत्रियांचो आहे. अशाबद्दल वसिष्ठाशीं भांडत होता. या तंट्याचा निकाल विश्वामित्राच्या बाजूचा झाला व गायत्री क्षत्रियांची ठरली. गायत्री-मंत्राचा छंदर्षि विश्वामित्र ठरला.

श्रीरामचंद्र यांनीं परशुरामाचा पराभव करून त्याला समुद्र-तटाकीं हांकून दिलें. ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यांतल्या या तंट्याची संधि साधून अरण्यांत राहणाऱ्या अनार्य लोकांनीं आपलीं मोठमोठीं राज्यें स्थापन केलीं. या अनार्य लोकांपैकींच रावण हा एक असून, त्यानें आपलें मोठें राज्य दक्षिण-हिंदुस्थानाकडे स्थापन केलें. ब्राह्मण-क्षत्रियांचा तात्पुरता तंटा मिटल्यावर, श्रीरामचंद्र यांनीं रावणाचा पराभव केला; व पुढें अयोध्येस येऊन आपणास राज्याभिषेक करून घेतला. आपण चक्रवर्ती सार्वभौम राजे आहोंत, असें ठरवून घेण्याकरितां त्यांनीं अश्वमेध यज्ञ सुरू केला व आपला घोडा दुसऱ्याच्या राज्यांत सैन्यासह सोडून त्याला प्रतिबंध करणाऱ्या क्षत्रियांशीं युद्ध केलें. श्रीरामचंद्राच्या या अश्वमेधाचा परिणाम असा झाला कीं, क्षत्रिया-क्षत्रियांत निष्कारण वैमनस्य उत्पन्न झालें. पुढें श्रीकृष्णाच्या वेळींही अशीच गोष्ट घडली. कृष्णावतारीं आर्य-क्षत्रियांनीं पुष्कळ अनार्य लोकांचा संहार केला. आणि पुढें इंद्रप्रस्थाच्या सार्वभौमत्वाविषयीं कौरव आणि पांडव यांच्यांत तंटा लागून, कुरुक्षेत्रीं ( पानपत येथें ) मोठें तुंबळ युद्ध झालें. त्यांत बहुतेक कौरव राजांचा संहार होऊन ते मृत्युमुखीं पडले. या कारभारांत श्रीकृष्ण प्रमुख होते. या भारतीय युद्धांत असंख्य क्षत्रियांचा नाश झाला. राहिलीं साहिलेलीं क्षत्रियांचीं घराणीं पांडवांनीं श्रीकृष्णाच्या संमतीनें अश्वमेध यज्ञ करून बुडविलीं. अशा तऱ्हेनें देशांत, क्षत्रियांत तंटे उत्पन्न होऊन त्यांच्यापायीं सगळे नाश पावले. कौरव पांडवांचें युद्ध संपल्यानंतर कृष्ण कुळांतील यादवांच्या प्रसिद्ध छप्पन्न घराण्यांमध्यें ( छप्पन्न कोटी यादव ) आपआपसांत तंटे सुरू झाले व यादवांनीं आपसांत लढून नाश करून घेतला. यावरूनच यादवी होणें ही भयंकर कलहाच्या अर्थाची म्हण मराठी भाषेंत रूढ झाली आहे. याप्रमाणें त्या काळीं सगळ्या हिंदुस्थानांत तंट्यास सुरुवात होऊन जो देश एकेकाळीं अत्यंत वैभवसंपन्न व सुधारणेच्या कळसास जाऊन पोंहोचलेला होता त्यास उतरती कळा लागली. या सर्व गोष्टी महाभारत, भागवत इ० ग्रंथांत सांगितल्या आहेत.

श्रीकृष्ण हा विष्णूचा एक अवतार होता अशी समजूत आहे. या कृष्णाचा जन्म यादव कुळांत

झाला या घराण्याचा मूळ पुरुष * चंद्र होय. त्याचा मुलगा बुध, व बुधापासून ययाति, वगैरे राजे होऊन ययातीला शुक्राचार्यांच्या कन्येपासून मुलगा झाला. या यदूवरूनच त्याच्या घराण्याला 'यादव' असें नांव मिळालें. यादव ऊर्फ जाधव या घराण्याचें गोत्र अत्रि. व अत्रि, शावासविती, व अर्चन असे तीन प्रवर आहेत. हें घराणें ऋग्वेदी आहे. निशाण काळें आहे. कुलदैवत श्रीशंकर व पंथ नाथ, याप्रमाणें गुरु, आचार्य, वगैरे परंपरा आहे. यादव-घराणें सोमवंशी आहे. याच्या एकंदर छप्पन्न जाती आहेत. आपआपसांत तंटे झाल्यामुळें, यांतील बऱ्याच जाती नाहींशा झाल्या. यादवांच्या घराण्यांतील पुरूरवा नांवाच्या राजानें +मथुरेस आपलें राज्य स्थापन केलें. तेथें बरींच वर्षे राज्य करून पुढें कृष्णानें द्वारकेस आपली गादी आणिली. भारतीय युद्ध झाल्यानंतर यादव जेव्हां आपआपसांत लढून मेले, तेव्हां तर या घराण्याची अत्यंत दुर्दशा झाली; व त्यावेळीं श्रीकृष्णानींही आपला अवतार संपविला.

ही गोष्ट ख्रिस्ती शकाच्या अकराशें वर्षे पूर्वी झाली. कृष्णाला एकंदर आठ स्त्रिया होत्या. पैकीं सर्वांत वडील रुक्मिणी. हिला एक मुलगा झाला. त्याचें नांव प्रद्युम्न. बाकीच्या सात स्त्रियांपैकीं शेवटलीसही एक मुलगा होता. परंतु त्याजबद्दल कोठें फारसा उल्लेख आढळत नाहीं. †प्रद्युम्नानें विदर्भ-राजाच्या कन्येशीं लग्न केलें होतें व तिजपासून त्यास अनिरुद्ध व (वज्र) अशीं दोन मुलें झालीं. वज्रापासून भाति यादवांचा वंश सुरू झाला. या भातिवंशांतल्या लोकांनीं गजनी जसलमीर, चंभुळघर, केरवली वगैरे ठिकाणीं आपलीं राज्यें स्थापन केलीं.

अनिरुद्ध याचा सूड घेण्यास रजपुतांच्या छत्तीस कुळांतील राजे उठले. त्यावेळीं नाभ-वज्राचा मुलगा मरुस्थळीकडे पळून गेला व अनिरुद्ध यानें काठेवाडांत गिरनार ऊर्फ जुनागड येथें जाऊन राज्य स्थापन केलें. पुढें त्याला वज्र नांवाचा मुलगा झाला. त्यानें सुरतेपर्यंत राज्य मिळविलें. वज्रास प्रतिवाहु नांवाचा मुलगा झाला. प्रतिबाहूनें आपलें राज्य गुजराथ-खानदेश पर्यंत वाढविलें. ही गोष्ट इ० सन ७०० च्या सुमारास झाली. प्रतिबाहु यास सुबाहु नांवाचा मुलगा होता. त्यास चार मुलें होतीं. सुबाहुनें आपल्या अंतकाळीं चार मुलांस चार राज्यें वांटून दिलीं. सर्वांत धाकट्या मुलाचें नांव दृढप्रहार होतें. यानें सन ७४५ मध्यें दक्षिणेंत प्रवेश केला. त्याच्या राजधानीचें नांव श्रीनगर असें प्रसिद्ध आहे. पण हें श्रीनगर म्हणजे काश्मिरांतलें नव्हे, तर नाशकाजवळ चांदोर म्हणून जें प्राचीन गांव आहे, तें हें असावें असें म्हणण्यास आधार आहे.

---

*. The Yadu was most illustrious of all the tribes of Ind and became patronymic of the descendants of Boodha, Progenitor of the lunar (Indu) race (page 89 Todds' History of Rajastan.)

+ Thence Mathura founded by Pururava remained for ages the great Power. The name of Jadu (Yadu) of whom there were fiftysix tribes, became famous to the world, and of this race was mighty Hari-Krishna, who founded Dwaraca. The grand international conflicts amongst the "fiftysix Yadu tribes" at Kurukshetra and subsequently at Dwaraka are sufficiently known to the reader of Hindu History and may be referred to elsewhere. These events are computed to have happened about 1100 years before Christ. On the dispersion of these races many abandoned India, and amongst these, two of the many sons of Krishna. This defied-leader of the Yadus had eight wives and off. spring of the first and seventh, by a singular fate now occupy what may be termed the out. posts of Hinduism.

† Rookmani was the senior of these wives; and eldest of her sons was Pridemna, who was married to a Princess of Bidurbha. She bore him two sons Anurudh and Bujra and from the latter the Bhaths claim descent. Bujra had two sons Naba and Khira ( vide yage 1053 Todds Rajastan.)

## दृढ-प्रहार,

( इ० स० ७४५ ).

द्वारकेंत आपआपसांत भांडून यादव मारले गेले. राहिलेल्यांवर रजपुतांच्या ३६ राजघराण्यांनीं स्वारी करून त्यांचा नाश केला. यादवांनीं सर्व आर्यावर्तावर आपलें वर्चस्व स्थापित केलें होतें. कौरव-पांडव देखील त्यांच्याच तंत्रानें वागत होते. यादव-घराणें त्यावेळीं सर्व हिंदुस्थानांत फार नाणावलेलें व शक्तिमान होतें. त्यांचें ऐश्वर्य अवर्णनीय होतें. त्यांचा दरारा त्या कालीं सर्व राजांवर होता. या व अशा अनेक तऱ्हेच्या कारणांमुळें या यादवांविषयीं तत्कालीन राजांच्या मनांत अप्रीति उत्पन्न झाली होती. अर्थात् ×श्रीकृष्ण स्वर्गीं गेल्यावरोवर व यादवांत आपसांत तंटे लागल्यामुळें, सर्व राजांनीं ही संधि साधून यादवांचा फडशा उडविला. या दंगलींत श्रीकृष्णाचे नातू अनिरुद्ध व वज्र हे पळून गेले. वज्र याला दोन मुलगे झाले. पहिला नाभ व दुसरा क्षीर. क्षीरापासून जर्ज्य अथवा जाट व जद्भान अशीं दोन कुळें उत्पन्न झालीं. भरतपुरास जें जाठांचें राज्य आहे तें यांच्याच वंशापैकीं आहे. नाभ याला प्रतिबाहू नांवाचा मुलगा झाला व त्याच्या वंशजांनीं जेसलमीर, केरोली, गजनी, व शेवटीं जामनगर अशीं राज्यें स्थापन केलीं. त्यांजबद्दल टॉड् साहेबांचा राजस्थानचा इतिहास पहावा ) कृष्णाचा वडील वंश प्रद्युम्न याचा मुलगा अनिरुद्ध, वज्र, प्रतिबाहू, सुबाहू व दृढप्रहार याप्रमाणें आहे. ( पहा हेमाद्रि व्रतखंड ).

प्रद्युम्नाचा मुलगा *अनिरुद्ध यानें द्वारका सोडून काठेवाडामध्यें गिरनार उर्फ जुनागड येथें राज्य स्थापन केलें. ( पहा टॉड ) प्रसिद्ध चांदभाट यानें आपल्या दोह्यांत असें म्हटलें आहे कीं, जाधवास सोरट दिली. तो दोहा येणेंप्रमाणें.—

### दोहा.

**दियो दिल्ली तूंवरा—दई पट्टन चाउरा ॥**
**दिय संभरि चहुआन-दई कन्वज राठोरां ॥१॥**
**परिहारा मुरदेश—सभा भट्टी सिंधतट ॥**
**दई सोरट जाधवां—दई दच्छन सुभाग भट ॥**
**चारना कच्छ दीनीं धरा-भाट्टापूरबभावही ॥**
**बर्ना गयो नृपति वटी धरा—**
**गीरिजापात मालागृही ॥**

या वरील दोह्यावरून जाधवाला काठेवाड प्रांत दिला. ( दई सोरठ जाधवां ) असें चांदभाटानें म्हटल्याचें स्पष्ट होत आहे. व टॉड साहेवांनींही आपल्या राजस्थानच्या इतिहासांत गिरनार ऊर्फ जुनागड येथील राजे जाधव असून, कृष्णवंशांतले होते, व काठेवाडप्रांत जाधवांकडे होता, असें म्हटलें आहे. अनिरुद्धाबद्दल यापेक्षां जास्त माहिती ते देत नाहींत. परंतु जाधवांच्या घराण्यांतील परंपरेनें चालत आलेल्या दंतकथेवरून असें कळतें कीं, अनिरुद्ध-वज्र व प्रतिबाहू या तिघांनीं काठेवाडांत राज्य करून अहमदाबाद—सुरतपर्यंत देश काबीज केला. व सुबाहू यानें काठेवाडपासून थेट दक्षिणेपर्यंत मुलूख काबीज केला. हेमाद्रिपंत आपल्या व्रतखंडांत म्हणतात कीं, कृष्णाचा मुलगा प्रद्युम्न, त्याचा मुलगा अनिरुद्ध, अनिरुद्धाचा मुलगा वज्र, वज्राचा प्रतिबाहू, असे सर्व राजे द्वारकेंत राज्य करीत होते; व सुबाहूचा मुलगा दृढप्रहार दक्षिणेंत आला.

---

× When the Yadoos were exterminated in the conflict at Dwarca and Hari had gone to Heaven, Bujra was on his way from Mathura to see his father but had only marched twenty coss ( forty miles) when he received intelligence of that event which had swept away his kindred. He died upon the spot when Naba was elected King and returned to Mathura, but Khirr pursued his journey to Dwaraca.

" The thirty six tribes of Rajpoots hitherto oppressed by the Yadus who had long held universal dominion now determined to be revenged. Naba was compelled to fly the holy city ( Dwarca ). He became prince of Marusthal in the west. ( vide Todd's Rajastan History page 1053. )

* The Jadu (yadu) from Junagad (Girnar) was of the race of Krishna and appeared to have held possession of this territory ( The Jadhav from Junagara Kathewad )

॥ श्लोक ॥

सर्वेऽपि पूर्वं मथुराधिनाथाः
कृष्णादितो द्वारवतीश्वरास्ते ।
सुबाहुसूनोरनु दक्षिणाशा—
प्रशासिनो यादववंशवीराः ॥
( हेमाद्रिकृत व्रतखंड, श्लोक २१ ).

याप्रमाणें द्वारकेहून हें घराणें इ० स० ७४५ चे सुमाराला थेट दक्षिणेंत येऊन पोहोंचलें. यादवांचा नाश झाल्यानंतर जे+ त्यांतून वांचून सर्व हिंदुस्थानभर पसरले, त्यांपैकींच मराठ्यांमधील जाधवांचें* घराणें आहे, असें टॉड साहेबांनीं म्हटलें आहे. बॉंबे ग्याझिटियर पान ५८७ यांतही जाधव घराण्यांतला सिंदण हा रजपूत घराण्यांतला आहे, असें मि० डब्ल्यु, डब्ल्यु, लॉंच यांनीं जुने माहितीवरून लिहून ठेविलें आहे. या सर्व गोष्टींवरून द्वारकेहून हें घराणें दक्षिणेंत आलें, तें रजपुतांच्या छत्तीस घराण्यांपैकीं होय; याविषयीं शंका रहात नाहीं. दृढप्रहारपासून यादव घराण्याची पुष्कळ विश्वसनीय हकीकत मिळते. दृढप्रहार हा प्रथमतः नाशिक जिल्ह्यांतील चांदोर या ठिकाणीं गादी स्थापून राहिला. खानदेश हाही प्रांत त्याच्या राज्याच्या अंतर्गत होता. त्यानें चांदोरला श्रीनगर असें गोडसें नांव दिलें होतें. याच्याच वंशांतील महादेव व रामदेवराव यांचे पदरीं हेमाद्रिपंत ऊर्फ हेमाडपंत हा मुख्य प्रधान होता. त्यानें व्रतखंड नांवाचा ग्रंथ केला. त्यांत यादव घराण्याचा सर्व इतिहास दिला आहे. व शिवाय बॉंबे ग्याझिटीयर व्हॉल्युम १–भाग दुसरा, यामध्यें यादवांच्या घराण्यांचा इतिहास पान ५११ मध्यें डब्ल्यु, डब्ल्यु, लॉंच एस्क्वायर यांनीं दिला आहे, डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं ‡दक्षिणच्या प्राचीन इतिहासावर ग्रंथ लिहिला आहे, त्यामध्यें तत्कालीन शिलालेख, ताम्रपत्रें, नाणीं व हेमाद्रि-

÷ This portion of Yadu's stock would appear never to have strayed far beyond the ancient limits of the Suraseni their ancestral abodes. They held celebrated Beena whence expelled they established Karowli west and Subulgurh east of the Chambhul. The tract under the latter called Yaduvati has been wrested from the family by Scindia, Shri Mathura is the independent fief of Kerowli held by Junior Branch.

* The Yadus or as pronounced in the dialects jadoom are scatterred over India and many chiefs of consequence amongst the Marathas are of this sort. ( vide page 91 Todd's Rajasthan. )

‡ Early History of the dekkan
The Yadavas of Devagiri
Early History of the family

The genealogy of the Yadavas is given in the introduction to the Vratakhanda attributed to or composed by Hemadri who was a minister of Mahadeva one of the later princes of the dynasty. Some of the manuscripts of the work, however, do not contain it, and in others it begins with Bhillama, as it was he who acquired supreme power and raized the dynasty to importance. Others again contain an account of the family from the very beginning, the first person mentioned being the Moon who was churned out of the milky ocean. From the Moon the genealogy is carried down through all the Puranic or legendary ancestors to Mahadeva. But it is not difficult from the account itself to determine where the legend ends and history begins. Besides the names of most of historical predecessors of Bhillama agree with, those occurring in the copper plate grant translated by Pandit Bhagvanlal Indraji He considered the Yadava dynasty mentioned in his grant to be different from that of Devagiri and called it " A new Yadava Dynasty " as, of course, in the absence of the information, I now publish, he was justified in doing. But it is now perfectly clear that the princes mentioned in the grant were the ancestors of the Devagiri Yadavas. The following early history of the family is based on the account given in the Vratakhanda and on the grant published by the Pandit. The letter however brings down the genealogy only to Sennachandra II who was on the throne in 991 Saka or 1069 A, D. and omits the names of some of the intermediate princess.

Subahu who belonged to the Yadhav race was a universal sovereign. He had four sons among whom he divided the whole earth ruled over by him. The second son—Dridhaprahara became king in the south or Dekkan.

The first king of Yadava family
Dridhaprahara

The Yadavas it is stated were at first lords of Mathura then from the time of Krishna they became s overeigns of Dvaravati or Dwarka and came to be rulers of the South from the time of the son of Subahu viz Dridhaprahara.

पंताचा व्रतखंड या सर्वांच्या आधारें जाधवांचा इतिहास लिहिला आहे. तो इतिहास श्री० नामदार सरदार शंभुसिंगजी जाधवराव यांच्याजवळ असलेल्या कागदपत्रांशीं ताडून पाहतां, बरोबर असून, विशेष बारीक रीतीनें शोध करून लिहिलेला व माहितीनें पूर्ण आहे; याविषयीं शंका राहत नाहीं. दृढप्रहारचा मुलगा पहिला शेऊणचंद्र हा आपले बापाचे मागून गादीवर आला, व शेऊणपूर नामक शहर वसवून त्यानें आपल्या देशाचें शेऊणदेश असें नांव ठेविलें. मुसलमान लोक इकडे येण्यापूर्वी खानदेशाचें हेंच नांव पूर्वीपासून चालत आलेलें होतें. शेऊणदेश नाशिकपासून दौलताबादेपर्यंतच्या मधल्या पट्टास म्हणत असत. हल्लींच्या खानदेशापेक्षां शेऊणदेशाची मर्यादा पूर्व व दक्षिणेस ज्यास्त होती. शेऊणचंद्राचा मुलगा धाडियप्पा पुनः गादीवर बसला व धाडियप्पाचे पश्चात् त्याचा मुलगा पहिला भिल्लम गादीवर आला. भिल्लमानंतर श्रीराज व त्याचे नंतर वद्दिग असे अनुक्रमें गादीवर आले. वद्दिगनें धुरापा राजाची कन्या व्होदियाव्हा हिच्याशीं लग्न केलें. धुरापा हा राजा राष्ट्रकुटांपैकीं होता. वद्दिगाच्या मागून त्याचा मुलगा धाडियस गादीवर आला.

## श्लोक.

**अर्वाक्तस्य बभूव भूतलहरिः श्रीवद्दिगाख्यो नृपः ॥ तस्मात् श्रीवरभिल्लमक्षितिपतेः प्रत्यक्षधर्मा भवत् ॥**

दानपत्र ।

धाडियसानंतर त्याचा मुलगा दुसरा भिल्लम हा गादीवर आला, दुसरा भिल्लम हा धाडियसाचा दुसरा मुलगा होय. भिल्लमानें झंझ नांवाच्या ठाण्याच्या शिलाहार राजाच्या मुलीशीं लग्न लाविलें.

## श्लोक.

**भार्या यस्य च झंझराजतनया श्रीलस्थियव्वाह्वया । धर्मत्यागविवेकबुद्धिसगुणा राष्ट्रकूटान्वया । या जाता नवबालनाजसमये यद्न्वया धारिता । सप्तांगोद्यतराज्यभारधरणाद्रायत्र याघर्या ततः ॥ १ ॥**

या मुलीचें नांव लस्थियव्वा होतें. लस्थियव्वा हिची आई राष्ट्रकूट अथवा महारट्ठे या राजकुलांपैकीं असून, ती ठाण्याच्या शिलाहारवंशी राजास दिली होती. तिची मुलगी लस्थियव्वा ही यादवांच्या घराण्यांत दुसरा भिल्लम यास दिली. राष्ट्रकूट व शिलाहार हे दक्षिणेंतले मूळचे राजे होते. राष्ट्रकूट यांजला महारट्ठे व ज्या देशावर ते राज्य करीत होते, त्यास महाराष्ट्र असें नामाभिधान पडलें. महारट्ठे हा शब्द महारथी या संस्कृत शब्दापासून निघालेला आहे. महारथी म्हणजे मोठा योद्धा, ( डॉ० भांडारकरांचा दक्षिणचा प्राचीन इतिहास पृष्ठ १४३ पहा ).

याप्रमाणें यादव घराण्याशीं शिलाहार व राष्ट्रकूट अथवा महारट्ठे या घराण्यांचा संबंध झाला. महारट्ठे हेच मूळचे दक्षिणेतले राजे होते. आणि म्हणून अलीकडे यादव घराण्याला मराठ्यांचें घराणें म्हणूं लागले. लस्थियव्वा हिजला तीन घराण्यांची उद्धारक असें म्हटलें आहे, तें यथार्थ आहे. ही गोष्ट शके ९२२ मध्यें म्हणजे इ० सन १००० याच्यापूर्वी झाली. संगमनेर येथील देणगी भिल्लमानें शके ९२२ मध्यें दिली आहे. याच वर्षी **रणरंगभीम** म्हणजे तैलक-दुसरा चालुक्य वंशांतील राजा-यानें, माळव्याचा राजा मुंज याजवर स्वारी केली,त्यावेळीं यानें त्याला मदत करून मुंज राजास ठार मारिलें. भिल्लमानंतर वेसुगि राजा गादीवर बसला. त्याचें चालुक्य राजा गोगी याची मुलगी नायलदेवी हिच्याशीं लग्न झालें. त्याच्यानंतर अर्जुन व त्याचेनंतर तिसरा भिल्लम गादीवर बसला. त्यानें जयसिंहाची कन्या व चालुक्यराजा अहवमल्ल याचे बहिणीशीं लग्न केलें. याच चालुक्याच्या निशाणाखालीं तिसऱ्या भिल्लमानें पुष्कळ लढाया मारल्या. ही गोष्ट शके ९४८ म्हणजे सन १०२५ मध्यें झाली. त्याच्या नंतर दुसरा शेऊणचंद्र राजा झाला. ह्यानें चालुक्यराजा विक्रमादित्य यास मदत केली, व पुष्कळ राजे जिंकून आपलें राज्य शत्रूच्या हातून बचाविलें. शेऊणचंद्रानंतर परमदेव गादीवर आला. त्याच्या मागून परमदेवाचा भाऊ सिंहराज गादीवर बसला. यालाच सिंघण असें म्हणत असत. ह्यानें कर्पूरतिलक नांवाचा हत्ती लांजीपुराहून आणिला होता. चालुक्य वंशांतील दुसरा विक्रमादित्य यास यानें पुष्कळ मदत केली. पुढें त्याचा मुलगा मलुगी गादीवर आला. त्यानें पर्णखेट नांवाचें शहर

जिंकून घेतलें. व उत्कल उर्फ ओडिसा या देशाच्या राजापासून हत्तींची टोळी जिंकून आणिली. नंतर त्याचा मुलगा अमरगांगेय गादीवर आला व त्याच्या मागून त्याचा मुलगा गोविंदराज गादीवर बसला. मलुगीला तीन मुलगे होते. पहिला अमरगांगेय दुसरा आमरमलुगी व तिसरा भिल्लम. पैकीं अमरगांगेय व गोविंदराज हे गादीवर आल्यानंतर आमर मलुगी हा गादीवर आला. पुढें त्याचा मुलगा कालीय बल्लाळ हा गादीवर बसला. त्याचा चुलता पांचवा भिल्लम यानें त्याच्या मुलास गादी न देतां, आपण गादी बळकाविली. भिल्लमानें फार थोडे दिवस राज्य केलें. परंतु आपल्या अल्प कारकीर्दींत त्यानें मोठमोठ्या लढाया मारून, आपणाला सार्वभौमत्व प्राप्त करून घेतलें. त्याबद्दलची थोडीशी हकीकत पुढील भागांत येईल. इतके दिवस यादव राजे चालुक्यांचे मांडलिक म्हणविले जात असत. परंतु आतांपासून ते आपणांस स्वतंत्र म्हणवूं लागले.

---

## पांचवा भिल्लम.

शके ११०९ ते १११४ ( इ. स. ११९२ प. )

भिल्लम गादीवर बसला त्या वेळेस म्हैसूरनजीक, हळेबीड उर्फ द्वारसमुद्र येथील होयसाळ यादव यांचें घराणें वाढत चाललें होतें. वीर बल्लाळ नांवाचा पुरुष या वेळीं त्यांचे गादीवर होता. वीरबल्लाळ यानें चालुक्यवंशी विक्रमादित्याच्या राज्यांत प्रवेश करून कृष्णावेण्यांच्या काठीं तळ दिला होता. परंतु त्या वेळीं चालुक्यांची भरभराट असल्यामुळें, त्याचें कांहीं चाललें नाहीं. परंतु अलीकडे चालुक्यांची सत्ता नष्ट होत चालली होती व लिंगाईत पंथ उदयास येत होता. राज्यांत तंटे बखेडे चालले होते,अशा संधीस वीरबल्लाळनें चौथ्या सोमेश्वर चालुक्याचा सेनापति ब्रह्म उर्फ बोम्म याचा पराभव केला व चालुक्यांच्या राज्यांतील बरेच प्रांत काबीज केले.

देवगिरीचे यादवांपैकीं अमरमलुगी हा त्या वेळीं कलचुरी राजा विजयान याच्याशीं लढाईंत गुंतला होता. त्या वेळीं त्याचा सेनापति दादा नांवाचा होता. त्यानें विजयान याजवर बराच विजय मिळविला. दादाला महीधर, जल्ह, सांब, व गंगाधर अशीं चार मुलें होतीं. महीधरानें विजयान राजाचा पराभव केला. याजबद्दल सूक्तिमुक्तावलि नामक ग्रंथांत उल्लेख आहे, तो असाः—

### श्लोक.

**तस्यान्वयेऽभूत्करिवृन्दनाथो दादाः सदाखानिदानभूतः । यस्येक्षणाद्बिज्जण भूपसैन्यं दैन्यं संयति विक्रमेण ॥ ५ ॥ चत्वारस्तस्य संजातास्तनया नयशालिनः। भुजा इव हरेः शश्वद्विक्रमश्रीविभूषिताः ॥ चतुर्मुखमुखोद्गीर्णनिगमा इवते बभुः। ख्याता महीधरो जल्हः साम्बो गङ्गाधरस्तथा ॥ ७ ॥ उपायैरिव तैः काले चतुर्भिः सुप्रयोजितैः । मे ( मै ) लुगिक्षोणिपालस्य राज्यं जातं सदोन्नतम् ॥ ८ ॥ विज्जणबलजलराशिं विमथ्य भुजमन्दरेण यः कृतवान् ॥ वीरश्रियमङ्कस्थां स न कस्य महिधरः स्तुत्यः ॥ ९ ॥**

परंतु चालुक्यांचें राज्य भिल्लमानें जिंकलें. त्याचा बाप मलुगी ह्याचे हातून तें जिंकलें गेलें नव्हतें. भिल्लमानें श्रीवर्धन नांवाचें शहर अंतळा नांवाच्या राजाकडून जिंकून घेतलें. प्रत्यण्डकच्या राजाचा लढाईंत पराभव केला. मंगळवेढ्याचा राजा बिल्लण यास ठार मारलें, आणि दक्षिणेकडील होसाळ यादव नारसिंह, वीरबल्लाळचा बाप, यास ठार मारून त्याच्या राजधानीचें शहर कल्याणही काबीज केलें. या युद्धांत महीधराचा भाऊ जाल्ह हा होता. यानें आपला मातलेला हत्ती मोठ्या शिताफीनें गुजराथच्या राजाच्या सैन्यांत नेला. व त्याच्या छातींत धडकी भरविली व मलुगीच्या सैन्याला भिवविलें आणि मुंज आणि अना यास यशस्वी केलें.

याप्रमाणें भिल्लमानें उत्तरेचा सर्व मुलूख काबीज केला व आपल्यास राज्याभिषेक करून देवगिरी शहर स्थापन केलें, ( शके ११०९ ). नंतर भिल्लमाने दक्षिणेकडे मुलूख वाढविण्याची सुरुवात केली. त्यास वीरबल्लाळानें हरकत केल्यामुळें, पुष्कळ लढाया झाल्या व शेवटची निकराची लढाई धारवाड नजीक लकुंडी येथें झाली. तींत भिल्लमाचा मुलगा जैत्रसिंह याचा पराभव होऊन, कुंतलदेश वीरबल्लाळानें बळकाविला.

तेथपासून भिल्लमानें दक्षिणेकडचा मुलूख जिंकण्याचा नाद सोडून दिला. याजबद्दल सूक्तिमुक्तावलि ग्रंथांत पुढील उल्लेख आहे—

### श्लोक

**विजित्य विज्जणं याते सुरलोकं महीधरे। निनाय भिल्लमं जल्हो राजतां क्षयवर्जिताम् ॥ ११ ॥ गूर्जरभूभृत्कटके कण्टकविषमेऽतिदुर्गमे येन । भगदत्तकीर्तिभाजा दुष्टगजः स्वेच्छया नीतः ॥ २ ॥ मल्लः पल्लवितोरुः भीतिरभितस्त्रस्यद्बल्लो मैलुगिर्मुञ्जः । पिण्डितविक्रमस्त्रिभुवनब्रह्मा किलब्राह्मणः ॥ अस्तो नुन्नपराक्रमो विधुतभूर्भञ्जरणप्राङ्गणे येनाकारि सुरारिविक्रमभृता किं किं न तस्योर्जितम् ॥ १३ ॥**

## जैत्रपाळ.

शके १११३ ते ११३२ पर्यंत.

भिल्लम १११३ त मरण पावल्यावर त्याचा मुलगा जैत्रपाळ हा गादीवर बसला. त्यानें हजारों राजे मारून टाकून, नरयज्ञ केला व त्रैलोक्य जिंकलें अशी दंतकथा आहे. तैलंगणचा राजा रुद्रदेव यानें आपला पुतण्या गणपती यास कैदेंत ठेविलें होतें. जैत्रपाळ यानें रुद्रदेवाला ठार मारून गणपतीला गादीवर बसविलें. या जैत्रपाळाला विद्येची चांगली अभिरुचि होती व तो विद्वानांचा परामर्ष घेणारा होता. प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य, याचा पुत्र लक्ष्मीधर हा जैत्रपाळानें मुख्य पंडित केला होता. जैत्रपाळ वेद शिकला होता आणि तर्कशास्त्र व मीमांसा या विषयांचें त्यानें अध्ययन केलें होतें. याला वेदांताचा नाद असल्यामुळें त्यानें मुकुंदराज नांवाच्या ब्राह्मणास गुरु केलें होतें. या मुकुंदराजानें विवेकसिंधु व परमामृत असे वेदांतपर दोन ग्रंथ करून जैत्रपाळास उपदेश केला. मुकुंदराज वैनगंगेच्या तीरीं राहत होता. जैत्रपाळ यानें पुष्कळ साधुसंत धरून कैदेंत टाकले होते. त्याचें कारण, तो माझी समाधि लावा असें म्हणे. समाधि न लाविल्यामुळें या लोकांस त्यानें तुरुंगांत टाकलें होतें. मुकुंदराजानें राजाची समाधि लावून त्याजकडून त्यांची बंधमुक्तता करविली होती. याच्या पश्चात् सिंघण हा राजा झाला.

## सिंघण.

शके ( ११३२ ते ११६९ ) पर्यंत
इ० सन ( १२१० ते १२४७ ) पर्यंत.

### ॥ श्लोक ॥

**संवत् १२८८ वर्षे वैशाखशुदि १५ सोमऽद्येह श्रीमद्विजयकटके महाराजाधिराजश्रीमत्सिंहणदेवस्य महामण्डलेश्वरराणकश्रीलावण्यप्रसादस्य च । संराज ( साम्राज्य अथवा सम्राट् ) कुलश्रीश्रीमत्सिंहणदेवेनमहामण्डलेश्वरराणश्रीलावण्यप्रसादेन पूर्वरूढ्यात्मीय ॥**

सिंघण हा इ० सन १२१० मध्यें गादीवर बसला. त्यानें आपल्यास महाराजाधिराज विष्णुवंशोद्भव द्वारावतीपूरवर्धीश्वर असें पद धारण केलें. त्यानें जज्जल्लाल राज्यास जिंकून त्याचे हत्ती आणिले. कक्कूल राजाचें राज्य हिसकावून घेतलें. माळव्याचा राजा अर्जुन याचा नाश केला. शिलाहारवंशी भोजराजा यास कैद करून त्याचें राज्य आपल्या राज्यास जोडिलें. असे अनेक पराक्रम केले. गंगाधराचा मुलगा जनार्दनपंत यानें सिंघण यादवाला लढाईमध्यें हत्ती कसे चालवावे, हें शिकविलें. व त्या योगानें अर्जुनराजाचा नाश केला.

जनार्दन यास हत्तीवरचा सेनापति केलें. हें काम झाहला त्याचा भाऊ व त्याचा बाप गंगाधर यांजकडे होतें.

### ॥ श्लोक ॥

**आसीद्गङ्गाधरस्तस्य भ्राता गङ्गाधरोपमः । एकान्वबन्ध यो व्यालान्मुमोचैकान्यदृच्छया ॥ १६ ॥ तस्याभवत्सूनुरनूनसत्वो जनार्दनाह्वः करिवाहिनीशः । सामुद्रवद्यो भुवनं बभार सह श्रिया चित्रमशेषमेतत् ॥ १८ ॥ सिंहोऽप्यध्यापितस्तेन गजशिक्षां तदद्भुतम् । यज्ञार्जुनं लसत्पत्रं समूलमुदमूलयत् ॥ २० ॥**

सिंघण राजानें राजा लक्ष्मीधर, भंगारींगा देशाचा, सिंह याची शक्ति हरण केली. धारचा राजा घोडेस्वारांच्या सैन्याचा उपयोग करून धरिला. दक्षिणेकडील

होसाल यादव यांच्या घराण्यांतील बल्लाळ राजाचें सर्व राज्य आपल्या राज्यास जोडिलें.

सिंघण राजानें जो एवढा पराक्रम केला, ती त्याची सहज क्रीडा होती, उत्तरेकडील चेदीनांवाच्या राजघराण्यांतील जेज़ाल हा राजपुत्र असला पाहिजे. कारण याचें नांव त्या घराण्यांत आलें आहे. पश्चिमेकडे त्रिपुर अथवा तेहूर शहर आहे. तेथील राजघराण्यांत कक्कूलचा जन्म झाला होता. मथुरेचा आणि काशीचा राजा यांना त्यानें युद्धांत मारलें. व हमीर या नांवाच्या मुसलमानास सिंघणच्या बालसेनापतीनें जिंकलें. सिंघणनें जेजालदेवाचा पराभव केला. होसाल यादवांपैकीं बल्लाळ यास जिंकलें. पन्हाळ्याच्या भोजराजाला ताब्यांत घेतलें, व माळव्याच्या राजाला जेरीस आणिलें.

सिंघण हा देवगिरी येथें राज्य करीत होता. पन्हाळ्याचा भोजराजा हा शिलाहारवंशी होता. त्याला ठार मारून कोल्हापूरचें राज्य आपल्या राज्याला जोडिलें. तेथपासून यादवांचें नांव ताम्रपटांत येऊं लागलें. शिलाहाराचें नांव कोल्हापूरच्या ताम्रलेखांतून बंद झालें. सिंघणनें खिद्रापूर प्रांतांत एक गांव कोप्पेश्वर देवाला शके ११३६ मध्यें इनाम दिलें. सिंघण यानें गुजराथेवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या. त्याचे पदरीं खोलेश्वर नांवाचा मुद्गल गोत्री ब्राह्मण सेनापती होता. हा फार शूर होता. त्यानें गुजराथच्या राजाचा गर्व-परिहार केला; माळव्याच्या राजाला चेंगरून टाकिलें व आभीर राजवंशाचा नाश केला.

याप्रमाणें शत्रूंला अग्नीप्रमाणें त्रास देऊन सिंघणची कांहींएक आशा उरूं दिली नाहीं. त्याचे सर्व मनोरथ पूर्ण केले. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा राम सेनापति झाला. तो मोठें सैन्य घेऊन नर्मदेपर्यंत गुजराथच्या राजावर चाल करून आला. तेथेंच गुजराथच्या राजाबरोबर एक मोठी लढाई झाली. या लढाईंत त्यानें हजारों गुर्जर शिपाई मारले व स्वतःही समरभूमीवर देह ठेविला. यावरून सिंघणनें गुजराथेवर दोन वेळ तरी स्वारी केली असावी असें सिद्ध होतें. कीर्ति-कौमुदीचा कर्ता सोमेदव यानें सिंघणच्या गुजराथेवरच्या स्वारीचें वर्णन आपल्या ग्रंथांत दिलें आहे. गुजराथेंत त्या वेळेस अनहिलपट्टणास वाघेल वंशांतले राजे राज्य करीत होते.

वाघेल हा वंश चालुक्य घराण्यापैकीं होय. सिंघणनें गुजराथेवर स्वारी केली, त्यावेळीं गुजराथचा लवणप्रसाद व त्याचा मुलगा वीरधवल वाघेल हे अनहिलपट्टणास होते. गुजराथचे लोक सिंघणचें सैन्य पाहून इतके घाबरून गेले कीं ते नवीन घरें बांधीनात व धान्य देखील सांठवीनात. सर्वांचीं मनें अगदीं अस्वस्थ होतीं. कोणी धान्य पेरिनात. व जे ते आपले सामानसुमान भरण्यास गाड्या मिळविण्याची तजवीज करूं लागले. जसजसें यादवांचें सैन्य जवळ येत गेलें तसतसे लोक भीतीनें दूर पळून जाऊं लागले. जेव्हां लवणप्रसाद वाघेल यानें सिंघण यादवाचें मोठें सैन्य जोरानें चाल करून आपल्यावर येत आहे असें ऐकिलें तेव्हां त्याला अत्यंत कोप चढला. त्याच्या जवळचें सैन्य थोडें होतें तरी तो आपल्या शत्रूशीं सामना देण्यास निघाला. ज्यावेळीं तापीवर सिंघणचें सैन्य आलें, त्यावेळीं लवणप्रसाद महीपर्यंत आला. एकतर शत्रूचें अगणित सैन्य आणि दुसरें त्या चालुक्यांच्या फौजेचा पराक्रमही दुर्धर. हें पाहून लोकांना जयापजयाविषयीं मोठी शंका उत्पन्न झाली, व काय परिणाम होईल तें कळेना. शत्रु गांवें जाळूं लागले व त्या धुराच्या खुणेवरून शत्रु कोठें आहेत हें जाणून त्या त्या प्रमाणें हालचाली सुरू केल्या. यादव भडोचपर्यंत आले. त्यावेळीं शेतांत पिकें उभीं होतीं. शत्रु इतका जवळ आला तरी लवणप्रसाद यास तो अजिंक्य आहे, असें वाटलें नाहीं.

परंतु इतक्यांत लवणप्रसाद व त्याचा मुलगा वीरधवल ह्यांजवर मारवाडचे चार राजे उठले. आणि गोधारा आणि लाट या देशचे मुख्य सरदार, जे वाघेल राजास आपआपलीं सैन्यें घेऊन मिळाले होते ते त्यास सोडून देऊन मारवाडच्या राजाला जाऊन मिळाले. त्यामुळें गुजराथच्या राजाला शरण येऊन सिंघणाशीं तह करणें भाग पडलें. गुजराथचा राजा श्री लवणप्रसाद व सिंघण यांजमध्यें झालेल्या तहाच्या अटींबद्दलचा श्लोक आरंभीं दिला आहे. लवणप्रसाद ह्यानें सिंघण हा सार्वभौम राजा होता असें त्यांत कबूल केलें आहे. कोणी कोणाच्या राज्यावर पुन्हा स्वारी करूं नये, असें त्या तहांत ठरलें.

**( देशपुरहणीयं ॥ केनापि कस्यापि भूमिर्नाक्रमणीया )**

त्यांत आणखी एक अशी अट होती कीं, जर दोघांपैकीं कोणावर शत्रु चाल करून आला, तर दोघांनीं एक होऊन त्याचा पराभव करून एकमेकांस शत्रूच्या तडाख्यांतून सोडवावें आणि जर कदाचित् दोघांच्या राज्यांतील एखादा राजपुत्र बिघडून दोघांपैकीं कोणापाशीं आश्रय मागूं लागला, तर त्यास आश्रय देऊं नये. हा तह शके ११४१ मध्यें झाला. त्या स्वारींत सिंघणतर्फे खोलेश्वर नांवाचा मुद्गलगोत्री ब्राह्मण सिंघणाचा सेनापती होता. सिंघणनें गुजराथेवर दुसरी स्वारी शके ११६० चे आंत केली, या स्वारींत खोलेश्वरचा मुलगा राम हा सिंघणाचा सेनापती होता, त्यावेळीं गुजराथचा राजा विसलदेव होता. हा वाघेल वंशांतील तिसरा पुरुष होय. वाघेल वंशांची हकीगत अशी आहे कीं, सोळांकी वंशांतील कुमारपाल यानें त्याचा मावसभाऊ अरुणराज यास वाघेलगांवची जहागीर देऊन आपले दरबारीं सामंत नेमिलें. पुढें अरुणराजास लवणप्रसाद नांवाचा मुलगा झाला. हा मोठा पराक्रमी होता. सोळांकी राजा दुसरा भीमदेव याच्या कारकीर्दींत त्यानें गुजराथवर स्वाऱ्या केल्या व अनहिलपट्टण हें शहर आपली राजधानी करून तो स्वतंत्रपणें राज्य करूं लागला. येथपासून वाघेलवंशांतले राजे गुजराथचे स्वतंत्र राजे झाले.

लवणप्रसाद याचा मुलगा वीरधवल व नातू विशळदेव यांजवर सिंघणनें स्वाऱ्या केल्या व हे तिघेही राजे, सिंघणबरोबर लढले. विशळदेवाच्या पश्चात् अर्जुन व त्याच्या मागून लवण व सारंगदेव असे राजे झाले. सारंगानंतर कर्ण म्हणून एक राजा झाला. त्याचीच मुलगी शंकरदेवास देऊं केली होती. शंकरदेव यादव याचें वर्णन पुढें येईल. दुसऱ्या स्वारींत राम हा विशळदेवाकडून मारला गेला. याप्रमाणें सिंघणच्या दुसऱ्या स्वारीचा शेवट झाला.

सिंघण यानें चीकदेवाचा मुलगा व मल्लाचा धाकटा भाऊ बिचण यास दक्षिण–महाराष्ट्र व कोंकण या प्रांतांवर मुख्य अधिकारी नेमलें होतें. हा खोलेश्वराप्रमाणें शूर असून, जसा खोलेश्वरानें उत्तरेकडे लढून गुजराथवर दाब ठेविला, तसा बिचण यानें दक्षिणेंत सिंघणतर्फे लढाया मारिल्या व दक्षिणेवर दाब ठेविला. दक्षिण–महाराष्ट्रांतील रट्ट राजास, बिचणानें जिंकलें. त्याचप्रमाणें कोंकणांतील (कदंब) कदम राजास जिंकलें. (हे कदम गोव्याकडील होत.) दक्षिणेंतील गुत्त ऊर्फ गुप्त, पांड्य, होयसळ आणि दुसरे कित्येक लहान संस्थानिक या सर्व लोकांस बिचणानें जिंकून आपल्या विजयी सैन्याचा तळ कावेरी नदीवर दिला. व त्या ठिकाणीं विजयस्तंभ बांधला, ही गोष्ट शके ११६० चे सुमारास झाली. त्यावेळीं सिंघण याची सत्ता अतोनात वाढली होती. त्याच्या राज्याचा विस्तार एवढा होता कीं, त्याच्या पूर्वीं झालेल्या कोणाही सार्वभौम राजाचें राज्य एवढें विस्तृत नसेल. सिंघण यास सार्वभौमपद मिळालें आणि त्यानें '**सकल पृथ्वीचा आश्रय**' **पृथ्वीपति** (**पृथ्वीवल्लभ**) आणि **राजाधिराज** अशीं पदें धारण केलीं. कृष्ण हा यादव घराण्याचा मुख्य पुरुष असल्यानें त्याच्याच वंशांतील हे यादव राजे होते. त्यामुळें ते आपणांस **विष्णुवंशोद्भव** म्हणवून आपल्या नांवास '**द्वारावतीपुरवराधीश्वर**' असें पद जोडीत असत. यादव घराण्याचा मुख्य प्रधान सोधल हा होता. हा भास्कराचार्यांचा मुलगा असून, मूळचा काश्मीर येथील राहणारा होता. पुढें हा दक्षिणेंत येऊन राहिला. सोधलचा मुलगा सारंगधर यानें सिंघणकरितां गायनकलेवर "संगीत रत्नाकर" नांवाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथात सिंघणबद्दलचा उल्लेख पुढील श्लोकांत आहे.

॥ श्लोक ॥

**तस्याभूत्तनयः प्रभूतविनयः श्रीसोढलः प्रौढधैर्येन श्रीकरणप्रवृद्धविभवं भूवल्लभं भिल्लमम् । आराध्याखिललोकशोकशमनी कीर्तिः समासादिता जैत्रे जैत्रपदं न्यधायि महती श्रीसिंघणे श्रीरपि ॥**

या श्लोकांत यादवकुळांतील भिल्लम व सिंघण यांची स्तुति केलेली आहे. भिल्लमानें सोधलास करणाधिप केल्याचें दिसतें व भिल्लमानें त्यास (सिंघणास) संतुष्ट करून, त्याजकडून अधिकार व द्रव्य मिळविल्याचेंही दिसून येतें.

**तस्माद्दुग्धाम्बुधेर्जातः शार्ङ्गदेवः सुधाकरः । उपर्युपरि सर्वान्यः सदोदारः स्फुरत्करः ॥**

याप्रमाणें संगीत रत्नाकरांत प्रस्तावनेंत मजकूर दिला आहे.

**इति श्रीमदनविनोदश्रीकरणाधिपति श्रीसोढलनन्दननिःशङ्कश्रीशार्ङ्गदेवविरचिते संगीतरत्नाकरे प्रकीर्णकाध्यायस्तृतीयः समाप्तः ॥**

संगीत रत्नाकराचा तिसरा अध्याय संपतांना सारंगदेवानें "सोधलचा मुलगा मी सारंगधर आहें." असें म्हटलें आहे. भास्कराचार्याचा नातू व लक्ष्मीधराचा मुलगा चांगदेव हा सिंघणचा मुख्य ज्योतिषी होता.

भास्कराचार्याला श्रीपती नांवाचा भाऊ होता. त्याचा मुलगा गणपती. या गणपतीस अनंतदेव नांवाचा मुलगा होता. हाही ज्योतिषी असून, सिंघणचे पदरीं होता. चांगदेवानें चाळीसगांव, जिल्हा खानदेशपैकीं, पाटणा या शहरीं पाठशाळा सुरू केली. तेथें त्याच्या शिष्यवर्गानें केलेला सिद्धान्त-शिरोमणि ग्रंथ शिकवित असत. अनंतदेवानें त्याच जिल्ह्यांत एका गांवीं भवानीचें देवालय बांधिलें. हें देवालय शके ११४४ सालीं तयार झालें. सिंघण यास जैत्रपाळ नांवाचा महान् पराक्रमी मुलगा होता. ज्याप्रमाणें पूर्णकलायुक्त पौर्णिमेचा चंद्र उदयाचलावर येऊन पृथ्वीला प्रकाशित करतो, त्याप्रमाणें जैत्रपाळ पूर्ण कलायुक्त होत्साता पृथ्वीचें संरक्षण करण्यास अवतरला. जे राजे त्याच्या बापाशीं शत्रुत्व करीत, त्यांस तो यमधर्मासारखा होता आणि जरी शत्रूपेक्षां त्याचें सैन्य कमी असलें, तरी तो युद्धांत अजिंक्य होता. जत्रपालानें हा पराक्रम व ही विद्वत्ता आपले बापाचे कारकीर्दीतच दाखविली असावी. जैत्रपाळ बापाचे देखतच युद्धांत मारला गेला. सिंघणचा नातू व जैत्रपाळाचा मुलगा कृष्ण शके ११६९ सालीं गादीवर बसून राज्य करूं लागला. सिंघण यास देवालयें बांधण्याचा फार नाद होता. कोल्हापूरच्या भोजराजाशीं लढत असतांना, सिंघण यानें माणदेशामध्यें सिंघणापुर हें शहर वसविलें व भूषणगड किल्ला बांधिला. हल्लीं जें शिखर सिंगणापूर ह्मणून महादेवाचें स्थान आहे तेथील देवालय सिंघणानें बांधून त्यास आपलें नांव दिलें. सातरा जिल्ह्यांत खटाव तालुक्यांत मायणी गांवीं दोन ओढ्याच्या संगमावर संगमेश्वर ह्मणून एक शंकराचें देवालय आहे तेंही यानेंच बांधिलें. हा राजा फार धार्मिक असून दक्षिण देशावर त्याची फार प्रीती होती.

---

## कृष्ण अथवा कन्हार.

शके ११६९ पासून ११८२ पर्यंत.

कृष्ण यास कन्हर अथवा कन्हार असेंही नामाभिधान होतें. माळवा, गुजराथ आणि कोंकण येथील राजांवर कृष्णाचा मोठा दरारा होता. त्यानें चोल आणि तेलंगण येथील राजांस जिंकून तीं राज्यें आपल्या राज्यास जोडिलीं होतीं. हेमाद्री आपले व्रतखंडांत कृष्णाविषयीं म्हणतो कीं, कृष्णानें गुजराथचा राजा विसल (जो सिंघणाबरोबर लढला) त्याचे सैन्याचा नाश करून टाकिला. या सैन्यांत पुष्कळ हत्ती व घोडे होते. यानें पुष्कळ लढाया जिंकल्या व कित्येकांस कैद केलें, कित्येक राजांस पळावयास लाविलें. अशा रीतीनें पृथ्वीवरील सर्व राजे जिंकल्यानंतर आतां जिंकण्यास भूतलावर कोणीं उरलें नाहीं. असें पाहून त्यानें शेवटीं इंद्रपदही घेण्याचा विचार करून तो स्वर्गीं गेला. याचा अर्थ तो मृत्यु पावला. जनार्दनाचा, मुलगा लक्ष्मणदेव यानें आपलेजवळ असलेल्या हुशार लोकांच्या मदतीनें राज्यास बळकटी आणिली व तलवारीचे जोरावर आपले शत्रूंना जिंकलें. ज्या धर्माबद्दल कांहीं दिवसांपूर्वी लोकांची श्रद्धा कमी झाली होती, अशा वैदिक धर्मास त्यानें स्वतः मोठमोठे यज्ञ करून उत्तेजन दिलें. बेळगांव तालुक्यांत जो ताम्रपट सांपडला आहे, त्यावरून असें समजतें कीं मल्ल हा बिचणचा वडील भाऊ असोन बिचणतर्फे सिंगणच्या दक्षिणेकडील प्रांतांत तो सुभेदार होता. हा मल्ल स्वतः कुहुण्डि-कुंद प्रांताचा सुभेदार होता. तो मुद्गल येथें राहात असे आणि कृष्ण याचे परवानगीनें बागेवाडींतील सर्व जमिनी त्यानें निरनिराळ्या गोत्रांतील बत्तीस ब्राह्मणांस दान दिल्या होत्या. दान घेणारे ब्राह्मणांत पटवर्धन व घैसास हे चित्तपावन ब्राह्मण व घळिसास, घळिस व पाठक हे देशस्थ ब्राह्मण होते असेही उल्लेख आढळतात.

याशिवाय त्यांमध्यें त्रिवाडि हें नांव सांपडतें; परंतु असलें नांव महाराष्ट्रीय ब्राह्मणांमध्यें सांपडत नस-

त्यामुळें, ते उत्तर हिंदुस्थानांतले किंवा गुजराथेंतील असावेत असें वाटतें, मल्ल याची जागा त्याचेमागून विचणाचा मुलगा चौण्ड यास दिली होती. या चौण्डनें तेथील एक गांव इनाम देण्याकरितां कृष्णाची परवानगी मागितली होती. लक्ष्मीदेवाचा मुलगा जहलना यास त्याच्या बापाचे जागयावर नेमिलें होतें. तो कृष्णाला उत्तम तऱ्हेचा सल्ला देत असे. तो हत्तीचे फौजेवर मुख्य असून कृष्णराजाच्या शत्रूंशीं त्याची एकदां लढाई झाली होती. त्यानें 'सूक्तिमुक्तावलि' नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिला आहे. वेदांत सूत्रांचा टीकाकार हा कृष्णाचे दरबारीं होता. लक्ष्मीदेवाचा मुलगा जहलना यानें मी लक्ष्मीदेवाचा मुलगा आहें, अशा तऱ्हेचें वर्णन सूक्तिमुक्तावलींतील ग्रंथांत ज्या श्लोकांत दिलें आहे, ते श्लोक येणेंप्रमाणें आहेत.

॥ श्लोक ॥

विश्वत्राणपरायणः स्फुरदुरुस्वर्णार्चितार्थी व्रजस्तस्मादद्भुतविक्रमः समभवच्छ्रीलक्ष्मिदेवः सुधीः । मन्त्रैर्निर्जितदेव मान्त्रिधिषणैर्जाग्रिन्नयः प्रक्रमैः राज्यं कृष्णमहीपतेरविकलं दत्वा स्थिरं यो ञ्यधात् ॥ २१ ॥ अगस्त्य इव यस्यासिर्य्यश्चित् क्षितिभृद्भयौ । चित्रं सोप्यकरो भृत्यत्कबन्धसमरार्णवम् ॥ २२॥ तस्यास्ते तनयो नयोदधिविधुर्बन्धुर्बुधानां सुधीः सारासारविचारणासु चतुरः श्रीजह्णाव्हयः क्षितौ ॥ २६ ॥ मत्पित्रादत्तमस्मै प्रतिहतबलवद्वैरिसर्गोपसर्गं राज्यं प्राज्य प्रभावप्रथितगुणभृताकृष्णराजाय भक्त्या तान्निर्वाह्यं मयेति द्विगुणितधिषणा शक्तिभक्तिर्विधत्ते सर्वं यः स्वामिकार्यं हितमनहताभावुकेनानुजेन ॥ २७ ॥ ध्रुवं यस्यास्ति हस्ताब्जे मदान्धा करिवाहिनी । दानोदकप्रवाहोऽत्र दृश्यंते कथमन्यथा ॥ २८ ॥

या श्लोकांवरून कृष्णराजा व लक्ष्मीदेव या दोघांचे वर्णन जहाल ऊर्फ जहलणानें दिलें आहे असें दिसतें. त्यानें सूक्तिमुक्तावली ग्रंथ केला त्याजबद्दलही येणेंप्रमाणें उल्लेख आहे.

तेनेयं क्रियते तीक्ष्यसत्सुभाषितसंग्रहान् सूक्तिमुक्तावलि कण्ठ-कन्दलीभूषणं सताम् ॥ ३८ ॥

कृष्ण हा शके ११८२ इ. स. १२६० मध्यें वारला. त्याचे पश्चात् त्याचा धाकटा भाऊ महादेव हा गादीवर बसला.

---

## महादेव.

( शके ११८२ पासून शके ११९२; )

कृष्णाच्या मागून त्याचा धाकटा भाऊ महादेव शके ११८२ म्हणजे इ. स. १२६० मध्यें गादीवर बसला. महादेवरूपी वायूनें कापूसरूपी तैलंगणाचा राजा उडवून दिला, गुजराथच्या राजाचा गर्वरूपी पर्वत महादेवाच्या शस्त्ररूपी मेघगर्जनेनें हदरून गेला. महादेवानें कोंकणचा राजा सहज लीलेनें मारून टाकिला; आणि कर्नाटकाच्या व गुजराथच्या गर्विष्ठ राजाचा समाचार घेऊन त्याची शक्ति क्षीण केली. गुजराथचा राजा विसलदेव याचा पराभव महादेवानें केल्याबद्दल पैठणच्या सनदेंत लिहिलें आहे. कर्नाटकमधील हळेबीडचे राजे होयसळ यादव होते. महादेव हा स्त्री, लहान मूल, व आपल्यास शरण आलेला शत्रु, यांस कधींही ठार मारित नसे. ही कीर्ति ऐकून आंध्र राजानें एका बाईस गादीवर बसविलें व आपल्या राज्याचें संरक्षण केलें; आणि माळव्याचे राजानें एका लहान मुलास गादीवर बसवून, पुष्कळ मुदतपर्यंत दांभिकपणानें तपश्चर्येचें मिष करून आपला बचाव केला. त्यानें तैलंगणच्या राजाचे पुष्कळ हत्ती व पांच गायनवाद्येंही हरण केलीं. महादेवास लढाईत तैलंगणचा राजा रुद्रमाहा सांपडला होता. तो स्त्री आहे असें समजल्यावरून त्यास त्यानें सोडून दिलें व स्त्रीला न मारण्याची आपली प्रतिज्ञा खरी केली. वियानाथ या कवीनें "प्रतापरुद्रिका" या नांवाचें काव्य केलें आहे; त्यांत असें दाखविलें आहे कीं, जैत्रपाल यादवानें काकतीया वंशापैकीं, गणपती यास कैदेंत ठेवून पुढें सोडून दिलें होतें. त्या गणपतीस ज्यावेळीं धरिलें, त्यावेळीं त्यानें आपल्या मुलीस रुद्र नांवाचा हा माझा मुलगा आहे, असें म्हणून गादीवर बसविलें. त्यावेळेपासून त्या मुलीस राजा असें मानूं लागले. तिनें

प्रतापरुद्र नांवाचा आपले मुलीचा ( रुद्रमाचा ) मुलगा वारस केला. हीच रुद्रमा आंध्र राजानें आपल्या गादीवर बसविली व हिलाच स्त्री जाणून महादेवानें न मारितां सोडून दिली. त्याबद्दल श्लोक दिला आहे तोः—

॥ श्लोक ॥

**॥ एवमेतत् । अन्यथा कथमीश्वरप्रसादादते निरङ्कुशं स्त्रीव्यक्तिविशेषस्य लोकाधिपत्यम् । एवं मानुपशम्भुना गणपतीमहाराजेनाभ्यन्तरस्यानुभावस्य सदृशमत्र पुत्र इति व्यवहारः कृतस्तदनुगुणा च रुद्र इत्याख्या ॥**

'महादेवाच्या मत्तहत्तींच्या गंडस्थलापासून वाहणाऱ्या दानोदकाच्या नदींत कोंकणचा सोमराजा, पोहण्यांत वाकब असतांहि आपल्या सैन्यासह बुडून गेला.' याचा अर्थ–महादेवानें हत्तींचे सैन्याकडून सोमराजाचा पराभव केला.–हा सोमठाण्याचा शिलाहारवंशी राजा होता. त्यास सोमेश्वरही म्हणत. हा कृष्णराजा याच्याशीं लढला; परंतु पूर्णपणें कोंकण त्यानें जिंकलें नाहीं. तें काम महादेवानें केलें. त्यानें पुष्कळ हत्ती व दुसरें इतर सैन्य घेऊन जमिनीवर सोमेश्वराचा पूर्णपणें पराभव केला. नंतर सोमेश्वरानें लढाऊ आरमार पूर्णपणें तयार करवून, समुद्रांतून लढाया दिल्या. समुद्रावरच्या लढायांतही महादेवानें त्याचा पराभव करून त्यास ठार मारलें. याबद्दल असें म्हटलें आहे कीं, समुद्रानें महादेवाचा अग्निवर्षाव आपणास सहन होणार नाहीं, असें जाणून कीं काय, सोमेश्वराचें संरक्षण केलें नाहीं. येथपासून सर्व कोंकणपट्टी यादवांनीं आपल्या राज्यास जोडली; व तिजवर आपला एक मुख्य अधिकारी नेमिला. सोमेश्वर शके ११७१ सालीं ठार मारला गेला. हाच ठाण्याचा शेवटचा राजा होय.

यापुढें शिलाहार वंशाचें राज्य नाहींसें झालें. शके ११८२ मध्येंही एका शिलालेखांत महादेव हा देवगिरी येथें राज्य करीत होता; त्याच्या राज्यास शेऊणदेश असेंच म्हणत होते; व शेऊण देशाची राजधानी देवगिरि ही दंडकारण्याच्या सीमेस लागून होती; असा उल्लेख आहे. ही नगरी केवळ सौंदर्याचें आगरच होय. येथील प्रासाद व मंदिरें यांचे कळस देवांच्या मेरुपर्वताच्या शिखरांची स्पर्धा करीत होते; आणि शेऊणदेश सौंदर्य आणि रुचि यांचें माहेरघर होतें; व देवगिरिपर्वत हा देवांच्या मेरुपर्वतासारखा होता; असें भपकेदार वर्णन या काळच्या लेखांत आहे. पंढरपुरास शके ११९२ प्रमोदनाम संवत्सरामधील शिलालेख आढळला आहे; त्यामध्यें महादेव हा त्या वेळचा राज्यकर्ता होता असें लिहिलें आहे व 'प्रौढ प्रताप चक्रवर्ती सार्वभौम राजा' असें गौरवयुक्त उपपद त्याचे नांवाला जोडलें आहे. व त्यांतच 'अप्तोर्याम' नांवाच यज्ञ महादेवानें केल्याबद्दल लिहिलें आहे. हा यज्ञ वैदिकधर्मानुसार करून, महादेवानें वैदिक धर्मास उत्तेजन दिलें. या यज्ञांत काश्यपगोत्री केशव नांवाचा ब्राह्मण मुख्य आचार्य होता. महादेव शके ११९२।९३ चे दरम्यान मरण पावला. त्याचा मुलगा अमान गादीवर बसला. परंतु त्याचा गादीवर हक्क नसल्यामुळें कृष्णाचा मुलगा रामचंद्र–रामदेव ऊर्फ रामराज नांवाचा होता तो गादीवर बसला.

---

## रामदेव.

( शके ११९३ पासून. )

रामदेव हा शके ११९३ म्हणजे सन १२७१ सालीं गादीवर बसला. ठाण्याच्या ताम्रपटांत रामदेवराव याचेविषयीं म्हटलें आहे कीं, माळव्याच्या हत्तीरूप राजास रामचंद्र हा सिंहरूप होता; म्हणजे ज्याप्रमाणें सिंह हत्तीचा पराभव करितो, त्याप्रमाणें माळव्याच्या राजाचा पराभव रामदेवानें केला. रामचंद्राला हत्तीचीही उपमा दिली आहे. हत्ती जसा आपल्या शुंडादंडानें एकादें झाड उपटून टाकितो त्याप्रमाणें रामदेवानें तैलंगणाचे राजास उपटून टाकिलें. याचा अर्थ—'महादेवाच्या कारकीर्दींत सांगितलेला तैलंगणाचा राजा (रुद्रमाचा मुलगा) प्रतापरुद्र याचेशीं रामदेवाची लढाई झाली. व त्यांत त्यानें तैलंगणच्या राजाचा पराभव करून टाकिला. महादेवाचें राज्य नर्मदेपासून म्हैसूरपर्यंत पसरलें होतें. अमरकोश नांवाचा ग्रंथ रामदेवाचे कारकीर्दींतच म्हणजे कलियुग ४३९८ शके १२१९ इसवी सन १२९७ यासालीं ताडपत्रावर लिहिला गेला. शके १२१२ मध्यें रामदेवानें भारद्वाज गोत्री,–पद्मनाभाचा नातु–कृष्ण

नांवाचा ब्राह्मण कोकणावर मुख्य कारभारी नेमिला होता. पद्मनाभ सिंघणचे वेळेस उदयास आला. शके ११९४ मध्यें ठाण्याची सनद त्या कृष्णानें दिली आहे. दुसरी एक सनद अच्युतनायक म्हणून दुसऱ्या एका ब्राह्मणानें दिली आहे. हा अच्युत नायक रामचंद्राचा नोकर असून लहानसा अधिकारी होता. त्याचें राहण्याचें ठिकाण समजत नाहीं. शके ११९३ मधील पैठणच्या ताम्रपटांत रामचंद्रानें ५७ ब्राह्मणांस इनाम म्हणून दिलेल्या तीन गांवांचा उल्लेख आहे. त्याच्या शर्ती अशा होत्या कीं, या इनाम गांवांमध्यें ह्यांनीं व यांच्या वंशजांनीं रहावें, गांव सोडून जाऊं नये. त्या गांवांमध्यें कोणी वेश्या ठेवूं नये. जुवा खेळूं नये व हत्यारें वापरूं नयेत. सत्कृत्यांत आपला वेळ घालवावा. याप्रमाणें शर्ती होत्या. हेमाद्रि हा महादेवाचा आणि रामचंद्राचा मुख्य प्रधान होता. या हेमाद्रीनें धर्मशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला. या धर्मशास्त्राच्या ग्रंथांत हेमाद्रीनें स्वतःस महादेवाचा श्रीकर्णाधिप अथवा श्रीकरणप्रभु असें म्हटलेलें आहे. ठाण्याच्या शके ११९४ मधील दानपत्रांत हेमाद्रीनें आपण मुख्य करणाधिप आहों असें म्हटलें आहे. हा अधिकार मुख्य प्रधानाचा असून, सर्व राजाचें दप्तर याचे ताब्यांत रहात असे; व तोच राजाच्या तर्फे हुकूम लिहीत असे. हेमाद्रीला प्रतिनिधी असेंही म्हटलें आहे. त्यानें आपले दुसऱ्या ग्रंथांत आणि ठाण्याच्या ताम्रपटांत महादेवाच्या ऐवजीं रामराज हा आपला धनी आहे, असें म्हटलें आहे. धर्मशास्त्राच्या ग्रंथांत त्यानें आपला व महादेवाचा वंशवेल दिला आहे. कित्येक ठिकाणीं तो सिंघणपासून दिला आहे व कित्येक ठिकाणीं भिल्लमपासून दिला आहे. दानखंडामध्यें मात्र महादेवाच्याच पराक्रमाचें वर्णन दिलें आहे. व्रतखंडांत यादव वंशाचा पहिल्यापासून वंशवेल दिला आहे. तो फार महत्त्वाचा आहे. हेमाद्रि वत्सगोत्री ब्राह्मण होता. त्याच्या बापाचें, आजाचें व पणजाचें हीं तीन नांवें अनुक्रमें कामदेव, वासुदेव व वामन अशीं होतीं. हेमाद्रीनें त्यांची फार स्तुति केली आहे. हेमाद्रि ब्राह्मणांविषयीं उदार होता; पुष्कळ ब्राह्मणांस तो रोज अन्न देई. तो स्वतः विद्वान् होता, व विद्वानांस त्याचा मोठा आश्रय होता. तो धार्मिक आणि पवित्र होता, तसाच शूरही होता. त्याचें राज्यांत मोठें वजन होतें. धर्मशास्त्रावर जो त्यानें ग्रंथ लिहिला, तो जरी अपूर्ण असला तरी त्यानें धर्मशास्त्रावर मोठे परिश्रम करून लिहिला होता, यांत शंका नाहीं. पूर्वीच्या धर्मसंबंधीं कित्येक अनवश्यक अशा वहिवाटी त्यानें कमी करून टाकिल्या. या ग्रंथास **'चतुर्वर्ग-चिंतामणि'** असें म्हणतात. या ग्रंथाचे चार भाग केले आहेत. १ व्रतखंड—यांत धर्मसंबंधीं उपोषणांबद्दल हकीकत दिलेली आहे. २ दानखंड—यांत दानांची माहिती आहे. ३ तीर्थखंड—यांत तीर्थयात्रा करण्याविषयींची माहिती आहे. ४ मोक्षखंड—यामध्यें मोक्षासंबंधी माहिती आहे. याशिवाय आणखी एक पांचवा खंड आहे. त्यास परिशेषखंड असें नांव आहे. यांत निरनिराळ्या देवतांचें पूजन, श्राद्धपक्ष व धर्मसंबंधी विधी करण्याच्या वेळा आणि प्रायश्चित्तें यांचा निर्णय सांगितला आहे. हे सर्व ग्रंथ उत्तम माहितीनें परिपूर्ण आहेत व जागोजाग धर्मसंबंधी ग्रंथांचे आधार दिले आहेत. हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. पुढील ग्रंथलेखकांनीं याला आधारभूत मानून, आपले ग्रंथ लिहिले. यावरून त्याची योग्यता कळून येईल. वाग्भटानें आयुर्वेदरसायन नांवाचा ग्रंथ केला आहे. त्यावरील टीका व बोपदेवानें केलेल्या **'मुक्ताफळ'** नांवाच्या वैष्णवमतासंबंधाच्या ग्रंथावरील टीका या हेमाद्रिपंतानें केल्या आहेत. बोपदेव हा विद्वान् असून हेमाद्रिपंताचा जोडीदार होता. याच बोपदेवानें भागवताच्या आधारानें **'हरिलीला'** नांवाचा ग्रंथ केला आहे. हे दोन्हीही ग्रंथ हेमाद्रीचे सांगण्यावरून बोपदेवानें लिहिले आहेत, याविषयीं उल्लेख आहे तो असाः—

**॥ विद्वद्धनेशशिष्येण भिषक्केशवसूनुना। हेमाद्रिर्बोपदेवेन मुक्ताफलमचीकरत्। श्रीमद्भागवतस्कन्धाध्यायार्थादि निरूप्यते। विदुषा बोपदेवेन मन्त्रिहेमाद्रितुष्टये ॥**

बोपदेव हा केशव नांवाच्या वैद्याचा मुलगा होता. हा केशव धनेशाचा शिष्य होता. केशव याचा बाप आणि गुरु वर्धेच्या कांठीं सार्थ नांवाच्या गांवीं रहात असत. यावरून बोपदेव हा वऱ्हाडांतील राहणारा असावा असें दिसतें. बोपदेवानें लिहिलेलें संस्कृत व्याकरण व त्याचप्रमाणें कांहीं वैद्यकीवरीलही ग्रंथ

प्रसिद्ध आहेत. हेमाद्रीची आठवण सर्व महाराष्ट्रांत अद्याप आहे. महाराष्ट्रांत त्यास हेमाडपंत असें म्हणतात. हेमाडपंती देवालयें दक्षिणेंत पुष्कळ आढळतात. त्यानें लंकेहून मोडी लिपी आणून येथें सुरू केली. त्याच्याकडे राज्याचें दप्तर असल्याकारणानें त्याला लिहिण्याचें काम वारंवार पडे. त्यामुळें त्यानें लिहिण्यामध्यें मोडी लिपीची सुधारणा केली असावी, हें सयुक्तिक दिसतें.

प्रसिद्ध मराठी साधु ज्ञानेश्वर हा रामचंद्र राजाचे कारकीर्दींतच झाला. भगवद्गीतेवर ज्ञानेश्वरी नांवाचा टीकाग्रंथ त्यानें केला. तिच्या शेवटीं रामदेवरावाबद्दल येणेंप्रमाणें उल्लेख आहे:—

**ऐसें युगीं परिकळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं ॥ श्रीगोदावरीच्या कूलीं । दक्षिणलिंगीं ॥ १ ॥ त्रिभुवनैकपवित्र । अनादिपंचक्रोश क्षेत्र ॥ जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ २ ॥ तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु ॥ न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥ ३ ॥ तेथ महेशान्वयसंभूतें । श्री निवृत्तिनाथसुतें ॥ केलें ज्ञानदेवें गीतें । देशीकार लेणें ॥ ४ ॥**

हा ग्रंथ शके १२१२ मध्यें झाला. त्यावेळीं रामचंद्र राज्य करीत होता. रामचंद्र हा दक्षिणेंतील शेवटचा वैभवशाली हिंदु राजा होता. मुसलमानांनीं यापूर्वीं एक शतकापासून दिल्लीवर आपली सत्ता स्थापन केली होती. तथापि त्यांचें लक्ष्य अद्यापि दक्षिणेकडे गेलें नव्हतें. पण लवकरच त्यांची नजर दक्षिणेकडे फिरली. यावेळीं दिल्लीचे तक्तावर केकोबाद नांवाचा गुलामवंशांतील सुलतान होता. खिलजी घराण्यापैकीं मलिक नांवाचा एक पुरुष स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आला होता; व तो दिल्लीच्या सुलतानाचे पदरीं राहिला होता. त्याचा मुलगा फिरोज यानें सुलतानास मारून दिल्लीच्या सुलतानाचें पद मिळविलें व आपल्यास जलालुद्दीन फिरोज असें नांव धारण केलें. जलालुद्दीन फिरोजनें आपला भाऊ शहाबुद्दीन याचीं दोन मुलें आपल्या जवळ ठेवून घेतलीं होतीं. त्या दोन मुलांचीं नांवें अनुक्रमें अल्लाउद्दीन खिलजी व अलबस बेग अशीं होतीं. अल्लाउद्दीन यानें माळव्याच्या स्वारींत चांगला पराक्रम केल्यामुळें, त्यास दरबारांत वजन प्राप्त झालें होतें. भिलसा येथें असतां, 'कुरा' चा सुभेदार अल्लाउद्दीन यास दक्षिणेंतल्या देवगड किंवा देवगिरी नामक एका धनाढ्य शहराची खबर कळली. तेव्हां त्याच्या तोंडास पाणी सुटलें. त्यानें लगेच दक्षिणेंत जाण्याची परवानगी चुलत्याकडे मागितली. यावेळीं दक्षिणेस जाणें हें काम मोठें दुर्घट होतें. महाराष्ट्रदेश नर्मदेच्या दक्षिणेस होता. 'कुरा' शहराहून देवगड ७०० मैल दूर व दिल्लीहूनही तितकेंच लांब होतें. देवगडास जाण्याचा रस्ता विकट, जंगलांतून व अपरिचित मुलखांतून होता. मार्गांत नानाप्रकारच्या दुष्ट लोकांची वस्ती होती, ते आपणास दाणावैरण मिळूं द्यावयाचे नाहींत, फौजेवर छापा घालून ते पाहिजे तेव्हां कापून काढतील, अशी भीति अल्लाउद्दीनास होती. अशा प्रसंगीं सुद्रन जाण्यास मार्ग नव्हता. पण हिंदु लोकांची अल्लाउद्दीनास चांगली माहिती होती. ते सात्त्विक आहेत, धर्मयुद्धाचे नियम मोडीत नाहींत, व आगाऊ सूचना दिल्याशिवाय संग्राम करीत नाहींत, त्यांच्या वाटेस न जाणाऱ्यास ते त्रास देत नाहींत, हें त्यास ठाऊक होतें; म्हणून स्वारांचा जमाव करून व कांहीं खोटी बात झोंकून देऊन, ह्या लोकांस चकवितां येईल अशी अल्लाउद्दीनची खात्री होती. त्यानें आपला खरा बेत चुलत्यास किंवा दुसऱ्या कोणासही कळविला नाहीं. आठ हजार स्वार घेऊन, तो सन १२९४ त 'कुरा' हून निघाला व बुंदेलखंडाच्या मैदानांतून थेट दक्षिणेस चालला. त्याचा मागमूस त्याच्या पाठीमागें सहा महिने कोणासहि लागला नाहीं. मी दिल्लीचा सुलतान जलालुद्दीन ह्याचा पुतण्या आहें, व चुलत्याबरोबर भांडून नोकरी पतकरण्याकरितां तैलंगणच्या राजाकडे राजमहेंद्रीस चाललों आहें, असें सांगत तो चालला होता. त्यास कोणींच कोठेंही अडथळा केला नाहीं; व तो सांगतो तें खरें कीं खोटें, ह्याची काडीभर सुद्धां चौकशी कोणी केली नाहीं. विंध्याद्री उतरून अल्लाउद्दीन सुखरूपपणें नर्मदा-पार झाला; व एकदम येऊन देवगडच्या तटाखालीं उतरला. देवगडासच पुढें दौलताबाद नांव मिळालें. हिंदुस्थानच्या इतिहासांत हें ठिकाण मोठ्या महत्त्वाचें आहे. त्याचें

कारण पुढें हळूहळू समजेल. अल्लाउद्दीन याची रामदेवाला वार्ता सुद्धां कळली नव्हती. शहराबाहेर देवदर्शनास गेला असतां, तेथें त्यास अल्लाउद्दीन आल्याची बातमी कळली. तेव्हां तो एकदम मोठ्या बुचकळ्यांत पडला. त्याची लढाईची तयारी नव्हती. फौज दुसरीकडे गेली होती. म्हणून शहरवासी लोकांतून व नोकर-चाकरांतून कांहीं माणसें जमवून, तो अल्लाउद्दीनावर चालून गेला. त्याच्या लोकांनीं बराच वेळ टिकाव धरिला. पण शेवटीं पराभव पाऊन तो किल्ल्याचे आश्रयास गेला. हल्लीं दौलताबादचे किल्ल्यास मोठा खंदक आहे, तो तेव्हां नव्हता. अल्लाउद्दीनानें किल्ल्यास वेढा दिला व शहरांत शिरून लुटालूट आरंभिली. लोकांनीं आपल्या गुप्त ठेवी दाखवाव्या म्हणून त्यानें त्यांजवर नाना तऱ्हेचा जुलूम केला. तरी किल्ला हस्तगत होईना. अल्लाउद्दीनानें असें कळविलें कीं, मी फक्त लहानशी फौज घेऊन पुढें आलों आहें; बादशहाची मोठी फौज मागाहून येत आहे. हें ऐकून रामदेवरावाची पांचावर धारण बसली. किल्ल्यांत सामग्री भरतांना धान्याच्या ऐवजीं मिठाचीं पोतीं भरलीं गेलीं होतीं. धान्य संपलें, तेव्हां त्यानें एकदम तह करून अल्लाउद्दीनास पुष्कळ द्रव्य दिलें. अल्लाउद्दीनाला तरी हेंच पाहिजे होतें. कारण रामदेवरावाची फौज परत आल्यावर तिच्यापुढें अल्लाउद्दीनाचा टिकाव लागला नसता म्हणून तो तहास कबूल झाला. तह होऊन अल्लाउद्दीन निघणार, इतक्यांत रामदेवरावाचा मुलगा शंकरदेव हा बाहेरून मोठी फौज घेऊन आला. रामदेवरावानें त्यास निरोप पाठविला कीं, अल्लाउद्दीनाशीं तह झाला आहे. तेव्हां आतां तुम्हीं लढाई करूं नये. पण शंकरदेवानें तें मानिलें नाहीं. त्यानें अल्लाउद्दीनास पत्र पाठवून कळविलें कीं, तुम्हांला जिवाची आशा असेल व सुखानें परत जाणें असेल, तर आमच्या राज्यांतून घेतलेलें द्रव्य परत द्या व जीव घेऊन परत जा. ह्या पत्रानें मुसलमानांचें पित्त खवळलें. अल्लाउद्दीनानें पत्र आणणाऱ्या जासूदाचे तोंडास काजळ फासून त्याला हांकून लाविलें. अल्लाउद्दीन एकदम लढाईचे तोंडावर गेला व १००० स्वारानिशीं मलीक खुस्रत ह्यास वेढ्याचें काम सांगितलें. यावेळीं शंकरदेवानें विलक्षण धाडस व पराक्रम दाखविला. मुसलमानांचा समूळ नाश होण्याची वेळ आली होती. इतक्यांत किल्ल्याचे रक्षणास ठेविलेला रामदेवाचा एक सरदार, आपले थोडे लोक घेऊन हुकूम नसतां लढाईस आला. त्या सैन्यांतील शिपायांच्या पायांनीं उडालेली धूळ दुरून दिसली, तेव्हां हिंदु लोकांस वाटलें कीं, दिल्लीहून अल्लाउद्दीनाचे मदतीस येणारी फौज आली. आतां आपला निभाव लागणार नाहीं, या खोट्या भीतीनें भेदरल्यामुळें ते रणांगणांतून सैरावैरा पळूं लागले. अल्लाउद्दीनाला अनायासें विजय प्राप्त झाला. अल्लाउद्दीन किल्ल्याकडे गेला. धान्याऐवजीं मिठाचीं पोतीं किल्ल्यांत गेलीं, हें समजलें; तेव्हां रामदेवरावास दुसरा कांहींच उपाय राहिला नाहीं. इलीचपूर व आसपासचे प्रांत व अपरंपार द्रव्य अल्लाउद्दीनास देऊन त्यानें कसाबसा आपला बचाव करून घेतला. अशाप्रकारें विजय संपादून अल्लाउद्दीन 'कुरा' येथें परत आला. युद्धांत विजय किंवा पराजय होणें केवळ दैवाधीन आहे, असें अनेक युद्धविशारद सांगतात. त्याचा प्रत्यय वरील देवगडच्या लढाईत चांगला आला. अल्लाउद्दीन दक्षिणेंतून विजय मिळवून दिल्लीकडे चालता झाला, व आपला चुलता जलालुद्दीन यास विजय संपादल्याचें वर्तमान त्यानें लिहून कळविलें, त्यावरून जलालुद्दीन बादशहा, थोड्या फौजेनिशीं 'कुरा' येथें अल्लाउद्दीनास भेटण्यास गेला, पुढें अल्लाउद्दीनाची व त्याची भेट झाली, तेव्हां अल्लाउद्दीन आपल्या चुलत्याच्या पायां पडला. त्यासमयीं तो सात्त्विक व वृद्ध जलालुद्दीन, प्रेमानें त्याचे गालांवरून हात फिरवीत आहे आणि "मी तुला लहानपणापासून वाढवून आपल्या मुलांपेक्षां तुजवर विशेष प्रेम करीत असतांही तूं माझा विश्वास धरिला नाहींस" असें त्यास म्हणत आहे; इतक्यांत लपवून ठेवलेले मारेकरी अल्लाउद्दीनानें खूण करतांच पुढें सरसावले व त्यांनीं बादशहाचीं आंतडीं बाहेर काढलीं. 'अरे दुष्टा अल्लाउद्दीना' असें म्हणून जलालुद्दीनानें प्राण सोडिला. त्याचें शीर भाल्यावर टोंचून लष्करांत व सर्व ठिकाणीं फिरविण्यांत आलें.

पुढें अल्लाउद्दीनानें दिल्लीस जाऊन तेथील तक्त बळकाविलें. सन १२९७ सालीं अल्लाउद्दीनानें अलफखान व वजीर नुस्रतखान ह्यांस गुजराथ जिंकण्यास पाठविलें. त्यावेळीं गुजराथचा राजा वाघेलवंशांतील

कर्णराय हा राज्य करीत होता. वाघेलवंशाची माहिती मागें दिलीच आहे. त्याच्या अवाढव्य सेनेनें गुजराथची अवर्णनीय अशी पायमल्ली केली. अनहिलवाडचा किल्ला घेऊन तेथें मुसलमानांनीं आपलें ठाणें बसविलें, राजा कर्णवाघेल पळून रामदेवराव याचे आश्रयास जाऊन राहिला. कर्ण राजाची नीतिमत्ता चांगली नव्हती. भाट लोकांनीं कर्णाच्या अनाचाराचें पुष्कळ वर्णन केलें आहे. माधव नांवाचा नागर ब्राह्मण कर्णाचा मुख्य प्रधान होता. तो कोठें बाहेर गेला असतां, त्याच्या रूपवती पत्नीवर कर्णानें बलात्कार करून तिला आपल्या वाड्यांत नेलें. तिला सोडविण्याचा प्रयत्न माधवाचा भाऊ केशव यानें केला. पण त्यांत तो मारला गेला. परत आल्यावर माधवास ही हकीकत कळली; पण त्याला स्वतःला या दुष्कृत्याचा सूड घेतां येईना. तेव्हां तो तसाच दिल्लीचा सुलतान अल्लाउद्दीन याजकडे गेला. तेथें कर्ण राजाच्या जुलमाची कची हकीकत अल्लाउद्दीनास सांगून गुजराथ देशावर स्वारी करण्याविषयीं माधवानें त्याचें मन वळविलें. कर्णाचे अंगीं शौर्य, वीर्य, पराक्रम वगैरे कांहींच गुण नसल्यामुळें लढाईची तजवीज करण्याचें सोडून, त्यानें बायकांप्रमाणें घाबरून शहरचे सर्व दरवाजे बंद केले व स्वतःसह सर्व नगरवासी जनांस कोंडून घेतलें. कर्णाच्या मागें त्याचें राज्य मुसलमानांचे स्वाधीन झालें. त्यांत कर्णाची रूपवती स्त्री कमलादेवी ही त्यांचे हातीं सांपडली. तिची अल्लाउद्दीनाकडे रवानगी करण्यांत आली. अल्लाउद्दीनानें तिच्याशीं लग्न लावून तिला आपल्या जनानखान्यांत ठेविलें. अनहिलपट्टण घेतल्यावर अलफखान व नुस्रतखान हे खंबायतवर गेले. खंबायत हें त्यावेळीं विशेष भरभराटीचें व मातबर शहर होतें. ह्या ठिकाणीं नुस्रतखानास एक गुलाम मिळाला. तो त्यानें बादशहास नजर केला, तोच गुलाम पुढें मलिककाफूर या नांवानें प्रसिद्धीस आला, हा लवकरच अल्लाउद्दीनाचा कलिजा होऊन बसला. ज्यावेळेस मुसलमान लोक अनहिलपट्टण शहरांत शिरले, त्यावेळेस कर्ण वर सांगितल्याप्रमाणें रामदेवाच्या आश्रयानें बागलाणचे किल्ल्यांत जाऊन राहिला होता. त्यावेळीं कमलादेवी ही अब्रूच्या रक्षणार्थ अग्निप्रवेश करून घेत असतां, मुसलमानांनीं तिला धरिली. त्याच्या पूर्वीच तिनें कनकदेवी व देवलदेवी अशा आपल्या दोन मुली एका विश्वासू नोकराच्या स्वाधीन करून आपले माहेरीं झालवाड्यास रवाना केल्या होत्या. हा नोकर ह्या दोन्ही मुली घेऊन निघाला. रस्त्यांत त्यास असें कळलें कीं, राजा कर्ण हा बागलाणांतील एका किल्ल्यांत राहिला आहे, म्हणून त्यानें ह्या दोन्ही मुली त्यांच्या बापाकडे नेऊन पोहोंचत्या केल्या. कनकदेवी ही पुढें २।८ वर्षांनीं वारली, व देवलदेवी आपले बापाजवळ होती. ती ह्या वेळीं १३ वर्षांची जाहली होती. एके दिवशीं देवलदेवी व रामदेवराजाचे दोन पुत्र वाघाचे शिकारीकरितां जंगलांत गेले असतां, देवलदेवीचे अंगावर वाघ धांवून आला. त्या वेळीं राजपुत्र शंकरदेव ह्यानें वाघास ठार मारून देवलदेवीचा जीव वांचविला. त्या वेळीं शंकरदेवावर देवलदेवीची पूर्ण प्रीति बसली. पुढें रामदेवराजानें कर्णराजापाशीं देवलदेवीची मागणी, राजपुत्र शंकरदेव याजकरितां केली. पहिल्यानें कर्णानें ही मागणी नाकबूल केली; परंतु रामदेवाचें घराणें अस्सल क्षत्रिय असून, रजपुतांच्या ३६ घराण्यांपैकीं जे सोमवंशी यादवघराणें आहे, त्यापासूनच हें घराणें दक्षिणेंत आलें; अशी त्याची खात्री झाल्यावर तो कबूल झाला. त्याची संमति मिळण्याला दुसरीही एक गोष्ट कारण झाली. ती अशी कीं, कर्णाची स्त्री कमलादेवी हिच्या सांगण्यावरून देवलदेवीला धरून आणण्यासाठीं अल्लाउद्दीनानें आलफखान नांवाच्या सरदारास पाठविलें होतें. मुलगी मुसलमानांचे हातांत पडण्यापेक्षां रामदेवरावासारख्या थोर व उच्च हिंदु घराण्यांत दिलेली बरी असा विचार करून कर्णानें आपली मुलगी शंकरदेव यास मोठ्या आनंदानें देण्याचें कबूल केलें.

वर सांगितल्याप्रमाणें अल्लाउद्दीन बागलाणकडे चालता झाला व मलिक काफर याचे हाताखालील सैन्यानें देवगडावर हल्ला केला. इकडे कर्णराजास आलफखान आपलेवर येत आहे, असें कळल्यावर त्यानें कांहीं अनुभविक व लढाईच्या कामांत कसलेले रजपूत जुने शिपाई आपले मदतीस बोलाविले. त्याप्रमाणें फार थोडे लोक त्याच्या मदतीस आले. शिवाय,

रामदेवाचा धाकटा मुलगा भीमदेव ह्यालाही मदतीस बोलाविलें होतें. भीमदेवानें बागलाणच्या मार्गांत आलफखान यास अडथळा केला, व मोठ्या शौर्यानें हल्ले केले. परंतु आलफखानचे मदतीस पुन्हा नव्या दमाचें सैन्य आल्यामुळें, त्याला बागलाणचा रस्ता मोकळा करतां आला व तेथील शहरास त्यानें वेढा दिला. आंतील लोकांस खाण्यास न मिळाल्यामुळें शहरवासी लोकांनीं शहरचे दरवाजे उघडले. मुसलमान आंत घुसण्याच्या गर्दींत असतां, त्यांचा डोळा चुकवून भीमदेव, कर्ण व देवलदेवी हीं कांहीं घोडेस्वार घेऊन तेथून निसटून देवगडाकडे गेलीं. परंतु आलफखानाच्या हाताखालील मुसलमानांच्या फिरत्या टोळीची व त्यांची गांठ पडून दोघांची चकमक उडाली. त्या गडबडींत देवलदेवी मुसलमानांच्या हातीं लागली. आलफखानानें तीस दिल्लीस नेऊन पोंहोंचविलें. तेथें सुलतानाचा वडील मुलगा खिजरखान त्याच्याशीं तिचें लग्न झालें× इकडे मलिक काफूरच्या फौजेनें देवगडास वेढा दिला होता; परंतु रामदेवराजानें त्याच्याशीं लढून आपला निभाव लागणार नाहीं, असें जाणून त्याचे बरोबर दिल्लीस जाण्याचें व खंडणी भरण्याचें कबूल करून तो दिल्लीस गेला. तेथें सुलतानानें त्याचा चांगला सन्मान* करून त्यास एक छत्र, राजाधिराज हा किताब व एक लाख रुपये वक्षीस दिले, आणि त्यास प्रतिष्ठेनें स्वदेशीं जाऊं दिलें. त्यावेळेपासून रामदेवानें मुसलमानाशीं वैर केलें नाहीं. तो वचनाप्रमाणें आमरण वागत होता. खंडणीची रक्कम तो न चुकतां भरीत असे. रामदेव हा सन १३०९ मध्यें वारला.

त्याच्या पश्चात् त्याचा वडील मुलगा शंकरदेव गादीवर बसला. देवगिरीचें घराणें फार जुनाट असून, तें द्वारकेहून देवगडास आलें, असें हेमाद्रिपंतांनीं आपले व्रतखंडांत लिहिलें आहे. व टॉडसाहेबांनींही हें घराणें रजपुतांच्या ३६ घराण्यांपैकीं आहे, असें म्हटलें आहे. ( पहा—टॉडस राजस्थान पान ९१ ) व बाँबे गॅझेटियरमध्यें देवगिरीचा सिंघण यादव, रजपूत राजा होता असें साफ म्हटलें आहे. कर्णराजाची मुलगी शंकरदेवास देऊं केली होती, त्याप्रमाणें हा विवाह घडून येता तर रजपूत आणि मराठे यांचे घराण्यांत बिलकुल भेद नाहीं असें सर्व जगाला कळून आलें असतें. मराठे हे रजपुतांच्या ३६ घराण्यांपैकीं असून फुटून दक्षिणेंत आले आहेत: व त्यांत यादवांचें घराणें सगळ्यांत जुनाट व मुख्य असें आहे रजपुतांत या घराण्याला फार मानितात, असें टॉडसाहेब म्हणतात. या सर्व आधारांवरून यादवांचें घराणें रजपुतांपैकीं असून त्यांच्यापेक्षां कोणत्याही बाजूनें कमी नाहीं. दक्षिणेंतील प्राचीन राजांस रट्टे अथवा महारट्टे ऊर्फ मराठे असें म्हणतात. दक्षिणेंत ज्या लोकांचीं स्वतंत्र राज्यें झालीं, त्यांमध्यें मराठ्यांपैकीं दोनच राजघराणीं स्वतंत्रपणें राज्य करणारीं झालीं. व त्यांनीं एके वेळीं सार्वभौमपद मिळविलें. पहिले यादव ऊर्फ जाधव व दुसरे भोंसले. भोंसल्यांचें घराणें चितोडच्या घराण्यापैकीं ( शिसोदिया ) आहे; असें टॉडसाहेबानें म्हटलें आहे. या भोंसलेघराण्यांत सुद्धां यादवांनीं मुलगी देण्याबद्दल फार आढेवेढे घेतले, त्याबद्दलची हकीकत पुढें येईल.

## शंकरदेव.

सन १३०९ पासून.

शंकरदेवानें दिल्लीस खंडणी पाठविण्याचें बंद केलें, त्यामुळें त्याजवर अल्लाउद्दीनानें मलिक काफूर याबरोबर सैन्य देऊन देवगडावर पाठविलें. ही खंडणी बंद करण्याचें कारण, आपल्यास देऊं केलेली देवलदेवी मुसलमानांनीं नेली, या गोष्टीचा सूड उगवावा अशी शंकरदेवाची इच्छा, हें होतें. काफूर हा देवगडास येऊन त्याची व शंकरदेवाची लढाई झाली. या लढाईंत शंकरदेवास वाघेलवंशांतील कर्णराजानें मदत केली. कर्ण वाघेल हा लढाईंत ठार झाला; व शंकरदेव लढाईंत जखमी झाला. त्यास दिल्लीस नेण्यांत येऊन तेथें त्यास सन १३१२ मध्यें ठार मारण्यांत आलें. याप्रमाणें यादव वंशांतील वैभवशाली राज्य नाहींसें झालें.

**भाग पहिला समाप्त.**

× मे. किंकेडसाहेब बहादुर, मुंबई सरकारचे पोलिटिकल सेक्रेटरी यांनीं सन १९०६ चे दरबारांत दक्षिणेंतील सरदारांचे सरकारचे एजंट या नात्यानें केलेल्या भाषणांत देवलदेवीसंबंधाच्या या अत्यंत मनोरम कथाप्रसंगाचा उल्लेख केला होता.

* सर देसाई कृत मुसलमानी रियासत पृष्ट १३३.

# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग दुसरा.

### अनुक्रमणिका.





शिंदखेड येथील

# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग दुसरा.

शंकरदेवाचा असा शोचनीय अंत होईपर्यंत सुमारें ६०० वर्षे, यादवांनीं दक्षिणेंत सार्वभौमपदाचा उपभोग घेतला. या लढाईमध्यें शंकरदेवाचा धाकटा भाऊ भीमदेव हाही ठार झाला, व शंकरदेवाची बायको व त्याचा–शंकरदेवाचा लहान मुलगा गोविंददेव, यांचें पालनपोषण शंकरदेवाचा मेव्हणा हरपाळ देव यानें केलें. सन १३१६ पासून दिल्ली शहरांत व इतरत्र जीं हिंदूंचीं बंडें झालीं, त्यांत हिंदुराजांचें अंग होतें. दिल्लीस बंड झाल्याबरोबर दक्षिणेंतील राजांनीं उचल घेतली. त्यामध्यें हरपाळ देवाचें मुख्य अंग होतें. हरपाळदेवानें सन १३१६ मध्यें बंड करून सर्व मुसलमान किल्लेदारांस देवगडच्या किल्ल्यांतून हांकून दिलें. याविषयींचें इत्थंभूत वर्तमान ऐकून, अल्लाउद्दीन खिलजी हा धास्ती खाऊन मरण पावला. अल्लाउद्दीनच्या पाठीमागें मुबारिक खिलजी हा गादीवर बसला. त्यानें दक्षिण देशांत स्वारी करून रामदेवाचा जांवई हरपाळ देव, जो देवगड मुक्कामीं स्वतंत्रपणें राज्य करूं लागला होता, त्यास त्यानें जिवंत सोलून हाल करून ठार मारलें. इ.स. १३१८. मुबारिक नंतर तघलक घराणें सुरू झालें. ग्यास्–उद्दीन तघलक व त्यानंतर त्याचा मुलगा महमद तघलक गादीवर बसला. त्याला वेडा महमद असेंहि म्हणत असत. त्यानें दक्षिणेंतील बंडें मोडण्याकरितां कांहीं सैन्य सन १३४४ मध्यें पाठविलें. महमद तघलकाच्या कारकिर्दीत जीं बंडें उद्भवलीं, त्यांचा परिणाम असा झाला कीं, निरनिराळ्या प्रांतांतील अंमलदार स्वतंत्र रीतीनें कारभार पाहूं लागले. त्यांत महाराष्ट्रांत, सुलतानाचा जांवई इनायत उल्मुल्क हा काम पहात होता. त्यास हसन गंगूनें ठार मारून ब्राह्मणीराज्य नांवाचें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. त्यावेळीं शंकरदेवाचा मुलगा गोविंददेव व कर्नाटकचा राजा यांनीं एकत्र होऊन ब्राह्मणी राज्य स्थापण्याचे कामीं हसनगंगूला उत्कृष्ट मदत केली. यावेळीं गोविंददेवानें आपली राजधानी हतनूर शहर केलें. याबद्दल बाँबे ग्याझेटीयर व ग्रांट डफचा इतिहास यांत अशी माहिती दिली आहे कीं, गोविंददेवानें बागलाणचा राजा यास सामील करून घेऊन ब्राह्मणी राज्याचे विरुद्ध बंड केलें व आपली सत्ता खानदेशांत बसवून हतनूरसभोंवतीं आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें. दक्षिणेंत हसनगंगू ऊर्फ अल्लाउद्दीनशहा हा एका ब्राह्मणाकडे वाढला असून त्यानें दिल्लीचे बादशहाविरुद्ध दक्षिणेंतील राजांस वश करून सन १३४७ मध्यें एक बंड उभारिलें. त्यावेळीं दिल्लीच्या तक्तावर महमुद तघलख हा सुलतान होता. तो स्वतः दक्षिणेंत हें बंड मोडण्याकरितां आला. परंतु दिल्लीकडे बंड झाल्याचें समजल्यावरून तो तिकडे तें बंड मोडण्यास गेला. त्यावेळीं मुसलमान लोकांमध्यें तंटे उपस्थित झाले होते. याचें कारण मुसलमानांतील शिया व सुन्नी या दोन धर्मपंथांमधील वाद हेंच होतें. शियापंथ हुबेहुब हिंदु धर्माचे धर्तीचा असून मूर्तिपूजेला अनुकूल होता. इकडे दक्षिणेंतील सर्व राजांशीं हसनगंगूनें स्नेह संपादिला. त्यानें स्वतःस जाफरखान असा किताब मिळविला. नंतर त्यानें गोविंददेव वगैरे दक्षिणेंतील राजांची मदत घेऊन दिल्लीचा सुलतान महमुद तघलख हा दिल्लीस परत गेल्यावर, मागें जें त्याचें सैन्य राहिलें, त्याजवर स्वारी करून त्याचा मोड केला व आपली राजधानी कलबुर्गा शहर करून, त्यास हसनाबाद असें नांव दिलें; आपण अल्लाउद्दीन हसन असा किताब धारण केला; व आपल्या नांवाचीं नाणीं पाडलीं. हासनचे मनाप्रमाणें कार्यभाग झाल्यावर त्यानें सर्व सहाय्यकर्ते राजे लोकांस सोडून देऊन तो त्यांच्याशीं कृतघ्नपणानें वागूं लागला. त्यामुळें सर्व राजे त्याचे विरुद्ध झाले. हा ब्राह्मणी राज्याचा संस्थापक सन १३५८ सालीं वारला.त्यावेळीं जालना, हतनूर, बागलाण

वगैरे ठिकाणचे राजे एक झाले. ते व दक्षिणेत विजयानगरचें राज्य वरंगूळच्या राजघराण्यांतील ज्या एका पुरुषानें स्थापन केलें तो, असे मिळून ब्राह्मणी राजाशीं लढूं लागले. त्या वेळीं ब्राह्मणी राजाचे तक्तावर महमदशहा होता. या शिवाय विजयानगरचा व तैलंगणचा राजा हे एक होऊन त्यानें आपले घेतलेले प्रांत परत घेण्याकरितां महमदशहाशीं लढूं लागले. तैलंगणच्या राजाचा मुलगा विनायकदेव हा त्या सैन्याचा सेनापति होता. तो महमदशहाबरोबर लढत असतांना तैलंगणांतील वेलंपट्टग येथें मारला गेला. परंतु महमदशहा परत येतांनां त्याचे फार हाल झाले. हासनगंगू यास मदत करून, एक नवीन मुसलमानी राज्य स्थापन करून, आपले दाराशीं एक नवीन शत्रु उत्पन्न केला, याचा सर्व हिंदु राजांना फार पश्चात्ताप झाला, व त्या सर्व राजांनीं दिल्लीचा बादशाह फिरोज तघलख याजकडे संधान बांधिलें, व त्यास दक्षिणेंत स्वारी करण्याबद्दल भर दिली. परंतु दिल्लीचे बादशहानें त्यांचे म्हणण्याप्रमाणें स्वारी केली नाहीं. त्यामुळें विजयानगरचा फार प्रबल राजा कृष्णराय यास गोविंददेव व खानदेशांतील आणखी कांहीं राजे यांनीं मदत केली व सर्वांनीं मिळून पुन्हां या महमदावर स्वारी केली. त्यावेळीं कृष्णराय तर्फे भोजमल्ल नांवाचा सेनापति होता. त्यास गोळी लागल्यामुळें जखम होऊन तो पळूं लागला; त्यामुळें हिंदूंचा पुन्हां पराभव झाला. कृष्णराय व हिंदुराजे यांचा पुन्हा तह होऊन ज्यानें त्यानें आपआपल्या मुलखांत रहावें असें ठरलें. महमदशहाचा प्रधान बहिरामखान मुझे दुराणी याला गोविंददेवानें चिथावून देऊन आपले मालकाविरुद्ध बंड करण्यास लाविलें. मुझे दुराणी व गोविंददेव यांनीं बागलाणचा राजा व खानदेशांतील पुष्कळ सरदार लोक हे आपल्यांत सामील करून घेऊन पैठणकडे कूच केलें. त्यांजवर महमदशहानें महमदअल्लीखान महमुद यांस पाठविलें. तो शेगांव येथें उतरला तेव्हां बहिरामखान व गोविंददेव यांनीं त्याजवर छापा घालण्याचा प्रयत्न केला, परंतु तो सावध आहे असें पाहून ते परतले. याचे योगानें बहिरामखानाचे सैन्यास, बहिरामखानाचे पराक्रमाविषयीं संशय उत्पन्न झाला. महंमदअल्ली यानें गोविंददेव व बहिरामखान यांजवर हल्ला करण्याची तयारी केली, व आपला मालक सुलतान यावेळीं डोंगरामध्यें सैन्याचे पिछाडीस शिकार करित होता, त्यास 'हल्ला करण्याची आपली तयारी आहे' म्हणून सांगून पाठविलें. सुलतान आपले सैन्यासह महमुदअल्लीचे मदतीस धांवत आला. हें ऐकून बहिरामखान व गोविंददेव जाधव यांनीं पहिल्यानें दौलताबादेस व नंतर गुजराथकडे पळून जाऊन आपला बचाव केला.

या मराठा राजास स्कॉट्स ट्रान्सलेशनमध्यें * जेवदेव असें म्हटलें आहे. फिरिस्ता या जाधवास गोविंददेव जाधव म्हणतो. व त्यावेळीं नायकांचा मुख्य हा देवगडच्या राजाच्या वंशांतील होता असें म्हणतो. रामदेवराव जाधव हा देवगडचा राजा होता, आणि या मराठी राजाचें नांव गोविंददेव जाधव असें होतें. हें मराठ्यांच्या बखरीवरून स्पष्ट होत आहे. यांत कांहीं संशय नाहीं.

इ० स० १३७० मध्यें दिल्लीचा बादशहा फिरोज तघलख यानें खानदेशापैकीं तीलनेर आणि कुरुंद हे दोन प्रांत मलिकनांवाच्या अरब सरदारास जाहागीर दिले, त्यावेळीं या मलिकनें बागलाणच्या राजावर स्वारी केली. त्या कामीं गोविंददेवानें बागलाणचे राजास मदत केली. पुढें लवकरच गोविंददेव मरण पावला. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा ठाकुरजी गादीवर बसला. ही गोष्ट १३८० च्या सुमारास झाली. गादीवर बसल्यानंतर त्याचे हातून १० वर्षे म्हणण्यासारखी कांहीं एक गोष्ट झाली नाहीं. सुमारें १३९६ मध्यें दुर्गादेवी नांवाचा भयंकर, १२ वर्षांचा दुष्काळ पडला. ठाकूरजीनें हतनूरभोंवतालचा आपला प्रांत व शिंदखेड, पैठण, औरंगाबाद वगैरे प्रांतांवर आपला अंमल चालवून त्या प्रांतांवर देशमुखीचा हक्क स्थापन केला. सुमारें ५० प्रांतांची देशमुखी त्याजकडे होती.

---

* In Scott's Translation it is Geodeo. In some copies of Ferishta, it is Govinddeo; but Ferishta says the chief of the Naiks was a descendant of the Raja of Deogurh, Ramdeo Rao Jadow was the raja of Deogurh according to all Hindoo Mss. and it is not improbable that this chief's name may have been Gowind deo Jadow.

—Footnote, Grant Duff's History P, 47—

त्यावेळीं रामोशी व पाळेगार यांनीं दुर्गादेवीचे दुष्काळामध्यें मोठमोठे किल्ले जिंकून डोंगराळ मुलूख आपल्या ताब्यांत ठेविला आणि शेतकरी लोकांवर दरोडे घालून ते आपला उदरनिर्वाह करूं लागले. सन १४२९ सालीं सुलतान अहमदशहावली ब्राह्मणी, हा ब्राह्मणी राज्याच्या गादीवर असतांना, त्यानें चोर लोकांचा नायनाट करण्याकरितां व देशाची आबादानी† करण्याकरितां एक सैन्य मलिक-उल्-तीजार याचे हाताखालीं देऊन त्याला त्या लोकांवर पाठविलें. त्यामध्यें पुष्कळ प्रांतांचे देशमुख, यांस मलिक-उल्-तीजार याचे मदतीस दिले होते. त्यांत ठाकूरजी देशमुख हे होते. त्यांनीं खटाव देशावर व महादेवाकडील डोंगरी मुलखांतील चोरटे लोकांवर स्वारी करून त्यांचा नायनाट केला. नंतरीं वांई देशावर स्वारी केली. याप्रमाणें चोरटे लोकांचा बंदोबस्त केला.

यावेळीं यादव घराण्यांतील ठाकूरजी, यानें मुसलमान लोकांची सत्ता कबूल करून त्यांची नोकरी धरिली. व त्याप्रमाणें सन १४२९ सालीं मलीक उल्-तीजार बरोबर सुलतानाच्या मदतीस गेला. तेथपासून शिंदखेड, हतनापूर, पैठण, औरंगाबाद वगैरे बावन्न प्रांतांची देशमुखी अहमदशहावली ब्राह्मणी या सुलतानानें कायम करून दिली. याप्रमाणें ठाकूरजींची कारकीर्द मुसलमानांची नोकरी करण्यांत संपली. यावेळींच यादवांचें राजघराणें नाहींसें होऊन ते मुसलमानांचे नोकर झाले. ज्या घराण्यानें शेंकडों वर्षे सार्वभौमपदाचा उपभोग घेतला, त्यास दुसऱ्याचें दास्यत्व पतकरणें भाग पडलें, यापेक्षां दुदैव तें कोणतें ? यादव घराण्यांतील सर्व राजे आपले धर्माप्रमाणे चालून प्रजेचें योग्य रीतीनें पालनपोषण करित आले व कोणत्याहि प्रकारच्या अनीतीचें वर्तन या घराण्यांतील कोणत्याहि राजानें केलें नाहीं, असें असून हें घराणें एकदम रसातळास गेलें याचें कारण या राज्यांतील राजकर्त्यांचा असावधपणा हें होय. शिवाय, हिंदूराजांत एकी नसून आपापसांत तंटे माजविण्याकडे त्यांची प्रवृत्ति जास्त असल्याकारणानें, त्यांचीं राज्यें एकामागून एक नाहींशीं झालीं. आर्य राष्ट्ररूपी वृक्षास कौरव पांडव यांच्या काळापासून जी दुहीची कीड लागली, तिनेंच शेवटीं त्यांचा नाश होऊन सर्व सत्ता मुसलमानांचे ताब्यांत गेली. ठाकूरजी सन १४४० च्या सुमारास मरण पावला. त्याचे मागून त्याचा मुलगा भुकणदेव ऊर्फ भेतोजी हा शिंदखेडच्या देशमुखीवर बहाल जाहला.

† ( ग्रांटडफचा इतिहास पान ४९ पहा. )

---

## भुकणदेव ऊर्फ भेतोजी.

( सन १४४०-१५०० )

भुकणदेवाच्या कारकीर्दीत अल्लाउद्दीनशहा हा वेदरचे तक्तावर बसला. सन १४५३ चे सुमारास जीं बंडें उद्भवलीं तीं या शहानें मोडलीं. या बंडांत भुकणदेवानें आपली हद्द बरीच वाढविली. (विजापूरचा इतिहास पहा ) हा शहा १४५७ मध्यें मरण पावला.

पुढें हुमायूनशहाजालीम व निजामशहा असे दोन राजे एकामागून एक गादीवर बसले. हुमायून शाहा याचा मुलगा निजामशहा गादीवर बसला त्यावेळीं त्याचें वय फक्त ८ वर्षांचें होतें, म्हणून त्याची आई राज्याचा सर्व कारभार पहात असे. त्यावेळीं मुख्य वजीर खाजेखान महमदगवान हा होता. त्यावेळीं माळव्याच्या सुलतानाची व ओढ्या प्रांताच्या राजाची लढाई होऊन सुलतानास जय मिळाला. नंतरच्या लढाईत गुजराथ प्रांताच्या सुलतानानें शहास मदत केल्यामुळें, त्याचा बचाव झाला. निजामशहा सन १४६३ त मरण पावला व दुसरा महमदशहा गादीवर आला. त्याचे वेळीं दरबारांत दोन तट होते. दक्षिणच्या लोकांच्या तटाच्या बाजूस ख्वाजा जाहान व परदेशी लोकांचे पक्षास महंमद गवान होता. त्या दोघांच्या भांडणांमुळें, शहाच्या आईनें ख्वाजा जाहान यास ठार मारून टाकिलें; तेव्हां महमद गवान हा मुख्य कारभारी झाला. त्या वेळेपासून परकी देशांतील लोकांना महत्व आलें. दक्षिणी व परकी लोकांमध्यें आपआपसांत तंटे सुरू होऊन ब्राह्मणी राज्याचे तुकडे पडण्याची वेळ आली. या भांडणांत मराठ्यांनीं आपआपला मुलूख वाढविला. त्यांत भुकणदेवानेंहि आपला मुलूख वाढविला. त्यावेळीं दरबारांत दक्षिणी तटाचा पुढारी निजाम-उल्-मुल्क बहिरी हा होता. हा बहिरी तिमाप्पा कुळकर्ण्याचा मुलगा होय. ( ग्रँट डफ पान ५५ पहा. )

याला महमदशहावली बाम्हणी, याचे कारकिर्दींतील एका लढाईत धरून आणून मुसलमान केलें. तो

वाढतां वाढतां दक्षिणातटाचा वजीर झाला. यामुळें दक्षिणेंतील हिंदुलोकांचें वजन जास्त वाढलें. खान जहान गवान यानें राज्याचे आठ भाग केले. व त्यांज वर निरनिराळे कामगार नेमिले. पुढें हेच कामगार स्वतंत्र झाले. या गोंधळामुळें मराठे लोकांनीं आपलें डोकें वर काढण्यास सुरवात केली ( ग्रॅंटडफ् पान ५४ व ५६ पहा. )

दौलता वादचा व जुन्नरचा सुभेदार मलिक महमद बहरी होता. तो नेहमीं जुन्नरास रहात असे. त्यानें. लहान लहान मराठे राजांस कमी करण्याचा प्रयत्न केला. ( बॉंबे ग्याझेटीयर पान ६२१ पहा )

हाच पुढें विजापूरच्या राजाशीं लढून अहमदनगरचे निजामशाहीचा स्वतंत्र राजा झाला. भुकणदेव यानें खानदेशमध्यें आपला बराच प्रांत वाढवून दरबारांत आपलें वजन वाढविलें. हा सन १५०० चे सुमारास मरण पावला. त्याचेमागून अचलकर्ण ऊर्फ अचलोजी हा बापानें मिळविलेल्या प्रांतावर मुख्य जाहला.

---

## अचलकर्ण ऊर्फ अचलोजी

( इ. स. १५००–इ. स. १५४० )

अचलोजीच्या कारकीर्दींत विजापूरच्या राज्याचे पांच भाग जाहले तेः—

विजापूरची आदिलशाही, गोंवळकोंड्याची कुतुबशाही, वऱ्हाडची इमादशाही, अहंमदनगरची निजामशाही, बेदरची बेरीदशाही. वर लिहिलेल्या प्रांतांवर जे सुभेदार नेमिले होते, ते सुलतानचा अंमल झुगारून देऊन स्वतंत्र झाले. याबद्दल पूर्वी लिहिलेंच आहे. त्यावेळीं अहंमदनगरचे गादीवर बुऱ्हाण निजामशहा राज्य करित होता. त्याचे व विजापूरच्या बादशहाचे आपसांत नेहमीं तंटे सुरू होते. त्या कामीं निजामशाहीस अचलकर्णानें मदत केली. सन १५२९ मध्यें बुऱ्हाणशहा यानें कंबरसेन नांवाचा एक ब्राह्मण होता त्यास पेशवे पद दिलें, आणि त्या दिवसापासून हिंदु लोकांस लष्कर अथवा मुलकी खात्यामध्यें मोठमोठ्या जागा मिळूं लागल्या. त्यांत अचलकर्णास लष्करांत ५००० घोड्यांची मनसब दिली. याच वेळेपासून सरकारी दप्तरचें लिहिणें उर्दूतून मराठींत आणलें.

( ग्रॅंटडफ्स् हिस्टरी पान ६३ पहा ).

अचलोजी सन १५४० मध्यें वारला. त्याचे मागून शिंदखेड वगैरे ५२ प्रांताचेदेशमुखी वतनावर व ५००० घोड्यांचे मनसबीवर विठ्ठलदेव हा आला.

---

## विठ्ठलदेव.

( सन १५४० ते १५७० ).

यावेळीं अहमदनगरचे गादीवर हुसेन निजामशहा होता. त्याची व विजयानगरच्या राजाची तालिकोट येथें सन १५६४ त मोठी भयंकर लढाई झाली; जींत विजयानगरच्या राजाचा पराभव झाला. या लढाईत विठ्ठलदेव होता. पुढें मूर्तुजा निजामशहा १५६५ मध्यें गादीवर बसला. त्यानें वऱ्हाड प्रांतावर स्वारी केली. फौजखान-तेथील इमादशाही घराण्याचा मुख्य, यास ठार मारून तें राज्य आपले राज्यास जोडिलें.

या कामीं खानदेशाचा सुलतान मिरन महमद खान फरूकी यानें या कृत्यास प्रतिबंध केल्यामुळें त्याचाहि पराभव मूर्तुजानें केला. या कामीं विठ्ठल देवानें त्यास पूर्णपणें मदत केली. विठ्ठलदेव हा सन १५७० मध्यें मरण पावला. त्याचे मागून त्याचा मुलगा लक्ष्मणदेव उर्फ लुखजी हा देशमुखी व मनसब यांवर कायम झाला.

---

## लक्ष्मणदेव उर्फ लुखजी

( सन १५७० ते १६२९. )

लुखजी हा जाधवराव यांच्या घराण्यांत मोटा नामांकित व कीर्तिमान् असा पुरुष उदयास आला. या दवांचें राज्य नाहींसें झाल्यापासून गोविंददेवाचे मागें जाधव घराण्यास याच पुरुषानें पुन्हा उद्दीपित केलें. लुखजी याचें नांव लक्ष्मणदेव असे होतें; परंतु तो लुखजी या नावानेंच इतिहासांत प्रसिद्ध आहे. लुखजीच्या कारकीर्दीच्या सुमारास पहिला मूर्तिजा निझामशहा, अहमदनगरच्या गादीवर होता, व तो वेडा झाला असल्यानें, त्याचा मुलगा गादीवर बसविण्याकरितां दरबारचे लोकांनीं पुष्कळ खटपट केली, व त्याचा मुलगा मिरन हुसेन यास राजधानीचे शहरांत आणिलें. मिरन हुसेन यानें बापास त्रास दिल्यामुळें तो १५८६ मध्यें मरण पावला. पुढें मिरन हुसेन गादीवर आला. त्या कामीं दरबार तर्फे लुख

जीच्या दक्षिणी लोकांच्या फळीची मदत होती. मिरन हुसेन याच्या कारकीर्दीत दक्षिणी लोकांचा जोर लुखजीमुळें वाढून, त्यांनीं परदेशी लोकांची कत्तल केली व या दक्षिणी लोकांच्या बंडवाल्यांनीं शहास ठार मारिलें व इस्माइल यास गादीवर बसविलें. इस्माइल हा मूर्तुजाचा धाकटा भाऊ बुऱ्हाण याचा मुलगा होय. पुढें बुऱ्हाण जो दिल्लीस होता, त्यानें बरोबर सैन्य घेऊन येऊन आपले मुलास कैद केलें व आपण गादीवर बसला. या बुऱ्हाणनें शिया पंथ धारण करून दक्षिणी तटाची बाजू धरिली. हाही शहा लौकरच मरण पावून त्याचा मुलगा इब्राहीम निजामशहा गादीवर आला. हा शहा दरबारांत फळ्या असल्यानें विजापूरकरांशीं लढत असतां मरण पावला. नंतर त्याचा दिवाण मिआन अंजू यानें अहमद या नांवाच्या एका मुलास गादीवर बसविलें. हा मुलगा निजामशाहीचा खरा वारस नाहीं. असा वाद उत्पन्न झाला. त्यामुळें वजिरानें गुजराथचा सुभेदार, अकबराचा मुलगा मुराद याची मदत मागितली. त्यानें अहमदनगरास वेढा दिला; त्या वेळीं चांदबिबीनामक शूर स्त्रीनें अहमदनगरचें संरक्षण केलें. त्या काळीं लुखजी जाधवराव यांनीं फार मदत केली. त्यामुळें त्यांजकडे दहा हजार स्वारांची मनसब देण्यांत आली. पुढें चांदबिबीनें बहादूरशहास तक्तनशीन केलें व आपण कारभार पाहूं लागली व महमदखान यास वजिरी दिली. पुढें लवकरच वजीर अधिकार बळकावून बसला. सबब त्यास सरदार लोकांनीं धरून चांदबिबीच्या ताब्यांत दिला. मोगलांनीं त्यावेळीं पुन्हां अहमदनगरवर स्वारी केली. त्यावेळीं विजापूर व गोवळकोंडें येथील फौजा चांदबिबीनें मदतीस बोलाविल्या. ह्या दोन फौजांनी व लुखजी जाधव वगैरे मराठे सरदार यांच्या सैन्यांनीं, पुन्हां मोगलांशीं टक्कर दिली. परंतु या चांदबिबीचा किल्ल्यांतील लोकांनीं खून केला. त्यामुळें मोंगल सैन्य आंत शिरलें, व त्यानें बहादुरशहा यास कैद करून आग्र्यास ठेविलें. इकडे लुखजी जाधवराव व दुसरे सरदार यांनीं आलीशहाचा पुत्र मूर्तजा यास परिंडा येथें निजामशाही तक्तावर बसविलें, व निजामशाही वांचविली. बहादुरशहाच्या कारकीर्दीच्या शेवटीं म्हणजे सन १५९९ मध्यें जाधवराव व भोंसले या दोन घराण्यांमध्यें लग्नासंबंधीं एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. ती खालीं लिहिल्याप्रमाणें:—

" मालोजी भोसले उत्तम प्रकारें सरकार चाकरी करून अधिक योग्यता पावूं लागले; आणि ज्या जाधवरावाचे आश्रयानें त्यानीं चाकरी मिळविली तो लुखजी जाधवरावही त्यावर बहुत कृपा करूं लागला. मालोजीचा पुत्र शहाजी रूपानें फार चांगला होता. सन १५९९ त शिमग्यामध्यें मालोजीनें आपल्या पुत्रास लुखजी जाधवरावाकडे भेटावयास नेलें. तेव्हां **जाधवराव** त्या मुलाचें रूप पाहून बहुत खुष होऊन त्यास जवळ बोलावून, जिजाबाई त्याची कन्या मांडीवर होती तिला बोलिले कीं,—' मुली हा तुला नवरा पाहिजे काय ? ' आणि मंडळीस म्हणूं लागले कीं, ' हा जोडा कसा दिसतो ? ' इतक्यांत तीं दोन्हीं मुलें एकमेकांवर गुलाल उधळून खेळूं लागलीं. तें पाहून सर्व मंडळीस चमत्कार वाटला, आणि हंसूं लागले. त्यावेळेस मालोजी भोंसले उभे राहून बोलिले कीं,—' ऐका हो सर्व मंडळी. आजपासून जाधवराव आमचे व्याही झाले, यास तुम्ही साक्षी आहांत. ' तेव्हां त्या मंडळींत कोणी कोणी म्हणाले कीं,–' हें ठीक आहे' तें ऐकून जाधवराव खिन्न होऊन उगाच राहिले, कांहीं बोलिले नाहींत. त्यानंतर दुसरे दिवशीं जाधवरावानीं मालोजीस भोजनास बोलाविलें; तेव्हां तो म्हणाला कीं,—' तुम्हीं व्याही व्हाल तर मी येईन, नाहीं तर येणार नाहीं, पुढें जाधवरावाची स्त्री म्हाळसाबाई ईस हें कळतांच राग येऊन तीही बोलली कीं, ' असें भाषण विनोदांतही न व्हावें; माझ्या कन्येच्या आणि त्याच्या योग्यतेंत किती अंतर आहे ? ' मालोजी आपल्या पदरचा नोकर त्यांच्या घरीं मुलगी दिल्यानें तो लोकापवाद होणार. निंबाळकर, शिर्के, महाडिक असे बरोबरीचे सरदार, मनसबदार, देशमुख आहेत त्यांच्या घराण्यांत मुलगे आहेत, ते टाकून मालोजीच्याच मुलास मुलगी द्यावयाची एवढी ती त्याची मातबरी तरी काय पाहिली ! " मालोजीनें हा अर्थ मनांत धरून पुष्कळ द्रव्य मिळविलें, व मोठी

कीर्ति व्हावी म्हणून कीतीएक जागीं देवालयें व तळीं बांधिलीं आणि बहुत घोडे विकत घेतले. अशा रीतीनें त्यानें बादशहाकडून पांच हजार स्वारांची सरदारी व 'मालोजी राजे' असें नांव मिळविलें. याखेरीज शिवनेरी व चाकण या दोन्ही किल्ल्यांची व त्यांच्या खालच्या मुलखाची मामलतही मिळविली, आणि पुणें परगणा व सुपें परगणा हे त्यास जहागीर मिळाले. एवढ्या योग्यतेस आल्यावर बादशहाचे आज्ञेनें त्याशीं संबंध करावयास जाधवराव सिद्ध झाले. मग जाधवरावाची कन्या जिजाबाई व मालोजीचा पुत्र शाहाजी या दोघांचें लग्न मोठ्या समारंभानें झालें. यासंबंधानें ग्रांट डफ् यानें लिहिलें आहे:—

"As Jadow Rao's objection was now confined merely to Mallojee's rank, this was soon obviated by his being raised to the command of 5,000 horse with the title of Mallojee Raja Bhonslay..........Thus every obstacle being removed Jadow Rao had no longer an excuse for not performing what he was urged to by his sovereign."

याप्रमाणें, भोंसले द्रव्यहीन असल्यामुळें लुखजी आपली मुलगी देईना; व द्रव्यवान् झाल्यावर अर्थात् जाधवरावांची कोणतीही अट राहिली नाहीं. म्हणून लग्न झालें असें ग्रांटडफ् म्हणतो; परंतु ही लग्नाची हकीकत सातारचे दप्तरांतून ग्रॅांट डफ् साहेबानें घेतली आहे; व सातारचे दप्तरांत एकतर्फी माहिती दिली आहे. मुलगी न देण्याचें कारण भोंसल्यांचें कुल आपल्या बरोबरीचें नाहीं हेंच होतें; दुसरें कांहीं कारण नाहीं, असें जाधवघराण्यांच्या संग्रहीं असलेल्या माहितीवरून कळतें. कारण लुखजी जाधवराव व त्याचा जांवई शहाजी या दोघांमध्यें पुढें फार वांकडें येऊन एकमेकांचीं युद्धें देखील झालीं आहेत. अहंमदनगरचे निजामशाहींत दोन फळ्या झाल्या होत्या. एक मुसलमानांची व एक मराठ्यांची. मुसलमानांच्या बाजूस मलिकंबर नांवाचा मुत्सद्दी होता. मियानराजू हा मराठ्यांच्या बाजूला होता. मियानराजू व मालिकंबर या दोघांमध्यें द्वेष वाढूं लागला. ही संधि साधून सरदार खान खानान यानें आपली फौज पाठविली. मलिकंबर तिजवर चालून गेला. त्यानें मोगलांचा पराभव केला. या कृत्यास लुखजी जाधवराव व शहाजी यांचें पाठबळ होतें. मलिकंबराचा पुढें मोगलांनीं पराभव केला. दिल्लीचा युवराज शहाजहान हा आपले बापाचे हुकमानें निजामशाही जिंकण्याचें काम तडीस नेण्यासाठीं सन १६१७ त दक्षिणेंत आला. परंतु लुखजीचें साहाय्य मलिकंबरास असल्यामुळें, शहाजहानाचें कांहीं चाललें नाहीं. पुढें अखेरची लढाई सन १६२० मध्यें झाली. त्यांत लुखजी जाधवराव व त्याचा जांवई शहाजी भोंसले, हे मलिकंबराचे तर्फेनें फार शौर्यानें लढले. त्यांत फलटणच्या*निंबाळकरांच्या वंशापैकीं एक मनुष्य लढाईत ठार झाला. ह्याला जगपाळ असें ह्मणत असत.

या लढाईमध्यें मलिकंबराचा पराभव झाला. परंतु हा दोष लुखजी जाधवरावाकडे मुळींच नाहीं. उलट शहाजहान बादशहास या थोर सरदाराचें युद्धचातुर्य पाहून फार आश्चर्य वाटलें व त्यानें लुखजी जाधवराव यास फितुरी करून आपले तैनातींत घेण्याचा प्रयत्न चालू केला. सन १६२१ मध्यें लुखजी जाधवराव निजामशाहीची नोकरी सोडून दिल्लीचे बादशहाचे नोकरीस गेले. याचें कारण दरबारांत तंटे माजून शहाजी भोसले व मलिकंबर यांचें वांकडें आलें. तेव्हां

* During the wars of Mullik Umber, the Mahrattas in his service were frequently conspicuous. Shahajee Bhonslay, who had succeeded his father Mallojee in the Jagheer, particularly distinguished himself in a great battle with the Moghals, fought in the year 1620, near the northern boundary of the Ahmednagar territory, in which, although Mullik Umber was defeated, no share o the blame was attached to the Maharattas. In the account of the battle, Lookhjee Jadow Rao is mentioned as well as Shahjee, and one of the naiks* of Phultun was killed on the same occasion.

* This is supposed by the present Jan Rao Naik Nimbalkar to have been his ancestor Jugpal, who was killed about this period.

History of the Maharattas by J. Grant Duff, p. 82.

मलिकंबर व जाधवराव एक होऊन त्यांनीं मोगलांचा आश्रय धरिला. मोंगल बादशहानें* लुखजी जाधवराव यास २४००० पायदळ व १५००० स्वार यांची मनसब दिली व शिवाय जाधवरावाचे भाऊबंद यांस मोठमोठ्या जागा दिल्या.

ग्रांटडफचे हकीकतीवरून लुखजी जाधवराव हा त्यावेळेस केवढा प्रबल सरदार होता, याचा अंदाज होईल. एवढा मोठा सरदार मोगलांकडे गेल्यानें निजामशाहीस उतरती कळा लागली. मलिकंबरही लुखजी जाधवरावाचे तंत्रानें वागूं लागला. अशा वेळीं निजामशाही अगदीं डबघाईस आली; शहाजी भोसल्यानें त्यावेळीं अज्ञान मूर्तिजा निजामशहा व त्याची आई यांस आपल्या ताब्यांत घेऊन निजामशाहीचा कारभार आटोपला. मोगलांची सरशी होऊं लागली व त्यामुळें आपला निभाव लागत नाही, असें पाहून शहाजीनें निजामशहा व त्याची आई यांस बरोबर घेऊन कोंकणांत कल्याण नजीक माहुलीचे किल्ल्यांत गेला व तेथून निजामशाहीचा कारभार पाहूं लागला. लुखजी जाधवराव यानें निजामशहास ताब्यांत घेण्याकरितां माहुलीच्या किल्ल्यास वेढा घातला. ही गोष्ट सन १६२६ मध्यें झाली. मलिकंबरही याच वेळीं वारला. ज्यावेळीं लुखजी जाधवरावानें मोंगली फौज घेऊन माहुलीस वेढा घातला, त्यावेळीं शहाजहान बादशहा हा त्याचे मदतीस होता. परंतु दिल्लीकडे बादशाहींत घोटाळा होऊन अनेक भानगडी झाल्यामुळें, शहाजहान जाधवरावाचे मदतीस फौज ठेवून तिकडे निघून गेला. माहुलीस सहा महिनेपर्यंत वेढा चालला होता. त्यावेळीं मूर्तिजाचे आईनें जाधवराव यांच्याशीं आंतून मिलाफ करण्याचा घाट घातल्यावरून, शहाजीनें तिला सोडून दिलें व आपला भाऊ शरीफजी यास मूर्तिजाजवळ ठेवून कांहीं विश्वासु लोकांनिशीं मागाहून विजापुराकडे पळून गेला. त्याचा पाठलाग जाधवरावानें फलटणपर्यंत केला. परंतु निंबाळकरांची मदत शहाजीस मिळेल असें समजून जाधवरावानें त्याचा पाठलाग सोडून दिला. निजामशहास मदत करण्याकरितां विजापूरकरांनीं तयारी केली होती. त्यास शहाजी जाऊन मिळाला. विजापूरकरांनीं मोगलांविरुद्ध निजामशाहीस हस्तावलंब करण्याची खटपट चालविली व विजापूरची फौज बादशहाच्या मदतीस आली.

परंतु लुखजी जाधवरावाचेपुढें शहाजीचें कांहीं एक चाललें नाहीं. शहाजीस संभाजी नांवाचा पहिला मुलगा सन १६२३ त जिजाबाईपासून झाला. जाधवराव व शहाजी यांचें वैमनस्य असल्यामुळें, प्रथमपासूनच जिजाबाईवर शहाजीची विशेष प्रीति नव्हती; तशांत जाधवराव मोंगलांस मिळाल्यामुळें, दरबारांत दुफळी होऊन शहाजी चाकणप्रांतीं आपल्या जहागिरीवर रहात असे. फलटणाकडे पळून जात असतां जिजाबाई गरोदर होती, तीस पळतां येईना; सबब तीस रस्त्यांत टाकून शहाजी पुढें गेला. तेव्हां जिजाबाई बापाचे हातांत आली. पण ती प्रसूतीकरितां माहेरीं गेली नाहीं. जाधवरावानें तीस शिवनेरीच्या किल्ल्यावर पोंचविलें. तेथें सन १६२७ च्या वैशाखमासीं ती प्रसूत होऊन मराठी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज हे जन्मास आले. सन १६२७ हें साल फार महत्त्वाचें आहे. या वर्षी महाराष्ट्रांत शिवाजी जन्मला, व दिल्लीस जहांगीर बादशहा मरण पावला. त्याचे जागीं त्याचा पराक्रमी पुत्र शहाजहान तक्तनशीन जाहला. थोडेच दिवसांपूर्वी विजापूरचा इब्राहिम आदिलशहा मरण पावला होता, व निजामशाहीचा आधारस्तंभ मलिकंबरही त्याच सुमारास मरण पावल्यामुळें तें राज्य

*But Mullik Umber was not always prosperous; he frequently experienced severe reverses, and about the year 1621, some of the principal Mahrattas in his service were induced to quit his standard and go over to the Moghuls. The most important defection was that of Lookhjee Jadow Rao, Deshmukh of Sindkheir, whom we have already mentioned as a principal Maratha Chief under the Nizam Shahee Government. The manner in which the Moghuls received and rewarded him, is, in itself, a proof of the great power and consequence, which the Mahrattas had by that time attained. A Munsub of 24,000, with 15,000 horse, was conferred upon him, and such of his relations as accompanied him were all raised to high rank.

—Grant Duff's History p. 81.—

बुडविण्याचा शहाजहानचा मनोरथ सिद्धीस जाण्याचा योग जमून आला. इकडे मूर्तिजा निजामशहानें सर्व कारभार आपले हातीं घेऊन, मर्जीप्रमाणें आपली व्यवस्था चालविली. मूर्तिजा जेव्हां स्वतः कारभार पाहूं लागला, तेव्हां त्याची राज्यकारभारांत तारांबळ उडालेली पाहून त्याला मदत करण्याकरितां लुखजी जाधवराव हे पुनः मोंगलांकडून निजामशाहींत आले. मूर्तिजा हा अज्ञान असतांना फत्तेखान हा कारभार पाहत होता. त्यास कैद करण्याचे कामांत मूर्तिजास लुखजीनें मदत केली, व त्याच्याच सल्ल्यानें मूर्तिजा आपला राज्यकारभार पाहूं लागला. पुढें मूर्तिजावर मोंगलांचें सैन्य आलें व त्यांच्या हल्ल्याचें निवारण कसें करावें, या विचारांत लुखजी जाधवराव असतांना, राज्यकारभारासंबंधीं कांहीं मसलत करावयाची आहे अशा सबबीनें त्यास व त्याचा मुलगा अचलोजी ऊर्फ अचलकर्ण यांस दौलताबादचे किल्ल्यांत बोलावून आणून कैद केलें, व ते उभय पिता-पुत्र व त्यांचे आप्त यांस ठार मारिलें. ही गोष्ट सन १६२९ मध्यें झाली. लुखजी मारला गेल्यानें निजामशाही पुढें कशी ठार बुडून गेली, त्याचें वर्णन यथावकाश येईलच.

( याबद्दल ग्रँटडफनें आपले इतिहासांत ८९ पानांमध्यें माहिती दिली आहे, ती पहा. )

---

## जगदेवरावाची हकीकत.

लुखजीनंतर त्याची बायको आपला नातू सुजनसिंह ऊर्फ संताजी व सून यांस घेऊन शिंदखेडास गेली. तेथें आपला दीर * जगदेवराव यास बरोबर घेऊन मोगलांस जाऊन मिळाली. जगदेवरावाचे नांवानें ५००० स्वारांची मनसब दिल्लीच्या बादशहानें त्यास दिली. खानजहान लोदी शहाजहानाविरुद्ध बंड करून दक्षिणेंत आला. निजाशाहींतील मोठमोठ्या सरदारांचें व लोदीचें मुळापासून सख्य होतें; तेव्हां लोदीचा बंदोबस्त करून निजामशाही जिंकणें, हीं दोन कामें एकाच तडाख्यानें सिद्धीस नेण्याकरितां स्वतः शहाजहान दक्षिणेंत आला. खानजहान लोदी यास शहाजीचा चांगला आश्रय होता.

लोदीच्या पक्षाकडील एक एक मराठा सरदार फोडण्याचा शहाजहानाचा क्रम चालू होता. जाधवरावांचें उदाहरण पाहून व खानजहान लोदीचा पडता पक्ष पाहून, शहाजीराजाही बादशहास शरण गेला. त्यास ( शहाजीस ) बादशहानें सहा हजार स्वारांची मनसब दिली व त्याचे भाऊबंद यांसही मोठमोठ्या जागा दिल्या. ह्याप्रमाणें मुख्य मुख्य सरदार लोदीच्या कटांतून फोडल्यावर शहाजहानानें लोदीचा बंदोबस्त करून, निजामशाहीकडे वक्रदृष्टि फिरविली. यावेळीं लुखजीचे बंधु जगदेवराव जाधवराव हे मोंगलातर्फे निजामशाहीशीं लढत होते. त्यांचे मार्फत निजामशाहीचा वजीर फत्तेखान यास वश करून घेऊन, शहाजहानानें त्या वजीरास जहागीर दिली. या जहागिरींत शहाजीचे कांहीं प्रांत फत्तेखानास देण्यांत आले, यामुळें शहाजीस वाईट वाटून, पुन्हा निजामशाहींत तो गेला व पुन्हां जगदेवराव जाधवरावाशीं निजामशाहीचे तर्फेनें लढूं लागला. जगदेवराव जाधवराव व त्या वेळीं शहाजहानानें नेमलेला दक्षिणचा सुभेदार मोहोबतखान, या दोघांनीं मिळून निजामशाही तर्फेचा सरदार शहाजी व फत्तेखान यांचा पराभव करून शहास कैद केलें; दौलताबादचा किल्ला सर केला व गादीचा मालक निजामशहा आणि वजीर फत्तेखान या दोघांस पकडून ग्वाल्हेरचे किल्ल्यांत पाठविलें. याप्रमाणें निजामशाहीचा जगदेवराव जाधवराव यांनीं शेवट केला.

या बहादुरीबद्दल रुस्तुमराव हा किताब त्यांस देण्यांत आला, व त्यांची मनसब वाढवून शिंदखेड वगैरे ५२ प्रांतांची देशमुखी लुखजी जाधवरावाचे नांवानें चालत होती, ती त्यांच्या नावानें चालू केली. फौजेकरितां त्याच प्रांताची जहागिरी तोडून दिली. हा निजामशहा त्या वेळीं सुमारें १० वर्षांचा होता. शहाजी भोंसल्यानें पुन्हां निजामशाहीच्या तक्तावर पूर्वीच्या वंशांतील एका मुलास बसवून अनेक मुत्सद्यांच्या मदतीनें निजाम-शाहीचा अम्मल पूर्ववत् चालू केला. या संधींत शहाजहान बादशहा दिल्लीकडे निघून गेला होता. शहाजीनें पुष्कळ सैन्य

---

* श्री० सरदेसाई, मुसलमानी रियासतींमध्यें, पृष्ठ २५८ भेताजीराव म्हणतात. व ग्रँटडफ जगदेवराव म्हणतो.

जमवून, निजामशाहीच्या राज्यांत मोडत असलेला पश्चिमेकडील सर्व मुलूख व कोंकणांतील डोंगरी किल्ले काबीज केले. या वेळीं मोहोबतखान मार्फत त्रिंबक किल्ल्याचा निजामशाहीचा सुभेदार महालदारखान हा बादशहास शरण गेला. त्या वेळीं मोहोबतखानानें महालदारखान यास अशी अट घातली कीं, शहाजीची बायको व मुलेंबाळें यांस तुम्हीं पकडून द्या. त्याप्रमाणें महालदारखान यानें या वेळीं शहाजीची बायको ( जाधवरावांची कन्या ) जिजाबाई जी शहाजीनें टाकून दिली होती व हल्लीं आपल्या आईजवळ रहात होती, तीस पकडलें.

हें कृत्य मोगलांनीं शहाजीचा अपमान करण्याकरितां केलें.* जगदेवराव जाधवराव यास ही गोष्ट कळल्यावर तो बादशहाकडे जाऊन त्यानें विनंति केली कीं, " शहाजीचें व आपलें वांकडें आहे, व जिजाबाईला त्यानें टाकून दिलें आहे. एवढेंच नव्हे, तर मोहिल्यांची कन्या तुकाबाई हिजबरोबर दुसरें लग्न केलें असून, तो स्वतंत्र रहात आहे. तेव्हां जिजाबाईला अशी कैदेंत ठेविली, तर उलट शहाजीला आनंद होईल व जाधवरावांचा अपमान होईल. सबब तिला सोडून द्यावी." बादशहाची याप्रमाणें समजूत झाल्यावर तिला सोडून दिली.

जिजाबाई ही आजपर्यंत आपले माहेरीं रहात असे. तेथून पुढें आपली आई, तिचा नातू सुजनसिंह ऊर्फ संताजी यांसह पुणें प्रांतीं आपले नवऱ्याचे जहागिरीवर राहूं लागली. इकडे शहाजहानाला शहाजीच्या कृत्याचा संताप येऊन, निजामशाहीचा प्रदेश स्वतः काबीज करण्याकरितां सन १६३५ त तो दक्षिणेंत आला. खानडौरान, खानजमान, शाहिस्तेखान व जगदेवराव वगैरे सरदारांच्या हाताखालीं निरनिराळे सैन्याचे भाग दिले. त्यांनीं चोहोंकडून एकदम विजापूरकरांवर व शहाजीवर हल्ला सुरू केला. प्रथमतः विजापूरकरांकडून शहाजीस सहाय्य होत असे, तें बंद करण्याकरितां त्यांनीं विजापुरावर चाल केली. तेव्हां विजापुरचा सुलतान आदिलशहा यानें बादशहाशीं सल्ला केला. त्यावरोबर शहाजी उघडा पडला. त्याजवर खानजहान व जगदेवराव यांस पाठविलें. त्यांनीं त्याचा पराभव केला. शहाजीचे पुष्कळ मजबूत किल्ले व प्रांत बादशहानें आपले राज्यास सामील केले. तेव्हां शहाजी मोंगल बादशहास शरण गेला. परंतु " मोगलांशीं पूर्वीं एकवेळ वेइमान जाहलां सबब, आम्हीं आपले राज्यांत तुम्हांस ठेवीत नाहीं. तुम्हीं पाहिजे तर विजापुरकरांचे पदरीं आदिलशाहींत रहावें" असें त्यानें शहाजीस सांगितलें. त्याप्रमाणें शहाजी विजापुरकरांचे पदरीं मुरार जगदेव व रणदुल्लाखान यांचे परिचयानें राहिला. निजामशाहींतून पुणें व सुपें या प्रांतांची जहागिरी शहाजीकडे चालू होती, तीच आदिलशाहीनें त्याजकडे कायम केली. बादशहानें निजामशाही जिंकून, पूर्वेकडील व दक्षिणेकडील बहुतेक मुलूख विजापुरकर सुलतान आदिलशहास दिला. व बाकीचा मुलूख आपले राज्यास जोडला. याप्रमाणें निजामशाही राज्याचा शेवट झाला. निजामशाही बुडविण्याचे कामीं दिल्लीचा बादशहा शहाजहान, यास जगदेवराव जाधवराव यानें कशी मदत केली, हें वरील मजकुरावरून ध्यानीं येईल. या जाधवराव घराण्याची नेकी वेळोवेळीं उत्तम कसास लागली आहे, असें इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें. जगदेवराव जाधवरावानें जी दिल्लीच्या बादशहाची नोकरी धरली, ती नेकीनें बजावून आपणास मान व पदवी ही बादशहाकडून मिळविली. व स्वतः आपले धन्याकरितां जांवई शहाजी भोंसले याच्याशीं सुद्धां वैर केलें. याप्रमाणें शिंदखेडकर जाधवरावाचे घराण्याची धाकटी शाखा दिल्लीचे बादशहाचे पदरीं अखेर पर्यंत इमानानें राहिली. ग्रॅंट डफ् साहेब यांनींही आपले मराठ्यांचे इतिहासांत हें घराणें अखेरपर्यंत दिल्लीच्या बादशहाशीं इमानानें वागलें, असा आपला अभिप्राय दिला आहे.

जगदेवराव जाधवराव अशीं मोटमोठीं कृत्यें करून सन १६५० चे सुमारास वारले. जगदेवरावाचा मुलगा बहादुरजी याजकडे बादशहानें मनसब सांगितली. व शिंदखेड वगैरे प्रांतांची देशमुखी त्याजकडे कायम केली. त्याचा पुत्र दत्ताजीराव, यास मुलें, राघुजीराव, यशवंतराव व जगदेवराव. ( दुसरा ) जगदेवराव ( दुसरा ) ह्याचाच फक्त वंश होता, व त्याचे घराण्यांत मनसब व देशमुखी सुरू झाली.

* ग्रँटडफस् हिस्टरी पान ९२ व
खरेदेसाईकृत मराठी रियासत पृष्ठ ४९-५०.

जगदेवराव ( दुसरा ) यास चार मुलें झालीं. त्यांत वडील मुलगा मानसिंगराव. त्याचें नांवें मनसब जाहली. दुसरा राघुजीराव, तिसरा यशवंतराव व चौथा दत्ताजीराव. मानसिंगराव व यशवंतराव यांचा निर्वंश जाहला. राघुजीराव यास एक मुलगा जाहला त्याचें नांव मानसिंग. यासच रस्तुमराव किताब मिळून दिल्लीची मनसब व देशमुखी चालू जाहली व याची मुलगी *अंबिकाबाई शाहूराजा औरंगजेबाचे कैदेंत असतांना त्यास दिली. ( इ. स. १६९९ )

दुसरे जगदेवराव याच्या मुलांमध्यें देशमुखीची वांटणी झाली होती, त्याजबद्दलचा जुना कागद श्री. ना. स. शंभुसिंगजी यांचे दप्तरीं सांपडला आहे; पण तो ठिकठिकाणी फाटलेला आहे तरीही त्याजवरून त्यावेळीं सुमारें वीस लाखांचें उत्पन्न शिंदखेडकर जाधव रावांचे घराण्यांत होतें असें दिसतें. ही वांटणी शके १६३१ इ० स० १७०९ विरोधी नाम संवत्सरे श्रावण शुद्ध १५ सोमवार चंद्र २ माहे जमादिलावल सन १११९ फसली ते दिवशीं झाली आहे. त्याचा उतारा खालीं लिहिल्याप्रमाणें:—

* When Aurungzebe began to revote the scheme of releasing shao, he proposed to marry him to the daughters of two of the most distinguished Mahrattas in the imperial service, and to secure them in his interests by additional favours; these were Jadow of Sindkheir to whom the emperor had given the tille of Roostum Rao; and Sindia, Patell of Kunneirkheir, whose illegitimate offspring as heads of a Mharatta principality, are well knows in the modern transactions of India. Shao was connected with Jadow by the the mother's side, and the proposal being agrreable to all parties, the nuptials were celebrated in a respectable manner, but without pomp; and the emperor, besides conferring favours on Jadow and Sindia bestowed on Shao the districts of Akalkote, Indapoor, Sopa, and Newassa in Jahagir etc.

॥ श्री ॥

वांटणी वतन देशमुख व देशपांडे पट्टी वगैरे सरकार दौलताबाद वगैरे शके १६३१ विरोधी नाम संवत्सरे श्रावण शुद्ध १५ सोमवार चंद्र २ माहे जमादिलावल सन १११९ ते दिवशीं हर जावदी राजश्री राऊ मानसिंग व राजश्री राघोजी व राजश्री यशवंतराव व राजश्री दत्ताजी बावा पिसराजी राजश्री राव जगदेव नबिरे, राजश्री दत्ताजी राजे जाधव मोकर झाले बद्दल परगणे २७ मोकरा हर्साल रुपये २०६९४७२।≈॥।... ...पैकीं परगणे ६ मोकरा जमा ४४२९०८८≈॥। रुपये बद्दल परगणे वडीलपणाखाले परगणे २ बार निमें......बायकास खावयासी दिधले पर......राव मानसिंग दरोबस्त हसील मोकरा...गणे मोकरा हसील २१७२८५॥।...१७०२३७। रुपये ......... तपसील......................................

हवेली दौलताबाद रुपये २५१३९॥।..परगणे पुलहरी..
परगणे सेंदूर ... ... ... येथें फाटलेलें आहे.
परगणे कन्हारमयेवामले ... दरोबस्त याती ,,
सिवेद...जमा रुपये १४५०९७॥ ,,
श्रीद्वारकाबाई...राजेश्री... ... ,,

बकसीस परगणे देशमुखी व देश- ... श्रीवैकुंठवासी... नावाहीनअद पांड्येगिरी राजेश्री रघुनाथ शंकर... राजश्री राघुजी ... ली यास दिधले व राजेश्री बापुजी महादेव बमोजी... राजे आपले चु- ... दरोबस्त हसील वसन वैकुंठवासी परगणे ५ ... लते वडील यास ... प्रमाणें २८६५५॥। ... हवेलीखुद शेहे बुनियाद ऊर्फ औरंगाबाद ... दिधले हसील ... राऊ मानसिंग देशमुख देशमुखी व देशपांडे गिरी प्रमाणें...... रुपये १८९१९४ ... ... (येथें फाटलेलें आहे.)

हसील रुपये २३१९७।≈॥।...चौघासी वाटून देणें ... ... देशपांडे गिरीमहाल ४ ,,

१ परगणे कुडापूर...परगणे राजे हेहरका बीन तूर्तसरफहेत
१ परगणे खडम ... सरकारपरगणा एकदरोबस्त एकूण
१ परगणे वेरूळ ... मोकरा ३१६२३ ॥≈
१ परगणे पिंपरी ...
—
४

बाकी परगणे २१ एकूण हसील मोकरा—१६२६५६४।˝ यांचे हिसे नंबरवार असे.

राजश्री राऊमानसिंगजी मोकरा जमा ... ... राघोजी राजे परगणे ६ मोकरा परगणे ५ रुपये ४०५२२० ...... जमा रुपये ४०५१०१। ... परगणे कुडाफूर वतन ... परगणे वामली दरोबस्त ... परगणे वासूल ... परगणे खानापूर देशमुखी परगणे दिले ... जमा रुपये ४६५३५॥। ... दरोबस्त ...

११०९३३

दरोबस्त रुपये ५११५९ देशपांडी येसील ... परगणे कतलर दरोबस्त ... परगणे मानिक ... प्रमाणे फडसा वकीस रघुनाथशंकर ... जमा रुपये १३८०७ ... पुज दरोबस्त ...वगी... [फाटलें आहे.

हता बापुजी महादेव ... परगणे गोताले ,,

४१४१

दरोबस्त ... जमा ५४६७॥ हसील ,,

११२५ ,,

जमा रुपये ... परगणे पिंपरी—परगणे खंडाले ३३४४९१।≈ परगणे रोटिगे दरोबस्त ... वतन

६२४४॥।≈

देशमुखी—वतन देशमुखी प्रमाणे दिले—प्रमाणे दिले येसील.

... देशपांडे यासी—बकीस रघुनाथ शंकर

... बकीस रघुनाथ—व बापुजी महादेव

... शंकर व रा० बापुजी जमा रुपये ५११२८४

महादेव जमा.

९७१३२॥।.

राजश्री यशवंतराव परगणे ४ येथें फाटलेलें आहे.

रा० दत्ता. ,,

परगणें वैजापूर...परगणे हरसूल ,,

२१७४२०

परगणे पैठणवतन ,,

परगणे ,,

परगणे कुभारी...दरोबस्त रुपये ,,

४६०३९

देशमुखप्रमाणे ,,

पदामु ,,

दरोबस्त रुपये...पमाणें एकतूनी ,,

१२१९७२।≁ येथें फाटलेलें आहे.

हिलदेशपांडीचे ,,

देशपांडी ,,

दरोबस्त रुपये...आलासिंवेप्रमाणें ,,

२७६५९ रा० रघुनाथ ,,

जमारुपये ,,

२६९५०७ व रा० बापुजी ,,

परगणेखराडी दरोबस्त ,,

मावे देव ,,

जमारुपये ६५७० ,,

बाकीस ,,

जमा ५११६१ ,,

परगणे दादूर ,,

दरोबस्त ३१९ ,,

नागजादी ,,

सदर वांटणी पत्राचा कागद फार जुना असोन जागजागीं फाटलेला आहे, त्यामुळें संदर्भ नीट लागत नाहीं.

याप्रमाणें दुसरे जगदेवराव यांचे मुलांमध्यें वांटणी जाहली आहे. लुखजी जाधवरावाची बायको यावेळीं हजर नव्हती. तिचा नातू सुजनसिंह ऊर्फ संताजी, व त्याचा मुलगा संभाजी हे बहुतेक मराठी राज्य वाढविण्याचे नादांत असून, शिवाजी महाराज यांस मदत करण्यांत गुंतले होते; त्याचें वर्णन पुढें येईल. हल्लीं जगदेवरावाचा वंश औरंगाबादेस देऊळवाडा येथें व कांहीं मालेगांवास आहे.

देवगिरीलाच हल्लीं दौलताबाद म्हणतात व तेथें फार मजबूत असा एक डोंगरी किल्ला आहे. 'तो औरंगाबाद शहरापासून पांच मैलावर आहे. दौलताबाद हें स्टेशन आहे. तेथून किल्ला अगदीं जवळ आहे. या वंशांतील पुरुषांस दिल्लीच्या बादशहांस मदत केल्यामुळें सरदेशमुखी, देशपांड्येगिरीचे वगैरे हक्कांच्या सनदा मिळाल्या व "राव जगदेव" हा किताब आणि राजचिन्हें धारण करण्याची परवानगी अलमगीर बादशहानें दिलेली आहे. हा किताब व दुसरे मान निजाम सरकारचे दरबारांतून या घराण्यांतील मुख्य पुरुषास अद्यापिही मिळत आहेत. व

त्यांच्या पुरातनपणाबद्दल, मानमान्यतेबद्दल, व खानदानीपणाबद्दल अनेक जागीं लिहून ठेविलेलें आहे. *

आमच्या एका स्नेह्यांनीं आम्हांस देवूळगांवच्या जाधव घराण्याची हकीकत व वंशावळ पाठविली आहे; तींत असें लिहिलें आहे कीं, बहादुरजी याचा मुलगा दत्ताजीराव, त्यास मुलें दोन, राघोजी व जगदेव, राघोजीस मुलगा एक, त्याचें नांव रुस्तमराव जाधव असून त्याच्याच कन्ये बरोबर–आंबिकाबाईबरोबर श्री. शाहू छत्रपति यांचें लग्न झालें होतें. स. १६९९ जगदेवास मुलें तीन, मानसिंग, राघोजी व यशवंतराव, पैकीं राघोजीस श्री. राजाराम छत्रपति यांची कन्या आंबिकाबाई दिली होती व ह्या राघोजीचा मुलगा मानसिंगराव हा शाहु छत्रपतीचा भाचा असून तो साताऱ्यास शाहुमहाराजांजवळच असे. व शाहुचे मनांतून आपल्यास पुत्रसंतान नसल्यामुळें त्यास मांडीवर घेऊन सर्व राज्याचा मालक करण्याचा त्यांचा विचार होता; पण तो हेतू तडीस जाण्याचे अगोदरच ते मरण पावले. शाहुमहाराजांचे मरणानंतरसुद्धां या जाधवघराण्याचा व सातारकरांचा संबंध चालूच होता. त्यांच्यांतील दळणवळण सन १८५० पर्यंत चांगल्या प्रकारचें होतें. पुढें तें बंद पडलें. त्याचीं कारणें अनेक आहेत. तीं येथें सांगत बसणें अप्रशस्थ होईल. अशा प्रकारचा तींत मजकूर आहे. तो मजकूर खरा असण्याचा संभव आहे. आम्ही वर ज्या मानसिंगराव ऊर्फ रुस्तमराव यांची मुलगी शाहू छत्रपतीस दिली होती असें म्हटलें आहे; तो हा नव्हे. तो पहिल्या राघोजीचाच मुलगा रुस्तमराव,शाहूचा सासरा असला पाहिजे. आतां वाटणीपत्राचा व ह्या हकीकतीचा कांहीं कांहीं नांवामध्यें मेळ जमत नाहीं, रा. दत्ताजीराजे जाधव मोकार झाले त्याबद्दल जगदेवरावांचे नवीरे म्हणजे मुलगे यांच्यांत वांटणी झाली; त्या वांटणीच्यावेळीं, राघोजीराव अगर रुस्तमराव यांपैकीं कोणी तरी त्यावेळीं असले पाहिजेत. शिवाय दत्ताजीराजे बावा पिसराजी जाधव यांचेंही दुसऱ्या जगदेवरावांचा चवथा पुत्र म्हणून आस्तित्व असलें पाहिजे. आतां दुसऱ्या एका गोष्टीसंबंधानें जबरदस्त संशय उत्पन्न होत आहे, तो हा कीं,–श्री. राजाराम छत्रपति यांस अंबिकाबाई नांवाची मुलगी होती, असें कोठेंही लिहिलेलें नसून उलट त्यांची स्त्री अंबिकाबाई* ही सती गेल्याबद्दल श्री. सरदेसाई, यांनीं मराठी रियासतीमध्यें लिहिलें असून, ही शिरक्यांची मुलगी नव्हे ना? म्हणून संशय प्रगट केलेला आहे. व आमच्याकडे आलेल्या माहितीवरून अंबिकाबाई ही श्री० राजाराम छत्रपति यांची मुलगी असून ती राघोजीराव जाधव यांस दिलेली होती असें दिसतें. तरी या गोष्टीचा निर्णय झाल्यास ऐतिहासिक दृष्टीनें बराच फायदा होऊन एका महत्वाच्या गोष्टीचा उलगडा होईल.

सन १८५३ पर्यंत या जाधव राजाकडे निजामाचे मुलखांतील ५६ महालांची सरदेशमुखी व देशपांड्येगिरी चालू होती. त्यावेळेस राजे बाजीराव जाधव औरंगाबादेस राहत असत. त्या प्रांतीं त्यांचा फार दरारा असून निजामसरकारचे दरबारांत त्यांचें मोठें वजन होतें. राजा चंदुलाल बहादूर हे त्या दरबारांत पेशकार होते. त्यांचा व राजे बाजीराव यांचा प्रथम चांगला स्नेह होता. पण पुढें कांहीं कारणांवरून त्यांच्यांत वैमनस्य पडलें व त्याचा परिणाम चांगला झाला नाहीं.

औरंगाबाद येथें असतांना सन १८५३ च्या आक्टोबर महिन्यांत, राजे बाजीराव यांच्याकडील कांहीं आरब लोकांनीं तनख्याच्या फेडीं संबंधांत

*But the only Rajput family of pure blood in the Rajputana Sense, which has been discovered is the house of the Jadow Rajas of Sindkher, which intermarries with the noblest clans of Rajputana and which has lately made a show of great reluctance to permit a poor Kinsman to espouse the Gaikawar's daughter (1870 A. D.)
(Berar Gazetter)

Of the principal Maratha families holding good position under the Bahmani Monarchy that of Jadow Rao is the only one belonging to Berar. In lineage and historical repute it yields to none even if its claim to descent from the ancient Yadav Rajas of Deogarh be discredited and the line has not yet ended.

(Berar Gazetter.)

* सरदेसाईकृत मराठी रियासत पृष्ठ ५०२.

कुरापत काढून त्यांना अटकेंत ठेविलें. राजे बाजीराव यांची सुटका करण्याकरितां औरंगाबाद छावणींतील पांचव्या कॅव्हलरीचे ब्रिगेडिअर मेन यांनीं रोषन गेटाच्या बाहेर जशवंत पुऱ्यांत अरब लोकांवर हल्ला केला. बाजीराव यांस सोडून देण्याबद्दल अगोदर पुष्कळ सामोपचाराच्या गोष्टी सांगितल्या, पण आरब लोक ऐकत ना. तेव्हां उभयतांत एक लहानसी झटापट झाली. व राजे बाजीराव यांची सुटका केली. पण त्या झटापटींत लेफ्टनन्ट बॉस्वेल, व वेगहन आणि कॅप्टन पारकर असे तीन सरदार पडले व कित्येक शिपायी मेले व जखमी झाले. अरबांकडील तर पुष्कळच लोक मेले. या भांडणाची चौकशी चालून, तींत राजे बाजीराव हे दोषी ठरले गेले व त्यांस दौलताबादेच्या किल्यांत राजकीय कैदी म्हणून कैदेंत ठेविलें व त्यांची सर्व जहागीर व इनामें वगैरे सरकारांत जप्त करण्यांत आलीं.

बाजीराव कैदेंत पडल्यावर त्यांची बायको अहिल्याबाई इनें आपले दोन बंधु रामचंद्रराव व गोविंदराव देसाई यांस रायबागेहून आणून आपल्याजवळ ठेविले होते. कांहीं दिवसांनीं अहिल्याबाईला बाजीरावांबरोबर किल्यांतच राहण्याची परवानगी मिळाली व त्यावरून ती तेथें राहूं लागली. उभयतां देसाईबंधु व्यवस्था पाहूं लागले. येणेंप्रमाणें या उभयतां बंधुंचा या जाधव घराण्यांत पाय शिरकला.

पुढें सन १८५९ चे दिसेंबर महिन्यांत, बाजीराव दौलताबादच्या किल्यांत कैदेंतच मरण पावले. तेव्हां त्यांचा मुलगा मानसिंगराव हा अडीच वर्षांचा होता व देसाई बंधु सर्व व्यवस्था पहात होते.

बाजीराव जिवंत असतांना निजामाकडील जहागिरीचा कारभार ते स्वत: पहात होते. व त्यांचे धाकटे भाऊ, राजे रामचंद्रराव हे देऊळगांव येथील **श्रीबालाजी** संस्थानची व्यवस्था पहात असत. हें संस्थान वऱ्हाडांत फार पुरातन असून प्रसिद्ध आहे. शिंदखेड म्हणून जाधवांचें, जें मूळ वतनाचें ठिकाण आहे, तेथपासून देवूळगांव तीन मैलांवर **आमनी** नांवाच्या एका लहान नदीचे कांठीं आहे. या ठिकाणीं जाधवांनीं आपली कुलदेवता **श्री बालाजीची** स्थापना करून देवुळगांव वसविलें व शहरासभोंवतीं कोट बांधून स्वतःची गढी बांधिली. राजे **रासोजीराव** नांवाच्या राजानें सन १६५७ च्या सुमारास हें शहर वसविलें आहे. गुजराथेंत जसें डाकुरजीचें संस्थान, देशावर जसें पंढरपुरचे विठोबाचें संस्थान, तसेंच वऱ्हाडांतील हें श्री बालाजीचें संस्थान आहे. येथें आश्विनमासांत मोठी यात्रा भरते. त्यावेळीं एक लक्षाहून जास्त लोक जमतात. तसेंच श्रींच्या संस्थानाचें उत्पन्नही एक लक्ष रुपयाहून जास्त होतें. यात्रेंत दानधर्म, ब्राह्मणभोजन व सर्व प्रकारच्या गुणी जनांचा सत्कार करण्यांत वरीच रक्कम खर्च करण्याचा संप्रदाय आहे.

या संस्थानची व्यवस्था जाधव राजांचे वतीनें हरिसा रामासा नांवाच्या लाड वाण्याच्या घराण्याकडे चालत होती. बाजीराव सन १८५९ मध्यें मरण पावल्यावर या हरिसानें, आपणच संस्थानचे मालक आहोंत, राजाचा कांहीं संबंध नाहीं, अशा गोष्टी चालविल्या. त्यावरून राजे रामचंद्रराव यांनीं हरिसाचा संबंध काढून टाकण्याकरितां संस्थान ताब्यांत आणण्याचा दावा मांडला. बाजीराव वडील होता म्हणून त्याचे मुलाच्या नांवें दावा आणावा, असें कोर्टानें ठरविल्यावरून तो दावा काढून घेतला व रामचंद्रराव यांनीं राजे मानसिंगराव याचें नांवें तो पुन; चालविला. तो दावा दोन वर्षे चालून, सन १८६८ मध्यें संस्थान राजे मानसिंगराव याचें ताब्यांत आलें. हरिसा हा नोकर या नात्यानें कारभार पहात होता, असें ठरून संस्थान राजांचें आहे असें ठरविण्यांत आलें. पुढें या प्रकरणांत हैद्राबादचे रेसिडेन्टकडे अपील झालें. त्यांत मात्र असें ठरविण्यांत आलें कीं, हें संस्थान धार्मिक संस्थान आहे व तें जाधवराजानीं स्थापिलें आहे. तेव्हां त्याची व्यवस्था पहाण्याचा वगैरे* अधिकार त्याच

* Of all tha Dewasthans in Berar, such as those at Sindhkhed and Basim, that of Balaji at Dewoolgaon Raja is the most celebrated. There are various opinions with regard to the founder of this Dewasthan. But it has lately been formally decided that the Raja's were the rightful owners and founders of this Temple.

In honour of this deity an annual fair is held generally in the month of October much

घराण्यांतील पुरुषांकडे चालला पाहिजे. हा निकाल सन १८६९ चे फेब्रुवारींत लागला. व संस्थान पूर्णपणें राजांचे ताब्यांत आलें.

राजे बाजीराव मेल्यांनतर, मानसिंगरावांच्या नांवें जहागिर सोडविण्याचे प्रयत्न, बाजीरावाचा दासीपुत्र रासोजीराव यानें चालविले. व त्यासाठीं तो मानसिंगरावासह हैद्राबादेस रहात असे. आणि देसाई बंधु श्रीबालाजी संस्थानाची व्यवस्था पहात असत. पुढें सन १८६९ मध्यें रासोजीराव यास, हैद्राबादचे दरबारांतून मानसिंगरावचे नांवें सनद मिळाली. व जहागिर सुटली. आणि रासोजीराव लहान मानसिंगासह मोठ्या थाटानें हैद्राबादेहून देवुळगांवीं आला. इकडे संस्थानाचे दाव्याचाही अखेरचा निकाल लागून तेंव्हां ताब्यांत आलें होतें.

राजे रासोजीराव हे मानसिंगरावाचे नांवें कारभार पाहूं लागले. प्रत्येक गोष्टींत लहान मानसिंग याचा बहुमान ठेवून त्याचा आपण नोकर अशा नात्यानें ते व्यवस्था पहात असत. पण त्याचे उलटवृत्ती देसाई बंधुंची होती. ते स्वतःसच मालक समजून मृच्छकटीक नाटकांतील शकारा प्रमाणें वागत होते. त्यांस रासोजीरावाची ही वृत्ती आवडली नाहीं, हें उघड आहे. तशांत रासोजीरावानें श्रीबालाजी संस्थानचा हिशोब देसाई बंधुंजवळ मागितला. त्यांना तें सहन झालें नाहीं. आणि उभय पक्षांत भांडणास आरंभ झाला. या भांडणाचा परिणाम असा झाला कीं, अनेक गृहकलह माजले व त्यांत कित्येक पुरुष बळी पडले. ते गृहकलह अद्यापि संपले नाहींत.

देसाई बंधुनां रासोजीरावाचें वाढत चाललेलें वजन पहावेना व आपल्या कारभारांतील हा कांटा नाहींसा केल्यावांचून आपली धडगत नाहीं, असें त्या दुष्टांनीं मनांत आणिलें आणि रासोजीराव यांस विषप्रयोग करून त्याला नाहींसा केला. सन १८६९ चे दिसेंबरांत हा प्रकार झाला. या भयंकर प्रकरणाचा फार बारकाईनें तपास होऊन, दोघा बंधूंस काळे पाण्याची शिक्षा झाली व त्यांस काळे पाण्यावर पाठविण्यापूर्वी आकोल्याचे तुरूंगांत ठेवण्यांत आलें. परंतु त्यांची बहीण अहिल्याबाई जिची रासोजीरावाचे नाशास संमत्ति होती असें म्हणतात, तिनें आपल्या बंधूंस सोडविण्याकरितां लाखो रुपये खर्च केले व हैद्राबादेस अपील करून त्यांना सोडविलें. ही गोष्ट सन १८६९ त घडली. देसाई परत आल्यावर त्यांच्या बहिणीनें पुनः त्यांचें प्रस्त माजविलें. व त्यांच्या मदतीनें ती कारभार चालवूं लागली. या प्रमाणें देसाई पुनः प्रबल होऊं लागले. ही स्थिती पाहून राजे रामचंद्रराव फारच निराश झाले व त्यांनीं या दुष्ट लोकांचा संबंध सोडला. पुढें ते लवकरच म्हणजे सन १८७१ च्या जून महिन्यांत मरण पावले.

राजा मानसिंग अज्ञान होता. रासोजीरावाची कीड नाहींशीं केली. व राजे रामचंद्ररावही मरण पावले. राणी अहिल्याबाई पालन कर्ती बनली. तेव्हां देसाई यांस कोणीही विचारितां राहिला नाहीं. त्यांस मनसोक्त व्यवहार करण्यास पूर्ण स्वातंत्र्य मिळालें. अशा स्थितींत संस्थानाचे वार्षिक उत्पन्नाची व्यवस्था म्हणजे ज्याचे हातांत पडेल त्यानें साधावें असें चाललें होतें. भावांनां सोडविण्याचे कामीं खर्च झालेल्या रकमांचा बोजा संस्थानावर पडला व कर्ज वाढत चाललें. इतक्यांत मानसिंगराव सज्ञान झाले. व जहागीर आणि संस्थान त्यांचे ताब्यांत आलें. त्यांची नवी कारकिर्द सुरू झाली. अहिल्याबाईनें राजे मानसिंगाचें लग्न मोठ्या थाटमाटानें औरंगाबादीं केलें, तोंपर्यंत सर्व ठीक होतें. पुढें मानसिंगराव यास आपल्या मामांच्या खटपटी आवडतना. आपल्या कारभारांत त्यांनीं इतःपर पडूं नये व कारभारांत ढवळाढवळ करूं नये.

---

frequented by pilgrims and traders from very distant parts. The paved yard in front of Balaji's Temple about 360 by 30 feet is for the occasion overshaded with a sort of canopy supported by posts. The offering given to Balaji is called Kanagi and its annual value exceeds Rupees 100,000. This amount besides defraying the establishments of the Temple (which are about Rs. 1500 per mensum) leaves a large balance the temple managers spend during the fair about Rs. 15000. Large dinners are given to pilgrims wandering devotee mendicants and all other persons destinguished for piety or religious learning.

(Berar Gazetteer)

ठराविक नेमणुक घेऊन स्वस्थ बसावें. अशी राजे मानसिंगरावांची इच्छा होती. अशा प्रकारची व्यवस्था करणें आहे असे विचार त्यांनीं व्यक्त मात्र केले, तों देसाई बंधुंनां तें वैषम्य वाटून, उभयतांमध्यें दुजाभाव उत्पन्न झाला. व आज इतके दिवस चालविलेला कारभार आतां आपल्या हातांतून जाणार, हें उभयतां बंधुंना सहन झालें नाहीं. व त्याचा परिणाम असा झाला कीं, राजे मानसिंगराव हे लग्न झाल्यावर १६ दिवसांतच एकाएकीं मरण पावले. इ. सन १८७८. रासोजीरावासारखीच त्यांची स्थिती झाली, असें किल्येकांचें म्हणणें आहे. व जुन्या कागदपत्रांवरून ( जे या लेखकाच्या हातांत आले आहेत ) तसा प्रकार झाला होता, हें उघड दिसून येत आहे. असो. कृष्णकारस्थान झालें आणि राजे मानसिंगराव नाहींसे झाले. पुनः "नवी इटी व नवा दांडु," अशी स्थिति आली, आणि मानसिंगरावांच्या मरणानंतर तीन महिन्यांनीं त्यांची विधवा स्त्री कोंडाबाई, इजला एक मुलगा झाला–त्याचें नांव राजे बाजीराव ठेवण्यांत आलें.

राजाची अज्ञान अवस्था म्हणजे देसाई बंधुंची उजळ कारकिर्द. बाजीरावाचे नांवें नवा कारभार चालू झाला. पण या कारकीर्दींत लवकरच दोन पक्ष उत्पन्न झाले. सासू व सून यांचें पटेना. प्रत्येकीस आपल्या हातांत श्री बालाजी संस्थानचा कारभार असावा असें वाटत होतें. व त्यामुळें दोन पक्ष झाले. देसाई बंधु एकमेकांचे शत्रु झाले. रामचंद्रराव देसाई व बाजीरावाची आई कोंडाबाईचा पक्ष धरून वागूं लागली. आणि गोविंदराव आपली कारस्थानी बहिण अहिल्याबाई हिला धरून राहिले. या उभयपक्षांत अज्ञान बाजीरावाचें पालन करण्याचें सर्टिफिकेट मिळविण्याचे दावे सुरूं झाले. ह्या दाव्यांत श्री बालाजी संस्थाबाचा पैसा, पाण्यासारखा खर्च झाला. कांहीं वर्षे संस्थान अहिल्याबाईच्या ताब्यांत, तर कांहीं वर्षें कोंडाबाईचे ताब्यांत राहिलें. वकिलांची पोळी पिकली. बालाजीच्या दाव्याच्या कामाकरितां, वकिलांनीं नेहमींच्या दाव्याच्या फी पेक्षां दसपट नव्हे, पण शंभरपटीनें अधिक रकमा मिळविल्या. असो. दोघांचे भांडणांत तिसऱ्याचा लाभ व्हावयाचाच. शेवटीं राणी कोंडाबाई, ह्या मरण पावतांच तंटे मिटले व अहिल्याबाई पालनकर्ती या नात्यानें कारभार पाहूं लागली.

राणी कोंडाबाई मेल्यावर तिचा पक्ष धरून बसलेले रामचंद्रराव देसाई हे बाजीरावास घेऊन वेगळे राहूं लागले. पण कारस्थान–निपुण अहिल्याबाईनें एक वेगळाच डाव मांडिला. गोविंदरावाची मुलगी यमुनाबाई, राजे बाजीरावास देण्याचा घाट रचण्यांत आला. या उभयतांचें नातें पाहिलें तर लग्नसंबंध होणें शास्त्र व रूढीच्या विरुद्ध होतें. गोविंदराव देसाई, राजे बाजीरावाच्या बापाचा सख्खा मामा, म्हणजे गोविंदरावाची मुलगी ती बाजीरावाच्या बापाची मामे वहिण होते. या लग्न संबंधास रामचंद्ररावांची संमत्ति नव्हती. तसेंच असा हा अशास्त्र लग्नसंबंध करूं नये म्हणून निझाम सरकारच्या अधिकाऱ्यांकडून देसाई व अहिल्याबाई यांस मनाईचे हुकूमही गेले होते. पण त्या हुकुमांस न जुमानितां, या उभयतां भाऊ बहिणींनें बाजीरावाचें लग्न, त्याच्या बापाची मामेबहीण यमुनाबाई इजशीं निजाम सरकारच्या हद्दीच्या बाहेर एका रात्रींत लावून टाकलें व आपलें कारस्थान शेवटास नेलें. त्यांत जरा खुबी केली ती हीच कीं यमुनाबाईला गोविंदराव नलवडे या नांवाच्या तिच्या मामाच्या मांडीवर वसविलें व त्याच्याकडोन कन्यादान करविलें. शास्त्र व रूढी याला हा एक पडदा मध्यें आणिला. कांहींही असो; पण आपले हेतू तडीस नेण्याचा ह्या उभयतां बहीणभावाचा बाणा विचार करण्यासारखा आहे.

ज्यांचें उत्पन्न सालीना जवळ जवळ दोन लक्ष रुपयांचे व ज्यांची गणना श्रेष्ठ मराठे क्षत्रियांच्या घराण्यांत; त्यांचें लग्न एकाद्या चांगल्या घराण्यांतील मुलीबरोबर आपल्या वैभवानुरूप करूं, अशी कोंडाबाई, रामचंद्रराव देसाई व त्यांच्या पक्षांतील मंडळींची इच्छा होती. व त्याप्रमाणें ग्वाल्हेर तंजावर वगैरे ठिकाणीं वधूची योजना चालली होती. पण त्या सर्व योजना अहिल्याबाईनें आपल्या भावाचे मतलबासाठीं ढांसळून पाडल्या व यमुनाबाईबरोबर बाजीरावाचें लग्न करून तो सर्वस्वी गोविंदरावाच्या स्वाधीन रहावा, असा योग जुळवून आणिला.

रामचंद्रराव देसाई व त्यांचे पक्षांतील मंडळीला हा डाव पसंत पडला नाहीं व त्यांनीं राजे बाजीराव

यांस अहिल्याबाई व गोविंदराव देसाई यांचे स्वाधीन न करितां आपले ताब्यांत ठेविला. लग्न झालें होतें तरी यमुनाबाईचे व बाजीरावाचें कांहीं वर्षे दर्शन सुद्धां घडूं न देण्याचा बंदोबस्त या पक्षानें चालविला होता. व कांहीं वर्षे तसें चाललेंही होतें. व बाजीराव आणि त्याचा कारखाना अगदीं स्वतंत्र ठेवला होता. व अहिल्याबाई आणि तिचे बंधु गोविंदराव हे आपल्या मुलीसह वेगळे रहात होते; परंतु अहिल्याबाईनें नानाप्रकारच्या युक्त्या चालवून बाजीरावास आपल्या स्वाधीन आणण्याचे प्रयत्न केले. त्यांत तिला यशही मिळालें. एके दिवशीं राजे बाजीराव आपल्या वाड्यांतून सहल करावयास म्हणून जे बाहेर पडले ते अहिल्याबाई व गोविंदराव ज्या घरांत रहात होते तेथें गेले. ते सबंध वर्षांत त्या वाड्याचे बाहेर म्हणून कधींही आले नव्हते. झालें— प्रेमपाशाच्या फासांत व कारस्थानी अहिल्याबाईच्या पेचांत एकदां सांपडल्यावर राजे बाजीराव कीं, ज्यास त्यापूर्वी विडी सुद्धां ओढण्याची संवय नव्हती, तो सर्व व्यसनांनीं ग्रासला गेला आणि त्याच्या कारभाराचीं सर्व सूत्रें गोविंदराव, व त्याची मुलगी यमुनाबाई यांचे हातांत गेलीं. पुढें रामचंद्रराव देसाई व त्याचे पक्षांतील मंडळी, बाजीराव त्यांचे हातांतून गेल्यामुळें केवळ निराधार झाली व लवकरच त्यांस गोविंदरावाचे पक्षास मिळून राहणें भाग पडलें. यानंतर रामचंद्ररावही कांहीं मंडळींस हाताशीं धरून बाजीरावास त्या पक्षांतून काढून आपले स्वाधीन ठेवण्याचे प्रयत्न करीत होता. पण त्याचेवर सुद्धां बहीण-भावांच्या कारस्थानाचा अनिष्ट परिणाम झाला आणि रामचंद्रराव देसाई आपल्या भावाकडून एक दिवस मेजवानीचें जेवण जेवून आल्यावर थोड्याच वेळांत निजधामास गेले. असो. याप्रमाणें राणी कोंडाबाई व तिचे मागून रामचंद्रराव मृत्यु पावल्यावर गोविंदराव देसाई पुनः सर्व कारभार पाहूं लागले. आणि त्यांची मुलगी यमुनाबाई, राजे बाजीरावास आपल्या कह्यांत ठेवून कारभारांत हात घालूं लागली.

राणी कोंडाबाई मेल्यानंतर अहिल्याबाई एकटीच स्वतंत्रपणें पालनकर्त्री बनून, बाजीरावाचे तर्फे व्यवस्था पहात होती. व तिचे तर्फे गोविंदराव देसाई हे वहिवाटदार या नात्यानें सर्व कारभार चालवीत होते. बाजीरावाचे अज्ञानपणांत निजामसरकारचे ताब्यांतील जहागिरीचा बंदोबस्त सरकारमार्फत नेमिलेल्या कोर्ट ऑफ वार्ड्‌सकडून चालविण्यांत येत होता व बाजीराव यांस खर्चासाठीं दरमहा नक्त नेमणूक ठरविण्यांत आली होती. ह्या अशा व्यवस्थेमुळें जहागिरीचें उत्पन्न सरकारचे स्वाधीन राहिल्यानें त्याची चांगली व्यवस्था लागली व मानसिंगरावाच्या वेळचें कर्ज वगैरे फिटून बरीच शिल्लक सरकार-खजिन्यांत जमा झाली. पण देउळगांव येथील श्रीबालाजी संस्थान, ज्याचें उत्पन्न दरसाल एक लक्ष रुपयांचें आहे–तें या कारस्थानी मंडळींच्या ताब्यांत राहिलें. मागें सांगितलें आहे कीं, सासू व सून यांच्यांत तंटे लागल्यामुळें अनेक भानगडी उत्पन्न झाल्या. त्यांत मुख्य व महत्त्वाची भानगड म्हणजे अज्ञानाचे तर्फे श्रीबालाजी संस्थानाची व्यवस्था पाहणें ही होय. ज्यास सरटिफिकेट मिळालें असेल त्यानें ती व्यवस्था पहावी असें असल्यामुळें, पालनकर्त्यांचें सरटिफिकेट मिळविण्याचे प्रयत्न दोन्ही पक्षांकडून होऊं लागले. आणि कधीं सासूनें व कधीं सुनेनें असे कारभार चालविले. सासूचे दोन मुकत्यार व गोविंदराव देसाई वहिवाटदार; तर राणी कोंडाबाईचे तीन मुक्त्यार व रामचंद्रराव देसाई वहिवाटदार. एका वर्षी एका पक्षानें श्रींच्या संस्थानाची यात्रा करावी, तर दुसऱ्या वर्षी यात्रा करण्याचा अधिकार दुसऱ्या पक्षानें मिळवून कारभार करावा. अशा बदलत जाणाऱ्या व्यवस्थेनें संस्थानाच्या उत्पन्नाची व मिळकतीची गैरव्यवस्था व अफरातफर झाली आणि संस्थानावर कर्जाचा बोजा वाढत चालला. व उभय पक्षांतील मुकत्यारांचे प्रतिस्पर्धीपणानें व वहिवाटदारांच्या आत्महित साधण्याच्या खटपटीनें फारच अव्यवस्था उत्पन्न झाली. यात्रेच्या वेळीं येणारी “ कानगी ” म्हणजे देवास दिलेला पैसा जमा करण्याचा अधिकार निरनिराळ्या सावकारांस त्यांचेकडील कर्जाचे फेडीसाठीं तारण म्हणून दिला होता. त्या सावकारांत त्यासंबंधानें तंटे उत्पन्न झाले व ज्याची खटपट ज्यास्त त्यास तो अधिकार मिळून, त्यालाच उत्पन्न मिळूं लागलें.

या भानगडींत जेव्हां अनेक सावकारांच्या चढाओढी चालल्या, तेव्हां कांहीं मंडळींनीं एक नवीनच दावा उत्पन्न करून, संस्थानाची व्यवस्था करण्याचा अधिकार राजाकडून काढून घेऊन पंचांकडे देण्यांत यावा, असा घाट रचला व बाजीराव अज्ञान असतांनाच हा दावा सुरू झाला. तो चालला असतांनाच बाजीराव सज्ञान झाले; म्हणून तो काढून टाकण्यांत आला व संस्थान पूर्णपणें बाजीरावाचे ताब्यांत वहिवाटीस आलें. अहिल्याबाईकडून तें बाजीरावाचें ताब्यांत देतांना पूर्वीच्या कर्जाचा बोजा कायम राहून, आणखी नवीन दस्तैवज करून, संस्थानांचे उत्पन्नावर सावकारांचा पगडा बसविण्याचें कारस्थान गोविंदराव व त्याचे साथीदार मुकत्यार यांनीं केलें होतें.

राजे बाजीरावाचे नांवानें, पण खरें पाहिलें तर गोविंदराव देसाई व अहिल्याबाईचे आणि कोंडाबाईचे वेळचे मुखत्यार या सर्वांचे संमतीनें व विचारानें, संस्थानचा कारभार पुनः चालू झाला. मात्र आतां त्याची जबाबदारी बिचाऱ्या नामधारी बाजीरावावर पडेल, अशी कार्यकर्त्यांनीं दक्षता ठेवण्याची व्यवस्था केली. मुखत्यार मंडळींत चुरस पडली आणि पुनः दोन पक्ष झाले. त्यावरून कांहीं मुखत्यारांस कामावरून दूर केलें. व म्हणून अनेक कारस्थानें उत्पन्न झालीं. आणि पुनः सन १९०४ मध्यें पूर्वीसारखा म्हणजे संस्थानाचा कारभार करण्याचा अधिकार राजे बाजीराव यांचेकडून काढून घेऊन, तें पंचांचे स्वाधीन करावें—असा दावा आणण्यांत आला.

संस्थानाचे उत्पन्नाची गैरव्यवस्था व अफरातफर झाली आहे व संस्थानाचे मुख्य उद्देशाप्रमाणें त्याची व्यवस्था होत नाहीं, म्हणून राजाकडून तें काढून पंचांकडे द्यावें; अशा मुद्यावर चालू झालेल्या दाव्यांत अफरातफर कोणीं केली हा मुख्य प्रश्न उत्पन्न झाला. आणि त्यावरून संस्थानाचे मुखत्यार घनःशाम त्रिंबक ऊर्फ बाबाजी सिताराम, व्यंकोबा पुजारी व राजाराम नानाजी या तिघांवर फौजदारी मुकदमे उभे झाले व पहिल्या दोघांवर गुन्हा शाबीत होऊन एकास पांच वर्षें व दुसऱ्यास तीन वर्षें, अशा शिक्षा झाल्या आणि तिसरे इसम बिनगुन्हेगार म्हणून सुटले. सन १९०४ मध्यें ही गोष्ट घडली. पुढें बाबाजीनें अपिल केलें होतें; पण त्याचा निकाल होण्यापूर्वी म्हणजे ता. ३० सपटेंबर सन १९०५ रोजीं, तो अकोलें येथें एकाएकीं मरण पावला.

या गडबडींत संस्थानाची व्यवस्था नवीन मुखत्यार नेमून करण्याचें काम मोठ्या जोखमाचें होतें. तिघांवर झालेल्या मुकदम्यांत गोविंदराव देसाई याचाही संबंध येत होता; पण त्यानें तो कारस्थानीपणाच्या युक्तीनें व खुबीनें आपल्यावरून टाळण्याचा प्रयत्न केला आणि औरंगाबाद येथें राजेसाहेबांस नेऊन तेथें त्यांचे आश्रयाखालीं राहिला. इकडे संस्थानावर कोणी जबाबदार कामदार नेमला नाहीं- म्हणून तें सरकारांतून नेमिलेल्या रिसिव्हरचे ताब्यांत सन १९०४ च्या सपटेंबरांत देण्यांत आलें.

मुकत्यारांस त्यांनीं केलेल्या अफरातफरीबद्दल शिक्षा झाल्यावर पुनः संस्थानाचा दावा चालू झाला. त्यांत अफरातफरीचा संबंध राजे बाजीरावांकडे नाहीं, असें शाबीत होऊन, त्या दाव्याचा निकाल होणार; इतक्यांत आपला बचाव व्हावा म्हणून उत्पन्न केलेल्या कारस्थानांत देसाई यानें पूर्ण जय मिळविला व त्याचा परिणाम राजे बाजीराव यांचेवर होऊन ते ता. ६ जानेवारी सन १९०६ रोजीं एकाएकीं औरंगाबादेस मरण पावले. झालें, देसाई यांचें हें तिसरें कारस्थान संपलें आणि त्याबरोबरच त्याचेवरचें किटाळ दूर झालें.

राजे बाजीराव हे निपुत्रिक मरण पावले. त्यांचे चुलतभाऊ राजे दत्ताजीराव व दुसरे इसम हे वारस म्हणून पुढें आले आहेत व निजाम सरकारचे दरबारीं या प्रश्नाचा विचार सुरू झाला आहे. प्रथम यमुनाबाईला स्वतःचे खर्चासाठीं व कारखाना चालविण्याकरितां दरमहाची नक्त नेमणूक रु. ४०० ची कायम करण्यांत आली व कायदेशीर वारस कायम करण्याची चौकशी इनाम-कमिशनरच्या नात्यानें औरंगाबादच्या अव्वल तालुकदारांचे कोर्टांत सुरू झाली.

राजे बाजीराव मरण पावल्यानंतर त्यांची बायको राणी यमुनाबाई व तिचा बाप गोविंदराव देसाई आणि त्याची बहीण म्हणजे बाजीरावाची आजी राणी अहिल्याबाई, यांनीं जीं अनेक भयंकर कारस्थानें केलीं, व यमुनाबाईचा मुलगा म्हणून वारस बनविण्याचे जें खोटें कारस्थान रचलें, ती हकिकत आम्हांस उपलब्ध झाली नाहीं, याबद्दल दिलगीर आहों. उपलब्ध झाल्यास तिचा समावेश, दुसऱ्या अंकीं पुरवणी रुपानें अगत्य करूं.

---

**भाग दुसरा समाप्त.**

# जाधव घराण्याची कैफियत.

# भाग तिसरा.

## अनुक्रमणिका.

( इ. स. १६२९ ते १८१६ ).

स्वराज्यांतील

# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग तिसरा.

मागें अचलकर्ण व लुखजी यांस दौलताबादचे किल्यांत बोलावून आणून अहमदनगरचा दुसरा मूर्तिजा निजामशहा यानें ठार मारलें, असें सांगितलें आहे. त्यानंतर त्याची ( लुखजीची ) बायको म्हाळसाबाई आपला नातु व सून यांस घेऊन सिंदखेडास पळून गेली- व आपला दीर जगदेवराव याचे नांवानें मनसब करून शिंदखेडचे देशमुखीवर राहिली. पुढें मोगलांनीं जिजाबाई व लुखजी जाधवरावाची वायको म्हाळसाबाई यांना मुलांबाळां सुद्धां, धरून कैद केलें, व त्यांस जगदेवरावांनीं मध्यस्थी करून सोडविलें, म्हणून वर दिलेंच आहे. नंतर ही सगळी मंडळी सुटल्यावर कोंडाणा ( सिंहगड ) किल्यामध्यें जाऊन राहिली.

---

### सुजनसिंह ऊर्फ संताजी.

( सन १६२९ ते १६५३ )

यावेळीं सुजनसिंह ऊर्फ संताजी मोठा असून स्वारीवर जाण्यासारखा होता. जिजावाईचा वडील मुलगा संभाजी व हा संताजी हे जवळ जवळ समवयस्क असून शहाजी भोंसले यांचेजवळ राहूं लागले, व लढाईचीं मोठमोठीं कामें आपल्या आंगावर घेऊं लागले. शहाजी भोंसले यांजला विजापुरकरांनीं कर्नाटक प्रांताचा बंदोबस्त करण्याचें काम सांगितलें. शहाजीनें सन १६३८ त कर्नाटकांत स्वारी केली. त्यावेळीं तो रणदुल्लाखानाचे हाताखालीं होता. रणदुल्लाखान, सरजेखान, व मुरार जगदेव वगैरे विजापूरच्या मुत्सद्दी लोकांचें शहाजीस पाठबळ होतें. रणदुल्लाखान हा विजापुरीं परत आल्यावर, शहाजी हा कर्नाटकांत एकटाच होता त्यामुळें त्या प्रांतीं त्याचें फारच वजन वाढलें. तो पहिल्यानें बंगळूर येथें रहात असून नंतर कोल्हार येथें राहूं लागला. विजापुरकरांची नोकरी शहाजीनें उत्तम प्रकारें बजाविली म्हणून त्याचें वजन दरबारांत उत्तम प्रकारचें पडूं लागलें. राया रायल नामक एक हिंदू राजा कर्नाटकांत प्रबल होता. त्याजबरोबर शहाजीनें दोन मोठ्या लढाया मारल्या. या युद्धाचा परिणाम असा झाला कीं, अक्कलकोट, बागलकोट, कोल्हार, बंगळूर, बासकोट, बाळापूर आणि शिरें हे प्रांत जिंकले गेले; व ते शहाजीस जहागिरीदाखल देण्यांत आले. पुढें लवकरच रतनपूर, देवगड, राजदुर्ग वगैरे परगणें शहाजीस प्राप्त झाले. सन १६५३ त लुखजींचा नातू संताजी जाधवराव आणि शहाजीचा व जिजावाईचा वडील मुलगा संभाजी या दोघांस शहाजीनें कर्नाटकांतलि आपाखान नामक सरदारावर पाठविलें. आपाखान हा कनकगिरी घेऊन बसला होता, ती तो शहाजीस देईना. ती ( कनकगिरी ) घेण्याकरितां संताजी व संभाजी यांनीं तुंबल युद्ध केलें. या स्वारींत लुखजी जाधवरावाचे हे दोघेही नातू ठार मारले गेले. नंतर शहाजीनें आपाखानाचा पुरा सूड उगवून कनकगिरी काबीज केली. संताजी कर्नाटकांत स्वारीवर असतांना त्याची बायको व मुलगा संभाजी ऊर्फ संभोसिंग हे जिजाबाईजवळ रहात होते.

---

### संभाजी ऊर्फ संभोसिंग.

( सन १६५३ ते १६५९. )

संभाजी ऊर्फ संभोसिंग याचा जन्म १६४० च्या सुमारें झाला. हा हमेष शिवाजीचा खेळगडी असे. या दोघांनाही शिक्षण जिजाबाईचे हाताखालीं मिळत

होतें. तिची संभाजीवर पूर्ण प्रीति होती. जिजाबाईची आई या वेळीं मरण पावली होती, त्यामुळें संभाजीची काळजी जिजाबाई फार घेत असे. शिवाजीचा जन्म शिवनेरी किल्ल्यामध्यें शके १५४९ प्रभवनाम संवत्सरे वैशाख शुद्ध ५ त रोहिणी नक्षत्रावर ता. १० एप्रिल सन १६२७ इसवी रोजीं झाला. त्यावेळीं लुखजी जाधवराव हयात होते. जाधवरावाचा व शहाजीचा युद्धप्रसंग जाहल्याबद्दल पूर्वीं लिहिलें आहे. त्यावेळीं जिजाबाईला शहाजीनें सोडून देऊन माहेरीं पाठविली, ती जाधवरावांनीं आपलीं माणसें* नारो त्रिमल हणमंते व गोमाजी नाईक पाणसंबळ हे कारकून बरोबर देऊन शिवनेरी किल्ल्यांत नेऊन पोंचविली. तथेंच तिला हा मुलगा झाला. लुखजी जाधवराव वारल्यावर त्यांचें कुटुंब म्हाळसाबाई हिनें शिवाजीसुद्धां जिजाबाईस माहेरीं नेलें. पुढें त्यांस मोंगलांनीं धरून सुटका झाल्यावर तीं प्रथम सिंहगडीं राहून नंतर पुण्यास आलीं. यावेळीं शहाजीतर्फे पुणें प्रांताच्या बंदोबस्तास दादोजी कोंडदेव नांवाचा कारकून होता. जिजाबाईला नवरा व माहेर यांचेकडून अत्यंत त्रास सोसावा लागल्यामुळें, तिच्या नैसर्गिक मानी स्वभावांत निश्चय, धैर्य, साहस इत्यादि गुणांची भर पडली होती. दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहून दिवस कंठणें, अथवा माहेरीं जाऊन राहणें हें या मानधन बाईस अत्यंत अयोग्य वाटलें, व स्वतंत्र रहातां यावें म्हणून आपले सत्तेच्या जागेंत म्हणजे पुण्याच्या जहागिरींत रहाणें तिनें पत्करिलें. राजकीय उलाढाली जिजाबाईनें पाहिल्या होत्या. बापाचीं (लुखजी जाधवरावाचीं) व नवऱ्याचीं धोरणें तीस माहीत होतीं. या दोन्ही बालकांच्या मनावर ठसा उमटेल अशा तऱ्हेच्या पूर्वजांच्या शौर्याच्या व वैभवाच्या गोष्टी ती त्यांना सांगत असे; त्यामुळें मोठमोठीं मर्दुमकीचीं कृत्यें करावयास त्यांचीं मनें तयार झालीं. शिवाजीला असेंही तिनें शिकविलें कीं, आपले कुळांत स्वतंत्र शककर्ता राजा होणार आहे. ही बाई जबरदस्त महत्त्वाकांक्षी असून स्वतः शूर होती. ह्या सर्व गोष्टी शिवाजीच्या व संभाजी जाधवराव यांच्या मनावर बिंबल्या होत्या. शिवाजीच्या इतिहासाचें स्वतंत्र व सुंदर पुस्तक रा. केळूसकरें यांनीं केलें आहे, व त्यांत शिवाजीची सर्व हकीकत दिली आहे; ती आतां पुन्हां देण्याची जरूर नाहीं. संभाजी जाधवराव हा, शिवाजीनें जेव्हां स्वराज्य स्थापण्यास प्रारंभ केला, तेव्हां त्यास वेळोवेळीं मदत करूं लागला. अनेक स्वाऱ्यांमध्यें त्यांनीं मोठमोठीं शूरत्वाचीं कृत्यें केलीं. अफझुलखान यास ठार मारण्याचे कामीं संभाजीचें अंग होतें. व जिजाबाईनें शिवाजीचे जिवाचा बचाव करण्याकरितां संभाजी जाधवराव यांस आसपास ठेविलें होतें. सन १६६० चे सुमारास शिवाजी, संभाजी जाधवरावासह जेथें रहात होता, त्या पन्हाळा किल्ल्यास, विजापुरकरांचा सरदार सिद्दी जोहार यानें वेढा दिला. त्यामुळें शिवाजीचें दळणवळण अगदीं बंद झालें. तेव्हां शिवाजीनें किल्ला स्वाधीन करून देतों, असें सिद्दी जोहाराशीं बोलणें लाविलें. व त्यास एके दिवशीं किल्ल्याजवळच्या एका मोर्च्याजवळ येऊन भेटला. दुसरे दिवशीं किल्ला स्वाधीन करण्याचें ठरलें, त्यामुळें विजापूरकरांचें सैन्य बेसावध राहिलें. शिवाजीनें मध्यरात्रीचे वेळीं संभाजी जाधवरावासह एका मावळ्यांच्या टोळीनिशीं अंधारांतून पहाऱ्याच्या चौक्या चुकवीत खालीं उतरून थेट रांगणा किल्ल्याकडे पलायन केलें. 'शिवाजी निघून गेला' हें विजापुरकरांच्या फौजेस बराच वेळ कळलेंसुद्धां नाहीं. ज्या वेळीं ही हकीकत समजली त्या वेळीं, फाजल महंमद व शिद्दी जोहाराचा मुलगा शिद्दी उर्जीज हे तावडतोब घोडेस्वार घेऊन, शिवाजीचे पाठलागास निघाले. त्या वेळीं शिवाजी रांगणा किल्ल्याचा घांट चढत होता. शत्रूचें सैन्य पाठलाग करीत आलेलें पाहून, शिवाजीनें बाजी प्रभू व त्याचे मदतीस संभाजी जाधवराव व कांहीं मावळे लोक देऊन, त्यांस किल्ल्याजवळील खिंडींत पांढऱ्या पाण्यानजीक ठेविलें, व सांगितलें कीं, आपण किल्ल्यावर सुखरूप पोंहोंचल्याच्या तोफा ऐकूं येईपर्यंत शत्रूस पुढें न येऊं देतां तेथेंच अडवून धरावें. याप्रमाणें त्या खिंडींत हे दोघे, मावळे लोकांनिशीं उभे राहिले. इतक्यांत यवन येऊन आंगाशीं भिडले. बाजी प्रभु व जाधवराव यांनीं मावळ्यांनिशीं इतक्या निकराचा हल्ला केला कीं, सर्व मुसलमान लोक पळून गेले. परंतु विजापूरच्या सैन्यास पुन्हा मागून मदत आल्यामुळें व त्यांत

* सभासदकृत ' शिवप्रताप बखर. पृष्ट २४.

फाजलखान नांवाचा ताज्या दमाचा सरदार असल्यामुळें त्यांनीं बाजी प्रभूवर पुन्हां निकराचा हल्ला केला. त्यामुळें संभाजी जाधवराव व अर्धे अधिक मावळे ठार जाहले. इतक्यांत एक गोळी बाजी प्रभूला येऊन लागली, त्यामुळें बाजी प्रभुही पडला; पुढें कांहीं वेळानें शिवाजी सुखरूप पोहोंचल्याच्या तोफा ऐकूं आल्या; त्या तोफांचा आवाज ऐकून त्याचा समाधानानें प्राण गेला. याप्रमांणें संभाजी व त्याचा बाप यांनीं मराठ्यांच्या स्वतंत्रतेकरितां आपले प्राण खर्ची घातले. ही गोष्ट सन १६६० मध्यें घडली. संभाजीचा मुलगा धनाजी ऊर्फ धनसिंग जाधवराव या वेळीं १०।१२ वर्षांचा होता. यावेळीं जाधवरावाचें कुटुंब निराळें राहूं लागलें. शिवाजीनें धनाजी जाधवराव यास युद्धकलेंत निष्णात करण्याकरितां, प्रसिद्ध प्रतापराव गुजर याच्या स्वाधीन केलें होतें.

---

## धनाजी ऊर्फ धनसिंग जाधवराव.

(इ० स० १६६० पासून इ० स० १७१० पर्यंत.)

धनाजीचा जन्म सन १६४९।५० चे सुमारास झाला. या पुरुषानें लुखजी जाधवरावाचे पश्चात् या घराण्यास फार पुढें आणिलें. धनसिंग जाधवराव हा इतिहासांत धनाजी जाधवराव अशा नांवानें प्रसिद्ध आहे. ग्रँट डफ् साहेबानें याजबद्दल मराठ्यांच्या इतिहासांत फार माहिती दिली आहे. सबब वाचकांनीं ग्रांटडफ्चा इतिहास वाचावा, अशी आमची त्यांस शिफारस आहे. धनाजी जाधवराव हे आपण भोंसल्याचे अंकित आहों, असें आतांपासून समजूं लागले. ह्या जाधवराव घराण्याची क्रांति वारंवार होत गेली आहे, व तिजवर नानातऱ्हेचीं संकटें येऊन अनेक आघात घडले आहेत. मूळ हें घराणें स्वतंत्र राज्य करीत होतें. पुढें विठ्ठलदेव, लुखजी वगैरे आपणांस त्यावेळचे राज्यकर्ते मुसलमान यांचे अंकित समजूं लागले. लुखजीच्या पदरीं भोंसले नोकर असून, पुढें धनाजी आपणांस भोसल्यांचे अंकित समजूं लागले.

या धनाजीनें बाळाजी विश्वनाथभट जो पुढें पेशवा झाला, त्यास आपले पदरीं कारकून ठेविलें होतें. जेव्हां बाळाजी विश्वनाथाचे वंशज मराठी राज्याचे मालक झाले, तेव्हां ह्या धनाजीच्या वंशजांस त्यांचे अंकित समजणें भाग पडलें. अशा तऱ्हेनें ह्या घराण्याची क्रांती होत होत शेवटीं पेशव्यांच्या अवकृपेनें हें घराणे अगदीं धुळीस मिळण्यास आलें. असो.

धनाजी जाधवराव याचें युद्ध-शिक्षण प्रतापराव गुजराच्या हाताखालीं परिपूर्ण झालें. शिवाजीची नजर धनाजीचे शिक्षणावर पूर्ण होतीच. शिवाजीची लढण्याची रीत व कावे धनाजीनें पूर्णपणें उचलले होते. जिजाबाईसाहेब यांच्या सांगण्यावरून धनाजीला शिवाजी आपले स्वारीबरोबर हमेष घेऊन जात असे. तथापि धनाजीची नेमणूक प्रतापराव गुजराच्या हाताखालीं झाली असल्याकारणानें, तो नेहमीं त्याच्या बरोबरच असे. तो त्याला वेळोवेळीं फार चांगल्या रीतीनें मदत करीत असे. ज्यावेळीं सन १६७२ मध्यें शिवाजीचें विजापुरकराशीं दुसरें युद्ध सुरू झालें, त्यावेळीं शिवाजीनें आपला सेनापति प्रतापराव गुजर व त्याचेबरोबर धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे असे देऊन, त्यांस विजापूरकरांचा सेनापति अबदुल करीम बुहलोलखान याजवर पाठविलें. हें युद्ध होण्याचें कारण मोगलांशीं संधान बांधून शिवाजीला उडविण्याची बुहलोलखानाची खटपट चालू होती. यामुळें शिवाजीनें त्याजवर सैन्य पाठविलें. प्रतापराव गुजरानें धनाजी व संताजी यांच्या मदतीनें वांईपासून तुंगभद्रा नदीपावेतों देशांत व पश्चिम समुद्रकिनाऱ्यानें विजापूरच्या हद्दींत जिकडे तिकडे मराठ्यांचा अंमल बसविण्यास सुरवात केली, हें बुहलोलखानास समजून तो झपाट्यानें प्रतापराव गुजरावर आला.

प्रतापरावाची व बुहलोलची उंबराणी येथें गांठ पडली. दोनप्रहरपर्यंत कडाक्याचा झगडा चालला, बुहलोलखानास पाणीसुद्धां मिळेना. तेव्हां प्रतापरावाचें आर्जव करून, त्यानें मराठ्यांच्या वाटेस न जाण्याचें कबूल केलें. प्रतापरावानेंही उदार मनानें शरण आलेल्या शत्रूस जीवदान दिलें. प्रतापराव गुजर याप्रमाणें विजयी होऊन परत फिरला. तों लागलीच पाठीमागें बुहलोलखान मराठ्यांच्या देशास उपद्रव देऊं लागला. शिवाजीला ही गोष्ट कळल्यावर प्रतापरावाचें हें करणें त्याला आवडलें नाहीं. विजापूरकरांची पूर्ण खोड मोडल्याशिवाय आम्हांस तोंड

दाखवूं नये, असा खरमरीत निरोप शिवाजीनें प्रतापरावास पाठविला. त्याबरोबर प्रतापराव पुन्हा बुह्लोलखानावर चालून आला, व रागाच्या आवेशांत आपली व्यवस्था बरोबर न करितां, त्यानें शत्रूवर एकदम चाल केली. परंतु दुर्दैवानें प्रतापराव आपल्या निवडक लोकांनिशीं रणांगणीं पडला.

*धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांचीं पथकें मागें होतीं. त्यांस प्रतापरावाचें पराभव पावलेलें सैन्य येऊन मिळालें. तेव्हां धनाजी जाधवरावानें त्या सैन्याला धीर देऊन, पुन्हां बुह्लोलखानावर चाल केली. प्रतापराव पडल्याची बातमी हंसाजी मोहिते त्या प्रांतीं कामगिरीवर होते, त्यांच्या कानीं गेली, तेव्हां तेही धांवून धनाजी जाधवराव यास येऊन मिळाले. या तिघांनीं बुह्लोलखानास जेसरी येथें गांठलें व बुह्लोलखानावर मोठ्या निकरानें हल्ले करून त्याचा अगदीं मोड करून त्यास पळावयास लाविलें. येणेंप्रमाणें विजापूरच्या फौजेचा नाश झाला, त्यामुळें शिवाजीस आनंद झाला. परंतु प्रतापराव पडल्याबद्दल अत्यंत दुःख झालें. या वेळीं धनाजीनें जें शौर्य दाखविलें, त्याबद्दल शिवाजीस धन्यता वाटली. हंसाजी मोहिते यांच्या समयोचित पराक्रमाबद्दल त्यास हंबीरराव हा किताब देऊन, सेनापति केलें. व या वेळेपासून धनाजीलाही स्वतंत्र सरदारी सांगितली.

सन १६६४ या सालीं मुसलमान एक होऊन, त्यांनीं शिवाजीला बुडविण्याचा कट केला. मोंगल व विजापूरकर एक झाले. विजापूर-दरबारीं पठाण व सिद्दी असे दोन पक्ष होते. या दोन पक्षांचे बुह्लोलखान व मसऊदखान असे अनुक्रमें मुख्य होते, या दोघांमध्यें वांकडें होतें, तरी ते यावेळीं एक झाले; व शिवाजीशीं लढण्यास तयार झाले. या कामीं प्रत्येक सरदारावर आपलेकडील निरनिराळें सैन्य पाठवून निरनिराळे जागीं शिवाजीनें मुसलमानांचा पराभव केला. त्यांत एका टोळीवर धनाजी जाधवराव होते. याप्रमाणें दिवसेंदिवस धनाजी जाधवरावाचा पराक्रम वाढत जाऊन, वेळोवेळीं स्वराज्य स्थापण्यास ते मदत करूं लागले. जिजाबाईसाहेब यांना हें ऐकून फार आनंद होत असे. धनाजीनें यावेळीं जिजाबाईजवळ आपली वडिलार्जित शिंदखेड वगैरे प्रांतांची देशमुखीची वांटणी आपणांस मिळावी, म्हणून उद्गार काढले. परंतु जिजाबाईसाहेब यांनीं त्याची समजूत अशी केली कीं, तुम्हीं स्वतंत्रच वतन मिळवावें. त्यावरून त्यांनीं पुनः वडिलार्जित वतनासंबंधानें उद्गार काढले नाहींत. विजापुरकरांची पूर्वीं सांगितल्याप्रमाणें खोड मोडल्यावर बरेच दिवस शिवाजीच्या वाटेस ते गेले नाहींत; परंतु सन १६७८।७९ सालीं पुन्हां विजापूरकरांचें शिवाजीशीं युद्ध सुरू झालें. यावेळीं शिवाजी कर्नाटकप्रांतीं असून, आपला भाऊ व्यंकोजी याजवळ वडिलांच्या जहागिरीची वांटणी मागत होता. त्यानें वांटणी देण्याचें साफ नाकबूल केलें, व तो शिवाजीशीं लढण्यास तयार झाला. एवढेंच नव्हे, तर त्यावर स्वतः चालून आला. तेव्हां त्याजवर हंबीरराव मोहिते, धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे हे तिघेही सरदार पाठविले. या तिघांची गांठ व्यंकोजीशीं बालगोंडपूर येथें पडली; त्यांत व्यंकोजीचा पराभव होऊन त्याचेकडील बहुतेक लोक पाडाव झाले. तेव्हां व्यंकोजीचे डोळे उघडले, व तो वांटणी देण्यास कबूल झाला. ह्या दोघां भावांचा तंटा उपस्थित झाला आहे, व शिवाजी कर्नाटकांत आहे, असें पाहून मोंगल सरदार दिलीरखान यानें गोवळकोंड्यावर चाल केली. गोवळकोंड्याचे सुलतान कुतूबशहा यांचें व शिवाजीचें सख्य होतें; याजबद्दल दिलीरखानास फार वाईट वाटे. सबब गोळकोंड्यावर चाल करून तें बुडवून टाकण्याचा दिलीरखानाचा विचार होता. ह्या दिलीरखानास शिवाजीचा वडील मुलगा संभाजी हा मिळाला होता. विजापुरकर व दिलीरखान यांनी गोवळकोंड्यावर स्वारी केली. त्यावेळीं मादण्णापंत हा कुतुबशाहीचा वजीर होता. त्यानें दोघांचाही पराभव केला. ही गोष्ट शिवाजीस कर्नाटकांत कळली, व शिवाय औरंगजेब बादशहानें आपल्या पारिपत्याची जय्यत तयारी चालविली आहे, असें कळलें म्हणून,

* In the division of Hunsaji Mohitey, two officers greatly distinguished themselves; they were promoted inconsequence, and their names, Suntajee Ghorepuray and Dhunajee Jadow, afterwards became renowned in the annals of Maharastra.

G. D. H. Page 222.

कर्नाटकची कामगिरी रघुनाथपंत, संताजी घोरपडे, हंबीरराव, व धनाजी जाधवराव इत्यादिकांवर सोंपवून शिवाजी दक्षिणेंत आला. येतांना विजापुरकरांशीं त्याचे पुष्कळ झगडे झाले. कृष्णा व तुंगभद्रा यांमधील दुआवांत विजापूरचा सरदार यूसुफ्खान मायणा म्हणून होता. शिवाजीनें तेथेंच जवळ साजरागोजरा वगैरे नवीन किल्ले बांधून, तेथील ओसाड प्रांताचा बंदोबस्त केला; हें त्यास आवडलें नाहीं. त्यानें शिवाजीचे लोकांस असें करण्याचें कारण विचारलें, तेव्हां त्यांनीं कळविलें कीं, ओसाड मुलखांत रानटी लोकांची फार वस्ती आहे व त्यांच्यापासून प्रवासी लोकांस फार त्रास होतो. म्हणून आम्ही त्याचा बंदोबस्त केला आहे. आम्हीं विजापूर-दरबारला याबद्दल कळविलें आहे. परंतु त्यानें दाद घेतली नाहीं. शिवाय "यूसुफ्खान आमच्यावर जुलूम करितो. त्याची नेक नजर नाहीं. अशी तक्रार आमचा सरदार हंबीरराव याजकडे तेथील जमेदार व रयत लोकांनीं केली, म्हणोन आम्ही हा बंदोबस्त केला, असें उत्तर यूसुफ्खानास मिळालें. कांहीं रयत लोक खरोखरी यूसुफ्खानाच्या जुलुमास त्रासून हंबीररावाकडे आले व म्हणूं लागले कीं, तुमच्याकडे आह्मीं कागाळी केल्यामुळें, या म्लेंछानें आज तीन दिवस आमच्यादारीं चौकी बसविली आहे. अन्नपाण्यावांचून जीव घेण्यास उद्युक्त झाला आहे. तरी रात्रीचा दिवस करून यावें, व आम्हांस संकटांतून मुक्त करावें. हंबीरजीनें जमेदारांचे जामीन आपलेकडे ठेवून घेऊन, रघुनाथपंत व धनाजी जाधवराव यांजला मजकूर विदित करून, जमेदारास आश्वासन देऊन, परत लाविलें. आणि फौजेसह जाऊन जमेदाराच्या मुलखांत जागोजाग आपलीं ठाणीं बसविलीं. हें वर्तमान यूसुफ्खानास कळतांच तो त्वरेनें जीनबंद होऊन फौजेसहित हंबीरजीच्या थोड्याशा फौजेवर चालून आला. मायणा शरीरें करून जबर. कजाखही विशेष. हंबीररावाजवळ सरंजाम थोडा, मायण्याची जमियत मोठी, असें असतां, वीज चकाकतांच अंधःकार दूर होऊन शुद्ध उदकधारा नजरेस येतात. तद्वत् हंबीररावाची तलवार चमकतांच शत्रूचे सैन्याची दाणादाण झाली. जिकडे तिकडे हलकल्लोळ माजून राहिला; व स्त्रीचे डोईवरील केंसांप्रमाणें हंबीररावापुढें शत्रूचें सेनेंत भांग पडला. ( अर्थात् सैन्य दुभंग झालें. ) शेंकडों मनुष्यें त्यानें जातां जातां मारलीं. खान नामोहरम झाला. शत्रु पळूं लागले. त्यांस धरून आणिलें. सरंजामासुद्धां सर्व लष्कर पाडाव करून आणिलें. हंबीररायाकडील फक्त ५।५० लोक जखमी जाहले. हें वर्तमान विजापुरी गेल्यावर मायण्यास सोडविण्याचा विचार काय करावा, याबद्दल दरबारास चिंता उत्पन्न झाली. शेवटीं मायण्यास सोडविण्याकरितां विजापुराहून फौज रवाना जाहली. हंबीरराव तयारीनेंच होता. दुआबांत विजापुरची फौज येतांच, उभयतांची तलवार चालू झाली. लढाईची एकच गर्दी उसळली. विजापुरकरांचा पराभव जाहला. ते दांतीं तृण धरून शरण आले. त्यांजकडे न पाहतां, ज्यांनीं शस्त्र उचललें त्यांचा चेंदा काढला. चार घटका लढाई मातबर झाली. इतक्यांत धनाजी जाधवराव वगैरे दुसरे सरदार विजापुरची फौज आलेली ऐकून, हंबीररावाचे मदतीस आले. मग चोंहोंकडून लांडगेतोड करून शत्रु बेजार करून सोडले. याप्रमाणें विजापुरास पोंहोंचेपर्यंत गलबल करून दिली. आईस लेंकरूं व लेंकरास आई ओळखीना. आपला जीव वांचला, तर सर्व कांहीं मिळेल, परंतु पळावें, असेंच प्रत्येक शत्रूचे मनास वाटे. "ईश्वरा ! पुन्हां मराठ्यांशीं लढाईची गांठ घालूं नकोस," असें त्यांनीं मनांत म्हणावें, अशी स्थिति झाली. येणेंप्रमाणें विजापूरची फौज पिटाळून आपला अंमल बसविल्यावर अण्णाजी रंगनाथ मालेकर यास बरोबर घेऊन धनाजी जाधवराव शिवाजीचे भेटीस रायगडास गेले. व मोहिते वगैरे इतर सरदार कर्नाटकांत गेले. शिवाजीनें मोठ्या आनंदानें व समारंभानें सामोरा येऊन* धनाजी जाधवाची तारीफ करून नांवाजणी केली, व म्हणाले—"हीं मनुष्यें प्रतिसृष्टि निर्माण करतील. आम्हीं नसतां बादशाहाशीं स्पर्धा करून मुलूख घेऊन गर्वरहित केला. आम्हांशीं बोलण्यास त्यास उरूज न राहिला. यांचे उतराई कोठें व्हावें ? असो. आमच्या साह्यार्थ हे देवलोकींहून मनुष्य-रूपी निर्माण झाले, असेंच वाटतें. जाधवराव, २५।३० हजार मुसलमान फौजेशीं लढाई ६।७ हजार माणसांनिशीं कशी केली ? तुम्हीं पोहों-

---

*श्री० सरदेसाईकृत मराठी रियासत पृष्ठ २२९.

चून पुढें पाठलाग कसा केला? हें साद्यंत वर्तमान सांगावें.—" त्यावरून अण्णाजी रंगनाथ यांनीं मजकूर निवेदन केला, व लढाई डोळ्यासमोर चालली आहे, असें शिवाजीस भासविलें. शिवाजीनें प्रसन्न होऊन वस्त्रें व अलंकार दिले. "शाबास" म्हणून नांवाजणी करून गौरविलें. या लढाईस **सावनूरची लढाई** म्हणतात. यावेळीं धनाजी जाधवरावाचें वय २० पासून २५ चे आंतच होतें. स्वतंत्रतेनें लढाई देण्याचा प्रसंग हा त्यांचा पहिलाच होता. एवढ्या वयामध्यें एवढें मोठें जबाबदारीचें काम पार पाडलें, याजबद्दल आश्चर्यच मानलें पाहिजे व त्याप्रमाणें शिवाजीनें आश्चर्य मानिलेंच आहे. अशी अनेक तऱ्हेचीं शिवाजी महाराजांचीं कामें धनाजी जाधवरावांनीं केलीं. व शिवाजीमहाराजांनीं त्यांस मोठ्या पदवीस, व इभ्रतीस चढविलें. शिवाजी महाराज पुढें जगले असते, तर त्यांचे कारकिर्दीत हंबीररावाचे पश्चात् धनाजी जाधवराव सेनापती जाहले असते. परंतु तो योग जुळून आला नाहीं. कारण पुढें शिवाजीमहाराज लवकरच वारले.

सन १६७४ सालीं शिवाजी महाराजांना राज्याभिषेक जाहला. नंतर जिजाबाईसाहेब यांस १५ दिवसांनीं रायगडच्याखालीं, पांचवड मुक्कामीं देवाज्ञा जाहली. तेव्हां पासून शिवाजी महाराज फार उदास जाहले. त्यांत संभाजी महाराजांचें दुर्वर्तन! त्यामुळें दिवसें दिवस खचत जाऊन शेवटीं एकाएकीं गुडघ्यांत एक गळू होऊन ७ दिवस ज्वर आला, व त्यांतच या महापुरुषाचा अंत जाहला. यावेळीं शिवाजी महाराजांचें वय ५३ वर्षांचें होतें.

याप्रमाणें शिवाजी महाराज व जिजाबाई साहेब हीं जाधवरावांच्या घराण्यांतील अत्यंत निकट संबंध असलेलीं दोन्हीही माणसें नाहींशीं झालीं. भोंसल्यांचा व जाधवरावांच्या घराण्याचा येथपासून आप्तसंबंधीं संबंध तुटला.

यावेळीं धनाजी जाधवराव महाराजांचे सन्निध होते. त्यांस पुढील होणारें भविष्य महाराजांनीं कथन केलें. महाराज म्हणालेः—" आमचा वडील मुलगा संभाजीराजे, आपल्यावेळच्या थोर ब्राह्मणांस मारील. मराठीयांस, लष्करचे सरदारांसही मारील, धरील, इजत घेईल, द्रव्य खजीना सर्व राज्य गमावील. मग राजाराम राज्य करील, मराठ्यामध्यें संभाजी मोडील व उरल्या पैकीं संताजी घोरपडे व धनाजी जाधवराव हे दोघे मोठे पराक्रम करतील, व गेलें राज्य सांवरतील" असें म्हणून महाराजांनीं कैलासवास केला. सर्व लोकांस अत्यंत दुःख जाहलें. यावेळीं संभाजी महाराज हे जवळ नसून पन्हाळा किल्यावर अटकेंत होते.

इकडे महाराजांचे धाकटे चिरंजीव राजाराम महाराज यांस मुत्सद्दी मंडळींनीं सिंहासनाधिष्ठ करण्याचें मनांत आणिलें. या कटांत सोयराबाई, अण्णाजी दत्तो, मोरोपंत पिंगळे, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत अमात्य इतकी मंडळी होती. धनाजी व हंबीरराव मोहिते, बाजीप्रभु चिटणीस, संताजी घोरपडे वगैरे प्रभु व मराठे लोक त्या कटांत सामील नव्हते. बाजीप्रभूला या मंडळींनीं या कटांत सामील होण्यास आग्रह केला. " परंतु हा कट सिद्धीला जाणार नाहीं " असें म्हणून त्यांत तो सामील झाला नाहीं. पाहिजे तर आपल्या मुलाला घ्या, असें तो म्हणाला. या मंडळीनें हंबीरराव मोहिते व धनाजी जाधवराव यांस संभाजीचा पन्हाळ्यावर ज्यास्त बंदोबस्त करण्याकरितां पत्रें लिहिलीं. यावेळीं हंबीरराव व धनाजी जाधवराव खेरीज बाकी मुत्सद्दी मंडळींनीं, संभाजी महाराज यांजवर बंदोबस्ताकरितां ठेवलेले हिरोजी फर्जंद व सोनाजी नाईक बंकी यांस महाराजांच्या मृत्यूचीं पत्रें जासूदांच्या हातीं पाठविलीं.

जासूद लोक रायगडाहून आले आहेत असें संभाजीस समजल्यावरून त्यानें त्यांस बोलावून आणून ' कां आलांत ?' म्हणून प्रश्न विचारून, त्यांचेजवळ असलेलीं पत्रें घेतलीं. त्यामुळें महाराजांच्या मृत्यूची बातमी त्यास कळली. नंतर त्यानें बंकी व सूर्याजी कंक मावळा या दोघांस एकदम ठार मारून टाकिलें. हिरोजीफर्जंद पळून गेला. संभाजीनें पन्हाळा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. त्याजवळ फौज नव्हती म्हणून त्यानें हंबीरराव मोहिते व धनाजी जाधवराव यांस पत्रें पाठविलीं. ते एकदम जाऊन त्यास मिळाले. धनाजी जाधवराव व हंबीरराव मोहिते यांसह संभाजी महाराज रायगडी आले. किल्ला मोकळा असल्याकारणानें आंत सहज प्रवेश झाला. नंतर त्यानें अनाजी

दत्तो व राजाराम महाराज यांस कैद केलें. सोयराबाईला भिंतींत चिणून ठार मारून टाकिलें. याप्रमाणें कृत्यें करून माघ शुद्ध १० सन १६८१ च्या फेब्रुवारींत आपणास राज्याभिषेक करून घेतला. याप्रमाणें संभाजी महाराजांची कारकीर्द सुरू झाली. त्यानें पुढें अनेक मुत्सद्दी ठार मारून टाकिले.

यावेळीं संभाजी महाराजांस अनेक शत्रु उत्पन्न झाले होते. त्यांत दिल्लीपती बादशहा औरंगजेब, स्वतः मोठी फौज घेऊन दक्षिणेंत मराठी राज्य नाहींसें करण्याकरितां आला. औरंगजेबानें आपला मुक्काम बऱ्हाणपूर येथें ठेविला व आपले चिरंजीव मुअज्जम आणि अजीम यांस संभाजीचा मुलूख जिंकण्यास पुढें पाठविलें. अजीमनें बागलाणांत जाऊन सालेरचा किल्ला घेतला. त्याजवर सेनापती हंबीरराव, धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांस संभाजीमहाराजांनीं पाठविलें. या तिघांचा पराभव होऊन ते माघारी फिरले. मोंगल फौजेनें त्यांचा साताऱ्यापर्यंत पाठलाग केला. यावेळीं धनाजी जाधवरावांनीं मोंगल अस्ताव्यस्त पाहून माघारीं तोंड फिरविलें, त्यामुळें मोंगल लोक मराठ्यांचे तावडींत सांपडले. तिघांनीं तिहींकडून त्यांस गांठून हैराण केलें. त्यामुळें बादशहानें अजीम यास परत बोलावून घेतलें. सन १६८५ सालीं संभाजी महाराजांनीं स्वतः हंबीरराव व धनाजी यांस बरोबर घेऊन विलक्षण साहस करून भडोच शहर लुटलें, व पुष्कळ संपत्ती रायगडीं आणली. त्याच सुमारास दहा हजार मराठ्यांची एक टोळी धनाजी, संताजी व हंबीरराव यांचे हाताखालीं देऊन मोंगल फौज सर्व देशभर पसरली असतां गुप्तरूपानें पाठविली. हे तिघे रायगडाहून अशा तडफेनें उत्तरेकडे गेले कीं, त्यांचा कोणास मागमूस लागण्यापूर्वी या तिघांनीं बऱ्हाणपूरापर्यंत सर्व प्रदेश लुटून जाळून फस्त केला. याप्रमाणें मोंगल बादशहाची पहिली हिंमत जिरली. हें युद्ध तीन वर्षें चाललें होतें. संभाजी महाराजांनीं कलुशा या नांवाचा ब्राह्मण आपला मुख्य प्रधान केला. व आपण नेहमीं व्यसनाधीन होऊन त्याजवर राज्यकारभार सोंपविला; यामुळें सर्व लोक संभाजी महाराजांविषयीं नाखुष जाहले होते. मात्र हंबीरराव मोहिते, धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांनीं लष्करची बाजू उत्तम तऱ्हेची राखिली होती. परंतु राज्यांतील खजिना नाहींसा होऊन, प्रांतांतील वसूलही येईनासा झाला.

त्यामुळें सर्व बाजूंनीं पैशाची अडचण पडली, व दिवसेंदिवस राज्य खालावत चाललें. रयत लोक नाखुष जाहले. सन १६८७ त विजापुरचें राज्य बादशहानें जिंकलें, तेव्हां तेथील मुख्य सरदार सरजेखान हा बादशहाचे तैनातीस आला होता; त्यास बादशहानें संभाजीचा प्रांत, सन १६८७ त सर करण्यास पाठविलें. या वेळीं धनाजी जाधवराव, हंबीरराव मोहिते, व संताजी घोरपडे हे वांईच्या आसपास तळ देऊन होते. त्या तिघांवर सरजेखान गेला. सरजेखानाची व ह्यांची लढाई होऊन, सरजेखानाचा पराभव जाहला, परंतु लढाईच्या गर्दीत हंबिररावास गोळी लागून तो रणांगणीं ठार जाहला. हा शूर पुरुष पडल्यामुळें मराठ्यांचें मोठें नुकसान झालें. ह्या थोर पुरुषाच्या युद्ध कलेंतील डावपेचांचा धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांनीं पूर्णपणें अभ्यास केला होता. हा थोर पुरुष वारल्यानें संभाजी महाराज यांस आपलें एक अंग नाहींसें झाल्यासारखें झालें, व ते दिवसेंदिवस निराश झाले. पुढें धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांस १०००० फौज देऊन कर्नाटकाचा कारभारी रघुनाथराव नारायण वारल्यामुळें, तिकडे पाठविलें. या फौजेनें कर्नाटकांत जिंजीचा किल्ला आपले हस्तगत करून घेऊन, तेथें चांगला बंदोबस्त केला. या कर्नाटकांतील मराठी फौजेवर मोंगली फौज बादशहाकडून पाठविण्यांत आली, परंतु यांचे त्यांचे फारसे सामने झाले नाहींत. पुढें सन १६८९ सालीं संभाजी महाराज यांस बादशहानें धरून ठार मारिलें.

त्याची हकिकत अशी आहे कीं:—संभाजी हा युद्धानें आपले ताब्यांत येत नाहीं, असें पाहून औरंगजेब बादशहानें त्यास गुप्त रीतीनें पकडण्याकरितां कांहीं लोक नेमिले. त्यांत तकरीबखान म्हणून एक सरदार होता. त्यास संभाजी हा एकटाच संगमेश्वरीं विलासांत पडला आहे, अशी खबर लागली. तेव्हां आपली फौज बरोबर घेऊन, तकरीबखानाचा मुलगा इख्लासखान हा संभाजीस पकडण्याच्या हेतूनें कोल्हापुराहून निघाला. संभाजीला तो अगदीं जवळ येईपर्यंत मुळींच वाता

कळली नाहीं. तो जवळ आल्यावर जासुदानें त्याला कळविलें. तेव्हां कलुशानें पुढें होऊन मोंगलांशीं सामना केला. परंतु त्यास तीर लागून तो पडला. तेव्हां इखलासखान हा संभाजी होता, तेथपर्यंत लोकांस कापीत गेला. संभाजी महाराज वेष पालटून पळण्याचे तयारींत होते, तोंच त्यानें त्यांस धरिलें, व उंटावर बसवून तुळापुरीं बादशहाचे छावणींत आणिलें. बादशहानें संभाजीस मुसलमान हो; असें म्हटल्याबरोबर संभाजीनें पैगंबराची निंदा केली; व ' मी मुसलमान होणार नाहीं ' असें साफ सांगितलें. त्यामुळें, त्याचे हाल हाल करून त्यास ठार मारिलें.*याप्रमाणें संभाजी महाराजांचा शेवट झाला.

संभाजी महाराज यांचे सारखा धाडशी व शूर असा पुरुष आजपर्यंत कोणी झाला नाहीं; परंतु व्यसनाधीन झाल्यानें मराठी राज्यावर मोठा घोर प्रसंग आला. मोगलांनीं देखील भागूबाईसारखें विश्वासघातानें त्यांस पकडलें. संभाजी महाराजांचा, मोगलांनीं कोणत्याही वेळीं सामना देऊन पराभव केलेला नाहीं, व ते अजिंक्य असल्यामुळें, बादशहानें कपट करून नामर्दपणानें त्यांस धरून आणून ठार मारिलें. यामुळें धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे वगैरे मराठे सरदारांस अत्यंत वाईट वाटून, ह्या गोष्टीचा सूड घेण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली, व पुढें आपलें विलक्षण सामर्थ्य प्रगट केलें. या कृत्यास ब्राह्मण व प्रभू लोकही अनुकूल झाले.

संभाजी महाराजांचे वधानें मोंगल व मराठे यांचें युद्ध बंद न पडतां ज्यास्तच भयंकर रीतीनें सुरू झालें, व मराठ्यांच्या शब्दाचा विलक्षण दरारा लोकांस वाटूं लागला. जों जों औरंगजेब बादशहा जुलूम करी, तों तों मराठ्यांच्या आंगचें मूळचें तीव्र तेज अधिकाधिक वृद्धिंगत होऊं लागलें. संभाजी महाराज वारल्याचें वर्तमान रायगडीं येऊन पोहोंचलें. धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे हे मराठे सरदार कर्नाटकांतून रायगडीं आले. सर्व मुत्सद्दी, ब्राह्मण, प्रभू व मराठे लोक रायगडीं जमा झाले, त्यांत प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाळ चिटणीस, बाबजी निळो-पारसनीस, धनाजी जाधवराव, संताजी घोरपडे व खंडेराव दाभाडे वगैरे कार्यकर्ती माणसें प्रमुख होतीं. राजाराम महाराज, संभाजीची बायको येसूबाई, तिचा मुलगा शिवाजी (पुढें शाहू नांवानें प्रसिद्ध झाला तो) व राजारामाची बायको वगैरे राजकुटुंबांतील मंडळी रायगडावरच होती. संभाजीच्या वधानंतर बादशहाची फौज रायगडावर रवाना झाली हें वर्तमान समजल्यावर मोठें संकट प्राप्त होऊन, सर्व मुत्सद्दी व सरदार पुढील मसलत करूं लागले. खजिन्यांत शिल्लक नाहीं, फौजा सर्व मोडल्या. किल्ले बेसरंजाम झाले. पूर्वीची अनुभवी माणसें मरून गेलीं. अशा स्थितींत शत्रूशीं उघड टक्कर देणें शक्य नव्हतें. राज्याचा मालक संभाजीचा मुलगा शिवाजी लहान असून, राजाराम महाराज तरुण व गुणसंपन्न होते. म्हणून राजारामास पुढें करून राज्याचा बचाव करावा, असा शेवटीं निर्णय झाला. येसूबाई व तिचा मुलगा शिवाजी यांस रायगडीं ठेवून, राजाराम महाराज, बायकोसुद्धां खंडो बल्लाळ चिटणीस, बाबजी निळो पारसनीस, प्रल्हाद निराजी, धनाजी जाधवराव, संताजी घोरपडे व खंडेराव दाभाडे वगैरे मुत्सद्दी लोकांस बरोबर घेऊन, रायगडाहून डोंगरी किल्ल्याचे आश्रयानें मोंगलांशीं झुंजावें या हेतूनें बाहेर पडले, व तेथून थेट पन्हाळ्यास येऊन दाखल झाले.

तेथें धनसिंग जाधवराव यांस फौज जमविण्यास सांगितलें. त्यांनीं ३०–४० हजार फौज जमविली. इकडे बादशहानें आसदखान याचा मुलगा झुल्फिकारखान यास कोंकणांत पाठविलें होतें. तो पावसाळा संपल्यावर सन १६८९ च्या नोव्हेंबर महिन्याच्या सुमारास रायगडावर आला. त्यास जंजिऱ्याचे शिद्दीची मदत होती. किल्ला मजबूत असल्याकारणानें मोंगलांचें फार दिवस कांहीं चाललें नाहीं. पुढें त्या किल्ल्याचा मुख्य सरदार सूर्याजी पिसाळ नांवाचा वांईचा मराठा होता. त्यास वांईची देशमुखी देण्याचें वचन देऊन आपलेकडे सामील करून घेतलें. त्यानें किल्ल्याचे दरवाजे उघडून शत्रूस आंत घेतलें. मुसलमानांनीं येसूबाईस व तिचे मुलास कैद करून बादशहाचे छावणींत नेलें, व सूर्याजी पिसाळास

---

* ऑर्म्नें संभाजीच्या मृत्यूपूर्वी घडलेली हकीकत बऱ्याच फेरफारानें लिहिली आहे. त्यानें कलुशाच्या माथीं फितुर होऊन संभाजीस पकडून देण्याचें अधम कृत्य लादलें आहे.

मुसलमान करून वांईची देशमुखी दिली. याप्रमाणें या निमकहराम मराठ्यानें फितुरी करून आपले धन्यास मुसलमानांचे हातांत देऊन, स्वार्थ साधिला पुढें शाहु महाराजांनीं या पिसाळ घराण्यांतील सर्व मंडळींची कत्तल केली व सूर्याजीस ठार मारिलें, असो.

पुढें औरंगजेबानें ईतिकदखानास, झुलपिकारखान असा किताब दिला. इकडे धनाजी जाधवरावानें संताजी घोरपडे यास मदतीस घेऊन रायगडचा वेढा कमकुवत व्हावा म्हणून, बादशहाचे फौजेवर चोंहोंकडून छापे घालण्यास सुरुवात केली. ह्या छाप्यांचें वर्णन खाफीखानानें उत्कृष्ट दिलें आहे. त्याचाच उतारा श्री. सरदेसाई यांनीं मराठी रियासतीमध्यें* घेतलेला आहे, तोच येथें देत आहों. तें वर्णन असें आहे कीं -"संताजी घोरपडे आणि धनाजी जाधवराव हे दोन विशेष अनुभविक योद्धे मराठ्यांकडे प्रमुख होते. त्यांत प्रत्येकापाशीं १५।२० हजारांचा जमाव असे. इतर मराठे सरदार त्यांच्या तंत्रानें वागत, व येणेंकरून त्यांनीं बादशहाच्या फौजेचें फार नुकसान केलें. धनाजी जाधवरावानें मुलखाची नासाडी करून, मोंगल सरदारांस जेरीस आणिलें. त्यांच्यासमोर जो कोणी जाई तो मरण पावे; अगर त्यांच्या हातांत तरी सांपडे. एकादा कोणी निभावलाच तर तो कफल्लक होऊन परत येई. 'मी मी' म्हणणारे मुसलमान योद्धे त्यांजपुढें जाण्यास चळचळ कांपत. त्यांच्याशीं टिकाव धरणारा एकही योद्धा मोंगलापाशीं नव्हता. हें ऐकून औरंगजेबाची पांचावर धारण बसली." याप्रमाणें खाफीखानानें धनाजीचें वर्णन दिलें आहे. "रायगडचा वेढा उठेल म्हणून आपली फौज तयार करून आपण पायबंद लावावा." असें धनसिंग जाधवरावानें रामचंद्रपंत अमात्य यांच्या विचारानें ठरविलें व त्यानीं बाळजोशी संगमेश्वरकर यांचेकडून मुहूर्त आणवून मुख्य सरदार धनसिंग जाधवराव यांचे स्वाधीन सरदारपथकें होतीं तीं केलीं.—त्यांत संताजी घोरपडे यांचेंही पथक त्यांच्या स्वाधीन केलें. फौजेसुद्धां धनसिंगराव जाधवराव यांनीं मसलत करून ते श्रीमहादेवाकडे गेले. कारण बादशहाच्या फौजेची ओढ आपलेकडे पडावी, मैदान मुलखांत लढाई द्यावी, मराठी फौज आहे, असें बादशहास कळावें; म्हणोन मोंगलांचे सैन्यावर हल्ले सुरू केले. यानंतर बादशहास "मराठी फौज आली." असें संगमेश्वरीं समजल्यानंतर त्यानें रणमस्तखान व शाएस्तेखान यांस फौजेसुद्धां रवाना केलें. त्या समयीं जाधवराव यांस संताजी घोरपडे बोलले कीं, बादशहाची फौज एक दोन मुक्कामावर आहे. फलटणच्या आश्रयास आपण लढाई द्यावी. मी बादशहाच्या छावणीवर जाऊन तुळापुरीं छापा घालतों. मजबरोबर २००० हजार सडे एकांडे निवडक स्वार द्या. असें बोलल्यावरून जाधवराव "फार चांगलें; शाबास" असें बोलले, व घोरपड्याचें पथक व शिवाय आपल्या जवळील विश्वासाचे २ हजार निवडक एकांडे शूर स्वार आणि विठोजी चव्हाण यांस संताजी घोरपडे यांचे स्वाधीन केलें. इकडे धनसिंग जाधवराव यांनीं फलटणचे मैदानांत पातशहाच्या फौजेशीं मोठ्या मर्दुमकीनें पांच वेळां लढाया दिल्या. शाएस्तेखान व रणमस्तखान यांच्या पांच तोफा पाडाव केल्या व त्यांस नामोहरम केलें.

धनसिंग जाधवराव यांचा मुक्काम फलटणवर असतां, शाएस्तेखान याजकडे कांहीं मराठे सरदार होते. त्यांस सांगून धनसिंगराव यांचे फौजेवर छापा घालविला. तो संभाळून, त्याची तसनस करून, जाधवराव तोफा घेऊन आपल्या सलतनतेसुद्धां पन्हाळ्यास येऊन पोहोंचले. श्रावण मासाचा महिना, पाऊस बहुत, तरी किल्ल्याखालीं मोर्चेस येऊन मुक्काम करून राहिले. हें वर्तमान छत्रपतीस कळल्यावर जाधवराव यांस भेटून बहुमान वस्त्रें भूषणें देऊन त्यांस **जयसिंगराव** हा किताब दिला. मागें सांगितल्याप्रमाणें संताजी घोरपडे हे धनसिंग जाधवराव यांचे दोन हजार निवडक शूर स्वार बरोबर घेऊन बादशहाच्या छावणीवर तुळापूरचे मुक्कामीं आले. झाडींत छपून राहून मध्यरात्रीचे वेळीं बाहेर निघाले. तुळापूरच्या मार्गानें जातांना अलीकडे ३ कोसांवर बादशहाच्या छबिन्याच्या स्वारांची गांठ पडली. त्यांस त्यांनीं सांगितलें कीं, बादशहाचे लष्करांतील हिंदु सरदार शिरके व मोहिते वगैरे आहेत, त्यांजकडील छबिन्यास जातों, असें सांगितल्यावरून बादशहाच्या स्वारांनीं त्यांस बादशहाच्या लष्करांत जाऊं

* श्री० सरदेसाईकृत मराठी रियासत पृष्ठ ४६५.

दिलें; व खुद्द बादशहाच्या डेऱ्याचे तणावे तोडून, सोन्याचे कळस घेतले व बादशहाच्या छबिन्याच्या स्वारांत शिरून माघारीं पळून आले. त्यांस चव्हाण यांनीं पुष्कळ मदत केली. ते सर्व सिंहगडावर प्रतापराव गुजराचा मुलगा सिधोजी गुजर, याचे आश्रयाला येऊन राहिले.हा त्यांचा परक्रम पाहून छत्रपतीनीं संताजी घोरपडे यांस **ममल्कत-मदार**, बहीरजीस **हिंदुराव** मालोजीस **अमीर-उल्उम्मराव** व विठोजी चव्हाणास **हिंमतबहाद्दर** असे किताब दिले. अमात्य व घोरपडे यांचा सलोखा असल्यामुळें, त्यांनीं घोरपड्यास सेनापतीचीं वस्त्रें द्यावींत; असा आग्रह केला. परंतु महाराजांनीं सांगितलें कीं, आमचे मनांत धनसिंगराव जाधवराव यांस हें पद द्यावें असें आहे; व त्यांच्याच (धनसिंगरावांच्या) लोकांनीं मशारनिल्हे घोरपडे यास मदत केल्यावरून त्यास यश आलें. परंतु अमात्य यांचा फार आग्रह पडल्यावरून राज्याभिषेकाच्या वेळीं घोरपडे यांसच सेनापतीचीं वस्त्रें दिलीं.

याप्रमाणें धनसिंगराव जाधवरावांनीं अवर्णनीय असा पराक्रम केल्यानें औरंगजेब बादशहा यास मोठा विस्मय वाटला. "मराठी फौज बुडाली म्हणत होतों, परंतु कायम दिसते. पन्हाळ्यास राहून फौज जमवून आम्हांशीं लढाया देतात. तरी दुतर्फा यास पायबंद लावावा." म्हणोन ईतिखदखान, ज्यास झुलपिकारखान असा किताब दिला होता, त्याचेकडे मदतीकरितां फौज पाठविली, व कांहीं फौज पन्हाळ्यास वेढा घालण्याकरितां पाठविली. रायगडास झुलपिकारखानाचा वेढा पडला होताच. त्यानें वर सांगितल्याप्रमाणें सूर्याजी पिसाळाच्या मार्फत रायगड काबीज करून येसूबाईला कैद केलें. इकडे पन्हाळ्यास वेढा पडणार हें ऐकून तेथें राहणें ठीक नाहीं, असें राजाराम व इतर मंडळी यांस वाटून, सह्याद्रि पर्वतांतील बांधाऱ्याचे विकट जाग्यांचे किल्यांत जाऊन रहावें म्हणोन विशाळगड रांगणा प्रांतीं गेले. सर्व देशांत बादशहाच्या फौजा फिरूं लागल्या. त्यांनीं सर्व राज्य व्यापिलें. पन्हाळ्यास वेढा घालून, विशाळगड रांगण्याकडे फौजा धांवल्या. तेव्हां राजारामादिकांस बहुत विचार पडला. धनसिंग जाधवराव व रामचंद्र निळकंठ अमात्य यांनीं विचार केला कीं, चंदीस महाराजांसुद्धां सर्व लोकांनी सडे जावें. वेष बदलून गुप्तरुपानें येथून निघावें. याप्रमाणें मसलत ठरविली. रामचंद्रपंत अमात्य यांनीं संगमेश्वराहून वेदमूर्ती बाळजोशी यांस आणविलें. धनसिंगराव जाधवराव यांस मागें बादशहावर रवाना केलें व त्यांनीं फलटणच्या मैदानांत यश मिळविलें, त्यावेळीं बाळजोशी यांनींच मुहूर्त काढून दिला होता. त्यांस पुन्हां आणवून चंदीस जाण्याचा मुहूर्त काढिला. कबिले (जनानखाना) रामचंद्रपंत अमात्य यांच्या स्वाधीन करून त्यांच्या मदतीस संभाजी घोरपडे त्रिवर्ग बंधु व विठोजी चव्हाण हे त्यांचे सनतनत सुद्धां ठेविले; व बरोबर धनाजी जाधवराव, खंडेराव दाभाडे, गाइकवाड बंकी, प्रल्हाद निराजी, खंडोबल्लाळ चिटणीस, व पारसनीस वगैरे मंडळी घेऊन चंदीस जाण्यास निघाले. जातांना महाराजांसुद्धां सर्व जंगम लिंगाईत कापडी यांचे वेष घेऊन चालते झाले, व इकडील प्रांताचा बंदोबस्त रामचंद्रपंत व संताजी घोरपडे यांस सांगितला. निळोपंत पिंगळे व हरजी महाडीक यांस महाराज यांनीं पूर्वीच चंदीस पाठविलें होतें. त्यांस इकडून निघाल्याचें वर्तमान कळवून तुम्हीं फौजा जमवून जेथत खबरदारीनें राहून चंदी किल्ला संरक्षण करावा, म्हणून लिहिलें. ही सर्व मंडळी गोकर्णावरून, सोंद्यावरून, श्रीव्यंकटेशावरून जाऊन बेंगरुळापर्यंत पोहोंचली. सर्वांनीं गळयांत लिंगें घालून लिंगाइतांचीं सोंगें घेतलीं होतीं. ते बेंगरुळास जाऊन एका धर्मशाळेंत उतरले. ही सगळी मंडळी निरनिराळ्या रस्त्यांनीं निघाली होती. बेंगरूळ मुक्कामीं महाराज पाय धूत असतांना एक सेवक पायावर पाणी घालीत होता, व दुसरा सेवक पाय धूत होता. हें तेथील लोकांनीं पाहिल्यावर कानडी भाषेंत 'हा कोणी मातबर मनुष्य आहे' अशी ते चर्चा करूं लागले. ही गोष्ट महाराजांच्या लोकांपैकीं कोणी कानडी जाणत होता. त्यानें ऐकिली. तेव्हां महाराजांचे सर्व लोक घाबरून—"आतां कसें करावें? परिणाम ठीक नाहीं" असें म्हणूं लागले. कारण तेथें औरंगजेब बादशहाचें ठाणें बसलेलें होतें. त्यांस हे कानडी लोक जाऊन सांगतील व आपल्यास धरणें येईल, तेव्हां धनाजी जाधवराव व खंडो बल्लाळ चिटणीस यांनीं महाराजांस धीर देऊन, घाबरूं नये म्हणून सांगितलें. महाराज, जाधवराव, व दाभाडे यांनीं एका मार्गानें

आतां निघून जावें, व प्रल्हाद निराजी यानें राहिलेल्या सर्वांस घेऊन दुसरे मार्गानें जावें, व खंडो बल्लाळ चिटणीस यांनीं २।४ असामी घेऊन येथेंच रहावें, असें ठरलें. याप्रमाणें दोन फळ्या दोहींकडे निघून गेल्या व चिटणीस ५।४ माणसांनिशीं तेथेंच राहिले. इतक्यांत कोटांत मुसलमानांना वरील वर्तमान कळल्यावरून तेथें त्यांस धरणें आलें. तेव्हां आम्ही कापडी यात्रेकरू आहोंत, असें चिटणीसानें सांगितलें. परंतु त्यांस धरून बेदम मार दिला. बाकीच्या लोकांचे पुष्कळ हाल केले. दुसरे लोक कोठें आहेत ? असें विचारतां पुष्कळ यात्रेकरू होते, कोणीकडे निघून गेले, माहीत नाहीं. असें त्यांनीं सांगितलें. या लोकांस चिटणिसासुद्धां ३।४ दिवस कैदेंत ठेविलें. त्यांनीं उपोषणें केलीं. त्याजवरून मुसलमानांची खात्री होऊन, त्यांस सोडून दिलें. इकडे महाराज चंदीनजीक सर्व लोकांनिशीं जाऊन पोहोंचले, व वाटेंत नेमिल्या स्थळीं चिटणीस, प्रल्हाद निराजीच्या फळीस भेटून तेही सर्व महाराजांस येऊन मिळाले. हें वर्तमान हणमंते व महाडिक यांस कळल्यावरून ते फौजेसहित सामोरे येऊन महाराजांस सर्वांसहित घेऊन गेले. वाटेनें जाधवराव यांनीं अतिशय श्रम व साहस करून सुखरूप आणून पोंचविल्याबद्दल महाराजांनीं त्यांचा अतिशय गौरव केला. पुढें धनाजी जाधवरावांनीं मोठा जमाव करून, कर्नाटक प्रांतीं बादशहाचे फौजेवर हल्ले करण्यास पूर्ववत् सुरुवात केली. हें बादशहास कळल्यावरून, राजाराम तिकडे जाऊन पुन्हा फौजनशिन झाला व स्वाऱ्या करूं लागला, असें पाहून बादशहानें झुलपिकारखान यास चंदी घेण्याकरितां पाठविलें. बरोबर सरदार दाऊदखान व किलीजखान होते. दक्षिणेंत रामचंद्रपंतावर फिरोजजंग गाजीउद्दीनखान यास पाठविलें. हा प्रसिद्ध निजाम-उल्मुल्क हैद्राबादचा नवाब, याचा बाप होय. यावेळीं राजाराम महाराज यांनीं सुमुहूर्तें मंचकारोहण करून ते आपले नांवें राजमुद्रा करून राज्य चालविते झाले. व धनसिंग जाधवराव बहुतच कर्ते निघाले. त्यांचे ठाईं बहुत विश्वास. सबब अष्टप्रधानांतील सरकारकून प्रीतिनिधि हें पद प्रल्हादपंतास दिलें व धनसिंग जाधवराव यांनीं चंदीस येतांना मार्गांत बहुत मेहेनत केली, चंदी प्रांतीं बादशहाकडील फौज आली असतां, आपली फौज घेऊन जाऊन मोठा पराक्रम केला, म्हणून महाराजांनीं त्यांची बहुत नांवाजणी करून, 'जयसिंगराव' हा किताब पूर्वीं पन्हाळीं मुक्कामीं दिला होता, त्याचे जोडीस हल्लीं सेनापतीप्रमाणें सन्मान व साहेबनौबतसुद्धां देऊन त्यांस गौरविलें. महादजीनाईक पानसंबळ यास सेनापति पद दिलेलें होतें परंतु त्यांच्या वृद्धावस्थेमुळें त्यांस ती कामगिरी झेंपेना; शिवाय नुक्तेंच महाराष्ट्रामधून त्यांच्या मृत्यूचें वर्तमान समजलें होतें म्हणून संताजी घोरपडे यांस सेनापति हें पद व खंडेराव दाभाडे यांस 'सेनाधुरंधर' असें पद दिलें. सिधोजीराव निंबाळकर यांस 'सर लष्कर हें पद दिलें परसोजी भोंसले यांस 'सेनासाहेब सुभा' हें पद दिलें. याप्रमाणें अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या, व महाराज चंदी हा किल्ला राजधानी करून राज्य करूं लागले. धनाजी जाधवराव यांनीं कर्नाटकामध्यें मुसलमानांवर शेंकडों स्वाऱ्या करून मुसलमानांचा अगदीं उच्छेद करून टाकिला. इकडे रामचंद्रपंत रांगण्यास असतांना त्यांजवर फिरोजजंग गाजीउद्दीनखान यानें रांगण्यांतील विशाळगडावर वेढा दिला. तेथें राहून निभाव लागत नाहीं, असें पाहून रामचंद्रपंत व परशुरामपंत बाहेर पडले, त्यामुळें मोठी मातबर लढाई होऊन शेंकडों मराठे धारातीर्थीं पडले. ७०० स्त्रिया सती गेल्या. ही बातमी धनाजी जाधवराव यांस कळतांच कर्नाटकांत राजाराम महाराजांची सुव्यवस्था करून, ते व संताजी घोरपडे रामचंद्रपंताचे मदतीस आले. दोन्ही सरदार आल्यावर रामचंद्रपंताच्या लोकांना मोठा धीर आला, धनसिंग जाधवराव व संताजी या दोघांनीं वांईचे मोंगल सरदारास पकडून तेथें आपलें ठाणें बसविलें. व शंकराजी नारायण यास तेथील ठाणेदार नेमिलें. पुढें धनाजी जाधवराव व संताजी हे दोघे आपल्या फौजा घेऊन चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याकरितां प्रांतोप्रांत फिरूं लागले. तेव्हांपासून घासदाणा म्हणून तिसरा एक कर घेण्याचा परिपाठ पडला. धनाजी जाधवराव यांनीं पन्हाळा किल्ला, विलक्षण पराक्रम करून घेतला व संताजीनें मिरजेवर छापा घालून वांईप्रमाणें तोही प्रांत हस्तगत करून घेतला. त्या प्रांताची देशमुखी रामचंद्रपंतांनीं संताजीस दिली. याप्रमाणें महाराष्ट्रांतील ठिकाणें हळू हळू धनाजी जाधवराव व

संताजी घोरपडे यांनीं आपल्या ताब्यांत घेतली. यामुळें बादशहास दक्षिणेंतील लढाई बंद करून आपला मोर्चा जिंजी किल्ल्याकडे फिरविणें भाग आलें. कारण राजाराम महाराजांस पकडल्याशिवाय मराठे हटत नाहींत, असें त्यास वाटलें व कर्नाटकांत सर्व फौज रवाना केली. हें धनसिंग जाधवरावांस कळतांच, ते व संताजी आपल्या फौजा घेऊन कर्नाटकाकडे धांवले. ह्या दोघांचा उद्देश असा होता कीं, मोंगलांची फौज कर्नाटकांत जिंजी किल्ल्याजवळ पोहोंचू द्यावयाची नाहीं. जिंजीचा (चंदीचा) वेढा सन १६९१ ते १६९८ पर्यंत चालू होता. या सात वर्षांमध्यें धनाजी जाधवराव व संताजी या दोघांनीं अनेक युद्धें करून बादशहाच्या फौजेला अगदीं 'त्राही भगवान्' करून पिटाळून सोडून दिलें. बागलाण, गुजराथ, गोंडवण, गंगातीर, स्वदेश, कर्नाटक, जिंजी वगैरे देश, दुर्ग व ठाणीं या सात वर्षांत त्यांनीं काबीज केलीं. बादशहास वाटलें कीं, मराठी फौज कांहीं सहज मोडत नाहीं, म्हणून तो कर्नाटकांत वरचेवर फौजा पाठवूं लागला. त्यांजवर वारंवार या दोघांचे हल्ले चालू होते. मोंगलांनीं ठाणीं घ्यावीं, तीं त्यांनीं उठवावीं; व तेथें आपला अंमल बसवावा. आपल्यावर सैन्य आलें म्हणजे पळून जावें. पुन्हां येऊन छापा घालावा, रात्रीं वेरडाकडून मोंगलांचे घोडे चोरून न्यावेत. मराठे लोकांनीं प्राण तृणप्राय करून देखील राज्य रक्षावें, हें सर्वांचे मनोगत. अकस्मात् येऊन "बक मच्छ उचलून नेतो," तसा घाला घालावा. शिपायगिरीची शर्थ करावी. खाण्यापिण्याची दरकार बाळगूं नये. पाऊस, ऊन, थंडी व अंधारी कांहीं न पाहतां घोड्यावर हरभरे, कांदे, चटणी, भाकरी खाऊन दिवस काढावे. मोंगलांनीं पाहिलें कीं, एका मुलखांत त्यांच्यावर स्वारी करावी, तर ते पिशाच्चासारखे नाहींसे होऊन दुसरीकडे जाऊन ठाणीं घेतात; मुलूख मारितात. "हे आदमी नव्हत; भूतखाना आहे" असे उद्गार मोंगलांस काढावयास लावण्याइतकी धनाजी जाधवराव व संताजी यांनीं बादशहाची या सात वर्षांत त्रेधा उडवून दिली. "आतां काय करावें?" असें बादशहास झालें. तेव्हां बादशहानें सन १६९५ त आपला तळ भीमेच्या कांठीं बऱ्हाणपूर येथें नेला. झुलपिकारखान याच्यानें जिंजीचा वेढा उठवेना. तेव्हां बादशहानें शेवटीं आपला पुत्र कामबक्ष व वजीर आसदखान ह्यांस झुलपिकारखानाचे मदतीस जिंजीस पाठविलें.

धनाजी व संताजी यांनीं सैन्यावर वारंवार छापे घातल्यामुळें, फार त्रास भोगून कामबक्ष फौजेसह एकदांचा जिंजीस आला. पण त्यामुळें झुलपिकारखानास वाईट वाटलें. इकडे धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे हे आपले बरोबर मोठी फौज घेऊन सन १६९६ चे सुमारास बादशहाच्या छावणीचे धोरणानें साताऱ्याहून थेट जिंजीकडे गेले. धनाजी जाधवराव हे आपली थोडीशी फौज घेऊन झपाट्यानें पुढें गेले. जिंजीला वेढा घालणाऱ्या फौजेस दहशत बसविण्याकरितां जिंजीच्या शेजारीं हल्ले करून मोंगलांचीं ठाणीं घेतलीं. मोंगलांच्या सैन्याचे कांहीं लहान लहान भाग व दोन मोठे भाग करून उजवे व डावे बाजूवर हल्ले करण्याचा हुकूम झाला. परंतु धनाजीचे घोडेस्वार त्यावेळीं विजेसारखे चमकणारे असल्यामुळें, त्यांच्या सहाय्यानिशीं त्यानें मोंगलांचे सैन्यावर हल्ला करून, त्यांची मोठी कत्तल केली.

*संताजी घोरपडे कुवरपाक येथें आल्यावर अलीमर्दनखान नांवाचा फौजदार त्यास आडवा झाला.

---

* Suntajee Ghorepuray, with less haste, brought on the main body of Mahrattas. Upon his arrival on Covrapauk, he was opposed by the foujdar, Ali Murdan Khan, with a considerable army; but the foujdar was speedily routed, the whole of his baggage and camp—equipage plundered, and he himself, on his flight towards the camp at Ginjee, was overtaken, made prisoner, and released for a high ransom.

The victorious Mahrattas, with their usual activity when successful, beat in the Moghul outposts in every direction, destroyed their foragers, and so completely cutoff their communications that neither supplies nor intelligence could reach them. Reports of the Emperor's illness and death were industriously circulated by the Mahrattas, who then made overtures to Kaum Bakhsh and proposed to make him emperor. The prince either listened to their proposals, or

त्याजवर हल्ला करून, धरून आणून, त्याच्या सामानाची लूट केली व त्याजकडून खंडणी घेऊन त्यास सोडून दिलें. याप्रमाणें या दोघांनीं आपले विजयी सैन्यांसह मोंगलांवर चहूं बाजूंनीं हल्ले केले; व ते चोहोंकडून त्यांचीं ठाणीं घेऊं लागले. मोंगलांस त्यांनीं इतकें सताविलें कीं, महाराष्ट्रांतील खवर जिंजीस व जिंजीची खबर महाराष्ट्रास पोहोंचूं देईनात, त्यामुळें झुलपिकारखान कंटाळून जिंजी सोडून अर्काटकडे निघून गेला.

पुन्हां दुडेरी येथें संताजी व धनाजी जाधवराव ह्या दोघांची कासमखान या मुसलमान सरदाराशीं लढाई झाली. हा कासमखान कर्नाटकाचा मुख्य सुभेदार होता. कासमखानाची फौज अघाडीस होती. तिजवर धनाजीच्या फौजेनें हल्ला करून ती लुटून फस्त केली. त्यामुळें रागानें स्वतः कासमखान मराठ्यांवर आला. पण मराठ्यांनीं चहूंबाजूंनीं त्यास घेरून जेर करून टाकिलें. ही लढाई ३ दिवसपर्यंत निकरानें चालली होती. शेवटीं कासमखानाचा नाइलाज होऊन त्याच्या लोकांस घांसदाणा व अन्नही मिळेनासें झालें. तेव्हां तो दुडेरीच्या गढीच्या आश्रयानें लढूं लागला. तीही गढी धनाजी व संताजी यांनीं घेतली. त्यामुळें तो आंत कोंडून राहिला. मराठ्यांच्या हातांत त्याचीं उंटें, जनावरें वगैरे सर्व पडलीं. चौथ्या दिवशीं मराठ्यांस समजलें कीं, हिंमतखान नांवाचा सरदार कासमच्या मदतीस येत आहे. तेव्हां त्याजवर निम्मी फौज घेऊन संताजी गेला. परंतु हिंमतखानाची गांठ न पडल्यामुळें पुन्हां दुडेरीस आला. कासमखान अगदीं निराश झाला होता. यावेळीं गढी रिकामी होती. तें पाहून कासमखान रात्रीं गुप्त रीतीनें रुहुल्लाखान, सफ्शिकनखान, मुरादखान व आणखी पुष्कळ मोटमोठे सरदार यांसह आंत शिरला. त्यामुळें मराठ्यांचा वेढा त्यांस जास्तच दुःसह झाला. घोडे फाडून खाण्याची वेळ आली. तटावरून उड्या मारून मराठ्यांशीं त्यांनीं जीवदान मागितलें. याप्रमाणें कासमखानाचा लढाईंत पराभव होऊन, छावणींत रोग, दाण्यापाण्याची दुर्मिळता, यांच्या योगानें सर्वांस मरणप्राय दुःख होऊं लागलें. कासमखानानें राग व निराशा यांमुळें व्याकुल होऊन आत्महत्त्या केली. राहुल्लाखान व दुसरे सरदार मराठ्यांच्या स्वाधीन झाले. त्यांची सर्व मालमत्ता मराठ्यांनीं आपल्या ताब्यांत घेतली व सात लाख रुपये दंड ठरवून सर्व सरदार सोडून दिले. या एकंदर संग्रामांत ५०।६० लाखपर्यंत मराठ्यांस मिळकत मिळाली.

याप्रमाणें धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे हे दोघे विजयी योद्धे आपल्या सैन्यांसह परत जात असतां, हिंमतखान त्यांस भेटला. तेव्हां लागलीच धनाजीनें व संताजीनें दोन टोळ्या करून त्याच्याशीं सामना दिला. व हिंमतखानही त्यांच्याशीं हिंमतीनें लढला. मराठ्यांची एक टोळी झाडींत पळून गेली. व हिंमतखान दुसरीवर चालून गेला. कित्येक लोक झाडांवर बसून राहिले. हिंमतखान झाडींत शिरला, तों एक गोळी सूं सूं करीत त्याच्या कपाळांत लागून तो ठार झाला, व मराठ्यांच्या सैन्यांनीं हिंमतखानाचें सर्व सैन्य लुटलें.

धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांनीं पुन्हां आपला मोर्चा जिंजीचा वेढा उठविण्याकरितां फिरविला. तो वेढा अद्यापपर्यंत राजपुत्र कामवक्ष व असदखानानें चालविला होता. त्यांच्या पाठीवर पुन्हां संताजी घोरपडे व धनाजी जाधवराव गेले. धनाजी जाधवराव आले, असें समजतांच मोंगल सरदार वेढा उठवून पळूं लागले. त्यावेळीं राजपुत्र कामवक्ष वेढ्यांत होता. त्याला कैद केल्यानंतर तर जिकडे तिकडे एकच गोंधळ उडून गेला. त्याची फौज मराठ्यांवर जाईना. मराठ्यांनीं मोंगलांस एकदम घेरलें. दलपत बुंदेल्याचे शिकस्तीनें यावेळीं झुलपिकारखानास थोडें तरी धान्य आणावयास सांपडलें, परंतु तें फार दिवस

at all events Assud Khan and his son affected to believe that he did, and they determined on placing him under restraint. The Mahrattas, apprized of what was going forward, taking advantage of the bustle and dissension which the circumstance naturally created in the Moghul camp, attacked and harrassed them with additional vigour. The personal troops of Kaum Bukhsh refused to fight; all became alarm and uproar; at last the Moghuls burst their cannon, abandoned their batteries, and were in turn besieged in their lines.

G. D. History Pages 323—24.

टिकलें नाहीं. पुन्हां दुष्काळ पडला, तेव्हां " मोंगल शिपायांनीं, मराठ्यांशीं तह करावा; न केल्यास आम्हीं सोडून जाऊं " अशी मोंगल सरदारांस धमकी दिली. बुंदेल्यानें त्यांची पुष्कळ विनवणी केली; पण ते ऐकेनात. तेव्हां आसदखानानें तहाचें बोलणें लाविलें. धनाजी जाधवराव आणि संताजी यांनीं खानाशीं तात्पुरता तह करून, मोंगलांनीं वांदिवाश येथें निघून जाण्याचें ठरविलें, व एकदांचा जिंजीचा वेढा उठला. यामुळें बादशहास राग येऊन त्यानें पुन्हां झुलपिकारखानास नेटानें जिंजीस वेढा देण्यास सांगितलें. यावेळीं मराठ्यांची चांगली सरशी झालेली होती. आणि जर संताजी घोरपड्याचें झुलपिकारखानाशीं आंतून सूत नसतें, तर यावेळीं धनाजी जाधवराबानें सर्व मोंगलांचा नाश करून टाकिला असता. संताजी घोरपडे आंतून शत्रूशीं सामील आहेत, असें राजाराम महाराजांच्या नजरेस आलें. मल्हारराव रामराव चिटणीस यांनीं थोरले राजाराम महाराज यांचे बखरींत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर दिला आहे. " संताजी घोरपडे तिघे बंधु अमात्याच्या आज्ञेंत असावे, अशी छत्रपतींची आज्ञा असतां, पन्हाळ्याचे वेळेस उपयोगी पडले नाहीत. व हुकूमांत चालत नाहींत. सोंडूर प्रांतीं झाडींत राहून, गुत्तीचा किल्ला घेऊन व कांहीं प्रांत व ठाणीं घेऊन तिकडेच राहिले. याविषयीं अमात्य यांनीं सांगून पाठविलें. घोरपडे न ऐकत म्हणून चंदीस हुजूर सविस्तर विनंति लिहीली. त्याजवरून महाराजांची गैरमर्जी होऊन महादजीराव पानसंबळ याशीं शके १६१२ त सेनापतीचें पद देऊन संताजीकडील पदाधिकार दूर केला. म्हणून पंतास लिहून, संताजी घोरपडे यांजकडे भक्ताजी व बहिर्जी हुजरे पाठवून शिक्के कट्यार घेऊन रामचंद्रपंत यांचे स्वाधीन केले. त्याजवरून संताजी घोरपडे, पंताकडे आले. तुम्ही आमचे भेटीस येऊं नये. जाधवराव यांसी सेनापती पद देत असतां, आम्हींच तुम्हांस देवविलें. त्याचे तुम्हीं उत्तीर्ण जाहलां. महाराजांकडे हुजूर जावें. याजवरून घोरपडे महिना १५ दिवस राहून, पंतांचे भेटीचा प्रयत्न बहुत केला. परंतु पंत कांहीं भेट घेत नाहींत. सबब महाराजांकडे चंदीस निघून गेले. तेथें राहून मर्जी संपादण्याबद्दल सर्वत्रांबरोबर चाकरी करणें ती शर्तीची करूं लागले." "त्याच संधींत चंदीकडे बादशहाची फौज गेली. त्याचे तोंडावर धनाजी जाधवराव [ जयसिंगराव ] यांस, संताजी घोरपडे बरोबर देऊन मोंगलांवर पाठविलें यांची त्यांची लढाई होऊन, बादशहाच्या फौजेचा मोड जाहला. महाराजांची संताजींवर पुन्हां मेहेरबानी जाहली. पुढें एके दिवशीं संताजी घोरपडे यांनीं कांहीं कारण करून चंदींत महाराजांकडील लोकांशीं खटला करून झुंजले, अमर्यादा केली, यावरून माने सरदार पाठविले; व हल्ला करविला. तेव्हां सरदार लोक यांनीं बहुत रदबदली करून मातबर माणूस चाकरीवर मारावें म्हणून रहाविलें. इतराजी जाहली. सेनापती पद धनाजी जाधवराव यांस दिलें. अशीं दोन तीन वर्षें कारकीर्द जाहली. पुढें झुलपिकारखानाशीं संधान बांधून राजाराम महाराज जिंजीच्या किल्ल्यांतून गुप्त रीतीनें झाडीमध्यें धनाजी जाधवराव यांचें सैन्य तयार होतें, त्यांत संकेताप्रमाणें जाऊन मिळाले, व धनसिंग जाधवराव सेनापती यांनीं महाराजांस सुरक्षित महाराष्ट्रांत आणिलें. इकडे संताजी घोरपडे एकटाच पळत असतां म्हसवड येथें आला. तेथें नागोजी माने याची स्त्री राधाबाई, अमृतराव निंबाळकर यांची कन्या ही होती. घोरपड्याचें व अमृतराव यांचें वांकडें. त्यावरून नागोजी माने म्हसवडकर यांचें व संताजीचें खाजगी वैर होतें. म्हणून त्यानें संताजीचा पाठलाग फारच शोधकपणें चालविला, तो म्हसवड येथें एका ओढ्यावर स्नानासाठीं उतरलेला पाहून, नागोजी यानें त्यास गांठून ठार मारिलें; व त्याचें डोकें बादशहाकडे पाठविलें. येणेंप्रमाणें त्याचा खून जाहला."

खाफीखान असें लिहितो कीं,—"संताजी व धनाजी यांचा तंटा लागून धनाजीच्या फौजेनें व बादशहाचा मोंगल सरदार फिरोजजंग यानें मिळून संताजीवर हल्ला केला." परंतु संताजीचें व धनाजीचें खाजगी वांकडें मुळींच नव्हतें. राजाराम महाराज यांच्यांशी तो निमकहराम झाल्यावरून त्यांनीं त्यास हांकून दिलें.* त्यांत धनाजीचें अंग मुळींच नव्हतें, असें श्री०

* वरील चिटणीसांच्या बखरीमधील उतारा वाचल्यावर, संताजीच्या मृत्यूस कारणीभूत म्हणून, धनाजी जाधवरावावर श्री. सरदेसाई यांनीं जो आरोप केला आहे त्याचें निरसन होण्यासारखें आहे. शिवाय

शंभुसिंगजी यांच्या दप्तरच्या कागदपत्रांवरून दिसतें. व चिटणीसांची बखरही असेंच सांगते. संताजींचें व म्हसवडच्या मान्यांचें मात्र वांकडें होतें. त्यावरून त्या मान्यानें त्यांना ठार मारलें. असो. धनसिंग जाधवराव यांचा जोडीदार संताजी घोरपडे यांचा याप्रमाणें शोचनीय अंत झाला,व धनसिंग जाधवरावांस सेनापती-पद कायमचें मिळालें. राजाराम महाराज दक्षिणप्रांतीं आल्यावर त्यांनीं सातारा हें आपलें राजधानीचें शहर करून कर्नाटकांत धनाजी जाधवराव सेनापती यांस तेथील मराठ्यांचे प्रदेश सांभाळण्याकरितां ठेविलें होतें याप्रमाणें सातारा येथें राज्यस्थापना करून मोंगलांशीं लढण्यासाठीं राजाराम महाराज बाहेर पडले. या वेळे-पर्यंत आपला बचाव करून मराठे लढत असत. परंतु आतां मोंगलांचें पाणी धनसिंग जाधवराव यांनीं चांगलें ओळखिल्यामुळें ते उघडपणें मोंगलांशीं सामने देऊं लागले. राजाराम महाराज व धनसिंग जाधवराव यांनीं सन १६९९ चे सुमारास शाहू महाराजांस सोड-विण्याकरितां बादशहाच्या छावणीवर हल्ला केला. परंतु त्यावेळीं बादशहा व शाहू, बेगमीच्या गोटांत गेले असल्यामुळें, ते निभावले. पुढें चौथाई, सरदेशमुखी व घासदाणा या बाबींचा वसूल करीत राजाराम महाराज व धनसिंगराव सेनापती देशांत फिरूं लागले. गंगथडी, नांदेड, खानदेश, वऱ्हाड या प्रांतांवर निरनिराळे मराठे सरदार नेमून, ते परत येतांना जालना शहर लुटीत असतां,मोंगल फौज राजाराम महाराजांवर आली. त्याची बातमी पूर्वी मराठ्यांस नसल्यामुळें, ते घाईघाईनें पळून येत असतां, रस्त्यांत राजाराम महाराजांना नवज्वराचा आजार झाला. ते सिंहगडास येऊन पोहोंचले, पण तेथें आल्यावर छातींत विकार होऊन महाराजांस रक्ताच्या उलट्या होऊं लागल्या. शेवटीं सन १७०० च्या मार्च महिन्यांत ते कैलासवासी झाले. याप्रमाणें राजाराम महाराजांचा शेवट झाला.

राजाराम महाराज चंदीहून परत आल्यावर, धन-सिंग जाधवराव सेनापती, यांनी चंदी मुक्कामीं मोठा पराक्रम करून चंदीचा वेढा उठविला, याजबद्दल महा-राजांनीं त्यांस दोन गांवें इनाम करून दिलीं. त्याची सनद श्री० शंभुसिंगजी यांचे दप्तरीं आहे. तिचा उतारा खालीं लिहिल्याप्रमाणेंः—

श्री.

राजश्री बाबाजी नारायण सुभेदार व कारकून
सुभा व वर्तमान व भावी
सातारा गोसावी यांस.

छ अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य

सेवक शंकराजी नारायण सचीव नमस्कार. सुरुसन सावान आर्बा तिसेन अलफ राजश्री धनाजी जाधवराव हे कलुऱ्या चंदीस जाऊन चंदीस वेढा पडला होता तेथें गनीमासीं गांठीं घालून चौकी मारिली. चौकीस इस्माईल म० होता, तो मारून गर्देस मेळवून, दस्त करून, राजश्री छत्रपती स्वामी पाशीं नेला. बास्तव राजश्री छत्रपति स्वामी बहुत संतोष पावले. आणि मशारनिल्हेवरी कृपाळू होऊन प्रांत मजकूर सुभा सातारा तरफेस दोनी गांव इनाम दिले. बी० देह, त० मौजे पाडळी तर्फ मजकूर, मौजे बोरगांव तर्फ मजकूर एकूण देह दोन्हीं दिले असेत याचे पत्र राजश्री छत्रपती स्वामींचें छ १ रजब सलसकस कलुऱ्या असे, त्याप्रमाणें सदहू दोन्हीं गांव कुलबाब, कुलकानू, हल्लीं पटीपासोडी, व पेस्तरपट्टी खेरीज इनामी हक्क कराकरून इनाम दिला असेल तर गांव मजकूरचे दुमाल करणे. हे वृत्ती यांस, यांचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेनें चालविणें. वर्षी प्रतिवर्षीं नूतनपत्राची अपेक्षा न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन, मुख्य पत्र मजकूर निल्हेपाशीं पर-तोन देणें, छ १३ जिलकाद ७ देशस समक्ष

मोर्तब

बार सुरुसुध्र बार

---

संताजीच्या मृत्यूनंतर धनाजी जाधवरावांस सेनापती पद मिळालेलें नसून तें त्यापूर्वीच मिळालें होतें व तें फक्त संताजीच्या मृत्यूनें कायमचें झालें. धनाजीस, संताजीचा द्वेष करण्याचें हेंच कारण काय? परंतु श्रीयुत सरदेसाई यांनीं मराठी रियासतीमध्यें धनाजी जाधवरावावर जे आरोप केले आहेत ते धनाजी जाधवरावांच्या पूर्वीच्या व यानंतरच्या कारकीर्दीचा पडताळा पाहतां तेंच कारण असेल असें संभवत नाहीं.

या प्रमाणें चंदीहून महाराज परत आल्यावर, धनसिंग जाधव सेनापती, यांनीं केलेल्या उपकाराबद्दल त्यांजवर फार संतुष्ट होऊन दोन गांवें महाराजांनीं इनाम करून दिलीं. त्याजबद्दलच्या सनदेची नक्कल वर दिली आहे. त्याचप्रमाणें धनाजी जाधवराव यांनीं पिराजी वीन चंडोजी व नरसोजी वीन जयताजी व महादजी वीन अवाजी यादव देशमुख परगणें व तर्फ उंब्रज व तारगांव परगणें मजकूर याजकडोन ५ गांवचें देशमुखी वतन २७०० रुपयास खरेदी घेतलें. त्याजबदल दुमाल पत्र करून घेण्याकरितां राजाराम महाराज यांजकडे धनाजी जाधवरावानें विनंती केली. त्याप्रमाणें महाराजांनीं १००० रुपये नजराणा घेऊन ५ गांवचे देशमुखीचे वतनाबदल दुमालपत्र करून दिलें. त्याचा उतारा खालीं लिहिल्याप्रमाणें दिला आहे.

श्री

स्वस्तीश्री राज्याभिषेक शके २५ बहुधान्य नाम संवत्सरे अश्विनशुद्ध त्रयोदशी भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस, श्री राजाराम छत्रपती यांणीं

तिमाजी यमाजी देशाधिकारी व + + क वर्तमान व भावी सुभाप्रांत सातारा.

यांस आज्ञा केली ऐसीजे. धनाजी वीन संभाजी जाधवराऊ यांणीं, हुजूर स्वामी समीप येऊन विदित केलें कीं, पिराजी वीन चंडोजी व नरसोजी वीन जयताजी व महादजी वीन आबाजी यादव देशमुख. परगणें व तर्फ उंब्रज व तारगांव परगणें मजकूर यांणीं आपले आत्मसंतोषें तर्फ उंब्रजपैकीं आपणास देशमुखी देह दिले आहेत.

१ मौजे नागठाणें १ मौजे अतीत १ मौजे इंदोली १ कसबे पालीदेह १ मौजे हिंगनोळे.

येणें प्रमाणें पांच गांव दिल्हे आहेत. त्यांस अक्षरीं रुपये २७०० सत्तावीसशें दिल्हे, आणि त्याजबद्दल पत्र येविशीं घेतलें आहे कीं, सदरहू गांवींचा सदर्हू पैका घेऊन देशमुखी दिली आहे. तर शफत पूर्वक सिकी सह्यानिशीं पत्र आपणास दिलें आहे. त्याप्रमाणें सदर्हू गांवची देशमुखी अनुभवीत आहों. तरी हुजूरून पत्र करून दिल्हें पाहिजे. म्हणून राजश्री रामचंद्र पंडीत आमात्यासी विदीत केलें. त्यावरून त्यांहीं मनास आणतां सदर्हू पांचगांवा जी देशमुखी आलबस करून, आपणापासून सूर्णी रुपये १ ---- हजार घेऊन आपले पत्र करून दिल्हें आहे. त्याप्रमाणें आपण वतनाचा उपभोग करीत जावा. तरी स्वामींनें आपली सनद करून उत्तरोत्तर चालविणें. अशी आज्ञा करविली पाहिजे. म्हणून याणीं विस्तारें विदीत केलें. त्यावरून मनास आणितां पिराजी वीन चंडोजी व नरसोजी वीन जयताजी व महादजी वीन आवाजी यादव देशमुख पाटील + + यांहीं मशारनिल्हेपासून रुपये सत्ताविसशें घेऊन, सदर्हू पांच गांवची देशमुखी आपले संतोषें दिली आहे. त्याप्रमाणें राजश्री रामचंद्र पंडीत असात्य हेहीं करार करून आजपासून सूर्णी रुपये एक हजार रास घेऊन आहेत. त्याप्रमाणें यावरी स्वामी कृपाळू होऊन सूर्णीची वेरीज सदर्हू एक हजार रुपये रास करार करून, सदर्हू पांच गांवीं जी देशमुखी करार केली असे. यास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेस चालवित जाणें. सदर्हू वतनास इलाजीमा व इनाम सालाबाद भोगवटा चालत असेल. त्याप्रमाणें चालविणें. साल दरसाल नवीन पत्राचा आक्षेप प्रतिवर्षीं करीत न जाणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र त्यांतून भोगवटी यांस मजकूरनिल्हे जवळी देणें. जाणिजे. लेखनालंकार. ( मोर्तब. )

रुजू.

याशिवाय धनाजी जाधवरावांनीं पिराजी बीन चंडोजी, पदाजी वीन आबाजी व गिरजोजी वीन मुधोजी यादव देशमुख परगणे कऱ्हाड यांजकडोन. पुढें राजाराम महाराज वारल्यानंतर १३८ गांवची देशमुखी खरेदी करून घेतली, त्याबद्दल सरकारांत नजराणा ५००० रुपये भरून देशमुखीबद्दल कबुलायत करून त्यावेळचे सरकारांतून धेतली. त्याबद्दलची अस्सल कबुलायत श्री. शंभुसिंगजी यांचे दप्तरी आहे. तिची नक्कल:—

दरबंदगी महाराजराजे

साहेबांचे शेवेशीः—

दरबंदगी बेशमे पिराजी बीन चंडोजी व पदाजी बीन आबाजी यादव व गिरजोजी बीन मुधोजी यादव व धनाजी संभाजी यादव देशमुख. परगणे कऱ्हाड. सुरुसन, इहिदे मया अलफ-

कर्णा साहेबांचे बंदगीस लिहून दिला कबूल कतबा ऐसाजेः—अर्जी सबब स्वामी संनीध विशालगडचे मोकांमीं विदीत केलें कीं, परगणे मजकूर देशमुखीचें पुरातन वतन आपलें आहे. त्याप्रमाणें पिढी दर पिढी चालत होतें त्यासंबंधें राजश्री मुधोजी बिन वहिगोजी नाईक निंबाळकर यांनीं जबरदस्तीनें जनाव करून धामधुम करून, तोरणें बांधून, धामधुम मांडली. त्यामुळें गांव खराब होऊं लागले. याकरितां आपले वडील त्यास जाऊन भेटले. त्यासी तह करून, गांवची महामुरी करून; हें वर्तमान परगणे मजकूरचा ठाणेदार होता, त्यानें जाऊन हजरत ईजराम पातशा त्याजवळीं विजापुरास जाऊन, जाहीर केलें कीं, मुधोजी निंबाळकर यानें पुंडावे केले आहे, त्यास परगणे मजकूरचे देशमुख जाऊन भेटले, आणि गांवगन्ना खंडण्या करून घेऊं लागले. म्हणोन जाहीर केलें. त्यावरून पादशहांनीं वतन देशमुखीचे व मोकदमी मौजे गावोरे हें वतन अमानत करून लणलीक वतनास, तनदेदाखल दौलतेचे पुरवणीस दिले त्यावरून त्यांनीं दोन चार वर्षें बाव संपादला. त्यावरी पादशहांनीं त्याकडून दूर करून, महाराज राजेश्री राजे भोसले यास देशमुखी व मोकदमी—तनदेदाखल दिली. त्यावरून ते हक्क खात होते. त्यावरी याकडून देशमुखी व मोकदमी काढून सर्वांस खाण्यास पादशहांनीं दिली होती. त्याप्रमाणें ते वाव खात होते. यावरी किलेनाक राजश्री कैलासवासी स्वामींनीं घेतला. ते समई देशमुखी व मोकदमी अनामत केली. आणि दिवाणांतून मुतालीक ठेविला. त्याप्रमाणें दिवाणांत चालत आहे. यावरी आपला भाऊ गिरजोजी यादव राजश्री सन्निध चंदीचे मोकामीं वतनाचा मनसुब विदित केला. त्यावरून कृपाळू होऊन देशमुखच्या वतनांपैकीं गांव येणेंप्रमाणें दुमाले केले. तर्फ उंब्रज देह ३० तर्फ तारगांव देह २४ येणेंप्रमाणें चौपन्न ५४ गावू दुमाले केले. उरलें वतन त्या प्रांतें गेलीयावरी मनास आणून देशमुख व मोकदमीचें वतन अगदीं दुमाले करूं म्हणून, स्वामींनीं अभय दिलें. यावरी राजश्री स्वामी या प्रांतास आलियावरी सदर्हू वतन अगदीं दुमाले करावे असा निश्चय केला होता, परंतु वतनाचीं पत्रें झालीं नाहींत. पत्रें करून यावीं, तों राजश्री स्वामींनीं वैकुंठवास केला. त्याकरितां वतनाचा प्रसंग तैसाच राहिला आहे. तरी स्वामींनीं कृपाळू होऊन, आपले देशमुखीचें वतन व मोकदमीचें वतन दुमाले केलें पाहिजे, म्हणोन विदीत केलें. त्यावरून साहेबल हे वतनदार देशमुख खरे आहेत, मध्यें निंबाळकरानें पुंडावे केले. त्यास भेटले म्हणोन त्याचें वतन पातशहानें विजापुराहून अमानत केलें होतें. त्यावरी त्यांनीं वजीरास तनदेदाखल देशमुखी व मोकदमीचें वतन दिलें होतें व केवळ वतन करून दिलें नाहीं असें दिसोन आलें. त्यावरून साहेब कृपाळू होऊन देशमुखी व मोकदमी मौजे गावोरे एकूण देह १३८ पैकीं पेशजी दुमाले केले देह ५४ चौपन्न, बाकी देह ८४ उरले ते दुमाले केले; त्यास शेरीकराचे; माथा शेरणी ठेविली. रुपये ५००० पांच हजार ते आपण कबूल केले असे, सदरहू वेरजेचा वसूल देऊन हक्क दुलकत खावा. हें (मोर्तब).

याप्रमाणें धनसिंग जाधवराव यांनीं महाराष्ट्राकरितां एवढी मोठी कामगिरी करून, १०१५ लक्षांचा मुलूख जाहागिरी दाखल तोडून घेण्याऐवजीं (कारण, तसें वजन त्याचें त्यावेळीं होतें.) स्वार्थत्याग करून फक्त दोन भिकारगांवें इनाम मिळविली, व परस्पर पैसे भरून १३८ गांवची देशमुखी खरेदी केली, व आपल्या कुटुंब भरणाला उत्पन्न करून ठेविलें ! ! हा स्वार्थत्याग पुढें शाहू महाराजांचे कारकिर्दीत कोणत्याही शूर पुरुषाचे चरित्रांत आढळण्यांत येणार नाहीं ! पेशवेच स्वार्थी बनले, मग बाकीच्या सरदारांची काय कथा ! याप्रमाणें धनसिंग जाधवराव यांनीं आपल्या वडीलोपार्जित शिंदखेडच्या देशमुखीमध्यें वांटणी न मागतां, आपले पराक्रमानें निराळेंच वतन संपादन केलें. त्या वतनाचा कारभार आपला वडील मुलगा सज्जनसिंग ऊर्फ संताजी याजकडेस सांगितला. व आपण आणि आपला दुसरा मुलगा चंद्रसेन व तिसरा शंभुसिंग यांस मदतीस घेऊन राष्ट्रकार्य सुरू केलें. राजाराम महाराज वारले त्या नंतर रामचंद्रपंत अमात्य व धनसिंग जाधवराव या दोन प्रमुख मुत्सद्याखेरीज दरबारांत वजनदार दुसरें कोणीहि नव्हतें. म्हणून सर्व राज्यकारभार धनसिंग जाधवराव यांच्या हातीं आला. याच सुमारास मुलखांचा कारभार, लष्करचें आधिपत्य हीं दोन्हींही कामें त्यांजकडेसच आलीं. व हीं दोन्हीं (मुलकी व लष्करी) कामें त्यांनीं किती उत्तम तऱ्हेनें

शवटास नेलीं, व केंस राष्ट्रहित केलें, त्याचे वर्णनाकडे आपण वळूं.

राजाराम महाराज वारल्यानें बादशहा औरंगजेब यास फार आनंद झाला. जिकडे तिकडे बादशहाच्या फौजेंत जयघोष करण्यांत आला. आतां मराठे आपलें डोकें वर कसचे काढतात ! राजारामाच्या बायका व दोन अल्पवयी मुलें, यांस जिंकण्यास मुळींच प्रयास पडणार नाहींत. असें बादशहास वाटलें; परंतु मराठ्यांची संघ शक्ति, व त्यांचे आंगचा जोम, रामचंद्रपंतांनीं व धनसिंग जाधवरावांनीं फारच वाढविला. रामाराम महाराजांचे गोडबोलण्यानें पुष्कळ मराठे सरदार राष्ट्र कार्यास मदत करण्याकरितां पुढें आले होते. तेव्हां चहूंकडे मोठीं आवेशयुक्त पत्रें धनसिंग जाधवराव व रामचंद्रपंत यांनीं पाठविलीं. त्यांत आतां राज्य–संरक्षण करणें तुम्हांकडेच आहे. सर्व लज्जा तुमची आहे. इत्यादि शब्द लिहिल्यानें सर्व सरदारांस विलक्षण स्फुरण चढलें. धनसिंग जाधवराव यांनीं सर्व सरदार हाताखालीं घेऊन शत्रूच्या बंदोबस्तास ठिकठिकाणीं ठेऊन दिले व महाराजांच्या स्त्रियांस ( राण्यांस ) भेटण्यासाठीं रामचंद्रपंतासुद्धां पन्हाळ्यास आले–तेव्हां ताराबाईसाहेब यांनीं आपला मुलगा शिवाजी याची मुंज करून त्यास राज्याभिषेक करावा, असा रामचंद्रपंताजवळ फार आग्रह केला. परशुरामपंत व शंकराजी नारायण यांचा ओढा ताराबाईसाहेब यांजकडेस असल्यामुळें, त्यांनीं धनसिंग जाधवराव व रामचंद्रपंत यांजला ताराबाईसाहेब यांचें म्हणणें पूर्ण करावें म्हणोन आग्रह केला. त्याप्रमाणें शिवाजीची मुंज करून सन १७०१ मध्यें त्यास राज्याभिषेक केला. परशुरामपंतास प्रतिनिधी पद दिलें. नंतर शिवाजी राजांचें लग्न बुंदकर घाडगे यांची कन्या भवानीबाई इजशीं करण्यांत आलें. राजाराम महाराजांची धाकटी राणी राजसबाई व तिचा मुलगा संभाजी यांना ताराबाईनें कैदेंत ठेविलें. याप्रमाणें राज्याला मालक करून, धनसिंग जाधवराव व रामचंद्रपंत यांनीं राष्ट्रकार्याकडे कधींही हयगय केली नाहीं. परशुरामपंत प्रतिनिधी यांनीं ताराबाई साहेब यांच्या मर्जीप्रमाणें राज्यांत ढवळाढवळ सुरू केली, व त्यामळें राज्यांत सरदार लोकांमध्यें दुही वाढत चालली, सरदार लोक स्वतंत्र होण्याचे बेतांत आले. तथापि धनाजी जाधवरावांनीं सर्वांवर दाब ठेवून त्या सर्वांस राष्ट्रकार्याकडे झटण्यास लाविलें. आपण सरदार लोक बरोबर घेऊन मैदानांत शत्रूंशीं सामना देऊं लागले. व आपले घोडेस्वार जिकडे तिकडे पसरून दिले. औरंगजेब बादशहानें मराठ्यांवर सातवी मोहीम सुरू केली, व स्वतः किल्ले काबीज करण्यास निघाला. पहिल्यानें वसंतगड किल्ल्याखालीं आला, नंतर मिरज, नंतर सातारा असे किल्ले एकामागूनएक घेऊं लागला, यावेळीं धनसिंगराव जाधवरावांनीं असा एक अपूर्व कावा केला कीं, प्रत्येक किल्लेदारानें किल्ला पुष्कळ दिवस लढवावा व मुसलमान लोकांची अत्यंत खराबी करून शेवटीं किल्ला ताब्यांत द्यावयाचा. बादशहा पुढें जसजसा किल्ले काबीज करीत जाईल तसें तसें त्याच्यामागून फिरून धनसिंगराव जाधवराव यांनीं हल्ले करून मुसलमानांचीं ठाणीं मारून किल्ले परत घ्यावेत. याप्रमाणें क्रम चालत असतां, बादशहाच्या फौजेची पुष्कळ खराबी झाली. तशांत घाटांत जोराचा पावसाळा सुरू झाला. त्यामुळें बादशहाच्या फौजेचे विलक्षण हाल झाले. परत जाण्यास मार्ग नव्हता. ओझ्याचीं जनावरें मरून गेलीं. सामान सुमान वाहून गेलें. परत येतांना कृष्णा नदीस उतार नव्हता. कित्येकांनीं पोहून जाण्याचा प्रयत्न केला. त्यांपैकीं नऊ दशांश लोक मेले. तशांत धनसिंगराव जाधवरावाचे हल्ले बादशहाच्या फौजेवर वरचेवर सुरू झाले. शेवटीं मोठ्या कष्टानें बादशहाची स्वारी माण नदीचे कांठीं खवासपूर येथें मुक्कामास आली. या ठिकाणीं बादशहानें आपले फौजेची पुन्हां चांगली व्यवस्था करण्याचें मनांत आणून उत्तर हिंदुस्थानांतून मुबलक पैसा आणिला. त्याजवरही धनसिंगराव जाधवरावांनीं छापा घालून बरीच लूट मिळविली. बादशहानें तेथें नवीन फौजही तयार केली व पुन्हां पावसाळा संपल्यावर झुलपिकारखान, तरबियतखान, व बेदरबख्त यांनीं पन्हाळ्याच्या किल्ल्यास वेढा घातला. हा वेढा दोन महिने चालला. बादशाहा स्वतः मिरजेस सर्व सैन्यासह येऊन दाखल झाला, व सैन्य पुरवूं लागला. त्यावेळीं वेढा उठविण्याची धनसिंग जाधवराव यांनीं शिकस्त केली. बादशाही छावणींतल्या पंचक्रोशींतील मुलूख त्यांनीं लुटला, व छावणींत येणारें धान्य व खजीनाही लुटला. पुढें स्वतः आपली फौज घेऊन झुलपिकारखान व

दलपत बुंदेले यांसह धनसिंगराव जाधवांवर आला. यांच्या त्यांच्या पुष्कळ लढाया होऊन धनसिंगराव जाधवराव यांस मागें घेणें भाग पडलें. परंतु त्यांत मोंगल सैन्याचा चुराडा झाला. किल्ल्यांतील लोक जेरीस येऊन त्यांनीं किल्ला बादशहाच्या स्वाधीन केला. पुढें दुसरे चंदनवंदन, खेळणा, बहादूरगड, पुरंधर, राजगड, तोरणा, पांडवगड वगैरे किल्ले बादशहानें घेतले. विशाळगड येथें रामचंद्रपंत होते, त्यामुळें धनसिंगराव यांनीं बादशहांचा सरदार फत्तेउल्लाखान याजवर अत्यंत जोराचे हल्ले केले व त्यामुळें त्या ठिकाणीं बादशहाच्या फौजेस पुष्कळ कष्ट सोसावे लागले, व त्याचें पुष्कळ नुकसान झालें. हा वेढा सहा महिने सुरू होता. परशुरामपंत शेवटीं किल्ल्यांतून पळून गेल्याचें समजल्यावरून फत्तेखानावर हल्ले करण्याचें धनाजीनें कमी केलें. त्यामुळें फत्तेखानानें अतोनात श्रम करून किल्ला घेतला व तेथून बादशहाची स्वारी परत फिरली. यावेळीं धनसिंग जाधवराव यांनीं अशी योजना केली होती कीं, प्रत्येक किल्ला पावसाळा येईपर्यंत लढवावयाचा व बादशहाच्या छावणीसभोंवार घिरट्या घालून घोडे, जनावरें, खजीना, सामानसुमान व बाहेरून येणारी रसद मारून न्यावयाची व पावसाळ्यांत किल्ला सोडवून घ्यावयाचा, पुढें बादशहाची फौज माघारी फिरली म्हणजे त्यास अन्न मिळूं द्यावयाचें नाहीं. डोकींवर एकसारखा पाऊस, नदीनाले, तुडुंब भरून गेलेले; बादशहाच्या फौजेचें अत्यंत नुकसान होत असे व पाठीमागून किल्लेही हातांतून जात. याप्रमाणें किल्ल्यांच्या नादीं बादशहा लागला, असें पाहून धनसिंग जाधवराव यांनीं राणूजी घोरपडे व हिंदूराव घोरपडे यांस बरोबर घेऊन सर्व दक्षिणेंतील मुलूख काबीज केला. सन १७०५ सालीं धनसिंगराव जाधवराव प्रथमतः नर्मदा नदी उतरून माळव्यांत शिरले. इकडे गुजराथ, वऱ्हाड, खानदेश हे प्रांत तर त्यांनीं आपलेसे करून टाकिले होते. या भयंकर खबरा बादशहास पोहोंचून त्यांनीं धनसिंगराव जाधवरावावर झुलपिकारखान, गाजीउद्दीन व अजीमशहा यांस रवाना केलें. धनसिंगराव जाधवराव यांनीं माळवा, वऱ्हाड, गुजराथ या प्रांतीं या तिन्हीही मुसलमान सरदारांस गांठून त्यांचा मोड करून पराभव करून टाकिला. मुसलमान फौजेचे अंगीं आतां लढण्याचें त्राण राहिलें नव्हतें, त्यामुळें धनसिंगराव जाधवरावांच्या हल्ल्यांचा प्रतिबंध त्यांच्यानें करवेना. धनसिंग जाधवराव हे नुसते हल्ले करून, स्वस्थ बसले नाहींत, तर मोठमोठे बादशहाचे खजिने त्यांनीं लुटले. लढून प्रांत घेऊन तेथें आपला अंमल कायमचा बसविण्यास त्यांनीं सुरवात केली, जो जो मुलूख त्यांच्या हातीं लागे, त्यांत बादशाही अंमलाप्रमाणें आपला अम्मल सुरू करून सुभेदार, कमावीसदार राहदार वगैरे अम्मलदार त्या प्रांतांवर नेमूं लागले. याप्रमाणें सर्वत्र मराठ्यांचा विजय होऊं लागला. या धनसिंग जाधवरावांच्या पराक्रमाबद्दल स्कॉट वेरींग व इलीयटचा खाफीखान यांनीं सुंदर वर्णन दिलें आहे.

धनसिंगराव जाधवराव यांनीं पऱ्या नाईक नांवाचा बेरड आपल्यास अनुकूळ करून घेतला होता. त्याची हकीकत खालीं लिहिल्याप्रमाणें:—[१]

रायचूरच्या वायव्येस कृष्णा आणि भीमा या नद्यांमध्यें सागर आणि वाकीनखेडें असे दोन लहानसे किल्ले आहेत. ते किल्ले पेमनाईक नांवाच्या धेडजातीच्या एका शूर पाळेगाराचा ताब्यांत होते. या पेमनाईकानें गोवळकोंड्याच्या युद्धांत कुतुबशहास मदत केली होती. म्हणून दिल्लीच्या बादशहानें पेमनाईकावर सैन्य पाठवून सागरचा किल्ला काबीज केला, व तो पेमनाईकाचा पुतण्या पऱ्या नाईक यास दिला. रायचूर काबीज करण्यांत त्यानें बादशहास चांगली मदत केल्यामुळें त्यास मनसब म्हणून हा किल्ला दिला. तेव्हांपासून हा किल्ला पऱ्या नाईकाच्या ताब्यांत राहिला. पऱ्या नाईकानें आपलेजवळ फौजफांटा जमवून दारूगोळा वगैरे भरून सागरचा किल्ला व वाकीनखेडचा किल्ला मजबूत केला. व आपली सत्ता पुष्कळ वाढविली. धनसिंग जाधवराव यांनीं त्याचें शूरत्व पाहून त्यास आपल्याकडे सामील करून घेतलें व स्वराज्य स्थापन करण्याचे कामीं त्याचे हातून मोठी कामगिरी करून घेतली. त्यानें धनसिंगराव यांचे सांगण्यावरून बादशाही फौजेवर छापे घालून त्याचे लष्करांतून धान्य, सामान वगैरे चोरून आणावें. याप्रमाणें मोंगल बादशहाची पिऱ्या नाईकानें नासाडी मांडली, तेव्हां बादशहानें अजीमशहास त्याजवर पाठविलें. अजीमशहास लांच देऊन त्यानें परत पाठविलें. तेव्हां पुन्हां गाजीउद्दीनखान फिरोजजंग

यास बादशहानें पाठविलें. तोही लांच खाऊन तसाच परत आला. तेव्हां बादशहानें स्वतः वाकीनखेड्यावर स्वारी केली, त्यावेळीं पऱ्या नाइकास धनाजी जाधवरावांनीं मदत पाठविली. व त्याचाही जातीचा बंदोबस्त चांगला होता. बादशहानें स्वतः वाकीनखेडचे किल्ल्यास वेढा दिला. ह्या प्रसंगीं बादशहाशीं पऱ्या नाईकानें मोठ्या जोराचा झगडा केला. किल्ल्यांतून बादशहाच्या फौजेवर असा कांहीं मारा चालविला कीं, बादशहाचे असंख्य लोक प्राणास मुकले. पुढें किल्ला काबीज होण्याची वेळ आली, इतक्यांत धनसिंग जाधवराव हे पऱ्या नाईकाच्या मदतीस येत आहेत. अशी बातमी बादशाही फौजेला समजल्या बरोबर सर्वांची गाळण उडून गोंधळ जाहला. धनसिंग जाधवराव यांनीं शादशाही फौजेवर सारखे हल्ले करून हजारों लोक ठार मारिले. संताजी घोरपडे वारल्यापासून १०-५ वर्षांत मोंगली फौजेवर तुंबळ युद्धें करून व त्यांजवर सारखे हल्ले करून धनसिंगराव जाधवराव यांनीं त्यांच्यावर इतकी दहशत बसविली कीं, जर मोंगल लोकांचे घोडे दाणी पिईनातसे झाले तर मोंगल लोक त्यांस " कां पाणी पीत नाहीं ? पाण्यांत धनाजी दिसतो काय ? ( क्यों पानी पीता नहीं ? पानेमें धनाजी नजर आता है क्या ? ) असें म्हणत याजबद्दल ग्रँटडफसाहेबानें आपले इतिहासांत पान ३४५ मध्यें* चांगलें वर्णन दिलें आहे, व स्कॉट वेरींग यांनींही आपल्या इतिहासांत यासंबंधानें माहिती दिली आहे.

याप्रमाणें मोंगली फौजेची कत्तल केल्यामुळें बादशाही सरदार पळून गेले. नंतर वेढा उठल्यावर धनसिंग जाधवरावाची मुलें माणसें वाकिनखेडच्या किल्यामध्यें पऱ्या नाइकाच्या ताब्यांत होती त्यांस घेऊन ते निघून गेले. नंतर पुन्हां बादशहानें आपल्या सरदारलोकांस दोष देऊन व सैन्यास उत्तेजन देऊन

*The Mahrattas say that, when a horse Refused to drink, and startted at his own shadow, it was a common joke amongst the Moghals to ask him why he was afraid— "One would think you saw Dhunnajee in the water" This anecdote is recorded by Mr. Scott Waring.

Footnote to Grant Duff's History, P. 343.

पुन्हा ताज्यादमाची फौज घेऊन वाकीनखेडच्या किल्ल्यांस वेढा घातला. पऱ्या नाइकाचा भाऊ सोमशंकर बादशहास शरण गेला. पऱ्या नाइकानें किल्ला ताब्यांत देण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें बादशहानें आपले सरदार लोक किल्ला ताब्यांत घेण्यास किल्ल्यावर पाठविले. पऱ्या नाईक त्यास मुळींच भेटला नाहीं तिसरे दिवशीं या सरदार लोकांस सोमशंकरानें अटकेंत ठेविलें, व पऱ्या नाईक गुप्तरूपानें निघून गेला. सोमशंकरानें लढाईची पुन्हां तयारी केली, व पुन्हां मोंगल फौजेवर हल्ले करूं लागला. शेवटीं झुलपिकारखान बादशहाचे मदतीस आला, व मोठ्या शिकस्तीनें त्यानें किल्ला काबीज केला. इकडे धनसिंग जाधवराव यांनीं बादशहानें घेतलेला सिंहगड किल्ला पुन्हां परत घेतला. या वाकीनखेडच्या हल्ल्यांत चिंकिलीज्खान हा हजर होता. व तोच पुढें निजामउल्मुल्क या नांवानें प्रसिद्धीस आला. याप्रमाणें बादशहाला चोहोंकडून त्रास होऊन त्यानें कृष्णेच्या कांठीं देवगांव येथें विश्रांतीकरितां मुक्काम केला. धनसिंगराव जाधवराव यांनीं बादशहाच्या कैदेंत असलेले शिवाजी उर्फ शाहूमहाराज यांस सोडवून आणण्याचा तीनवेळां इलाज केला. तो येणेंप्रमाणेंः—

सन १६९९ च्या सुमारास राजाराममहाराज व धनसिंग जाधवराव हे सातारा सोडून उत्तरेकडे चौथाई वगैरे हक्क गोळा करीत चालले, त्यावेळीं बादशहाचा मुक्काम औरंगाबाद येथें आहे असें कळल्यावरून धनसिंग जाधवराव पंढरपुराहून औरंगाबादेस येण्यास निघाले. व स्वतः महाराज साताऱ्याहून सिंहगडास येऊन तेथून पुण्यास आले. बादशहाला राजाराममहाराज व सेनापती धनसिंग जाधवराव हे लांब होते ते आतां नजीक येऊन आपल्यावर हल्ला करणार, असें समजल्यावरून बादशहानें झुलपिकारखान यांस त्यांच्यावर रवाना केलें. त्याजवरून छत्रपती राजाराम महाराज यांनीं सेनापती धनसिंग जाधवराव यांस व परशुराम त्रिंबक व त्यांचे हाताखालील कांहीं सरदार आणि शंकराजी नारायण यांचें हाताखालील सरदार या सर्वांच्या मिळून तीन टोळ्या करून मुसलमानावर पाठविल्या. जाधवराव सेनापती यांनीं पंढरपूरचे सुमारास येऊन झुलपिकारखानावर हल्ला केला. त्यांची व खानांची लढाई होऊन खानाची फौज

नामोहरम झाले. त्याचप्रमाणें शंकराजी नारायण यांनीं सरजेखानाचा पराभव केला, व परशुराम त्रिंबक यांनीं चिंकिलीजखानाचा पराभव केला.

याप्रमाणें मराठ्यांनीं विजय मिळवून छत्रपती महाराज पुण्यास असतां तेथें खुद्द सेनापती जाधवराव त्यांस येऊन मिळाले. शिवाय दुसरे सरदारांच्या हाताखालीं दिलेल्या फौजाही येऊन मिळाल्या. याप्रमाणें स्वारीची तयारी होऊन, बरोबर ५०,००० वर सैन्य घेऊन धनसिंगराव जाधवराव व आपण बादशहावर हल्ला करण्यास निघाले. पुणें मुक्कामीं शंकराजी नारायण व परशुराम त्रिंबक यांजवळ २५००० फौज देऊन ठेविली. ही स्वारी पुण्याहून राहुरी बोरीवरून पुणतांबेपाशीं गंगा उतरून, औरंगाबादेस सातान्यास जावयाचे खंडोबाच्या माळावर बादशहाच्या फौजेचा तळ होता, त्या धोरणानें येऊन औरंगाबादचे आसपास पोहोंचली. धनसिंग जाधवराव यांनीं शाएस्तेखान याचे हाताखालील कांहीं सरदार लोक यांस फोडून असा संकेत ठरविला कीं, ज्या दिवशीं बादशहाकडील फौजेचा छबिना शाएस्तेखानाकडे येईल त्यादिवशीं बातमी राखून बादशहाच्या फौजेवर हल्ला करून शाहू महाराजांस सोडवून आणावें. त्या संकेताप्रमाणें महाराजांस तळावर ठेवून बंदोबस्तास कांहीं फौज ठेवून अडचण पडल्यास महाराजांनीं मागाहून मदत करावी, असें ठरवून स्वतः सेनापती जाधवराव हे रात्रीचे वेळेस सैन्यानिशीं निघाले. त्यास शाएस्तेखानाचे छबिन्याचे सरदार आढळले, त्या छबिन्याचे सरदार लोकांमध्यें शिरून बादशहाच्या खुद्द तळावर गेले. याही खेपेस बादशहा हजर नसून बेगम साहेब यांचेकडे मेजवानीस गेला होता. बरोबर शाहू महाराजांसही नेलें होतें. सेनापतीनें दोन टोळ्या केल्या. पूर्व भागास पांच हजार स्वार, त्यांजवळ बाण देऊन, त्यांनीं बाणांचा मारा करावा, या हेतूनें पाठविले. या टोळीनें बादशहाच्या पूर्व भागाच्या फौजेवर जोरानें हल्ला केल्यामुळें सर्व फौजेची ओढ तिकडे पडली व खुद्द सेनापतीनें बादशहाच्या मुख्य फौजेवर हल्ला केला. यामुळें बादशहाच्या फौजेमध्यें एकच गोंधळ उडाला. शेंकडों लोकांची कत्तल केली, खजिना लुटला. बादशहाचा खुद्द रहावयाचा मुकरवा ( तंबू ) मोकळा जाहला. तंबूंत बादशहा व शाहूमहाराज नसल्याचें समजून आल्यावरून सर्व फौजेनिशीं मिळालेली लूट घेऊन सेनापती, राजाराम महाराजांस येऊन छावणीवर भेटले. शाहूची सुटका जाहली नाहीं असें पाहून महाराज दिलगीर जाहले. दुसरे दिवशीं सेनापतीसह तळ उठवून जालनापुरास येऊन पेठ लुटवून जाळून टाकिली. तेथून गंगातीरीं आंबेड, पैठण, बीड इत्यादि लुटून खंडण्या घेऊन परत पुण्याहून सिंहगडास आले. तेथेंच महाराजांचा काल जाहला.

त्यानंतर शाएस्तेखान यांस सेनापतीवर पाठविलें. त्याची व ह्यांची भीमा उतरून पलीकडे लढाई जाहली. सेनापतीनें अति तुंबळ युद्ध केलें. शाएस्तेखान याचा नाश होऊन पुन्हां औरंगाबादेस परत गेला. यावेळीं महाराज नुकतेच वारले होते. रामचंद्रपंत हे सेनापतीस कोसभर सामोरे जाऊन "तुम्ही महाराजांचें राज्य याउपरी रक्षण करावें धनी हातारीं येई असें करावें." म्हणून त्यांचा गौरव केला. याप्रमाणें धनाजी जाधवराव यांनीं पूर्वीं हल्ला करविला, व या खेपेस स्वतः आपण जाऊन हल्ला केला, परंतु दोन्ही वेळेला शाहू महाराजांची सुटका जाहली नाहीं.

शाहूराजास सोडवून आणण्याकरितां धनसिंग जाधवराव यांनीं महाराजांचे पश्चात् पुन्हा खटपट सुरू केली. शाहूराजांकडून राजाराम महाराज वारल्यानंतर भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड यांच्या हातीं ताराबाईसाहेब व राजसबाईसाहेब यांस प्रणाम व शिवाजी संभाजीस आशिर्वाद कळवून, धनसिंग जाधवरावयांस "आपण काका ( राजाराम महाराज ) यांचे ठिकाणीं आहांत. आम्हांस नेण्याचा उद्योग करतच आहांत. काकासाहेब यांनीं राज्य रक्षण केलें तें आपण रक्षावें." याप्रमाणें निरोप आल्यावरून धनसिंग जाधवरावांनीं पुन्हा मोठ्या आवेशानें व जोरानें बादशहाचे फौजेवर वारंवार हल्ले करून बादशाही फौजेची दाणादाण केली. त्यामुळें बादशहा ( औरंगजेब ) अगदीं घाबरून गेला. यावेळीं त्याचा मुक्काम विजापुरास होता. मराठ्यांच्या वारंवार हल्ल्यानें व त्याच्या ( औरंगजेबाच्या ) मुलांच्या भांडणामुळें व लष्करीलोकांचे पगार तुंबल्यानें त्यांनीं त्रास दिला त्यामुळें, बादशहा इतका सतावून गेला कीं त्यानें शाहू यास मांडलिक ठरवून सोडून देऊन मरा-

ज्यांचे गादीवर बसवावें, म्हणजे आपणास आराम मिळेल, असा विचार केला.

या विचाराला त्याच्या पदरचे सरदारांनीं आपली संमती दिली. मराठे पादाक्रांत तर होतच नाहींत. तेव्हां ते आपले ताबेदारी पत्करतील तरी पुष्कळ, असें बादशहास वाटून त्यानें आपला पुत्र कामवक्ष याजबरोबर शाहूस देऊन, मराठ्यांशीं तहाचें बोलणें करण्यास हुकूम दिला. राजपुत्रानें धनसिंग जाधवराव यांचेकडे वकील पाठवून शाहूचे सुटकेबद्दल बोलणें सुरू केलें. बरीच वाटाघाट होऊन असें ठरलें कीं, दक्षिणेंतील सहा सुभ्यांवर बादशहानें मराठ्यांस सरदेशमुखीचा हक्क द्यावा व मराठ्यांनीं सर्व बादशाही मुलखांचा बंदोबस्त राखावा व सर्व मराठ्यांचे मुख्य सरदारांस पत्रें पाठवून बादशहानें त्यांचा बहुमान करावा, व त्यांस सन्मानाचे पोषाक मिळावे. बादशहाचें म्हणणें असें पडलें कीं, मराठयांनीं आपले ताबेदार व्हावें. परंतु धनसिंग जाधवराव यांस ही गोष्ट मानवली नाहीं, व या गोष्टीस सरदारांनींही अनुमोदन दिलें नाहीं. यामुळें तो तह मोडून शाहूची याहीवेळेस सुटका जाहली नाहीं. ही गोष्ट सन १७०५ मध्यें घडली. नंतर धनसिंग जाधवराव यांनीं बादशाहानें पूर्वीं मराठ्यांचे किल्ले काबीज केले होते, ते पुन्हां जिंकून आपले ताब्यांत घेण्यास सुरवात केली. मोंगल लोक पुढें किल्ले काबीज करीत चालले, तसतसे मराठे मागून तेच किल्ले परत घेत चालले.

मोंगल पुढें व मराठे मागें अशी शिकार सुरू जाहली. पन्हाळा, पवनगड, सातारा, व वसंतगड हे किल्ले धनसिंग जाधवराव, रामचंद्रपंत अमात्य, परशुराम त्रिंबक या सर्वांनीं जिंकून परत घेतले. सिंहगड, रायगड, व राजगड यांस शंकराजी नारायण यांनीं वेढा दिला. पुन्हां धनसिंग जाधवराव यांनीं स्वतः जाऊन शंकराजीस मदत करवून वरील तिन्हीहि किल्ले परत घेतले. यामुळें बादशहास अतोनात दुःख होऊन तो दुखणेकरी जाहला. व आतां आपली बासलात काय होईल ? याची त्यास धास्ती पडून त्याचें दुखणें जास्तच वाढलें. कांहीं दिवसांनीं बादशहाला थोडें बरें वाटूं लागलें. नंतर तो विजापूर सोडून बहादूरगडास आला. आजारी पडण्यापूर्वींच सिंहगड परत घेण्याकरितां त्यानें हमीदुद्दीनखान उर्फ तबियतखान यास पाठविलें होतें त्याचे सहाय्यास झुलपिकारखान यास तावडतोब जाण्यास हुकूम दिला.

यावेळीं धनसिंग जाधवराव यांस फसविण्याकरितां मोंगलांनीं अशी युक्ति लढविली कीं शाहुकडून धनसिंग जाधवराव यांस बादशहास शरण येण्याविषयीं पत्र लिहविलें. परंतु त्यांनीं बादशहाची कपटविद्या जाणून पत्रास मुळींच मान दिला नाहीं व आपले हल्ले बादशाही फौजेवर तसेच जोराचे चालविले. यावेळीं सर्व युक्त्या फसल्यामुळें लढाईचा नाद सोडून बादशहा अहमदनगराकडे वळला. धनसिंग जाधवराव यांस बादशहा अहमदनगरास जातो आहे अशी खबर लागल्यामुळें ते लागलीच आपली फौज घेऊन स्वतः बादशहाच्या फौजेवर तुटून पडले. त्यावेळीं त्यांनीं आपल्या शूरत्वाची कमाल करून सोडली. तेव्हां त्याचा बंदोबस्त करण्यासाठीं हमीदुद्दीनखान यास बादशहानें पाठविलें. धनसिंग जाधवराव व हमीदुद्दीनखान यांचीं लढाई होऊन हमीदुद्दीनखानास लढाईत जिवंत पकडून नेलें. बादशहाच्या सरसामानावर हल्ला करून लूटही पुष्कळ नेली. थोडक्यांत चुकलें. नाहीं तर बादशहासही धनसिंग जाधवराव यांनीं कैद केलें असतें. परंतु बादशहा धनसिंग जाधवराव यांची नजर चुकवून एका टोळींत निघून गेला. धनसिंग जाधवराव यांचें नांव ऐकून बादशाही फौजेस विलक्षण दरारा वाटूं लागला. शिवाय फौजेबरोबर अवजड सामान वाहून नेण्यास जनावरेंही पुरेशीं नव्हतीं. खजीना खलास जाहलेला, अशा अनेक कारणांनीं धनसिंग जाधवराव यांना बादशाही फौजेला जेरीस आणण्यास फार सोपें गेलें. बादशाही फौज अगदीं दीनदशेस आणली, यामुळें बादशहास आपण अहमदनगरास सुखरूप जाऊन पोहोंचतों की मध्येंच धनसिंग जाधवराव यांच्या हातांत सांपडतों. अशी धास्ती पडली. तेव्हां खान ई-आलम बाजला धनसिंग जाधवराव यांच्या फौजेच्या तोंडावर ठेवून बादशहा स्वतः जेमतेम करून अहमदनगरास एकदांचा सुखरूप येऊन पोहोंचला. पुढें धनसिंग जाधवराव यांनीं खान-ई-आलमचा पराभव करून अहमदनगरचे भोंवतीं वेढा दिला. तेव्हां त्यांजवर झुलपिकारखान यास पाठविलें. झुलपिकारखान व धनसिंग-जाधवराव यांचें युद्ध बरेच दिवस चाललें. तथापि

मराठ्यांचा वेढा उठेना. इतक्यांत धनसिंग जाधवराव यांस असें कळलें कीं, संताजीचे मुलगे व पुतणे मराठ्यांच्या मुलखांत लुटालूट करूं लागले. म्हणून अहमदनगर सोडून भीमा उतरून जाधवराव हे कर्नाटकाकडे घोरपड्यांवर चालून गेले. झुलपिकारखानानें घोरपड्यांस मदत केली. धनसिंग जाधवराव व घोरपडे यांची मोठी लढाई होऊन घोरपड्यांचा मोड जाहला; यामुळें झुलपिकारखान अहमदनगरास बादशहाकडे परत आला. बादशहा यावेळीं अतिशय थकून गेला होता. फौजेची दुर्दशा झाली होती. फौजेंतील लोकांस खावयास अन्न देखील मिळेना! धनसिंग जाधवराव यांनीं रसद व खजीना लुटण्याची सुरवात केली, त्यामुळें बादशाही गोटांत धान्य देखील येईनासें जाहलें. तेव्हां बादशहानें आपले हाताखालील मराठे सरदारांस सुरत, बऱ्हाणपूर, वऱ्हाड, माळवा इत्यादि बादशाही मुलखांतून मोठमोठ्या रकमा वसूल करून आणण्यास पाठवून त्यांजकरवीं पुष्कळ पैसे जमा केले. त्यांचे बंदोबस्तास बादशहानें निरनिराळे सरदार पाठविले. त्यांचें न मानतां या वेळीं मराठ्यांनीं अत्यंत पराक्रम करून सर्व मुलूख लुटून उद्ध्वस्त केला. या सर्व दुःखदायक बातम्या ऐकून बादशहास मोठा धक्का बसला. व शेवटीं त्या धक्यानेंच गुरुवार तारीख २० माहे फेब्रुवारी सन १७०७ इसवी रोजीं बादशहाचा अंत झाला.

मरतेवेळीं बादशहानें धनसिंग जाधवराव व मराठे यांविषयीं असे उद्गार काढले कीं, "आपण स्वतः दक्षिणेंत येऊन २५ वर्षे यांजबरोबर युद्ध चालविलें. ही आपली मोठी चूक जाहली. धनसिंग जाधवराव यह कुच इन्सान नई है, सैतान है. हमारे सायप्याज खाके आजतक लडता है. और हमारी पातशाही यह छीन लेगा ऐसा हमारेकू मालूम पडा है." असें बोलून त्यानें प्राण सोडिला. यावरून, मोंगलशाहीची वाट मराठे लावणार, हें बादशहास अंतकाळीं कळून आलें होतें, असें स्पष्ट दिसतें.

धनसिंग जाधवराव यांस बादशहा वारल्याचें समजल्यावरून त्यांनीं मोंगलांनीं घेतलेले सर्व किल्ले पुनः काबीज करण्याचा सपाटा सुरू केला. पुण्याचा फौजदार लोदीखान याचा पराभव करून त्यानें पुणें व चाकण हे परगणे घेतले. याप्रमाणें एकामागून एक मोंगलांकडील सर्व ठाणीं हिसकावून घेऊन नर्मदेपासून कर्नाटकापर्यंत सर्व मुलूख काबीज करून मराठेशाही पुन्हां स्थापन केली. मोंगल बादशहास व मुसलमान लोकांस मराठे जिवंत आहेत असें दाखविलें. याप्रमाणें मराठे व मोंगल यांजमध्यें सारखा २० वर्षे स्वतंत्र राज्य स्थापन करण्याकरितां जो मोठा झगडा चालला होता, त्याचा शेवट मराठ्यांस हितावह झाला. त्याचें श्रेय धनसिंग जाधवराव व रामचंद्रपंत अमात्य यांनीं मिळविलें. राजारामाचे मृत्यूनंतर युद्धाची सर्व जबाबदारी धनसिंग जाधवराव यांजवर येऊन पडली. या १०१५ वर्षांत धनसिंग जाधवराव विजेप्रमाणें सर्वत्र सारखे चमकत होते. शत्रूवर एकदम घाले घालण्यांत त्यांची बरोबरी करणारा त्यावेळीं कोणीही नव्हता. मोंगल फौजेस 'दे माय धरणी ठाय' करण्यास लावणाऱ्या धनसिंग जाधवरावांचें नांव ऐकतांच मुसलमानांस विलक्षण कांपरें भरे. अशा रीतीनें बादशहाचा शेवटीं पाडाव झाला. त्याचें सर्व श्रेय धनसिंग जाधवराव यांनींच मिळविलें. "इंडिया ऑन् धी इव्ह् ऑफ धी ब्रिटिश् कॉन्वेस्ट्" या नांवाचें सिडने ओवेल् यांनीं एक पुस्तक लिहिलें आहे. त्यामध्यें धनसिंग जाधवराव व तत्कालीन मराठे यांजबद्दल माहिती दिली आहे, ती खालीं लिहिल्याप्रमाणें:-

"औरंगजेबाचा गर्विष्ठ व हट्टी स्वभाव, त्याच्या लष्करांतील डामडौल व सर्वांशीं त्याचा बेइमानीपणा यांचा फायदा नेहमीं शत्रूस मिळत गेला. गर्वामुळें त्यास धनसिंग जाधवरावासारख्या मराठे लोकांची योग्यता कळून आली नाहीं. त्याच्या लष्कराच्या भपक्यास भिऊन विजापूर व गोवळकोंडा येथील भीरु मुत्सद्दी, धन्याचा विश्वासघात करण्यास प्रवृत्त झाले, ही गोष्ट खरी. पण त्या निरर्थक भपक्यानें, तत्वांशीं गांठ घालणारे धनसिंगराव वगैरे मराठे लोक न डगमगतां, त्यांनीं समरांगणावर आपलें अनुपमेय कौशल्य दाखविलें. राजारामाचे मृत्यूनंतर व पूर्वी पागा, फौज, खजिना वगैरे कांहीं नसून केवळ लुटीवर निर्वाह करून धनसिंग जाधवराव यांनीं, फौज जमा करून मोंगल लोकांवर सारखे २० वर्षेपर्यंत हल्ले केले, ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. अनेक घोर संग्रामांत मराठ्यांना केव्हां केव्हां विजयी होण्याऐवजीं पराभूत व्हावें लागलें; तथापि मराठ्यांचे मुख्य मुख्य किल्ले

पाडाव झाले असतांही त्यांस जिंकण्यास बादशहा समर्थ झाला नाहीं; इतकेंच नाहीं, तर धनसिंग जाधवराव यांनीं बादशहाच्या फौजेवर व सामानावर हल्ले करून, त्यांचें द्रव्य लुटून, मराठेशाहीचा खजिना भरून टाकिला.

मराठे म्हणजे एक राष्ट्र आहे. स्वदेशावर स्वराज्य चालविण्यास ते लायक आहेत; व कितीही संकटें ओढवलीं तरी ते अपमान सहन करणारे नाहींत, हें त्यांनीं आपले कृतीनें लोकांचे अनुभवास आणून दिलें. या प्रचंड युद्धांमध्यें धनसिंग जाधवराव यांनीं जशी मोंगलांशीं टक्कर दिली तशी प्रत्यक्ष शिवाजीनेंही दिली नाहीं. उलट जयसिंगासारख्यांशीं लढण्याचा प्रसंग आला, तेव्हां बादशहास शरण जाऊन शिवाजीनें वेळ मारून नेली. विजापूर व गोंवळकोंडा येथील राज्यें हयात असल्यामुळें मोंगल बादशहांचा कलह लावून देण्याची सवड शिवाजीस होती, शिवाय शिवाजी महाराज आपले किल्ले सोडून बाहेर मैदानांत फारसे कधींही आले नाहींत. त्यांच्या उलट धनसिंग जाधवराव यांचें वर्तन होतें. ते कधीं मोंगल बादशहास शरण गेले नाहींत. मोंगलांच्या प्रचंड सेनेशीं त्यांना मैदानांत टक्कर द्यावी लागली. संभाजीच्या गैरव्यवस्थेंत मोठमोठे सरदार धुळीस मिळालेले असून किल्यांची व्यवस्था बरोबर नव्हती. मराठी राजा बादशहाचा कैदी होऊन बसला. सर्व मराठे देशोधडीस लागले. पैचा वसूल नाहीं, फौज व्यवस्थेशीर नाहीं, किल्ले नीट नाहींत, कोणाचा आधार नाहीं, अशा स्थितींत धनसिंग जाधवराव यांनीं आपलें बुद्धिमत्तेनें व पराक्रमाचे योगानें, फौज, पागा वगैरे जमवून आपला गेलेला मुलूख परत मिळविला. परदेशांत चौथाई व सरदेशमुखी हे हक्क स्थापित केले. अर्थात् शिवाजीचे वेळीं राज्यसंस्थापनेची जी प्रेरणा केवळ वरच्या वरच्या मंडळींत होती, ती धनसिंग जाधवराव यांनीं आपले सर्व हाताखालच्या मंडळींत व सर्व मराठे लोकांमध्यें पसरून दिली, व प्रत्येक पुरुष लोकनायक होण्यास लायक केला. प्रल्हाद निराजी, राजाराम, संताजी घोरपडे वगैरे लोक नाहींसे झाले; तरीही त्यांचे ठिकाणीं येण्यास दुसऱ्या लोकांस धनसिंग जाधवराव यांनीं उत्तेजन देऊन आपले आंगचें खरें राष्ट्रतेज या घोर संग्रामांत उत्तम प्रकारें कसास लाविलें. या सर्व परिणामांचें श्रेय खरोखर औरंगजेब बादशहास दिलें पाहिजे. कारण तो जर स्वतः जातीनें मराठ्यांशीं लढण्यास दक्षिणेंत आला नसता, तर धनसिंग जाधवराव यांचें व तत्कालीन मराठे यांचे क्षात्रतेज असें झळकलें नसतें; व त्यांचीं नांवें राष्ट्राचे इतिहासांत प्रसिद्ध झालीं नसतीं. धनसिंग जाधवराव व त्या वेळचे मराठे यांच्या राष्ट्राखेरीज मुसलमानांस हार न गेलेलें असें दुसरें राष्ट्र नाहीं. मी मी म्हणणारे रजपूतही पादाक्रांत झाले. पण मुसलमानांच्या एकछत्री राज्यास अडथळा फक्त धनसिंग जाधवराव व त्यावेळचे मराठे सरदार यांनीं मात्र आणला. या जाधवरावाचे घराण्याकडून अशींच संस्मरणीय कृत्यें पूर्वापार घडलीं आहेत. भोंसले व जाधवराव या दोन घराण्यांनींच पुढाकार घेऊन सर्व महाराष्ट्रास स्वतंत्रता व स्वराज्य हीं प्राप्त करून दिलीं. ”

याप्रमाणें परस्थ लोकांनींसुद्धां धनसिंग जाधवराव यांची स्तुति केली आहे. बादशहा वारल्यानंतर धनसिंग जाधवराव यांनीं मागें सांगितल्याप्रमाणें गेलेले किल्ले व प्रांत पुनः काबीज करून दक्षिणेंत मराठ्यांची सत्ता पूर्णपणें स्थापन केली. मोंगल बादशाहीस उतरती कळा याच वेळेस लागली, व मराठेशाहीसही यावेळींच उतरत्या कळेचा वेध लागला. आजपर्यंत शाहू महाराज बादशहाचे ताब्यांत राजकैदी म्हणून होते. औरंगजेब बादशहाचा वडील मुलगा मोआज्जीम हा बहादुरशहा हें नांव धारण करून दिल्लीचे तख्तावर बसला. इकडे अजीमशहा नांवाचा दुसरा मुलगा बादशहा वारल्याबरोबर अहमदनगर येथें येऊन विधिपूर्वक तख्तनशीन झाला.

दिल्लीस आपला वडील भाऊ मोआज्जीम उर्फ बाहदुरशहा तख्तनशीन जाहल्याची बातमी ऐकून अजिमशहा त्याजबरोबर लढण्याकारितां उत्तरेकडे निघाला. बरोबर वजीर आसदखान व त्याचा पराक्रमी पुत्र झुल्पिकारखान हे असून त्यांचें त्यास चांगलें पाठबळ होतें. शाहूही त्याजबरोबर होता. पुढें अजीमशहा हंड्या जवळ नर्मदा उतरून माळव्यांत शिरला. इकडे धनसिंग जाधवराव यांनीं पुण्याचा फौजदार लोदीखान वगैरे मुसलमान सरदारांचा पराभव करून

महाराष्ट्रांतील सर्व किल्ले व प्रांत फिरून काबीज केले. दक्षिणेवर स्वतंत्रता स्थापन करून धनसिंग जाधवरावानें पातशाहीची द्वाही फिरविल्याचें वर्तमान अजीमशहास कळलें, तेव्हां आतां मराठ्यांना जिंकण्याची काय युक्ति करावी, त्याबद्दल वजीर आसदखान व झुलपिकारखान यांच्याशीं मसलत करून, शाहू राजा यांस मराठ्यांचा राजा कबूल करून परत पाठवावें असें त्यानें ठरविलें. झुलपिकारखानानें बादशहाला अशी सल्ला दिली कीं, धनसिंग जाधवराव वगैरे मराठे सरदारांशीं नुसतें लढून त्यांचा बंदोबस्त होणार नाहीं, व एकही मोंगल सरदार धनसिंग जाधवराव यांचेशीं सामना करण्यास समर्थ होणार नाहीं. तेव्हां शाहू राजाला सोडल्यानें ताराबाईचे व शाहू राजाचे राज्या बद्दल आपसांत तंटे लागून मराठ्यांचे दोन तट होऊन त्यांची शक्ति कमी होईल व मोंगलांचे मुलखास त्रास देण्यास त्यांस सवड मिळणार नाहीं. अशी त्यानें सल्ला दिल्यावरून अजीमशहानें ५०-६० लोकांनिशीं शाहू राजास दक्षिणेंत पाठविलें. त्यावेळीं बादशहानें शाहू राजाकडून असा करार करून घेतला कीं, तुम्हीं आपणास दिल्लीचे बादशहाचे अंकित समजून राज्य करावें, व बादशाही मुलखास उपद्रव देऊं नये, व जे उपद्रव देतील त्यांचा बंदोबस्त करावा. याप्रमाणें करार करून घेऊन दक्षिणेंतील सहा सुभ्यांचें सरदेशमुखीचें उत्पन्न व चौथाई, तसेंच बाले घाटावरील महाल, विजापूर व दौलताबाद हे बादशाहींतील महाल, भीमा व गोदावरी यांचे मधील निम्मा मुलूख किल्ल्यांसाहित त्यांतील बादशाही ठाणीं, तुम्ही चांगल्या रीतीनें चालल्यास बक्षीस करून देऊं. असा ठराव करून घेऊन, बादशहाच्या हुकुमांत वागण्याबद्दल करार करून घेतला. बरोबर हत्ती, घोडे, व २०० रांगडेस्वार देऊन त्यांनीं शाहू महाराजांची रवानगी केली, व शाहू महाराजांची आई येसूबाई हीस ओलीस ठेवून घेतलें. याप्रमाणें शाहूची सुटका होऊन मोंगल व मराठे यांच्या मधील प्रचंड युद्धाची समाप्ति जाहली. आतां ताराबाईशीं झगडून शाहूनें राज्य कसें मिळविलें याचें वर्णन देऊं.

सन १७०७ च्या एप्रिल महिन्यांत शाहूची सुटका होऊन तो नर्मदा उतरून सातपुड्याच्या घाटांतून बऱ्हाणपुरास आला. तेथें अमृतराव कदम बांडे हा मराठा सरदार सुरतपासून बऱ्हाणपूरच्या मुलखांत बंडाळी करीत होता. त्यास शाहू जाऊन भेटला. तेव्हां बांडे यांनीं शाहूस बरीच मदत दिली. पुढें बऱ्हाडांत परसोजी भोंसले, खानदेशांत पेशवे पिंगळे वगैरे लहान लहान सरदार यांस शाहूनें अनुकूल करून घेतलें. पुढें शाहू औरंगाबादेस गेला. तेथून रोजास औरंगजेबाचे थडग्याची पूजा करून कायगांवटोंक येथें गोदावरी नदी उतरून तो अलीकडे आला. गोदावरी उतरून अलीकडे आल्यावर शाहूनें ताराबाईस पत्र पाठविलें कीं, आम्ही बादशहापासून निघून मुकामास येऊन पावलों, लवकरच येतों.

हें वर्तमान ऐकून राजाराम महाराजांचे पत्नीस म्हणजे ताराबाईस फार वाईट वाटलें. शाहूला राज्य देऊं नये असा तिचा संकल्प होता. धनसिंग जाधवराव यांस ताराबाई साहेब यांनीं बोलावून आणलें व 'हा येणारा शाहू तोतया आहे. सबब तुम्ही जाऊन त्यास मारून टाकावें' असें सांगितलें.

त्यावरून धनसिंग जाधवराव यांनीं रामचंद्रपंत अमात्य, परशुराम त्रिंबक प्रतिनिधि व खंडो बल्लाळ चिटणीस या लोकांस बोलावून आणून, त्यांची सल्ला घेतली. रामचंद्रपंत व परशुरामपंत या दोघांनीं ताराबाईजवळ शपथक्रियाही केली. जाधवराव सेनापति व प्रतिनिधि खंडो बल्लाळ चिटणीस हे शाहूशीं सामना देण्यास निघाले. गोदावरी उतरल्यावर शाहू अहंमदनगराहून मौजें पारद परगणे शिवणें येथें आला. तेथील पाटलानें शाहूशीं सामना देऊन गांव भांडविला. तेव्हां शाहूनें हल्ला करून गांव मारून फन्ना केला. तेव्हां शहाजी लोखंडे नांवाचा पाटील ठार जाहला. त्यावेळीं पाटील घराण्यापैकीं एका स्त्रीनें आपलें तान्हें मूल शाहू महाराजांचे पालखींत आणून टाकिलें, व यास संरक्षण करावें, असें बोलली. या गांवीं आपण प्रथम फत्ते केली म्हणजे जय मिळविला, म्हणून शाहू महाराज यांनीं त्या मुलाचें नांव फत्तेसिंग भोंसले असें ठेविलें. हाच अक्कलकोटचा मूळपुरूष होय. पारदहून शाहू, खेडकडूस येथें भीमानदीवर आला. तों इकडून ताराबाईचे तर्फे प्रतिनिधि व सेनापति आडवे आले. धनसिंग जाधवरावांचे मनांत शाहूशीं

लढूं नये असें होतें. शाहू हा राज्याचा अधिकारी आहे, अशी त्यांची समजूत झाली होती. प्रतिनिधि परशुराम त्रिंबक मात्र पूर्णपणें ताराबाईकडे होते. परंतु धनसिंग जाधवराव हे हा शाहू खरा आहे कीं काय? याबद्दल गुप्त माहिती मिळविण्याचे खटपटीस लागले. प्रथम धनसिंग जाधवराव यांनीं खंडो बल्लाळ चिटणीस यांस निराळा वेष देऊन महाराजांचे गोटांत पाठविलें. खंडो बल्लाळ हे गोटांतील सर्वत्र मंडळीस भेटले. जोत्याजी केसकर व बंकी गाईकवाड यांच्याशीं मसलत करून महाराज खरे आहेत अशी खात्री करून घेतली. पुढें खुद्द शाहू महाराजांस जाऊन खंडो बल्लाळ हे भेटले. महाराजांची व खंडो बल्लाळांची भेट झाल्यानंतर महाराजांनीं खंडो बल्लाळ यांस प्रश्न केला कीं, 'आम्हांस राज्य कसें मिळावें? मातोश्री काकीसाहेब (ताराबाईसाहेब) ह्या आमच्यावर बदलून पडून त्यांच्या तर्फे सेनापति जाधवराव व प्रतिनिधि असे आमच्याबरोबर लढण्यास येऊन दाखल झाले आहेत. सेनापति धनसिंग जाधवराव हे युद्धांत प्रतिभीष्म आहेत. त्यांनीं औरंगजेबासारखा महापराक्रमी बलाढ्य व पृथ्वीपति बादशहास आपल्या पराक्रमानें पादाक्रांत करून धुळीस मिळविलें, हें आम्हांस खुद्द माहीत आहे. मग अशा शूर सेनापतींपुढें आमचा टिकाव कसा लागणार? तरी ते आपल्या मसलतींत येतील अशी सल्ला सांगावी.' खंडो बल्लाळ चिटणीस यानें थोडें स्तब्ध राहून महाराज यांस विनंति केली कीं—'सेनापति हे आपले आप्त असून त्यांच्याच घराण्यापासून आपल्या घराण्याचा उदय झालेला आहे. आपले आजे शिवाजीमहाराज हे जाधवरावांच्या कन्येचे पुत्र होत, हें आपणांस विदितच आहे. एका नात्यानें आपण त्यांचे मालक आहांत हें खरें; तरी आप्तसंबंधानें आपणास ते वडील आहेत; तरी आपण खुद्द वेष पालटून सेनापतीच्या गोटांत त्यांस भेटण्यास चलावें व त्यांस वडील समजून आपले मनोदय त्यांस कळवावे भीष्मानें निष्पांडवी पृथ्वी करीन अशी जेव्हां प्रतिज्ञा केली, तेव्हां पांडवांवर मोठें संकट आलें, त्यांचें त्यांनीं श्रीकृष्ण भगवान् यांच्या सल्ल्यानें द्रौपदीकरवीं भीष्मास शरण जाऊन निरसन केलें. यावेळीं आपण सेनापतीस भेटलां, तर आपल्या विनंतीचा ते अव्हेर करणार नाहींत. आपणांस त्यांजपासून कोणत्याही प्रकारचा दगा फटका होणार नाहीं.' असें खंडो बल्लाळ यानें आश्वासन दिल्यावर महाराज यांनीं ती गोष्ट मान्य करून बरोबर जोत्याजी केसकर यास घेऊन ते खंडो बल्लाळ चिटणीस यांसमागमें वेष पालटून सेनापतींच्या गोटांत गेले. गोटाबाहेर उभे राहिल्यावर खंडो बल्लाळ यांनीं सेनापतीपाशीं जाऊन सर्व राजकारण त्यांस विदित केलें, व महाराज आल्याची वर्दी दिली. त्यावरून सेनापति यांनीं डेऱ्याबाहेर येऊन महाराजांस सन्मानानें आंत नेलें. महाराजांनीं सेनापतीस वडिलांप्रमाणें मान दिला. उभयतांच्या भेटी होऊन महाराजांनीं आपलें हृद्गत सेनापतीस कळविलें व बोलले कीं,—'काकांनीं व आपण श्रम व साहस करून गेलेलें राज्य पुनः मिळविलें. काकांच्या पश्चात आम्हांस सोडविण्याकरितां आपण पुष्कळ प्रयत्न केले. मातोश्री काकीसाहेब यांनीं दुर्बुद्धि धरून आपणांस आम्हांवर पाठविलें, तरी आतां आपण वडील आहांत राज्यांवर हक्क कोणाचा, हें आपणांस विदित आहे. उदईक आपली व आमची लढाई होऊन आमचा निभाव आपल्यापुढें कसा लागणार?' असें म्हणून महाराज यांनीं वाईट तोंड केलें. त्याजवरून सेनापति जाधवराव यांस गहिंवर येऊन त्यांनीं महाराजांना पोटाशीं धरून मी आपल्याशीं लढाई देणार नाहीं, असें साफ सांगितलें. आपण आपल्या फौजेसह आमच्या फौजेवर खुशाल हल्ला करावा. आमचे हाताखालील सरदार व सैन्य आपले विरुद्ध शस्त्र धरणार नाहींत. व मीही उद्यां निःशस्त्र राहणार. प्रतिनिधि मात्र माझे विचारांत नाहींत. तथापि त्यांची मोठीशी काळजी करण्यास नको. याप्रमाणें जाधवराव सेनापतींनीं आश्वासन देऊन त्यांस मसलत दिली. नंतर महाराज यांस खंडो बल्लाळ समागमें देऊन आपले गोटाबाहेर पोहोंचविलें. याप्रमाणें महाराज आपले गोटांत सुखरूप येऊन दाखल झाले. दुसरे दिवशीं ठरल्याप्रमाणें महाराज यांनीं हत्तीचे पायीं आंदू घालून लढावयाचें म्हणून सिद्ध होऊन, बखतर व टोप घालून, हौद्यांत बसून, धनुष्यबाण हातीं घेऊन, ढाल-तरवार बांधून, युद्धाची तयारी केली. सेनापति व प्रतिनिधि सिद्ध होऊन लढाईस गेले. लढाईस प्रारंभ जाहला. प्रतिनिधि व आईसाहेब

यांच्या बाजूचे सरदार बहुत लढले. तिकडून परसोजी भोंसले व चिमणाजी दामोदर यांनीं घोडे चालवून लढाई केली. त्यांत महाराज यांनीं हत्ती चालवून तिरंदाजी केली. फौजेंत मिसळले. सेनापति हे आपल्या घोड्यापर्यंत महाराजांचा हत्ती येईपर्यंत स्तब्ध उभे राहिले. प्रतिनिधि वगैरे फौजेचा मोड होऊन पळूं लागले. तेव्हां सेनापतींनीं आपले विचारांतील सर्व सरदार घेऊन घोड्यावरून शाहू महाराजांस मुजरे नजर करून भेटले. महाराज तेथेंच खेडचे मैदानांत मुक्काम करून राहिले. सेनापति आपली फौज एकवटून तीन कोसांच्या अंतरावर महाराजांची आज्ञा घेऊन जाऊन उतरले व भीमातीरीं राहिले. याप्रमाणें मुक्काम मजकुरीं शके १६२९ सर्वजितन्नाम संवत्सरे इ० स० १७०८ साल समान मया व अलफ सालीं, लढाई संपून महाराज विजयी झाले. लढाई झाल्यावर प्रतिनिधी पळून सातार्‍यास गेले. दुसरे दिवशीं सेनापति यांनीं खंडो बल्लाळ यांस महाराजांकडे पाठवून सरदार लोकांच्या भेटीचा दिवस ठरवून मुक्रर केला, त्या दिवशीं सर्व सरदारांच्या महाराजांनीं भेटी घेतल्या व सर्वांस यथायोग्य चादरी व शेले घातले. यानंतर सुमुहूर्तावर धनसिंग जाधवराव यांस सेनापति पदाचीं वस्त्रें व बहुमान–पद्धतीप्रमाणें हत्ती, घोडे, जवाहीर वगैरे दिलें. खंडो बल्लाळ यांस चिटणीसाचीं वस्त्रें, कमलदान, शिरपेंच, कंठी, चौकडा वगैरे दिले आणि सरदार वगैरे यांस सरदारी वस्त्रें बहुमानपूर्वक दिलीं.

यानंतर सेनापतीसह कूच करून पुण्यास शाहूमहाराजांची स्वारी आली. तेथून कूच करून जेजूरीहून, वीरकल्हेहून, चंदन वंदन नजीक दहिंगांव येथें वाईप्रांतीं येऊन मुक्काम केला. चंदन वंदनचे हवलदार सुभेदार यांस बोलावून आणून त्यांस सर्फराज केलें. शेखमिरा वांईकर जमादार आपल्या लोकासुद्धां सातार्‍यावर होते. व प्रयागजी प्रभु सुभेदार व कारखानीस हवलदार यांस पत्रें पाठविलीं असतां ते भेटीस आले नाहींत. प्रतिनिधीनें व या मंडळींनीं पुन्हां महाराजांशीं लढाई देण्याची तयारी केली, तेव्हां सेनापतींनीं सुभेदार व शेखमिरा यांचे कबिले धरून आणिले; व तुम्ही सातारचा किल्ला स्वाधीन करा असें सांगून पाठविलें. त्यावरून प्रयागजी प्रभु व शेखमिरा यानें प्रतिनिधीस सांगितलें कीं, आमचे कबिले सेनापतीनें धरिले, तेव्हां महाराज राज्याचे खावंद; त्यांस किल्ला देऊन भेटावें. ही गोष्ट प्रतिनिधींनीं मान्य केली नाहीं. तेव्हां सर्वांनीं एकविचार करून प्रतिनिधीस कैद केलें, व महाराजांस किल्ला घेण्यास सांगून पाठविलें. याप्रमाणें वंदनावरून सातार्‍यावर येऊन हल्ला करून सातारा घेतला. शेखमिरा, सुभेदार व हवलदार येऊन भेटले. त्यांचीं कामें त्यांजकडेसच ठेविलीं. यानंतर शके १६२९ सर्वजितन्नामसंवत्सरे ( जानेवारी १७०८ ) सनसमान मया व अलफ माघ शुक्लपक्षीं सातार्‍यास येऊन, उत्तम मुहूर्त पाहून सिंहासन करून व व्रतबंध पूर्वक समारंभ करून विधिपूर्वक राज्याभिषेक केला. अष्ट प्रधान जे जे आले, त्यांस यथापद्धति पदाचीं वस्त्रें देऊन कार्यें सांगितलीं.

याप्रमाणें धनसिंग जाधवराव यांनीं शाहूमहाराज यांस राज्याभिषेक करविला. हें सेनापतीचें कृत्य पुष्कळ सरदार लोकांस आवडलें नाहीं. तथापि धनसिंग जाधवरावांनीं आपले शूरत्वाच्या हिमतीनें शाहूराजास राज्य मिळवून दिलें. यापुढें शाहूमहाराज जाधवरावांच्या घराण्याशीं कोणत्या तर्‍हेनें वागले, व बाळाजीपंत भट यांस आश्रय देऊन या घराण्याचें कितीं नुकसान केलें, त्याचें वर्णन यथाक्रमें येईल.

वर सांगितलें आहे कीं, शाहूमहाराज यांनीं प्रतिनिधीस कैद करून त्यास कडक शिक्षा करण्याचें मनांत आणिलें. परंतु धनसिंग जाधवरावांचे सांगण्यावरून त्यांनीं तो बेत रहित केला. पुढें धनसिंग जाधवरावांचे विचारें अष्टप्रधानांच्या नेमणुका होऊन परळी येथें रामदास स्वामींचे गादीवर स्वामींचे वडील भावाचा नातू गंगाधर स्वामी यांस बसवून संस्थानची नेमणूक व्यवस्था वगैरे करून दिली. याप्रमाणें धनसिंग जाधवरावांचे विचारें, शाहूमहाराज यांनीं राज्याभिषेकापासून सुमारें सहा सात महिने आपल्या राज्यांत सर्व स्थिरस्थावर करण्यांत घालविले.

ताराबाईसाहेब ह्या पन्हाळे किल्ल्यावर जाऊन आपले पुत्राचे नांवें राज्य करून त्या प्रांतीं दंगे करूं लागल्या, तेव्हां पावसाळा संपल्यावर सन १७०८ च्या आक्टोबरांत ताराबाईवर स्वारी करण्याकरितां शाहूमहाराज, धनसिंग जाधवरावांसह पन्हाळ्याकडे गेले. मार्गांत वसंतगड वगैरे किल्ले घेतले. पन्हाळ्यास जाऊन मोर्चे लावून पन्हाळा व पावनगड हे दोन्ही

किल्ले घेतले. कोल्हापुरीं ठाणें बसवून व तिकडील प्रांतीं अंमल बसवून रांगण्यावर गेले. ते समयीं आई-साहेब यांस तेथें दम निघेना, यामुळें त्या दोघां पुत्रांसह रामचंद्र अमात्यास घेऊन मालवणास निघून गेल्या. धनसिंग जाधवराव यांनीं रांगण्यास मोर्चे लाविले, व रांगणा घेतला. त्याची हकीकत अशी कीं, धनसिंग जाधवराव यांनीं महाराजांस बरोबर घेऊन रांगण्यास मोर्चे लाविले, त्यावेळीं आईसाहेब यांनीं खेमसावंत वाडीकर आणि कान्होजी आंग्रे यांची आंतून कुमक मागविली. त्याप्रमाणें त्यांनीं फौज घेऊन येऊन धनसिंग जाधवराव व महाराज यांजवर हल्ले करून रांगण्याचे मोर्चे उठविण्याचा यत्न सुरू केला. तेव्हां धनसिंग जाधवराव व महाराज यांनीं स्वतः स्वार होऊन किल्ला घेण्याची प्रतिज्ञा करून ते दोघेही किल्ल्यावर चढूं लागले. त्यावेळीं महाराजांचे घोड्याचा पाय घसरला, तेव्हां जवळ शेखमिरा, व खंडो बल्लाळ चिटणीस चालले होते; तेसमयीं चिटणीस यांनीं एका झाडास आपल्या पायाचा नेट देऊन, घोडा ओढून धरिला. व शेखमिरा यानें महाराजांस उतरून घेतलें. तेव्हां त्या दोघांवर खुष होऊन महाराजांनीं त्यांस सरंजाम व इनामें करून दिलीं. रांगण्याचे मोर्चे धनसिंग जाधवराव यांनीं मोठ्या नेटानें चालविले. वाडीकर सांवत व आंग्रे यांस समरंगणांतून पळवून लाविलें. मोठा अपघात झाला असतां त्यांतून सुटका झाली, सबब महाराज किल्ल्यावरून खालीं येऊन त्या दिवशीं किल्ला घेण्याचें तहकूब केलें. पुढें पुनः तयारी करावी तों पर्जन्यकाळ आला. व रांगण्यास मनस्वी पाऊस पडूं लागला. त्यामुळें धनसिंग जाधवराव यांनीं महाराजांस 'आपण किल्ल्याचे मोर्चे कायम ठेवून पावसाळा सातान्यास घालवून पुनः परत येऊं,' अशी सल्ला दिल्यावरून सेनापतीसह महाराज परत फिरून करवीर पन्हाळा येथें छावणीस येऊन त्या प्रांताचा बंदोबस्त करून नंतर महाराज सातान्यास आले. चंदनवंदन किल्ल्याखालीं छावणी केली. धनसिंग जाधवराव सेनापति वृद्ध असून त्यांचे पायास जखमेचा व्रण होता. तें दुखणें अधिक होऊन धनसिंग जाधवराव हे वडगांव येथें, वारणेच्या तीरीं शके १६३२ इ. स. १७१० मध्यें वारले. या शूर व अद्वितीय पुरुषाचा आपलें कर्तव्यकर्म करीत असतां अंत झाला. यामुळें सर्व महाराष्ट्राचें फार नुकसान झालें. धनसिंग जाधवराव यांचा मृत्यु ते वयोवृद्ध असून देखील आपलें कर्तव्य करीत असतांच झाला, हें त्यांस भूषणावह आहे.

सर्व महाराष्ट्र या थोर पुरुषाच्या मरणानें हळहळलें एवढेंच नव्हे तर दिल्लीपति बादशहा व त्या वेळचे राज्यकर्ते पुरुष यांस हळहळ वाटून त्यांनीं जाधवरावांची फार वाखाणणी केली. धनसिंग जाधवराव हे प्रतिभीष्म होते, असें सर्व महाराष्ट्राचे तोंडांतून उद्गार निघाले. महाराजांना अत्यंत शोक झाला व आपल्या पक्षाचें फार नुकसान झालें असें वाटूं लागलें. 'आमच्यावर जाधवरावांनीं मोठे उपकार केले व आम्हांस हें राज्य मिळवून दिलें' असे महाराजांनीं उद्गार काढले. या थोर पुरुषाची निरनिराळ्या ग्रंथकर्त्यांनीं पुष्कळ स्तुती केली आहे. ती दिली असतां एक स्वतंत्र ग्रंथच होईल. खुद्द ताराबाई साहेब यांनीं त्यांचे चिरंजीव चंद्रसेन जाधवराव यांस दुखवट्याचें पत्र लिहिलें, व त्यांत आपला अभिप्राय त्यांनीं व्यक्त केला. तो खालीं लिहिल्याप्रमाणें:—

* 'जाधवराव कैलासवासी स्वामींचे संपूर्ण कृपेस पात्र झाले, ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकूमबारदारी एकनिष्ठेवरी झाले; राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांहीं सामान्य कसाला, श्रमसाहस केला नाहीं. जीविताची तमा न धरितां स्वामिकार्यीच तत्पर राहून, कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला, ते समयीं कर्नाटकांत फौजांनीं धांवून जाऊन, स्वामींस प्राप्त झालीं संकटें निरसन करून, स्वामींगौरवाचें सुख त्यांहींच अनुभविलें व सेवाधर्मेकरून त्यांहींच कैलासवासी स्वामींस संतुष्टविलें, तेव्हां स्वामींस मशारनिल्हेविना दुसरें प्रिय कीं प्राण ( कोणी ) होते असें नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरंवसा दृढ मनीं मानिला होता. तदनुरूपच राव मशारनिल्हेनीं स्वामींचे चरणीं चित्तालय करून, औरंगजेबासारखा मोठा शत्रु राज्यांत पसरला असतां, आपल्या शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगें शत्रूचा हिसाब न धरितां राज्याचे संरक्षणार्थ असाधारण कसाला केला. स्वामींच्या

* भारतवर्ष, द्वितीयावृत्ति, पत्रें यादी, अं. ५०.

तपोबलप्रभावेंकरून शत्रु पराभव पावविल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त झालें.'

वर लिहिल्याप्रमाणें प्रत्यक्ष राजकर्त्री व महान् शहाणी ताराबाई साहेब यांचा सेनापती धनसिंग जाधवराव यांजबद्दल अभिप्राय आहे. त्यावरून धनसिंग जाधवराव यांनीं कशा संकटांतून मराठ्यांचें राज्य वांचवून महाराष्ट्रशाही स्थापन करण्यास पुढील मार्ग मोकळा करून दिला, हें दिसून येईल.

**गुण**—धनसिंग जाधवराव यांच्या आंगचे थोर गुण म्हटले म्हणजे परोत्कर्षसहिष्णुता, स्वार्थत्याग, एकनिष्ठपणा व शौर्य हे गुण अगदीं त्यांच्या एकंदर चरित्रांत स्पष्ट दिसून येतात. धनसिंग जाधवराव यांनीं कधीं कोणाची निंदा व नुकसान केल्याचें दिसून येत नाहीं. प्रत्यक्ष बादशहाच्या सैन्यावर अनेक हल्ले करून असाधारण असे अनेक जय मिळविले, व त्याजबद्दल जयसिंह असा किताबहि मिळविला; येवढेंच नव्हे, तर प्रत्यक्ष मराठी राज्य स्थापन करणारे श्रीशिवाजी महाराज यांनीं या थोर पुरुषाची केलेल्या कामगिरीबद्दल स्तुति करून पाठ थोपटली, व 'जाधवराव, तुम्हांस देवलोकाहून देवानें आमच्या साह्यार्थ पाठविलें आहे, असें आम्हांस वाटतें!' असे उद्गार काढून त्यांचा धन्यवाद गाइला आहे. अशा पुरुषाला रामचंद्रपंत अमात्य यांनीं मध्यें पडून सेनापति-पद मिळूं दिलें नाहीं. तें पद राजाराम महाराज हे धनसिंग जाधवराव यांस देण्यास तयार असतांना त्यांच्या हाताखालील संताजी घोरपडे यांस रामचंद्रपंतांनीं तें पद देवविलें. पुढें संताजी घोरपडे, महाराज यांजवर फिरून पडले, त्यामुळें महाराज, यांनीं त्यांस नोकरींतून दूर केलें असतां ते रानोमाळ एकटे फिरतां फिरतां म्हसवड मुक्कामीं आले. तें म्हसवडकर माने देशमूख यांस कळल्यावरून त्यांचीं ह्यांची खाजगी चुरस असल्यामुळें मान्यांनीं संताजीवर हल्ला करून, शिर कापून, बादशहाकडे पाठविलें. (पहा, फलटणकराची बखर) संताजी घोरपड्यास जरी हें पद दिलें तरी धनसिंग जाधवराव यांनीं आपले कामांत कोणतेही प्रकारें कसूर न करितां ते एकनिष्ठेनें महाराजाशीं राहिले. खाफीखान वगैरे मुसलमान इतिहासकर्ते धनसिंग जाधवराव यांनीं घोरपड्यांवर सैन्य पाठवून त्यांचा नाश केला असें म्हणतात. हें सर्वथैव खोटें आहे. याबद्दल थोरले राजाराम महाराज यांचे बखरींत मल्हारराव रामराव चिटणीस यांनीं लिहिलें आहे, त्यांत मजकूर असा आहे कीं, संताजी घोरपडे हे कांहीं कारणानें चंदीत महाराजांकडील लोकांशीं तंटा करून झुंजले. यावरून त्यांजवर माने सरदार पाठविले व हल्ला करविला. तेव्हां सरदार लोक यांनीं बहुत रदबदली करून मातबर माणूस चाकरीवर मारावें. म्हणून रहाविलें. इतराजी जाहली. सेनापति पद धनसिंग जाधवराव यांस दिलें. याप्रमाणें चिटणीसानीं मजकूर दिला आहे. या मजकुरावरून धनसिंग जाधवराव यांनीं खाफीखान म्हणतो तसें संताजीस मारविलें, हें साफ खोटें ठरत आहे. संताजीच्या नाशामध्यें धनसिंग जाधवराव यांचें अंग नसून, उलट त्यांनीं राजाराम महाराज यांस दोन गोष्टी सांगून त्यांस जीवदान देऊन सोडून दिलें. असेंच वरील मजकुरावरून सिद्ध होत आहे. पुढें माने देशमुखांनीं खासगी चुरसेवरून संताजीस ठार मारिलें. तेव्हां याबद्दल धनसिंग जाधवराव यांजवर बिलकुल दोष नाहीं. आपणांस सेनापति पद न देतां घोरपड्यास दिलें, याबद्दल त्यांनीं कधींही नाखुषी दर्शविली नाहीं. अथवा आपल्यास महाराजांनीं सेनापति पद दिलें नाहीं, या बद्दल, जसे संताजी घोरपडे महाराजा विरुद्ध उठले, तसे हे उठले नाहींत. यावरून धनसिंग जाधवराव हे लोकांचा उत्कर्ष जाहला असतां त्यास विघ्न आणणारे नव्हते. हें उघड दिसतें. धनसिंग जाधवराव यांस राजाराम महाराज वारल्यानंतर सर्व राज्याचा अधिकार मिळाला होता. ते करतील तें दरबारांत प्रमाण होतें. मुलकी व लष्करी दोन्हींही खातीं त्यांच्या ताब्यांत होतीं. तरी त्यांनीं आपले नावानें छत्रपतीकडून एकही जाहागिरीची सनद करून घेतली नाहीं. एवढेंच नव्हे तर लोकांच्या पाटीलक्या व देशमुख्या खरेदी करून घेतल्या, व त्याबद्दल सरकारांत नजराणा भरून त्यांचीं दुमालपत्रें करून घेतलीं. नाहीं म्हणायास, फक्त एक राजाराम महाराज यांनीं बोरगांव व पाडळी हीं दोन्हीं गांवें सनद करून दिलीं आहेत. त्यांनीं ब्राह्मण व मराठा हा भेद अंतःकरणांत मुळींच वागविला नाहीं. त्यानीं वसुलाच्या खात्यावर दौलत संबंधीं लिहिण्याचे कामावर बाळाजी विश्वनाथ भट व आबाजीपंत पुरंदरे यांस नेमिलें होतें. व

त्यांजवर त्यांचा विश्वास व लोभ होता. व वेळोवेळीं त्यांनीं बाळाजीच्या हुशारीबद्दल शाहूमहाराजांकडे तारीफ केलेली आहे. हा थोर पुरुष महाराष्ट्र-राज्य-संस्थापक श्रीशिवाजीमहाराज छत्रपति ह्यांच्या अस्सल तालमीतला होता. व शिवाजीमहाराजांचे राजकीय मार्ग व रीती त्यांस पूर्णपणें अवगत होत्या. थोरले महाराजांचे कारकीर्दीत जे प्रमुख मुत्सद्दी तयार झाले ते बहुतेक स्वार्थत्यागी होते, म्हणूनच मुसलमानांचे कचाट्यांतून दक्षिणदेश स्वतंत्र जाहला. या स्वार्थत्यागाचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून पुढील मुत्सद्दी मंडळींनीं त्यांची रीत उचलली असती, तर मराठेशाहीचें कल्याण झालें असतें. पुढें मंडळी कशी स्वार्थी झाली त्याचें वर्णन पुढें देऊं. ह्या वरील विवेचना वरून धनसिंग जाधवराव हे स्वार्थत्यागी होते हें स्पष्ट होत आहे. त्यांच्या अंगीं एकनिष्ठपणा होता. याजबद्दल मुळींच वाद नाहीं. एकदां भोंसल्याचे अंकित झाल्यावर मराठेशाही विरुद्ध एक काडीइतकीही खटपट त्यांनीं कधीं केली नाहीं. औरंगजेब बादशहासारख्या पुरुषानें त्यांचें मन आपलेकडे वळविण्याकरितां हजारों खटपटी केल्या व लालुची दाखविल्या; तरी त्यांस न जुमानतां मराठेशाहीकरितां दारिद्र्य व हाल अपेष्टा भोगून, कांदा भाकरी खाऊन, श्रम व साहस करून राज्य वांचविलें. यापरता एकनिष्ठपणा तो कोणता असावा? दुर्दैवानें या थोर गुणांबद्दल धनसिंग जाधवराव यांची तारीफ इतिहासकारानें जितकी करावयास पाहिजे, तितकी केली नाहीं. तरी सरदेसाई यांनीं त्यांचे खरे गुण ओळखून त्यांजबद्दल दोन शब्द लिहिलेले आहेत, ही समाधानाची गोष्ट होय. आतां शौर्याबद्दल प्रत्येक इतिहास-कारानें त्यांची स्तुति केलीच आहे. त्यांचें नांव ऐकून मुसलमान लोकांस विलक्षण कांपरें भरे, मोंगल शिपाई घाबरून जात, हें सुप्रसिद्धच आहे. त्यांजबद्दल, त्यांच्या निरनिराळ्या मोहिमांबद्दल, व लढायांबद्दल वर्णन करूं लागलें असतां, निराळा ग्रंथ करावा लागेल. ( असा ग्रंथ होणें श्रेयस्कर आहे. ) प्रस्तुत स्थळीं येवढेंच वर्णन पुरे.

धनसिंग जाधवराव यांचे हाताखालीं जे सरदार लोक व इतर सैन्यांतील लोक होते, ते धनसिंग जाधवराव यांजवर अत्यंत प्रेम करीत असून त्यांचे ठायीं सर्व लोकांची निष्ठा होती. त्यांच्या करितां हजारों वीर प्राण देण्यास तयार होते. त्यांच्या सैन्यामध्यें विशेष शिस्त नव्हती, असें जरी इतिहासकार म्हणतात, तरी तेच पुनः असें लिहितात कीं, धनसिंग जाधवरावासारखा मोंगलांवर तुटून पडून हल्ला करणारा एकही वीर पुरुष नव्हता, व अशा वेळीं त्यांच्या हाताखालील प्रत्येक सरदार व शिपायी या कामीं मनापासून त्यांस मदत करित असत; व त्याचमुळें धनसिंग जाधवराव यांनां हजारों जय मिळाले. शिस्त असून भाडोत्री शिपायी प्रसंगीं कसे कुचकामीं ठरतात, तें संताजीचें व पुढील पेशवाईमधील लष्करी लोकांच्या वर्तनावरून सहज दिसून येतें. धनसिंग जाधवराव यांचा इमानी शिपाई व सरदार कोणीकडे? व पेशव्यांतील सदाशिवराव भाऊ यांचे भाडोत्री शिपाई कोणीकडे? राष्ट्रावर प्रीति करणाऱ्या स्वातंत्र्याभिलाषी, स्वार्थत्यागी धनसिंग जाधवरावांच्या हाताखालील शिपायांच्या हातून केवढें राष्ट्रकार्य झालें, व सदाशिवरावांच्या हाताखालील स्वार्थी व भाडोत्री शिपायांच्या हातून राष्ट्राचें कसें नुकसान झालें, हें इतिहासावरून दिसून येईल. शिवाजी महाराज व धनसिंग जाधवराव वगैरे पूर्वकालीन मराठी मुत्सद्यांच्या तालमींत नीतिमान् व स्वातंत्र्याभिलाषी लोकनायक कसे तयार झाले, व पेशवाईत स्वतः पेशवे स्वार्थी बनल्यानें सर्व लोक स्वार्थी व राष्ट्रास विघातक कसे निर्माण झाले, याबद्दल महाराष्ट्राचा इतिहासच साक्ष देत आहे. धनसिंग जाधवराव यांचें निधन शके १६३२ इ. स. १७१० मध्यें झालें. त्यांचें कुटुंब सौभाग्यवती गोपिकाबाई यांनीं सहगमन केलें. त्यावेळीं त्यांचे वडील चिरंजीव संताजी ऊर्फ सुजनसिंह, चंद्रसेन व शंभुसिंग असे तिघेही पुत्र मरणकाळीं हजर होते. या महापुरुषाचें देहावसान वारणा नदीच्या कांठच्या वडगांव मुक्कामीं झालें. त्यावेळेस स्मशानयात्रेस शाहू महाराज, अष्टप्रधान, अमीरउमराव व हजारों मराठे सरदार हे आपआपल्या सैन्यानिशीं हजर होते. जाधवरावांचें प्रेत उत्तम शृंगारलेल्या पालखींत घालून बरोबर सर्व सैनिकांनीं व खुद्द महाराज व त्यांचे अष्टप्रधान, कारभारी, कारकून वगैरे

सर्व लोकांनीं जाऊन स्मशानभूमीपर्यंत पोहोंचविलें. त्यांच्या वडील पुत्राच्या हातून यथाशास्त्र प्रेतसंस्कार करवून त्यांचे कुटुंबासह त्यांस एकाच चितेवर ठेवून मंत्राग्नि देण्यांत आला. रीतीप्रमाणें लष्करी सलामी होऊन तोफा झाल्या. त्यांचे हाताखालील हजारों सरदार व लाखों सैनिक दुःखभरित होत्साते शोकार्णवांत निमग्न झाले, व महाराष्ट्रांतील मोठा कर्ता मनुष्य जाऊन आपला वाली नाहींसा झाला, असें म्हणूं लागले. खुद्द शाहू महाराज यांस अत्यंत शोक होऊन आपला पक्ष निर्बळ झाला, असें त्यांस वाटलें. तिकडे ( रांगण्याकडे ) ताराबाईसाहेब यांस मजकूर विदित जाहल्यावरून त्यांनींही फार दुःख केलें. लाखों रुपये दानधर्म करण्यांत आला, व त्यावेळीं त्यांच्या तिघां पुत्रांनीं भूमिदान केलें. त्याबद्दलची सनद श्री. शंभुसिंगजी यांच्या दप्तरीं सांपडली आहे. तिची नक्कल खालीं लिहिल्याप्रमाणेंः—

**श्री.**

निशाण ४

वेदमूर्ती राजश्री काशीनाथ भट उपाद्धे चावरे वस्ती श्रीक्षेत्र माहुली गोसावी यांसी—

छ अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने० संताजी जाधवराऊ व चंद्रसेन जाधवराऊ व संभाजी जाधवराऊ दंडवत सुम्मा तिस्सा मया अलफ, दिलें वृत्ती पत्र ऐसाजे. तीर्थरूप राजश्री बाबांनीं कसबें वेडगांवचीं मुक्कामीं कैलासवास केला. सौभाग्यवती मातोश्री गोपिकाबाईनें सहगमन केलें. त्यांचें उत्तरकार्य यथाविधिपूर्वक केलें. ते समयीं भूमिदान तुम्हास उदक घालून दिलें. जमीन विसापांडाच्या बिघायानें २ दोन दिले असे. आमच्या खाजगत देशमुखीचे इनामापैकीं व पाटीलकी पैकीं देविले असे. कीर्दकरून उत्पन्न होईल तें भक्षून स्नानसंध्या करून सुखरूप राहणें. येविषयीं राजश्री तुवाजी गोविंद यांसी अलाहिदा पत्र दिलें आहे. ते जमीन नेमून देतील त्याप्रमाणें अनुभउन सुखरूप राहणें. तुमचे वंश परंपरेनें चालवून जाणिजे चंद्र २ जमादिलावर

मोर्तब

श्री
राजाराम चरणीं
दृढभाव सेनापति
धनाजी जाधव-
राव

अशी सनद वेदमूर्ति पिलंभट चावरे वस्ती मालेगांव यांचे जवळ आहे.

---

**भाग तिसरा समाप्त.**



# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग चौथा.

### अनुक्रमणिका.

( इ. स. १७११ ते १९१० ).

स्वराज्य व मालेगांव येथाल

# जाधव घराण्याची कैफियत.

## भाग चौथा.

(इ० स० १७११ ते १९१० पर्यंत.)

### चंद्रसेन जाधवराव.

( सन १७११ पासून सन १७३१ पर्यंत )

तिसऱ्या भागांत सांगितल्याप्रमाणें उत्तरकार्य वगैरे होऊन महाराजांसह चंद्रसेन जाधवराव, सुजनसिंह ऊर्फ संताजी व शंभूसिंग हे साताऱ्यास गेले. धनसिंग जाधवरावांचे वडील चिरंजीव सुजनसिंह यांचेकडे वडिलार्जित उत्पन्न, बोरगांव, पाडळी वगैरे धनसिंग जाधवरावांनीं मिळविलेलीं इनाम गावें, व देशमुखी पाटीलक्या वगैरे सर्व उत्पन्न त्यांच्या वडिलांनीं सोंपविलें होतें. त्याप्रमाणें महाराजांनीं कबूल करून त्यांच्या वडिलांच्या पश्चात् त्यांजकडे सुमारें ४० हजारांच्या पाटीलक्या, व देशमुख्या व इनाम गांव वगैरे मिळून उत्पन्न चालू केलें. संताजी जाधव हे धनसिंग जाधवराव यांच्या वडील कुटुंबाचे चिरंजीव असून सर्वांत वडील होते. पुढें जाधवरावांनीं दुसरें लग्न केलें. त्यांजपासून चंद्रसेन व शंभुसिंग असे दोन चिरंजीव त्यांस जाहले. संताजीचें व वडिलांचें साधारण बरें नसल्यानें त्यांस राज्यकारभारांतलें काम न सांगतां वडिलार्जित उत्पन्नावर ठेविलें होतें. संताजी स्वभावानें तामसी व रागीट असून, स्वतंत्र राहण्याची इच्छा करीत असत. त्याप्रमाणें त्यांची व्यवस्था ठेवण्यांत आली होती. महाराजांनीं पुढें हीच व्यवस्था कायम करून धनसिंग जाधवरावांचे दुसरे चिरंजीव चंद्रसेन जाधवराव यांस शके १६३२ मध्यें सेनापतीचीं वस्त्रें दिलीं व शंभुसिंग जाधवराव यांस त्यांच्या ( सेनापतीच्या ) मुतालिकीचीं वस्त्रें दिलीं. शाहू महाराजांचे बाजूची मंडळी बहुतेक सर्व ताराबाई साहेब यांस जाऊन मिळाली होती. शाहू महाराजांचे तर्फे चंद्रसेन जाधवराव, हैबतराव निंबाळकर, सरलष्कर खंडेराव दाभाडे, मानसिंगराव मोरे, परसोजी भोंसले, चिमणाजी दामोदर, बहिरोपंत पिंगळे व खंडो बल्लाळ इतकी मंडळी होती. ताराबाई साहेब यांच्या बाजूस अप्पाजी व दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे, रामचंद्र नीळकंठ अमात्य, वाडीकर खेमसांवत, उदाजी चव्हाण, कान्होजी आंग्रे, शंकराजी नारायण सचीव व परशुरामपंत प्रतिनिधि इतकी मंडळी होती. ताराबाई साहेब यांच्या तर्फे सुप्याकडे दमाजी थोरात, भोराकडे सचिव, फलटणाकडे शहाजी निंबाळकर, मिरजेकडे उदाजी चव्हाण, दक्षिण कोंकणांत खेम सांवत, उत्तर कोंकणांत कान्होजी आंग्रे याप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं सरदार लोकांनीं मुलूख व्यापून टाकिला होता. पुण्यापासून कोल्हापूर पर्यंत त्यांनीं दंगा उसळून दिला होता. मोंगलांच्या तर्फे उगाच ढोंग करून कृष्णराव खटावकरानें कृष्णेच्या पलीकडील सगळा माणदेश आटोपला होता. प्रतिनिधीच्या औंध प्रांतांतही शाहू महाराजांच्या विरुद्धच खटपट चालू होती. तशांत धनसिंग जाधवराव वारल्यानें ताराबाईच्या पक्षास फारच जोर आला. अशा भयंकर स्थितींत शाहू महाराज होते. यावेळीं ताराबाईसाहेब यांनीं चोहोंकडून सरदार लोकांस उठवून शाहू महाराजांची अगदीं गाळण करून टाकिली. तेव्हां त्यांनीं सन १७११ मध्यें दमाजी थोरात, उदाजी चव्हाण वगैरे ताराबाईचे तर्फेच्या सरदारांवर सेनापति चंद्रसेन जाधवराव यांस रवाना केलें व त्यांचा बंदोबस्त करून मोंगलाईतील मराठ्यांचे हक्क चौथाई, सरदेशमुखी व घांसदाणा हेही वसूल करण्याचें काम सांगितलें. यावेळीं चंद्रसेन जाधवराव यांनीं बाळाजी विश्वनाथ भट यांस बरोबर घेतलें. बाळाजी विश्वनाथ व चंद्रसेन जाधवराव सेनापति

या उभयतांमध्यें या स्वारींत वांकडें आलें. त्याचें कारण व बाळाजी विश्वनाथ भट हा धनसिंग जाधवराव यांच्या पदरीं मुलकी कारकून म्हणून कसा राहिला, व तो पुढें पेशवा कसा झाला, याची हकीकत खालीं लिहिल्याप्रमाणें दिली आहे तीः—

बाळाजी विश्वनाथ हा मूळचा कोंकणांतील श्रीवर्धन नांवाच्या गांवीं राहणारा होय. राजारामाच्या मृत्यूनंतर म्हणजे इसवी सन १७०० च्या सुमारास मराठ्यांच्या शत्रूंनीं बरीच उचल घेतली, त्या भरांत म्हणजे इसवीसन १७०१ च्या सुमारास श्रीवर्धनास जानोजी विश्वनाथाचें शिद्दीशीं वांकडें येऊन, शिद्दीनें जानोजीस पकडून जंजिऱ्यांत नेलें, व गोणत्यांत बांधून समुद्रांत बुडविलें. त्या दहशतीनें बाळाजीनें देशांतर करण्याचा निश्चय केला. मुलांमाणसांसह श्रीवर्धन सोडून, बाणकोट खाडीच्या दक्षिणतीराजवळ वेळास म्हणून गांव आहे, तेथें भानू आडनांवाचे बाळाजीचे घरोब्याचे स्नेही रहात होते, त्यांजकडे तो आला तेव्हां त्रिवर्गबंधु भानूही बाळाजीबरोबर देशांतरीं जाण्यास सिद्ध जाहले.

ह्याप्रमाणें भानू व बाळाजीपंत हे साताऱ्यास जाण्याच्या इराद्यानें निघून पुरंदर किल्ल्यानजीक सासवडास आले. व सासवडचे कुळकर्णी व देशपांडे अंबाजीपंत पुरंदरे यांजकडे मुक्कामास उतरले, पुढें रोजगाराविषयीं सर्व मंडळींचीं बोलणीं होऊन पुरंदरे व सर्व मंडळी साताऱ्यास आली. साताऱ्यास महादाजी कृष्ण जोशी यांचा व भानूंचा परिचय होता. त्यावरून जोशी यांजकडे जाऊन ते भेटले व त्यांचे मार्फत भोरास शंकराजी नारायण सचिव यांजकडेस कारकुनीवर राहिले. पुढें इ० सन १७०६ च्या सुमारास बाळाजी व अंबाजीपंत पुरंदरे यांस धनाजी जाधवराव सेनापति यांनीं त्यांची हुषारी वगैरे पाहून आपले पदरीं दौलतीसंबंधाचे लिहिण्याचे कामावर ठेविलें. व तेही हुषारीनें कामकाज बघत आले. यामुळें धनाजी जाधवरावांचा त्यांवर लोभ व विश्वास विशेष जडला.

धनसिंग जाधवराव यांजकडे राजारामहाराज वारल्यानंतर वसुलाचें व लष्करी अशीं दोन्हीही कामें आलीं; येवढेंच नव्हे; तर सर्व राज्याचा बंदोबस्त त्यांच्याकडे होता. पुढें लढाईचें काम एकट्यावर पडल्याकारणानें मुलकी कामास कोणी चांगले कारकून पाहिजे होते म्हणून त्यावेळीं नुकतेच बाळाजी विश्वनाथ व अंबाजीपंत पुरंदरे हे दोघे शंकराजी नारायण सचिव यांचे नोकरींतून कमी करण्यांत आले होते ते मोकळे आहेत असें पाहून त्या दोघांसही धनसिंग जाधवराव यांनीं आपले पदरीं ठेविलें. त्यांनीं कांहीं दिवस नोकरी केल्यावर बाळाजी विश्वनाथ हा स्वार्थी व लबाड आहे, असें चंद्रसेन जाधवराव यांच्या नजरेस आलें व त्याबद्दल त्यांनीं वडिलांस (धनसिंग जाधवराव यांजकडे) हे आपले पदरीं नसावेत म्हणून सांगितलें. परंतु जाधवरावांच्या मनांत त्याचेबद्दल कांहीं आलें नाहीं. जाधवराव स्वतः यावेळीं फार वृद्ध झाले असून, त्यांच्यानें लढाईचीं कामें संभाळून बाकीच्या दुसऱ्या कामांची दगदग होत नसे. बाळाजी विश्वनाथ हा मुलकी कामांत हुषार असून बुद्धिमान् होता, व आपले धन्यावर छाप कशी ठेवावी या कामीं तो निपुण होता. जात्या कोंकणस्थ असून स्वार्थी व गोड बोलून, आपला स्वार्थ कसा साधून घ्यावा, हें तो जाणत होता. धनसिंग जाधवराव स्वतः उदार बुद्धीचे असल्यामुळें व वयोवृद्ध असल्यामुळें या कोकणस्थ भट ब्राह्मणाचीं कसबें त्या वेळीं त्यांस जाणण्याची शक्ति नव्हती. अशा साध्या स्वभावाचे धन्यावर सहजच बाळाजीनें आपली छाप बसविली. ही गोष्ट चंद्रसेन जाधवराव यांस पूर्ण अवगत होती व हा कोंकणस्थ ब्राह्मण आपले पदरीं नसावा अशी त्यांची पूर्ण इच्छा होती. चंद्रसेन जाधवराव यांचे मनांत शाहूमहाराजांसारखा ऐषआरामी राजा गादीवर नसावा, परंतु खंडोबल्लाळ चिटणीस व बाळाजी या दोघांनीं विचार करून आपणांस पुढें मागें मोठेपणा मिळविण्याचे हेतूनें शाहूमहाराज यांजकडे जाऊन, त्यांच्याशीं सल्ला मसलत करून धनसिंग जाधवराव यांजकडे त्यांस घेऊन येऊन, जाधवराव यांस खेड मुक्कामीं महाराजांच्या बाजूस वळविलें. व सेनापति जर या प्रसंगीं शाहूस मिळाला नसता, तर शाहूची उचल बांगडी तेव्हांच होऊन ताराबाईचा पक्ष कायम झाला असता. चंद्रसेन जाधवराव यांस या सर्व गोष्टी विदित होत्या; परंतु बापापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. पुढें

चंद्रसेन जाधवराव सेनापति जाहल्यावर बाळाजीवर त्यांची हुकमत सुरू जाहली, व हा कावेबाज मनुष्य राज्यांत नसावा, असें त्यांस वाटत होतें. चंद्रसेन जाधवराव यांस ताराबाईच्या मुलाचा राज्यावर अधिकार असून, शाहूमहाराजांसारखा ऐषआरामी व नेभळा राजा मराठेशाहीच्या तख्तावर नसावा, असें पूर्णपणें वाटत होतें; परंतु आपले वडिलांनीं त्यास आश्रय देऊन राजा केलें. तेव्हां त्यांजपुढें त्यांनीं विशेष वाटाघाट केली नाहीं. एवढें मात्र खरें कीं, हा कोंकणस्थ ब्राम्हण कधीं तरी शाहूमहाराज यांस फसवून मराठ्यांचे हातचें राज्य घालवील असें ते पूर्णपणें जाणून होते. अशाच तऱ्हेचीं मतें सर्व मराठे सरदारांचीं व सचिव, प्रतिनिधी, अमात्य वगैरे देशस्थ जुन्या ब्राह्मण सरदारांचीं झालीं होतीं. बाळाजीपंताबद्दल अशा तऱ्हेचें चंद्रसेन जाधवराव यांचें मत झाल्यामुळें, त्यास अजिबात नाहींसें करण्याचा त्यांचा इरादा होता. एवढेंच नव्हे, तर साताऱ्चे गादीवर ताराबाईचा मुलगा बसवून, राज्यांतील दुही मोडून टाकण्याचा त्यांचा यत्न होता. मुसलमान बादशहानें मराठ्यांत दुही माजावी म्हणून शाहूमहाराज यांस मुद्दाम सोडून दिलें. व त्याप्रमाणें मराठ्यांचे गादीविषयीं अनायासेंच तंटा उपस्थित झाला. चंद्रसेन जाधवराव सेनापति, शंकराजी नारायण सचीव, प्रतिनिधि व अमात्य वगैरे जुने सरदार यांच्या मतें मराठेशाहीवर एकट्या भोंसले घराण्याचा हक्क नसून, दक्षिणेंतील मराठे, ब्राह्मण, प्रभु वगैरे जातींची सत्ता आहे, असें होतें; व या प्रत्येक लोकांस आपला हात राज्यकारभारांत पूर्ण असावा असें वाटत होतें. शाहू हा राज्याधिकारास हापापलेला असून राज्यकारभार चालविण्यास नालायक होता. (ही गोष्ट इतिहासावरून व्यक्त झाली आहे.) अशी या लोकांची समजूत होती. बाळाजीनें शाहू महाराजांशीं आंतून सूत्र ठेविलें होतें. याप्रमाणें चंद्रसेन जाधवराव व बाळाजी यांचेमध्यें चुरस वाढतां वाढतां चंद्रसेन जाधवराव सेनापति यांस स्वारीवर पाठविलें; म्हणून मागें सांगितलें आहे.

एके दिवशीं लष्कर कूच करीत असतां एक हरिण उठलें. त्याचे मागें बाळाजीच्या पथकांतील पिराजी राऊत नांवाचा सरदार लागला. पळतां पळतां पुढें मुक्कामावर डेरे राहुट्या लागल्या होत्या, त्यांत व्यासराव म्हणून जाधवरावांकडील एक ब्राह्मण कारकून होता, त्याचे राहुटींत तें हरिण शिरलें. त्यावरोबर व्यासराव व पिराजी यांचा तंटा लागला. पिराजी आपली शिकार मागूं लागला. व्यासराव म्हणाला,– 'आम्हीं ब्राह्मण, आमचे राहुटींत आलें त्याचें संरक्षण आम्हीं करणार.' शेवटीं पिराजीनें भाला टाकिला तों व्यासराव पुढें झाला; त्यास तो लागला. जखम झाली. हें वर्तमान पिराजीनें बाळाजीस जाऊन कळविलें. इकडे व्यासरावानें जाधवरावाकडे फिर्याद केली. तेव्हां पिराजीस आमचे स्वाधीन करा असें जाधवरावानें बाळाजीस कळविलें. बाळाजीनें उत्तर दिलें,– पिराजी आम्हांस शरण आला आहे, त्यास जी शिक्षा करावयाची ती आम्हीच करितों. त्यावरून दोघेही आग्रहास पडले. जाधवरावानें बाळाजीवर फौज रवाना केली व पिराजीस पकडून आणण्यास सांगितलें. तेव्हां बाळाजी आपल्या पथकासह कूच करून निघाला. जाधवरावानें पाठलाग सुरू केला. तेव्हां बाळाजी पळत पळत पुरंदर किल्ल्यावर सचिवाच्या आश्रयास गेला. त्याउपर जाधवरावानें बारामतीवरून सुप्यास येऊन पुरंदरास शह दिला व सचिवास सांगून पाठविलें कीं, बाळाजीस काढून द्या नाहीं तर, तुमचा खराबा करूं. यावरून सचिवानें बाळाजीस घालवून दिलें. बाळाजी बाहेर पडून, कुंटुंब, मुलें व अंबाजीपंत पुरंदरे यांसह निघून, पांच सातशें नवे स्वार ठेवून निरेवर आला. तेथें लढाई होऊन बाळाजी पराभव पावला. तेव्हां तो परिंचे (ता० पुरंदर) गांवावरून पांडवगडच्या रानांत शिरला. यावेळीं बाळाजीच्या शिलेदारांत पिलाजीराव जाधव वाडीकर व परिंच्याचे नाथाजी धुमाळ हे दोन गृहस्थ होते, त्यांनीं हरप्रयत्न करून बाळाजीस कुटुंबासह पांडवगडच्या किल्ल्यावर सुरक्षित पोंचविलें. पांडवगड हा किल्ला वांईजवळ आहे. (१७१० ची अखेर)

पांडवगडाहून बाळाजीनें ही हकीकत महाराजांस कळविण्याकरितां अंबाजी पुरंदरे यांजला साताऱ्यास पाठविलें. अंबाजी व खंडो बल्लाळ यांचा स्नेह होता. त्यांच्या मार्फत शाहूस सर्व हकीकत कळली, तेव्हां त्यानें बाळाजीस साताऱ्यास बोलावून घेतलें. शाहूनेंच त्यास आश्रय दिला. त्याजवर चंद्रसेन जाधवरावांनीं

निरोप पाठविला कीं, स्वामींनीं बाळाजीस माझे स्वाधीन करावें. त्यास आश्रय दिल्यास आम्हांस महाराजांचे पाय सुटतील. परंतु शाहूनें बाळाजीस घालवून देण्याचें नाकारलें व चंद्रसेन जाधवराव यांजवर हैबतराव निंबाळकर यास पाठविलें. हें प्रकरण विकोपास न जावें म्हणून शाहूनें खटपट केली. पण ती गोष्ट चंद्रसेन जाधवराव यांस मान्य झाली नाहीं. चंद्रसेन पांडवगड सोडून निघाले. त्यांची व हैबत रावांची गांठ आंदरकीच्या घाटाखालीं जेऊर येथें पडून एक लढाई होऊन, हैबतराव माघारी फिरले व चंद्रसेन जाधवराव पन्हाळ्यास जाऊन उघडपणें ताराबाईस मिळाले. त्यांनीं वडगांव, कुमठे ऊर्फ गुमठे, शिरोळ व कोल्हापूर हीं सर्व ठाणीं शाहू महाराजांशीं लढून घेतलीं व ताराबाई साहेबांकडे दिलीं.

पुढें कागलकर घाटगे व दुसरे काटक लोक जमवून ते वालेवाटीं निघून गेले आणि तेथें त्यांनीं प्रतिज्ञा केली कीं, शाहू महाराजांबरोबर लढून त्यांस गादीवरून दूर करून ताराबाईसाहेब यांचे चिरंजीव शिवाजी महाराज यांस गादीवर बसवून, मराठेशाही एकछत्री करावी व शाहू महाराजांचा पराभव करावा, तरच अंगावर दुसरीं वस्त्रें घ्यावींत.

याप्रमाणें चंद्रसेन जाधवरावांनीं प्रतिज्ञा करून, तारीख २० आगष्ट सन १७११ मध्यें शाहू महाराजांशीं लढाई दिली, यांत चंद्रसेन जाधवराव यांनीं बहुतेक सर्व जुने सरदार ताराबाईसाहेब यांचे बाजूस वळवून शाहू महाराज यांस गादीवरून काढण्याचा कसा घाट घातला, याबद्दल भारतवर्ष मासिकांमध्यें दोन पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यावरून स्पष्ट होईल. ताराबाईचा पुत्र शिवाजी महाराज यांनीं चंद्रसेन जाधवराव यानीं लिहिलेल्या पत्राच्या जबाबावरून दृष्टोत्पत्तीस येईल. प्रथम चंद्रसेन जाधवरावांनें लिहिलेल्या पत्रांत असा मजकूर आहे कीं,

"आपण लिहिलें कीं, आमचे एकनिष्ट स्वामींचे चरणीं, स्वामींची सेवा करावी व यशकीर्ति संपादावी. राजश्री जाधवराव ( धनसिंग जाधवराव ) स्वामींचे पायांव्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नव्हते. राज्यांत दुही निर्माण झाली. ते प्रसंगीं त्यांनीं प्रतिज्ञापुरस्सर स्वामिसन्निध बोलून स्वार झाले. धनसिंग जाधवराव यांनीं ताराबाईसाहेब यांजवळ 'शाहूशीं लढाई देऊन त्याचा मोड करीन' अशी प्रतिज्ञा केली होती; परंतु धनसिंग जाधवराव यांनीं शाहूशीं लढाई न देतां उलट त्यांस गादीवर बसविलें. त्यायोगें राज्यांत दुफळ्या झाल्या. [ याजबद्दल येथें चंद्रसेन जाधवरावांनीं आपले पत्रीं उल्लेख केला आहे. ] परंतु कालगतीनें सर्वांची बुद्धि एका प्रकारें झाली. तत्मुळें त्यांचा ( आपणास साह्य करण्याचा ) हेतु पूर्ण करावा, हें अंतःकरणीं धरून, आजपर्यंत याच मानीं राहून; राजश्री अप्पाजी थोरात, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे आदिकरून सामील करून घेऊन, शाहूनीं केल्या लोभाची ( दाखविलेल्या लालुचीची ) आस्था न धरितां, त्यासही वैमनस्य दर्शवून, प्रतिनिधी व रा० खंडेराव दाभाडे, स्वामींच्या लोभाचे सेवक, ह्या प्रसंगांत आणावे, ह्या अर्थें आपल्या समाधानास या उभयतांस पाठविणें, म्हणून मुद्दाम सांगून पाठविलें. त्यावरून उभयतांस ( आपणाकडे ) पाठवून दिलें; त्यांच्या व आपल्या भेटी जाहल्या व रा० हैबतराव निंबाळकर ह्यांचीही भेट जाहली. तों अगोदर आपण, रा० थोरात, खंडेराव दाभाडे, संताजी पांढरे बसोन घाट घातला होता, तो निंबाळकर यास सांगतांच त्यांचे चित्तीं हेंच होतें. मग आम्ही अवघे वर्तमान सरदार कटांत घेऊन प्रतिनिधि यांस विचारांत घेतलें. स्वामींची द्वाही फिरविली. खुशाली केली. आणि गडकिल्ल्यांस आम्हीं आपलीं व पंडीत मशार निल्हेचीं पत्रें पाठविलीं आहेत. याउपरी नीट सातारिया खालें चालून जाऊन राज्यांतील दुही निःशेष करितां स्वामींनीं खुशाली केली पाहिजे."

याजवर शिवाजीमहाराजांकडून ताराबाईनीं लिहिलेला जाधवरावांस गेलेला जबाब येणेंप्रमाणें:—

"आपण लिहिलेलें वर्तमान श्रवणगोचरें करून संतोषातिशय झाला. तो पत्रारूढ किती काय म्हणून करावा ? कार्य कर्तव्य, पराक्रमी, मायेचे हिंदुसेवक असावे, ते तुम्हांसारिखेच कृतकर्मे असावे. रा० जाधवराव ( धनाजी ) यांनीं कै० रा० स्वामींचे ( राजाराम ) वेळेपासून राज्याभिवृद्धींविषयीं केले श्रम साहस, व सांप्रत दुहीमुळें राज्याभिवृद्धीस झालेला अपाय, चित्तांत आणून पुढें स्वामींचें राज्य वृद्धीतें पाववून यशकीर्ति संपादावी हें मनीं धरून, जो अर्थ

विशदें लिहिला, तो उचित व यथार्थित लिहिला. तरी तुम्ही दीर्घद्रष्टेच आहां. हें राज्य समग्र ताम्राक्रांत झालें असतां, कै० स्वामींनीं लहानापासून थोरास आपली माया लावून, अवघियांवरी सदयत्वें कृपामृत-वृष्टि करून दिनप्रतिदिनीं राज्यवृद्धिंगत पावविलें, ते प्रसंगीं कै० स्वामीचे संपूर्ण कृपेस पात्र एक जाधवराव मात्र झाले, ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकूमबारदारी एकनिष्ठेवरी झाले. राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांहीं सामान्य कसाला श्रम साहस केला नाहीं. जीविताची तमा न धरितां स्वामिकार्यीच तत्पर राहिले...तों दुहीचा प्रसंग प्राप्त झाला. दुही निःशेष करावी म्हणून स्वार होऊन गेले. त्यास विपरीत कालवशें सर्व लोकांस एकप्रकारें मोह प्राप्त झाला, तन्मुळें मशारनिल्हेचा कृतसंकल्प सिद्धीतें न पावला. त्यांचे पुत्र तुम्ही, त्यांजसारिखे कृतकर्मे आहां. तुम्हां व्यतिरिक्त त्यांचा संकल्प आणखी कोण शेवटास नेतो. राज्याभिवृद्धीचा उपाय मायेच्या सेवकाविना दुसऱ्याचे मनांत कसा येईल ? तरी दुही निःशेष करून स्वामीचें शासन चालविण्याचा संकल्प सफल करावा. प्रतिनिधी, दाभाडे व मोरे यांस एकाग्रतेनें जवळ आणावयाचा विचार कल्पून आपलें कर्तेपण प्रगट केलें ही गोष्ट कांहीं सहाजिक केली नाहीं. हे तुमची दीर्घदृष्टि व आंगेजणी व बुद्धीचें वैभव व शूरत्वाचा प्रसंग मनन करून पाहतां दुसरी साम्यता आहे असें नाहीं. तुम्हांसारिखे बुद्धिप्रगल्भ पराक्रमी पुत्र जाधवरावास होऊन स्वामीचे शेवेशीं तत्पर झाले. तुमच्या भरंवशानें स्वामी निश्चिंत आहेत, एकाग्रता होय तें करणें, आणि संतोषाचें वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. प्रतिनिधीही स्वामींच्या मायेचेच सेवक आहेत. गडकिल्ले यांस त्यांहीं व तुम्ही पत्रें पाठविलीं ही गोष्ट उत्तम केली. पुढेंही ज्यास जें लिहीणें तें लिहावें. स्वामींनींही हुजूरहून गडकिल्यांस व हशम लोकांस पत्रें पाठविलीं आहेत. रा० हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांची चित्तवृत्ति स्वामींचे चरणीं सदृढ आहे. त्यांस समाधानपत्र पाठवावें म्हणून लिहिलें. त्यांचें सर्व प्रकारें स्वामीस अगत्य आहे. हल्लीं तुमच्या लिहिण्यावरून स्वामींनीं त्यांस समाधानपत्र सादर केलें आहे. त्याचप्रमाणें थोरात, खंडेराव दाभाडे व संताजी पांढरे यांनीं तुमच्या चित्ताचे ठायीं एकरूप होऊन महत्कार्य संपादिलें; येणेंकरून स्वामी त्यावर संतुष्ट आहेत, त्यांचींही पत्रें हुजूर आलीं होतीं, व स्वामींनीं त्यांस चित्तानुरूप समाधान पत्रें पाठविलीं आहेत. तसेंच रा० मानसिंग मोरे, शहाजी निंबाळकर आदि करून कुल सरदारांस समाधानपत्रें पाठविलीं आहेत. अतःपर कोणी संशय मनांत आणावा असें नाहीं. मध्यें कांहीं दिवस कालाची गति कुटिल होती, तथापि स्वामींच्या चित्तीं कोणाएकाचें वैषम्य किंवा संदेह नाहीं. अवघ्यांच्या विचारें स्वामिकार्याची सिद्धि करावी, अशीच स्वामींनीं अवघ्यांस आज्ञापत्रीं आज्ञा केली आहे. सर्व गोष्टींनीं मातोश्रीसाहेब व स्वामी बहुत संतोषी आहेत. तुम्ही जें कर्तव्य लिहिलें तें निःशेष करून संतोषाचें वर्तमान लिहून पाठवावें."

हें पत्र सन १७११ आगष्ट तारीख २७ चें आहे. म्हणजे धनाजी वारल्यास सुमारें सव्वा वर्ष झालें, त्या अवधींतली ही चंद्रसेनाची खटपट होती. हें कारस्थान किती जबरदस्त होतें, ह्याची कल्पना बरोबर व्हावी म्हणून वरील पत्रांचे उतारे दाखल केले आहेत. पूर्वी, शाहूस मिळालेले बहुतेक सरदार आतांच चंद्रसेन जाधवराव यांनीं ताराबाईसाहेब यांजकडे वळवून घेतले. ताराबाई व शाहू यांजमधील तंट्याचा निकाल चंद्रसेन जाधवराव व बाळाजी यांच्या कर्तबगारीवर अवलंबून होता. चंद्रसेन जाधवराव यांच्या हातांत सर्व फौज होती, व बाळाजीचीं कूट कारस्थानें चालू असून, चंद्रसेन जाधवरावांच्या हाताखालील फौजेंत फाटाफूट पडावी म्हणून सरदार लोकांस लालूच दाखवून आपले बाजूस आणण्याचा त्याचा यत्न चालू होता, व कांहीं शिलेदार नवीन भरण्याचें काम चालू होतें. यावेळीं शाहूकडे बाळाजी विश्वनाथ यानें जाधवरावांच्या सैन्यांतून फोडलेले होनोपंत वरेकर, नारोराम शेणवी, जीवनराम सुमंत औरंगाबादकर, कोकाटे व पिलाजी जाधव असे शिलेदार लोक आले. त्याजवळ फक्त २००० फौज राहिली होती व चंद्रसेन जाधवराव यांजकडे मराठ्यांची मुख्य फौज व सरदार होते. ही सर्व फौज घेऊन नीट साताऱ्याखालीं चालून जाऊन जाधवरावांनीं साताऱ्यास वेढा घातला. तों शाहू-महाराज बाळाजी विश्वनाथासह सिंहगडाकडे पळून गेल्याचें समजलें. त्याजवरून मंगळाच्या किल्ल्यास सोन्यारुप्याचे गोळे

मारून वेढा उठवून चालते झाले. सेनापतींनीं कांहीं नवाबाकडील फौज कुमकेस घेऊन व पांढरे वगैरे सरदार घेऊन ते विरुद्धपक्षीय सैन्यावर चालून आले, तेथें लढाई बहुत मातबर जाहली. प्रहर दोन प्रहर लढाई होऊन मोंगल लोक आडून उभे राहिले. नंतर बाळाजीपंत सालप्याच्या घाटाखालीं मैदानांत महाराजांसह पळाले. सेनापति निरेवर येऊन उतरले व पुनः सिंहगड, पुणें वगैरे प्रांतीं लढाई देण्याचा त्यांनीं इरादा ठेविला. याप्रमाणें चंद्रसेन जाधवराव यांनीं महाराज व त्याजबरोबर बाळाजी यांची खोड मोडून टाकिली.* सरदेसाई यांनीं त्या वेळच्या शाहूच्या स्थितीचें वर्णन केलें आहे तें असें—" ही वरील लढाई (चंद्रसेन जाधवराव यांनीं साताऱ्याजवळ दिलेली) जाहल्यानंतर शाहूची खरी स्थिति काय? हें हैबतराव निंबाळकरास कळून आलें. ताराबाई व चंद्रसेन यांजकडून त्याजकडे बोलणीं आलीं. तेव्हां सर्व सरदारांनीं शाहूस सोडलें आहे असें पाहून हैबतरावही मनांतून ताराबाईकडे गेला. मात्र तसें त्यानें उघडपणें केलें नव्हतें. तथापि शाहूकडे आतां म्हणण्यासारखे सरदार कोणीच राहिले नव्हते. परसोजी भोंसले व चिमणाजी दामोदर आपआपल्या सैन्यासह वऱ्हाडांत होते. मुलूखगिरीवर असल्यामुळें राज्यपदाच्या तंट्यांत ते आपला संबंध ठेवित नव्हते. अमृतराव बांडे नासिक–नंदुरबारकडे होता. बाळाजीनें नवीन ठेवलेल्या शिलेदार लोकांचें वजन लोकांत नव्हतें. अशा भयंकर अवस्थेंत शाहू सन १७११मध्यें होता."

या वेळीं बाळाजी विश्वनाथानें शाहूची बाजू कशी सांभाळली. व चंद्रसेन जाधवराव यांस दैवानें कसें हातचें सोडिलें, त्याचें वर्णन देऊं.

मागें सांगितल्याप्रमाणें चंद्रसेन जाधवराव व बाळाजी यांची लढाई झाल्यावर बाळाजीचा मोड होऊन चंद्रसेन जाधवराव हे कोल्हापुरीं ताराबाई साहेब यांस भेटण्यास गेले. शाहूचें संकट यावेळीं अनावर होऊन चंद्रसेन जाधवराव यांच्या पक्षास पूर्णपणें यश येत चाललें. बाळाजीनें कितीही दक्षता ठेविली, तरी शाहूचें संकट इतकें भयंकर होतें कीं, दैविक प्रसादामुळेंच त्याचें निरसन झालें, असें सरदेसाई यांनीं लिहिलें आहे. ज्याच्या जोरावर चंद्रसेन जाधवराव व ताराबाई यांनीं राज्यकारस्थान रचिलें होतें आणि शाहू व स्वार्थी बाळाजी यांचा पूर्णपणें पाडाव करण्याचा घाट घातला होता, तो गादीचा वारस ताराबाई साहेबांचा मुलगा शिवाजी, सन १७१२ चे मे महिन्यांत फोड्या येऊन वारला. त्यामुळें चंद्रसेन जाधवराव यांच्या कारस्थानाचा आधार नाहींसा होऊन त्यांची हिंमत बरीच खचली. यावेळीं शाहूस दैवाची अनुकूलता नसती, तर चंद्रसेन जाधवरावानें शाहूची व बाळाजीची उचलबांगडी झटकून केली असती. दुर्दैवानें चंद्रसेनाची याप्रमाणें बाजू खचली, तरी देखील यावेळीं न डगमगतां राजारामाचा धाकटा मुलगा संभाजी यास हाताशीं धरून चंद्रसेन जाधवराव यांनीं संभाजीचा पक्ष जोरानें उचलला. इतर सरदारही त्यांस अनुकूल होते, परंतु कित्येक मंडळी ताराबाईशीं जितकी अनुरक्त होती, तितकी संभाजीची आई राजसबाई हिच्याशीं नव्हती. अर्थात् तितक्यापुरता शाहूचा पक्ष जोरांत चढला. चंद्रसेन जाधवराव यांच्या कटांतून बरेच सरदार निघून जाऊन स्वतंत्र मुलूखगिरी करूं लागले. तेव्हां चंद्रसेन जाधवराव यांनीं दिल्लीस बादशाहींत भानगडी उपस्थित झाल्याचें ऐकून तिकडे कारस्थान सुरू केलें. बाळाजीनेंही आपलें सूत्र दिल्लीस चालविलें. बाळाजीच्या मार्फत सय्यद बंधु शाहूस वश झाले. व चंद्रसेनाचे मार्फत निजाम संभाजीस वश झाला. यावेळीं शाहूला दुसरा एक मोठा फायदा झाला. तो असा कीं, सचिव शंकराजी नारायण हा यावेळीं मृत्यु पावला. भोरपासून पुरंदरचा सर्व प्रदेश सचिवाच्या ताब्यांत असून तो प्रांत शिवाजीचे राज्याचा केवळ पाया होता; म्हणून सचिवानें आपल्या ताब्यांत यावें, अशी शाहूची इच्छा असून त्यानें सचिवास अनेक पत्रेंही पाठविलीं. परंतु तो चंद्रसेन जाधवराव व ताराबाई साहेब यांशीं बेइमान होण्यास धजत नव्हता, म्हणून सन १७१२ त शाहूनें सचिवाचे मुलखांत फौज पाठविली. पण सचिवाचे सर्व किल्ले मजबूत असून त्यांवर शूर मावळे लोकांची शिबंदी होती, म्हणून ते सहज हस्तगत होणारे नव्हते.

इकडे शाहूशीं उघडपणें लढण्याची सचिवाची छाती होईना. अशा पेचांत सांपडल्यामुळें त्यानें सन १७१२ च्या आक्टोबरांत अंबवडें येथील नागनाथ तीर्थांत जलसमाधि घेऊन देहत्याग केला, ही गोष्ट शाहूच्या चांगलीच

* श्री.–सरदेसाईकृत मराठी रियासत पृ. ५९४.

पथ्यावर पडली. त्यानें लागलीच सचिवाचा मुलगा नारोशंकर दोन वर्षांचा होता, त्यास एकदम सचिव-पदांची वस्त्रें पाठविलीं, व सचिवाचे मुतालीक राझेकर यांस बाळाजीनें लालूच दाखवून आपल्याकडे फितविलें. व सचिवाचा मुलूख त्याचे मार्फत आपले ताब्यांत घेतला, व त्या मुलखाचा कारभार राझेकर यांकडे सोंपविला. यावेळीं चंद्रसेन जाधवराव व संभाजी महाराज यांचा पक्ष पुनः लंगडा झाला. तथापि चंद्रसेन जाधवराव यांनी संभाजीच्या पक्षास निजाम, दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर व कुलाब्याचे आंग्रे व आणखी कांहीं सरदार मंडळी यांस आपले कटांत सामील करून घेण्याचा यत्न चालविला. संभाजीनें चंद्रसेन जाधवराव यांस एक पत्र लिहिलें आहे. तें श्री. नामदार शंभुसिंगजी यांचे दप्तरीं आहे. त्याचा उतरा खालीं लिहिल्याप्रमाणें:—

श्री.

स्वस्तीश्री राज्याभिषेक शके ५२ वि. संवत्सरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी समस्तसेना धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराव सेनापती–युक यांस आज्ञा झाली ऐसा जे तुम्हांकडून कोंडाजी सालोखी व मानाजी जगन्नाथ असे उभयतां समागमें ते प्रविष्ट जाहले. सारांश लिहून गोपाळ जनार्दन या समागमें कित्येक गिला सांगोन पाठविला. येणेंकडून समाधान पावले. स्वामीचे आज्ञाधारक आहों.

स्वामीच्या संरक्षणापेक्षां व स्वामीचे राज्याभिवृद्धी-पेक्षां तिसरा निजध्यास नाहीं. खानवाक निजामउल्मु-ल्क तीन कोसांचे अंतरें खानवाक येथें आहेत. तिकडे स्वामी कडील मनोमिष्टाचीं पत्रें छ + + + + लिही-ण्याची तें केलीं होतीं. गोपाळ जनार्दन व आणखी हीं पत्रें पाठविलीं. त्यावरून निजामउल्मुल्क बहुत समाधान पावोन, स्वामीचा अभिमान धरोन उत्तरें पाठविलीं. तीं गोपाळ जनार्दन याणीं वाचून पाहिलीं, आणि सविस्तर स्वामी सेवेशीं लिहीलें आहे. अतःपर स्वामीचे लौकिकास होऊन महत्कार्याचा प्रसंग व्हावा. त्यास स्वामीचे जाणें पन्हाळी यास जऱ्ही असले तऱ्ही बयान फिरोन येणार नाहीं. यास सेना समुदाया-निशीं तोरगलास त्वरा करून आपणास + + पत्र पाठवावें. येऊन जाऊन जे सेवा करणें ते करून दाख-वितों. समयीं ती ये चिरकाले कडून प्राप्त आहे. जितकी त्वरा होईल तितकें हित आहे. म्हणोन कित्येक तपशील लिहीले व गोपाळ जनार्दन याणींही अद्याप खानमुलकाकडील वडीलाचे आंगे-जादी लिहून विनंतीपत्र पाठविलें. त्यावरून व कोंडाजी सालोखी यानीं जबानी सांगितल्यावरून या राज्याची अभिवृद्धीविषयीं संपूर्ण तुमची तरतुद व्यवस्था व हिंमत विदीत होऊन स्वामी संतोषाच्या कोटीच जाहल्यां राज्याची अभिवृद्धी ते एक तुम्हीच कराल. तुम्हां-विषयीं स्वामीनीं भरंवसा मानिला त्याचें सार्थक्यच जाहलें. परिपूर्ण स्वामीचे मनोरथ सिद्धीस गेले असें वाटलें. तुम्ही स्वामीचें दर्शन घेऊन प्रयोग आपले वडीलापेक्षांही अधिकोत्तर जाहला, म्हणोन स्वामी तुम्हांस हेंच वरचेवरी करीत असतां तोच निराधार तुम्ही करून खास त्वरा करण्याविषयीं लिहिलें. तरी याहून अंतर तें काय. तुम्हांस दर्शन देऊन मनोरथ सिद्धीस न्यावे. हेंच बहुत दिवस स्वामीचे चित्तींच तुमचा करार विदीत झाला हें उत्तमोत्तम. ऐशीयांस तुम्हास दर्शन द्यावयाचें वी + + स्वारी स्वामीनें केली. फौजेची तालेदारी या निमित्त पहिले हिंदुराव होते त्यांची सगुणाबाईही अंगेजाची एकनिष्ट...कित्तेक दील भरीनें सांगणें तें सांगोन फौज करावयाविषयीं आज्ञा केली. त्यावरी बायको होतसाती स्वामीचे आज्ञेवरी द + + स्वामी सन्निध राहून सात आ + + केली तैसेच पिराजी घोरपडे यांची स्त्री + + बाई व पुत्र राजश्री राणोजी घोरपडे यांनीच सहा...हजार फौज केली. या दोन्ही फौजा + द तोरगल देखील जमा व समागमें घेऊन तुंगभद्रा तीरपर्यंत स्वारी केली. राजश्री हिंदूरावास दर्शनास बोलाविलें. इतके जाहल्या उपरांत नड सर्व धंदे ठेऊन तुम्हांस आणून द० शं० निजामउल्मुलूकाचें आगमन होतें. त्यांचीच पहिलेपासून अत्यंत दंडलाई. आपलेकडील एक विचार करणें तो व श्रीपतजीराव आले याचे उपमर्दाचा विचार तो तुमचें विचारें करावा. असा विचार करण्यासाठीं तुम्ही त्वरेनें दर्शनास यावें याबद्दल गोपाळ जनार्दन व कोंडाजी सालोखी पत्रें तुम्हाकडे पाठवून दिले. वस्तुता पाहतां स्वामीजवळही हें सामान जमा जाहलें. यामध्यें

स्वामीचे तुमचें दर्शन होतें. तेव्हां कोणेही गोष्टीचे आगाध पडत नाहीं असेंच स्वामींनीं मानलें. गोपाळ जनार्दन तुम्हाजवळ पावले कीं + + + ता निजामउल्मुलूकाचे येण्याचा हेतु होऊन अखवानिस आले पुढें यतात यथुन न आले व स्वामीस त्यांचीं पत्रेंही आलीं कीं, राज्याकडील फौज येऊन भेटली नाहीं. अगोदर आपली फौज पाठवून देणें म्हणजे म अ+ + ज असतील तै करून देतो. त्यावरून + समीयं + व हिंदुराव व राणोजी घोरपडे यांचें विचारें असावें असें सांगोन रा. निळकंठराव त्रिंबक यास फौजेंत येऊन निजामउल्मुलूकानें अगोदर सामील होणें तें करणें म्हटलें आहे. त्याप्रमाणें जाणें झालें तरी जावें अशी आज्ञा केली. निजामउल्मुल्ककाकडील स्नेहसंदर्भाचा विचार करणें तो तुमचे विचारें करावा. अगत्य तुम्हास दर्शन यावयाकारितांच स्वामींनीं मजाली तोरगल येथें मुक्काम केला. तुम्हां कडील उत्तर यावें यास विलंब लागलेला पाहून आणखी जोडाही रवाना करविला असतां तुम्हास पत्रें मनुष्यें आलीं, स्वामीचे चित्तीं जसें तसेंच अंगेजून निःसंशयात्मक दर्शनास येतों म्हणून लेहून पाठविलें. यांत स्वामी परम कृतार्थ जाहले. केल्या उद्योगाचें सर्व सार्थक वाटलें. या उपरी सहस्र विचारांत एकच विचार कीं तुम्ही बहुत्वरेनें येऊन स्वामीचें दर्शन घ्यावें लागतें. यानिमीत्य तयारीत अगोदर आहेच. हें पत्र पावल्या उपरी निश्चयाप्रमाणें स्वार होऊन मजल दर मजल तेथून निघाल्यावरी जोडा पुढें पाठविणें. इकडील वर्तमान तरी श्रीपतराव वाजीराव तोरगुलकर असे या प्रांते आले आहेत. अवदुलची भेट न घेणें. आपणांकडे येणें म्हणून निजाम उल्मुलूकाचीं लिहिलीं येतात. त्यास—याचा घरोबा विशेष जाहला आहे. त्याची भेटही झाली. श्रीपतरायाची ओढ—कडे बहुत आहे, त्यामुळें पठाणांनींही जोर केला आहे. पठाणांचे वाढीमुळें श्रीपत वाजीरावपंतही एका मता नाहीं—अंगजीले प्रसंगास अनुकूलच म्हणोन त्वरा करोन वानी साधावी लागते. प्रस्तुत सगुणाबाई, हिंदुराव, राणोजी घोरपडे व खान देखील एकत्र जाहले. म्हणून वर्तमान आहे. स्वामीकडील अगत्य धरावे येविशी निष्कर्ष तो तुम्ही निजामउल्मुलूकास कळवावा. पुढेंही दृढीकरणांत अहांच. तुम्हीं स्वामीचें दर्शन घ्यावें. भारी रहावें हा विचार सातारवासीयांकडील तह मोडून स्वार्थ साधावा व हा अर्थ निजामउल्मुल्कांनीं तुम्हांस सांगून पाठविला. हें सविस्तर गोपाळ जनार्दन यांनीं लिहिल्यावरून व त्यांच्या सांगण्यावरून कळलें. हे गोष्ट तुम्ही बरी केली. अजी सर्वप्रकारें तरफदारी त्यांची आहे. स्वामीकडील त्याणीं अडविल्यास स्वामीचे संग्रहीं तुम्हांसारखे शूर आहेत. कार्यप्रसंगी जबाबाची असूदी केली जाईल. ते मतलब यांतून आल्यास तुम्हाकडून त्यांचे मानसवदस दूक आहे. हें स्वामी जाणतच आहेत. याकरितां त्याणीं ये...... मी कडीलच विचार त्यास करून चित्तानरूप करून घ्यावें. त्यास दक्षिणेच्या बंदोबस्तादीक करणें आहे. त्यास सर्वप्रकारें स्वामी अगत्य होन नाहीं. ये गोष्टीचे त्यास प्रमाण आहे. सारखे आणखीही तुम्ही त्यास लिहून पाठवून ती वार्ता विचार अनुकूल करून घेणें. दर्शनास येण्याची त्वरा करा, म्हणून म्हणावें तरी विचारच. स्वामीस त्वरा करावयाविशी कितीक लिहीलें ते तुम्हीं दिनमेक होऊं देतां असें नाहीं. स्वामीसिद्धतेनें तुमचे येण्याची प्रतीक्षा करितात. याउपरी कोणे गोष्टीचा उजूर न धरितां स्वार होऊन स्वामीचे दर्शनास येणें जे सामील करून व अनुकूल करावयाचे ते केलेच अस...कडे राजश्री आपाजी सुरो व मुरारजी उदाजी चव्हाण, हिंमतबहादूर द + प आहेत. स्वामीचें तुमचें दर्शन होतें. फौज सनपुर्न आहे. श्री करितो, करो. दर्शनोत्तर विचित्रच होऊन अगदींच हस्तगत व्हावें. असें होऊन आलें. आ—मुख्य कारण स्वामीचें तुमचें दर्शन व्हावें. ऐवज खानाकडूनही राजकारण बहुत निऱ्हाळीयाचें.आलें आहे. वरकडही कित्येक कारणें आहेत, तीं कागदीं लिहीतां येत नाहीत. तुमचे भेटीनंतर सर्व तुमचेच स्वाधीन स्वामी असतात. अगदी दादराच उघडून जातो. आतां येण्याची त्वरा कराल तितकी थोडकी. आतां कांहीं विलंबावरी न घालतां त्वरेनें तेथून स्वार होऊन येऊन स्वामीचें दर्शन घेऊन स्वामीस संतोष पाववणें. यशवंतराव पांडरे, रुस्तुमराव पांडरे व भिकाजी पांडरे तुम्हांजवळ आहेत. त्यांचा दिकसा केला हें उत्तम केलें. ते कापर्दानें आहेत. त्यांचे बहूत भातेने समाधान येतां त्यांस ही समागमें घेऊन येणें. हल्लीं कोंडाजी सालोखी व

मानाजी जगताप यांस आज्ञा करून पाठविलें आहे. ते सांगतील त्यावरून कळेल. जाणिजे बहुत लिहीणें तरी सुज्ञ असा (मोर्तब).

हें वरील पत्र ठिकठिकाणीं अक्षरें फुसटल्यामुळें जसेंच्या तसें उतरण्याची मुश्कील पडली. तरीही पत्राचा गर्भितार्थ लक्षांत घेतला म्हणजे चंद्रसेन जाधवराव यांनीं मराठेशाही एकछत्री करण्याकरितां निजाम-उल्मुल्क यास कसें वश करून घेतलें तें समजेल.

यावेळीं दिल्लीच्या तख्तावर बादशहा फर्रुख्सेअर नांवाचा होता. तो बादशहा कसा झाला, त्याजबद्दल मुसलमानी इतिहासांत विस्तारें करून लिहिलें आहे. त्याचा सारांशः—

औरंगजेबानंतर बहादूरशहा, जहांदरशहा असे दोन बादशहा झाले. जहांदरशहा हा बादशाही सत्ता धारण करण्यास लायक नव्हता. त्यानें फार क्रूरकर्मे केलीं, आसदखान व झुलपिकारखान यांस त्यानें मोठ्या योग्यतेस चढविलें, झुलपिकारखानाचे हातांत सर्व सत्ता गेल्यामुळें दरबारचे लोक नाखुष झाले, बादशहाचें छंदानुवर्तन झुलपिकारखानास आवडेनासें झालें, त्यामुळें त्या दोघांत वितुष्ट पडलें. इतक्यांत बंगाल प्रांतांत गडबड झाली.

शहाजादा अजीम उखान हा पूर्वी बंगालचा सुभेदार होता, हा बहादूरशहा बादशहाचा दुसरा मुलगा होय. याचा फर्रुखसेअर नांवाचा मुलगा बंगाल्यांत राजमहाल या ठिकाणीं दूर रहात होता, त्यामुळें तो जहांदरच्या तावडींतून सुटला. सय्यद हुसेनअल्ली व सय्यद अबदुल्ला (प्रसिद्ध सय्यद बंधु) हे दोन सरदार फर्रुखसेअरच्या पक्षास जाऊन मिळाले. तेव्हां बादशहा जहांदर, झुलपिकारखानास बरोबर घेऊन त्यांजवर गेला. ता. २८ दिजंबर सन १७१२ रोजीं उभयपक्षांची आग्र्यानजीक गांठ पडली. लढाई होऊन जहांदरशहाचा पराजय झाला. व बादशहा जहांदरशहा आपली राख (लालकुंवर) बरोबर घेऊन पळून गेला. पराभव झालेल्या फौजेची जमवाजमव करून झुलपिकारखान दिल्लीकडे आला. तेव्हां जहांदरशहा आसदखानाच्या घरीं लपलेला त्यास आढळला. परंतु दरबारची सर्व मंडळी फर्रुखसेअर यास जाऊन मिळाली. सबब झुलपिकारखानास जहांदरशहास मदत करणें उचित वाटलें नाहीं. ता. १ जानेवारी सन १७१३ रोजीं फर्रुखसेअर यानें बादशाही पद धारण केलें. ज्यानीं ज्यानीं त्यास मदत केली होती, त्या सर्वांस त्यानें मोठमोठ्या जागा दिल्या. त्यांतच चिंकिलीजखान यांची हुशारी पाहून त्यास त्यानें निजामउल्मुल्क असोफजा असा किताब दिला.

चिंकिलीजखान हा शहाबुद्दीन ऊर्फ गाजीउद्दीन याचा मुलगा होय. औरंगजेबानें सन १६८३ त दक्षिणेंत स्वारी केली, तेव्हां गाजीउद्दीन हा दुराणी मोगलांच्या टोळीचा मुख्य होता. त्यानें संभाजीच्या एका टोळीचा पराभव केल्यामुळें, शहाबुद्दीन यास 'गाजीउद्दीन' असा किताब मिळाला. त्याचा मुलगा कमरोद्दीनखान यासच 'चिंकिलीजखान' अशी औरंगजेबानें पदवी दिली. तो औरंगजेबाच्या दक्षिणच्या मोहिमेंत हजर होता. पुढें फर्रुखसेअर सिंहासनारूढ झाला. त्यावेळीं सय्यदबंधूंस या चिंकिलीजखानानें मदत केल्यामुळेंच 'निजाम-उल्मुल्क असोफजा असा किताब त्याला मिळाल्याचें वर सांगितलेंच आहे. याच सुमारास चंद्रसेन जाधवराव शाहूला सोडून थेट दिल्लीस गेले व जहांदर बादशहाशीं दिजंबर १७१२ मध्यें आग्र्यानजीक फर्रुखसेअर बादशहा व त्याचे साथीदार सय्यदबंधु यांची लढाई झाली. त्यावेळीं चिंकिलीजखान ऊर्फ निजाम उल्मुल्क याच्या सैन्यांत चंद्रसेन जाधवराव हजर असून, निजामउल्मुल्क व चंद्रसेन जाधवराव यांनीं मोठ्या शौर्यानें लढून सय्यदबंधूंस मदत केली, त्यामुळें दक्षिणच्या सुभ्यावर चिंकिलीजखानाची नेमणूक झाली व त्याचे हाताखालीं दुय्यम म्हणून चंद्रसेन जाधवराव यांची नेमणूक झाली व त्यास बेदरच्या पूर्वेस भालकी वगैरे परगण्याची मोठी जहागिरी मिळाली.

दक्षिणेंतील सुभेदारीचें काम निजाम उल्मुल्क यानें फार हुषारीनें केलें, त्यामुळें त्याचें वजन दक्षिणेंत फार वाढलें. तेव्हां फर्रुखसेअर यानें सय्यद हुसेन यास दक्षिणच्या सुभ्यावर पाठविलें व *निजामास मुरादाबादच्या सुभ्यावर नेमिलें. त्या

* ग्रांट डफ पान ३६४ ते ३६६.

सय्यदबंधूंशीं फर्रुखसेअर बादशहाचें फार वांकडें आलें. कारण बादशहाला ते जुमानीनासे झाले. तेव्हां त्यांची शक्ति कमी करण्याकरितां एका सय्यदबंधूस (सय्यद हुसेन यास) दक्षिणच्या सुभ्यावर नेमिलें व आंतून बादशहानें गुजराथचा सुभेदार दाऊदखान यास हुसेनअल्लीबरोबर लढून त्यास मारून टाकण्याबद्दल लिहिलें. दाउदखानाची व हुसेन अल्लीची बऱ्हाणपुरानजीक गांठ पडून, सन १७१५ मध्यें लढाई झाली. तींत दाऊदखान मारला गेला, पुढें बादशहानें मराठ्यांशीं संधान बांधून त्यांचा सेनापति खंडेराव दाभाडे यांस आपल्याकडे वश करून घेतलें. खंडेराव दाभाडे यांनीं हुसेनअल्लीबरोबर लढाई केली, परंतु हुसेनअल्लीनें शाहूराजाशीं तह केला. ह्या लढाईंत झुलपिकारबेग नांवाचा सरदार हुसेनअल्लीबरोबर लढत होता, त्याचा पराभव झाला. तेव्हां हुसेनअल्लीनें, आपला दिवाण मोकावसिंग यास व त्याचे मदतीला चंद्रसेन जाधवराव देऊन, खंडेराव दाभाडे यांजवर पाठविलें. तेव्हां चंद्रसेन जाधवराव व मोकावसिंग यांची, खंडेराव दाभाड्याशीं मोठी निकराची लढाई झाली, तींत कोणाचाही पराभव झाला नाहीं. याप्रमाणें बादशहाचे सय्यद बंधूंचा नाश करण्याबद्दलचे सर्व डाव फसले. नंतर सय्यदबंधूंनीं १७१९ सालांत फर्रुखसेअर याचे डोळे काढून त्यास विष देऊन मारून टाकिलें व रोशन-अख्तर नांवाचा बहादूरशहाचा नातू १८ वर्षें वयाचा होता, त्यास महंमदशहा असा किताब देऊन सय्यदांनीं तख्तावर बसविलें. याप्रमाणें चंद्रसेन जाधवराव व निजामउल्मुल्क या उभयतांनीं सय्यद बंधूंस चांगल्या तऱ्हेनें साहाय्य केलें, परंतु सय्यदांच्या मनांत निजामाबद्दल आंतून वांकडें सुरू झालें. मुरादाबादच्या सुभ्यावरून निजाम व चंद्रसेन जाधवराव दिल्लीस आले व त्यांनीं सय्यदबंधूंस मदत केली; तरी सय्यद बंधूंचें व निजामाचें चांगलेंसें पटेनासें झालें. सय्यदांनीं शाहूमहाराजांची मदत मागितली, त्यामुळें चंद्रसेन व निजाम यांचें सय्यदबंधूंशीं वांकडें आलें. सय्यदांनीं निजामाची नेमणूक माळव्याच्या सुभ्यावर केली. तेव्हां चंद्रसेन व निजाम यांनीं माळव्याचा बंदोबस्त करून दक्षिणेकडे दृष्टि फिरविली. चंद्रसेन जाधवराव यांस कोल्हापुरास पाठवून कोल्हापूरचे संभाजी महाराज यांच्याशीं निजामानें संधान बांधलें. नंतर १२००० फौज बरोबर घेऊन निजाम व चंद्रसेन नर्मदा उतरून दक्षिणेंत आले. चंद्रसेन जाधवराव यांनीं आपल्या बरोबर हैबतराव निंबाळकराचा मुलगा रावरंभा व आणखी पुष्कळ मराठे सरदार निजामाचे मदतीला आणिले होते. या सर्व लोकांनिशीं निजाम दक्षिणेंत येऊन त्यानें असिरगडचा किल्ला व बऱ्हाणपुर शहर आपल्या ताब्यांत घेतलें व वऱ्हाडचा सुभेदार घोसखान हाही निजामास येऊन मिळाला. माळव्यांत जी बादशाही फौज सय्यदांनीं ठेविली होती, तिचा मुख्य दिलावरअल्लीखान हा निजामाचा पाठलाग करीत आला. बऱ्हाणपुरानजीक उभयतांची लढाई होऊन तींत दिलावरअल्लीखान मारला गेला.*

आलफअल्ली नांवाचा दुसरा एक मोंगली सरदार दक्षिणेंत होता. तो हुसेन सय्यदाचा पुतण्या असून त्याच्या वतीनें दक्षिणचा कारभार पहात होता. त्यास दिलावरअल्लीची पराभव पावलेली फौज जाऊन मिळाली व तो लगेच निजामाशीं सामना करण्याकरितां वऱ्हाडांत गेला. निजामाचा बंदोबस्त विशेष होता. ह्या दोन्ही सैन्यांची गांठ पैनघाटांत बाळापूर नांवाचें लहान शहर आहे तेथें पडली. यावेळीं शाहू महाराजांचे तर्फे सेनापति खंडेराव दाभाडे हे सय्यद हुसेनच्या बाजूनें लढण्यास आले होते, व निजामच्या वतीनें चंद्रसेन जाधराव व कोल्हापुरचे संभाजी महाराजांचे सरदार हे आले होते. यावेळीं चंद्रसेन जाधवराव व निजाम यांनीं मोठ्या शर्तीची लढाई देऊन आलफअल्ली यास रणांत ठार केलें, व निजामास स्वतंत्रतेचा पाया घालण्यास पूर्ण मदत केली. याप्रमाणें +चंद्रसेन जाधवराव यांनीं निजामउल्मुल्क यास मोठे श्रम व साहस करून संभाजी महाराजांचे बाजूस वळविलें. ही बाळापूरची लढाई ८ आगष्ट सन १७२० मध्यें झाली. याच लढाईमध्यें दमाजी गायकवाड प्रसिद्धीस आले.

चंद्रसेन जाधवराव यांनीं निजामउल्मुल्कास संभाजीचे बाजूचा करून घेऊन शिवाय आणखी दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर व कुलाब्याचे आंग्रे, चव्हाण, घोरपडे, कागलकर घाडगे, निंबाळकर व दाभाडे वगैरे जुने मराठे सरदार आपले बाजूस

* ग्रँट डफ पान ३९५.

+ ग्रांट डफ, पान ३९५।३९६ पहा.

वश करून घेतले, व पुनः शाहूमहाराजांशीं सामना देण्याची तयारी केली. ह्या कटाची सर्व बातमी बाळाजी विश्वनाथाला होतीच. तेव्हां ह्या कटांतून वरील मराठे सरदार फितवून आपलेकडे वश करून घ्यावेत, म्हणोन त्यांनीं पुष्कळ खटपट केली व त्याप्रमाणें कटांतून वरेच सरदार बाळाजीस वश झाले, त्याची हकीकत खालीं लिहिल्याप्रमाणें:—

वर सांगितलेंच आहे कीं सचिव शंकराजी नारायण यांच्या मृत्यूपासून शाहूचा मोठा फायदा झाला, व बाळाजीचेंही त्यांत साधन झालें. दुसरा मोठा ब्राह्मणसरदार प्रतिनिधि. हा प्रतिनिधि कोल्हापूरच्या बाजूला पूर्ण अनुकूल होता. व त्यानें शाहूमहाराजांबरोबर सातारचा किल्ला लढविला. परंतु शेखमिरा हे शाहूमहाराजांस जाऊन मिळाले; व राजकारण करून प्रतिनिधि हा बेसावध असतां त्यास कैद करून किल्ल्याच्या महाराजांचे स्वाधीन केला, हा मजकूर पूर्वीं आलाच आहे. त्यावेळीं परशुरामपंत प्रतिनिधि यांस सातान्यास कैद करून ठेविलें होतें. ते अद्यापपर्यंत तसेच कैदेंत होते. याप्रमाणें दोन ब्राह्मण सरदारांची आपोआप व्यवस्था झाली. रामचंद्रपंत अमात्य मात्र चंद्रसेन यांच्या बाजूस पूर्णपणें होते, ते अखेरपर्यंत तसेच राहिले. परंतु रामचंद्रपंत या वेळीं वृद्ध झाले होते, तेव्हां त्यांचा विशेष उपयोग झाला नाहीं, हें उघडच आहे. आतां बाकी राहिलेले मराठे सरदार यांची बाळाजीनें कशी व्यवस्था लावली तें पाहूं.

दमाजी थोरात हा रामचंद्रपंत अमात्य यांच्या हाताखालीं जिंजीच्या वेढ्याचे वेळेस सुपें आणि पाटस ह्या दोन परगण्यांवर नेमिला होता, व पुढें चांगलें काम केल्यामुळें ते दोन्ही परगणे त्यास जहागीर देण्यांत आले. तो हिंगणगांव येथें गढी करून राहिला होता. त्यास चंद्रसेन जाधवराव यांनीं संभाजीच्या वतीनें शाहूच्या मुलखांत धुंडपणा करण्यास सांगितलें. त्याचप्रमाणें उदाजी चव्हाण अथणीकर यालाही चंद्रसेन जाधवराव यांनीं संभाजीचे वतीनें शाहूचा प्रांत लुटण्यास सांगितलें होतें. तो ३२ शिराळ्यांस गढी करून राहिला होता. थोरात व चव्हाण या उभयतांनीं सातारप्रांतापर्यंत स्वारी करावी, चव्हाण यानें चौथाई घ्यावी, गांवें लुटावी, मारावें, असा क्रम चालविला. सन १७४४ चे सुमारास शाहूनें थोराताच्या बंदोबस्ताकरितां बाळाजी विश्वनाथ यास पाठविलें. तो जाऊन त्यांची लढाई जाहली. तींत बाळाजीपंत व अंबाजी पुरंदरे यांस त्यानें धरलें व कैदेंत ठेविलें. तेव्हां थोरातास,शाहूमहाराजांनीं मोठा दंड भरून बाळाजी विश्वनाथ यांस सोडवून आणविलें. त्यानंतर सचिव नारो शंकर याचे आईकडे व कारभाऱ्याकडे थोरातावर स्वारी करावयाचें काम सोंपविलें. थोरातानें सचिवासही कैद केलें. याप्रमाणें थोरात संभाजी महाराजांचे तर्फेनें शाहूस त्रास देऊं लागला. पुढें स्वतः शाहू त्याजबरोबर लढण्यास निघाले. थोरातास विश्वासानें आपल्याजवळ आणिलें, तरी थोरात त्यांच्या बाजूस वळेना. तेव्हां पुनः साताऱ्याहून सरलष्कर निंबाळकर यांस तोफखाना, पागा, फौज असें श्रेष्ठ प्रतीचें सामान देऊन थोरातावर रवाना केलें. बाळाजीपंतांस बरोबर दिलें होतें. सरलष्कर यांनीं मोठ्या हिंमतीनें लढून दमाजी थोरात यास कैद केलें. याप्रमाणें थोराताचा बंदोबस्त झाला. यांत बाळाजीचा बिलकूल कर्तृत्वपणा दिसून आला नाहीं. उलट, थोराताकडून कैद होऊन राहिला होता, तो कसावसा पैसा भरून सुटला, व अखेर एक मराठा सरदार सरलष्कर निंबाळकर यानें थोराताचा बंदोबस्त केला.

दुसरा ब्राह्मण सरदार कृष्णराव खटावकर हाही शाहूच्या प्रांतास उपद्रव देत होता व हा मोंगलांच्या तर्फे लढत असे. त्याजवर परशुरामपंत प्रतिनिधीचा मुलगा श्रीपतराव हा पाठविला, बरोबर बाळाजीपंतही होता. श्रीपतरावानें खटावकराशीं शिकस्तीनें लढाई केली. खटावकरानेंही त्याशीं जबरदस्त सामना दिला. शेवटीं तह होऊन खटाव वगैरे जहागिरी त्यास देऊन शाहूनें आपले पदरीं ठेविला व परशुराम प्रतिनिधि यास त्याचे मुलानें चांगलें काम केल्याबद्दल सोडून देऊन, मुलाकडे प्रतिनिधिपद दिलें. याप्रमाणें खटावकर व प्रतिनिधि हीं दोन्हींहि घराणीं बाळाजीनें आपलींशीं करून घेतलीं. कुलाब्याचे आंग्रे यांचा बंदोबस्त करण्यासाठीं त्यांस मोठी जहागीर देऊन कोंकणांत स्वतंत्रता दिली व त्यांच्याशीं बाळाजीपंतानें तह करून त्यास शाहूकडून सरखेल अशी पदवी देवविली. याप्रमाणें कोंकणपट्टीवर कुलाब्याचे आंग्रे यांस स्वतंत्रतेनें राज्य करण्यास परवानगी दिली आणि शाहूवर

उठलेले बहुतेक सरदार लांचलुचपत, जहागिऱ्या व पदव्या वगैरे देऊन बाळाजीनें आपलेकडे करून घेतले. वास्तविक म्हटलें असतां गोडबोलेपणापलीकडे बाळाजीनें ह्यांत सत्कृत्य कांहींच केलें नाहीं. घरीं बसून सल्ला देण्यापलीकडे कांहीं विशेष काम केलें असें नाहीं. शिवाजीचा पेशवा मोरोपंत पिंगळे ह्याच्याप्रमाणें त्यानें समरांगणावर पराक्रमाचें कृत्य कोणतेंच केलें नाहीं. चंद्रसेनाच्या कचाट्यांतून सुटण्यास त्यास शाहूमहाराजांची कांस धरावी लागली. कृष्णराव खटावकरानें त्यास मुलाबाळांसुद्धां अडकवून टाकिलें. दमाजी थोरातानें त्यास चांगलाच हात दाखविला. आंग्र्यास सुद्धां लांच भरल्याप्रमाणें करून आपणाकडे वळविलें. याप्रमाणें बाळाजीनें चंद्रसेनाचे कटांतले सरदार फोडले.

बाळापूरची लढाई झाल्याच्या सुमारास, बाळाजी विश्वनाथ मरण पावला, त्याचे ठिकाणीं त्याचा मुलगा बाजीराव हा पेशवा झाला. शाहूराजाचे नांवानें ज्या दिल्लीहून सनदा होऊन आल्या होत्या; त्यांप्रमाणें संभाजीस पुढें करून चंद्रसेन व निजाम यांनीं शाहूचा अम्मल होऊं दिला नाहीं. जागोजाग शाहूशीं लढाई देऊन संभाजीचा पक्ष जोरानें उचलून धरिला व कांहीं केलें तरी शाहूस गादीवरून काढण्याचा हट्ट चंद्रसेन जाधवराव यांनीं कधींही सोडला नाहीं. चंद्रसेन जाधवराव हे रात्रीं बिछान्यावर न निजतां तरटावर निजत असत, याचें कारण त्यांची मागें सांगितलेली प्रतिज्ञाच होय. जरी या वेळेस बरेच मराठे सरदार कटांतून निघून गेले, तरी पुनः मराठ्यांचे सेनापति खंडेराव दाभाडे वारल्यावर त्यांच्या ठिकाणीं यशवंतराव दाभाडे, त्रिंबकराव दाभाडे यांस शाहूराजाकडून संभाजी महाराजांकडे वळवून घेतलें. तें असें कीं, बाजीराव यानें बुंदेलखंडाचा बंदोबस्त त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांस सल्ल्यांत न घेतां आपण एकटेंच जाऊन केला, हें त्रिंबकराव सेनापति यास बरोबर वाटलें नाहीं. बाजीरावानें त्यांत बराच मुलूख आपल्याकरितां मिळविला, तेव्हां त्रिंबकराव यास वाटलें कीं, माळवाप्रांतीं सरदेशमुखीचा मामला आपल्याकडे असून बाजीराव या प्रांतीं स्वाऱ्या करून आपला फायदा करून घेतो, अशानें आपण तसेच कोरडे राहूं, असें वाटल्यावरून चंद्रसेनामार्फत निजामाकडे त्यानें राजकारण केलें, व तो निजामाला जाऊन मिळाला. बाजीरावानें ही गोष्ट शाहूस लिहिली. तेव्हां शाहूनें सेनापतीस बरोबर घेऊन यावें, असा हुकूम दिला. बुंदेलखंडाकडून बाजीराव माळव्याहून येत असतां सेनापति चालून त्यास पुढें आडवे आले. तुम्हीं आमचे तालुक्यांतून जाऊं नये, असें त्यांनीं बाजीरावास लिहिलें. इकडून नवाब व चंद्रसेन जाधवराव हेही गुजराथकडे चाल करून निघाले. बाजीरावानें सेनापतीस लिहिलें कीं, तुमच्या प्रांतास आम्हीं उपद्रव करणार नाहीं. नवाब फौजेसुद्धां आमचे पिछाडीवर आहेत. याचकरितां त्या मार्गें जाणार. त्रिंबकराव दाभाडे हे रस्ता देऊन डभई येथें उभे राहिले. बाजीरावाची व त्यांची जंगी लढाई झाली. तींत दुर्दैवानें सेनापतीचे कपाळावर एक गोळी लागून ते ठार झाले. याप्रमाणें चंद्रसेन जाधवराव यांचे बाजूचा एक सरदार नाहींसा झाला. यामुळें त्यांचा पक्ष लंगडा पडला. तथापि त्यांनीं आपल्या कटांत प्रतिनिधि यांस आंतून अनुकूल करून घेतलें. कोल्हापुरकर संभाजी महाराज यांस आपलेकडे बोलावून घेतलें, व राज्याची वांटणी निम्मेनिम करून द्यावी, असें बोलणें शाहूमहाराजांशीं लाविलें. तें त्यांनीं नाकबूल केल्यावरून " संभाजीराजे यांनीं आपली सर्व फौज जमा करून शाहूवर स्वारी करण्याची तयारी ठेवावी. इकडील आम्ही फौज सामान पोक्त करून निघतों, आणि फौजेचा खर्च पाहिजे तो तुमच्या राज्याचा वाटा सिद्ध होईपर्यंत आम्हीं दरमहा चालवितों. " असें चंद्रसेनाचे मार्फत निजामानें संभाजीस पत्र लिहिलें. पुढें संभाजी जमाव करून किल्ले कोट घेत घेत रामचंद्र अमात्यासह नवाबाकडे निघून आले. तिकडून निजामही पुढें येऊन त्यांच्या भेटी होऊन दोन्ही फौजा एकत्र झाल्या. हें सर्व वर्तमान साताऱ्यास शाहूस कळलें. याबद्दल मल्हारराव रामराव चिटणीस यांनीं शाहू महाराजांचे बखरींत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर दिला आहे.—

" संभाजी राजे विपरीत बुद्धि करून हें राज्य देवब्राह्मणांचें. त्यांत श्रीसांब श्रीभवानीची कृपा. यवन लोकांचा नाश करून राज्य वडिलांनीं स्थापिलें व आम्ही ही तेंच करितों. यांत आपण यवनांचे आश्रयास जाऊन राज्यास अपाय करूं इच्छितों. हें शेवटास कसें जाईल, हा विचार करित नाहींत.

त्यापक्षीं आपणास ही मसलत करणें प्राप्त झाली, म्हणोन वर्तमान समजलें यावरून विचार करून सर्व प्रधान व फौज यांस तयारी करून येण्याविषयीं पत्रें पाठविलीं. तयारी करविली. नबाब यांनीं तोफखाना व जंगी सामान गारदी वगैरे मजबूत करून जाधवराव वगैरे सरदार, मनसबदार व संभाजीराजे फौजेसुद्धां कूच करून पुढें चालून आले. महाराजांनीं सर्व प्रधान बोलावून विचार केला जे-संभाजी राजे यांनीं मनांत दुर्बुद्धि धरिली आहे. हें राज्य श्रीचे कृपें थोरले महाराज यांजपासून आजपर्यंत साहाय्य करण्यास कोण प्रयास लागले. म्हणोन त्यांस पत्रें लिहिलीं जे-हें राज्य श्रीचें. यवन लोकांचे आश्रयास जाऊन त्यांचा आश्रय केला. त्यास जय कसा येईल. तुम्हांस राज्य लोभ बहुत होता. तरी आम्हांस सांगोन पाठवावयाचें होतें. आम्हांपाशीं शेवक लोक दिगंत प्रताप करावे ऐसे आहेत. त्यांतील तुमचे बराबर एकास देऊन एकादें राज्य साधून दिलें असतें. किंवा पूर्वी महाराजांनीं साह्य केलें असतें. त्यांतून तुम्ही साह्य करून आम्हांस तुम्हीं पराक्रम करून दाखवावा होता; किंवा आम्हीं तें राज्य यवनांनीं घेतलें. तें पुनः सोडवितों. [ तेव्हां ] तुम्हांसही याखेरीज यांतील सोडवून दिलें असतें. आम्हीं सोडविलें यांत मागावें व राज्याचा विभाग करावा. यावा म्हणावें हे कोठें नीत आहे ? पूर्वीही कोठें झाली नाहीं. हे कोण बुद्धि केली. कैलासवासी राजाराम साहेब यांनीं औरंगजेब मोठे बलाढ्य शत्रु. दोन लक्ष फौज व दोन लक्ष पायदळ सुद्धां येऊन संभाजीराजे यांचे अवस्थेमुळें राज्य हरण केलें. सर्व फौज बुडाली. ऐसे समयांत कोणते प्रकारें चंदीकडे आम्हांस टाकून जाण्याचा समय प्राप्त झाला. [ तेव्हां ] तसें करून चंदीस जाऊन पावले. तेथें फौज व सुभे जमवून पैसे जमविले. आणि तेथून रात्रंदिवस शत्रूशीं लढाया देऊन फौज त्यांची बुडवून राज्याचा भाग अमल नेला. पुनः तेथें प्रसंग पडला असतां देशीं येऊन लढाया जातीनें देऊन त्यांचीं मोठीं स्थळें औरंगावाद [ वगैरे ] जाऊन लुटलीं ऐशी ख्यात केली.आम्ही नजरबंदींत होतों. त्यांचे पोटीं ते समयीं आपणच राज्याभिषेक करून राज्य करणें. सिंहासन करणें असते. तरी त्याचे हातीं काय न होतें ? आमचे ठायीं कसें लक्ष्य ठेविलें, हें तुम्हीं जाणत असोन हा विचार केला. बरें असो. झाली ती गोष्टच बरी झाली. याउपरी तरी यवनांचा आश्रय करावा हें विहित नव्हे. ऐसें मनांत आणोन हरप्रकारें निघावें. तुम्हांस दौलत पाहिजे ती नवीन सिद्ध करून देऊं अगर यांत खर्चास नेमणूक अधिक करून मागावी. राज्याचा तंटा म्हणणें हें पुराणांतरी झालें नाहीं. हे बुद्धि धरूं नये. ऐशीं पत्रें व सांगोन पाठविलीं कीं सेनापति सेवक लोक असोन लढाई करोन हरामखोरी करून महाराष्ट्र राज्य व धर्म सोडून यवनास शरण गेले. तेही मोठी कुळीचे रामदेवराव जाधवराव यांचा वंश परंतु त्यांनीं धर्म सोडिला. त्यांची अनुकूलता करून सेवक लोकांस व यवनास शरण जाणें. हें फार वाईट म्हणोन बहुता रीतीनें सांगोन पाठविलें असतां ती गोष्ट त्यांचे चित्तीं कांहींच आली नाहीं. आणि केलें मनसुब्याचे अभिमानास पडून निजामउल्मुल्क याणींही प्रतिनिधीचे विद्यमानें बोलणें ठरून तह झाला असतां लागलेंच विघाड करणें. हा विचार न करितां ते व हे मिळोन चालून पुढें आले. ”

याविषयीं शाहू महाराजांस मोठी चिंता पडून ते स्वतःच लढाई देण्यास तयार झाले, परंतु सेनापति सरलष्कर सेनासाहेब सुभा, बाजीराव आणि आंग्रे या सरदारांनीं शाहूस बरेंच उत्तेजन देऊन, आपण लढाईवर जाण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें बाजीराव व बाकीचे सरदार निघून मोंगलांच्या मोकावल्यास जालना प्रांतांत गेले. पावसाळा संपल्यावर निजामातर्फे येऊन खान यानें मराठ्यांच्या फौजेवर हल्ला केला. तेथून बाजीराव मराठी फौजेसह मातुरकडे पळून गेला, व तेथून औरंगाबादेस आला. बऱ्हाणपूर वगैरे शहरें निजामाच्या फौजेनें जाळलीं. चंद्रसेन व एऊजखान हे बाजीरावाचे पाठीवर होते, ते अजिंठ्याचा घांट उतरल्यावर बाजीराव गुजराथेंत गेला, व सरबुलंदखान यास जाऊन भेटला. सरबुलंदखान व निजाम यांचें वांकडें होतें. त्यामुळें सरबुलंदखानानें त्यास मदत दिली. हें ऐकून निजाम व चंद्रसेन जाधवराव पुण्याकडे वळले व त्यांनीं अहमदनगर येथें मुक्काम केला. बाजीराव कासारबारी घांटामध्यें येऊन उतरला. त्यानें गांडापूर वैजापूर हे प्रांत लुटले. चंद्रसेन जाधवराव व निजाम गोदावरी उतरून आले, तेव्हां बाजीरावानें

डोंगरास आग लावून दिली. त्यामुळें गवत वगैरे मिळण्याची फारच मारामार पडली. मराठ्यांच्या चालीप्रमाणें मंडळें करून मराठे निजामाच्या फौजेवर चाल करूं लागले. निजामाचा तोफखाना मराठ्यांवर सारखा सुरू असल्याकारणानें मराठ्यांचा बराच नाश झाला. परंतु मराठ्यांचे घोडेस्वार चपळ असल्याकारणानें ते टोळ्या करून लढूं लागले. चंद्रसेन जाधवराव यांनीं आपल्याकडून मोठ्या निकराच्या लढाया दिल्या. परंतु त्यांच्या सैन्यांत मोंगली घोडेस्वार असल्यामुळें त्यांस मराठ्यांचे बरोबर पल्ला करवत नसे. लढाईंत निजाम व चंद्रसेन जाधवराव यांची फौज आसपास पुष्कळ मैलावर पाणी नाहीं अशा ठिकाणीं येऊन उतरली. व मराठ्यांनीं इतक्यांत पाण्याची जागा आडवून धरली. त्यामुळें निजामाचें सैन्य फार हैराण झालें. व त्यांस तह करणें भाग पडलें. याप्रमाणें लढाईचा निकाल लागून निजाम सरकार व चंद्रसेन जाधवराव हैद्राबादेस परत गेले व संभाजी महाराज कोल्हापुरास गेले. कोल्हापूरचे संभाजीमहाराज हे विषयासक्त असल्यानें त्यांस मदत करावी असें चंद्रसेन जाधवराव यांस वाटेनासें झालें. ही *लढाई सन १७२८ मध्यें झाली.

दिल्लीच्या बादशहाचे मुलखांत बाजीराव यानें लुटालूट चालविल्यामुळें बादशहानें निजामउल्मुल्काचें मन वळवून त्यास दिल्लीस बोलाविलें. गुजराथ व माळवा या दोन प्रांतांचा कारभार त्याचा वडील मुलगा गाजीउद्दीन याजकडे सांगितला, व त्यानें मराठ्यांची सर्व फौज त्या प्रांतांतून हांकून द्यावी असें ठरविलें. निजाम यास आपले निशाणाखालीं मांडलिक राजे वगैरे जमविण्याचा अधिकार दिला. त्या सर्वांची एकंदर ३४००० फौज जमली. सर्व हिंदुस्थानामध्यें अत्युत्तम असा तोफखाना त्याच्या स्वाधीन झाला. अबदुलमजसूरखान, सफदरजंग आणि कोट्याचा राजा हे निजामाच्या पिछाडीस संरक्षणाकरितां होते. निजाम यानें ही स्वारी मोठ्या सावधपणानें चालविली होती. माळव्यांत फौजेसुद्धां निजाम उतरला. त्याचेबरोबर मराठे सरदार चंद्रसेन जाधवराव, रावरंभा वगैरे होते. बाजीरावानें ८०,००० फौज आपले हाताखालीं घेऊन तो नर्मदेवर आला. बाजीरावानें चिमणाजी आप्पा यांच्या हाताखालीं तापीवर पुष्कळ फौज ठेविली होती. या फौजेंत चंद्रसेन जाधवराव यांचा धाकटा भाऊ शंभुसिंग मराठ्यांचे तर्फे लढण्यास होता.* ही मोठी लढाई भोपाळानजीक झाली. त्यांत कोणीं कोणाचा पराभव केला नाहीं. शेवटीं २४ वे दिवशीं एकमेकांचा तह झाला. या लढाईत चंद्रसेन जाधवराव यांनीं निजामास फार चांगली मदत केली. पुढें सन १७४० मध्यें पुनः लढाई उपस्थित होऊन, कोणीं कोणाच्या राज्यास उपद्रव देऊं नये असा तह गोदावरीचे कांठीं होऊन मराठ्यांच्या लढाईचा शेवट झाला. ह्याच वर्षी बाजीराव मरण पावला.

चंद्रसेन जाधवराव सन १७५१ चे सुमारास वारले. त्यांच्या कारकीर्दीचे गुणदोष पुष्कळ इतिहासकारांनीं आपापले मर्जीप्रमाणें लिहिले आहेत. पुष्कळ इतिहासकारांनीं यांना राजद्रोही असेंही ठरविलें आहे. ग्रँटडफ साहेब हे मात्र कांहींएक म्हणत नाहींत. मराठ्यांच्या इतिहासाची माहिती सरदेसाई यांनीं मात्र चांगली दिली आहे.

सेनापति चंद्रसेन केवळ संभाजीचा पक्ष स्वीकारून स्वस्थ बसला नाहीं. निजाम-उल्मुल्काचे मार्फत मोंगलांशीं संधान बांधून शाहूचा पाडाव करण्याचा त्याचा निश्चय झाला होता. वास्तविक ही चुरस बाळाजी व चंद्रसेन यांजमध्यें होती. प्रत्येकास असें वाटत होतें कीं, आपल्यावांचून शाहूचें चालावयाचें नाहीं. तशीच प्रत्येकाची धमक अशी होती कीं, दुसऱ्याचे मदतीची आपणास जरूर नाहीं. दोघांचा कावा, वर्तनक्रम मात्र वेगळा, बाकी दोघांचा उद्देश एकच. चंद्रसेन अभिमानी, हट्टी, एकदां स्वीकारलेली पद्धत कधीं न सोडणारा व सेनापतित्वाच्या ज़ोरावर शाहूस वाटेल तसा नाचविण्याची धमक बाळगणारा असा होता. बाळाजी दूरदर्शी, सौम्य, आंतल्या पेंचांचा, मोठ्या खुबीनें सूत्रें चालवून "चंद्रसेनाची आपल्यास जरूर नाहीं." असें मोठ्या नम्रतेनें व कळकळीनें शाहूस भासविणारा असा होता. असा वर्तनक्रम भिन्न असूनही शाहूस आपल्या तंत्रानें चालवावयाचें, हा

* ग्रांट डफ, पान ४२७ पहा.

* ग्रांट डफ, पान ४६० पहा.

दोघांचा एकच उद्देश होता. चंद्रसेन युक्तीनें व सौम्यपणानें वागून शाहूस मिळता तर अखेर बाळाजी त्याचे कबजांत आला असता. चंद्रसेनानें एकच उत्तर शाहूस दिलें कीं, "बाळाजीस माझ्या स्वाधीन करा. मग काय तें पुढें बोला." बाळाजीची अक्कल इतकीच कीं, नानाप्रकारच्या उलाढाली करून महाराजांशीं चंद्रसेनाची एकी करून दिली नाहीं. चंद्रसेन माघार घेणारा नव्हे; पण संभाजीचा पक्ष निर्बल असल्यामुळें त्याच्या कर्तृत्वास जागा राहिली नाहीं. अर्थात् आपला आग्रह तडीस नेण्यास त्यास मुसलमानांकडे जावें लागलें. चंद्रसेनासारखा पराक्रमी सरदार शाहूनें आपणाकडे वळवून घेतला नाहीं, ही फार अनिष्ट गोष्ट झाली. अशा कामांत थोरल्या शिवाजीची हातोटी शाहूस साधली नव्हती. कांहीं तरी युक्ति लढवून बाळाजीची अक्कल व चंद्रसेनाची तलवार यांचा मिलाफ शाहूनें कायम राखिला असता, तर बाळाजीच्या निदान बाजीरावाच्या हयातींत कदाचित् दिल्लीचें तख्त मराठ्यांस प्राप्त झालें असतें. वास्तविक हरएक प्रकारचें भांडण मिटविण्यामध्यें शाहू बराच कुशल होता. प्रत्यक्ष छातीवर बसलेल्या चुलत भावाचीही त्यानें समजूत केली. पण बाळाजीच्या कर्तबगारीनें अगर मराठेशाहीच्या दुर्दैवानें चंद्रसेनाची समजूत करण्याची दिशा शाहूनें घेतली नाहीं. इतकें खरें कीं, ह्यामुळें बाळाजीचें मात्र कल्याण झालें. चंद्रसेनाची समजूत झाली असती तर बाळाजीस पेशवेपद कदाचित् मिळालें नसतें. पण बाळाजीचा मार्ग मात्र निष्कंटक होऊन शाहूनें त्यास पेशवा करण्याचा निश्चय केला. तोच शेवटीं कायम झाला. याप्रमाणें सरदेसाई यांनीं आपला अभिप्राय दिला आहे. सरदेसाई यांनीं "चंद्रसेन यांनीं मुसलमानास न मिळतां काय उद्योग करावयाचा होता ?" याबद्दल खुलासा केला नाहीं. चंद्रसेन जाधवराव यांनीं कोल्हापुरकरांस सार्वभौम करण्याबद्दल ईर्ष्या धरली होती व ती कांहीं अन्यायाची नव्हती. कोल्हापूरकरांचें घराणें सार्वभौम झालें असतें. तर मराठ्यांचें राज्य मजबूत पायावर उभारलें गेलें असतें, व देशामध्यें एकी राहिली असती. ज्या सरदारांच्या वाडवडिलांनीं शिवाजीमहाराजांच्या पश्चात् गेलेलें राज्य पुनः मिळविण्याकरितां व मराठेशाहीच्या स्वतंत्रतेकरितां श्रम व साहस करून खाणें पिणें, ऊन, तहान, यांची दरकार न पाळतां आपले प्राण खर्ची घातले, त्यांच्या वंशजांना मराठ्यांच्या राज्यकारभारामध्यें कोणत्याही तऱ्हेचा हक्क नसावा व बाळाजीचा कोणत्याही प्रकारचा राज्यावर हक्क नसतां, अथवा श्रम साहस न करितां, मालकास खोट्या नाट्या गोष्टी सांगून खूष करून, कांहीं जुने सरदारांस जहागिरी सारखी लांच देऊन व आपणही स्वार्थपरायण होऊन थोरपणा मिळवावा हा अन्याय नव्हे काय ? चंद्रसेन जाधवराव यांच्या वडिलांनीं (धनसिंग जाधवराव यानीं) प्रत्यक्ष शाहूस मराठ्यांचा राजा केलें. शाहूवर बाळाजीनें कांहीं एक उपकार न करितां शाहूनें बाळाजीचा पक्ष धरिला हें राष्ट्राचें दुर्दैव होय! कोणी कितीही चंद्रसेनास शिव्या दिल्या तरी चंद्रसेन यास देशकाल वर्तमान पाहूनच वर्तन करावें लागलें. संभाजीचे बाजूस मिळून मराठ्यांचें राज्य राखण्याचाच त्याचा हेतु होता. यांत देशद्रोहीपणा तो त्यानें कोणता केला ? चंद्रसेनानें बाळाजीचे पायां पडावयास पाहिजे होतें कीं काय ? केवळ चंद्रसेनच शाहूमहाराजांकडून गेला असें नाहीं. प्रतिनिधि, दाभाडे, आंग्रे, थोरात, घाडगे, घोरपडे, चव्हाण, निंबाळकर असे मोठमोठे जुनें सरदार शाहूचा पक्ष सोडून ताराबाईस जाऊन मिळाले. पण कोल्हापुरीं त्यांच्या कर्तृत्वास जागा न राहिल्यानें मुसलमानांस जाऊन मिळणें त्यांना भाग पडलें. व त्याबद्दल दिल्लीच्या बादशहानें त्यांची योग्यता जाणून मोठमोठ्या राजांसारख्या लाखों रुपयांच्या जहागिऱ्या त्यांस देऊन त्यांचा मानमरातब राखिला. जाधवरावांच घराणें पुढें मराठ्यांच्या राज्यास फार उपयोगीं पडलें. हें वर्णन त्यांचे पुढील कारकीर्दीत देऊं. पुढें चंद्रसेन जाधवराव यांस दिल्लीचे बादशहाकडून दक्षिणची नायब सुभेगिरी (निजाम यास दक्षिणचा सुभा नेमून त्याचे हाताखालीं चंद्रसेन यास मुतालीक नेमिलें.) मिळाली त्याबद्दल ६० लक्षांचा मुलूख मिळाला. त्याची यादी खालीं लिहिल्याप्रमाणें दिली आहेः—

| | |
|---|---|
| १ परगणे भालकी राहाण्याची जागा. | १ परगणे कल्याण किल्ला राहाण्याची जागा. |
| १ परगणे निलगे. | १ परगणे हुमणाबाद. |
| १ परगणे प्रतापपूर. | १ परगणे कलबर्गे. |

| | |
|---|---|
| १ परगणे सटवली. | १ परगणे येकहोली. |
| १ परगणे रायचूर | १ परगणे बहादर बंडा. |
| १ परगणे आळंद. | १ परगणे अबजलपूर. |
| १ परगणे चितापूर. | १ परगणे नरवणे. |
| १ परगणे गदवल. | १ परगणे गुलमटनाल. |
| १ परगणे गुजोटी. | १ परगणे येगली. |
| १ परगणे चरचनापल्ली. | १ परगणे चिटगोपे. |

२०

याप्रमाणें चंद्रसेन जाधवरावांची कारकीर्द समाप्त होऊन त्यांचा एकुलता एक मुलगा वीरसिंह ऊर्फ राजा रामचंद्र जाधवराव यांची कारकीर्द सुरू झाली.

## वीरसिंह ऊर्फ राजा रामचंद्र जाधवराव.

( इ० स० १७५१ पासून इ० स० १७६९ पर्यंत. )

रामचंद्र जाधवरावांची कारकीर्द सुरू झाली त्यावेळीं नुकेच शाहूमहाराज साताऱ्यास वारले असून, ताराबाई व बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे ह्यांच्यामध्यें राज्यासंबंधीं लढा लागला होता. शाहूमहाराज यांनीं आपले मृत्युपत्रांत ' मराठ्यांचें सर्व राज्य नानासाहेब पेशवे यांच्या स्वाधीन केलें. ' असें होतें, व ताराबाई ' हें मृत्युपत्र खोटें असून त्याप्रमाणें राज्य नानासाहेब यांच्या हातांत जाऊं द्यावयाचें नाहीं. ' अशी खटपट करीत होती. ताराबाईसाहेब यांच्या बाजूला दमाजी गायकवाड व नागपूरकर भोंसले वगैरे सरदार होते; परंतु नानासाहेब पेशवे यांनीं लबाडी करून गायकवाड यास कैद केलें. व शाहूच्या पत्नीला सती जाणें हें किती पुण्यप्रद आहे त्याचें महत्त्व उपाध्यायाकडून वाचवून दाखवून, सती जाण्यास भाग पाडलें. येणेंप्रमाणें बंदोबस्त करून आपल्या हातांत लबाडीनें राज्य घेतलें.

सन १७४८ च्या जूनचे १९ व्या तारखेस निजाम उल्मुल्क वारला असून, त्यास गाजीउद्दीन, नासिरजंग सलाबतजंग, निजामअल्ली, महमुद्शरीफ व सरमोगल अशीं सहा मुलें होतीं. गाजीउद्दीन हा निजाउल्मुल्क वारले तेव्हां दिल्लीस होता, सबब नासिरजंग हा दाक्षिणचा सुभेदार झाला. नासिरजंग यानें कर्नाटकामध्यें आपला पुतण्या मुजफरजंग यानें बंड केलें होतें, त्याजवर स्वारी केली. त्या कामीं राजे रामचंद्र जाधवराव, जानोजी भोंसले, मुरारराव घोरपडे गुत्तीकर वगैरे मराठे सरदारांनीं त्यास मदत केली. परंतु नासिरजंग यास विश्वासघातानें गोळी घालून ठार मारण्यांत आलें, व त्याचा पुतण्या मुजफरजंग ज्यानें बंड केलें होतें तो दक्षिणच्या सुभ्याच्या गादीवर आला. या कामीं रामदास नांवाचा एक ब्राह्मण त्यास अनुकूल झाला होता. त्यास त्यानें आपला दिवाण करून राजा रघुनाथदास असा किताब दिला. या कामीं फ्रेंच सरदार बुसी व डुप्ली वगैरे सरदारांनीं मुजफरजंग यास मदत केली. परंतु मुजफरजंग लवकरच वारला. त्याचे ठिकाणीं निजामाचा तिसरा मुलगा सलाबतजंग हा गादीवर आला. निजामाचा वडील मुलगा गाजीउद्दीन हा दिल्लीस होता म्हणून मागें सांगितलें, त्याच्याशीं बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं संधान बांधून त्याचा गादीवर हक्क आहे असें त्यास समजवून सलाबतजंग याच्या राज्यांत लुटालूट सुरू केली. त्यामुळें बुसी ५०० युरोपियन व ५००० शिकलेले शिपाई असे बरोबर घेऊन मराठ्यांचे राज्यांत लढाई देण्याचें ठरवून आला. सलाबतजंग हाही राजा रामचंद्र जाधवराव, मल्हारराव व रावरंभा निंबाळकर आणि मोठमोठे मोंगल सरदार बरोबर घेऊन अहमदनगर येथें आला. व आपला दिवाण राजा रघुनाथदास याच्या मार्फत ताराबाई व कोल्हापूरचा संभाजी राजा यांस त्यानें वळवून घेतलें. याप्रमाणें सर्व दक्षिण जिंकण्याचे हेतूनें नबाबाची तयारी झाली. पेशवे ह्या वेळेस अत्यंत घाबरून गेले. पेशव्यांनीं ४०००० स्वार बरोबर घेऊन मोंगलसैन्यास वेढा दिला. यावेळीं राजा रामचंद्र जाधवराव यास त्या कटांतून फोडण्याकरितां त्यांनीं पुष्कळ यत्न केला, परंतु जाधवराव अनुकूल झाले नाहींत. या कामीं पेशव्याला हैद्राबादचे मुक्कामावरून ता० १३ नवंबर सन १७५१ सालीं त्यांच्या कारकुनाचें पत्र आलें, तें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

श्री.

ता० १३ नवंबर सन १७५१

श्रीमंत राजश्री　　पंतप्रधान

स्वामीचे शेवेसीः—

विनंती. सेवक रघुनाथ गणेश कृतानेक विज्ञापना स्वामीचे कृपादृष्टीनें सेवकाचें वर्तमान तागायत छ ५

मोहरम पावेतों मे॥ लष्कर नबाब सलाबतजंग यथास्थित असे. छ मा॥रीं मौजे दुपटीहून लष्कराचा कूच झाला. सानवा कोशाचा मौजे केद्‌ल व पावल मुलखाचे तीरीं मुक्काम झाला. द्रकूच अहमदनगरास जातात तेथें जनाना ठेवून व बहुतेक बाहेर ठेवून जरीदा होऊन पुण्यास येणार. खान अजम सैद्‌लस्करखान यांचें डेरे दोन होते. पैकीं आजच एक माघारा पाठविला. काय गांवीं अगर पुढें दर येक गावीं ठेवावयास सांगितला आहे. राजाजीनें खानास एक लक्ष रुपये पेशगी आज प्रातःकाळीं पाठविली. आज्ञा केली कीं, स्वारास एक एक महिना पेशगी विना कसूर देणें. दोन महिने यांची तलब राहिली. तो ऐवज खजानेयावर देवविला आहे. याजप्रमाणें लष्करांत वांटणी केली व करित आहेत. हणमंतराव निंबाळकर काल छ ४ रोजीं लष्कर दाखल झाले. दोन हजार राऊत बरावर आले आहेत. काल संध्याकाळापूर्वी महमद अनवरखान नबाबानें पुढें पाठविलें. यावर रावमशारनिल्हे नबाबाचे मुलाजमतीस आले. सेवेसी विदीत झालें पाहिजे. सुभानजी थोरातही दोन कोस स्वारानसी कालच आले. पांढरेही आले. सा सात कोस स्वार आहेत. आघाडीस राहिले आहेत. हणमंतराव निंबाळकर यांची फौज खुदावंदखान खजाना घेऊन आले. त्याजबरोबर आली. हल्लीं खासा दोन हजार फौजेनसीं आले. एकूण चार हजार फौज आहे. नबाबाची फौज जमावत चालली. आज ता। विसेक हजार फौज जमा झाली आहे. आणिकही जमा होतच आहे. आणिक वर्तमान आढळलें कीं, राजाजीनें महाराव यांस पत्र पाठविलें कीं, तम्हीं फौजेसुद्धां येणें. सटवाजी जाधवराव यास निरोप देणें, व स्वामीसही पत्र पाठविलें कीं, तयार व्हावें. व खानास हरकारे यानें खबर दिली कीं, महाराज जाधवराव यास घेऊन लष्करांत येत आहेत. ही गोष्ट खानच बोलत होते. स्वामीजवळ फौज जमा झाली नाहीं. चार पांचेक हजार स्वार आहेत. स्वामीचा मुक्काम पुण्यासमीप कळसावर आहे म्हणोन येथें बातमी आहे. खानही याचप्रमाणें बोलत होते. सेवकानें जाधवराव याजकडे पत्र लेहून जासूद जोडी काल पाठविली ते अद्याप वर आली नाहीं. आज संध्याकाळ पावेतों आली तर येईल. विनंति-पत्र लिहीत असतांच जाधवराव यांजकडे जोडी पाठविली होती, ते आतांच आली. जाधवराव यांनीं सेवकास पत्र पाठविलें. तेथें लिहिलें कीं, तुम्हीं वर्तमान लिहिलें तें कळलें. स्नेहाचे विचारें त्यांनीं आम्हास बोलविलें, त्यावरून आलों. आम्हीं जवळच आहों. भेटीचे विचारेंकडून झाल्यास होईल. न होय तर उत्तम. येथील बातमी मात्र वरचेवरी अंतस्थाची खबर आम्हांस व श्रीमंताकडे रोजच्यारोज लेहून पाठवित जाणें म्हणोन छ ४ मोहरमचें पत्र आलें. जाधवराव व महागव एकत्र आहेत. सिंगवे पिंपळगांवास उभयतां होते,तेथून कालच कूच करून सात आठ कोश वरते निंब देव्हारे याचे रुखे मौजे राजेवाडीवर मुक्कामास आले म्हणोन जासूद सांगत होते. विनंति पत्र लिहित असतां दर्याजी जासूद खानाचे जासूदाकडे पाठविला होता. त्यानें येऊन वर्तमान सांगितलें कीं, खानाचे बातमीचे जासूद स्वामीचे लष्करांतून आतांच आले. ते सांगत होते कीं स्वामीचा मुक्काम खेड नजीक वडगांवावर आहे. बराबर फौज विसेक हजार आहे. हें वर्तमान आतांच कळलें. तें सेवेसी विदित व्हावयाकरितां विनंति लिहिली आहे. नबाबानें खानांस आघाडी सांगितली. परंतु अद्याप आघाडीस गेले नाहींत. पिछाडीसच रहात असतात. खान आज जरीदा आले. बहुतेक वस्त भाव माघारी लाविली. तुरकाबादेस ठेवावयास सांगितली आहे. नबाबाबरोबर फौज पंचविस हजार पावेतों जमा झाली आहे. आढळलें वर्तमान सेवेशीं विनंति लिहिली आहे. सेवेशीं श्रुत झालें पाहिजे हे विज्ञापना. या मुक्कामाहून वामोरी खालती तीन कोश आहे. विदित झालें पाहिजे. राजश्री शामजी गोविंद शहरांतून काल लष्करांत आले. हे विज्ञापना. राजश्री मनोहरपंती आज प्रातःकाळीं विनंति-पत्र लेहून दिलें. सेवक मजलीस आलीयावर विनंतिपत्र लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत झालें पाहिजे हे विज्ञापना."

निजाम व मराठे यांची कुकडी नदीवर गांठ पडली. तेथें मराठ्यांचा बराच नाश झाला. परंतु बुसीच्या सल्ल्यानें निजामानें मराठ्यांशीं तह केला; याप्रमाणें या लढाईचा शेवट झाला.

मागें सांगितलें आहे कीं, निजामाचा वडील मुलगा गाजीउद्दीन हा दिल्लीस अमिर-उल् उमराव असा किताब धारण करून राहिला होता. तो होळकर आणि शिंदे यांची मदत घेऊन दिल्लीहून सलाबतजंग याच्यावर स्वारी करण्याकरितां निघाला. सलाबतजंगाचा मुख्य दिवाण राजा रघुनाथदास हा भालकी येथें

मारला गेला. तेव्हां औरंगाबाद येथें सय्यद लष्करखान व शहानवाजखान असे दोन मुत्सद्दी रहात होते, ते फार लोकप्रिय होते, तेव्हां त्यांस सलाबतजंग यानें बोलविलें. हे दोघेही फ्रेंचांच्या विरुद्ध होते. परंतु त्यांनीं हैद्राबादीं येऊन बुसी नामक फ्रेंच सरदाराची मर्जी संपादन करण्यास सुरवात केली. कारण बुसीचें वजन सलाबतजंग याजवर बरेंच होतें. बुसीच्या सल्ल्यानें सय्यद लष्करखान यास निजामानें आपला दिवाण नेमिलें, आणि शहानवाजखान यास हैद्राबादचा सुभेदार नेमिला. सय्यद लष्करखान हा मराठ्यांचा दोस्त असून गाजीउद्दीन याच्याशीं आंतून मिलाफी होता. यानें गाजीउद्दीन दक्षिणेकडे निघाला असें खात्रीपूर्वक समजल्यावर बुसी व सलाबतजंग यांची समजूत घातली कीं, मी दिवाणगिरीचा राजीनामा देऊन मराठ्यांना जाऊन मिळतो. व मराठ्यांचें मन आपल्या बाजूला वळवून त्यांच्यातले पुष्कळ सरदार आपल्या बाजूला करून घेतों. याप्रमाणें समजूत केल्यावरून त्यांनीं त्यास रजा दिली. नंतर तो करमाळें येथें जानराव निंबाळकर यांचेकडे आला. ते दोघेही निघून बाळाजी बाजीराव पेशवे यांजकडे ब्रह्मणपूर मुक्कामीं आले. परंतु बाळाजी बाजीराव यानें सय्यदलष्करखान याचा स्वभाव वाईट दुष्ट आहे, असें जाणून त्याच्याशीं दोस्ती केली नाहीं व उलट गाजीउद्दीन यास सय्यदलष्कर दुष्ट आहे अशाबद्दल लिहिलें. त्यावरून गाजीउद्दीन यानें पेशव्याला लिहिलें कीं, तुम्ही आपले ताब्यांत निंबाळकर व सय्यदलष्कर यांस ठेवावें. आणि त्यांस तुम्ही आमचेकडे घेऊन यावें. तेव्हां सय्यदलष्कर याचें सैन्य व पेशवे यांचें सैन्य एक होऊन तें औरंगाबादेजवळ आलें. हें सैन्य १,५०,००० होतें. यावेळीं सैयदलष्कर यांनी राजा रामचंद्र जाधवराव यांस आपले कटांत घेण्याबद्दल खटपट केली. परंतु रामचंद्र जाधवराव हे त्यास मुळींच मिळाले नाहींत. रावरंभा मात्र मिळाला. इकडून रामचंद्र जाधवराव, सलाबतजंग व फ्रेंच सरदार बुसी असे गाजीउद्दीन याजबरोबर सामना देण्याकरितां निघाले. इतक्यांत पावसाळा कमी झाल्यामुळें दोन्ही बाजूंचीं सैन्यें लढाई देण्याच्या इराद्यानें सज्ज झालीं. परंतु सलाबतजंग यानें गाजीउद्दीन हा वडील असून त्याचाच गादीवर हक्क आहे असें जाणून त्याच्याशीं सल्ल्याचें बोलणें सुरू केलें. इतक्यांत, एके दिवशीं गाजीउद्दीन मेजवानीस शहरांत गेला, तेथें निजामअल्लीचे आईनें त्यास विष घालून ठार मारलें. अर्थातच सलाबतजंग याचा वैरी नाहींसा झाल्यावर तो गाजीउद्दीननें मराठ्याला देऊं केलेले प्रांत देण्यास नाकबूल झाला. परंतु फ्रेंच सरदार बुसी यानें त्याची समजूत करून व मराठ्यांशीं लढाईचा प्रसंग नसावा म्हणून गाजीउद्दीनानें देऊं केलेले प्रांत देण्याची त्यास सल्ला दिली. याप्रमाणें मराठे व निजाम यांचा पुनः तह झाला. व सय्यदलष्कर यास सलाबतजंग यानें पुनः आपला दिवाण केलें. ही गोष्ट इ० स० १७५३ मध्यें झाली.

पुढें फ्रेंच सरदार बुसी मच्छलीपट्टण येथें निघून गेला. तेथें तो बरेच दिवस आजारी होता. तेव्हां सय्यद लष्कर यास सलाबतजंग याचें मन आपलेकडे वळविण्यास आयतीच संधि सांपडली. त्यानें सलाबतजंग यास फ्रेंच लोक आपल्या नोकरींतून कमी करण्याबद्दल सल्ला दिली व आपल्या हद्दींतून फ्रेंच तोफखाना हांकून देण्यासाठीं सलाबतजंग यास घेऊन तो औरंगाबादेस आला. इतक्यांत बुसीही आपलें सैन्य घेऊन औरंगाबादेस आला. तेथें सलाबतजंगाची गांठ पडल्यावर पुनः त्यावर बुसीनें आपला पगडा बसविला, व सय्यद लष्कर यास नोकरींतून कमी करून शहानवाजखान यास दिवाण नेमिलें. पुढें पेशवे यांनीं सावनूरचे नबाबावर स्वारी केली. त्या कामीं निजामाची मदत मागितली होती. स्वारीचें कारण असें होतें कीं, बुसीचे हाताखालील मुजफरखान नांवाचा सरदार पेशव्याकडे सन १७५२ मध्यें गेला व पेशव्यांनीं महादजीपंत याचेबरोबर त्यास कर्नाटकांत पाठविलें. परंतु महादजीपंत याशीं त्याचें न जमल्यामुळें तो सावनूरचे नबाबाकडे गेला. सावनूरचे नबाबाकडे पेशव्यानें त्याची मागणी केली. परंतु सावनूरचे नबाबास सोंडुर व गुत्ती येथील घोरपडे सरदार यांची मदत होती, त्यामुळें मुजफरखानास परत देण्याचें त्यानें नाकारलें, तेव्हां जानोजी भोंसले यास पेशव्यांनीं बरोबर घेऊन ते सावनूरकर नबाबावर निघाले व कृष्णा उतरून त्यांनीं बागलकोट घेतला. हें हैद्राबाद येथील मुख्य दिवाण शहानवाजखान यास समजल्यावरून त्यानें पेशव्यांकडे संधान बांधलें. याजवरून पेशव्यांनीं त्याची मदत मागितली. सलाबतजंग हा बुसी, रामचंद्र जाधवराव आणि रावरंभा निंबाळकर यांसह पेशव्यास जाऊन मिळाला व सर्वांनीं सावनूरला

वेढा दिला. या कामीं मद्रास येथील इंग्लिशांनींहि मदत दिली होती. यावेळीं बुसीच्या तोफखान्यानें फारच मोठी कामगिरी केली. यावेळीं एक लाख फौज सावनूरच्या वेढ्यांत होती. जाधवराव, निंबाळकर आणि मोंगली फौज यांनीं लढाईची शर्थ केली. हें पाहून मुरारराव घोरपडे, फ्रेंच सरदार बुसी यास येऊन मिळाला. तेव्हां सावनूरच्या नबाबानें निजाम व पेशवे यांच्याशीं तह केला. मुजफरखान हा निजाम सलाबतजंग याच्या पदरीं गुप्तपणें राहिला. नंतर मुरारराव घोरपडे यांचेकडे गेला. यावेळीं शहानवाजखान निजामाचा दिवाण व पेशवे हे एकं होऊन फ्रेंचाला आपले हद्दींतून काढण्याबद्दल विचार करूं लागले. पुढें शहानवाजखान यानें बुसीला लिहिलें कीं, सावनूरची लढाई होऊन आतां शांतता झाली आहे, सबब तुमचे सैन्याची आम्हांला जरूर नाहीं. यावेळीं बुसीजवळ २००० घोडेस्वार, ६०० युरोपियन पायदळ, ५००० शिपाई आणि उत्तम तोफखाना असें सामान होतें. त्याच्याखुद्धां निजामावर हल्ला करण्याचा त्याचा बेत होता. परंतु मुजफरखान हा सलाबतजंग याजकडे असून शिवाय मराठे सरदार रामचंद्र जाधवराव व रावरंभा निंबाळकर वगैरे निजामास अनुकूल आहेत. आणि मुजफरजंगाची व आपल्या शिपायांची जुनी दोस्ती आहे; असा विचार करून त्यानें निजामाशीं लढाई दिली नाहीं. निजामाच्या सैन्यांतून निघून त्यानें आपल्या नोकरीचा राजीनामा दिला व मच्छलीपट्टण येथें जाण्याबद्दल परवानगी घेतली. तो तेथून थेट हैद्राबादीं आला; व कांहीं मजबूत इमारतींत येऊन उतरला आणि त्यानें आपल्या बचावाची तजवीज केली. हैद्राबादेकडे बुसी जाईल अशा संशयावरून राजा रामचंद्र जाधवराव व जानराव निंबाळकर रावरंभा या उभयतां मराठे सरदारांस ६००० फौजेनिशीं त्याचेवर निजामानें पाठविलें. हें सैन्य येत आहे, असें वाटल्यावरून बुसीनें पांदेचरीस मदत मागितली. शिवाय ६०० अरब व अबिसिनीयन लोक ज्यास त्यानें सुरत येथें नोकरीस ठेविलें होतें, ते येऊन मिळतील असें त्याला वाटलें होतें, परंतु जानराव निंबाळकर रावरंभा यानें हे लोक जवळ आल्याचें ऐकून त्यांस मध्येंच अडवून त्यांवर हल्ला केला व त्यांतील ५० लोक मारून बाकीचे सर्व कैद केले. या वेळीं इंग्रज सरकारची मदत शहानवाजखान यानें मागितली, परंतु ती त्यास देण्यांत आली नाहीं. अखेरीस बुसी यास मोठें संकट प्राप्त झालें. रामचंद्र जाधवराव व निंबाळकर यांनीं बुसी यास अगदीं जर्जर करून सोडलें. तेव्हां बुसी यानें राजारामचंद्र जाधवराव व रावरंभा निंबाळकर यांच्याशीं आंतून संधान लाविलें. राजा रामचंद्र जाधवराव यांच्याशीं दरबारांतील मुसलमान लोक वैर करीत असत. त्यांजपासून बुसीनें त्यास पुष्कळ वेळां मदत केली होती. तें मनांत आणून या बुसीचे उपकारांमुळें* राजा रामचंद्र जाधवराव व निंबाळकर हे बुसीचे बचावाकरितां त्यास अनुकूल झाले. व मच्छलीपट्टणाहून फ्रेंचांकडून बुसीस मदतीस पाठविलेल्या सैन्यास त्यांनीं अडथळा केला नाहीं; त्यामुळें बुसीला मदत येऊन दाखल झाली. सलाबतजंग यानें पुनः बुसीशीं मिलाफ केला व मुजफरखानें यास नोकरींतून काढून दिलें. त्यानें पेशव्याची माफी मागितली. याप्रमाणें राजा रामचंद्र जाधवराव यांनीं पुनः फ्रेंच व निजाम यांचा सल्ला करविला. ही गोष्ट सन १७५६ मध्यें झाली.

सलाबतजंग बुसीसह हैद्राबादेस येऊन दाखल झाला. या वेळीं निजामाचे दरबारांत फ्रेंच सरदार बुसी याचें वजन बरेंच वाढलें होतें, त्यामुळें राजा रामचंद्र जाधवराव यांचेंही निजामचे दरबारांत फारच वर्चस्व वाढलें. मोठमोठ्या मुसलमान सरदार लोकांना ही गोष्ट आवडेनाशी झाली, परंतु बुसीचें पूर्ण पाठबळ राजा रामचंद्र जाधवराव यास असल्यानें कोणाचें कांहीं एक चाललें नाहीं. मध्यंतरीं सलाबतजंग यानें आपला भाऊ निजामअल्ली आणि बसलतजंग या दोघांस दिवाण शहानवाजखान याच्या सल्ल्यानें दोन प्रांतांचे सुभेदार नेमिले. निजामअल्ली यास बेदरची सुभेदारी आणि बसलतजंग यास विजापूरची सुभेदारी दिली. ते आपापल्या जागांवर १७५६ मध्यें गेले. ह्या वर्षाच्या शेवटीं

* In the meantime Bussy maintained his post at Hyderabad against the army of Salabut Jung, and contrived to secure in his interests Ramchundur Jadow and Janojee Nimbalkur, the principal Mahrattas in the Moghul Service. They did not oppose the advancing reinforcement from Mansulipatam, and although great efforts were made to cut them off, the troops joined Bussy in the middle of August.

G. D. History Page 569.

फ्रेंच सरदार बुसी हैद्राबादेहून आपला दिवाण हैदरजंग यासह फ्रेंचांकडे जो मुलूख होता, त्याची व्यवस्था पाहण्याकरितां त्या प्रांतीं निघून गेला. ही संधि साधून शहानवाजखान यानें सलाबतजंग निजाम यास रामचंद्रराव जाधवराव याजवर स्वारी करण्याबद्दल सल्ला दिल्यावरून, सलाबतजंग हा स्वतः राजा रामचंद्र जाधवराव याबरोबर लढाईस तयार झाला. हा तंटा करण्याचें वरकांती कारण असें उपस्थित केलें होतें कीं, "राजा रामचंद्र जाधवराव यांनीं जितके घोडेस्वारांची संख्या निजामाचे नोकरीकरितां ठेवावयाची होती, तितकी ठेविली नाहीं." 'याबद्दल कारण दाखवावें.' असें सलाबतजंग याजकडून विचारण्यांत आलें. परंतु हें सलाबतजंग याचें विचारणें वरवरचें असून, मागील प्रसंगीं मच्छलीपट्टणहून बुसीच्या मदतीस आलेल्या फ्रेंच सरदाराच्या सैन्यास रामचंद्र जाधवराव यांनीं अडथळा केला नाहीं; त्याचा सूड घेण्याकरितां ही युक्ति योजिली होती, परंतु राजा रामचंद्र जाधवराव हे निजामाची नोकरी सोडून एकदम वऱ्हाडकडे चालते झाले. त्यांची बरीच* जहागीर निजामानें जप्त केली. याबद्दल ग्रँटडफ साहेब यांनीं आपल्या इतिहासांत थोडीशी माहिती दिली आहे,

यावेळीं रावरंभा, जानोजीराव, हणमंतराव व निंबाळकर हेही निजामाचे विरुद्ध झाले होते. निजामानें रामचंद्र जाधवराव यांचा पाठलाग वऱ्हाडपर्यंत केला, परंतु निजामाला चुकवून रामचंद्र जाधवराव यांनीं गंगा उतरून वरंगेल सरकार, एलगंदल सरकार व निर्मळ वगैरे कुल प्रांत लुटून धुळीस मिळविले व ते इंदूराकडे फिरून दुसऱ्यानें आले. हैद्राबाद सुभ्याचा खराबा करून पैसे मुबलक घेतले. तसेंच घास, दाणे घेत परदूर परगणा लक्ष्मणराव खंडागळे यांचे जहागिरींत घुसले.

* Sulabut-Jung, in the meantime, took the field, and his operations, at the suggestion of Shah Nuwaz Khan, were directed against Ramchandur Jadow, oslensibly to call him to account for not keeping up his established quota of horse, but in reality to punish him for not acting against the French reinforcements when marching from Mausulipatam to Join Bussy at Hyderabad, Jadow was deprived of most of his Jagheer;

G. D. History Page 577.

वऱ्हाडांत मन मानेल तितके पैसे घेतले. पंढरपूर तीन दिवस लुटलें व औरंगाबादेसमीप आले. निजामाची इच्छा "रामचंद्र जाधवराव यांनीं शरण येऊन तह करावा." अशी होती, परंतु तसें मुळींच झालें नाहीं. ही स्वारी देखील पुण्याच्या पेशव्याच्या सल्ल्यानें राजा रामचंद्र जाधवराव यांचेवर झाली. दुसरें एक कारण निजाम व त्यांचे मुसलमान सरदार यांस राग येण्यासारखें होतें; तें असें कीं, मराठे सरदार फार पराक्रमी असून निजामाचे दरबारीं रामचंद्र जाधवराव वगैरे मराठे सरदारांचें फार वजन होतें, तें वजन कमी करण्याकरितां दिवाण शहानवाजखान व मुसलमान सरदार यांनीं पुष्कळ युक्त्या योजिल्या. एके दिवशीं दरबारांत जाधवराव व निंबाळकर गेले असतां, त्यांस मुसलमान अमीरउमराव यांनीं ठरलेल्या मानमरातबाप्रमाणें खडी ताजीम दिली नाहीं. तेव्हां रामचंद्र जाधवराव व निंबाळकर यांनीं तलवारी उपसून दरबारांतील अमीरउमराव यांजवर एकदम हल्ला करून बरेच लोक जखमी केले. त्यामुळें सर्व दरबारांतील लोक निघून गेले, परंतु सलाबतजंग निजाम यांनीं या मराठे सरदारांचें सांत्वन करून त्यांस परत लाविलें. याप्रमाणें निजामाचे दरबारांतील मुसलमान सरदार व मराठे सरदार यांमध्यें चुरस लागली होती व त्याचा बंदोबस्त निजामाला करितां आला नाहीं. शिवाय निजामाचा दिवाण शहानवाजखान व पुण्याचे पेशवे हेही आगींत तेल ओतीत होते; निजामाच्या दरबारीं असलेला पेशव्याचा वकील यानें एक पत्र पुण्यास पाठविलें होतें, त्याचा कांहीं उतारा खालीं लिहिल्याप्रमाणें आहेः—

विनंती श्रीमंत प्रताप वरोग्राभिधान राजश्री पंत प्रधान स्वामींनीं एकांतीं खिलवतांत फर्माविलें कीं, जानोजी भोसले यांनीं पुण्यांत असतां करार केला कीं, किल्ला गोवळेचा नबाबाचा घ्यावा, वराडांत अंमल तहनासरजंगाचे वेळेस जैसा होता त्याप्रमाणें वर्तावें. गंगथडीस घासदाणा जाजती न घ्यावा, सुरळीत सदर्हू करारप्रमाणें वर्तावें. ते तों एकही गोष्ट अंमलांत न आली. बदमामली करून वराडांत पैका घेतला. गंगथडीस घासदाणा घेतला. मुलूख पायमाल केला. उपरी नबाब खुद्द बदौलत वंजरा संगम पावेतों गेले; परंतु फौज, सरदार, मराठे व फिरंगी कोणी नव्हते. तेथें पोहचून सदर्हू प्रमाणें अंमलांत यावें तें न जालें.

नबाब फिरले, जाधवरावाच्या मुलखाच्या बंदोबस्तास गुंतले. असो. हें साल गेलें. परंतु, पुढें आतांपासूनच माहाराव जानोजी निंबाळकर व हणमंतराव निंबाळकर यांसी सांगावें कीं, दोघेजण एकेविचारें वराडांत जाऊन भोंसल्यास तंबी करून सदरहू कामें सरकारचीं करणें. उभयतां निंबाळकरांस वसूल पन्नासा लाखांचा मुलूक आहे व भोंसल्यासही पन्नासा लाखांचा मुलूक आहे. हे म्हणतील कीं त्याजपासीं फौज फार, तरी सरकारच्या कामावरी एक वरीश आणखी पांच पांच हजार फौज ठेविली तरी काम होईल. पैका कोठें म्हणतील तरी एक एक वरीश उभयतां निंबाळकर चाकरीस आले नाहींत. कदाचित् आले तरी जानोजीचा पुत्र सात आठशें, हणमंतराव दोन हजार, मुलूक आहे त्याप्रमाणें फौज निरंतर पांच पांच हजार यांजपाशीं असावी. दुसरे पांच पांच हजार फौज एकसालीं जाजती ठेवावी. खाविंदांचें काम करून घ्यावें. तरीच जन्मपर्यंत मातबरीनें मुलूक देऊन ठेविली याचें फल. नाहीं तरी इतका मुलूक खावंदानें त्याजवर कैसा बहाल ठेवावा. कितींदा चाकरीस नच आले. पैसा वसूल जाला तो खजाना मागें पडला. त्यापैकींच खर्च करून जाजती पांच पांच हजार फौज ठेवावी. आणि खाविंदांचें एक काम वराडाचें करूं यावें; यांतच उत्तम. उभयतां निंबाळकरापाशीं दहाहजार फौज प्रतीवरशीं असावी. एक साल घरांतीलच ऐवज खावंदाच्याच मुलखांत मेळवीला. त्यापैकीं खर्च करून फौज ठेवावी आणि काम करावें. तरीच खावंदानें मातबरीनें बाळगिल्याचें फळ व निंबाळकराचे सेवकधर्मास उचित असे. सदर्हू मजकूर एकांतीं नबाब समसदुद्दौला बहाद्दर यासी एक एक अक्षर वाचून दाखवून सदर्हूप्रमाणें करवून वराडांत नबाबाचा अंमल सुरळीत होय, गोवळकोंडचा किल्ला घेऊन चाकर मातबर निंबाळकर यांचा आजमायेश होय, तें करणें म्हणोन लिहिलें. अशा आशयाचें उत्तर केलें जे श्रीमंताचा आमचा स्नेह तेव्हां जें कर्णें तें आम्हास श्रीमंताचेच विचारें केलें पाहिजे. जे वेळेस आम्ही भागानगरीहून निघालों आणि वराडांत जाण्याचा कस्त केला. त्या दिवसांत श्रीमंतांचीं पत्रें पावलीं जे गंगातीरपर्यंत जाऊन दबाव घालावा. गंगापार न व्हावें. दबावानेंच किल्ल्याचें काम करून घ्यावें. बाबूराव कोन्हेर येतील. तह जाल्यावर तहाप्रमाणें वर्तावें. गंगा पार होऊन गेले तरी आम्हांस तमाशा पाहतां नये. आम्ही समीप आहों. आम्हासही भोंसल्याची कुमक करावी लागेल. जेव्हां श्रीमंताचीं लिहिलीं ऐशीं पावलीं मग पुढें जावें. यास्तव श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें गंगातीर परीयंत जाऊन गिरमाजी खंडेराव याशीं मागें सरवून जाधवरावाच्या तंबीकरितां चाललों. ते वेळेस गिरमाजी खंडेरायापुरतें सामान पुष्कळ होतें. त्या वेळेस गिरमाजी खंडेराव यानें करार मदार परशराम पंताचे मारफतीनें केला जे, आम्ही इतक्यावर गंगा उतरणार नाहीं वराडांतच जातों. असें असतां आम्हासच इलजाम श्रीमतीं दिल्हा हें काय ? आम्ही तरी त्यांचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक केली. गिरमाजी खंडेरायानें करार मदार केले; परंतु आम्ही जाधवरायाचे तालुकीयांत धसलों तों त्यानीं गंगा उतरून बेइमानी करून वरंगेल सरकार व येलगंदर सरकार व निर्मळ वगैरे कुलप्रांत धुळीस मेळविला व इंदूराकडे फिरोन दुसऱ्यानें आले. परगणे खराब करीत बसवड वगैरे मुलूख हैद्राबाद सुभ्याचा खराब करून पैसे मुबलक घेतले. तसेंच वसकते वरून घास दाणे घेत परदूर परगणा लक्ष्मणराव खंडागळे याचें जहागिरींत धसले. औरंगाबादेसमीप आले होते. याप्रमाणें त्यांनीं बदमामली केली. वराडांत मनमानले पैसे घेतले. राजश्री बाबूराव कोन्हेर यांसी तह करावयासी पाठविणार होते त्यासी न पाठविलें. जे जे करार श्रीमंताशीं केले त्यांत एकही अमलामध्यें याजकडून न आला. हें परिच्छीन्न करून चुकलेंच आहे. छावणी आलजपुरची तरी होऊं सकत नाहीं. कांकीं, फौजा कुलवाटें लाविल्या. जुने फौजेनशीं जाणें सलाह नाहीं. चित्तांत आहे जे रमजान आंदरजाली यावर ईद करून हैदराबादेस यावें. तिकडे गेल्या वेगळे हुजूरचे फौजेस खर्चास मिळणें कठीण होईल. जरी पाण्यानें उघाड दिधली तरी हैदराबादेस जावें. नाहीं तरी औरंगाबादचीच छावणी जाली. छावणी औरंगाबादेस हो अथवा हैदराबादेस हो, परंतु दसरा झाल्यावर परिच्छीन्न रा. जानोजी भोसले यांसीं समजोण घेणें जरूर. त्याचें पारपत्य अवश्यक व चित्तानुरूप करावें व करतोंच. परंतु श्रीमंतीमध्यें आणखी कांहीं न म्हणावें. ज्याप्रमाणें सांप्रत लिहिलें आहे याच गोष्टीवर कायम असावें. फिरंग्यास मागें बोलावूं पाठविलेंच होतें व सांप्रतही पत्र पाठविलेंच आहे जे तुम्हीं लौकर येणें. पहिले पत्राचें

उत्तर फिरंग्याकडून आलें जे आम्हीं छावणींत तुम्हापाशींच येतो, इकडे छावणी करीत नाहीं. फिरंगीही येतच आहेत. फिरंगी न आले तरी चिंता नाहीं. आम्ही भोंसल्यांचे पारपत्य उत्तम प्रकारें करतों. उभयतां निंबाळकराचा मजकूर त्यासी आबदालीची खबर दाट होती. यास्तव रा० जानोजी निंबाळकरास रुखसत करतेवेळेस व रा. हणमंतरायाची भेट झाली तेव्हां सांगितलेंच आहे जे पुढें तुम्हांस मातबर फौजेनिशीं यावें लागेल. त्यांनींही कबूल केलेंच आहे, हें वर्तमान पूर्वींही लिहिलेंच आहे. आतांही उभयतां निंबाळकरांस फौजेविशीं पत्रें पाठविलींत. अशास तुम्हीं लिहिल्याप्रमाणें फौज त्यांनीं आणावी हें तरी कळतच आहे; परंतु त्यास लिहिलें आहे. अलबत पहिलेपेक्षां सवाई दिढी फौजा घेऊन येतील यांत संशय नाहीं. पहिलेपासूनही मातबर फौजेनशींच चाकरी करीत आलेत व पुढेंही ते चाकरी चांगलीच करून दाखवितील. कळलें पाहिजे. मोठा मनसबा अबदालीचा होता, तें अरीष्ट सांप्रत जगदीशें वारलेंच आहे. हे विनंती रवाना १३ छें रमजान.

कांहीं दिवस गेल्यानंतर निजामाचा दिवाण शहानवाजखान याचें मन सलाबतजंग निजाम याजविषयीं वाईट होऊन त्यानें पेशव्यांशीं आंतून संधान बांधिलें. या कामीं सलाबतजंगही अनुकूळ होता. पेशवे, सलाबतजंग व शहानवाजखान यांनीं बसलतजंग यास दौलताबादच्या किल्ल्यांत कैदकरून ठेवण्याचा विचार केला. त्यामुळें निजाम सलाबतजंग याला आपला दिवाण शहानवाजखान याचें खरें स्वरूप लक्षांत येऊन आपण मोठमोठ्या मराठे सरदारांस नाखुष केलें याचा पश्चाताप झाला. व राजारामचंद्र जाधवराव यांस पुनः आपल्यावर आलेलें संकट लिहून तें दूर करण्यासाठीं मदतीस बोलाविलें. निंबाळकरही सलाबतजंग यास जाऊन मिळाले. ह्याप्रमाणें पेशव्यांशीं मोकाबला देण्याची तयारी केली. यावेळीं पेशव्यांकडील दत्ताजी सिंदे व विश्वासराव असे दोघे सेनानायक होते. ही लढाई पेशवे व निजाम यांच्यामध्यें शिंदखेडें येथें झाली. पुण्याहून जनकोजी सिंदे निघून औरंगाबादेस आला व त्यानें नबाबाला तेथें गांठलें. या लढाईचें वर्णन सदाशिवरावभाऊ यांचे बखरीमध्यें खालीं लिहिल्याप्रमाणें दिलें आहे.

"नबाबाजवळ फौज अगदीं मराठे व्यंकटराव निंबाळकर व जानबा निंबाळकर व गोपाळसिंग राजा खंदारकर व इभ्रामखान गारदी. एक जाधवराव निराळा करून तीस हजार फौज होती. तीजवर भोंवताले गनीम उभे राहात परंतु मोंगल बाहेर येईना, त्यास मराठी यांच्या फितूरीचा संशय झाला होता. तों मराठी यांस ईरहीं पडली कीं, "आमचा अभाव नबाबास झाला आहे हें उत्तम नव्हें, युद्ध करावें," म्हणोन तमाम मराठे सिद्ध होऊन शहरानजीक बाहेर उभे राहिले. तों दत्ताजी सिंदे व जनकोजी सिंदे व नानासाहेब यांचा पुत्र विश्वासराव यांनीं फौज सिद्धकरून चालून गेले. नबाब निजामअल्ली तयार होऊन यांत न मिळतां दुरून तमाशा पाहात उभा राहिला. यांनीं तीन फौजा करून तिन्हींकरून तिघे उठले. जानबा निंबाळकर यांजवर दत्ताजी शिंदे, व व्यंकटराव निंबाळकर यांजवर जनकोजी सिंदे, व वरकड उमराव यांजवर विश्वासराव यांची फौज, असे उठले. व्यंकटराव यांची बहीण जनकोजी सिंदे यास दिली होती. सोयरे झाले तरी एकमेकांचे येथें जेवणास जावें, परंतु क्षात्रधर्मात अंतर करतां येत नाहीं, म्हणोन मराठी यांचे गाढ हत्यारींची मोटी मारामार झाली. तों व्यंकटराव यांचे मेहुणे आणि इकडे जनकोजी सिंदे यांचे साडू रा० नागोजी माने म्हसवडकर यांनीं अवघे फौजेतोन उठोन जनकोजी सिंदे यांची गांठ घातली; परंतु सिंदे याजपाशीं करोलाचें सामान भारी, करोलाकडून मार देवविला. त्यांत नागोजी माने यांस गोळी लागून ठार पडले. तों गैबीचा मारा झाला. इश्वरें चित्तांतील हिंमत पुरूं दिली नाहीं. अस्तु इहलोकीं किर्ती करून परलोक साधन केलें. नागोजी माने यांचा मुडदा काढून नेला, त्यांजवर सायंकाळ ही झाला, व्यंकटराव यास मेहुणे यांचें परम दुःख जाहलें. मुलें, माणसेंही समागमें होतीं, मायाजाळें सर्वत्रांस परम दुःख जाहलें. त्यांचें देह सार्थक केलें, नबाब बंदेगानअल्ली डेरीयास येऊन त्यांचें मूल दत्ताजी माने यांचे समाधान केलें. ते वेळीं नबाब यांचे चित्तातील विकल्प निघाला, तों रा० रामचंद्र जाधवराव पांच हजार फौजेनिशीं नबाबास मिळावयास ताबडतोब येत असतां, तें वर्तमान दत्ताजी शिंदे यांस कळतांच त्यांनीं त्यांजवर १० हजार फौज रवाना केली. फौजेची गांठ पडावी तों

रामचंद्र जाधवराव हे शिंदखेडाचा आश्रय करून शिंदखेडांत राहिले. फौजेचे व त्यांचे युद्धप्रसंग नित्य होतच होते. दिवसेंदिवस जाधवराव पाण्याचे तसदीनें जेरीस आला. हें वर्तमान निजाम उल्मुल्क यांनीं ऐकून भोंवताला तोफांचा अराबा देऊन गोल बांधून बाहेर निघाले. बहुत मोगल होऊन गेले परंतु यांजसारखा काबील कोणीच जाहला नाहीं. तों ग० नानासाहेब यांजकडून गोपाळराव रास्ते व पवार व आगखी फौज घेऊन शिंदे यांसी सामील झाले. मध्यें मोंगल व भोंवताले गनीम वेष्टून हां हूं करीत दोन कोस झुंजत भांडत मजली करून शिंदखेडास दाखल झाले. तों खासे नाना व भाऊही येऊन पोंचले, ते दिवशीं दत्ताजी शिंदे इरेस पडून आपण उडी टाकून करोळ व तोफा व जेजाला व सुतरनाला व हस्तनाला असें ठाणें धरून मार दिला, तों मोगलाचे फौजेचा गोल याजमुळें थोडी मनुष्यें पळूं लागलीं, तें समयीं नबाब बंदेगानअली यास विषाद येऊन टासणावर नीट हौदे चालविले. ते समयीं दुतर्फी यंत्रांचा कडाखा ऐसा झाला कीं, "न भूतो न भविष्यती" भडभुंजे लाह्या भाजतात तैशी गत झाली. धुराचे गर्दीत कोणी कोणास दिसेनासें झालें. दत्ताजी शिंदे जसा डुक्कर खळीस येतो तैसे इरेस पडून मारामार केली. तों नबाब केवळ हातघाईस आला. भाऊसाहेब यांचें नेत्र संतोष झालें. तारीफ केली कीं, "दत्ताजी सिंदे यांचे मर्दुमकीची शर्थ आहे! जसें ऐकण्यांत आलें तसें कर्तव्य करून दाखविलें." असें बोलून मोठें संकट दत्ताजी सिंदे यास उपळोन काढिलें. शेंदोनशें खासे ठार पडले. नबाबासही असें झालें कीं, "गनीमासी झुंजें बहुत केलीं, परंतु याप्रमाणें निधडा सरदार मराठी यांत नाहीं." म्हणोन त्यानेंही स्तुती करून आपले जागां मुक्काम करून राहिले. मानकरी लोकांचें समाधान करून नावाजिलें. पुढें सल्ल्याचें सूत्र आरंभिलें. तेव्हां आठ दिवसांत मोंगलाचा व गनीमाचा सल्ला सांखर-खेडलीचे मुक्कामीं झाला." या प्रकरणासंबंधानें * ग्रँड डफनेही बरीच माहिती दिली आहे.

याप्रमाणें राजा रामचंद्र जाधवराव यांनीं निजाम व सलाबतजंग यांकरितां पुन: मराठ्यांशीं तुंबळ युद्ध करून आपली शिकस्त केली; व फ्रेंच सरदार बुसी व आपण स्वतः निजामाचे हितकर्ते आहों असें आपल्या कृतीवरून स्पष्ट करून दाखविलें. त्याजवरून निजामाची खात्री झाली व राजा रामचंद्र जाधवराव व फ्रेंच सरदार बुसी यांजबद्दल विनाकारण सलाबतजंग याचें मन दूषित केलें होतें, तें यावेळीं स्वच्छ झालें. उलट शहानवाजखान दिवाण यानें बेइमानी करून सलाबतजंग ह्यासच कैद करण्याचा घाट घातला होता परंतु राजा रामचंद्र जाधवराव वगैरे सरदार व फ्रेंच सरदार यांच्या मदतीनें तो फसला.

पुढें शहानवाजखान याजवर बुसीचा दिवाण हैदरजंग यास निजामअल्लीकडून ठार मारिलें असा दोष आला, बुसीच्या हाताखालच्या सैन्यानें शहानवाजखान यास त्याच्या मुलांसुद्धां ठार मारून टाकिलें. शहानवाजखान यावेळीं फ्रेंच युरोपियन शिपायांच्या पाहाऱ्यांत होता, खरोखरी शहानवाजखान याचें अंग हैदरजंग याचा खून करण्यांत नव्हतें, असें सलाबतजंग यास समजल्यावरून त्यानें बुसीसह निजामअल्लीचा पाठलाग करण्याची तयारी केली, निजामअल्ली बऱ्हाणपुराकडे पळून गेला, बुसीनें सलाबतजंग यास निजामअल्लीशीं लढाई न करण्याबद्दल विनंती केली, सलाबतजंग

* Very shortly after this reconsiliation, intelligence was received that Ramchandur Jadow, proceeding to pay his respects and join the army of Sulabut Jung, was attacked, surrounded, and driven into the town of Sindkheir, where he was besiged by the Peshwa's troops. Orders of March were instantly issued; but the same influence which hitherto had prevented Sulabut Jung from falling into the power of his enemies, once more frustrated their designs. He would not move. Nizam Ally, however, proceeded to Sindkheir, went through the farce of rescuing Ramchandur Jadow, of beating the Mahrattas, and compelling them to make peace. Although the latter, with more show of reason, afterwards claimed the victory, the nominal defeat was a disgrace to which Balajee Rao would willingly have submitted, in consequence of his having received a cession of territory, Yielding an annual revenue of upwards of 25 lakhs of Rupees.

G. D. History Page 380.

हैदराबादेस जाऊन पोहोंचला, व बुसीला फ्रेंचाच्या अधिकाऱ्यांनीं निजामाच्या दरबारांतून परत बोलावून घेतलें. बुसी निजामाच्या दरबारांतून गेल्यावर निजामअल्लीनें पुष्कळ सैन्य जमवून सलाबतजंग यासी लढाई देण्याची तयारी केली. त्याला ( निजामअल्लीला ) इब्राईमखान गारदीही मिळाला, सबब सलाबतजंग यानें विचार करून हैदराबादीं निजामअल्ली यास बोलावून नेऊन आपली दिवाणगिरी दिली, याप्रमाणें हैद्राबादचे दरबारीं बराच घोटाळा माजलेला पाहून पेशवे यांनीं निजामावर स्वारी केली, यावेळीं इब्राइमखान गारदी सदाशिवराव भाऊस मिळाला होता, निजामच्या दरबारची वाताहात झाली असेत त्यावेळीं त्यास सहाय्यकर्ता कोणीच राहिला नव्हता. आपसांतलि पूर्वीच्या दुहीमुळें देशाचा वसूल बरोबर येत नव्हता. तशांत सूर्यराव, निर्मळचे देशमूख यांनीं बंड केलें. त्यांजवर रामचंद्रराव वगैरे मराठे सरदार पाठवून तें बंड त्यानीं मोडून टाकिलें. अशा एकंदर अडचणींमुळें पेशव्यांबरोबर टक्कर देण्यास असमर्थ होते. तथापि सलाबतजंग आणि निजामअल्ली, राजा रामचंद्र जाधवराव, जानोजीराव निंबाळकर रावरंभा व मोंगल सरदार असें मिळून १०१५ हजार सैन्यानिशीं उदगिरच्या बाजूला निघाले. यावेळीं पेशव्यांनीं अहमदनगरचा किल्ला घेतला. पेशवे स्वतः अहमदनगरकडे आले व सदाशिवरावभाऊ बहादूरगड घेऊन भीमेवर आले. तेव्हां त्यांनां सलाबतजंग निजामअल्ली उदगीरकडे आहेत, असें समजल्यावरून एक सैन्य त्यांनीं तिकडे रवाना केलें. तेव्हां त्या टोळीबरोबर उदगीर येथें सामना देण्याला निजामअल्लीनें सुरवात केली. परंतु ही चकमक मराठी घोडेस्वारांशीं चालली असतां सदाशिवरावभाऊ यास मध्यें वेळ मिळून त्यानें १०१२० हजार घोडेस्वार, व पांच हजार पायदळ, इब्राइमखान गारदी याच्या हाताखालील तोफखाना इतकें सैन्य जमा केलें. इब्राइमखानच्या तोफखान्यानें मोंगली सैन्यांत जिकडे तिकडे हाहाःकार केला; तेव्हां निजामअल्लीनें सदाशिवरावभाऊशीं तहाचें बोलणें सुरू केलें. परंतु सदाशिवरावभाऊ यानें उत्तर दिलें कीं तुम्हीं आम्हांस शरण यावें, तें कोणालाही कबूल झालें नाहीं. मोंगल व त्यांजकडील मराठे सरदार यांनीं इब्राइमखान गारदीच्या टोळीवर मोठ्या जोराचा हल्ला करून त्याचे पुष्कळ लोक मारले, व फळी फोडून बाहेर निघाले, परंतु एका मराठे घोडेस्वारांच्या टोळीनें त्यांजवर पुन्हां हल्ला करून त्यांचे ३ हजार लोक ठार केले, सबब निजामअल्लीनें पुन्हां तहाचें बोलणें करून ६२ लक्षांचा मुलूख देऊन तह केला. ही उदगीरची लढाई १७६० मध्यें झाली. यांत निजामाच्या गैरव्यवस्थेनें व असावधपणानें पेशव्यांस विनाकारण मोठा लाभ झाला,

सन १७६१ मध्यें पेशवे आणि अहंमदशहा अबदाली यांमध्यें पानपत येथें लढाई झाली, तींत पेशव्यांचा फार नाश झाला. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे हे पर्वती येथें मरण पावले. ही संधी उदगीरच्या लढाईचा सूड घेण्यास बरी आहे. असा सलाबतजंग व निजामअल्ली यांनीं विचार केला; व ते औरंगाबादजवळ मोठें सैन्य जमवूं लागले. रघुनाथराव बाजीराव पेशवे हा आपल्याला राज्य कारभार मिळावा अशा खटपटींत होता. पेशव्यावर स्वारी निजाम करणार असें रघुनाथराव यास समजल्यावरून त्यानें इंग्लिशांची मदत मागितली व निजामाचे पदरचे राजा रामचंद्र जाधवराव वगैरे सरदार आपलेकडे वळवून घेण्याचा यत्न केला * निजामअल्ली कायगांवटोक्यावर येऊन त्यानें कायगांवटोकें येथील हिंदूंचे देवालयाचा विध्वंस करून टाकिला, त्यामुळें * रामचंद्र

* Nizam Ally was not yet sufficiently apprized of those dissensions to reap advantage from them; but even if he had possessed the requisite information, one of his first acts, the destruction of the Hindoo temples at Toka, a village upon the Godavery, would have prevented his being joined by any party. It was nevertheless celebrated by the Mahomedan soldiery as a triumph, and Nizam Ally was pushing on towards Poona, when Ramchundur Jadow, and most of the Mahrattas in the Moghul service, disgusted by the insult offered to their religion, deserted to the Peishwa, and carried with them Meer Maghul, the youngest son of Nizam-ool-Moolk.

G. D. History page 629.

* Descendant of Dhunnaji Jadow. Jadow of Sindkheir has, I believe, maintained his allegiance to the Moghuls since the murder of his ancestor, Lookhjee Jadow Rao, by the son of Mullik Umber.

Footnote G. D. History page 629.

जाधवराव यांस फार वाईट वाटून ते निजाम-उल्मुल्कचा सर्वांत धाकटा मुलगा मिरमोंगल यास आपल्या फळींत घेऊन रघुनाथराव यांच्या मदतीला आले. निजामअल्ली पुण्यापासून १८ मैलांच्या अंतरावर आला व त्यानें पुणें जाळण्याचा बेत केला. परंतु रामचंद्र जाधवराव व मीरमोंगल हे पेशव्यांस मिळाल्यामुळें त्यांनीं निजामास जोरानें थोपवून धरिलें. त्यामुळें निजामअल्लीनें आपले मराठे सरदार आपल्यांतून निघून गेल्याचें समजून पेशव्याशीं तह करण्याचें कबूल केलें व पेशव्यांनीं २७ लाख रुपयांचा मुलूख निजामास देऊन त्यास परत लाविलें.

हा तह झाल्यानंतर रघुनाथराव व माधवराव यांच्यामध्यें तंटा सुरू झाला. माधवरावांनीं त्रिंबकराव मामास आपले दिवाण केलें. व त्यांचे मदतीस गोपाळराव गोविंद पटवर्धन मिरजेचे जहागिरदार यांस नेमिलें व बाळाजी जनार्दन भानू उर्फ नानाफडणवीस व हरीपंत फडके या उभयतांस आपले हुजूर कारकून नेमिलें. त्यामुळें सखारामबापू, रघुनाथराव व त्यांची बायको आनंदीबाई यांस फार वाईट वाटलें. रघुनाथराव नाशकाहून औरंगाबादेस गेले व तेथील सुभेदार मुरादखान यास भेटून त्याची मदत त्यांनीं घेतली. शिवाय ते मराठे लोकांत लोकप्रिय असल्यानें पुष्कळ मराठे लोक त्यांस येऊन मिळाले. माधवराव पेशवे, रामचंद्र जाधवरावांसह त्यांस सामना देण्याकरितां निघाले. उभयतांजवळ सैन्य फार थोडें होतें. शिवाय निजामअल्ली व जानोजी भोंसले हे आपल्या फौजा घेऊन रघुनाथरावाच्या मदतीला आले. तेव्हां जाधवराव यांनीं त्यांस सामना न देतां एकदम रघुनाथरावाचे स्वाधीन झाले, त्यामुळें सर्वत्र स्थिर स्थावर झालें. निजामअल्ली परत निघून गेले. या सर्व कामगिरीबद्दल राजा रामचंद्र जाधवराव यांस सेनापति पद दिलें, नारोशंकर यांस प्रतिनिधि नेमिलें, विठ्ठल शिवदेव यांस राजाज्ञा; कानोजी मोहिते यांस सरलष्कर, चिंतो विठ्ठल यांस फडणीस नेमिलें. याप्रमाणें रघुनाथराव पेशवे यांनीं पूर्वीच्या लोकांचे पदाधिकार काढून दुसऱ्या नवीन लोकांस दिल्यामुळें पेशवाईंतील सर्व मुत्सद्दी लोक रघुनाथरावांवर नाखुष झाले. या हकिकतीबद्दलचीं दोन पत्रें—पेशव्यांच्या दप्तरांतील—काव्येतिहास संग्रह नांवाच्या मासिक पुस्तकांत पत्रें यादी वगैरे या मथळ्याखालीं छापिलीं आहेत.

"कर्नाटकांत पंत प्रधान यांची स्वारी गेली. दादासाहेब रुसून पुण्यास आले. निळकंठराव महादेव व सखाराम भगवंत कारभार सोडून घरीं बसले. त्रिंबकराव विश्वनाथ मामा कारभारी झाले.

वृषनाम १५ १६८३ ११७१ ११६२ ८८
सन इसने सितैन मय्या व अल्फ.

दादासाहेब, माधवरावसाहेब यांजवर रुसून एका घोड्यानिशीं गेले. त्यांनीं २० हजार फौज दोन महिन्यांत जमा करून माधवरावसाहेब यांजवर चढाई करून आले, त्यांचें व यांचे युद्ध कार्तिक वद्य ११ स न्हावरें तालुके कडे भीमेपलीकडे झालें. रावसाहेबांचा मोड झाला. त्रिंबकराव मामा व बाबूराव राम फडणीस व गोपाळराव पकडून गेले. चुलत्या-पुतण्यांच्या भेटी कार्तीक वद्य १२ स झाल्या. उभयतां एक झाले. कारभार सखाराम भगवंत व निळकंठराव महादेव करूं लागले. प्रधान-पंताच्या व मोगलांच्या भेटी मुक्काम पारगांव भीमातीरीं झाल्या. भाऊसाहेब यांणीं पांसष्ट लक्षांची जहागीर घेतली होती, ती माघारी दिली. मोंगल भागानगराकडे गेला. पंत प्रधान मिरजेस जाऊन मोरचे लावून पंतांचा व मोंगलांचा सल्ला झाला. तदनंतर फौजेसुद्धां मार्गशीर्ष वद्य १३ स सातान्यास जाऊन महाराज रामराजे यांस बाहेर काढून अधिकार दिले.

रामचंद्र जाधवराव यांस सेनापति !
नारोशंकर यांस प्रतिनिधि !
विठ्ठल शिवदेव यांस राजाज्ञा !
कान्होजी मोहिते यांस सर लष्कर.

चार पदें जुन्यांचीं काढून दिलीं. वरकड ज्यांचीं त्यांस दिलीं."

येणेंप्रमाणें या पत्रांत हकीकत दिली आहे. शिवाय * ग्रांट डफ साहेब यांनींही आपले इतिहासांत ही हकीकत दिली आहे.

---

* Ramchandur Jadow, who had in the preceding year deserted the Moghul Standard, was restored to the rank of Senaputtee, formerly held by his great-grandfather, the famous Dhunnajee; but, as he was disappointed in a promise made to him of receiving, as Senaputtee, the Sovereignty of Guzerat, he

पेशवाईतील नाखुष झालेले मुत्सद्दी व राजा रामचंद्र जाधवराव आणि मीर मोंगल असे सर्व मोठमोठे लोक पुनः निजामअल्लीस जाऊन मिळाले. रामचंद्र जाधवराव यांस पेशव्यानें गुजराथचें राज्य देण्याचें कबूल केलें असतां, आपलें काम करून घेऊन यावेळीं गुजराथ देण्याचें साफ नाकबूल केलें. त्यामुळें मीर मोंगलला घेऊन ते पूर्वीचे जहागिरींवर जाऊन निजामअल्लीस मिळाले. निजामअल्ली यानें आपला वडील भाऊ सलावतजंग यास ठार मारून तो निजामाच्या गादीचा मालक झाला व विठ्ठलसुंदर यजुर्वेदी ब्राह्मण यास आपला दिवाण नेमून त्याला राजाप्रतापवंत असा किताब दिला होता. त्यानें निजामअल्लीस सल्ला दिला कीं, यावेळीं कोंकणीं ब्राह्मणांचें राज्य बुडविण्याची फार चांगली संधि आहे. सर्व पेशव्यांचे मुत्सद्दी लोक आपल्यास येऊन मिळाले आहेत. साताऱ्चा राजा राज्य करण्यास अयोग्य असल्यामुळें व ताराबाई नुक्तीच मेल्यामुळें, जानोजी यास साताऱ्च्या राजाचे मुख्य प्रतिनिधि नेमून पेशव्यांच्या हातांतला अधिकार हिसकावून घ्यावा. जानोजी भोंसले या गोष्टीस कबूल झाला. परंतु निजामअल्लीनें कोल्हापूरचे राजाशीं रामचंद्र जाधवरावाचे मार्फत आंतून संधान लाविलें होतें. याप्रमाणें सर्व बाजूंनीं तयारी झाल्यावर निजामअल्ली सैन्यासुद्धां पारगांवचा तह मोडला म्हणून पेशव्यावर स्वारी करण्यास निघाला. इकडून रघुनाथराव आणि माधवराव हे उभयतां मल्हारराव होळकर व दमाजी गायकवाड यांसह सामना देण्याकरितां निघाले. हें सैन्य निजामाशीं सामना देण्यास फार थोडें होतें. सबब सामना न देतां औरंगाबादेकडे जाऊन औरंगाबादचा किल्ला शिड्या लावून घेण्याचा यत्न केला. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं तेथून त्यांना हांकून दिलें. निजामअल्लीचें सैन्य नजीक आल्याचें पाहून ते वऱ्हाडांत घुसले व त्यांनीं जानोजी भोंसल्याचा मुलूख लुटला. मोंगलांच्या मुलखांतही त्यांनीं फार उपद्रव दिला. निजामअल्लीनें त्यांचा पाठलाग केला, परंतु निजामाचें सामान अवजड असल्यामुळें पाठलाग करण्याचा प्रयत्न निष्फळ झाला. सबब तो नाद सोडून देऊन तो थेट पुण्याकडे वळला, व पुणें शहरच्या बाहेर त्यानें मुक्काम केला. पुण्यास निजाम लुटावयास येणार, असें ऐकल्यावरून पुण्याचे सर्व लोक आपलें सामान घेऊन निघून गेले. निजामानें फौजेस शहर लुटण्यास परवानगी दिली. पुण्याचा बराच नाश करून पुरंदराहून पूर्वेस भीमेकडे तो आला. रघुनाथराव हा थेट हैदराबादीं गेला, व त्यानें शहरांत शिरण्याचा प्रयत्न केला. शहरास तटबंदी असल्यानें त्याचा प्रयत्न व्यर्थ गेला. त्यानें १॥ लाख रुपये खंडणी शहराबाहेर वसूल करून, जानोजी भोंसले यास निजामापासून फोडण्याचा गुप्त रीतीनें प्रयत्न केला. यावेळीं निजामाची स्वारी औरंगाबादेकडे निघाली होती. जानोजी भोंसले यास राजे 'प्रतापवंत' याचा गैरविश्वास वाटून व ३२ लाखांचा मुलूख पेशव्यानें देऊं केल्यावरून तो त्याजकडे वळला. मोंगली फौज औरंगाबादेकडे जात असतांना रघुनाथराव तिच्या पिछाडीवर चालून गेले. निजामअल्ली गोदावरीवर आले. तेव्हां आपली थोडी फौज दिवाण प्रतापवंत याजवळ राक्षस भुवन नजीक ठेवून बाकी फौज घेऊन आपण गोदावरीचे दक्षिणतीरीं उतरून गेले. दिवाण व जानोजी भोंसले यांस, मागील सामानसुमान नदी पार होईपर्यंत राहण्यास हुकूम झाला होता. जानोजी भोंसले हा आपल्या सैन्याला खर्चाला मिळालें नाहीं म्हणून दिवाणाला सोडून देऊन निराळा मुक्काम करून राहिला. ही बातमी रघुनाथराव यांला कळल्याबरोबर त्यांनीं जलदीनें धांवून येऊन दिवाणावर हल्ला केला. पुष्कळ मोंगली फौज व दिवाण यांस ठार मारिलें. यावेळीं राजा रामचंद्र जाधवराव व निजामअल्ली यांनीं माघारीं फिरून दोन दिवस सारखें पेशव्यांशीं तुंबळ युद्ध केलें. परंतु पूर्वीच मोंगल सैन्याचा फार नाश झाल्याकारणानें याही वेळीं निजामानें हार खाल्ली. निजाम यानें नदीच्या पलीकडून पेशव्यांवर तोफखाना सुरू केला होता, परंतु

---

took the first opportunity of making his peace with Nizam Ally. Kanhojee Mohitey was appointed Sur Lushkur, and Wittul Sewdeo (Vinchorkur) was also raised to high rank. The Situation of Peishwa's Furnuwees, which, since the time of Ballajee Wishwanath, had been continued in the family of Bhanoo, was taken from Moroba Baboo Rao, and conferred on Chintoo Wittul.

G. D. History page 633.

त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. सबब निरुपायानें निजामअली सर्व सैन्यासुद्धां औरंगाबादेस निघून गेला. यावेळीं गोदावरी नदी भरून चालली होती; त्यामुळें मराठ्यांचें सैन्य पायउतार होऊन औरंगाबादेजवळ आलें. तेथें रामचंद्र जाधवराव यांनीं पुनः सामना दिला. परंतु मोंगल सैन्य व मराठे सैन्य दोन्हींहीं दमून गेलीं होतीं. त्यामुळें पेशवे व निजाम यांचा तह होऊन निजामास ५१ लाखांचा मुलूख देण्याचें ठरलें. त्यांतील ३२ लाखांचा मुलूख जानोजी यांस देण्याचें ठरलें. माधवराव पेशवे यांनीं जानोजी भोंसले यांची फार निर्भत्सना केली व निजामानेंही तोंडघशीं पडल्याबद्दल त्यांस दोष दिला. याप्रमाणें या लढाईचा शेवट सन १७६३ सालीं झाला.

सन १७६६ मध्यें जानोजी भोंसले याजवर पेशवे व निजाम यांनीं स्वारी करून त्याचा पराभव केला. याचें कारण पेशव्याला व निजामाला त्यानें राक्षस भुवनच्या लढाईत फसविलें होतें. तींत निजामअली तर्फे राजा रामचंद्र जाधवराव हे लढाईत हजर होते. ३२ लाखांचा जो मुलूख राक्षस भुवनच्या लढाईत जानोजीला मिळाला होता, त्यांतील $\frac{3}{4}$ मुलूख परत देण्याचें त्यानें कबूल केलें. त्यापैकीं १६ लक्षांचा मुलूख निजामाला मिळाला.

मराठे व निजाम यांच्या दक्षिणेंत अशा लढाया चालल्या असतांना, म्हैसूरच्या राजघराण्यास नाहींसें करून त्यांच्याच पदरचा हैदरअली नांवाचा मनुष्य मोठ्या पदवीस चढला व त्यानें आपल्या पराक्रमानें म्हैसूरचे राज्य बळकावून आपण तेथील अधिकारी झाला. निजामअलीचा भाऊ बसलतजंग हा मराठे व निजामअली यांच्या लढाया चालल्या आहेत ही संधी साधून हैदरची मदत घेऊन कर्नाटकामध्यें आपलें स्वतंत्र राज्य स्थापण्याचा विचार करूं लागला. त्यानें बासकोटा, सेरा आणि बुरा बाळापूर हीं ठिकाणें जिंकून घेतलीं. परंतु निजामअली आपल्यावर हल्ला करील या भीतीनें आदुनी येथें आला. परंतु हैदरनें तसेंच आपलें लढाईचें काम सुरू ठेऊन त्यानें छोटापूर, रायदुर्ग, हारपोंदली आणि चितळदुर्ग वगैरे ठिकाणच्या पाळेगारांपासून खंडणी घेतली. व सावनूरचे नबाबाचा पराभव केला, याप्रमाणें त्यानें व त्याच्या कामगारानें धारवाडपर्यंत मुलूख घेऊन कृष्णेच्या उत्तर तीरापर्यंत आपली सत्ता स्थापन केली. मराठे व निजाम या दोघांलाही त्याची काळजी पडली. तेव्हां त्या दोघांनीं हैदरावर स्वारी करण्याचें ठरविलें. निजामअलीनें इंग्रजांबरोबर तह केला. तेव्हां मराठे, निजाम व इंग्रज या तिघांनीं सन १७६७ मध्यें हैदरवर स्वारी केली. माधवराव पेशवे यांनीं इंग्रज व निजाम यांची वाट न पाहतां एकदम कृष्णा उतरून ते कर्नाटकांत शिरले, व त्यांनीं शेरा बासकोटा, मुदेगिरी हे प्रांत घेतले. आणि बेदनूरची राणी व तिचा मुलगा यांस कैदेंतून सोडून दिलें व हैदरअलीवर जाऊन त्याजकडून ३० लाख रुपये खंडणी घेतली व शिवाय १७ लाख रुपये कर्नाटकांत जमा केले. व त्यांची निजाम येण्यापूर्वीं महाराष्ट्राकडे परत फिरण्याची तयारी झाली. निजाम व इंग्रज यांनीं खंडणीमध्यें हिस्सा मिळावा म्हणून मागणी केली. परंतु ती देण्याचें त्यानीं नाकबूल केलें. नंतर माधवराव हे निजाम व इंग्रज यांजवर हैदरशीं आपल्या पुढील स्वाऱ्या करण्याचें सोंपवून कृष्णापार गेले. यावेळीं राजा रामचंद्र जाधवराव निजामअली बरोबर हैदरशीं युद्ध करण्यास होते. निजामअली व इंग्रज यांजमध्यें पुन्हां १७६८ त तह झाला. त्यांत हैदर हा म्हैसूरचे राज्य बळकविणारा आहे असें ठरवून त्याचे मुलुखाविषयीं निजाम व इंग्रज यांनीं वाटेल ती तजविज करावी असें ठरविलें. निजामअली यानें हैदरवर हल्ला करून कर्नाटक व बालेघांट हे प्रांत त्याजवळून घेतले व इंग्रजांस त्या प्रांताचे दिवाण नेमिले व गुंतूर प्रांत इंग्रजांला देण्याचें ठरलें.

या तहांत मराठे सामील झाले नाहींत. नंतर निजामअली हैदराबादीं आले. यावेळीं राजा रामचंद्र जाधवराव वयानें बरेच वृद्ध झाले असून त्यांची जहागिरीची व्यवस्था व लढाईचीं वगैरे कामें त्यांचा मुलगा खासेराव पहात असे. यापुढें सर्व कामकाज आपले मुलावर सोंपवून देऊन ते स्वस्थ राहिले.

सन १७६९ मध्यें जानोजी भोंसले यांजवर माधवराव पेशवे यांनीं निजामअलीची मदत घेऊन स्वारी केली. निजामअलीचे तर्फेनें रुखनतदौला हा पेशव्यांबरोबर होता. यावेळीं राजा रामचंद्र जाधवराव यांस निजामअलीनें स्वारीवर जाण्यास सांगितलें असतां, त्यांनीं वयाच्या मानानें जाण्याचें नाकबूल केलें. पुढें

पेशवे व निजामअल्लीचें सैन्य वऱ्हाडांत शिरलें. त्यामुळें निजाम व पेशवे ह्यांना त्याचा पाठलाग होईना. कारण त्याचें सामान फार भारी होतें. जानोजी भोंसला पुण्याचे बाजूला येऊन लुटालूट करूं लागला. त्याच्यावर गोपाळ जनार्दन व रामचंद्र गणेश यांजबरोबर ३० हजार सैन्य देऊन पाठविलें. परंतु ते आंतून त्यास सामील झाले, असा पेशव्यांना संशय आला. जानोजी पुण्याभोंवतालचा प्रांत लुटीत गोदावरीवर आला. पेशव्यांनीं चांदोर वगैरे प्रांत घेतले. दोन्ही बाजू लढाईस कंटाळून हात घाईस आल्या सबब तह झाला. या कामीं निजामअल्ली यास रामचंद्र जाधवराव यांनीं जानोजी भोंसल्याला सहाय्य केलें असावें असा मनांत संशय आला. त्या त्याचे संशयांत रुखनतदौला वगैरे मुसलमान लोकांनीं रामचंद्र जाधवराव यांचें वजन निजामचे दरबारीं वाढलें असल्याकारणानें तें कमी व्हावें म्हणून भर घातली. दरबारचे लोकांनीं रामचंद्र जाधवराव यांस ठार मारण्याचा बेत केला, तो असाः—

एके दिवशीं रामचंद्र जाधवराव यांस दरबारांत कांहीं कामानिमित्त बोलावून आणिलें. निजामअल्ली हे एका खोलींत बसले होते, तेथें रामचंद्र जाधवराव गेले. दोघांचें कांहीं बोलणें सुरू झालें. खोलीचे वरचे बाजूला सभोंवती सवाणीं ठेविलीं असून वर गच्ची होती, त्या गच्चीवर चुन्याच्या कळ्याचीं पुष्कळ पोतीं व पाणी आणून ठेविलें होतें. निजामअल्ली ठरल्याप्रमाणें कांहीं निमित्त करून खोली बाहेर गेले व त्यांनीं दार लावून घेतलें. त्याबरोबर ज्या सवाण्याखालीं जाधवराव बसले होते, त्यांतून चुन्याच्या कढत पाण्याचा वर्षाव होऊं लागला, त्यामुळें भाजून त्यांतच त्यांचा शोचनीय अंत झाला.

याप्रमाणें या थोर पुरुषाचा निजामअल्लीनें विनाकारण खून करून जाधवराव घराण्याशीं कृतघ्नपणा केला. रामचंद्र जाधवराव यांचे वडील चंद्रसेन जाधवराव यांनीं निजामअल्लीचे पूर्वज चिंकिलीजखान ऊर्फ निजामउल्मुल्क यांस दक्षिणेंत स्वतंत्र राज्य स्थापन करण्यास मदत केली, त्यांचे उपकार याप्रमाणें निजामअल्लीनें फेडले. असो. ह्या शोचनीय मृत्यूचें वर्तमान त्यांचे मुलगे खासेराव व भाऊसाहेब ( यांची मूळची नांवें आढळत नाहींत ) यांस भालकी येथें समजलें. त्यावेळीं त्यांनीं आपलें सैन्य तयार करून निजामअल्लीवर हल्ला करण्याची तयारी केली. निजामअल्लीनें रुखनतदौला याजबरोबर सैन्य देऊन त्यास भालकी येथें रवाना केलें. त्यांची व निजामअल्लीची लढाई होऊन तींत भाऊसाहेब ठार मारले गेले. खासेराव यानें लढाईची शिकस्त करून रुखनतदौला व निजामअल्ली यांचा पराभव केला. निजामाचा मुलूख लुटण्यास प्रारंभ केला. पुढें निजाम अल्ली यानें स्वतः येऊन त्याची समजूत करून त्याच्या वडिलांच्या वेळचा सर्व मुलूख जो होता तो त्याला देऊन त्याजकडे नोकरी सांगितली व त्याचें सांत्वन केलें.

**गुणः**—राजा रामचंद्र जाधवराव यांचा स्वभाव परोपकारी असून सरळ असा होता. ते स्वतः शूर, धाडसी व मुत्सद्दी होते. निजामाचे दरबारीं मोठमोठे मुसलमान सरदार या मराठे सरदाराचा द्वेष करीत असत. परंतु आपली मुत्सद्देगिरी व शूरत्व यांचे जोरावर त्यांस न जुमानतां त्या सर्वांवर त्यांनीं आपली छाप ठेवून दिली होती. निजामअल्लीचा धाकटा भाऊ मिर मोंगल हा तर राजा रामचंद्र जाधवराव यांच्या अर्ध्या वचनांत होता. कायगांवटोकें येथील देवालय निजामअल्लीनें जाळल्यामुळें, मिर मोंगल यास घेऊन राजा रामचंद्र जाधवराव हे पेशव्यांस येऊन मिळाले. त्यावेळेस पेशवे पानपतचे लढाईनें खालावले होते व निजामअल्लीचा बेत मराठ्यांचें राज्य समूळ नाहींसें करण्याचा होता. तेव्हां अशा पडत्याकाळीं आपल्या देशबंधूंस मदत करण्याचे हेतूनें व आपले धर्माचा छळ होतो असें पाहून, त्यांनीं एकदम पेशव्यांची बाजू उचलून धरून निजामअल्लीशीं सामना दिला. निजामअल्ली पुण्यानजीक उतरून पुणें जाळण्याचे बेतांत होता; परंतु राजा रामचंद्र जाधवराव यांनीं निजामअल्लीचा पराभव करून मराठ्यांची राजधानी पुणें याचा बचाव केला. माधवराव पेशवे यांनीं त्यांस सेनापतीचीं वस्त्रें दिलीं व गुजराथचें राज्य देण्याचें कबूल केलें. गुजराथ न दिल्यामुळें मिरमोंगल यास घेऊन–निजामअल्लीनें त्यावेळीं दरबारांत दुफळ्या असल्याकारणानें पुनः मोठ्या गौरवानें बोलावल्यामुळें–ते परत गेले. त्यांनीं निजाम व मराठे यांस सारखीच मदत केली. रामचंद्र जाधवराव हे आपल्या

नांवापाठीमागें " राजा " असें पद जोडीत असत. त्याबद्दल निजामानें हरकत घेतली. परंतु त्यांनीं आपले पूर्वज एकेवेळीं दक्षिणेंत स्वतंत्र राज्यकर्ते होते. व आपण दौलताबादचा राजा रामदेवराव यांचे वंशज आहों असें दाखवून दिल्यावरून, तेथपासून जाधवरावांच्या सर्व घराण्यास 'राजा' असें पद जोडण्याची वहिवाट सुरू झाली. निजामअल्लीनें हें पद कायम केलें. रत्नसिंग जाधवराव यांस पुण्याच्या एजंट मार्फत ता० २० माहे मे सन १८५२ मध्यें; थैली पत्रानें विचारण्यांत आलें होतें, त्यावेळीं याचप्रमाणें जबाब जाऊन इंग्रज सरकारानेंही हा किताब जाधवरावांचें घराण्यांत कायम करून चालू ठेविला आहे. पेशव्यांनींही हा किताब कायम केलेला आहे.

निजाम व पेशवे यांच्या दरबारीं राजा रामचंद्र जाधवराव यांचें वजन किती होतें, याबद्दलचें एक पत्र जयाजी सिंदे व मल्हारजी होळकर यांचे नांवें पाठविलेलें आहे. हें पत्र निजामाकडून राजा रामचंद्र जाधवराव, पेशव्यांच्या भेटीस आल्या वेळीं, त्यांचा सरातब ठेवण्याबद्दल जयाजी सिंदे व मल्हारजी होळकर यांस पत्रांत लिहिलेले सरदार यांसह राजा रामचंद्र जाधवराव येणार, त्यांचे आमराहा मुलाजमत रहावें व त्यांचा बंदोबस्त ठेवावा अशा आशयाचें आहे. निजामांनीं राजा रामचंद्र जाधवराव यांच्या हाताखालीं मोठमोठे सरदार देऊन पेशव्यांकडे पाठविलें होतें. याबद्दल या पत्रांत पूर्ण उल्लेख आहे व यांतच रामचंद्र जाधवराव यांस ' राजा ' असा किताब त्यांच्या नांवाच्या पाठीमागें जोडला आहे. तें पत्र येणेंप्रमाणें:—

**श्री**

पुा राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी सिंदे गोसावी यांसी उपरी राजश्री रामचंद्र जाधवराव या समागमें सरदार मनसबदार आहेत त्यांस नवाबाचे इजायेत नामें यावे म्हणोन मशारनिल्हेनीं लिहिलें आहेत. सरदारः—

१ मालोजी राजे घोरपडे मुधोळकर.
१ भालेराव पांडरे व गुरुबक्ष पांडरे.
१ मनप्या नाईक व किलीच नाईक. जमीदार देवदूर्ग.
१ रायाजी भोंसले.
१ आनंदराव जमीदार परगणे कमरनगर ऊर्फ कनोल.
१ गिरजोजी हांके.
१ शंकरमा जमीदार परगणे आंदोल.
१ भूपाळराव निंबाळकर.
१ कृष्णाजी नाईक निंबाळकर.
१ मकरंदसिंग नाईक निंबाळकर.
१ पामनाईक बहिरी जमीदार परगणें वागनगिरा वगैरे.
१ लक्षमकाजे व जेम करंडी जमीदार परगणे कानकुती.
१ रामराव जमीदार गदवाल.
१ अगाजी सलगर.
१ राजे अजेचंद खंदारकर.
१ महिपतराव निंबाळकर.
१ यशवंतराव निंबाळकर.

येणेंप्रमाणें सरदार इजायत नामें पाठविणें कीं, राजे रामचंद्र जाधवराव यांस इजायेतनामा पाठविला आहे. तरी तुम्हीं त्यांजपाशीं येऊन त्यांचे हमराहा मुलाजमत करणें म्हणोन इजायेत नामें नवाबाचे पाठविणें.

छ २७ जिल्काद बहुत काय लिहिणें, लेखन सीमा.

याप्रमाणें या थोर पुरुषाचें वजन पेशवे मानीत असत व पेशव्यांना वेळोवेळीं आपले देशबांधव म्हणून यांनीं मदत करून निज़ामापासून त्यांचा बचाव केलेला आहे, हें त्यांच्या चरित्रावरून विदित होईलच. निजामअल्लीनें या थोर पुरुषांचा असा शेवट केल्यानंतर त्यांचे वडील पुत्र राजा खासेराव जाधवराव यांनीं निजामाला आपलें सैन्यानिशीं पुष्कळ वेळां मदत केली.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें हैदरअल्ली यानें म्हैसूरचें राज्य बळकावून आपण मालक झाला आणि निजाम, मराठे व इंग्रज यांच्या सैन्याला उपद्रव देऊं लागला. पुढें लवकरच हैदरअल्ली मेल्यानंतर टिपू राज्याचा मालक झाला. नंतर तोही आपले बापाप्रमाणें वर्तन करूं लागला; असें पाहून मराठे, इंग्रज व निजामअल्ली एक होऊन, त्यांनीं टिपूवर सन १७९० मध्यें स्वारी केली. ती एक वर्ष चालू होती. सन १७९१ त टिपूनें या तिघांशीं तह केल्यानंतर या स्वारीचा शेवट झाला. मराठ्यांच्या तर्फे हरीपंत फडके व परशराम-

भाऊ हे दोन सरदार आणि इंग्रजांतर्फे कार्नवालीस आणखी त्याचे बरोबर दुसरे इंग्रज सरदार व निजाम-अलीतर्फे त्याचा मुलगा शिकंदर जहांगिर आवदूल कासीम वगैरे मुसलमान सरदार असून, रावरंभा व खासेराव जाधवराव हे मराठे सरदार, असे मोंगल, मराठे व इंग्रज सरदार या स्वारींत होते. टिपूबरोबर हीं तिन्हीं सैन्यें लढत असतांना त्या लढाईमध्यें खासेराव जाधवराव हे ठार झाले. याप्रमाणें मोंगलाईंतील जाधवराव घराण्याच्या मधल्या शाखेचा शेवट झाला.

भाऊसाहेब व खासेराव यांस संतति मुळींच झाली नाहीं. मालेगांव येथील तिसऱ्या शाखेच्या घराण्यांतील श्रीमंत शंभुसिंगजी यांचे आजे यांस, भाऊसाहेब यांचे कुटुंब लक्ष्मीबाई यांनीं दत्तक मागितलें. परंतु ते देण्यांत आले नाहींत. सबब निजाम सरकारानें मालकीचें सर्व उत्पन्न जप्त करून आपला जांवई समशेर उमराव यास दिलें. आतां पुढील प्रकरणांत धनसिंग जाधवराव यांचा तिसरा मुलगा शंभुसिंग यांच्या म्हणजे जाधवराव घराण्याच्या मालेगांव येथील तिसऱ्या शाखेचें वर्णन देऊं.

---

## मालेगांव येथील जाधवरावांच्या तिसऱ्या घराण्याची हकीकत.

## शंभुसिंग जाधवराव.

( इ० स० १७१५ पासून इ० स० १७६० पर्यंत. )

धनसिंग जाधवराव यांस मुलें तीन म्हणून पूर्वी सांगितलेंच आहे. शंभुसिंग हे धनसिंग जाधवराव यांचे सर्वांत लहान चिरंजीव होत. चंद्रसेन जाधवराव यांस शाहूमहाराजांनीं सन १७१० मध्यें धनसिंग जाधवराव वारल्यावर सेनापतीचीं वस्त्रें दिलीं व त्यांच्याच हाताखालीं शंभुसिंग यांस मुतालीक नेमिलें. चंद्रसेन जाधवराव यांस सेनापतीपद देऊन महाराजांनीं धनसिंग जाधवरावाला 'जयसिंगराव' हा किताब पूर्वी दिला होता, तो शंभुसिंग जाधवराव यांस शाहूमहाराजांनीं देऊन सेनापतीप्रमाणें जरीपटका व साहेबनौबत वगैरेचा मान दिला. पुढें चंद्रसेन जाधवराव यांस मोंगलांवर स्वारी करण्याकरितां पाठविलें, त्याजबरोबर शंभुसिंग जाधवराव यांसही पाठविलें होतें. बाळाजी विश्वनाथ भट व हे उभयतां जाधवराव बंधु यांचा तंटा होऊन महाराजांचें व त्यांचें कसें वांकडें पडलें व ते मोंगलांस कसे जाऊन मिळाले, वगैरे सर्व मजकूर चंद्रसेन जाधवराव यांच्या कारकीर्दीत लिहिला गेलाच आहे. या उभयतां बंधूंनीं शाहूमहाराज यांशीं लढाया देऊन त्यांस कसें जर्जर केलें, याबद्दलही चंद्रसेन यांच्या कारकिर्दीत सांगितलेंच आहे. चंद्रसेन यांचा महाराजांस अत्यंत त्रास होऊं लागला. त्यामुळें बाळाजी विश्वनाथ यांनीं चंद्रसेनाच्या कटांतून पुष्कळ जुने सरदार फोडण्याचा क्रम सुरू केला. त्यांत शंभुसिंग यांजकडेही सूत्र चालू केलें होतें. "तुम्हांस महाराजांकडून सेनापतिपद देवबितों. तुम्हीं आपल्या बंधूस सोडून महाराजांस येऊन मिळा." अशाबद्दल होनोपंत वरेकर, नारोराम शेणवी व जीवनराम सुमंत औरंगाबादकर यांस मध्यस्थ घातलें होतें. हे तिघे पूर्वीपासून धनसिंग जाधवराव यांच्या पदरीं असून, बाळाजींनीं त्यांस आपले कटांत फोडून घेतलें होतें; परंतु शंभुसिंग जाधवराव यांनीं तें मुळींच मानलें नाहीं. नारोराम शेणवी यांस शाहूनें मंत्रीपद दिलें. त्याचप्रमाणें होनोपंत वरेकर, जीवनराम सुमंत औरंगाबादकर, कोकाटे व पिलाजी जाधव वगैरे लोक जाधवांकडून फुटून आले होते; त्यांस मोठमोठीं पदें देण्यांत आलीं. पिलाजी जाधव ( दिव्याचीं वाडी व वाघोलीकर जाधव यांचा मूळपुरुष ) व कोकाटे यांस सरंजाम देऊन सरदार केलें, त्याचप्रमाणें आनंदराव रघुनाथ हा मोंगलाईंतील माहितगार कारकून, चंद्रसेन जाधवराव यांच्या हाताखालीं विश्वासु होता, त्यासही बाळाजी विश्वनाथांनीं सुमंतपदाची लालूच दाखवून आपले कटांत सामील करून घेतलें. व त्यांस सुमंत पद दिलें. याप्रमाणें बाळाजींनीं चंद्रसेन जाधवराव यांच्या पदरचीं मोठमोठीं माणसें व सरदार यांस मोठमोठाले सरंजाम व पदें देऊन आपल्यास अनुकूल करून घेतलें. त्यांनीं चंद्रसेन जाधवराव यांची शक्ति कमी करण्याचे भगिरथ प्रयत्न केले. त्यांच्या पदरचीं माणसें फोडलीं एवढेंच नव्हे, तर त्यांचा सख्खा बंधु शंभुसिंग जाधवराव यांसही फोडण्याचा यत्न केला. परंतु तो त्यावेळीं निष्फळ झाला. तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांनीं धनसिंग जाधवराव यांचा वडील चिरंजीव सुजनसिंह ऊर्फ

संताजी ज्यास धनसिंग जाधवराव यांनीं बोरगांव वगैरे स्वतः मिळविलेलें उत्पन्न देऊन सातार प्रांतीं ठेविलें होतें, त्यास महाराजांकडून सेनापतीचीं वस्त्रें देवविलीं. संताजी हे चंद्रसेनाचे वडील बंधु होते, असें पूर्वीं सांगितलेंच आहे. हें सेनापतीपद त्यांस सन १७१२-१३ चे दरम्यान मिळालें व तें पद पुढें संताजी यांजकडून कसें निघालें, याबद्दलची माहिती बोरगांवचे घराण्यांत देऊं.

शंभुसिंग व चंद्रसेन जाधवराव यांनीं वारंवार बाळाजी विश्वनाथ व शाहू महाराज यांजवर हल्ले करून त्यांस 'सळो कीं पळो' करून सोडिलें. बाळाजी विश्वनाथ वारल्यानंतर त्यांचे वडील चिरंजिव बाजीराव यांस पेशव्याचा अधिकार मिळाला. शंभुसिंग, बाळाजी विश्वनाथांच्या मार्फत आपणास अनुकूल होत नाहीं, असें पाहून प्रतिनिधि यांस ही कामगिरी सांगितली. प्रतिनिधींनें शंभुसिंग जाधवराव यांस पत्रें पाठविलीं व स्वतः जाऊन भेटले आणि 'सातारचे दरबारीं पेशव्यांचें वजन वाढत चाललें असून, जुन्या पक्षाची हार होत चालली आहे. सबब तुम्हीं सातारचे दरबारीं यावें, म्हणजे आम्ही, तुम्ही, दाभाडे वगैरे सरदारांची एकी करून पेशवे यांचें वजन कमी करण्याचा प्रयत्न करूं.' अशी शंभुसिंग यांची समजूत केली व शाहू महाराज यांनीं प्रतिनिधीजवळ सुरसन सब्बा-समान अशर मया व अलफ फसली ११२७ म्हणजे इ० स० १७१७ त महालानिहाय सरंजाम शंभुसिंग यांस दिल्याबद्दलची सनद स्वतः प्रतिनिधि यांनीं त्यांचे स्वाधीन केली व साताऱ्यास चलण्याबद्दल फार आग्रह केला. शंभुसिंग यानें चंद्रसेनाची परवानगी घेतल्याखेरीज निघतां येणार नाहीं, असें गोड-बोलून प्रतिनिधि यांस माघारीं फिरविलें. पुढें या उभयबंधूंचे महाराजावर सारखे हल्ले चालूच होते.

सन १७२७ चे सुमारास संभाजी महाराज (कोल्हापूरकर) हे चंद्रसेन जाधवराव यांजकडे मोंगलाईंत आले. तेव्हां चंद्रसेन जाधवराव यांनीं आपलें सैन्य, व कोल्हापूरकरांचें सैन्य एकत्र करून निजाम उल्मुल्क यास आपले बरोबर घेऊन बाजीराव पेशवे यांच्याशीं लढाई दिली. ही लढाई गांडापूर व वैजापूर या प्रांतांत गोदावरीचे अलीकडे झालेली आहे. ह्या लढाईचें वर्णन चंद्रसेन यांच्या कारकिर्दींत दिलें आहे. यावेळीं कोल्हापूरच्या मंडळीमध्यें आपापसांत तंटे चालून संभाजी महाराज यांचेंही त्या लोकांशीं वांकडें असल्याचें दिसून आलें. त्यामुळें निरुपायानें कोल्हापुराकडे संभाजी महाराज यांस आपले बंधु शंभुसिंग यांस बरोबर देऊन रवाना केलें. शंभुसिंग यांनीं बाजीराव पेशव्यांच्या सैन्यावर अनेक हल्ले करून संभाजी-महाराज यांस सुरक्षित कोल्हापुरीं पोहोंचवून दिलें. यावेळीं पुनः प्रतिनिधींची व त्यांची गांठ पडून सातारचे महाराजांकडे येण्याविषयीं पुन्हां त्यांचें मन वळविलें. दरम्यान महाराजांकडून संताजी पांढरे, चंद्रसेन जाधवराव यांजवर आले होते, त्यांशीं या दोघांनीं तुंबळ युद्ध करून सन १७२४ मध्यें संताजी पांढरे यास ठार मारिलें. त्याजवरून पुनः महाराजांनीं केरोजी पवार, कान्होजी भोंसले (नागपूरकर) आणि संभाजी नाईक यांस मसलतीस बोलावून पुन्हा त्यांस या दोघां बंधूंवर रवाना केलें. पुन्हां सन १७२७ त कान्होजी भोंसले यांस पत्र लिहून चंद्रसेन जाधवराव यांजवर पाठविलें. चंद्रसेन जाधवराव व शंभुसिंग या दोघांनींही मातबर लढाई दिली. यावेळीं कान्होजी भोंसले यास चिमणाजी पंडीत राजाज्ञा हे अनुकूल होते. ही लढाई पाराशर येथें झाली. याप्रमाणें सारखे या दोघां जाधवराव बंधूंनीं* हल्ले चालविल्यावरून महाराज अगदीं त्रासून गेल्यामुळें, पुन्हा या उभयबंधूं पैकीं शंभुसिंग यांस आपलेकडे वळविण्याबद्दल प्रतिनिधीला हुकूम दिला. तेव्हां वर लिहिल्याप्रमाणें प्रतिनिधि यांनीं शंभुसिंगांची गांठ कोल्हापूर प्रांतीं घेतली व त्यांस हा सर्व मजकूर विदित केला. त्याजवरून त्यांनीं वडील बंधु चंद्रसेन जाधवराव यांची परवानगी घेऊन येतों, असें म्हणून पुनः परत मोंगलाईंत गेले.

शंभुसिंग, चंद्रसेन जाधवराव यांस जाऊन भेटले व त्यांस प्रतिनिधींची हकीकत सांगितली. चंद्रसेन जाधवराव यांस त्याबद्दल बरेंच वाईट वाटलें; शंभुसिंगानें असा आग्रह धरिला कीं, आपण स्वतः तरवार करून नवी सरदारी संपादन करावी. वडील भावांनीं मिळ-

* वरील ज्या लढाया झाल्या, त्याजबद्दलचे दाखले शाहूमहाराज यांचे रोजनिशींत दाखल आहेत. ही रोजनिशी नुक्तीच पारसनीस यांनीं सरकारच्या परवानगीनें छापली आहे. पहा डायरी पान ४।९।१०।११ पत्र नंबर ९।२४।२६।२८.

विलेल्या उत्पन्नांतच निर्वाह करित बसण्यापेक्षां नवीन मुलूखगिरी करून नांव कमवावें हें बरें. हें बोलणें चंद्रसेन जाधवराव यांस रुचलें नाहीं. तरी पण 'नाहीं' म्हणण्याची त्यांस छाती झाली नाहीं. शंभुसिंग यांची वर्तणूक मोंगल सरदारांशीं सलोख्याची नव्हती. हे स्वतः तरुण व सुंदर असल्यानें एका पठाण सरदाराच्या मुलीचा यांजवर डोळा होता. ही गुणगुण दरबारांत कळून नबावानें चंद्रसेन जाधवराव यांस भावाचा बंदोबस्त करण्याविषयीं ताकीद दिली. शिवाय चंद्रसेन जाधवराव यांस 'शाहूमहाराजांची शंभुसिंग यांस तिकडे येण्याविषयी आंतून पत्रें येतात.' हें ठाऊक होतें. व प्रतिनिधींनीं शंभुसिंगाचें मन वरेंच वळविलेलें आहे व शंभुसिंगाचा रोंखही तिकडे जाण्याचा दिसतो. या सर्व गोष्टींचा विचार करून चंद्रसेन यांनीं शंभुसिंग यांस कैद करून ठेवण्याचा विचार केला. ही गोष्ट शंभुसिंग यांस पवार आडनांवाच्या हुजऱ्याकडून कळली. ( हें पवार घराणें मालेगांव येथें हयात आहे.) शंभुसिंग भालकीहून यलमर या आडनांवाचा धनगर जातीचा शिलेदार यास बरोबर घेऊन रातोरात तेथून निघाले. त्यांजबरोबर पवार हुजऱ्या व आणखी दोन चार माणसें व यलमर याचे हाताखालील स्वार यांसह निघून मोंगलाईतील निंवाळें या गांवीं आले. वर सांगितलेली पठाणाची मुलगी सरदाराचे वेषानें त्यांजबरोबर निघाली. निंवाळ येथें पोहोंचल्यावर तेथलि लिंगाईत जातीचा वाणी हा जाधवरावाचा गुमास्ता होता. त्याच्या आश्रयास गढींत येऊन राहिले. तेथें फौजेचा जमाव करून त्यांनीं चंद्रसेन जाधवराव यांजकडून पाठलागास आलेले फौजेबरोबर लढाई देऊन तिचा मोड केला व निंवाळ येथील पाटीलकी सदरहू वाणी यास दिली व प्रतिनिधीस,-' आम्हीं येतों ' म्हणून महाराजांस विनंति करण्यास सांगितलें, त्याजवरून इ० स० १७२९।३० सल्लासीन मय्या व अलफ जमादिलाखर छ २६ या तारखेचें पत्र शंभुसिंग जाधवराव यांचे नांवें आलेलें होते, तें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

## चिटणीसी पत्रें.

रा० संभोसिंग जाधवराव यांस पत्र कीं, तुम्हांविशीं राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांनीं विनंति केली—त्यावरून तुम्हाविषयीं यास आज्ञाकरणें तो केली आहे. तुम्ही फौजेनिशीं यास सामील होऊन स्वामीसेवा करणें, मशारनिल्हे तुम्हास सांगतील तें स्वामीचीं वचनें जाणून या समागमें दर्शनास येणें, स्वामी तुम्हांस सरंजाम देऊन उर्जित करतील. म्हणून पत्र.

हें पत्र शाहू महाराज यांच्या रोजनिशींत पान १७ पत्र नं० ४४ यांत दाखल आहे.

याप्रमाणें पत्र आल्यानंतर ते पन्हाळ्याकडे कूच करून निघून आले. महाराजांचें पुन्हां पत्र १७२९-३० चें सल्लासीन मया व अलफ रबिलाखर म्हणजे पूर्वीच्या पत्राच्या अवल एक पत्र आलें आहे, त्याचाआशयः—

शंभुसिंग जाधव यांस पत्र जे-तुम्ही फौजेनिशीं पन्हाळेप्रांतीं येणें. या कामास केदारजी निकम व सीवाजी सांवत जासूद दिंमतलवे पाठविले यासी रुपये ५०.

शंभुसिंग यांजबरोबर माणकोजी वांडगर, रा. दौलाजीराव सोमवंशी, सिदूजीराव निंबाळकर व सखोजी आंग्रे अशा चार मोठमोठ्या सरदारांस पत्रें आहेत त्यांत असेंही लिहिलें आहे कीं, स्वामींचें कूच कार्तिक शु. ५ चें आहे. तरी तुम्ही फौजेनिशीं स्वामीसन्निध पन्हाळ्याखालीं येणें.

याप्रमाणें दोन पत्रें आल्यावरून निंवाळयाहून कूच करून पन्हाळीं मुक्कामा आले व महाराज यांस भेटले. महाराजांनीं त्यांचा फार चांगला सन्मान ठेविला होता. यावेळीं शाहूमहाराजांची स्वारी उंब्रजाहून पन्हाळें येथें दाखल झाली होती. संभाजी महाराज कोल्हापूरकर हे पन्हाळ्याच्या आसपास होते. त्यावेळीं प्रतिनिधि व शंभुसिंग जाधवराव यांनीं कोल्हापूरकर संभाजी महाराज यांशीं लढाई देऊन त्यांचा

मोड केला. त्याजवरून महाराज खूष होऊन शंभुसिंग जाधवराव यांजवर महाराजांची मर्जी सुप्रसन्न झाली. पुढें शंभुसिंग जाधवराव यांनीं कोल्हापूरचे महाराज व शाहू महाराज यांचा तह करविला. संभाजी महाराज व शाहूमहाराज यांच्या भेटी कऱ्हाड नजीक जखणवाडीचे मैदानांत झाल्या. या स्वारीचे भेटीसंबंधानें पेशव्यांच्या दप्तरचीं पत्रें यादी वगैरे पानें ४२९।३९३ यांमध्यें असें वर्णन दिलें आहे.—

नामीनामी लोकांनिशीं शाहूमहाराज घोड्यावरी स्वार होऊन आले. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतींची स्वारी हत्तीवरी होती. ते घोड्यावरी स्वार होऊन बनवा बिछावल्या होत्या. तेथें येऊन उभयतां महाराज घोड्यावरून उतरले. परस्पर संन्निध येऊन ऐक्यता होऊन शाहूमहाराज यांच्या पायावरी डोई श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांणीं ठेविली. महाराजांनीं परस्परें उभयतां बंधुंनीं आलिंगनें केलीं. त्यावेळेस मोहरा व रुपये, सोन्याचीं फुलें व रुप्याचीं फुलें परस्पर सार्के जहाले. त्यासमयीं तोफेची सरबत्ती व नाना प्रकारचीं वाद्यें व शाहाजोनें वाजवून आनंद झाला. फाल्गुन शुद्ध ३ मंदवारीं दोनप्रहरीं याप्रमाणें भेटीचा समारंभ जाहला. तदनंतर शाहूमहाराज यांनीं श्रीमन्हाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांचा हात धरून उभयतां बंधु एका अंबारीमध्यें हत्तीवर स्वार जाहले. खवासखान्यांत दोन मोर्चेलें घेऊन शंभुसिंग जाधवराव बसले.

वरील वर्णनाप्रमाणेंच रा. काशीनाथ नारायण साने ह्यांनीं छापलेल्या शाहू महाराज यांच्या बखरींतही वर्णन दिलें आहे. (पहा, पान ६३।६४).

ही गोष्ट शके १६५३ चैत्र वद्य २ ला झाली. याप्रमाणें कोल्हापूरकरांचा बंदोवस्त झाला.

शंभुसिंग जाधवराव यांस सन १७१७।१८ या सालामध्यें प्रतिनिधीबरोबर पाठविलेल्या सनदेंत खालीं लिहिल्याप्रमाणें महालानिहाय सरंजाम मोकाशाचें उत्पन्न देण्यांत आलें तें.

सुरूसन सल्लासमान आशरमय्या व आलफ म्हणजे सन ११२७ फसली, सन १७१७ इसवी सालांत महालानिहाय सरंजाम मोकासे वगैरे मिळाले ते.

**५९ महाल प्रांत भागानगर पैकीं.**

**५ सरकार देवरकोंडा.**

१ हवेली देवर कोंडा. १ परगणे यलजवाल
१ परगणे इउरती. १ परगणे इब्रामपट्टण.
१ परगणे चिरकोंडा.

—
५

**६ सरकार कान्हापूर.**

१ परगणे अमरावाद. १ परगणे आवची गंगापूर.
१ परगणे कणदूर. १ परगणे गुदर.
१ परगणे तारीपुडा. १ परगणे आमल कोटगोल.

—
६

**५ सरकार कोहल कोंडा.**

१ हवेली कोहलकोंडा. १ परगणे तांदूर.
१ परगणे पालीपल्ली. १ परगणे कोसगी कोंडगल.
१ परगणे आडकी.

—
५

**२ सरकार पानगल.**

१ हवेली पानगल. १ परगणे नागलील कंदमूल.

—
२

**५ सरकार खमलामेट.**

१ हवेली खमलामेट. १ परगणे मवाड कोंड पल्ली.
१ परगणे शंकरगिरी. १ परगणे हसनाबाद.
१ परगणे आनंतागिरी.

—
५

**५ सरकार मूर्तीजानगर.**

१ परगणे किलकोंडा. १ परगणे गोवूर.
१ हवेली मूर्तिजानगर. १ परगणे रायगुंद.
१ परगणे यलमकोंडा.

—
५

२ सरकार नळगोंडा.

१ हवेली नळगोंडा. १ परगणे आवरपल्ली.

—

२

१ परगणे कातकोंडा सरकार वरगल.

२४ सरकार मुस्तफानगर.

१ हवेली मुस्तफानगर. १ परगणे वानेवाड.
१ परगणे जमलवाडी. १ परगणे कपुर.
१ परगणे काळवा. १ परगणे कट्टरघट्ट.
१ परगणे इब्रामपूर. १ परगणे भितरजेल.
१ परगणे विआतवाल. १ परगणे कणपट.
१ परगणे गालपल्ली. १ परगणे पडेगांव.
१ परगणे अतुलसार. १ परगणे जाईन.
१ परगणे चिटकाई. १ परगणे उदीवाड.
१ परगणे मलगोंल. १ परगणे विनीकोंडा.
१ परगणे आवेर. १ परगणे नटकनीकोंडा.
१ परगणे देऊर कोंही. १ परगणे कणगिरी.
१ परगणे कट्टर. १ परगणे विनराई.

—

२४

१ परगणे कवूर सरकार देवरकोंडा.
१ परगणे गाणगापूर हवेली.
१ परगणे नडकूड हवेली सरकार भागानगर.
१ परगणे सुगूरनयान किचे सरकार पानगल.

—

५९

प्रांत बेदर.

सरकार मलसलेंड.

१ कानकुरती, १ परगणे उटकुड अर्धे परगणे मंगथळ अर्धे.
परगणे चिटगोपे सरकार हवेली बेदर.

१ परगणे कलबर्गे तक्षिमा २ तीसरी तक्षिमा बंडगरवांची वजा करून असे.

१ हवेली मल्कसोड.
१ परगणे मंगळगी सरकार मळसोड प्रांत बेदर.
१ सरकार मळसोडपैकीं गांवें.
१ कसबे कलगी आर्धा कसबे कालेवडी अर्धा.
१ परगणे सिराढोण.
१ हवेली सोलापूर १ परगणे सोहाळ.
१ लंग.

सदहू बेरीज एकंदर तालुक्यांची न नोंदण्याचें कारण दोन तीन सुभ्यांचे तालुके बेदर प्रांतांतील असोन पोटीं झाडा दाखलेवार न लागल्यामुळें दिल्ही नाहीं.

१ राणो निंबाडगर यांजकडील सरंजाम कदीम करार करून शंभूसिंग जाधवराव यांचे दिमतीस दिले.
१ परगणे माहागांव निमे व कसबा मारा.
१ परगणे कलबर्गे तिसरी तक्षिमा.
२ परगणे प्रतापपूरपैकीं देह.
१ मुचलंबे १ नारायणसोंड.

—

२

१ मौजे कडमुगली, तालुके कमळापूर प्रांत कलबर्गे
१ सरकार मलखेडपैकीं देह २ दोन.
कसबे कानगी अर्धा कसबे कोंनबडा.

—

१

यादवराव माहादेव बंडगर दिमत शंभुसिंग जाधवराव पास नर्दाद सरंजाम प्रांत भागानगर.

१ परगणे बुरगोंल कोटीकोंडा.
१ परगणे यलमलगडक सरकार गणपूर.
१ परगणे दापपल्ली सरकार गणपूर.

—

३

फत्तेसिंग भोंसले यांचे सरंजामपैकीं दूर करून शंभूसिंग जाधवराऊ यांस मोकासे महाल दिल्हे.

॥ परगणे प्रतापपूर निमे माणकोजी बांडगर बाकी निमे.
॥ परगणे वरवर सदरप्रमाणें.

सदहू सरंजाम सन १७१७ इसवींत शाहूमहाराज यांनीं शंभूसिंग जाधवराव यांस दिल्याबद्दलची माहिती मिळते.

१ सुरसन तिसा आशर मया व अलफ सन ११२८ फसली सन १७१८ इसवी सालीं रत्नोजी पांडरे यास महाल शंभूसिंग यांचे सरंजामपैकीं दिल्हे. त्याचे मोबदला फत्तेसिंग बोवा भोसले अक्कलकोटकर यांचे सरंजामपैकीं माहाल मोकासे दिले ते.

॥ परगणे मंगथळ सरकार मलसोड अर्धे.
॥ परगणे सेंडवे.
१ परगणे दौलताबाद.

३ सरकार देवरकोंडा.

१ परगणे चिट्टपाळ. १ परगणे देवींपल्ली.

१ परगणे मोरपल्ली.

---

३

येणेंप्रमाणें सुमारें २।४ लाखांचा मुलूख शंभुसिंग यांस सरंजाम दिला. व सातारा मुक्कामीं शाहूमहाराज यांनीं आपल्या सन्निध राहण्याचा त्यांस हुकूम दिला. ह्या मुलखावर शंभुसिंग हे सातारप्रांतीं राहिल्यापासून अंमल चालवूं लागले. शाहूमहाराज यांस वाघाच्या शिकारीचा फार नाद असे. तेव्हां रघूजी भोंसले ( नागपूरकर ) व शंभुसिंग जाधवराव हे नेहमीं महाराजांबरोबर शिकारींत असत.

पुढें सन १७३२।३३ चे सुमारास जंजिऱ्याचे सिद्दी यांचा भावाभावांत तंटा लागला. ही गोष्ट साताऱ्यास कळली. तेव्हां शाहूमहाराज ह्यांच्या मनांत आलें कीं, हबशी यांजकडे जंजिरा हें स्थळ बेलाग राहिलें. पूर्वी थोरले महाराजांनीं प्रयत्न केला; परंतु तें स्थळ मिळालें नाहीं. कोंकणप्रांत गेला तो सर्व सोडविला. परंतु हें स्थळ हस्तगत होत नाहीं. असें चित्तांत आणून सेखजी म्हणून मातवर सरदार हबसी याजकडे होता. त्याजला ५० हजार रुपये देऊन भेद करविला. यासमयीं सिद्दी रसूल याकूदखान तख्तनशीन होते ते वारले. त्यांचा वडील मुलगा थोरला सिद्दी अवदूल, दुसरा धाकटे सिद्दी अबूल रहिमान, तिसरा सिद्दी सबुदूल, सिद्दी आंबर अफवानी, सिद्दी रहाण व सिद्दी याकूद, याप्रमाणें सिद्दी रसूल याकूदखान यांस मुलें होतीं. या सर्व जणांनीं एक विचार करून वडील सिद्दी अबदुलखान यास ठार मारलें व आपण जंजिरा बळकावून बसले. धाकटे सिद्दी अबूल रहिमान हे राजापुरीं आपल्या वडिलांचें प्रेत घेऊन दफनास आले होते, ते तेथेंच राहिले. तेव्हां सेखजीनें सिद्दी अबूल रहिमान यास सल्ला दिली कीं, शाहू महाराजांची मदत मागा; त्यावरून महाराजांची मदत मागण्याकरितां राजकारण आल्यावरून महाराजांनीं श्रीपतराव प्रतिनिधि, फत्तेसिंग भोंसले व शंभुसिंग जाधवराव यांस जमावानिशीं राजापुरीं रवाना केलें. त्याप्रमाणें हे तिघे सरदार रायगडावरून राजापुरीस रवाना झाले. जातांना यशवंतराव पोतनीस यांनीं रायगडचें राजकारण सिद्ध केलें आहे, त्यामार्गे जाऊन किल्ला हस्तगत करून यशवंतराव यांस बरोबर घेऊन पुढें चालते झाले व राजापुरीस येऊन पोंचले. कान्होजी आंग्र्यास पूर्वींच पाण्यामध्यें मोर्चे बांधण्यास हुकूम दिला होता. बाजीराव पेशवेही राजापुरीस येऊन दाखल झाले होते. ह्या तिन्ही मराठ्यांच्या सैन्यानें जंजिऱ्यास वेढा देऊन मोठी मातवर लढाई केली. सिद्दी रहाण रणांत ठार झाला. वेढा दोन तीन महिने सारखा चालू असून, किल्ला बहुत जेर केला. बाहेरून रसद पोहोंचणें बंद केलें व सरदार यांनीं बाहेरून मारगिरी केली. त्यावरून आंतील हबशी हवालदील झाले व सिद्दी अबूल रहिमान यांचे स्वाधीन जंजीरा करण्याचें कबूल केल्यावरून व पर्जन्यकाळ समीप आल्यावरून किल्ला व जंजीरा अबूल रहिमान यास देऊन सर्व मराठ्यांचें सैन्य माघारीं परतलें. माघारी निघण्यापूर्वीं सिद्दीचा व महाराजांचा तह ठरून, राजापूर लुटून, तळें, घोसाळें, अवाचितगड, बिरवाडी व सुरगड वगैरे महाल व किल्ले या सैन्यानें घेतले. याप्रमाणें सर्व सरदार परत आल्यावर शंभुसिंग जाधवराव यांस एक पत्र लिहिलें आहे. या पत्रामध्यें शंभुसिंग जाधवराव, उदाजी चव्हाण व व्यासो भुजबळराव यांची मोठी वाहवा केली असून, संतोष मानलेला आहे. शाहूमहाराजांची रोजनिशी नंबर ६३ पान २४ इसवी सन १७३३–३४ अर्बा सल्ला सन मया व अलफ जिल्हेज.

**पत्र.**

सरदारांस पत्र जे—तुम्ही मुलूखगिरी करून आलांत ते विदित झाले स्वामी संतोष पावले प्रस्तुत मनसुब्याचा प्रसंग आहे. आम्ही आपली फौज घेऊन टाकोटाक स्वामीचे दर्शनास येणें म्हणून पत्रें सादर करून जासूदचाकर रवाना पाठविले. यासी देविला मसाला रुपये २५ राजश्री उदाजी चव्हाण, २५ राजश्री व्यासो भुजबळराव, २५ शंभूसिंग जाधवराव.

या पत्राप्रमाणें शंभुसिंग जाधवराव सैन्यानिशीं साताऱ्यास जाऊन पावले. याचे पूर्वी सुरुसन तिस्सा अशिरील मया व अलफ सन ११३८ फसली इ० स० १७२८ माहे मजकूरचें आज्ञापत्र फत्तेसिंग भोंसले याला देऊन आज्ञा केली कीं, खालीं लिहिल्याप्रमाणें शंभुसिंग यांस सरंजाम महाल दिलेले आहेत. त्यांस तुम्हीं उपद्रव न करणें. हे महाल शंभुसिंग साताऱ्यास पोंहोंचले, त्या वर्षीच दिले होते, ते येणेंप्रमाणें.

सुरुसन तिस्सा अशिरील मया व अलफ सन ११३८ फसली सन १७२८ इसवी छ ५ माहे जमादिलावरचें आज्ञापत्र फत्तेसिंग भोंसले यास कीं, शंभुसिंग जाधवराऊ यांचा सरंजाम हुजूर करार करून दिल्हा असे. येविषयीं तुम्हास आज्ञा करणें ती जाते समयीं केलीच आहे. तर तुम्हीं या उपर यासी व सरंजामास उपद्रव न देणें.

१ सुरुसन इहिदे सल्लासीन मया व आलफ.
१ सरकार परगणे मानूर.
१ परगणे पुसंदे. १ परगणे महागांव

—

२

**३ सरकार परंडे.**

१ कसबे सावरगांव परगणे वार्सी,
१ परगणे वार्सी. १ परगणे पांगरी.

—

३

**२ सरकार धारूर.**

१ परगणे सेनगांव. १ परगणे परळी.

—

२

**४ सरकार पाथरी.**

१ परगणे हवेली पाथरी. १ परगणे कोसरी.
१ परगणे झरी. १ परगणे जिऊरी.

—

४

१ कसबे इसाद.
-॥- परगणे येकउनी अर्धी.
-। परगणे आंबेगांव चवथा हिस्सा.
-॥- परगणे रासीन अर्धी.

**८२ कितां गांवें.**

**५ तालुके जामखेड.**

१ मौजे तलेगर्सी. १ मौजे झिकरी.
१ मौजे सवताडे. १ मौजे सारळे अर्ध -॥-
१ मौजे सातेफळ

—

५

१ कसबे खेड चांभार गोंदे.
-॥- कसबे रासीन.

**६ परगणे बीड पैकीं.**

१ मौजे चिचवली. १ मौजे निमगांव अर्ध.
१ मौजे पिंपोळी. १ मौजे थरूड अर्ध.
१ मौजे माकपुरी तालुके सोनखेड.
-॥- मौजे कोरेगांव. -॥- मौजे भागलगांव.

—

६

१ मौजे अंजनगांव तालुके करेपठार निमे.
१ मौजे आडुळगांव परगणे कडे राक्षणगांव.
८ कितादेह ८.
१ मोर्ती परगणे पाथरी साधरानपंत मजमदार.

**२ शिवाजी पांडुरंग यांचीं गांवें.**

१ मौजे रामण १ मौजे भोंस.

—

२

सदर दोन्हीं गांवें पाथरीपैकीं शिवाजी पांडुरंगाचे तैनात राजपत्रीं असेत.

१ वाडीक-मळाची विनाजीस जमीन.

**३ अष्टीपैकीं.**

१ पिंपरी मुजूमदार.
२ शिवाजी पांडुरंग यांस.

**१ शिवाजी पांडुरंग यांस.**

— —

३ २

सदरहू तीन गांवें राजपत्रीं दरखदार यास देविले असेत.

मौजे वडगांव शेळगांव पैकीं कमळोजी विनाजिस जमीन.

—

८

३ तालुके पेंडगांव.

१ वासिंवे अर्धे १ चांदेबुद्रूक अर्धे -॥-
१ करजें अर्धे -॥-

—
३

३ तालुके कडे.

१ मुरडी अर्धी -॥- डोंगगण अर्धी -॥-
१ सेरी खुर्द अर्धी-॥-

—
३

९ परगणे सुपे बारामती.

१ कसबे बारामती. १ सुपे खुर्द अर्धे.
१ कांबळेश्वर. १ सिरष्णे १ कारखेल -॥- अर्धे.
१ नेपतवळण. १ रुई अर्धी.
१ मुंजवडी. १ मौजे सावळ अर्धी.

—
९

२७ परगणे आबड

१९ दरोबस्त मोकासा.

१ मौजे आतरवली सराटी.
१ मौजे कुकरगांव १ मौजे खेडले.
१ मौजे वके. १ मौजे महाकाळ.
१ मौजे कुंभार पिंपळगांव.
१ मौजे सिद्धेश्वर पिंपळगांव.
१ मौजे साकळगांव १ मौजे गोंदी खांडी.
१ मौजे घारगांव १ मौजे आतरवाली खांडी.
१ मौजे कोळीवेंडके १ मौजे खडके.
१ मौजे दुधपुरी १ मौजे साष्ट पिंपळगांव.
१ मौजे कोढारी १ मौजे कुरसळ पिंपळी.
१ मौजे वाठाण. १ मौजे लखमापुरी.

—
१९

८ निमे मोकासा अमलांचीं गांवें.

१ मौजे काईखोड १ मौजे बोरगांव बु॥
१ मौजे निपाणी पिंपळगांव.
१ मौजे भेंडाळे १ मौजे निंबोली.
१ मौजे सोनके पिंपळगांव.
१ मौजे कोटाळे बुद्रुक.
१ मौजे गंगाचिचौली.

—
८

—
२७

१६ कितां गांवें.

१ उंदरगांव तालुके चांभार गोंदे.

७ तालुके पेंडगांव.

१ अंजनडोह १ रावगांव. १ कामाल.
१ करमाळे १ झरे १ पोंथर १ पोटगांव.

—
७

२ परगणे पाथरीपैकीं दोन.

१ रामपुरी १ हातगांव.

—
२

१ उमरडे तालुके चांभार गोंदे.
१ तालुके आष्टी.
१ माहूर परगणे शिरसोळ.
१ मौजे डोंगरगांव तालुके कडे.
१ परगणे हिसरे तालुके पेडगांव.
१ मौजे पेडगांव तालुके मजकूर

— —
८२ १६

पुढें संभाजी व शाहू महाराज यांचा तह झाल्याचे सुमारास सन १७३१ मध्यें मौजे कोथळे, मौजे माले-गांव बुद्रूक इनाम, स्वराज्य, मोगलाई सुद्धां छ ९ जमादिलावर मार्गशीर्ष शु. ११ सन १७३१ रोजीं कबिला ठेवण्याकरितां गांव सर्व दिला आहे त्याचे सनदेची नक्कल.

श्री.

स्वस्तीश्री राज्याभिषेक शके ५८ विरोधी नाम संवत्छरे मार्गशीर्ष शुद्ध ११ रविवार क्षत्रियकुळावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणीं राजश्री नारोपंत सचीव यासी आज्ञा केली ऐसाजे. राजश्री संभुसिंग जाधवराव यांस कबिले ठेवण्याबद्दल मौजे मालेगांव

कर्यात बारामती हा गांव स्वराज्य व मोंगलाई अम्मल एकूण दुतर्फा कुलबाब व कुलकानू देखील बाबती इनाम करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर मशारनिल्हेच्या स्वाधीन करणें आपणाकडील आमलदारास ताकीद करून मौजे मजकूरीं दखलगिरी करून घेणें लेखन आलंकार.

बारसुद. मोर्तब.

सुरुसुदबार.

याप्रमाणें हा गांव कबिले ठेवण्याकरितां इनाम करून दिला. त्यामुळें शंभुसिंग जाधवराव मालेगांवीं येऊन जाऊन राहूं लागले. पुढें दाभाडे यांचीं बडोद्या-नजीक डभई येथें बाजीरावाशीं लढाई झाली. याबद्दल हकीकत चंद्रसेन जाधवराव यांच्या कारकीर्दींत दिलीच आहे.

सन १७३७ मध्यें पुनः कोकणांत पोर्तुगीज लोकांनीं संभाजी आंग्र्याचे बाजूनें, मानाजी आंग्र्यावर स्वारी केली. तेव्हां बाजीराव, प्रतिनिधि व शंभूसिंग वगैरे सरदार पुनः कोकणांत पाठविले. तेव्हां पोर्तुगीज लोकांचा पराभव करून आंग्र्याची व्यवस्था करून ते परत आले. शंभुसिंग पुनः परत सातारीं आल्यावर त्यांस कर्नाटकीं जाण्यास हुकूम झाला. त्यावेळींहि त्यांना सरंजाम व महाल देण्यांत आले, ते खालीं लिहिल्याप्रमाणें.

सुरुसन सबा सलासीन मया व अलफ सन ११४६ फसली सन १७३६ इसवी नळनाम संवछरे शके १६५८.

**५ सरकार मलसोड प्रांत बेदर.**

१ मौजे कडकूर १ मौजे वरमाण
१ मौजे उठकूर. १ मौजे अमरचिंता.
१ मंगथळ.

—
५

**४ प्रांत मान.**

१ कसबे येळापूर. १ कसबे म्हसण.
१ कसबे दहींगांव. १ कसबे आटपाडी.

—
४

**९ प्रांत मिरज पैकीं.**

१ तासगांव. १ कर्यातदेसिंग.
१ कर्यात अजनी. १ सावरडे.
१ कर्यात बेंडग. १ कर्यात कवठेमहांकाळ.
१ कर्यात म्हैसाळ. १ कर्यात ढाळगांव.
१ कर्यात मने राजुरी.

—
९

**२ मौज उनती** १ परगणे मंगळवेढें मौजे नेवळे परगणे सांगोलें १ एकुण २.

**२७ सरकार विजापूर.**

१ समत बरडोल. १ समत होरटी.
१ समत चांदकवठे. १ समत हिंमरगे.
१ समत जत. १ समत बागेवाडी.
१ समत मोमलवाड. १ समत आथणी.
१ समत होनवार. १ समत कोकनूर नालवंद.
१ समत हालसिंगी. १ समत तांबे.
१ समत उकली. १ समत इंडी.
१ समत करजगी. १ समत गोट.
१ समत हवेली विजापूर. १ समत कोकतेनूरगडी.
१ ठाणे नरगुंद. १ ठाणे जयनापूर.
१ ठाणे सिद्धनाथ. १ ठाणे बीनरंगी.
१ ठाणे बनुती. १ ठाणे रुळी.
१ ठाणे कोल्हार. १ ठाणे हुसूर.
१ ठाणे चिमणळग

—
२७

विजापूर प्रांतांतील नऊ ठाणीं अठरा परगणे त्यांच्या मोकाशाच्या सनदा छ ५ माहे साबान रोजीं करून दिल्या असेत.

१ सरकार मलसोड प्रांत बेदर.

१ परगणे चितापूर. १ परगणे हवेलीं मनसोड.
१ परगणे मंगळगी. १ परगणे सेरवे.
१ मौजे कोलवडी. १ परगणे चिंचोली.
१ परगणे नळगुंद १ परगणे कालकुरती.
१ कसबे कात गी.

—
९

१ सरकार सगर.

**६ प्रांत मान.**

१ कसबे सांगोले १ अकलूज. २ भालवणी.
१ ब्रह्मपुरी.
१ नाझर १ कासेगांव

—
६

१ परगणे केमवावी प्रांत विजापूर.

१ परगणे तालीकोट.

सदरहू शिवाय आणखी उत्पन्न दिल्याची नक्कल सांपडली तीः—

श्री.

स्वस्तीश्री राज्याभिषेक शके ६३ नळनाम संवत्छरे मार्गशीर्ष शु॥ ७ भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणीं देशमूख व देशपांडीये महाला निहाय आहद तुंगभद्रा तहाद कावेरी प्रांत करनाटक यासी आज्ञा केली ऐसीजे प्रांत तगार पै॥ निमे मोकासा व तहाप्रमाणें जकातीचा वसूल राजश्री संभुसिंग जाधवराव यांजकडे वसूल देणें, छ ५ माहे साबान सुरसन सबा सला सीन मया व अलफ लेखन आलंकार मोर्तब.

शुद सूद्र बार सनफसली सन इसवी
११४६ १७३६

वार

येणेंप्रमाणें उत्पन्न असून आणखीही उत्पन्नें असावीत. परंतु कागदपत्र गहाळ झाल्यामुळें बरोबर तपास लागत नाहीं.

शंभुसिंग यांस कोंकणांत सिद्दीवर पाठविण्यापूर्वी ते मालेगांवीं कुटुंबाची व्यवस्था लावण्याकरितां आले असतां, त्यांस एक तगादेपत्र लवकर सैन्य पाठविण्या. विषयीं आलेलें आहे, तें शाहूमहाराज यांची रोजनिशी पान १२२ पत्र नंबर २६८ सन १७३४।३५ खमस सल्लासीन मया व अलफ रजब २३ चें आहे. सदरहू पत्र महाराजांचे खास दस्तकाचें आहे, त्याचा मजकूर खालीं लिहिल्याप्रमाणेंः—

पत्र.

राजश्री शंभुसिंग जाधवरायास खास दस्तकाचें पत्र जे, मसलतीस राउत पाठविणें ते गांवास जातांच रवाना करितों म्हणून स्वामी यांसी बोलून गेला. त्यास जाऊन दिवसगत लागली. आद्यापि एकहि राऊत आला नाहीं. यावरून स्वामींनीं आपूर्व मानिलें आहे. मसलतीचे कामास तुम्ही लोकांनीं दिरंगाई घालावी ऐसे नाहीं. स्वामींचीं आज्ञापत्रें पाठवावयाची सीमा झाली; याउपर देखत आज्ञापत्र बोलीप्रमाणें आपणाकडील राउत व एक सरदार शिताबीनें पाठविणें, एक घडीचा उझूर न करणें. ये विशयींचीं कित्येक आज्ञा नारोत्तम मंत्री यांस केली आहे. ते लिहितील त्यावरून कळून येईल. या कामास खंडोजी निंबाळकर दिंमत हुद्दे पाठविला आहे. त्यास रुपये २० देविले असत. त्यास देणें म्हणून पत्र १.

शंभुसिंग जाधवराव यांचें शाहूमहाराजांवर मोठें वजन असून, प्रत्येक स्वारीचे कामामध्यें यांची सल्लामसलत शाहूमहाराज घेत असत. यावेळीं मराठे सरदारांमध्यें फत्तेसिंग भोंसले अक्कलकोटकर व शंभूसिंग जाधवराव मालेगांवकर हे प्रमुख होते. यावेळीं जेवढ्या स्वाऱ्या झाल्या, तेवढ्या स्वाऱ्यांमध्यें फत्तेसिंग व शंभूसिंग या मराठे सरदार–द्वयांची जोडी हजर असून, शाहूमहाराजांची बाजू मोठमोठे रणसंग्राम करून त्यांनीं उचलून धरिली होती. चंद्रसेन व निजामउलमुल्क यांनीं कर्नाटकाकडे अगदीं धुमाकूळ माजवून दिला होता व शाहूमहाराजांचा मुलूख लुटण्यास आरंभ केला होता. कोंकणांत सिद्दीची तेढ पडली होती. सिद्दी, आंग्रे व कोल्हापूरकर हेही त्रास देत होते. तेव्हां प्रतिनिधि, फत्तेसिंग भोसले, शंभूसिंग जाधवराव व बाजीराव बल्लाळ पेशवे या सर्व सरदारांस कोंकणांत पाठवून देण्याची मसलत

चालू होती. व त्या कामीं पुष्कळ पत्रें शंभूसिंग यांस, मसलतीस सरदार व सैन्य पाठविण्याबद्दल आलीं होतीं. ' स्वामीची आज्ञापत्र पाठविण्याची सीमा झाली. ' असा या पत्रांत उल्लेख आहे व ' मसलतीस राऊत पाठवितों. आपणाकडील राऊत व एक सरदार सिताफीनें पाठविणें ' अशा तऱ्हेचीं या पत्रांत वाक्यें आहेत. या पत्रांतील सर्व वाक्यांवरून या स्वारीकरितां शंभूसिंग यांची किती जरूरी होती, हें स्पष्ट होत आहे. व महाराजांवर शंभूसिंग जाधवरावांचें केवढें वजन होतें, हें कळून येईल. त्याचप्रमाणें शंभूसिंग जाधवराव यांजवळ मोठी फौज असून, त्या फौजेवर आधिपत्याकरितां शंभूसिंग जाधवराव यांच्या हाताखालीं सरदारही होते, असें ' आपणाकडील राऊत व एक सरदार सिताफीनें पाठविणें. ' या वाक्यावरून स्पष्ट होत आहे. या सैन्याच्या वेगमीकरितां कर्नाटक, मोंगलाई वगैरे ठिकाणीं पुष्कळ सरंजामही देण्यांत आले होते. त्यावरून त्यांचेजवळ मोठें सैन्य होतें, हें सिद्ध होत आहे. कोंकणांतील स्वारी आटोपल्यानंतर कर्नाटकांत चंद्रसेन जाधवराव तर्फे विराप्पा नांवाचा कानडी सरदार देश लुटून धूळधाण करीत होता. म्हणून शंभूसिंग जाधवराव, फत्तेसिंग भोंसले, रघुजी भोंसले सेनासाहेबसुभा ( नागपूरकर. ) व आपाजी सोमवंशी सरलष्कर, या चार मोठ्या सरदारांस चंद्रसेन व विराप्पा यांजवर पाठविलें. नंतर हे सर्व सरदार कर्नाटकप्रांतीं गेले व त्यांनीं विराप्पा यास गांठून त्याच्याशीं मोठें तुंबळ युद्ध केलें. शंभूसिंग जाधवराव यांच्या या स्वारीबद्दल शाहूमहाराज यांचे रोजनिशींत, पान २९ मध्यें पत्रनंबर ७२ चें छापिलें आहे, त्याचा मजकूर येणें प्रमाणें:—

श्री.

कित्तापत्र चिटणीशी पौष बाहूल द्वादशी गुरुवासर राजश्री हैबतराउ बांडगर अमीरुल उमराव यांस जाब ऐसाजे:—तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. लिहीलें वर्तमान विदीत झालें. विराप्पा वगैरे टाळेटोळे जमा होऊन मुलखांत धूम मांडली आहे. चंद्रसेन जाधव उदाजी चव्हाणास बरोबर घेऊन विडाकडे आले आहेत म्हणोन लिहीलें, त्यांस गनिमांनीं वळवळ केली आहे. त्यांस नतीजा देऊन ( लागत नाहीं. ) ठेवावें म्हणोन स्वामींनीं चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री रघुजी भोसले सेनासाहेबसुभा व शंभूसिंग जाधवराऊ व राजश्री आपाजी सोमवंशीं सरलष्कर यांसी फौजेनिशीं आज्ञा देऊन रवाना केले आहेत. चतुर्वर्ग सत्वरींच त्या प्रांतीं येतील. तुम्हींही चिरंजिवांस सामील होऊन स्वामीसेवा करून दाखवून आपले सेवेचा मजूरा करून घेणें म्हणून पत्र १.

ही लढाई सन १७३८।३९ तिस्त्या सलासैन मया व अलफ जिल्हेज २४ रोजीं झाली. त्याजबद्दल रोजनिशींतील ७१ नंबरचें पत्र छापलें आहे. त्यांत फत्तेसिंग भोंसले व शंभुसिंग जाधवराव वगैरे सरदारांस या लढाईमध्यें आणखी किती सरदार त्यांच्या दिमतीस दिले होते, याबद्दल वर्णन दिलें आहे:—

कित्ता एक चिटणीशी समाधानपत्रें:—सरदार दिमत राजश्री फत्तेसिंग भोसले याणीं विराप्पा निसबत चंद्रसेन यासी युद्धप्रसंग करून विराप्पा धरिला फौज मोडून तारांगण केलें म्हणून विदित झालें; त्यावरून स्वामी बहुत संतोषी होऊन खुशाल झाले. समाधान पावले. तुम्हीं बरी अंगेजणें करून युद्धप्रसंगीं शर्त केली, हें सविस्तर वृत्त चिरंजिवांनीं लिहिलें, त्यावरून स्वामी समाधान पावले. तुमचे सेवेचा मजुरा झाला. पुढेंही चिरंजीवांचे आज्ञेंत वर्तोन स्वामीसेवा करून आपला जगनामोश करून घेणें म्हणून पत्रें.

कित्ता एक नांवनिशीवार.

१ राजश्री हैबतराऊ बांडकर १ राजश्री संताजी यशवंतराऊ व तुळाजी यशवंतराऊ

कोकाटे. १ राजश्री सुभाजी पोळ. राजश्री खंडोजी बांडगर, राजश्री यशवंतराऊ ओटकर. १ राजश्री खंडोजी बांडगर वजारतमहा. १ राजश्री आपाजी माने १ जानराऊ सोळसकर १ मानसिंग सोळसकर १ कोंडजी सोळसकर. शामराऊ त्रिंबक घोडके धायगुडे १ डोंगरोजी यादव. १ जयसिंग शिर्के. १ नरसिंगराव कोकाटे १ यशवंतराऊ शितोळे एकूण १५.

मोघम नांवास जागा टाकून डौलें पाठविलीं. लष्करांत नांवें भरून देतील पत्रें सुमारें २५.

याप्रमाणें ज्या ज्या सरदारांनीं फत्तेसिंग भोंसले व शंभुसिंग जाधवराव या सरदारांस लढाईच्या कामीं मदत केली, त्या कित्येक सरदारांस महाराजांनीं फत्तेसिंग भोंसले यांच्या मार्फत हें समाधानपत्र पाठविलें आहे. शंभुसिंग जाधवराव व फत्तेसिंग भोंसले याप्रमाणें कर्नाटकांत चंद्रसेन जाधवराव वगैरे मोंगलांकडील सरदारांशीं झुंजत असतां, निजामउल्मुल्क यांनीं उत्तरेकडे भोपाळ नजीक शिरोंजें गांवीं मोठें सैन्य जमविलें होतें. बाजीराव बल्लाळ पेशवे, राणोजी सिंदे, पिलाजी जाधव व सयाजी गुजर वगैरे मराठे सरदार मदतीस घेऊन निजामाशीं सामना दिला. त्यांत निजामाला वरीच हार खावी लागली. पुनः निजामानें मदतीस आणखी सैन्य बोलावून पुनः बाजीराव यांजबरोबर लढाई दिली. सपतर जंग व कोट्याच्या राजा हे निजाम तर्फे लढत असतांना मल्हारराव होळकर, व यशवंतराव पवार ह्यांनीं त्यांचा पराभव केला. ह्याप्रमाणें निजाम हा मराठ्यांच्या कचाट्यांत सांपडला असतां त्यानें दक्षिणेकडे आपला दुसरा मुलगा नाशिरजंग यास पत्र लिहून हैद्राबाद व औरंगाबाद येथें फौज जमवून भोपाळ येथें मदतीस पाठविण्याबद्दल लिहिलें. त्याप्रमाणें नाशिरजंग हा चंद्रसेन, रावरंभा निंबाळकर वगैरे मोठ मोठे सरदार व मोंगल सरदार यांच्या हाताखालीं फौज देऊन भोपाळकडे या सर्व फौजेनिशीं रवाना झाला. बाजीरावानींही ही फौज न यावी म्हणोन आपला भाऊ चिमणाजी आप्पा यांस लिहिलें. त्याचप्रमाणें शाहू महाराजांस मोठ्या कळकळीनें पत्र पाठवून रघूजी भोंसले व सोनगड सुरत नजीक असलेले सेनापती दाभाडे यांस पाठवून देण्याबद्दल त्यांस हुकूम द्यावा म्हणून लिहिलें. चिमणाजी आप्पा तापीवर येऊन उतरले. औरंगाबादचे उत्तरेस निजामचें सैन्य फुलंबरी येथें येऊन जमलें. बाजीरावानीं आपल्या भावास अत्यंत जरुरीनें लिहिलें कीं, जितकें सैन्य मिळेल तितकें तुम्ही घेऊन या. फत्तेसिंग भोंसले, शंभुसिंग जाधवराव आणि सर लष्कर हे कर्नाटकांत आहेत, त्यांसही घेऊन यावें. दाभाडे, गाइकवाड, बांडे वगैरे सरदार माझेकडोन आले तरी तुम्हांस त्यांनीं तापीवर येऊन मिळावें. याप्रमाणें मोठा जमाव करून मोंगलांशीं टक्कर देऊन आपण दक्षिणचे मालक व्हावें, असा माझा हेतू आहे, असें चिमणाजी आप्पास लिहिलें. ( पहा ग्रांटडफ पान ४६०. )

याप्रमाणें शंभुसिंग जाधवराव, फत्तेसिंग भोंसले, सरलष्कर वगैरे मोठमोठे सरदार येऊन बाजीराव यांस मिळाले, ही लढाई भोपाळनजीक झाली. या लढाईत मोंगलांचे तर्फे चंद्रसेन जाधवराव व मराठ्यांचे तर्फे शंभुसिंग जाधवराव असे दोघे भाऊ भाऊ एकमेकांविरुद्ध लढत होते. ह्या भोपाळच्या लढाईचें वर्णन चंद्रसेन जाधवराव यांच्या कारकीर्दींत दिलें आहे. मराठ्यांतर्फे शंभुसिंग जाधवराव व फत्तेसिंग भोंसले या दोघांनीं मोठें तुंबळ युद्ध केलें. या वेळेस निजामास हार खावी लागली; व माळवा आणखी नर्मदा व चंबळा यांमधील मुलखाचें राज्य बादशहाकडून घेण्याबद्दल ठराव झाला. व ही लढाई संपली.

पुढें कोंकणमध्यें पोर्तुगीज लोकांनीं तारापुरनजीक असलेल्या असिरीचें ठाणें घेतलें होतें. तिकडे कांहीं मराठी सैन्य पाठविण्यांत आलें व बाकीचें सैन्य परत साताऱ्यास आलें. पुन्हां चिमणाजी आप्पा यांस शंभुसिंग जाधवराव, फत्तेसिंग भोंसले, शिंदे आणि होळकर या सर्व मराठे सरदारांनिशीं कोंकणांत पाठविलें. या लष्करानें केळवा आणि तारापूर येथें वेढा दिला. पोर्तुगीज लोकांनीं मोठ्या शौर्यानें ह्या ठाण्याचें संरक्षण केलें. परंतु राणोजी भोंसले किल्ल्याभोंवतीं जो

खंदक होता व ज्यास कोठेंही रस्ता नव्हता; तो ओलांडून शिड्या लावून हातांत तलवार घेऊन वर चढला, व त्यानें किल्ला सर केला. यावेळीं फ्रेंच लोक फारच शौर्यानें लढले. परंतु राणोजी भोंसल्यानें मोठें धाडस करून शेवटीं किल्ला सर केला. यावेळीं सर्व मराठे सरदारांनीं फारच शौर्य दाखविलें. युरोपियन लोकांशीं सामना देणें मोठें कठीण होतें. इतक्यांत नादीरशहाची स्वारी दिल्लीकडे आल्याचें कळल्यावरून बाजीरावानीं चिमणाजी आप्पा यांस सर्व सरदारांनिशी कोंकणांतून आम्हांला येऊन मिळावें म्हणून लिहिलें होतें. परंतु वसईला यावेळीं वेढा पडला असल्याकारणानें चिमणाजी आप्पा कांहीं तिकडे गेले नाहींत. पुष्कळ दिवस सारखा मराठ्यांनीं हल्ला केल्यामुळें अखेरीस पोर्तुगीज यांनीं सल्ला करून वसई किल्ला स्वाधीन केला. या लढाईंत मराठ्यांकडील ५००० लोक मेले. या वेढ्यांत मराठ्यांनीं मोठें शौर्य दाखविलें, असें ग्रँट डफ साहबानें सुद्धां म्हटलें आहे.

याप्रमाणें शंभूसिंग जाधवराव यानें मराठ्यांचे तर्फे सारखें युद्ध करून शाहूमहाराज यांस फार संतोषित केलें. बाजीराव हे पुढें लवकरच वारले. पुन्हां कर्नाटकांत सन १७४० मध्यें मराठ्यांची स्वारी झाली, त्यांतही शंभूसिंग होते. त्यावेळीं बाळाजी बाजीराव यांस पेशवाईचीं वस्त्रें देण्याबद्दल रघूजी भोंसले यांनीं अडथळा घातला व बापूजी नाईक बारामतीकर यांस पेशवे पद देण्याबद्दल पुनः प्रश्न उपस्थित झाला. परंतु चिमणाजी आप्पा ह्यांचे खटपटीनें बाळाजी बाजीराव यांस पेशव्याचीं वस्त्रें मिळालीं. इकडे कर्नाटकांत श्रीपतराव प्रतिनिधि, फत्तेसिंग भोंसले व शंभूसिंग जाधवराव यांनीं लढाया देऊन सन १७४१ मध्यें चंदासाहेब यास धरून साताऱ्यास आणिलें. पुढें त्रिचनापल्ली किल्ला घेतला. व पुनः सातारा मुक्कामीं आले. बाळाजी बाजीराव यांस रघूजी भोंसले, शंभूसिंग जाधवराव, व फत्तेसिंग भोंसले या तिघांनीं आपल्यास पेशवाई न मिळण्याबद्दल खटपट केली असली पाहिजे असा संशय आल्यावरून, पुनः शंभुसिंग जाधवराव यांच्यांशीं बाळाजी बाजीराव पेशवे यांची चुरस लागली. रघूजी भोंसले सेनासाहेब सुभे हे पेशव्यांच्या अगदीं उघड विरुद्ध होते व यावेळीं शाहूमहाराज हे वृद्ध झाले असून, त्यांस पुत्र नसल्यानें पुढें राज्यास अधिकारी कोणी नव्हता. अशी संधि पाहून रघूजी भोंसले व फत्तेसिंग भोंसले अक्कलकोटकर, या दोघांनीं आपल्यास राज्य मिळावें म्हणून खटपट चालविली. ताराबाईसाहेब यावेळीं हयात असून, त्यांनीं प्रतिनिधि शंभुसिंग जाधवराव यांस आपल्या विचारांत घेतलें. बाळाजी बाजीरावही महाराजांचे पश्चात् आपणास पूर्ण स्वतंत्र राज्यकारभार मिळावा अशा खटपटींत होतेच. यावेळीं चिमणाजी आप्पाही वारले होते. त्यायोगें पेशव्यांची बाजू थोडी लंगडी होती. तथापि त्यांच्यावर महाराजांचा पूर्ण विश्वास असल्यानें बाकीच्या लोकांचें कांहीं एक चालत नसे. शंभुसिंग, फत्तेसिंग, रघूजी भोंसले व प्रतिनिधि या सरदारांस साताराचे दरबारांतून नाहींसें करून टाकण्याची त्यांची खटपट चालू होती. पुष्कळ वेळां या सरदारांस मोठमोठीं अवघड लढाईचीं कामें सांगून त्यांचा तिकडे नाश व्हावा, अशी युक्ति बाळाजी बाजीराव योजीत असत; परंतु तें बाह्यात्कारी दाखवीत नसत. विरुद्ध पक्षाची मंडळी शूर असल्यानें त्यांचें कोणतेंही कृत्य चाललें नाहीं. बाळाजी बाजीराव यांचें वजन हे चार सरदार मुळींच ठेवीत नसत. शंभुसिंग जाधवराव हे हल्लीं सातारा व मालेगांवीं राहत असत.

महाराज यांस शिकारीचा फार नाद होता, असें वर सांगितलेंच आहे. एक वाघ राजगडचे किल्ल्याचे जंगलांत होता. तो माणसांवर सवकला असून, मावळांतील बरींच गांवें त्याच्या धास्तीनें उठून गेलीं होतीं. महाराजांनीं पुष्कळ सरदारांस या वाघावर जाण्याबद्दल आज्ञा केली; परंतु कोणी त्याचेकडे लक्ष दिलें नाहीं. बाळाजी बाजीराव यानीं महाराज यांस असें सुचविलें कीं, शंभूसिंग जाधवराव हे आपले पदरीं मोठे शूर आहेत. त्यांस ह्या वाघावर पाठवावें. तेव्हां त्यांनीं सर्व सरदार लोक दरबारांत बोलावून शंभूसिंग जाधवराव यांस वाघावर जाण्याविषयीं आज्ञा केली. त्याजवरून मी आपले हाताखालील सरदारांस पाठवितों, असें त्यांनीं कळविलें. परंतु महाराजांनीं बाळाजीनीं सुचविल्याप्रमाणें—'तुम्हींच वाघावर गेलें पाहिजे व वाघ तलवारीनें मारला पाहिजे.' असा हुकूम दिला. शंभुसिंगास हा हुकूम फार वाईट वाटला.

कारण यापेक्षां मोठें काम आपणास शोभण्यासारखें असून, हें हलकें काम सांगितलें असें त्यांस वाटलें.

शंभूसिंग हे हातांत तलवार घेत नसत. त्यांची तलवार नेहमीं हुजऱ्याजवळ असावयाची व प्रसंगीं ती त्याजवळून ते घेत असत. दुसरे दिवशीं शंभूसिंगांची वाघावर जाण्याची तयारी झाली. तेव्हां त्यांच्या बरोबर जाणारे हुजरे यांस बाळाजी बाजीरावांनीं एकांतीं बोलावून नेऊन, तुम्हीं तलवारीचा सळ ( म्यान बांधण्याचा बंद ) न सोडतां म्यानासुद्धां तलवार आयत्या वेळीं शंभूसिंगाच्या हवालीं करावी, म्हणजे तुम्हां प्रत्येकास आम्हीं एक लाख रुपये देऊं, असें सांगून त्या लोकांस फोडलें.

दुसरे दिवशीं शंभूसिंग वरील दोन हुजऱ्यांनिशीं वाघावर गेले. पुढें वाघाची हेरी ( सुगावा ) आल्यावर ज्या जाळींत वाघ होता, तेथें हे गेले. माणसाचा वास आल्याबरोबर वाघ जाळींतून बाहेर धांवून आला. त्यासरसें शंभुसिंग यांनीं मागें हुजऱ्याकडे पाहिलें, तों हुजऱ्यानें तलवारीच्या म्यानाचा सळ न सोडतां, तलवार बंदम्यानासुद्धां हवालीं केली. म्यान काढण्यास शंभुसिंग यांस यावेळीं अवसर नव्हता. वाघ आतां आपणास ठार मारणार असें पाहून त्यांनीं म्यानासुद्धां तलवारीचा वार वाघावर केला. त्याबरोबर म्यान तुटून गेलें व त्यांनीं पुन्हां वार करून वाघाची गर्दन उडवून दिली व पाठीमागें फिरून दोन्ही हुजऱ्यांचीं मुंडकीं तोडून टाकिलीं. याप्रमाणें त्यांजवरील यावेळचा अपघात चुकला. ही कारवाई पेशव्यांची असावी, असें त्यांना समजून आलें. तेव्हां त्यांनीं अशी शपथ घेतली कीं, “ जो जाधवरावाच्या वंशांतील असेल त्यानें आपल्या तलवारीचे म्यानास सळ बांधूं नये. ” ही वहिवाट आज तारखेपर्यंत या घराण्यांत चालू आहे. असो; वाघ ठार केल्यानंतर शंभुसिंग शाहूमहाराजांस भेटले व झालेली हकीकत त्यांस कळविली. महाराजांनीं दिलगिरी प्रदर्शित केली. पुढें शंभूसिंग साताऱ्यास कामानिमित्त जाऊं लागले व नेहमीं पुढें मालेगांवासच राहूं लागले. शाहूमहाराज सन १७४९ त वारले. त्यावेळीं शंभूसिंग यांनीं ताराबाईचा पक्ष उचलून धरला. परंतु बाळाजी बाजीराव यांस सकवारबाईचा बाप, तिचा भाऊ, शिर्के, होळकर व शिंदे हे मिळाल्यामुळें, व त्यानीं ताराबाईला राज्यांत मोठा कारभार देऊं असें वचन दिल्यामुळें, तो बेत फसला. असो. शंभूसिंग यांचें यावेळीं उतारवय होत चाललें हात; सबब महाराज वारल्यानंतर ते कोणत्याही स्वारींत गेले नाहींत. नेहमीं मालेगांवीं रहात असत. त्यांस दोन चिरंजीव होते. वडील रायसिंग बाबासाहेब व धाकटे अमरसिंग बाबासाहेब. संस्थानचें काम व लष्करचें काम अमरसिंग बाबासाहेब पहात असत. व शंभूसिंगाचे तर्फे पानपतचे लढाईमध्यें अमरसिंग बाबासाहेब हजर होते. त्यांची हकीकत पुढें देऊं. याप्रमाणें शंभूसिंगांनीं मोठमोठीं कामें करून सन १७६०।६१ चे सुमारास मालेगांव येथें देह विसर्जन केला.

**गुण**—शंभुसिंग जाधवराव यांचा स्वभाव तापट असून शूरत्वाविषयीं त्यांची कमालच होती. महाराज, त्यांचें शूरत्व पाहून त्यांस वाघ म्हणत असत. त्यांचें शरीर फार बळकट असून उंच व धिप्पाड होतें. ते दिसण्यांत सुंदर होते, मुत्सद्देगिरींतही ते कमी नव्हते. मोंगलाईतून आपला भाऊ चंद्रसेन जाधवराव यांचेकडून आल्यापासून, साताराचे राज्यांत त्यांनीं अनेक उलाढाली केल्या व मोठमोठ्या लढाया मारल्या. आपलें वजन सातारचे दरबारीं पुष्कळ वाढवून मोठा सरंजाम मिळविला. पेशव्यांस त्यांनीं कधीं दाद दिली नाहीं व जुमानलें नाहीं. असो. शंभूसिंग वारल्यानंतर मालेगांवकर घराण्याला थोडीथोडी उतरती कळा येऊं लागली. त्याचें वर्णन पुढें देऊं. शंभूसिंगांपासूनच मालेगांव हें जाधवराव घराण्याचें वसतिस्थान झालें. तें आज तारखेपर्यंत कायम आहे. याप्रमाणें या पुरुषाची कारकीर्द संपली.

---

## अमरसिंग जाधवराव यांचें वर्णन.

(इ० सन १७६१ पासून इ० स० १८१६ इ० पर्यंत)

शंभुसिंग जाधवराव यांस पुत्र दोन. वडील रायसिंग, धाकटे अमरसिंग. जाधवराव बंधु हे उभयतां एकत्रपणानें तीर्थरूपाचे वेळचा सरंजाम फौज वगैरेचा बंदोबस्त ठेवून होते. रायसिंग जाधवराव हे स्वभावानें उग्र असून, शूरत्वाचे वगैरे कामीं त्यांच्या आंगीं अविचारीपणा फार होता. आणि त्यांजला संततीही नव्हती. यामुळें त्यांचे विचारें अमरसिंग यांचें नांव

सरदारींत दाखल होऊन इनामी व सरंजामी उत्पन्न त्यांचे नांवें पेशवे यांचे कारकिर्दीत बाळाजी बाजीराव यांनीं चालविलें. पुढें अमरसिंग यांनीं वहुत वेळीं सरकारचीं कामकाजें केलीं तीं:—

शंभुसिंग सन १७६० चे सुमारें मरण पावले. शंभुसिंग यांजला पूर्वी शाहूमहाराज छत्रपति यांनीं जहागिर व मोकासे, स्वराज्य व मोंगलाईंतील महाल वगैरे दिले होते. (त्याचा तपशील मागें शंभुसिंग यांच्या कारकीर्दीत दिला आहे;) त्याचें उत्पन्न शंभुसिंगाचे कारकीर्दीचे अखेरपर्यंत चाललें. पुढें शंभुसिंग मृत्यु पावतांच बाळाजी बाजीराव यांनीं विनाकारण पूर्वीची तेढ मनांत आणून सदरी उत्पन्नांतून वहुतेक कमी केलें. तें वजा जातां, बाकी उत्पन्न अमरसिंग जाधवराव यांचे नांवें कायम ठेवून, महालानिहाय ताकीद व दुमालपत्रें वगैरे दिलीं, तें उत्पन्न तपशीलवार—

१४००० परगणे पाथरी
४००० परगणे शेळगांव
५४०० परगणे कलबर्गे निमे
७०८० परगणे आष्टी
५५०० परगणे गुंजोटी
१००० परगणे कोसरी
९२४ परगणे चिकले पाटोदे
७०० परगणे रासीन
८०० गांव पैकीं केडवळीत
३००० गांव पैकीं आवर
बी तपशील.
११२४ परगणे पांगरी निमे
१८०० परगणे बार्शी
९८१० परगणे झरे
१००० परगणे जिऊरी
३००० परगणे परळी
१४९७॥=। फुटगांव परगणे सुपें व पुणें पैकीं
१८०० मालेगांव कर्यात बारामती याची सनद पूर्वी झाल्याचें नमूद आहे.

त्यांचें दुमालपत्र सन १७६० इसवी सालीं म्हणजे सुरुसन इहिदे सीतैन मया व अलफ सन ११७० छ २९ माहे जमादिलावल रोजीं झालें. त्यांतील हशील मौजे मालेगांव बुद्रूक कर्यात बारामती हा गांव जहागिरी व मोकासा बाबती देखील सरदेशमुखी कुलबाब कुलकान्हू दरोबस्त शंभूसिंग जाधवराव यांजकडे इनाम आहे. ते मृत्यू पावले, याजकरितां त्यांचे पुत्र राजश्री अमरसिंग जाधवराव यांजकडे इनाम करून दिला असे. तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन आमद सुरळीत देणें म्हणून मौजे मजकूरचे मोकदमास पेशवे सरकारची ताकीद व याप्रमाणेंच दुमालपत्र; तें येथें लिहावें तर कागदपत्र नाहींत. जुने दप्तरीं शोध करितां ताकीदीची नकल सांपडली ती नमुद केली.

## सुभे वेदरपैकीं.

७००० परगणें वेंमगल. १०००० परगणें पलीम.
५०० कसवें विसाद. २५०० कसवें सावरगांव.

८२३५५॥=॥

येणेंप्रमाणें अमरसिंग जाधवराव यांजकडे वडिलार्जित उत्पन्नापैकीं चालविलें असे. तें घेऊन पेशवे यांचे कारकीर्दीत उपयोग केले.

अमरसिंग जाधवराव हे आपले वडील शंभूसिंग हयात असतांनाच पुणें येथें आपले १५० स्वारांचें पथक घेऊन पेशव्यांच्या दरबारीं राहूं लागले. शंभूसिंग यांस ही गोष्ट आवडली नाहीं. परंतु यावेळीं शंभूसिंग अगदीं वृद्ध झाले होते व अमरसिंग हे आतां कर्तेसवरते झाले असून, संस्थानचा कारभार तेच पहात होते. बाळाजी बाजीराव पेशवे यांचें व शंभूसिंगाचें अत्यंत वांकडें होतें. परंतु अमरसिंग जाधवराव यांनीं पेशव्यांशीं सलोखा करण्याचा यत्न केला व पेशव्यांच्या मर्जीप्रमाणें पुण्यास राहून पेशव्यांची मर्जी संपादन करूं लागले. कारण यावेळीं सातारचे राजे नामशेष झाले असून, त्यांच्यांत कांहीं राम राहिला नव्हता व अमरसिंग जाधवराव या कर्त्या पुरुषास आपली कर्तबगारी दाखविण्यास पुण्याच्या पेशव्यांचे दरबाराखेरीज जागा राहिली नव्हती. असो.

सन १७५१ पासून म्हणजे शाहू महाराज वारल्यानंतर, शंभुसिंग हे मालेगांवींच राहूं लागले. इकडे बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं सकवारबाई राणीसाहेब यांस सती घालवून सर्व मराठ्यांचें राज्य आपले ताब्यांत घेतलें. त्यामुळें सर्व मराठे सरदार पेशव्यांच्या सहजच अंकित झाले. त्याप्रमाणें अमरसिंग यांसही पेशव्यांचे अंकित होणें भाग पडलें. अमरसिंग

बाबासाहेब यांनीं ( यांस बाबासाहेब असें म्हणत असत. ) उदगीर व सिंदखेडचे लढाईंत मोठें शौर्य करून नांव लौकिक मिळविला व याप्रमाणें सन १७६० पर्यंत सरकारची चांगल्या तऱ्हेनें नोकरी बजाविली. त्यामुळें पेशव्यांचें लक्ष्य त्यांजवर बरेंच बसलें. तथापि शंभूसिंग वारल्यानंतर जो मुलूख पेशव्यांनीं खालसा केला, तो त्यांस परत देण्यांत आला नाहीं.

सन १७६०-६१ मध्यें उत्तरहिंदुस्थानांत अहमदशहा अबदाली येऊन दिल्लीचें राज्य घेण्याच्या विचारांत होता. त्याजबरोबर दत्ताजी व जनकोजी शिंदे आणि मल्हारराव होळकर हे तिघे सरदार लढत होते. शिंद्याचा पराभव झाल्याची वार्ता पुण्यास आली त्यामुळें, नानासाहेब पेशव्यांनीं सदाशिवरावभाऊ व आपला मुलगा विश्वासराव यांबरोबर मोठें सैन्य देऊन उत्तर हिंदुस्थानांत रवाना केलें. मराठ्यांच्या इतिहासांत पानपतची लढाई म्हणून ज्या प्रसिद्ध लढाईचें वर्णन दिलें आहे, तीच ही स्वारी होय.

यावेळीं मराठ्यांच्या जरीपटक्याखालीं सर्व लहान मोठे सरदार व मानकरी जमून पानपतावर गेले. ग्रँटडफ साहेब यांनीं आपले इतिहासांत पान ६०६ व ६०७ यामध्यें कोणकोण सरदार व मानकरी लोक या स्वारींत हजर होते, त्याचें वर्णन दिलें आहे. यावेळीं अमरसिंग बाबासाहेब यांस स्वारीवर पाठवूं नये अशाबद्दल शंभूसिंग यानीं फार खटपट केली, परंतु अमरसिंग हे आपल्या वडिलांस न विचारतां भाऊ साहेबांबरोबर सोनपत पानपतच्या स्वारीवर गेले. ही बातमी मालेगांव येथें बरेच दिवसांनीं शंभूसिंग यांस कळली, त्यांस ( शंभूसिंगांस ) आह्मीं गेल्याचें कळवूं नये, असें आपल्या दरबारचे मंडळीस त्यांनीं सांगून ठेविलें होतें. परंतु हुजरे लोकांतून ही गोष्ट शंभूसिंग यांस कळल्यावर त्यांनीं सदाशिवराव भाऊ यांस अमरसिंग बाबासाहेब यास परत पाठविण्याबद्दल पत्र लिहिलें, त्यावेळीं या स्वारीचा मुक्काम सिरोंज येथें होता, त्या पत्राचें उत्तर खालीं लिहिल्याप्रमाणें आलें.

॥ श्री ॥

राजश्री शंभूसिंग जाधवराव गोसावी यांसी

उ सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री सदाशिव चिमणाजी अशिर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. शरीरीं समाधान वाटत नाहीं. याकरितां अमरसिंग जाधवराव यास आज्ञा देऊन पाठवावें. म्हणून लिहिलें तें कळलें. ऐसीयास आम्ही अबदालीच्या पारपत्यास मजल दरमजल जात आहों नांव नांवाचे उमदे सरदार जवळ असले पाहिजेत; याकरितां मशारनिल्हे यांस पाठविलें नाहीं. आपण आपले आरोग्यतेचें लिहून पाठवावें. प्रस्तुत आम्ही दरकूच सिरोंजपर्यंत आलो. पुढें केकरीस जाऊं. कळावें म्हणून लिहिलें असे. रवाना छ ९७ माहे रमजान बहुत काय लिहिणें हे विनंती.







याप्रमाणें शंभुसिंग यांस सदाशिवरावभाऊनीं पत्र पाठविलें आहे; व पानपतच्या स्वारींत अमरसिंग जाधवरावांसारखे नामांकित सरदार आमचेबरोबर पाहिजेत असें म्हटलें आहे. सदाशिवरावभाऊ यांनीं पुण्याहून निघतांना सर्व लहान मोठे सरदार लोक यांस बोलावून आणून त्यांस विनंती केली कीं, आपण पेशव्यांनीं केलेले अन्याय विसरून जावे व ज्यांचे

सरंजाम, * जहागिरी खालीं केल्या होत्या त्यांसही वचन दिलें कीं, तेथून आल्यावर त्या तुमचे तुम्हांस परत करून देऊं; अशा रीतीनें त्यांचें समाधान केलें.

याप्रमाणें सर्व सरदार लोकांचा गौरव करून सदाशिवराव भाऊ हे सर्व † ९६ कुळांतील मराठे सरदार आपले बरोबर घेऊन गेले. असो.

या स्वारीचा वृत्तांत ग्रांट डफ वगैरे मराठ्यांच्या इतिहासांमधून दिला आहे. ही स्वारी दिल्लीस पोहोंचल्यानंतर लौकरच सोनपत पानपत येथें तुंबळ युद्ध झालें, व तींत हजारों रणशूर मराठे मरून गेले. त्याजबद्दल दुःखकारक वृत्तांत येथें देण्याचें कारण नाहीं. ज्या वेळीं विश्वासराव पेशवे हे ठार होऊन अंबारींत पडले, त्या वेळीं त्यांचा हत्ती गिलच्यांच्या फौजेनें अडवून नेऊन अवदालीनें आपल्या ताब्यांत घेतला. त्यावेळीं उमरगिर गोसावी यांचें साह्य घेऊन अमरसिंग बाबासाहेब यांनीं आपले टोळीसह गिलच्यांवर हल्ला करून विश्वासरावाचे मुडद्यासुद्धां हत्ती आपले स्वाधीन करून घेतला, व त्या मुडद्याचें संरक्षण मोठ्या शौर्यानें केलें. पुढें या वरील गोसाव्याचे स्वाधीन हत्ती करून मराठ्यांचा मोड झाल्यामुळें अमरसिंग बाबा यांस निघून जाणें प्राप्त झालें. सदाशिवरावभाऊ यांची स्त्री पार्वतीबाई वगैरे स्त्रियांना अमरसिंग बाबा यांनीं होळकरांच्या मदतीनें बचावून, ते पुढें नानासाहेब पेशवे ह्या वेळीं नर्मदेवर आले होते, त्यांस येऊन मिळाले व त्या सर्व बाया त्यांच्या स्वाधीन करून झाला वृत्तांत सांगितला; अमरसिंग बाबासाहेब यांनीं गोसाव्याचें सोंग धारण केलें होतें. याप्रमाणें पेशव्यांच्या स्त्रियांचें संरक्षण करून आपल्या जिवाची पर्वा न धरितां विश्वासराव यांस मदत केली, व हिंदुधर्माप्रमाणें त्याचें प्रेत शत्रूपासून लढून घेऊन त्यास दहन करण्याची तजवीज उमरगिरकडून पानपत येथेंच करविली. याप्रमाणें या स्वारीचा हृदयद्रावक शेवट झाला, परंतु मालेगांवीं अमरसिंग बाबासाहेब स्वारीवर असतांनाच त्यांचे वडील शंभुसिंग वारले. ह्या पिता–पुत्रांची गांठ देखील पडली नाहीं. ज्यावेळीं अमरसिंग बाबासाहेब स्वारीवर जाणार असें ठरलें, त्यावेळींच शंभुसिंग यांची प्रकृति चांगली नव्हती व आपण स्वारीवर गेलों असतां आपले वडिलांची गांठ पडेल कीं काय याचा भरंवसाही त्यांस नव्हता, एवढेंच नव्हे, तर सिरोंज मुक्कामीं सदाशिवरावभाऊ यांस 'अमरसिंग बाबा यांना रवाना करावें' म्हणून त्यांच्या वृद्ध पित्याचें पत्र आलें असतांना व या वेळीं शंभुसिंग यांची प्रकृति अत्यंत बिघडली असून अंतःकाळ समीप आला आहे असें अमरसिंग यांस कळून चुकलें असून व हिंदुधर्माप्रमाणें आपले वडिलांचे मरणसमयीं आपण सन्निध असणें हा पुत्रधर्म आहे हें जाणत असून, त्यांनीं आपल्या वडिलांच्या आलेल्या पत्राकडे दुर्लक्ष केलें. अमरसिंग बाबासाहेब यांनीं राष्ट्रकार्याकरितां कुटुंबांतील मंडळीच्या मोहाकडे लक्ष न देतां ते आपला जीव देण्यास तयार झाले. पानपत येथें सर्व मराठ्यांनीं राष्ट्रकार्याकरितां जीव देण्याचा संकल्प केला असता, तर मराठ्यांस त्यावेळीं यशही मिळालें असतें. ब्राह्मण सरदारांची अरेरावी व राष्ट्रकार्याच्यावेळीं वृद्ध व अनुभवी माणसांची सल्लामसलत न ऐकल्यामुळेंच मराठ्यांस भयंकर टोला बसला. होळकरासारख्या, वृद्ध व अनुभवी सरदारांनीं मानापमान विसरून जर ह्या राष्ट्रकार्यास निरपेक्षपणें मदत केली असती, तर एवढा राष्ट्रकार्याचा नाश झाला नसता. शिंदे, इब्राइमखान गारदी व खानदानीचे जुने मराठे सरदार लोक मात्र आपल्या वचनापासून च्युत झाले नाहींत. अपेशाचा वांटा सदाशिवरावभाऊकडेही बराच येत आहे, याचें कारण त्यांचा चढेल स्वभाव हा होय. असो; नानासाहेब पेशव्यांसह अमरसिंगबाबा पुण्यास येऊन दाखल झाले. पुढें

---

*( पहा सदाशिवरावभाऊंची बखर पान ८६ ).

† ह्या स्वारीमध्यें बहुतेक सर्व मराठे सरदार होते. मे. आकर्थ साहेब यांनीं 'इतिहास प्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे' या नावांचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्या पुस्तकामध्यें, मराठे व दुराणी यांमध्यें पानिपत येथें जी लढाई झाली तीवरील पोवाडा प्रसिद्ध झालेला आहे. तो, मालेगांवकर जाधवराव यांनीं लढाईतून परत आल्यानंतर, तेथील कची हकीकत, सोनवडी ता. भिमथडी येथील पाटील कादरसाहेब यांस सांगितली आणि तीवरून त्यांनीं पोवाडा तयार केला. असें लिहिलेलें आहे. पहा फूटनोट, इ. प्र. पु. व स्त्रि. पोवाडे भाग दुसरा पृ. ८७.

नानासाहेब पेशवे लवकरच पर्वती येथें मरण पावले, व अमरसिंग बावासाहेब हे मालेगांवीं जाऊन तेथें त्यांनीं आपल्या बापाची उत्तरक्रिया केली.

शंभूसिंग जाधवराव वारल्यावर, अमरसिंग बावासाहेब यांचे नांवें सरंजामाच्या सनदा झाल्या, परंतु शंभूसिंग जाधवराव यांजकडे जें उत्पन्न चालत होतें तेवढें न चालवितां पुष्कळ उत्पन्न खालसा केलें. या घराण्याशीं पेशव्यांचें अतिशय वांकडें असल्यामुळें ही गोष्ट घडली. असो. वर लिहिल्याप्रमाणें अमरसिंग जाधवराव यांजकडे ८२३५५ ॥।≈॥. रुपयांच्या सरंजामाच्या सनदा होण्यापूर्वी सदाशिवरावभाऊ यांनीं उत्पन्न कोणाचें कमी करणार नाहीं व आहे त्यापेक्षां वाढवून देऊं असें वचन दिलें असतां व पानपतच्या लढाईमध्यें बावासाहेबांनीं मोठें शौर्याचें काम केलें असतांना देखील पेशव्यांनीं या गोष्टीचा विचार केला नाहीं व उलट संस्थानचें उत्पन्न पुष्कळ कमी केलें. पुढें संस्थानाचा बंदोबस्त करून बावासाहेब पुण्यास राहूं लागले. माधवराव पेशवे व निजामअल्ली यांची कांहीं तेढ आल्यावरून पेशवे व मोंगल यांच्यामध्यें लढाई उपस्थित झाली. ही लढाई राक्षसभुवनची होय. या लढाईत माधवराव बल्लाळ पेशवे यांस यश मिळालें. यावेळीं अमरसिंग बावासाहेब यांनीं पेशव्यांस उत्तम तऱ्हेनें मदत केली. त्यामुळें पेशव्यांनीं तुंगाव परगणे गुंजूटी हा गांव दरोबस्त इनाम करून दिला. यावेळीं निजामाचे तर्फे राजा रामचंद्र जाधवराव, अमरसिंग जाधवराव यांचे चुलत भाऊ हे लढत होते.

सन १७७० इसवीचे सुमारें फत्तरगडावर अबदालीशीं पेशवे यांनीं पूर्वी पानपतचे लढाईत जरीपटका व साहेब नौबद वगैरे भूषणें गेलीं तीं परत आणण्याकरितां लढाई केली. त्यासमयीं अमरसिंग जाधवराव यांनीं फार शौर्य केलें आणि शिकस्त करून अबदालीपासून भूषणें परत घेतलीं.

सन १७८७ इसवीचे सुमारें, पेशवे यांनीं बदामीचा किल्ला घेतला. हल्ला चढवितेवेळीं अमरसिंग जाधवराव यांनीं प्रथमतः जाऊन किल्ला सर केला.

स्वारीहून परत आल्यावर पेशवे यांजवळ अमरसिंग बावासाहेब यांनीं काशीयात्रा करण्याविषयीं परवानगी मागितली. त्याप्रमाणें परवानगी मिळून यात्रेचे तयारीकरितां ते मालेगांवीं आले. मालेगांवीं विश्रांतीचे वेळांमध्यें त्यांनीं नवा वाडा बांधण्यास सुरवात केली. पूर्वी शंभूसिंग यानीं कविले ठेवण्यास वाडा वगैरे न बांधतां तेथील पाटलाची एक जुनी गढी होती, तींतच ते रहात असत. ती गढी अद्याप असून मोडकळीस आली आहे. नवा वाडा बांधण्याचें काम सुरू झालें. कांहीं दिवस स्वतःचे नजरेखालीं काम चालू होतें. हा वाडा चुनेगच्ची संगी दगडांचा बांधला असून त्याचा तट फार मजबूत आहे. तो किल्लेवजा बांधला आहे. प्रसंग पडल्यास लढाई देण्याचीही त्यांत तजवीज केली आहे.

या वाड्यास सुमारें १॥ लाख रुपये खर्च झाले. आंतील इमारत मजबूत असून, कांहीं ठिकाणीं सागाच्या लाकडांचा उपयोग केला आहे. हा वाडा दुमजली बांधला असून, वर रंगमहाल, दिवाणखाने वगैरे बांधलेले होते. परंतु हल्लीं वरील मजले पडून गेले आहेत. वाडाही कांहीं ठिकाणीं नादुरुस्त होत चालला आहे. असो. याप्रमाणें वाड्याचें काम चालू असतांना काशी यात्रेची तयारी पूर्ण झाली. त्यावेळीं काशीला जाणें फार दुर्घट होतें. सबब पेशवे यांजकडून ५०० घोडेस्वारांची तुकडी बरोबर घेतली व आपले जवळच्या अरबांचा हत्यारबंद बेडा सुमारें २०० लोकांचा व स्वतःचे पथकांतील १५० स्वार, हत्ती, पालख्या, म्याने, निशाण, डंका, जरीपटका, वाद्य, सिंगाडे, भालदार, चोपदार, हरकारे, जासूद वगैरे लवाजमा घेतला. शिवाय सर्व जनानखान्याच्या खाशा स्वाऱ्या त्यांच्या दासदासी व मानकरणी ह्याही बरोबर होत्या, स्वतःबरोबर भले लोक, मानकरी, कारभारी, कारकून, उपाध्ये, शास्त्री, पुराणिक, हुजरे, शागिर्दपेशा वगैरे मंडळी घेतली होती. शिवाय कारखान्यापैकीं जामदारखाना, देवघर व दप्तर हे कारखाने घेतले होते, ओझ्यास उष्टरखाना घेतला असोन मोदीखाना फरासखाना, भांडीं वगैरे सामान घेतलें होतें. मालेगांवांतील महाजन, शेटसावकार व सुखवस्तु लोकही यात्रेस बरोबर निघाले. बारामतींतील निम्मे लोकही त्यांबरोबर यात्रेकरितां निघाले. त्यांत प्रसिद्ध मोरोपंत कवि हे पुराणिकांमध्यें घेण्यांत आले होते. या स्वारीबरोबर नोकर चाकर लष्करी लवाजमा

व इतर सुखवस्तु गृहस्थ मिळून सुमारें २५०० मंडळी काशी-यात्रेस निघाली, त्यावेळीं मोठा सरदार किंवा श्रीमान् मनुष्य यात्रेस निघाला. म्हणजे त्याजबरोबर आसपासचे सुखवस्तु लोक त्याचे आश्रयानें यात्रेस निघत असत. एवढ्या मनुष्यांस रस्त्यानें अन्नसामुग्री पुरविण्याकरितां बाजार घेतला होता, दुध दह्याकरितां गाईचीं खिल्लारें घेतलीं होतीं, एवढेंच नव्हे तर बाळंतिणीच्या सोईचें सामान सुद्धां घेतलें होतें. याप्रमाणें सर्व तयारी होऊन स्वारी काशी-यात्रेस निघाली. या स्वारीस सुमारें दोन अडीच वर्षे लागणारीं होतीं; म्हणून मागील संस्थानाचें काम त्या वेळच्या कारभाऱ्यावर सोंपवून निघाले, त्यांत वाडा पुरा करण्याचें हीं काम सोंपविलें होतें. आपल्या गैरहजेरींत पथकाचें काम दत्तक चिरंजीव शंभुसिंग ऊर्फ खासेमहाराज यांजकडे सोंपविलें होतें. या दत्तकाबद्दल थोडीशी माहिती मिळते ती खालीं लिहिल्याप्रमाणें :—

पूर्वी सांगितलेंच आहे कीं, धनसिंग जाधवराव यांस तीन मुलगे होते. वडील सुजनसिंह ऊर्फ संताजी, मधले चंद्रसेन, धाकटे शंभूसिंग. पैकीं चंद्रसेन यांनीं मोंगलाईत जाऊन मोठा मुलूख मिळविला. त्याची राजधानी भालकी हें शहर होतें. याबद्दलचा सर्व वृत्तांत पूर्वींच येऊन गेला आहे. शंभूसिंग यांनीं मालेगांव संस्थान कसें संपादन केलें, याहीबद्दलचा वृत्तांत दिला आहे. बाकी राहिलेल्यापैकीं धनसिंग जाधवरावांचे वडील चिरंजीव संताजी यांचा वृत्तांत येथें देऊन टाकूं, म्हणजे या घराण्यांच्या तिन्ही शाखांचा वृत्तांत वाचकांस पूर्ण समजून येईल. संताजी जाधवराव हे व्यसनी असून बापाच्या कह्यांत वागत नव्हते, म्हणोन त्यांच्या वडिलांनीं मिळविलेलें सर्व उत्पन्न वडीस पुत्रास ( सुजन सिंहास ) देऊन टाकिलें. ह्या उत्पन्नाची माहिती धनसिंग जाधवराव यांच्या कारकीर्दींत दिलीच आहे. या मिळकतीचा दरसालचा वसूल ४०००० च्या वर होता. चंद्रसेन जाधवराव हे शाहू महाराज यांशीं भांडून मोंगलाईत गेले तेव्हां संताजी* जाधवराव यांस महाराजांनीं सेनापती पदाचीं वस्त्रें, व सरंजाम यांच्या सनदा करून दिल्या. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं सेनापतीपद खंडेराव दाभाडे यांस देण्यांत आलें. तथापि संताजी जाधवराव महाराजांजवळ नेहमीं असत, संताजी जाधवराव यांस एक मुलगा झाला, त्याचें नांव धनसिंग, हे नेहेमीं बोरगांवी व मांडवें येथें रहात असत, त्यांना उदसिंग नांवाचा मुलगा होता, उदसिंग यांस दोन मुलें झालीं, सुरसिंग व खासे महाराज; खासेमहाराज यांस अमरसिंग बावासाहेब यांनीं दत्तक घेतलें व त्याचें नांव शंभूसिंग असें ठेविलें, ह्यामुळें उदसिंगाच्या धाकट्या मुलाचा वंश बोरगांवकडे राहिला नाहीं. त्यांचा वडील मुलगा सुरसिंग यास खंडेराव आप्पासाहेब नांवाचा मुलगा होता. याचे कारकीर्दीचे अखेरपर्यंत देशमुखी उत्पन्न व मोकास बाब जें धनसिंग जाधवरावांनीं मिळविलें होतें तें सर्व चाललें होतें. परंतु सातारचे श्री. छत्रपति बोवासाहेब महाराज यांचें व खंडेराव अप्पासाहेब यांचे एका घोड्यावरून वांकडें आल्यामुळें तें सर्व उत्पन्न त्यांनीं खालसा केलें, यामुळें बोरगांवचे घराणें अत्यंत खालावून धुळीस मिळालें. ज्या घराण्याचा पूर्वज धनसिंग जाधवरावासारखा नामांकित योद्धा होता, व ज्यानें मराठेशाही, संकटकाळीं आपल्या अचाट शौर्यानें संरक्षण केली, त्यांच्या घराण्यांतील एका वडील शाखेस असें दैन्य यावें यापेक्षां त्या घराण्याचें दुर्दैव कोणतें! असो, खंडेराव अप्पा यास एकंदर तीन मुलें होतीं, नवलसिंग भाऊसिंग व नानासाहेब, या नवलसिंगानें बापाच्या वेळची इस्टेट घेऊन मांडवें येथें जें वडिलार्जित पाटीलकी व देशमुखीचें उत्पन्न होतें तें घेऊन तो निर्वाह करूं लागला. त्यास दोन मुलें झालीं.नारायणराव व बाजीराव;हे दोघेही हल्लीं वारले असून या उभयतांस मुलें आहेत. भाऊसिंग यास माधवसिंग नांवाचा मुलगा झाला, त्यास खाशाबा, धनसिंग आणि रामसिंग अशीं तीन मुलें होतीं. पैकीं खाशाबा यांस मालेगांव संस्थानास दत्तक दिलें, तेच हल्लींचे मालेगांवचे सरंजामदार होत.

धनसिंग सुमारें १० वर्षांपूर्वी मरण पावले. त्यांस मुलीं आहेत. रामसिंग हा हल्लीं बोरगांवीं असोन पाटीलकी व मोकाशाचें शेष राहिलेलें उत्पन्न उपभोगित आहे; त्यास जयसिंगराव नांवाचा मुलगा आहे, तो मालेगांवीं असतो; खंडेराव आप्पाचा तिसरा मुलगा नानासाहेब हा ग्वाल्हेरीस जाऊन

*( थोरले शाहूमहाराज यांचें चरित्र पान २४ पहा )

तिकडेच मरण पावला. त्यास बाळाजीराव नांवाचा एक मुलगा होता, तो आतां वारला. त्यास मुलेंबाळें आहेत. याप्रमाणें या वडील शाखेचा वृत्तांत आहे.

बाबासाहेब हे सन १७८८।८९ सालीं काशीयात्रेस निघाले. प्रत्येक मुक्कामास अतीथी अभ्यागतांसाठीं सदावर्त ठेविलें होतें. ते नाशिक, पुणतांबें हीं दक्षिणेंतलीं तीर्थें करून प्रयागहून काशी येथें गेले. काशीला सुमारें ६ महिने मुक्काम होता, दानधर्म वगैरे पुष्कळ करण्यांत आला. ज्या दिवशीं तीर्थविधी केला, त्या दिवशीं प्रसिद्ध मोरोपंत कवि यांनीं गंगेच्या व अमरसिंग बाबासाहेब यांच्या दरम्यान आपण वकील आहों असें कल्पून गंगेस अमरसिंग बाबासाहेब यांचे तर्फे 'गंगे अमरसिंग यांस मुलगा दे' अशी विनंति केली आहे. त्या विनंतीबद्दल पंतांनीं आर्या केली ती 'गंगवकिली' नांवाच्या पंतांच्या काव्यांत छापून प्रसिद्ध झाली आहे. ( रा० लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं 'मोरोपंताचे वेंचे' या नांवाचें पुस्तक केलें आहे तें पहा. ) त्यांतील ४० वी आर्या खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

जो अमरसिंह जाधव या धवल प्राज्य यश असें मातें।
तोकहि लोक हितावह दे जें शिवभक्तिच्या रसें मातें॥

पंतांनीं 'गंगावकिली'मध्यें हरिपंत फडके, नानाफडणवीस, माधवराव पेशवे, व अमरसिंग जाधवराव अशा तत्कालीन थोर लोकांच्या विनंत्या व नमस्कार गंगेस सांगितले आहेत. यावरून तत्कालीन सरदारांमध्यें अमरसिंग बाबासाहेब यांचें मोठें वजन होतें व त्यांस पेशवे चांगल्या तऱ्हेनें मान देत होते, असें पंतांच्या वरील आर्येवरून स्पष्ट होत आहे अमरसिंग बाबासाहेब यांची कीर्ति सर्वत्र झाली असून, ती निष्कलंक आहे. असें पंतांनीं आपल्या आर्येंत स्पष्ट म्हटलें आहे. मोरोपंतांसारख्या निःस्पृह साधूनें आणि कवीनें वरील स्तुतिपर उद्गार काढले आहेत, त्यावरून बाबासाहेब यांची योग्यता केवढी होती व मोरोपंतकवी या घराण्यास कसे मान देत होते, हें स्पष्ट होत आहे. मोरोपंत मोठे भगवत्भक्त असून कवित्व करण्याविषयीं मोठे प्रसिद्ध होते, कवित्वाविषयीं अद्याप त्यांची कीर्ती सर्व महाराष्ट्रभर पसरून राहिली आहे. मोरोपंतानीं आपल्या निःस्पृह, स्पष्ट व रसाळ वाणीनें प्रत्यक्ष परमेश्वरास आळवून आपलेंसें केलें व तत्कालीन व अर्वाचीन महाराष्ट्रजनांवर आपली छाप बसवून दिली. महाराष्ट्रांत असा एकही मनुष्य नाहीं कीं, तो मोरोपंतांची आर्या ऐकून मान डोलविणार नाहीं. मोरोपंत निःस्पृह व स्पष्ट खरें बोलणारा साधु होता. हें महाराष्ट्रांतील सर्व लोकांस मान्य आहे व पूर्वी अथवा हल्लीं त्यांविरुद्ध एकही मनुष्य ब्र काढणारा मिळाला नाहीं व मिळावयाचा नाहीं. पंतांच्या स्पष्ट व खरें बोलण्याबद्दल उदाहरणार्थ त्यांनीं केलेली आणखी एक आर्या देऊं, ती अशी.

त्रिभुवन राज्य प्रभुचें प्रतिनिधीनें त्वां स्वहस्तगत केलें॥
भोळ्या दिगंबराचें आक्रमिलें वतन जल जसें तैलें॥ ३९॥

**अन्वय**—त्वां प्रतिनिधीनें प्रभुचें त्रिभुवन राज्य स्वहस्तगत केलें. जसें तैलें जळ ( आक्रमिलें ) तैसें भोळ्या दिगंबराचें वतन आक्रमिलें.

**अर्थ**—त्वां प्रतिनिधीनें ( बाळाजीपंत पेशवे यानें ) प्रभूचें ( शाहूमहाराज छत्रपति यांचें ) त्रिभुवन राज्य ( सार्वभौम राज्य ) स्वहस्तगत केलें. आपले स्वाधीन करून घेतलें. ) जसें तैलें जळ आक्रमिलें ( जसें तेल पाण्यावर टाकलें असतां सर्व पाणी तें आक्रमण करितें. ) तसें ( तसें ) तूं भोळ्या दिगंबराचें ( भोळ्या शाहू छत्रपतींचें ) वतन आक्रमिलें ( राज्य घेतलें. )

आम्हीं चंद्रसेनाची कारकीर्द लिहितांना बाळाजीपंत पेशव्यानीं सकवारबाई राणीसाहेब यांस सती घालवून राज्य आपले ताब्यांत घेतलें असें लिहिलें आहे, त्यास या पंतोक्तीनें जास्त पुष्टि येत आहे. ग्रांट डफ साहेबसुद्धां याच बाजूचे आहेत. "ग्रांट डफ साहेब हे परदेशस्थ असल्यानें त्यांना मराठ्यांच्या इतिहासाचें रहस्य चांगलें समजलें नसावें." असें कित्येक कोंकणस्थ ब्राह्मण इतिहासकार विधान करितात, व बाळाजीनें निरपेक्ष बुद्धीनें शाहूमहाराजांचे हुकूमावरून आपले ताब्यांत राज्य घेतलें असें म्हणतात; परंतु बाळाजीपंताच्या कारकीर्दीपासून हयात असलेला व बऱ्याच पेशव्यांच्या कारकीर्दी पाहिलेला मोरोपंतासारखा निःस्पृह साधु देखील पेशव्यांनीं लबाडी केली, असें साफ म्हणत आहे. त्यावरून ग्रांट डफ साहेब व सरदेसाई यांचें म्हणणें अगदीं सयुक्तिक आहे, असें स्पष्ट दिसतें.

अमरसिंग बाबा साहेब यांचा तीर्थविधी आटोपल्यावर एके दिवशीं काशींतील एक तेजःपुंज गोसावी त्यांजकडे भेटण्यास आला. त्यास अमरसिंग बाबासाहेब यांनीं नमस्कार करून त्याचा आदरसत्कार केला. त्यानें त्यांस धर्माविषयीं बराच उपदेश केला, व बाबासाहेबांची परवानगी घेतांना त्यानें आपले जवळ असलेलें उत्कृष्ट सुचिन्हयुक्त भवानी शंकराचें लिंग त्यांस दाखविलें. त्यावर हें लिंग आपणांस देण्याबद्दल त्यांनीं गोसाव्यास विनंति केली. परंतु गोसाव्यानें मी हें देणार नाहीं असें साफ सांगितलें. बाबासाहेब यांनीं कळविलें कीं, आपणास याबद्दल मी एक लाख रुपये दक्षिणा देतों. परंतु गोसाव्यानें तें ही नाकारलें. नंतर बाबासाहेब यांनीं पहारेवाल्यास या गोसाव्यास जाऊं देऊं नये, अशी ताकीद दिली. व आम्हीं हा बाण घेणारच, असें गोसाव्यास आग्रहानें सांगितलें. गोसाव्यानें बाबासाहेब यांची निष्ठा पाहून कांहीं एक न घेतां बाण त्यांचे स्वाधीन केला, व जाण्यास परवानगी मागितली. बाबासाहेब यांनीं गोसाव्याचा आदरसत्कार करून त्याची पादपूजा केली व गौरवानें त्यास जाण्यास परवानगी दिली. पुढें चौकीपहारे ओलांडून जाऊन देवडीचे बाहेर तो गुप्त झाला. तें पहारेवाल्यानें पाहून बाबासाहेब यांस तसें कळविलें. त्यावरून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर कांहीं दिवसांनीं काशीहून कूच करून मथुरा, वृंदावन वगैरें तीर्थें करून ते परत दक्षिणेंत आले. येतांना इंदूर येथें अहिल्याबाई होळकरीण व करोली येथें यादवांचें एक घराणें आहे, त्यांजकडून आमंत्रण आल्यावरून त्या उभयतांस भेटले. त्यांचा त्या दोघांनीं आदरसत्कार केला व तेथील कांहीं उत्तम जिनसा त्यांस दिल्या. त्या आणलेल्या जिनसा संस्थान जप्त होईपर्यंत श्री. संभुसिंगजी यांच्या ताब्यांत होत्या. जप्त झाल्यावर त्या लोकांनीं अस्ताव्यस्त केल्या. नंतर पुण्यास येऊन पेशव्यांना भागिर्थीचें स्नान घातलें व मोठ्या समारंभानें मावंदें केलें. ही गोष्ट सन १७९०चे सुमारास झाली.

मालेगांवीं बाबासाहेब आले तेव्हां वाड्याचें काम समाप्त झालें होतें. गांवाच्या बाहेरच्या बाजूला जेथें शंभुसिंग जाधवराव यांस दहन करण्यांत आलें, त्या ठिकाणीं भवानी–शंकराचें देवालय बांधण्यास सुरवात केली. हें देवालय अत्यंत मजबूत बांधलें असून, प्रसिद्ध मालेगांव पणदारे, येथील दगडांचें बांधिलें आहे. त्या देवालयास १ लक्ष रुपये खर्च झाले. देवालय फार पाहण्यासारखें आहे. बारामतीचें सिद्धेश्वराचें देवालय व हें देवालय एकाच कारागिराच्या नजरेखालीं बांधलें असून, नमुनाही सारखाच आहे. याच्या पुढील नंदी फार प्रेक्षणीय आहे. या नंदीस १०००० वर खर्च आला. देवालयाचें काम संपल्यावर काशीहून आणलेले भवानी–शंकराचे बाणाचा शिवरात्रीचा उत्सव मोठ्या प्रमाणावर सुरू केला. पूर्वी शिवरात्रीचा उत्सव—देवघरांत गौरीशंकर नांवाचा एक लहान बाण आहे, त्याचा थोडक्या प्रमाणावर करित असत. तो या सालापासून मोठ्या प्रमाणावर सुरू करून त्यास सुमारें दरसाल ५००० वर खर्च करूं लागले. याच सालीं बाबासाहेब यांनीं वडगांवचे निंबाळकरांची कन्या ताईसाहेब इच्याशीं विवाह केला. कारण त्यांनीं बोरगांवकरांचे घराण्यांतील घेतलेला दत्तकपुत्र शंभुसिंग ऊर्फ खासेमहाराज हे नुकतेच वारले, त्यांस एक मुलगा रामचंद्र जाधवराव नांवाचा लहान होता. सदर मुलगा तान्हा असल्यानें कारकून, कारभारी वगैरे मंडळींनीं मूल लहान आहे, त्याचा काय भरंवसा, सबब आपण मुलाकरितां पुनः विवाह करावा अशी सल्ला दिली. या वेळीं बाबासाहेब यांचें वय ५०।६० चे दरम्यान होतें. विवाह केल्यानंतर थोडक्याच दिवसांत पेशव्याकडून पुण्यास बोलावणें आलें. त्यावरून बाबासाहेब तेथें गेले. या वेळीं पेशव्याची स्वारी टिपू सुलतान याजवर जाण्याच्या तयारींत होती. त्या स्वारीबरोबर बाबासाहेब आपलें पथक घेऊन गेले. मोंगलांकडून फौजेसह राजे रामचंद्र जाधवराव यांचे थोरले चिरंजीव खासेबाबा होते. पुढें टिपूबरोबर लढाई झाली, तींत खासे जाधवराव हे पडले. तेव्हां त्यांचें कुटुंब राजसबाई हिनें दोहों सैन्यांचे मध्यें आपल्या भ्रताराचें शरीर घेऊन सहगमन केलें. तेव्हां सर्वत्रांस मोठा चमत्कार वाटला. तेसमयीं अमरसिंग जाधवराव यांस फार दुःख वाटलें. कारण खासे जाधवराव हे त्यांचे पुतणे होते.

स्वारीहून परत आल्यावर बाबासाहेब आपल्या नवीन कुटुंबासह पुत्रप्राप्तीकरितां शिखर शिंगणापूर

येथील महादेवास वाऱ्या करूं लागले. हें शिखर सिंघणापूरचें देवालय जाधवरावांचेच घराण्यांतील सिंघण यादव यांनीं बांधिलें व जवळच सिंघणापूर गांव वसविलें. त्याचा वृत्तांत आरंभीं दिलाच आहे. महादेवाचे जंगलामध्यें टाकीवाडींत धनगर जातीचा एक साधु पुरुष रहात असे. त्याला बायको वगैरे कोणी नसून फक्त एक मुलगी होती. त्याचा नित्य क्रम टाकेवाडी येथील लिंगाचें अर्चन करून गाईची सेवा करणें हा होता. त्याजवळ सुमारें ५०० उत्तम गाईंचा कळप होता. ह्या जंगलामध्यें तो त्या गाई चारून त्यांचें संरक्षण करीत असे. ही गोष्ट बाबासाहेब यांस कळल्यावरून ते त्या साधूच्या नादीं लागले. या साधूस महादेवबुवा म्हणत असत. तो साधु आपला सगळा वेळ जंगलांत घालवित असे व जंगलांतच एकादे शिळेवर निजत असे, अन्नपाणी न खातां गाईचे दुधावर निर्वाह करी. याप्रमाणें शंकरावर त्याची निष्ठा पाहून बाबासाहेबही त्याजबरोबर राहूं लागले. टाकेवाडीचे जंगलामध्यें बाबासाहेब यांनीं आपला तंबू दिला व आपण आपल्या कुटुंबासह साधूच्या सन्निध एक वर्षभर राहिले. साधू जिकडे जाई, त्याचे पाठोपाठ हे असत, याप्रमाणें वर्तनक्रम चालला असतां त्या साधु पुरुषानें मला त्रास देऊं नको असें सांगितलें. त्यावरून बाबासाहेबांनीं उत्तर दिलें कीं, मला मूलबाळ नसल्याकारणानें आपल्या सेवेंत माझें व माझ्या कुटुंबाचें आयुष्य घालविण्याचा माझा निश्चय आहे. त्यांची निष्ठा पाहून साधूनें आशिर्वाद दिला कीं, तुला पुत्र होईल, परंतु तुझें कुटुंब पुत्र झाल्याबरोबर मरण पावेल. नंतर बाबासाहेब कुटुंबासह लिंगासन्निध टाकेवाडी येथें येऊन राहिले. वर्ष सहा महिने गेल्यानंतर साधूचे म्हणण्याप्रमाणें त्यांचें कुटुंब गरोदर राहिलें. पुढें नऊ महिने झाल्यानंतर तेथेंच बाळंत होऊन त्यांस पुत्ररत्न झालें व इकडे बाबासाहेब यांचें कुटुंबही वारलें.

याप्रमाणें बाबासाहेब यांस एका गोष्टीनें दुःख व दुसरे गोष्टीनें हर्ष झाला. कुटुंबास दहन वगैरे करून उत्तरक्रिया केली. नंतर सुतकांतून मोकळे झाल्यावर त्यांनीं आपल्या मुलाचें जातकर्म, नामकर्म वगैरे विधि केला व मोठा समारंभ करून शर्करा वांटली. देवांना रुद्राभिषेक केले. मुलाची आई वारल्याकारणानें त्यास वर सांगितलेली साधूची मुलगी हिनें पाजून त्याचा संभाळ केला. मुलाचें नांव रत्नसिंग ठेविलें. मुलगा एक वर्षाचा झाल्यानंतर बाबासाहेब मुलासह मालेगांवीं आले. बाबासाहेब यांनीं महादेवबुवाचे मुलीस तिनें मुलास पाजल्याबद्दल मालेगांव येथें इनाम जमीन दिली, ती अद्यापपर्यंत चालत आहे. ते वृद्ध जाहल्यामुळें मालेगांवींच राहूं लागले व पथकाचें काम त्यांचा राखी पुत्र गमाजी दाजी ऊर्फ गुमानसिंग जाधव याजकडे सांगितलें.

सन १७९५ इसवीचे सुमारें पेशव्यांची व निजामअल्ली या उभयतांची खरडें मुक्कामीं लढाई झाली. तींत निजामाचा पराभव होऊन तह झाला. तींत मशरूरमुल्क हे निजामाचे दिवाण ओलीस घेऊन पेशवे पुण्यास आले. नंतर दिवाणाशीं तहाचें बोलणें सुरू असतां माधवराव नारायण पेशवे हे सन १७९६ इसवीच्या सुमारें उडी टाकून मरण पावले. तेव्हां निजामाकडील तह सिद्धीस न जातां मशरूरमुलकास निरोप देणें नाना फडणविसांस भाग आलें. निजामाचे दिवाण यांची रवानगी पुण्याहून करेतसमयीं पेशवे यांनीं सिरपावसंबंधीं कांहीं उत्पन्न स्वराज्य अमलापैकीं दिलें. त्यांत अमरसिंग जाधवराव यांचे उत्पन्नापैकीं अठरा हजार आठशें चौऱ्याहत्तर बेरजेचा मुलूख मोकासा सिरपावाचे देणगीस लागून गेला. त्याजबद्दल अमरसिंगांनीं तजवीज करावी, तों राज्यांत गलबला होऊन बाजीराव पेशवे व नाना फडणवीस यांचें अंतःकरण एकमेकांविषयीं शुद्ध नसल्यामुळें, नानांचे चित्ताची स्थिरता नव्हती. तथापि अमरसिंग जाधवराव यांनीं आपलें म्हणणें वकीलद्वारा नानास कळविलें. त्यावर त्यांनीं असें सांगितलें कीं, तूर्त याचा विचार होत नाहीं. उत्पन्न गेलें तर तुम्हांकडील स्वारांपैकीं पंचवीस स्वार तूर्त कमी करून बाकी स्वारांनिशीं नोकरी करावी. ही गडबड निवारण झाली म्हणजे तुमचें उत्पन्न सोडवून देऊं, अगर त्याचे मोबदला दुसरें उत्पन्न देऊं. नंतर कमी केलेले स्वार भरून पूर्ववत् नोकरी करीत जावी. मुलूख गेला त्याचा तपशीलः—

सुरुसन सबा तिसेन मया व अलफ सन १२०५ फसली सन १७९६ इसवी सुमारें.

७००० परगणे बेंमगल.
१०००० परगणे पालीम.
११२४ परगणे पांगरी.
७५० परगणे चकल पाटोदे गांवें अडीच अकार ९२४ पैकीं १७४ चीं वहीवाट असोन बाकी.

१८८७४

एकूण अठरा हजार आठशें चवऱ्याहत्तर रुपये वजा जातां बाकी उत्पन्न पेशवाई अखेर चाललें त्याचा तपशील.

| | |
|---|---|
| १४००० | परगणे पाथरी. |
| ४००० | परगणे शेळगांव. |
| ५४०० | परगणे कलवर्गे. |
| ९८१० | परगणे झरी. |
| १४९७॥।≈॥ | फुटगांव परगणें सुपें व पुणें पैकीं. |
| ७०० | परगणे रासीन. |
| ३००० | गांव परगणे आंवड |
| १७४ | चकले पाटोदे नऊशें चोवीस पैकीं. |
| ७००० | परगणे आष्टी. |
| ५५०० | परगणे गुंजोटी. |
| १८०० | परगणे बारसी. |
| ३००० | परगणे परळी. |
| १००० | परगणे कौसरी. |
| ८०० | गांव पैकीं कडे वळीत. |
| १८०० | मालेगांव कर्यात बारामती. |
| ५०० | कसबे विसाद. |
| २५०० | सावरगांव. |
| १००० | परगणे जिऊरी. |

६३४८१॥।≈॥.

येणेंप्रमाणें उत्पन्न, वहिवाटीस होतें. पुढें अमरसिंग जाधवराव हे शके १७३९ चैत्र वद्य १० सन १८१७ इसवींत मालेगांव येथें मृत्यू पावले. त्यांस चिरंजीव दोन.

**गुण.**—राजा अमरसिंग यांचा बांधा उंच व बळकट असा होता. त्यांच्या शक्तीची तारीफ अशी सांगतात कीं, कृष्णानदीमध्यें पोहत असतांना त्यांना एका मगरानें गांठिलें. परंतु आपले ताकदीचे जोरावर तें मगरासुद्धां नदीच्या कडेस पोंहत आले. इतक्यांत नदीच्या कडेवरील त्यांच्या मानकरी लोकांनीं गोळी घालून मगरास ठार केलें. ह्यावरून त्यांची केवढी शक्ति होती हें लक्षांत येईल. ते घोड्यावर बसण्यांत फार पटाईत असून निशाणही चांगलें मारीत असत. यांनीं आपले कारकीर्दींत मोठमोठे पराक्रम करून आपले आंगचें शौर्य प्रगट केलें. हे स्वभावानें शांत, मनमिळाऊ व थोर असे होते. त्यांना शिवभक्तीचा नाद असून ते फार धार्मिक होते. मोठमोठे शास्त्री व पुराणिक हेही त्यांच्या पदरीं असत. त्यांस वेद-पुराणें ऐकण्याचा नाद होता. ते स्वतः शाक्तमार्गी असून शाक्तमार्गांतील मुख्य गुरु यज्ञेश्वर श्रोतीं म्हणून काशींतील नाणावलेले मोठे विद्वान् शास्त्री होते त्यांस आपल्याबरोबर घेऊन आले होते. त्यांस हल्लीं मालेगांव येथें इनाम आहे. हल्लीं त्यांचें वास्तव्य पुणें येथें आहे.

## राजे रतनसिंग जाधवराव.

इ. स. १८१७ पासून इ. स. १८७६ पर्यंत.

मागील भागामध्ये सांगितलें आहे कीं, राजे अमरसिंग यांस दोन चिरंजीव होते. एक दत्तक चिरंजीव शंभूसिंग व दुसरे राजे रतनसिंग, हे औरस; दत्तक चिरंजीव शंभूसिंग वारल्यावर राजे रतनसिंग औरस म्हणून पेशवे सरकारांतून त्यांचे नांवें संस्थान होऊन वर लिहिलेल्या ६३ हजारांच्या सरंजामांच्या सनदा मिळाल्या. ते आपल्या वडिलांप्रमाणें पेशव्यांच्या दरबारीं नोकरी करीत असत. त्यांचे वडील हयात असतांना, गुमानसिंग नांवाचा दासीपुत्र जो नोकरी करित होता, तो राजे रतनसिंग यांस शिरजोर झाला होता. परंतु ते वारल्यावर राजे रतनसिंग व गुमानसिंग यांचा एके दिवशीं तंटा होऊन त्यास रतनसिंगानें ठार मारिलें. अर्थात् सरदारीला हक्क सांगणारा आतां कोणी राहिला नाहीं, म्हणून निष्कंटक होऊन ते सरदारीचा उपभोग घेऊं लागले.

शके १७३९ (सन १८१७ इसवी) सालीं पेशवे आणि इंग्रजसरकार यांची लढाई झाली. तींत बाजीराव रघुनाथ पेशवे हे पुण्याची गादी सोडून निघाले. नंतर पेशवे आणि इंग्रज यांचा तह झाला. त्यावरून पेशवे ब्रह्मावर्तास गेले. इकडे दक्षिणेंतील सरदार पेशव्यांच्या समागमें होते, ते माघारे फिरले, त्यांत राजे रतनसिंग जाधवराव हे होते. ते समयीं म्हणजे पेशवाई अखेर रतनसिंग जाधवराव यांजकडे उत्पन्न चालू होतें, त्याचा तपशीलः—

| | |
|---|---|
| १४००० | परगणे पाथरी |
| ४००० | परगणे शेळगांव |
| ५४०० | परगणे कलबुर्गे |
| ७००० | परगणे आष्टी |
| ५५०० | परगणे गुंजोटी |
| १००० | परगणे कोसरी |
| १७४ | परगणे चकलेपावेदे |
| ७०० | परगणे रांशीन |
| ८०० | गांव परगणे कडेवळीत |
| ३००० | गांव परगणे आंबड |
| १८०० | मालेगांव कर्यात बारामती |
| १८०० | परगणे बारसी |
| ९८१० | परगणे सेरी |
| १००० | परगणे जिंतुरी |
| ३००० | परगणे परळी |
| १४९७॥।≈॥ | फुटगांव परगणे सुपे व पुण प० |
| ५०० | कसबे विसाद |
| २५०० | सावरगांव |
| ६३४८१॥।≈॥. | |

सदर उत्पन्न शाहूमहाराजांपासून (इ० स० १६७४ ते इ० स० १८१८) इंग्रज सरकारचा अंमल सुरू होईपर्यंत १४४ वर्षे सतत सारखें चालू राहिलें. पुढें इंग्रज सरकारचा अंमल झाल्यावर, सरदारांकडील चाकरीची माफी होऊन, फौजेचा सरंजाम होता तो खालसा केला; व जात सरंजाम मात्र ज्याचा त्याकडे ठेविला. परंतु यावेळीं जाधवराव यांचा ठराव बरोबर झाला नाहीं. कारण अमरसिंग जाधवराव यांचे कारकीर्दीत अव्वल उत्पन्न रु. ८२३५५॥।≈॥ सरंजामादाखल घेऊन शंभर स्वारानिशीं नोकरी करावी; असें ठरलेलें असतां, इ. स. १७९६ सालीं जी खर्ड्याची लढाई झाली ती झाल्यानंतर, मोंगलांकडील दिवाणास परत जातेवेळीं पेशव्यांनीं जो मुलूख दिला, त्यांत १८८७४ रुपये उत्पन्नाचा जाधवरावांचा मुलूख देण्यांत आला. ह्या गोष्टीबद्दल पेशवे सरकारांत कळवितां, पेशव्यांचा असा हुकूम जाहला कीं, आपलें जें उत्पन्न गेलें आहे, त्याबद्दल पंचवीस स्वार कमी करून पंचाहत्तर स्वारांनिशीं शिल्लक उत्पन्नावर नोकरी करावी. हा प्रकार घडल्यामुळें सदर १८८७४ रुपये वजा-जातां बाकी उत्पन्न ६३४८१॥।≈॥ राहिलें, हें उत्पन्न घेऊन पंचाहत्तर स्वारांनिशीं पेशवाईअखेरपर्यंत जाधवराव नोकरी करीत आले. पुढें अव्वल इंग्रज सरकारचे अंमलांत फौजेचा सरंजाम खालसा करणेचा ठराव झाला, त्यावेळीं, पंचाहत्तर स्वारांचा आकार, दरमहा दर स्वारास २५ रुपये प्रमाणें, एकंदर बारा महिन्यांचा आकार रुपये २२५०० वजा करून निव्वळ जात सरंजाम रुपये ४०९८१॥।≈॥ असतां, मेहेरबान लॉर्ड एलफिन्स्टन साहेब बहादुर यांनीं पूर्वींच्या ठरावावर लक्ष न देतां, सदर उत्पन्नापैकीं, सरंजाम कमाल आकार रु. ६२५० येतात. त्याचा कमाल आकार वर लिहिल्याप्रमाणें वजा जातां बाकी ३२३८४ रुपये मिळावे पण सरकारांतून तसें न होतां, राजे रतनसिंग जाधवराव यांस सालीना दहा हजाराची तहाहयात पेनशन हंगाम सरंजाम मोबदला म्हणून देण्याचें ठरलें. ही पेनशन देतेवेळीं, सरकारांनीं पूर्वीचे वहिवाटीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, असें स्पष्ट दिसत आहे; ही पेनशनीची रक्कम पुणें खजिन्यामधून मिळत असते.

सदर उत्पन्न वहिवाटीप्रमाणें वंशपरंपरा चालविणें योग्य होतें; परंतु निजाम सरकाराबरोबर इंग्रज सरकारचा जो तह झाला, त्यांत जाधवराव यांचें उत्पन्न अमलाबद्दल माफीकडे दिलें, त्यामुळें इलाज नाहीं. या उत्पन्नापैकीं, आंबड या एका तालुक्याचा मोकासा चालू आहे. तें वंशपरंपरा चालविण्याबाबद हरदो कमिशनर म्हणजे इंग्रज सरकारांकडून मेहेरबान बॅरो हेलबर्ट एलीस साहेब बहादूर कमिशनर व नवाब सरकाराकडून मेहेरबान चिंतामणराव मनसबदार या उभयतांनीं चौकशी केली, व हें उत्पन्न राजे रतनसिंग

जाधवराव यांचे वंशपरंपरा चालविण्यासारखें आहे, असें समजून, तारीख ३० माहे एप्रिल सन १८५१ इसवी रोजीं सनद दिली, तींत लष्कर चलनी आकार रुपये ३७९२ हे इंग्रज सरकाराकडून वंशपरंपरा घेण्याविषयीं ठराव केला. हें उत्पन्न जाधवराव यांचे हातीं असतें, तर सरकारांनींही वंशपरंपरा सहज करून दिलें असतें.

शके १७७० फाल्गुन शुद्ध १३ रोजीं, श्री० राजे रतनसिंग जाधवराव यांचे चिरंजीव राजे अमरसिंग जाधवराव यांचा जन्म झाला. त्यावेळीं पुत्रोत्साहाचे आनंदाची शर्करा, थैली, पत्रासह साहेब लोकांकडे पाठविली.

कैलासवासी धनाजी जाधवराव सेनापति, राजे चंद्रसेन जाधवराव, शंभुसिंग जाधवराव व अमरसिंग जाधवराव यांचे वेळीं, शाहू महाराजांपासून पेशवाईपर्यंत जाधवराव यांस जीं उत्पन्नें मिळालीं, त्यांबद्दल विस्तार मागें लिहिलाच आहे; तेव्हांपासून जे लोक पदरीं होते त्यांनीं अनेक लढायांमध्यें, शूरत्व गाजविलें व इमानानें नोकरी केली. तेव्हां त्यांपैकीं जे युद्धांत पडले त्यांच्या कुटुंबाचा खर्च चालविणें राजे रतनसिंग जाधवराव यांस अवश्य असल्यामुळें, पूर्वीपासून कर्जदारी वागविणें जरूर पडत असे; पुढें उत्पन्न कमी झालें त्यामुळें तर कर्जदारी बरीच वाढली; सबब सरकारांत जाहीर केल्यावरून सन १८६३ मध्यें नामदार ऑनरेबल सर बार्टल फ्रियर साहेब बहादूर गव्हरनर यांनीं दयाळुपणानें कर्जमुक्त होण्याकरितां, राजेसाहेब यांस साठ हजार रुपये ( Advance ) दिले. ही सरकारची मोठी मेहेरबानी झाली; पूर्वी छत्रपति यांनीं राजेसाहेब यांचे पूर्वजांस सेनापति वगैरे पदें देऊन गौरविलें, त्या त्या पुरुषांनीं त्यांचे मोठे आभार मानून, त्यांच्या उपकारांचें पुढें स्मरण रहावें एतदर्थ जें जें वर्तमान घडलें तें तें इतिहासांत लिहून ठेविलें. ज्याप्रमाणें त्यांचें वर्तमान लिहिलें त्याप्रमाणेंच इंग्रज सरकारांनींही जो मोठा उपकार केला तोही, राजेसाहेबांच्या पुढील वंशजांनीं लक्षांत ध्यावा म्हणून इतिहासांत लिहून ठेविला आहे.

रामचंद्र जाधवराव यांच्या सून लक्ष्मीबाई साहेब जाधव, या मोंगलाईंत भालकीचे संस्थानीं होत्या म्हणून लिहिलें आहे. पुढें लक्ष्मीबाई जाधव या अमरसिंग जाधवराव यांचे भेटीस गेल्या आणि त्यांनीं निजामअल्ली याचा दत्तक घेण्याविषयीं झालेला हुकूम कळविला. त्यावर अमरसिंग यांनीं बाईस सांगितलें कीं, दत्तक घेण्यासारखें येथें कोणी नाहीं, त्यावरून बाई भालकी येथें जाऊन राहिल्या व तेथेंच कांहीं दिवसांनीं मरण पावल्या.

लक्ष्मीबाई मरण पावल्या त्यावेळीं त्या वाड्यांत जाधवराव यांचे नोकर राहात असत. त्यांत जाधवराव यांचा जामदारही राहात होता. तो ज्यावेळीं मयत झाला, त्यावेळीं हा जहागीरदाराचा जामदार तेव्हां याजवळ अवश्य संग्रह असला पाहिजे म्हणून त्याच्या जिनगीचा, दुसरे जहागिरदार यांनीं तपास केला. तेव्हां तो ज्याठिकाणीं रहात असे त्याजागीं तळघर आढळलें. त्या तळघराचीं दारें मोकळीं करून तपास करितां, जवाहीर व हत्ती घोडे यांचें जडावाचे सरंजाम तसेंच मनुष्यांचे दागदागिने आणि सोनेरुप्यांचीं भांडीं असा अदमासें तीस चाळीस लक्षांचा माल सांपडला. त्यावेळीं जामदाराची स्त्री व पदरचीं माणसें यांनीं तिकडील जहागिरदारांस कळविलें कीं, हा माल रामचंद्रराव जाधव यांचा आहे; त्यावरून त्यांनीं पुढें चौकशी न करितां त्या मालावर जप्ती ठेविली. ही हकीकत राजे रतनसिंग जाधवराव यांस कळतांच त्यांनीं आपले वकील बहिरु आप्पाजी आसलेकर, मौजे शेठफळ हवेली ता. इंदापूर जिल्हा पुणें येथें राहणारे यांजकडून, राजे रामचंद्रराव जाधवराव आमचे चुलते सबब तो माल आम्हांस मिळावा म्हणून, नियमाप्रमाणें वारसाचें सरटिफिकेट घेऊन इंग्रज सरकारांत याद देवविली. तिचा जबाब असा मिळाला कीं, तहखेरीज बहादारीचा मजकूर आहे तर त्याविषयीं निजामसरकारांत यत्न करावा; त्यावरून निजाम सरकारचे हुजुरांत, श्रीनिवास महारुद्र राहणार माणकेश्वर यांस जाधवराव यांनीं वकील म्हणून पाठविलें. त्यांनी हुजूर सुरुनगरावर हुजूर पुनूर नशरुद्दवला नवाब साहेब यांस जाहीर करून अर्ज केला कीं, राजे जाधवराव हे रामचंद्र जाधवराव यांचे पुतणे असून हक्कदार वारस आहेत. शिवाय जाधवराव हे वेळोवेळीं सरकारच्या उपयोगीं पडले आहेत हें हुजूरनें लक्षांत घेऊन योग्य फैसला करावा अशी विनंती आहे. त्याप्रमाणें

विनंती करितांच, हुजूरच्या लक्षांत येऊन त्यांनीं (समक्ष) येण्याविषयीं खलिता पाठविला. खलिता पोहोंचतांच, राजे रतनसिंग जाधवराव हे इंग्रज सरकारची परवानगी घेऊन निघण्याची तयारी करीत आहेत तोंच, नशरुद्दवला हक झाल्याचें वर्तमान समजलें. व नंतर लवकरच १८५७ सालचें बंड उत्पन्न झालें. अर्थात् सर्व बेत रहीत होऊन माल हातास आला नाहीं.

श्रीमंत मुधोजीराव नाईक निंबाळकर देशमुख व जहागीरदार परगणे फलटण, यांजला राजे रतनसिंग जाधवराव यांनीं आपली कन्या आवईसाहेब या देण्याचें निश्चित करून लग्नाचा बेत ठरविला. परंतु कांहीं अयोग्य कारणांनीं, ते लग्न करून घेण्यास नाकबूल झाले. हें लग्न नामंजूर होतांच मोठा वाद झाला. त्यावेळीं मेहेरबान रोस साहेब बहादूर माजी कमिशनर इलाखा सातारा व मेहेरबान रिटिस् साहेब बहादुर रेव्हिन्यू कमिशनर प्रांत दक्षिण भाग या या उभयतांनीं, दोहों पक्षांचा मजकूर समजून घेऊन समजायश व शरीर संबंध घडवून आणिला. त्यावेळीं, बहिरु आप्पाजी वकील यांनीं जाधवराव यांच्या पूर्वजांचा इतिहास लिहिला. (सन १८५५-५६) ह्या आवई साहेबांचें नांव आनंदीबाई निंबाळकर असून त्यांस पुत्र व्यंकटराव नाईक निंबाळकर देशमुख व जहागिरदार परगणे फलटण हे होत.

राइट ऑनरेबल नामदार सर बार्टल फ्रीयर साहेब बाहादूर जंजिरे मुंबई, यांनीं दापोडी येथें पहिलाच दरबार भरवून सर्व सरदार मंडळीस पाचारण केलें होतें. त्यांत राजे रतनसिंग जाधवराव हे ही एक होते. त्या आलेल्या सरदारांपैकीं पहिले प्रतीचे सरदारांच्या घरीं नामदार साहेबांची स्वारी जाफती (मेजवानी) करितां शहरांत आली, त्यावेळीं राजेसाहेबांचें नांव सेकंडक्लास सरदारांत होतें त्यामुळें येण्याचें अवधीवर राहिलें. परंतु नामदार साहेबांच्या मनाचा थोरपणा इतका कांहीं अवर्णनीय होता कीं, त्यांनीं राजे साहेसाहेबांचे सन्मानार्थ मालेगांवीं येऊन त्यांचें अंतःकरण संतुष्ट केलें याउप्पर त्यांनीं राजे साहेबांचें नांव दुसऱ्या प्रतीच्या सरदारांत असल्यानें मातबरीवर नजर देऊन फर्स्टक्लास सरदारांत चढविलें.

नामदार साहेब, यांनीं राजे साहेबांचें नांव फर्स्ट क्लास सरदाराचे पटांत दाखल केलें तें पाहून असें वाटतें कीं, त्यांनीं राजे यांच्या परंपरेच्या खानदानीकडे लक्ष पुरवूनच हा असा गौरव केलेला असला पाहिजे. ह्या प्रकारामुळें नेटिव्ह लोकांत अशी प्रसिद्धी झाली कीं, नामदार साहेब हे पुरातन व खानदानी मंडळींचे विशेष माहितगार असून ते परंपरेकडे लक्ष देत असतात.

ता. ४ माहे आक्टोबर सन १८६४ रोजीं, नामदार साहेब बहादूर यांची स्वारी, गोल्डस् स्मिथ साहेब बहादूर यांचें नांवें बांधावयाच्या धर्मशाळेच्या पायाचा दगड पुरण्याकरितां, कौन्सिलर फ्रीयर साहेब व इतर मोठमोठ्या साहेबलोकांसहित डिकसळ स्टेशनवर आली होती. त्यावेळीं कलेक्टर साहेबांकडून पूर्वीच येण्याविषयीं यादी आल्यावरून, श्री. राजेसाहेब यांची स्वारी मालेगांवाहून मेजवानीच्या सरंजामासहित आली होती, त्यावेळीं परस्पर मेजवान्या होऊन आभार दिग्दर्शन झालें, नंतर धर्मशाळेच्या पायाचा दगड पुरण्याचा समारंभ होतांच, अस्तमानी स्वारी पुण्यास गेली व राजेसाहेब यांची स्वारी मालेगांवांस आली. त्यावेळीं प्रसंग पाहून गाडीमध्यें, बहिरो आप्पाजी वकील यांनीं साहेब मजकुरांस, राजे अमरसिंग जाधवराव यांचें लग्न होणें आहे, म्हणून समजाविलें होतें.

पुढें अमरसिंग जाधवराव यांचे लग्नाकरितां, बहिरो अप्पाजी वकील यांनीं सरकारांतून दहा हजार रुपये मिळण्याविषयीं यादी दिल्या. त्यावरून सरकारांतून दहा हजार रुपयांची ॲडव्हान्स रुपानें मदत करण्यांत येऊन फेब्रुवारी सन १८६४ सालीं अमरसिंग जाधवराव यांचें फलटण मुक्कामीं लग्न झालें.

राजे रतनसिंग जाधवराव यांजकडे जो जातसरंजाम होता, त्याच्या उत्पन्नाच्या वसुलाचा आकार.

१ ठाणें तुगांव परगणे गुंजोटी हा गांव मिळालेला असोन त्याचे वसुलाचा आकार दरसाल २५०० रु०.

२ जि० कलादगी तालुके इंडी येथील इंडी व तांबे ह्या दोन परगण्यांची देशमुखी राजे रतनसिंग जाधवराव यांची असून त्यांची वहिवाट धनाजी जाधवराव यांच्या वेळेपासून आजपर्यंत सतत आहे.

३ पेनशन सरंजाम मोबदला, सालीना चांदवड रुपये दहा हजार याचा बट्टा सुरतीचा आकार ४०६ वजा जातां नक्त रुपये ९५९४ पुणें खजिन्यांतून पावत होते.

४ मौजे मालेगांव खुर्द परगणे सुपें जि० पुणें व मौजे नाथ खुर्द तालुके इंडी जि० कलदगी या हरदो गांवची पाटीलकी आहे.

५ इंग्रज सरकारांतून जात गुजार ठेविलें तें उत्पन्न कमाल आकारणें ८५९७-१४-६ त्या उत्पन्नाचा हल्लीं वसूली आकार होत आहे तो एकंदर ४५३३.

मौजे मालेगांव बुद्रुक तालुके भिमथडी जिल्हा पुणें; येथील वसूली आकार प्रतबंदीप्रमाणें या गांवची रिव्हिजन सर्व्हे झाली आहे त्यांत आकार होईल तो लिहिण्याचा आहे.

७०० परगणे बार्शी, तालुके आळगांव येथील मोकाशाबद्दल आकार व त्याचा वसूल.

३००० परगणे आंबड येथील मोकाशाबद्दल हरदो सरकारचा ठराव झाला, त्याप्रमाणें नक्त लष्कर चलनी ३७९२ रुपये त्याचा बट्टा वजा जातां बाकी कंपनी.

१५०० परगणे राशीन व कडेवळीत पैकीं गांव त्याचा नक्त वसूल, इंग्रज सरकारचे खजिन्यांतून वगैरे तालुके जमखिंडी जिल्हा अहमदनगर येथें पावत आहेत तेः

परगणे सुपें व पुणें पैकीं गांवें आकार एकंदर रुपये १४९७-१४-६ पैकीं, वजा माफीकडे घेतले ते १००० बाकीचा वसूल ४९७-१४-६

तपशील.

१ मौजे नेपत वळण जमीन शेरी १५०

२ मौजे शिरेला व आंजनगांव या दोन्ही गांवचा वसूली आकार सरकारांतून येत आहेत ते १०० मिळून २५०.

एकंदर रक्कम ८५९७-१४-६

६ मौजे उमरगे परगणे गुंजोटी येथील शेटेपणाची वृत्ति;

१८५४४

येणेंप्रमाणें उत्पन्न वसूली येत आहे;

या शिवाय खजिन्यांतून ९५९४ मिळत असलेली रक्कम, २७५४४ रुपये हल्लीं चालू आहे.

राजे रतनसिंग यांस सरंजाम मोबदला म्हणून दहा हजार रुपयांची पेनशन ठरविली होती, ती त्यांच्या हयातीपर्यंत होती; परंतु राजे रतनसिंग यांनीं मुंबई सरकारांत काम चालवून त्या गोष्टीचा निर्णय केला. त्या वेळीं मुंबई सरकारनें असा ठराव केला कीं, राजेसाहेब हयात आहेत तोंपर्यंत त्यांस दहा हजार रुपये व नंतर त्यांतून चौथाई कमी करून शिल्लक रकमेची पेनशन वंशपरंपरा चालू ठेवणें. हा ठराव करून त्या घराण्यावर सरकारनें बहुत उपकार केले आहेत.

रतनसिंग राजे सन १८७६ जून महिन्यांत परलोकवासी झाले. यांस तीन कुटुंबें होतीं. पहिलें वाटारकर निंबाळकर यांची कन्या भवानीबाई, दुसरें रावसाहेब हिंम्मतबहाद्दर कोल्हापुरकर यांची भगिनी रेणुकाबाई व तिसरें पाटणकर फकीरजी साहेब राजे यांची कन्या लक्ष्मीबाई ह्या होत. याच लक्ष्मीबाईसाहेबांचे चिरंजीव अमरसिंग बाबासाहेब हे होत. हे राजे रत्नसिंग निवर्तल्यावर सरंजामाचे मालक जाहले. रत्नसिंग राजे यांस दिवाणी फौजदारीचे अधिकार मिळाले होते. ते फार मानी असून शूर होते. इंग्रज सरकाराबरोबर इ० स० १८१८ मध्यें जी मराठ्यांची शेवटची लढाई झाली, तींत हे मराठ्यांच्या तर्फे लढत होते.

यांस शिकारीचा अत्यंत शोक असून, ते नेहमीं शिकारी कुत्र्यांस घेऊन शिकार करण्यास जंगलांत भटकत फिरत. त्यांचा स्वभाव शांत व दयाळू असून जाधव घराण्याच्या लौकिकास अनुरूप असा होता. मरण समयीं यांचें वय ८० वर्षांचें होतें.

## दुसरे अमरसिंग.

राजे रत्नसिंग हे वारल्यानंतर, त्यांजकडे चालू असलेलें सर्व उत्पन्न, मालेगांव खेरीज करून व चौथाई कमी करून सर्व सरंजाम अमरसिंग बाबासाहेब यांजकडे चालू केला. ह्या वेळीं संस्थानला फार कर्ज होतें. त्यामुळें त्यांनीं, मेहेरबान नॉरमल साहेब कलेक्टर यांचे मार्फत कर्ज फेडण्याकरितां सरकारनें कर्जाऊ रक्कम द्यावी म्हणून मागणी केली. परंतु दुर्दैवेंकरून सरकारांतून ठराव बाहेर येण्यापूर्वीच ते निवर्तले. इ० स० १८७८ मरणसमयीं त्यांचें वय फक्त २८



श्री. राजे रत्नसिंग. जाधवराव. | श्री. राजे कृष्णासिंह. (दादासाहेब) जाधवराव. | श्री. ना. स. राजे शंभुसिंग. जाधवराव-मालेगांवचे राजेसाहेब. | श्री. राजे चंद्रसिंग (भाऊसाहेब) जाधवराव.

वर्षांचें होतें. हे स्वरूपवान् असून फार दयाळु होते. यांचींही एकंदर तीन कुटुंबें होतीं. पहिलें, डेरवण कर भवानजी राजे ऊर्फ बुवासाहेब शिर्के यांची कन्या पार्वतीबाई; दुसरें वजरड्याच्या पिसाळ घराण्यांतील व तिसरें काटे यांच्या घराण्यांतील, ह्याप्रमाणें होतीं.

राजे अमरसिंग निपुत्रिक वारले. सबब त्यांचें वडील कुटुंब पार्वतीबाईसाहेब व त्यांची आई राणी लक्ष्मीबाईसाहेब यांनीं मुंबई सरकारांकडे दत्तक घेण्याबद्दल अर्ज केला. तेव्हां सरकारनें दयाळु होऊन, ह्या घराण्याला दत्तक घेण्यास परवानगी दिली. परवानगी मिळतांच पार्वतीबाईसाहेब व मेहेरबान रीची साहेब कलेक्टर जिल्हा पुणें यांनीं मालेगांवकर यांच्या वडील घराण्यांतील, धनाजी जाधवराव यांच्या वडील मुलाच्या वंशापैकीं हल्लींचे सरंजामदार यांस पसंत करून दत्तक घेतलें. व सरकारनींही त्यास मंजुरी दिली.

---

## शंभुसिंग ऊर्फ तात्यासाहेब.

मे सन १८८१ मध्यें, बारेगांवकर माधवसिंग यांचे चिरंजीव खासेराव यांस पार्वतीबाई यांनीं मांडीवर घेतलें. व त्यांचे पूर्वीचें नांव खासेराव हें बदलून शंभुसिंग असें ठेवण्यांत आलें. त्यावेळीं श्री० शंभुसिंगजी राजे यांची अज्ञानावस्था असल्यामुळें, सरकारनें संस्थानचें सर्व उत्पन्न आपल्या ताब्यांत घेतलें व पुण्याचे कलेक्टर साहेब यांस अॅडमिनिस्ट्रेटर नेमून त्यावेळचे एजंट साहेब मेहेरवान वेडरबर्न साहेब यांस देखरेख ठेवावयास आज्ञा केली. व सरकारनें पूर्वीचे संस्थानास जें कर्ज होतें, तें ८४००० हजार रुपये देऊन संस्थानची एका सालची शिल्लक नजराणा घेऊन या रकमेमधून आदा केलें. श्रीमंत शंभुसिंगजी यांस ज्या सालीं श्रीमंत पार्वतीबाई साहेबांनीं दत्तक घेतलें त्या वेळेपर्यंत त्यांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष देण्यांत आलें नव्हतें, परंतु त्यांस मालेगांव संस्थानचे वारस करण्यांत आल्याबरोबर त्यांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष देण्यांत आलें. त्यांस रा. रा. केशव रामकृष्ण सुखटणकर पुणें शाळा नं० ४ चे हेडमास्तर यांच्या स्वाधीन केलें व त्यांच्या जोडीस रा. रा. गोविंद वामन पुंडे यांसही नेमण्यांत आलें. हे दोन्ही शिक्षक मालेगांव संस्थानचे आश्रित असून त्यांस तेथें इनाम जमिनी देण्यांत आल्या आहेत. राजे शंभुसिंगजी यांच्या बाराव्या वर्षी त्यांच्या खऱ्या शिक्षणासंबंधानें शिक्षकांनीं एवढी मेहनत घेतली कीं, एक वर्षामध्यें त्यांजकडून चार इयत्ता पूर्ण करून घेतल्या. त्यांच्या वयाच्या १४ वर्षानंतर–मराठी सहा इयत्ता संपूर्ण झाल्यावर त्यांस पुणें हायस्कूलमध्यें इंग्रजीचा अभ्यास करण्याकरितां पाठविण्यांत आलें. त्या वेळीं हायस्कूलचे हेड मास्तर रा. वामन आबाजी मोडक हे होते. पुढें एक वर्षाच्या अंतरानें त्यांजवर एक दुःखकारक प्रसंग ओढवला. त्यांचें पुत्रवत् पालन करणाऱ्या पार्वतीबाईसाहेब निवर्तल्या. त्या वेळीं राजे शंभुसिंग यांस फारच दुःख झालें. त्याच वर्षी त्यांचें लग्न ठरविण्यांत आलें. प्रसिद्ध गायकवाड घराण्यांतील खंडेरावमहाराजांचे धाकटे बंधु व मल्हारराव महाराजांहून वडील आनंदरावमहाराज यांच्या नातीबरोबर श्री. शंभुशिंगजी यांचा इ० स० १८८२ मध्यें बडोदें येथें श्री० सयाजीराव गायकवाडांसमक्ष विवाह झाला. या वेळीं राजे शंभुसिंग यांचें वय १६ वर्षांचें होतें. व इंग्रजी तिसऱ्या इयत्तेचा अभ्यास सुरू होता. या वेळीं हेडमास्तर रा. माधव मोरेश्वर कुंटे हे होते. इ० स० १८८९ सालीं यांचा अभ्यास म्याट्रिकपर्यंत होतांच रा. कुंटे यांनीं राजेसाहेबांचा अभ्यास पूर्णझाल्याबद्दल सरकारामध्यें रिपोर्ट केला. त्यावरून त्यांस सरकारांनीं कृपाळू होऊन मालेगांव संस्थानची जहागीर देऊन सर्व उत्पन्न ताब्यांत दिलें. संस्थानचा अधिकार प्राप्त होतांच राजेसाहेब आपल्या कुटुंबानिशीं मालेगांवींच येऊन राहिले.

श्री० राजे शंभुसिंगजी यांस संस्थानचा अधिकार प्राप्त होतांच त्यांनीं प्रजेच्या सुखाकडे व उत्पन्नाच्या वाढीकडे जें लक्ष दिलें आहे, तें खरोखरच कित्ता घेण्याजोगें आहे. त्यांनीं प्रथम संस्थानच्या मालकीचें पडीक फॉरेस्ट होतें तें तोडून सर्व रयतेस लागवडीस दिलें. याच सुमारास नीरा–क्यानलचें पाणी जमिनीस मिळूं लागल्यामुळें, चार हजारांचा वसूल जास्त वाढला. त्याचप्रमाणें संस्थानच्या मालकीच्या पडीक जमिनी कुळांस तगाई वगैरे देऊन लागवडीस देण्यांत आल्या. ह्या योजनेपासूनही सुमारें चार हजारांचें उत्पन्न वाढलें. ज्या ज्या ठिकाणीं जमिनींस पाणी मिळण्याची सोय नव्हती, त्या त्या ठिकाणीं एंजिन

वगैरे लावून अभिनोस पाणी देण्याची सोय करण्यांत आली. जुनावाडा पडावयास लागल्यामुळें, त्याची दुरुस्ती करवून अमरबागेंत सर्व कुटुंबांस राहण्यासाठीं बंगले बांधले. श्री० राजेसाहेबांनीं, ज्या सुधारणा केल्यानें उत्पन्न वाढून संस्थानचें कर्ज नाहींसें करण्यांत येईल, त्याच मार्गाचें अवलंबन केल्यावरून अवघ्या नऊ वर्षांमध्यें त्यांनीं संस्थानावरील सरकारचें कर्ज फेडून टाकिलें, व संस्थानचें उत्पन्न वाढतें केलें.

सन १८९६–९७ सालीं मे० क्रोसाहेब बहादूर दक्षिणेंतील सरदारांचे एजंट व नामदार ल्यामसाहेब ( ए. क्यु. मेंबर ) यांच्या स्वाऱ्या बारामती येथें आल्या होत्या. त्या वेळीं संस्थानची व्यवस्था पाहून साहेब बहादुरांच्या स्वाऱ्या खूप झाल्या व त्यांनीं राजे शंभुसिंगजी यांस दिवाणी व फौजदारीचे अधिकार देण्याविषयीं सरकारांत शिफारस केली, व त्याप्रमाणें सरकारांनीं त्यांस ते दोन्ही अधिकार दिले. त्यावरून राजेसाहेबांस फ. क्लास म्याजिस्ट्रेट व फ. क्ला. सि. जज्ज ह्या पॉवर्स मिळाल्या.

श्री० राजेसाहेबांचें लक्ष लोकोपयोगी सुधारणांचा लाभ आपल्या रयतेनें अवश्य घ्यावा, याकडे किती आहे हें खालील हकीकतीवरून कळेल. नीरा-क्यानलचे ए. इं. मे. विश्वेश्वर आय्या यांनीं निरा-व्हॅलीमध्यें ब्लॉक सिस्टिम सुरू करण्याबद्दल सरकारकडे शिफारस केली; (सन १९०२). त्या गोष्टीस सरकारचीही मंजुरी मिळाली; परंतु नीरा–क्यानलवरील बागाइतदारांस ही गोष्ट कबूल होईना. तेव्हां श्री० राजे शंभुसिंहजी व मे० रंगनाथ केशव चावरे संस्थानचे कारभारी यांनीं सर्व बागाइतदारांस बोलावून आणून त्यांची नीट समजूत घातली व त्या सर्वांकडून ब्लॉक घेवविले. ह्या कृत्याचा फायदा पाणी वेळचे वेळीं मिळण्याची सोय होऊन धंदा ऊर्जितावस्थेस आल्यावरच त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आला. ब्लॉक नव्हते त्या वेळीं पाणी देणें हें सरकारच्या स्वाधीन असल्यामुळें, बागाइतदारांस फारच अडचणी सोसाव्या लागत. केव्हां केव्हां असेंही होई कीं, खत घातलेल्या जमिनींस पाणी न मिळाल्यामुळें त्या तशाच पडून ठेवाव्या लागत.

पाण्याची सुबत्ता झाली तरी पण उंस लावण्यासाठीं गरीब लोकांस पैसे मिळत नसत. स्थानिक सावकार कुळांस मोठ्या व्याजाच्या दरानें रकमा देत; पण त्या वेळेवरही देत नसत. शेवटीं गुळाच्या हिशोबामध्येंही घालमेल होत असे. ही दुसरीं अनेक कारणें पाहतां बागाइतदारांस व्हावा तसा फायदा होत नसे. हें नजरेस आल्यामुळें, भीमथडी तालुक्याचे मामलेदार रा०सा० सहस्रबुद्धे व त्यावेळचे अ० कलेक्टर, मे० ब्रांडर साहेब यांनीं बागाइतदारांस तगाईच्या रूपानें पैसे मिळावे म्हणून शिफारस केली. त्याप्रमाणें सरकारांनीं बारामती येथें 'नीरा–क्यानल तगाई ब्यांकिंग स्कीम' नांवाची एक संस्था स्थापन केली. या ब्यांकेचाही फायदा घेण्यास लोकांनीं नाकारिलें. त्या वेळीं राजेसाहेब व वर सांगितलेले कारभारी यांनीं पुनः सर्व बागाइतदारांस बोलावून आणून त्यांची समजूत केली. सर्वत्रांस साठ हजारांची तगाई देऊन त्यांबद्दल राजे शंभुसिंहजी स्वतः सरकारांत जामीन राहिले. किती लोकहिताची दक्षता! उंसाचा फायदा जसजसा मिळूं लागला, तसतशी लोकांची खात्री होत चालली व ते तगाईचा फायदा घेऊं लागले.

तगाई स्कीम कशी काय चालते हें पाहण्यासाठी मे० नामदार मूर मॅकेंझी, मे० कीटिंगसाहेब व मे० रिलसाहेब यांच्या स्वाऱ्या बारामतीस आल्या होत्या; त्यावेळीं सदर स्कीमचें काम पाहून साहेबबहादुरांच्या स्वाऱ्या खूप झाल्या व त्यांनीं श्री० राजे शंभुसिंहजी यांचें अभिनंदन करून उत्तेजनपर भाषण केलें.

ह्याप्रमाणें हल्लींचे सरंजामदार शंभुसिंगजी यांनीं प्रजेच्या कल्याणार्थ केलेले प्रयत्न पाहतां त्यांचें अभिनंदन केल्यावांचून राहवत नाहीं. राजा व प्रजा यांचा जो संबंध आहे, तो लक्षांत घेतां त्यांनीं आपलें कर्तव्य योग्यप्रकारें बजाविलें आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. गुणी माणसें कोठेंही पडून असलीं तरी तीं आपल्या गुणांचा प्रभाव पाडल्यावांचून स्वस्थ बसावयाचीं नाहींत. त्यांच्या गुणांस लुब्ध होऊन बहुजनसमूह त्यांचा गौरव करण्यास तत्पर झाल्यास नवल नाहीं. यांच्या बाबतींतही हेंच अनुभवास आलें आहे. मे० नामदार लॉर्ड मोर्लेसाहेब स्टेट सेक्रेटरी व नामदार लॉर्ड मिंटो हिंदुस्थानचे व्हाइसरॉय, यांनीं एन्लॉर्ज कौन्सिल बिल मंजूर केलें; त्या कौन्सिलचें १९०९ सालामध्यें जें पहिलें इलेक्शन झालें, त्या

प्रसंगीं सरकार तर्फे कौन्सिलमध्यें जे मेंबर्स नेमण्यांत आले, त्यांत हल्लींचे सरंजामदार शंभुसिंगजी यांचें घराणें फार जुनें व खानदानीचें असल्यामुळें सर्व मराठे लोकांचे वतीनें मुंबईच्या कायदेकौन्सिलामध्यें त्यांची नेमणूक हल्लींचे लोकप्रिय नामदार सर जॉर्ज क्लार्क मुंबईचे गव्हर्नर साहेब बहादूर यांनीं केली. श्री॰ शंभुसिंगजी जाधवराव यांनीं जी लोक-आस्था दाखविली, तिचें सरकारकडून हा बहुमान मिळून चीज होत आहे; तोंच बहुजनसमूहानें – मराठे मंडळीनें बडोदें येथें भरलेल्या आपल्या चवथ्या मराठा–शिक्षण–परिषदेच्या अध्यक्षाचा मान त्यांस देऊन, त्यांबद्दलची आपली पूज्यबुद्धि व्यक्त केली. तिचेंही श्री॰ राजे शंभुसिंहजी यांनीं उत्तम चीज केलेलें मराठासमूहाच्या दृष्टीसमोर उभें आहे. ज्या मराठा–शिक्षण-परिषदेस स्वतःचा असा फंड नव्हता, त्याची यांनीं स्थापना करून परिषदेस जीवन दिलें आहे. त्यांनीं आपला पिढीजाद घराण्याचा अभिमान बाजूस ठेवून आपल्या भाषणांत निरा-कॅनलचा बागाइतदार म्हणवून घेण्यांतच भूषण मानिलें आहे.

राजे शंभुसिंगजी यांचा स्वभाव इतका कांहीं मनमिळाऊ आहे कीं, लहान असो किंवा मोठा असो, गरीब असो कीं श्रीमंत असो, त्यांजबरोबर निरभिमानपणें संभाषण करण्यांत त्यांस एक प्रकारचा उल्हास वाटत असतो. सार्वजनिक हितास साह्य करण्याचे कामींही त्यांनीं बरीच तत्परता दाखविलेली दिसून येत आहे.

इ. स. १८८३ व ८४ या दरम्यान हल्लींचे सरंजामदार श्री॰ शंभुसिंगजी यांचें दुसरें लग्न मौजे शिरसगांव काटा येथील जहागीरदार भवानराव कदम यांचे कन्येशीं झालें. तें कुटुंब मयत झालें आहे.

यांस दोन्ही कुटुंबांपासून एकंदर नऊ मुलें झालेलीं आहेत, त्यांपैकीं चार मुलगे व पांच मुली आहेत. दोघां वडील मुलांचें अध्ययन म्याट्रिकपर्यंत झालेलें असून इतर शिक्षणाचा लाभ घेत आहेत. दोन मुलांचीं लग्नें झालीं आहेत. तसेंच वडील मुलीचेंही लग्न झालें आहे. त्यांच्या चिरंजिवांपैकीं श्री. रत्नसिंह राजे हे हल्लीं नागपूर येथें भरलेल्या मराठा–शिक्षण–परिषदेच्या पांचव्या बैठकीस हजर होते, त्यावेळीं त्यांनीं, आपणास पॉकेट खर्चासाठीं म्हणून मिळणाऱ्या रकमेमधून कांहीं रक्कम देण्याचें कबूल केलें आहे, ह्या उदाहरणावरून जात्याच ज्यांचें कुल उदार आहे त्यांच्या वंशजांस जरी ते त्यावेळेपुरते सामर्थ्यवान् नसले तरी त्यांस शिकवावें लागत नाहीं. ते उपजतच उदार स्वभावाचे असतात.

येथपर्यंत ह्या यदुकुलवंशजांचा कुलवृत्तांत ह्या भागीं दाखल केला आहे. महाराष्ट्रांतील जुनें व प्रमुख घराणें जें यादव ऊर्फ जाधवांचें त्या घराण्याची मर्दुमकी कित्पत होती व त्या कुळांतील पुरुषांनीं स्वतंत्र राज्यसुख अनुभविलें असून, कालचक्राच्या गतीबरोबर जरी कांहीं काल त्या घराण्यास गुलदस्तामध्यें राहणें भाग पडलें, तरी प्रसंग येतांच त्यांच्याच कुलांतील एका अपत्याकडून–जिजाबाईकडून–पुनः स्वतंत्र राज्यकर्ता शिवाजी उत्पन्न होऊन मराठ्यांचें नांव अजरामर करण्यास हेंच कुल कारणीभूत झालें आहे. जरी आज हें कुल इंग्रजांच्या शांततेच्या कारकीर्दीमध्यें आपलें आयुष्य क्रमण करीत आहे, तरी त्या कुलांतील महाभाग श्री॰ शंभुसिंगजी यांनीं ब्रिटिश राजकर्त्यांकडून तसेंच मराठाबांधवांकडून जी मान्यता मिळविली आहे, ती पाहून सिंहाचे छावे कोठेंही असले तरी ते प्रसंग आल्यास आपल्या आंगचें पाणी दाखविण्यास क्षणभरही विलंब लावीत नाहींत, असें म्हणावयास आम्हांस मुळींच दिक्कत वाटत नाहीं. ईश्वर ह्या जाधवघराण्यास सुख, ऐश्वर्य, संतति, संपत्ती, व बल देवो !

शेवटीं ज्या यदुकुलवंशीय परमात्मा श्रीकृष्णाच्या कृपेनें त्याच्या ह्या वंशजांचा कुलवृत्तांत प्रसिद्ध करण्याचें कार्य शिरावर घेऊन, पूर्णत्वास पावलें, त्याच श्रीकृष्ण परमात्म्यास त्याच्याच वंशजांचा हा इतिहास अर्पण असो !

श्रीकृष्णार्पणमस्तु.

# यादव ऊर्फ जाधव घराण्याचा वंशविस्तार.




उशन.
तितेकी.
मूरित.
कमाल.
वरिश्व.
रुक्माव.
रुक्मेश.
पृथुक्म.
हविष्मन्.
जामुग.
सव्यपी.
विदर्भ.
केशुक.
लोमपाद.
कृति.
जीमुत.
ऋषभ.
भीमरथ.
नवरथ.
दिधृत.
शकुंत.
करंटिक.
कर.
देवरात.
देवक्षत्र.
माधि.
दुर्वसु.

# यादव ऊर्फ जाधव घराण्याचा वंशविस्तार.




भिल्लम ( ३ ).
शेऊणचंद्र ( २ )

भिल्लम ( ४ ) परमदेव. सिंघण.

जैत्रपाळ. मलुगी.

अमरमलुगी. अमरगांगेय. भिल्लम (५).

कालीयबल्लाळ. गोविंदराज. जैत्रपाळ.

सिंघण.

जैत्रपाळ.

कृष्ण. महादेव.

रामदेव ऊर्फ रामचंद्र. अमान.

शंकरदेव. भीमदेव.

गोविंददेव.

ठाकुरजी.

भुकणदेव ऊर्फ भेतोजी.

अचलकर्ण ऊर्फ अचलोजी.

विठ्ठलदेव.

लक्ष्मणदेव ऊर्फ लुखजी. जगदेव.



अचलोजी.
बहादुरजी.
सुजनसिंग ऊर्फ संताजी.
दत्ताजीराव.
संभाजी ऊर्फ शंभुसिंग.
राघोजी.
जगदेव २.
धनसिंग ऊर्फ धनाजी.
रुस्तमराव.
मानसिंग. राघोजी. यशवंतराव. दत्ताजीराव.
संताजी ऊर्फ सुजनसिंग. चंद्रसेन. शंभुसिंग.
मानसिंगराव.
धनसिंग. वीरसिंह ऊर्फ रामचंद्र. अमरसिंग (१).
आनंदराव.
सुरसिंग. उदसिंग. भाऊसाहेब. शंभुसिंग ऊर्फ खासेसाहेब.
रतनसिंग.
व्यंकटराव.
खंडेराव अप्पा. रायसिंग (द० मालेगांव).
अमरसिंग (२).
बाजीराव. रामचंद्रराव.
नवलसिंग. भाऊसिंग. नानासाहेब.
मानसिंगराव. किसनराव.
(मालेगांवचे सरंजामदार.) शंभुसिंग.
माधवसिंग.
बाजीराव.
रतनसिंग. कृष्णसिंग. चंद्रसिंग.
जगदेवराव.
दत्ताजीराव.
(हल्लीचे वारस.)
देऊळगांव–बाळाजीचें संस्थान.
खाशाबा. धनसिंग. रामसिंग.
(दत्तक)—मालेगांवकर

# मराठा-कुळाचा इतिहास.

## भाग १ ला.

### जाधव घराण्याची कैफियत ह्या ग्रंथावरील, विद्वज्जनांचे अभिप्राय.

---

**मुमुक्षुकर्ते म्हणतातः—**रा. दळवी यांनीं ऐतिहासिक साधनें जुळवून मोठ्या परिश्रमानें ही कैफियत तयार केली आहे. ह्या कैफियतींत जाधव-घराण्याचा संपूर्ण इतिहास दिला आहे. जाधवांचें घराणें महाराष्ट्रीयांनीं अभिमान बाळगण्यासारखें आहे. श्रीकृष्णाच्या यादव वंशांतूनच देवगिरीच्या जाधवांचें घराणें निघालें. देवगिरीचे जाधव राजे, शिंदखेडचे जाधव, मालेगांवचे जाधव, ह्या सर्व जाधव–घराण्यांतील कर्त्या पुरुषांची माहिती उपलब्ध साधनांवरून ह्या कैफियतींत व्यवस्थितपणानें दिली आहे. मराठा–कुळांचा असा इतिहास प्रसिद्ध होणें अवश्य होतें व ह्या महत्त्वाच्या कामास रा. दळवी यांनीं आरंभ केला आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. गेल्या पंचवीस वर्षांत मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें बहुधा ब्राह्मण–संशोधकांनींच गोळा केलीं असल्यामुळें व ‘ मराठा तेवढा मेळवावा महाराष्ट्र धर्म वाढवावा ’ ह्या समर्थोक्तीचें मर्म कळण्याइतका उदारपणा त्यांत थोडा कमी असल्यामुळें ब्राह्मणपणाच्या फाजील अभिमानानें तीं बरींच दूषित झालीं आहेत. ह्या क्रियेस प्रतिक्रिया या न्यायानें मराठा मंडळ आपल्यांतील श्रेष्ठ कुळांचे व पुरुषांचे इतिहास अलीकडे प्रसिद्ध करूं लागलें आहे. स्वराज्याच्या वेळीं ब्राह्मण वीर व मराठे वीर खांद्यास खांदा लावून लढले व महाराष्ट्राचें यश वाढविते झाले. त्याप्रमाणें सांप्रतकाळीं ब्राह्मण विद्वानांबरोबर मराठे विद्वानही लेखणी हातीं धरूं लागले आहेत, ही अभिमानाची गोष्ट आहे. उभयतांच्या ओढाताणींत खरा इतिहास बाहेर पडेल. खरा इतिहासकार निर्मळ दृष्टीचा, समतोल बुद्धीचा व उदार मनाचा असावयास पाहिजे. जात्याभिमान सोडून अधिक व्यापक दृष्टीचा राष्ट्राभिमान किंबहुना केवळ सत्याभिमानानें प्रेरित झालेला मनुष्यच खरा इतिहास लिहूं शकेल. असे इतिहासकार जगाच्या इतिहासांत असलेच तर अत्यंत विरळ आहेत. ‘ तुका म्हणे सर्वांभूतीं नारायण । अवगुणी दंडण गुणीं पूजा ॥ किंवा व्हावा ऐसा वाटे जना । तुका म्हणे साठीं गुणा ॥ ’ ह्या तुकाराम महाराजांच्या उदार उक्तींतलें मर्म लक्षांत ठेवणारा खरा उदार मनस्क इतिहासकार महाराष्ट्रास केव्हां लाभेल तो लाभो; तूर्त सर्व संशोधक व लेखक आपापल्या योग्यतेप्रमाणें व कलाप्रमाणें ग्रंथ लिहीत आहेत, ही त्यांतल्यात्यांत बरीच समाधानाची गोष्ट आहे. गुणाची पूजा मग तो गुण कोणत्याही जातींत आढळो व अवगुणाचें दंडण मग तो अवगुण स्वजातींतच काय पण स्वकुलांतही आढळो. असला समतोलपणा व निरभिमानता इतिहासकारांच्या अंगीं पाहिजे. सांप्रतचे एकंदर इतिहास-संशोधकांचें धोरण पाहिलें म्हणजे रा. दळवी यांच्या ग्रंथास चांगलें म्हटलें पाहिजे. धनाजी जाधवरावांचें चरित्र फार चांगलें वठलें आहे. ग्रंथाची भाषा सुबोध व जोरदार असून ग्रंथ वाचनीय व संग्रहणीय झाला आहे.

**इंदुप्रकाशकर्ते म्हणतातः—**या ग्रंथांत महाराष्ट्रांतील जाधव–घराण्याचा विस्तृत इतिहास दिला आहे तो वाचनीय आहे. अशा प्रकारच्या पुस्तकांचा उपयोग भावी महाराष्ट्रेतिहासकारांस पुष्कळच होणार आहे. मराठामित्रकर्त्यांचा हा प्रयत्न फार स्तुत्य असून, त्यांस सर्व महाराष्ट्रीयांकडून योग्य तें प्रोत्साहन मिळेल अशी आशा आहे.........एकंदरीत ग्रंथ फार चांगला व संग्रहणीय आहे, यांत संशय नाहीं.

**आनंद मासिकाचे संपादक, श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे बी. ए. म्हणतातः—**या पुस्तकांत पुराणप्रसिद्ध व इतिहासांत गाजलेल्या यादव ऊर्फ जाधव घराण्याचा आजपर्यंतचा इतिहास संगतवार दिला आहे, तो वाचनीय आहे. लेखकानें माहिती मिळविण्याचे कामीं बरेच परिश्रम केले आहेत. या पुस्तकानें मराठी भाषेंतल्या इतिहास-ग्रंथांत चांगली भर टाकली आहे, अवश्य वाचावें.

**बालबोध मासिकाचे संपादक रा० सा० विनायक कोंडदेव ओक म्हणतातः**—नांवावरून विषय उघड कळत आहे. माहिती पुष्कळ आहे, भाषा बरी असून पुस्तक संग्राह्य आहे.

**श्रीयुत गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए.** म्हणतातः—आपण चालविलेला उद्योग स्तुत्य असून आपल्या राष्ट्राचा इतिहास बनविण्यास त्याचा फार उपयोग होईल.

**श्रीयुत प्रो० अण्णा बाबाजी लठ्ठे एम. ए.** म्हणतातः—विशेषतः धनाजी व चंद्रराव यांच्या कारकीर्दीची आपण दिलेली हकीकत वाचून आनंद झाला. चंद्ररावावरील आक्षेपाचें निरसन आपण चांगल्या प्रकारें केलें आहे, पुस्तकाची भाषा साधी व सरळ आहे.

**रा० ब० विष्णु मोरेश्वर महाजनी एम. ए.** म्हणतातः—इतिहास महत्त्वाचा आहे, व कुलाभिमान वाढविणारा आहे, व कुलाभिमान राष्ट्राभिमानाचा पहिला धडा होय.

**विविधज्ञानविस्तारकर्ते म्हणतातः**—एकंदर हकीकत वाचनीय आहे.

**चिकित्सककर्ते म्हणतातः**—या कैफियतींत जाधव घराण्याचा साग्र इतिहास देण्याचा प्रयत्न केला आहे, तो चांगला सफल झाला आहे. ही कैफियत लिहिणारानें हल्लीं उपलब्ध असलेल्या छापिल ऐतिहासिक ग्रंथांचा आणि जुन्या पुराण्या हस्तलिखित लेखांचा उपयोग उत्तम रीतीनें केला आहे. जाधवांचें घराणें हें मराठा क्षत्रिय यांनींच काय पण सकल महाराष्ट्रीयांनीं अभिमान बाळगण्यासारखें आहे, तेव्हां अशा थोर कुळांत जीं तेजस्वी थोर रत्नें होऊन गेलीं, त्यांची थोडक्यांत माहिती दिली आहे ती अत्यंत उपयुक्त आहे, ही कैफियत लिहिणारे मराठे आहेत आणि ज्यांच्या घराण्याची कैफियत लिहिली आहे तेंही घराणें मराठ्यांचें आहे, असें असतां त्यांनीं जात्यभिमानाच्या विकारास वश न होतां किंवा खऱ्या इतिहासाची पायमल्ली करून आपल्या जातभाईंचा कुळाभिमान जागृत करण्यासाठीं ऐतिहासिक गोष्टीस काल्पनिक रूप दिलें नाहीं; ही गोष्ट इतर ऐतिहासिक पुस्तक लिहिणाऱ्या लोकांनीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. मराठेलोकांमध्यें आपल्या थोर ऐतिहासिक पुरुषांसंबंधीं ग्रंथ लिहिणारे उत्पन्न झाले आहेत, ही मोठीच संतोषकारक व उत्तेजनदायक गोष्ट होय. पुस्तकाची भाषा साधी, सरळ व सुंदर असून चरित्र निरूपण करण्याची शैलीही मनोहर आहे; जाधवांचीं घराणीं दक्षिण महाराष्ट्र देशांतही आहेत; त्यांची हकीकत पुढील पुस्तकांत प्रसिद्ध करावी अशी आमची प्रकाशकांस प्रेमपूर्वक सूचना आहे. रा. दळवी यांनीं हें मोठें उपयुक्त पुस्तक प्रसिद्ध करून आपल्या ऐतिहासिक ग्रंथ संग्रहांत एका उत्तम ग्रंथाची भर घातली एतदर्थ ते लोकस्तुतीस पात्र झाले आहेत; आणि त्याबद्दल आम्ही त्यांचें मोठ्या आनंदानें अभिनंदन करतों.

**प्रगति आणि जिनविजयः**—कर्त्यांनीं बराच लांबलचक अभिप्राय दिला आहे व त्यांत कांहीं सूचनाही केल्या आहेत. तो सर्व अभिप्राय ह्या ठिकाणीं न देतां त्यांतील कांहीं मुद्दे देतों. ते म्हणतात.—‘ प्रस्तावना पृष्ठ ४ वर क्षत्रियत्वाविषयीं प्रकट केलेले विचार सर्वांनीं विशेषतः आमच्या मराठा–बांधवांनीं मनन करण्यासारखे आहेत. मराठे म्हणजे क्षत्रिय असें असतां क्षत्रिय हें विशेषण मराठा शब्दामागें खुलेपणानें लावण्याच्या प्रवृत्तीचा निषेध आमच्या मुंबईच्या मराठा-समाजांनीं विचार करण्यायोग्य आहे. ’

‘ इतिहास प्रसिद्ध धनाजी जाधवांचें चरित्र प्रत्येक मराठ्यानें वाचण्यासारखें आहे. मराठ्यांचा उत्कर्ष कां व कसा झाला व त्यांचा अपकर्ष काय कारणानें झाला, याचें ज्ञान होण्यास येवढा एक भाग पुरे आहे. आपसांतील ईर्षा, द्वेष, दुरभिमान, शूरपणा, इमान वगैरे दुर्गुण व सद्गुण ठळकपणानें अनेक व्यक्तींच्या ठायीं दिसतात. धनाजी जाधवराव यांच्या कर्तबगारीविषयीं भरपूर माहिती आज उपलब्ध असलेल्या इतिहासावरून कळत नाहीं. चंद्रसेन जाधवराव यांचें व बाळाजी विश्वनाथाचें वांकडें आल्यानंतर तो आमच्या ब्राह्मण इतिहासकारांचा अगदींच नावडता झाला. नाटकांत कादंबरींत वगैरे नीचपणाची भूमिका त्याचे नांवावर ठेवण्याची वहिवाट पडली आहे. ब्राह्मण ग्रंथकारांचा हा किती घोर नीचपणा आहे बरें ! ’

'चंद्रसेन जाधवरावाचें वर्णन प्रत्येक मराठ्यानें वाचण्यासारखें आहे. त्यांच्या काळीं राष्ट्रभक्ति किंवा देशभक्ति मुळींच ठाऊक नव्हती. यामुळें राष्ट्रहिताविरुद्ध कांहीं प्रकार घडल्यास त्याबद्दलचा दोष देणें वाजवी नाहीं. महत्त्वाकांक्षा हीच प्रबल मनोवृत्ति होती. बाळाजी व चंद्रसेन हे या एकाच वृत्तीनें भारलेले होते. याचसाठीं त्यांचीं कारस्थानें चाललीं होतीं. बाळाजी पक्का कारकून, पडून घर घेणारा खुशामती. त्याची शाहूवर छाप बसली. चंद्रसेन शूर व अभिमानी. मोडून जाईन पण वांकणार नाहीं अशा हिय्याचा. यामुळें या दोघांच्या झटापटीस एकप्रकारचें महत्त्व आलें. महाराष्ट्राचें दुर्दैव ओढवलें. बाळाजीच्या अकलेला यश मिळावयाचें नव्हतें. कारण बाळाजीची दृष्टि अगदीं कोती होती. पण केवळ दैविक घाल्यानें ताराबाईचा मुलगा शिवाजी व सचिव एकाएकीं मरण पावले व शाहू बाळाजीच्या तावडींत पुरा सांपडला. त्याचे मागें त्याचा मुलगा बाजीराव यानेंही बापाचाच कित्ता वळवून पराक्रमी मराठे सरदार कमी केले व अशा रीतीनें मराठेशाई कमकुवत करून ब्राह्मणशाई पुढें आणिली. स्वार्थापलीकडे कोणास कांहीं दिसत नव्हतें. या एका तत्त्वाच्या उदाहरणादाखल हा सर्व इतिहास आहे.'

'एकंदरींत पुस्तक फार उपयुक्त झालें आहे.'

**बकुलकर्ते म्हणतातः**—ही ऐतिहासिक पुरावा गोळा करून बरीच संगतवार कैफियत लिहिली आहे. इच्या योगानें मराठी वाङ्मयांत ऐतिहासिकदृष्ट्या भर पडली आहे; यांत संशय नाहीं.

**डॉ. एच. एच. मॅन, चेअरमन पब्लिशिंग कंपनी शेतकी आणि शेतकरी म्हणतातः**—रा. दळवी यांनीं फार परिश्रम करून, निरनिराळ्या इतिहाससंशोधकांनीं दिलेली माहिती व जुने कागद-पत्र आणि बखरा यांतील माहिती संकलित करून, जाधव-घराण्याची कैफियत लिहिली आहे. तींत यदुकुलोत्पन्न श्रीकृष्णपरमात्म्यापासून, हल्लींचे यादवकुलावतंस शंभुसिंग राजे मालेगांवकर यांचेपर्यंतची यादव कुलाची हकीकत दिली आहे. इतिहासाचे दृष्टीनें पाहतां हा प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहे व असाच प्रयत्न संपादकांनीं चालू ठेवल्यास महाराष्ट्राच्या इतिहासांत बरीच मोठी भर निःसंशय पडणार आहे. हें काम फार-खर्चाचें व त्रासाचें असल्यामुळें इतिहासप्रिय मंडळींनीं संपादकांस माहितीच्या द्वारा व शक्य असल्यास द्रव्यद्वारा मदत करावी. ज्या लोकांपाशीं जुने कागदपत्र, बखरी वगैरे असतील त्यांनीं संपादकांशीं पत्रव्यवहार करून, त्यांस त्या कागदपत्रांचा अवश्य फायदा द्यावा. मराठा-कुळांचा इतिहास, या पुस्तकाचे चार भाग केलेले आहेत. त्यांपैकीं प्रस्तुत पुस्तक हा पहिला भाग आहे, व त्यांतील ऐतिहासिक माहिती फार मनोरंजक व बोधप्रद आहे. हें पुस्तक इतिहासाचे दृष्टीनें संग्राह्य आहे. यादव कुळांतील हल्लींचे पुरुष शंभुसिंग अमरसिंह राजे मालेगांवकर हे आपल्या सर्व पूर्वजांप्रमाणेंच गुणी असून, हल्लींचे देशकालवर्तमानाप्रमाणें ते मोठे प्रजाहिततत्पर असून, शेतकीच्या कामांत मोठें लक्ष घालीत असतात. त्यांनीं आपले जहागिरींतील पडित जमीन लागवडींत आणिली व निरा-कॅनल ब्लाक सिस्टिम सुरू झाली; ते वेळीं बागाइतदारांस ब्लाक सिस्टिमबद्दल त्यांची समजूत नीट करून देऊन, सरकारास मोठी मदत केली. त्याचप्रमाणें निरा-कॅनाल तगाई व्यांकचा फायदा घेण्यास कोणी धजेनात, ते वेळीं राजेसाहेबांनीं सर्व बागाइतदारांस बोलावून आणून, त्यांची नीट समजूत केली व आपण स्वतः बऱ्याच मोठ्या रकमेस जामीन राहून लोकांस तगाई देवविली. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन, सरकारांनीं त्यांस सन १९०९ सालीं सर्व मराठे लोकांचे वतीनें कायदे-कौन्सिलांत मेंबर नेमून, त्यांचा मोठा बहुमान केला आहे. शेवटीं या पुस्तकाच्या संपादकांचें त्यांच्या परिश्रमाबद्दल अभिनंदन करितों व त्यांस लोकांनीं सर्व प्रकारें लागणारी मदत अवश्य करावी अशी आशा करितो.

* **रा. ब. चिंतामण विनायक वैद्य** एम्., ए. म्हणतातः—पुस्तक पाहून फार आनंद झाला. तुमचा उद्योग फारच स्तुत्य आहे; आमच्या महाराष्ट्रांत जीं मराठ्यांची सन्मान्य घराणीं आहेत, त्यांचा इतिहास

* श्रीयुत वैद्य यांनीं आपल्या पत्रीं आम्हांस ज्या सूचना केल्या आहेत, त्याबद्दल आम्हीं त्यांचे अत्यंत आभारी आहों.

आम्हांस माहीत नसावा; हें आमचें दुर्दैव तुम्हीं सुधारण्याचें मनावर घेतलें आहे याजबद्दल तुम्हीं सर्व महाराष्ट्राचे अभिनंदनास योग्य आहांत. आतां हा जो प्रथम भाग तुम्हीं छापला आहां तोही तुम्हीं फार माहिती मिळवून लिहिला आहे, यामुळें तुमचें विशेषच अभिनंदन करावें असें वाटतें. याचप्रमाणें पुढचे भाग पूर्ण माहितीनें भरलेले निघतील, अशी आशा आहे..........तुमचा उद्योग फार स्तुत्य आहे व समतोलदृष्टीनें तुम्हीं चालविल्यास तुमचे ग्रंथ अमुल्य होतील.

**श्रीयुत रघुनाथराव जाधव**—बडोदें, हे आपल्या पत्रीं लिहितातः—सदर जाधव घराण्याची हकीकत बहुतेक उपलब्ध इतिहासाला धरून आहे, तेव्हां त्या संबंधानें कांहीं विशेष कळविण्यासारखें नाहीं. मात्र एक सूचना करण्यांत येत आहे ती ही कीं, पृष्ठ १७ वर गुजराथच्या कर्ण राजाची मुलगी देवलदेवी शंकरदेव यादवास देण्याचे प्रसंगाचें वर्णन इतिहासाचे आधारानेंच देऊन त्यांत रजपूत व मराठे यांच्यामधील शरीर संबंध जुळविण्याचे बाबतींत झालेल्या प्रकरणाची हकीकत सांगून जाधव व भोंसले हे अस्सल रजपुत कुळांपैकींच आहेत अशा विषयींचे आधार दाखवितांनां, एकंदर मराठ्यांस गौणत्व आणण्यासारखें जें दर्शविलें आहे तें माझ्या मतें अप्रासंगिक होय.

वास्तविक रजपूत व मराठे अस्सल क्षत्रियच होत. ह्या क्षत्रियांची लाट पूर्वी एकदां उत्तरेकडून थेट दक्षिण समुद्रापर्यंत जाऊन त्यांनीं जागजागीं आपलीं राज्यें स्थापन केलीं आणि पुनः त्याच क्षत्रियांपैकीं कांहीं पराक्रमी पुरुषांनीं उत्तरेकडे हिमालयापर्यंत स्वाऱ्या करून जिकडे तिकडे मुलुख काबीज केले तिकडेच ते आपलीं राज्यें स्थापून राहूं लागले. हा क्रम या देशांत आर्य लोकांचें आगमन झाल्यापासून दीर्घकाल गतीनें नेहमींचाच चालू आहे. देशकालपरत्वें त्यांच्या रीतीभातींत थोडाबहुत फरक पडत असला पाहिजे, पण तेवढ्यावरून त्यांच्या कुळांत कमी अधिकपणा होण्याचें मुळींच कारण नाहीं.

वर सांगितलेल्या क्रमापैकीं अगदीं अलीकडील क्षत्रियांची उत्तरेकडे आलेली लाट म्हणजे भोंसले, गायकवाड, शिंदे, होळकर, पवार, वगैरेची होय. सुदैवानें आगगाड्या, तारायंत्रें, वर्तमानपत्रें, टपाल वगैरे साधनें अस्तित्वात आल्यामुळें वरील राजांचें महाराष्ट्रत्व कायम राहिलें. नाहींतर येवढ्या अवधींत तेही बहुतेक रजपूत होऊन बसले असते. मराठे व रजपूत हे एकाच वर्णाचे असल्यानें त्यांच्यांत रोटीबेटी व्यवहार होण्यास कधींच अडचण यावयाची नाहीं. गायकवाड घराण्यामध्यें कच्छ, भूज, राजपिंपळा, लाठी, मांडवा वगैरे अस्सल रजपूत संस्थानिकांनीं आपल्या मुली दिल्याचीं उदाहरणें असल्याचें समजतें. तसेंच थोड्या वर्षांपूर्वी तंजावरच्या मराठे राजघराण्यापैकीं एक मुलगी नेपाळचे जंगबहादुर रजपूत घराण्यांत दिली होती. सारांश क्षत्रिय वर्णाचे लोक मग ते कोठेंही अथवा एकमेकांपासून कितीही दूर राहोत, त्यांच्यामध्यें आप्तपणा घडून येण्यास कोणतीच हरकत येण्याचें कारण नाहीं.

दुर्दैवानें मराठे लोक धर्ममिषानें ठकले जाऊन त्यांनीं पुरोहितांस भूदेव बनविलें, इतकेंच नव्हे तर प्रपंचादि व्यवहाराचे कारभारही त्यांचे हातीं दिले. अशा दोन्ही सत्ता त्यांच्या हातीं गेल्यामुळें, निमकहराम बनून यजमानास हलके लेखण्याची त्यांस साहजिकच प्रवृत्ति उत्पन्न झाली आणि कालगतीनें ती दृढ होऊन उभयतांसही आंगवळणी पडून गेली. व याच कारणामुळें श्री शिवाजी महाराजांस राज्याभिषेक करविण्याचे वेळीं, त्यांच्या पदरच्या कायस्थ मुत्सद्यांनीं त्यांची वंशावळी उदेपूरचे रजपूत घराण्याशीं नेऊन भिडविण्याची क्लृप्ति काढली व या रीतीनें वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लाविला. पण वास्तविक त्यांत तथ्य कांहींच नव्हतें हें इतिहासज्ञ पुरेपणें जाणत आहेत. अशा बनावट गोष्टीवर भरंवसा ठेवण्याइतका भोळसरपणा सुशिक्षित लोकांमध्यें आतां राहिलेला नाहीं. ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें तरी रजपुताइतकी मराठ्यांचे रक्तांत भेसळ झालेली नाहीं असेंच दिसून येईल. असें असतां कित्येक मराठे कुळांस रजपुतांशीं जाऊन भिडण्यांत कां अभिमान वाटतो तें कळत नाहीं. ह्या वृथाभिमानाचें वारें. आपापल्या घराण्याच्या हकीकती तयार करून पाठविणारांमध्यें शिरूं नये म्हणून हें विवेचन येथें करावें लागत आहे. ज्या जाधव घराण्यासंबंधानें ही कैफियत लिहिली गेली आहे, त्या घराण्याशीं प्रत्यक्ष संबंध असलेल्या अशा कित्येक शाखा त्यांत दाखविण्याच्या

अद्याप राहिलेल्या आहेत. त्या हल्लीं राजवैभवांत नसल्या किंवा त्यांच्याकडे मोठ्या जहागिरी चालत नसल्या तरी जेथें जेथें त्या आहेत, तेथें तेथें त्या वतनदार या नात्यानें निःसंशय आहेत. त्या शाखांचीही माहिती मिळवून, तिचा तींत उल्लेख करणें अवश्य दिसतें. आतां हें काम अति प्रयासाचें, खर्चाचें व कठीणही आहे हें खरें; पण तें दुःसाध्य आहे असें मात्र नाहीं. म्हणून परमेश्वराच्या कृपेनें ज्यांना संपत्ती व ज्ञान-धन प्राप्त झालें आहे; अशा सामर्थ्यवान् गृहस्थांनीं आपल्या कुलाचा अभिमान बाळगून, पूर्ण माहिती मिळवून देण्याचा शक्य तो प्रयत्न करणें अवश्य आहे.

मुंबईनजीक साष्टी तालुक्यांतील लोकांच्या तोंडून, ज्या बिंब राजाची दंतकथा ऐकण्यांत येते; तो यादव राजघराण्यांतील प्रसिद्ध रामदेवराव जाधवाचा द्वितीय पुत्र भीमदेव होय. हा महापराक्रमी असून त्यानें मुंबईपासून गुजराथपर्यंतचा मुलुख काबीज करून, महिकावती ऊर्फ हल्लींचें माहीम येथें आपली राजधानी केली होती. या राजाचें वर्णन बिंबपुराण नामक त्याच्याच नांवानें लिहिलेले ग्रंथांत आहे. सुमारें सात-आठ वर्षांवर ह्या बिंबपुराणाचे आधारें एक सुंदर ऐतिहासिक लेख इंग्रजींत लिहिलेला 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्रामध्यें प्रसिद्ध झालेला वाचण्यांत आला होता. तो बहुधा मुंबापुरस्थ मि. कर्केरिया ह्या इतिहासज्ञ गृहस्थानें लिहिलेला असावा असें वाटतें, व तसें असेल तर त्यांनीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलेले ऐतिहासिक लेख एकत्र छापले असल्याचें समजतें. तो लेख मिळवून, सदर कैफियतीस जोडला जाईल तर ह्या घराण्याच्या राजकर्ते व जाहागिरदार या नात्यानें प्रसिद्धीस आलेल्या शाखांचा तरी एकत्र समावेश होऊं शकेल. बाकी झालेला प्रयत्नही अत्यंत प्रशंसनीय आहे.'

ज्या ज्या गृहस्थांनीं हे अभिप्राय आपापल्या वृत्तपत्रांमधून प्रसिद्ध करून, व कित्येकांनीं पत्रद्वारें लिहून पाठवून, मराठा कुळांच्या इतिहासाबद्दल अगत्य प्रगट केलें; त्याबद्दल आम्हीं त्यांचे अत्यंत आभारी आहों.



# मराठी ग्रंथप्रकाशक मंडळ.

## मराठा-मित्र पुस्तकमाला.

ह्या मालेंत आजपर्यंत आठ पुष्पें गुंफिलीं असून, यानंतरही अनेक मनोवेधक, चित्ताकर्षक व प्रगतिपर-सामाजिक, ऐतिहासिक, धार्मिक-पुस्तकें, अनेक विद्वान् मंडळींकडून लिहवून घेऊन प्रसिद्ध करण्यांत येतील. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांवर विद्वानांचे अत्युत्तम अभिप्राय मिळाले असून, पहिल्याच पुष्पास दक्षिणा प्राइझ कमिटीनें दहा रुपयांचें बक्षिस दिलें आहे. यानंतर सदर मालेंत, मराठा-कुळांचा इतिहास व इतर सामाजिक, ऐतिहासिक कादंबऱ्या, धार्मिक व उपदेशपर ग्रंथ विद्वान् मंडळींकडून पसंत करवून प्रसिद्ध करण्यांत येतील. ज्या ज्या ग्रंथकर्त्यां-कडून प्रसिद्धीकरितां पुस्तकें येतील, तीं कमिटीकडून तपासवून पसंत असल्यास ग्रंथकर्त्यास मोबदला देण्यांत येईल. नापसंत पुस्तकें ग्रंथकर्त्याच्या खर्चानें परत करण्यांत येतील.

## मालेचे नियम.

**सदर मालेचा उद्देशः**—बहुजनसमूहामध्यें ज्ञानाचा फैलाव व्हावा, त्यांस ऐतिहासिक वाङ्मय कंटाळवाणें न वाटतां तें वाचण्याची उत्कंठा लावावी, त्यांच्या आचारविचारांत ( सामाजिक व धार्मिक ) आवश्यक असे फेरफार व्हावे, अल्पमोली व बहुगुणी अशा पुस्तकांचा त्यांस संग्रह करितां यावा. हाच मालेचा उद्देश आहे.

**हितचिंतकः**—मालेस शंभर किंवा त्यापेक्षां जास्त रक्कम देणारांस हितचिंतक समजण्यांत येईल. त्यांचीं नांवें मंडळाच्या हितचिंतकांमध्यें नोंदिलीं जाऊन, कमिटीमध्येंही दाखल केलीं जातील. त्यांस मराठा-मित्र एक प्रत व मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें ( लायब्ररी एडीशन ) प्रत्येकीं दोन प्रती पाठविण्यांत येतील. व त्यांचीं नांवें मालेच्या प्रत्येक पुस्तकाच्या आरंभीं प्रसिद्ध करण्यांत येतील.

**तहाहयात आश्रयदातेः**—मालेस पंचवीस रुपये किंवा शंभराच्या आंत रक्कम देणारास मंडळाचे तहाहयात आश्रयदाते समजण्यांत येईल. त्यांस मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें (लायब्ररी एडिशन) प्रत्येकीं एक प्रत पाठविण्यांत येईल व त्यांचीं नांवें मालेच्या प्रत्येक पुस्तकाच्या आरंभीं प्रसिद्ध करण्यांत येतील.

**कायमचे आश्रयदातेः**—मालेस एक रुपया देणारास मंडळाचे कायमचे आश्रयदाते समजण्यांत येईल. त्यांस मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें निम्या किंमतीनें मिळून योग्य तें टपाल हांशील आकारण्यांत येईल. व्ही. पी. चा चार्ज प्रत्येक वेळचा एक आणा आकारण्यांत येणार नाहीं. त्यांचीं नांवें साल अखेरच्या मालेच्या पुस्तकांत प्रसिद्ध करण्यांत येतील.

**आश्रयदातेः**—मालेमध्यें नांवें नोंदणारांस मंडळाचे आश्रयदाते समजण्यांत येईल. त्यांस मालेमध्यें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें निम्या किंमतीनें मिळून योग्य टपाल हांशील व व्ही. पी. चार्ज एक आणा आकारून पुस्तकें रवाना करण्यांत येतील.

मालेमध्यें नांवें नोंदणारांनीं, हितचिंतक, तहाहयात आश्रदाते, कायमचे आश्रयदाते, व आश्रयदाते ह्या चार वर्गांपैकीं ज्या वर्गांत नांव नोंदणें असेल, त्या वर्गाचा अवश्य खुलासा करावा.

## लक्षांत ठेवावयाचे नियम.

१ कमिटीनें जें पुस्तक पसंत केलें असेल तें प्रत्येक आश्रयदात्यास कबूल करणें भाग पडेल.

२ कोणत्याही सबबीवर व्ही. पी. परत न करण्याची खबरदारी घेणें.

३ व्ही. पी. पाठविण्यापूर्वीं प्रत्येकास एक अलाहिदा कार्ड रवाना करण्यांत येईल.

सर्व पत्रव्यवहार—**श्रीयुत गोपाळ दाजीबा दळवी.**

व्यवस्थापक, मराठी ग्रंथप्रकाशक मंडळ, मुंबई नंबर ११—ह्या पत्त्यावर करणें.

# मराठा-कुळांचा इतिहास.

## भाग २ रा.

## साळुंखे ऊर्फ पाटणकर व अंकलीकर शितोळे घराण्यांच्या कैफियती.

---

हें पुस्तक,

श्रीयुत गोपाळ दाजीबा दळवी-संपादक "मराठा-मित्र" मुंबई नं० ११.

यांनीं,

मुंबई येथें "इंदुप्रकाश" प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केलें.

सन १९१२ इसवी.



किंमत १ रुपया.

"सुखामागून जसें दुःख आणि दुःखामागून जसें सुख प्राप्त होतें, त्याचप्रमाणें प्रगतीच्या मागून अवनति व अवनतीच्या मागून प्रगति ठेवलेलीच असते."

हें पुस्तक घर नं. ४३४, ठाकुरद्वार रोड, मुंबई येथें "इंदुप्रकाश" छापखान्यांत मालकाकरितां रा० रा० दामोदर सांवळाराम यंदे यांनीं छापिलें व रा० रा० गोपाळराव दाजीबा दळवी यांनीं भायखळा, चमेलीची वाडी येथें "मराठा-मित्र" ऑफिसांत प्रसिद्ध केलें.



श्रीमंत भीमराव ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर, फर्स्ट क्लास सरदार
व जहागीरदार डेक्कन ॲन्ड कोल्हापूर.

ही

# साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची

# कैफियत.

ज्या चालुक्य ऊर्फ सोळांखी-सोळांखी ऊर्फ साळुंखे-साळुंखे ऊर्फ पाटणकर.
ह्या घराण्यांमध्यें जन्म घेणारे मान्यवर. श्रीमंत सरदार भीमराव
ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर, फर्स्टक्लास सरदार व जहागीरदार
डेक्कन आणि कोल्हापूर, यांस, त्यांच्या सौजन्य,
औदार्य व निरभिमानता या गुणांवर लुब्ध
होऊन, त्यांच्याच पराक्रमी पूर्वजांची ही
कृति त्यांस अर्पण करीत आहों.

ग्रंथप्रकाशक.

"बांधवहो! आपलें कुल उत्तमांतलें आहे; आपण क्षत्रिय म्हणवितां; 'मराठा' ह्या नामोच्चाराबरोबर आपल्यांत अभिमान जागृत होतो; आपल्या वाडवडिलांच्या कीर्तीचा आपणांस अभिमान वाटतो; आपण अमुक उच्च कुलांत जन्म घेतला आहे हें सांगण्यास आपणास उत्साह उत्पन्न होतो; मग ज्या पूर्वजांच्या नांवावर सध्यां आपण ह्या अशा प्रकारच्या फुशारक्या मारीत असतों, त्यापूर्वजांची मर्दुमकी–त्यांनीं ज्या कुलामध्यें जन्म घेतला त्या कुलाची थोरवी, प्रकाशांत आणण्यास आपण आळस करावा ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट नव्हे का? ज्यास आपल्या कुलाबद्दल अभिमान नाहीं; ज्यास आपल्या कुलांतील थोर पुरुषाबद्दल आदर नाहीं; ज्यास ज्या लिखितांवर आपल्या शूर–वीर–पराक्रमी पुरुषांची कीर्ति वास करीत आहे, त्या लिखितांचा कसरीनें भक्षण करण्यांतच आनंद वाटतो, तीं प्रसिद्ध करून त्या आपल्या पूर्वजांची कीर्ति चिरस्मरणीय करण्याची बुद्धि होत नाहीं; त्या महाभागांनीं अद्यापहि सावध व्हावें व आपल्या कुलाच्या मानमान्यतेस, त्या कुलामध्यें जन्म घेतलेल्या पूर्वजांच्या कीर्तीस चिरस्थाईपणा देण्याचें कर्तव्य बजवावें. प्रत्येक मराठ्यानें आपल्यावरील ही जबाबदारी लक्षांत घ्यावी."



# प्रस्तावना.

आम्हीं ज्या वेळीं, मराठा कुळांचा इतिहास लिहिण्याचें मनावर घेऊन, त्याप्रमाणें प्रथम भाग "जाधव घराण्याची कैफियत" या ग्रंथाचा प्रसिद्ध केला त्यावेळीं, आम्हांस या कामीं यश येईलच असें आमची मनोदेवता आश्वास सांगत नव्हती; कारण मराठा समाजामध्यें जें अज्ञान वास करीत आहे व त्यामुळें आळस व अनास्था हे जे दोन मुख्य दुर्गुण त्यांच्याठायीं वास करीत आहेत त्यांची पदोपदीं ओळख पटत असल्यामुळें, ह्या कामीं यश येणें दुरापास्त आहे असें आम्हांस वाटत होतें; परंतु लिहिण्यास फार आनंद वाटतो कीं, ब्रिटिश रियासतीमुळें आपल्या समाजामध्यें जो थोडाबहुत विद्येचा प्रसार झाला आहे त्यामुळें प्रत्येक सुशिक्षित व त्यांच्या संसर्गानें अशिक्षित मराठ्यांसही,–ज्या राष्ट्राच्या अभ्युदयास आपल्या पूर्वजांचें शौर्य कामीं आलें, त्यांचे अतुलप्रताप, त्यांच्या अपूर्व करामती, त्यांची स्थितिगति, त्यांचे आचारविचार आपणांस पूर्णपणें माहीत असले तर आपण व आपले वंशज यांस किती तरी फायदे होतील; हताश व नेभळटपणाचे उद्गार आपल्या व तरुण पिढीच्या मुखांतून कधींही निघावयाचे नाहींत; आपण व आपली भावी पिढी यांची दृष्टि उद्योगाकडे वळेल; दुर्व्यसनांचा त्याग करण्याची आवड उत्पन्न होईल; मदांधपणा व अज्ञान यांस दूर झुगारून देऊन आपल्या पूर्वजांचें वैभव, त्यांची मर्दुमकी, त्यांची हिंम्मत यांचें स्मरण होऊन इतर सुशिक्षित व पुढें गेलेल्या समूहाबरोबर आपण आपल्या कर्तृत्वाच्या योग्यतेवर सारखेपणा मिळवूं" असें–वाटावयास लागलें आहे. त्यामुळेंच आज आम्हीं ह्या आरंभिलेल्या कार्याला प्रत्येक मराठा बंधु हातभार लावूं लागला आहे ही अत्यानंदाची गोष्ट होय. निदान आमच्या ह्या चळवळीनें '**मराठा बांधव**' आपआपलीं जुनीं कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडत असलेलीं दफ्तरें चाळून पाहूं लागले आहेत व त्यांस त्या योगें आपल्या पूर्वजांची स्मृति होत आहे ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट होय !

ह्या आपल्या अवाढव्य देशांत अनेक लोकांचें वास्तव्य असून निरनिराळ्या समूहांनीं राज्य सुख उपभोगिलें आहे. पण त्या सर्वांवर मराठ्यांची कडी आहे. कोणाच्यानेंही त्यांची बरोबरी करविली नाहीं. राजस्थानचा इतिहास ज्या शूर व पराक्रमी अशा रजपूतांच्या शौर्यवीर्यादि पराक्रमानें भरलेला आहे व ज्यांची गणना यूरोपचे पृथ्वीमध्यें अति शूर म्हणून नांवाजलेले स्पार्टन यांच्याशीं करितात. त्या रजपूतांसही क्षुल्लक अशा कंगाल अवस्थेंतील मराठयांनीं पाणी पाजलें. त्या मराठयांच्या शौर्यास, त्यांच्या कर्तबगारीस आणि त्यांच्या तेजस्वीपणास कोणती उपमा द्यावी ? त्यांचा संपूर्ण इतिहास प्रकाशांत नसल्यामुळेंच, आज मराठा बांधवांस दैन्यावस्था आलेली आहे. पूर्व स्मृति झाल्याशिवाय त्यांच्या हातून कांहीं व्हावयाचें नाहीं. ते असेच अज्ञानांधःकारांत खिचपत पडणार. जर इंग्रजप्रभूच्या कृपेनें आपणांस सध्यां प्राप्त झालें आहे येवढें ज्ञान प्राप्त झालें नसतें तर आमच्या समाजाची स्थिति कोणती झाली असती–त्याचें अस्तित्व-कितपत स्वाभिमानयुक्त असतें ! याचा आमच्या बंधूंनींच विचार करावा.

सर्व जगाला थक्क करून सोडणाऱ्या आमच्या पूर्वजांनीं आम्हांस किती तरी धडे शिकण्यासाठीं शिल्लक ठेविले आहेत. त्यांनीं आपल्या क्षात्रतेजानें आपला मायदेश व आपलें कूळ धन्य करून सोडलें. आज आपणांस मीं '**मराठा आहें**' हें सांगण्यामध्यें जो अभिमान दिसून येतो तो त्यांच्याच पराक्रमाचा–त्यांच्याच क्षात्रतेजाचा द्योतक होय ! निस्सिम स्वामि-

भक्तकार्यपरायणता व संघशक्तीचें बळ दाखवून त्यांनीं आम्हांस एकमेकांचा मत्सर न केल्यास कार्यसिद्धि कशी होते याचीं उदाहरणें आपल्या कृतीनें घालून दिलीं आहेत. त्यांचा आपण कित्ता कां गिरवूं नये ?

मराठा बांधवहो ! असे निरुत्साह होऊं नका. आपलें दैन्य नाहींसें होऊन आपली भावी पिढी ज्ञान संपन्न व्हावी व स्वामिभक्त निपजावी म्हणून प्रयत्न करा. आपल्या पूर्वजांच्या कृतीच्या वाचनानें आपणांस व आपल्या भावीपिढीस पूर्ण आनंद प्राप्त होईल. आपली महत्त्वाकांक्षा अत्यंत तीव्र होईल. आपल्या सद्यस्थितींतून उड्डाण करावयाचें तीस सामर्थ्य प्राप्त होईल. आपले पूर्वज कोण होते ? त्यांनीं काय केलें ? व आपण काय करीत आहों ? याची तुलना आपणांस करावयास सांपडेल. आपल्या स्वामीच्या सेवेप्रित्यर्थ आपल्यांतील शूर मराठ्यांनीं आपल्या प्राणांचे बळी दिले आहेत. स्वामिआज्ञा म्हणजेच ज्यांचा मोक्ष ! एकनिष्ठ सेवा हेंच ज्यांचें व्रत ! अशा मानी पूर्वजांचे आपण वंशज आहों. वारा वाहील तशी पाठ देणें हें आपलें कर्तव्य होय ! आपल्या पूर्वजांनीही आपल्या कृतीनें हेंच सिद्ध करून दाखविलें आहे. स्वसत्तेचें निर्मूलन होतांच, त्यांनीं यवनसेवेंत आपला देह झिजविला. परंतु आपलें क्षात्रतेज वायां जाऊं दिलें नाहीं. यवनसाम्राज्यानंतर मराठशाहीमध्येंही त्यांनीं आपणांस आपल्या क्षात्रवृत्तीचा विसर पडूं दिला नाहीं. हे गडबडीचे व धामधुमीचे दिवस निघून जाऊन समर्थ इंग्रजप्रभूचें सध्यां आपणांवर स्वामित्व आहे. त्यांनीं आजपर्यंत जें कार्य केलें आहे तें इतकें उच्चतम आहे कीं, त्या त्यांच्या कार्याबद्दल आपण त्यांचे अत्यंत आभारी असलें पाहिजे. आमची रानटी अवस्था लुप्त होऊन आम्हीं मनुष्यत्वास पावत आहों. आमच्या ज्ञानशक्ति ज्या आज कैक वर्षे लुप्त झाल्या होत्या त्या प्रज्वलित होत आहेत. आमचे जे हक्क आहेत ते आम्हांस कळूं लागले आहेत.समान हक्क व धार्मिक बाबतींतील स्वातंत्र्य यांचा आपणांस लाभ झाला आहे. विद्यामंदिराचीं द्वारें खुलीं असून अतिशूद्रापासून कोणत्याही वर्गास सरस्वती देवीचा प्रसाद ग्रहण करण्यास आडकाठी राहिलेली नाहीं. अशा प्रकारचे आमचे फायदे झाले आहेत. ह्या काळांतील आमच्या मराठा बांधवांचें खरें कर्म म्हणजे, ज्ञानसंपन्न होऊन आपली उन्नति करणें हेंच होय. तें त्यांनीं बजाविल्यास त्यांची हीन स्थिति सहज नाहींशी होईल.

ब्राह्मणांनीं ज्याप्रमाणें आपलें वेदाध्ययन सोडून सेवाधर्म स्वीकारिला आहे, त्याचप्रमाणें क्षत्रियांनींही आपली क्षात्रवृत्ति सोडून काळास अनुसरून सेवाधर्म अंगिकारिलेला आहे. अद्याप कित्येक ब्राह्मण आपल्या सौजन्यानें आपलें कर्तव्य करीत आहेत, त्याचप्रमाणें क्षत्रियवीरही **'शिपाईगिरी'** मध्यें कीर्ति मिळवून धन्यता संपादित आहेत. शिपाईगिरीचा पेशा हा सध्यां कमी प्रतिचा गणला जातो; परंतु त्यांतच क्षत्रियत्वाचे बीज आहे. पूर्वींचे आमचे वाडवडील शिपाईबाण्याचेच होते. व त्याच बाण्यास सांभाळून त्यांनीं आपलें क्षत्रियत्व राखलें व आपल्या शौर्यवीर्यादि पराक्रमानें, एका यःकश्चित शिपायापासून वाढत वाढत मोठमोठे मनसबदार, देशमुख, सरदार, सेनापति, व राजे बनले गेले हें शिपाईगिरीस तुच्छ समजणारांनीं लक्षांत घेतलें पाहिजे. यावरून सर्वच ब्राह्मणांचा लोप झाला किंवा सर्वच क्षत्रियांचा लोप झाला आहे, असें विधान करणें चुकीचें होईल. असो. आतां आपण आपल्या

# मराठा कुळांचा इतिहास.

## भाग १ ला.

'जाधव घराण्याची कैफियत' ह्या ग्रंथाकडे वळूं. हा ग्रंथ ह्या कुळांतील मान्यवर श्री. स. शंभुसिंगजी अमरसिंग जाधवराव राजे मालेगांवकर यांस अर्पण करण्यांत आला; तो राजेसाहेबांस पसंत पडून त्यांनीं आम्हांस तीनशें रुपयांचें बक्षिस पाठविलें व ह्या ग्रंथ-प्रकाशनाच्या महत्‌कृत्यास उत्तेजन दिलें; याबद्दल आम्हीं ह्या ठिकाणीं श्री. **राजे शंभुसिंगजी** यांचे आभार मानीत आहों. ह्या जाधवरावांच्या मदतीनेंच आम्हांस हें हातीं घेतलेलें कार्य तडीस न्यावयास उमेद आलेली आहे. त्याचप्रमाणें श्रीयुत सुबराव पवार यांनींही १५ रुपयांची रक्कम देणगी दाखल पाठवून आम्हांस ऋणी केलें आहे. तसेंच आमच्या बऱ्याच हितचिंतक मित्रांनीं ह्या इतिहासाच्या आश्रयदात्यांमध्यें प्रत्येकीं एक पासून बारापर्यंत आश्रयदाते मिळवून दिले,

याबद्दलही त्यांचे आभार मानीत आहों. तरीही अद्याप आम्हांस बऱ्याच आश्रयदात्यांची जरूरी आहे. हा १५० पृष्ठांचा एक एक भाग फक्त आठ आण्यांत द्यावयास आश्रयदात्यांची संख्याही बरीच असावी लागेल. ती वाढविण्यासाठीं आमचे सहृदय मराठा-बांधव शक्य ते प्रयत्न करितील व यथाशक्ति एक दोन असे आश्रयदाते मिळवून देतील अशी आम्हांस उमेद आहे.

आतां जाधव-घराण्याची कैफियत हा पहिला भाग मराठा-बांधव व विद्वज्जन यांस कितपत आवडला यासंबंधें या ठिकाणीं थोडेंसें विवेचन केलें असतां अप्रासंगिक होणार नाहीं. आमच्या मराठा-बंधूंस हा भाग पसंत पडलाच आहे व त्यासंबंधीं बरींच पत्रें आमच्याकडे आलेलीं आहेत. त्यांतील बहुतेकांत आमची-आम्हीं हें कार्य आरंभिल्यामुळें-वृथास्तुति केलेली असल्यामुळें, आपली आपणच पुंगी वाजविल्याप्रमाणें समज होण्याचा संभव आहे म्हणून आम्हीं त्यांतील आशय न देतां त्यांच्या जाणीव बुद्धीबद्दल या ठिकाणीं त्यांचे आभार मानीत आहों. मनुष्यप्राण्याचें जें कर्तव्य असतें तें त्यानें केलें पाहिजे, त्यांत अंतर पडतां कामा नये. त्याप्रमाणेंच ज्या ज्ञातींत आपण जन्म घेतला आहे, त्या ज्ञातिसंबंधां आपलें जें कर्तव्य असेल तेंही आपण केलेंच पाहिजे. या विद्वज्जनांच्या अभिप्रायानुरूप आम्हीं आपलें कर्तव्य करीत आहों. कर्ताहर्ता तो सर्वसाक्षी भगवान् होय! **यत्कृत यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम्। त्वया कृतं तु फल भुक्त्वमेव मधुसूदन॥** म्हणजे मीं जें केलें आहे व जें यापुढें करीन तें सर्व मीं केलेलें नव्हे. तर हे मधुसूदना, तें सर्व तूंच केलें आहेस, व त्याचा फलभोक्ताही तूंच आहेस.

मराठा-समुहाखेरीज इतर वृत्तपत्रें, मासिकें यांमध्यें, तसेंच ज्या विद्वान् मंडळींस आम्ही त्यांच्या निरपेक्ष अभिप्रायाबद्दल पुस्तकें रवाना केलीं होतीं त्यांचे, जे अभिप्राय आलेले आहेत ते या भागीं दिलेले आहेत. त्यांत कित्येक ठिकाणीं आमची स्तुतीही केलेली आढळेल; परंतु त्याचें उत्तर आम्हीं वर दिलेलेंच आहे. ह्या अभिप्रायांवरून ही आमची प्रथम कृति विद्वान् मंडळीस पसंत पडली आहे असें म्हणावें लागेल. त्यांत कित्येकांनीं आम्हांस ब्राह्मण व मराठे ह्या दोन ज्ञातींमध्यें द्वेषबुद्धि न वाढेल असें लेखाचें स्वरूप ठेवण्यासंबंधानें, तसेंच आपल्या जातभाईचा इतिहास लिहितांना मराठ्यांची बाजू फुगवून न दाखविण्यासंबंधानें खबरदारी घ्यावयाच्या सूचना केल्या आहेत. पण आम्हीं स्वपक्षमंडनार्थ निव्वळ द्वेषबुद्धीनें अर्थाचा अनर्थ करून इतिहासाची पायमल्ली मुळींच केलेली नाहीं. जें आम्हांस सत्य भासलें तें आम्हीं निरपेक्षपणें लिहिलें आहे. चंद्रसेन व बाळाजी विश्वनाथ यांच्या वैमनस्यासंबंधानें आम्हीं चंद्रसेनाचाच पक्ष धरून वकिली केली आहे, किंवा संताजी व धनाजी यांच्या वितुष्टामध्यें धनाजीची वकिली केली आहे, असें कोणास वाटल्यास त्यांची चुकी आहे. आम्हीं ह्या दोन्ही पुरुषांच्या कारकीर्दीसंबंधानें जें जें लिहिलें आहे, त्याबद्दल जागोजाग पुरावे दिलेले आहेत. चंद्रसेनाच्या कारकीर्दीसंबंधानें आमच्या म्हणण्याच्या पुष्टयर्थ आम्हीं श्री० गोविंद स० सरदेसाई यांस काय वाटतें तेंही लिहिलें आहे. ज्याप्रमाणें बाजीरावाबरोबरील त्रिंबकराव दाभाड्यांचें वितुष्ट मोडण्याबद्दल शाहू छत्रपतीनें प्रयत्न केला, तसा प्रयत्न त्यावेळीं बाळाजींचें व चंद्रसेनाचें वितुष्ट मोडण्याकडे शाहूनीं केला असता, तर कितीतरी फायदे झाले असते; यांत मुळींच संशय नाहीं व प्रत्येक इतिहासज्ञ हें कबूल करील. असो.

मराठा-कुळांचा इतिहास भाग १ ला जाधव घराण्याची कैफियत ह्या ग्रंथाचें पृष्ठ ३५ वरील ९ व्या ओळीमध्यें एक चुकी राहिलेली आहे. ती ही कीं, '१६ दिवसांतच' ह्या शब्दाऐवजीं '१६ महिन्यांतच' असें पाहिजे. ती तेवढी चूक सर्वत्रांनीं आपआपल्या संग्रहीं असलेल्या पुस्तकांत दुरुस्त करून घ्यावी अशी विनंति आहे.

आजरोजीं, हा जो मराठा-कुळांचा इतिहास भाग २ रा प्रसिद्ध केलेला आहे, यांत चालुक्य घराण्याची पूर्वपरंपरा देऊन त्याच घराण्याच्या गुजराथेंतील सोळंखी वंशाची कारकीर्द दिलेली आहे. तसेंच तेथून हें घराणें महाराष्ट्रांत येऊन साळुंखे-पाटणकर हें नामाभिधान कसें पावलें गेलें तें प्रत्येक पुरुषाची कारकीर्द देऊन प्रतिपादन केलेलें आहे. ह्या कारकीर्दीमध्यें वाचकांस कांहीं ठिकाणीं गोंधळल्यासारखें होण्याचा संभव आहे. पण त्यास नाइलाज आहे. चालुक्य घराण्याची परंपरा बहुतेक शिलापट्ट-ताम्रपटांवरच

अवलंबून असल्यामुळें व गुजराथची माहिती बहुतेक गुर्जर ग्रंथकारांवर अवलंबून असल्यामुळें त्या कारकीर्दींचा जसजसा शोध लागला, तसतशी ती लिहिलेली आहे. राज्यक्रांतीनंतर ते पुरुष अज्ञानावस्थेंत असल्यामुळें त्यांची पूर्ण माहिती ताम्रपट इत्यादि साधनांच्या द्वारें मिळणें शक्य नव्हतें. त्यामुळेंच चालुक्यांच्या शेवटची कारकीर्द व गुजराथच्या सोळंखी वंशाची कारकीर्द यांचा मेळ बसविणें जड जात आहे. तसेंच वाघेल वंशाच्या समाप्तीनंतर (इ० स० १२९७) कर्ण वाघेल दंतागिरीच्या आसपास राहूं लागल्यापासून जोत्याजीरावाच्या उदयकालापर्यंतची (इ० स० १५७२) म्हणजे सरासरी अडीचशें पावणेतीनशें वर्षांची माहिती मिळत नाहीं. ही खेदाची गोष्ट होय! आमच्या एका मित्रानें आम्हांस एका जुन्या बखरीवरून पाठविलेली या घराण्याचा संबंध दर्शविणारी माहिती आम्हीं पृष्ठ ९६ वर दिलेली आहे. तींत जी माहिती दिली आहे तींत बराच तथ्यांश आहे असें दिसून येत आहे. ती बखर आम्हांस वाचावयास मिळावी म्हणून आम्हीं प्रयत्न करीत आहों. मिळाल्यास येत्या भागीं ह्या घराण्याचा जो हा दुवा विस्कळीत दिसत आहे तो जडवून टाकण्यांत येईल—व इतरही कांहीं माहिती मिळाल्यास देण्यांत येईल. ह्या घराण्यांतील मान्यवर श्री० सरदार भीमराव ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर फर्स्टक्लास सरदार डेक्कन एण्ड कोल्हापूर, यांनीं आपल्या घराण्याचा इतिहास प्रसिद्ध करण्याचीं साधनें देऊन जी ही आम्हांस अमोलिक संधि प्राप्त करून दिली तीबद्दल आम्हीं त्यांचे अत्यंत आभारी आहों.

ह्या घराण्याची हकीकत कै० श्री० नागोजीराव बाबासाहेब यांजपर्यंत प्रथम प्रसिद्ध केली होती; कारण कै० श्री० नागोजीरावांचे चिरंजिव श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर फर्स्टक्लास सरदार डेक्कन एण्ड कोल्हापूर, सध्यांचे सरंजामदार यांजकडून कै० श्री० नागोजीरावांच्या मृत्यूनंतरच्या हकीकतीचें टांचण वेळेवर न आल्यामुळें ती हकीकत पुरवणी ह्या सदराखालीं पृष्ठ ९३ च्या पुढें घेण्यांत आलेली आहे. तसेंच कै०श्री० नागोजीराव यांच्या पूर्वीच प्रसिद्ध झालेल्या हकीकतीमध्यें चुकीनें कांहीं ठिकाणीं वर्तमान काळीं प्रयोग केलेले तसेच राहिले आहेत ते भूतकालीन आहेत असें समजावें. ह्या हकीकतीनंतर मीरकर सावंत ऊर्फ साळुंखे, साळुंखे ऊर्फ अनेराव, इंदप ऊर्फ साळुखे ह्या घराण्यांचाही त्रोटक वृत्तांत देण्यांत आला आहे. तसेंच श्री० सरदार रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब पाटणकर यांनीं आपल्या पूर्वजांचे फोटो प्रसिद्धीसाठीं पाठविले, त्याबद्दल त्यांचेही अत्यंत आभारी आहों. श्री० सरदार रामचंद्रराव पाटणकर यांच्या ग्वाल्हेर येथील घराण्याची हकीकत या भागीं त्रोटक रुपानें देण्यांत आली आहे. कारण ती वेळेवर मिळूं शकली नाहीं, तरी ती पुढील भागीं दाखल करण्यांत येईल. तसेंच आजच्या ह्या दुसऱ्या भागीं अंकलीकर शितोळे घराण्याची कैफियत प्रसिद्ध केली आहे. या कैफियतीसंबंधानें इतकेंच लिहावयाचें आहे कीं, ज्या पुरुषापासून ह्या घराण्याची हकीकत मिळाली, त्याच पुरुषापासून तिची सुरुवात केलेली आहे. कारकीर्दीचे सन वगैरे बरोबर मिळत नसल्याकारणानें दिलेले नाहींत. हिचा भावी इतिहास–संशोधकांस बराच फायदा होईल अशी आम्हांस आशा आहे. हीही कैफियत श्री० आप्पाजीराव शितोळे देशमुख अमीर-उल-उमरा, सेनाहरदस्तहजारी ग्वाल्हेर, यांच्या कृपेनें साधनें मिळून प्रसिद्ध करण्याची सुसंधी लाभली याबद्दल त्यांचेही अत्यंत आभारी आहों. विषयानुरोधानें आजच्या भागा मध्यें भोंसले, मोरे, निंबाळकर, शिर्के, घाटगे, शिंदे, पवार, दाभाडे, गायकवाड, भोंसले नागपूरकर, कदमबांडे, डफळे ऊर्फ चव्हाण, माने, घोरपडे, वाडीचे सावंत, दळवी, आंगरे, थोरात, भोंसले अक्कलकोटकर, दळवी भोंसले, साटम ऊर्फ जाधव, वाघोलीकर व वाडीकर जाधव, महाडीक, वगैरे इतिहास प्रसिद्ध पुरुषांच्या कुळांची मूळपीठिका थोडक्यांत देण्यांत आली आहे. आम्हीं आज ह्या भागीं जी ही माहिती दिली आहे ती फक्त इतिहासामध्यें प्रसिद्धीस आलेल्या कुळांचीच आहे ह्या कुळांच्या किती तरी अशा शाखा आहेत कीं, त्यांचा इतिहास प्रसिद्ध होणें अगत्याचें आहे, तरी प्रत्येक शाखेंतील पुरुषांनीं आपआपल्या शाखेची माहिती पाठविल्यास आभार होतील.

ह्या व दुसऱ्याही ज्या अनेक मराठ्यांच्या कुळांतील पुरुषांकडून अद्यापही आपल्या हकीकति फोटो वगैरे आले नसतील, त्या त्यांनीं त्वरित पाठविण्याची कृपा करावी. आपल्याजवळ कागदपत्रांचीं साधनें आहेत, पण तीं गुळविणें अपरिहार्य वाटत असेल तर त्यांच्या नकला आमच्याकडे पाठवाव्या म्हणजे आम्हीं त्या त्या कुळांची

कैफियत संगतवार लिहून प्रसिद्ध करूं. मराठा कुळामध्यें जन्म घेतलेल्या महाभागांनीं आपल्या पूर्वजांचा कीर्तिरव प्रकाशित करण्यासाठीं आम्हांस आपल्या संग्रहीं असलेलीं साधनें देऊन मदत करावी अशी विनंति आहे.

श्रीयुत गद्रे यांनीं इंदुप्रकाशमध्यें पत्रव्यवहार करून जाधव घराण्याच्या कैफियतीच्या दुसऱ्या भागासंबंधानें संशय प्रगट केला होता; पण त्यांस आम्हीं त्याच पत्रामध्यें " कोणतीही कारकीर्द खोटी आहे असें म्हणण्यापूर्वी तीबद्दलचा पुरावा प्रसिद्ध करणें अगत्याचें आहे. पुराव्यावांचून पिढिजाद टांचण खोटें आहे असें फक्त सहा पिढयांची कारकीर्द साधारण वाढलेली असली म्हणून त्या पिढया कल्पना सृष्टीतील आहेत असें म्हणण्याचें धाष्ट्य करणें सर्वथैव गैर होय." अशा अर्थाचें उत्तर दिलें आहे. आम्हीं जी माहिती प्रसिद्ध केली ती श्री० जाधवराव यांच्या टांचणावरून प्रसिद्ध केलेली आहे, तीस ऐतिहासिक पुरावा एका गोविंद देवाशिवाय दुसऱ्या कोणाचा नाहीं--कारण कोणत्याही प्रसिद्ध घराण्याचें राज्य नष्ट झाल्यानंतर त्याची पुढील पिढयांची कारकीर्द प्रचारांत न येतां गुप्त असते. कारण त्या वेळच्या इतिहासकारांस त्या कारकीर्दीचीं साधनें मिळणें अशक्य होतें, त्या प्रकारावरूनच बहुतेक प्रसिद्ध घरण्यांच्या कारकीर्दीची माहिती मिळत नाहीं. असो.

श्री० हणमंत गोपाळराव फाळके जहागीरदार ग्वाल्हेर, यांनीं अंकलीकर शितोळे व ग्वाल्हेर येथील पाटणकर घराण्यांच्या माहितीचें टांचण मिळवून देण्याच्या कामीं आम्हांस जी मदत केली आहे, तीबद्दल आम्हीं त्यांचे अत्यंत आभारी आहों. तसेंच श्रीयुत गोविंद जनार्दन बेडेकर यांनीं लिहिलेल्या पाटणकरांच्या हकीकतीचाही आम्हांस बराच उपयोग झाला आहे त्याबद्दल त्यांचेही अत्यंत आभारी आहों. शिवाय ज्या ज्या ग्रंथकर्त्यांच्या ग्रंथांचा ह्या कैफियती लिहिण्याच्या कामीं आम्हांस उपयोग झाला आहे, त्या सर्वांचे आम्हीं निरपेक्षपणें आभारी आहों.

हा ग्रंथ छापतेवेळीं तांतडीनें छापणें भाग पडत असल्यामुळें, यांत कांहीं अशुद्धें, ऱ्हस्व दीर्घ वगैरे दोष राहिले आहेत. कित्येक मजकूर पुनः पुनः छापावा लागत आहे. त्यांचें शुद्धिपत्र दिलेलें नाहीं. तरी त्याबद्दल सहृदय वाचक क्षमा करितील अशी आशा आहे.

शेवटीं ज्या जगच्चालकाच्या कृपेनें हा मराठाकुळांचा इतिहास भाग २ रा पूर्ण होऊन थोड्या उशीरा कां होईना आश्रयदात्यांपुढें ठेवितां आला; त्याबद्दल त्या जगच्चालकाचे आभार मानून अशीच कृपा यापुढेंही ठेव म्हणून त्यास विनंति करितों.

आपला सर्वांचा नम्र दास,
**गोपाळ दाजीबा दळवी.**
ग्रंथप्रकाशक.

भायखळा ता० २८-७-१९१२.

---

## आजच्या कैफियतींतील चित्रांचा तपशील.

१ श्रीमंत सरदार भीमराव ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर फर्स्टक्लास सरदार व जहागीरदार, डेक्कन एन्ड कोल्हापूर.

२ कै० नागोजीराव ऊर्फ बाबासाहेब पाटणकर कोल्हापूर.

३ कै० श्रीमंत सरदार रामचंद्रराव ऊर्फ आपासाहेब पाटणकर, ग्वाल्हेर येथील पाटणकर घराण्याचे मूळपुरुष, कै० श्री० बायजाबाईसाहेब शिंदे यांचे जामात.

४ कै० श्रीमंत सरदार त्रिंबराव रामचंद्रराव ऊर्फ आपासाहेब पाटणकर, ग्वाल्हेर.

५ श्रीमंत सरदार रामचंद्रराव त्रिंबकराव पाटणकर, ग्वाल्हेर.

६ श्रीमंत सरदार त्रिंबकराव रामचंद्रराव पाटणकर, श्री० स० रामचंद्रराव पाटणकर यांचे चिरंजीव.

७ श्रीमंत सरदार सूर्याजीराव रामचंद्रराव पाटणकर, श्री० स० रामचंद्रराव पाटणकर यांचे कनिष्ट चिरंजीव.

८ श्रीमंत सरदार आप्पाजीराव शितोळे, अमीर-उल-उमरा, सेना हरदु सरखी, ग्वाल्हेर.

# साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

## चालुक्य घराणें.

### अनुक्रमणिका.

त्संगाचें आगमन. त्याचा अभिप्राय. महाराष्ट्राचें वर्णन. इराणच्या राजाकडे वकील पाठवितो. विष्णुवर्धनास सातारा व पंढरपूर ह्या प्रांतांचा कारभारी नेमतो. जयसिंहाची नेमणूक नाशिकच्या आसपासच्या प्रदेशावर होते. चंद्रादित्य कुडाळप्रांताचा कारभार करितो. त्याचा किताब. त्याची राणी. विजयभट्टारिका 'कोचरें' गांव व त्यालगतचें 'खाजण' दान देते. ताम्रपट्टाची नक्कल. नेरूरगांवीं सांपडलेलीं दानपत्रें.

**विक्रमादित्यः**—( इ० स० ६४१–६८० ). दक्षिणप्रांतींच्या राजांवर सत्ता प्रस्थापित करितो. 'पल्लव' राजांस जिंकतो. 'लाट' देशांत चालुक्यवंशाच्या एका शाखेची स्थापना. जयसिंहवर्मास लाट प्रांत मिळतो.

**विनयादित्यः**—(इ० स० ६८०–६९६). पल्लवराजास जिंकतो. गंगकुल, अलुप नांवाचे लोकांस जिंकतो. सर्वत्र राजांस दोस्त बनवितो. पारसिक, सिरियन व सिंहलचा राजा यांस जिंकतो. उत्तरहिंदुस्थानांतील राजांस जिंकून सार्वभौमपद मिळवितो.

**विजयादित्यः**—( इ० स० ६९६–७३३ ). शत्रूंबरोबर लढत असतां कैद होतो. तेथून राज्याचा बंदोबस्त करितो. वातापीपुर येथें ब्रह्मा, विष्णु, महेश्वर यांच्या मूर्तींची स्थापना करितो.

**दुसरा विक्रमादित्यः**—( इ० स० ७३३–७४७ ). गादीवर बसतांच पल्लवराजाबरोबर युद्ध होतें. पल्लव राजाचा पराभव. ब्राह्मणांस दान देतो. देवस्थानांतील सोनें देववितो.

**दुसरा कीर्तिवर्मः**—( इ० स० ७४७–७५३ ). तो एकटाच पल्लवांच्या राजावर स्वारी करतो. पल्लव भिऊन पळतो. लूट मिळवून परत येतो. 'दंतिदुर्ग' नांवाचा राष्ट्रकूटवंशीय राजा चालुक्यांची सत्ता हरण करतो. चालुक्य वंशाच्या कारकीर्दींत झालेली समृद्धि. त्यांचा वर्तनक्रम. मिरज येथील ताम्रपटांतील उत्तरकालीन चालुक्यवंशाची परंपरा.

---

## उत्तरकालीन चालुक्य.

**तैलपः**—(इ० स० ९७३–९९७). 'चोलांच्या' देशावर स्वारी करतो. 'चेदीच्या' राजास पादाक्रांत करतो. गुजराथेंतील चालुक्य वंशाची स्थापना करणारा मूळराज याजवर स्वारी करतो. माळव्याचा राजा मुंज याजवर स्वारी करतो. मुंजाचा पराभव करून त्यास कैद करतो व त्याचा शिरच्छेद करतो. राष्ट्रकूटवंशीय कन्या जाकव्वा इजशीं लग्न करितो.

**सत्याश्रयः**—( इ० स० ९९७–१००८ )—

**पहिला विक्रमादित्यः**–(इ० स० १००८–१०१८).

**पहिला जयसिंहः**—( इ० स० १०१८–१०४० ). माळव्यांतील कट मोडतो. भोजराजास जिंकतो. चोलराजास जिंकून सप्तकोंकणाचा अधिकार मिळवितो.

**आहवमल्ल ऊर्फ पहिला सोमेश्वरः**—(इ० स० १०४०–१०६९). 'आहवमल्ल' व 'त्रैलोक्यमल्ल' हीं बिरुदें धारण करितो. चोलांवर स्वारी करितो. 'धार' हस्तगत करितो. भोजराजाची कथा. समुद्रकांठच्या देशांवर स्वारी करितो. चोलराजास जिंकतो. कनोजच्या राजास पळवितो. मुलांची व्यवस्था. कल्याणनगरी वसवितो. विक्रमादित्याचा पराक्रम. जलसमाधि घेतो.

**दुसरा सोमेश्वरः**—(इ० स० १०६९–१०७६ ). 'भुवनैकमल्ल' हें बिरुद धारण करतो. विक्रमादित्य व सोमेश्वर यांचा संप. सोमेश्वराचें जुलमी वर्तन. भावाभावांमधील वितुष्ट. विक्रमादित्याचा पराक्रम. कदंबाच्या कन्येबरोबर विवाह. चोलराजाच्या कन्येबरोबर विवाह. सोमेश्वर व विक्रमादित्य यांची लढाई. विक्रमादित्य विजयी होतो व सोमेश्वरास पदच्युत करून कल्याणच्या गादीवर बसतो.

**दुसरा विक्रमादित्यः**—(इ०स० १०७६–११२६). 'त्रिभुवनमल्ल' हें बिरुद धारण करितो. आपल्या नांवाचा शक सुरू करतो. कऱ्हाडच्या 'शिलाहार' वंशी राजाच्या कन्येशीं विवाह करतो. चंद्रलेखेचें वर्णन. ती स्वयंवरामध्यें विक्रमादित्यास वरते. बनवासी प्रांतावर जयसिंहाची नेमणूक करितो.

तो विक्रमादित्याच्या फौजेंत फितूर आरंभितो. विक्रमादित्य त्यास समजावितो. उभयतांची लढाई विक्रमादित्याचें सैन्य कच खातें. विक्रमादित्याच्या पराक्रमानें विजयमाला त्याच्या गळ्यांत माळ घालते. जयसिंहास क्षमा करितो. यादववंशीय 'होयसाळ' स्वारी करितो. यादववंशीय विष्णुवर्धनाबद्दल विक्रमादित्याची पूज्यबुद्धि. तो आपल्या एका संस्थानिकास त्याजवर पाठवितो. विष्णुवर्धनाचा पराजय होतो. गोवें काबीज करतो. विक्रमपुर वसवितो. काश्मिरच्या पंडितास आश्रय देतो. 'मिताक्षरा' ग्रंथाचा कर्ता 'विज्ञानेश्वर' याचे उद्गार.

**तिसरा सोमेश्वरः**—( इ० स० ११२६ ११३८ ). 'भूलोकमल्ल' हें बिरुद धारण करतो. 'मानसोल्लास' किंवा 'अभिलषितार्थ चिंतामणि' ह्या नांवाचा ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहितो. त्या ग्रंथांतील आशय. यास 'सर्वज्ञभूप' असें म्हणत.

**जगदेकमल्लः**—( इ० स० ११३८–११५० ).

**तैलपः**—(इ० स० ११५०–११६५). कलचुरी कुलांतील 'विज्जण' हा तैलपास आपल्या कह्यांत ठेवितो. तैलप धारवाडप्रांतांतील अन्निगेरी येथें पळून जातो. कलचुरी कुल राजसत्ता उपभोगितें. जैनधर्माचें प्राबल्य. नुर्मडि तैलपाचा पुत्र सोमेश्वर पुनरपि सत्ता मिळवितो.

**चवथा सोमेश्वरः**–'ब्रह्म' किंवा 'बोम्म' या नांवाच्या मांडलिकाचें सोमेश्वरास साह्य. हा बोम्म फार पराक्रमी होता. वीरबल्लाळ यादव यांची व बोम्माचीं युद्धें. वीरबल्लाळचा जय. चालुक्यवंशाची समाप्ति. साधारण विचार.



# साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची कैफियत.

## पूर्वकालीन चालुक्य.

### भाग पहिला.

## पूर्वकालीन इतिहासाची स्मृति.

पृथ्वीवरील सर्व ग्रंथांमध्यें प्राचीन असा वेदच होय. दुसऱ्या कोठेंही न लिहिलेली अशी माहिती यांत असल्यानें हा केवळ ज्ञानाचें भांडारच होय! वेदावलोकनानें आपणास असें कळून येतें कीं, आपणां सर्व आर्यांचें मूळ वास्तव्यस्थान उत्तर-हिंदुस्थान, व त्याच्या वायव्य दिशेकडील प्रांत, अफगाणिस्तान व त्याच्या आजुबाजूचा प्रदेश हेंच होय. बहुतांशीं आर्यांचें मूळ निवासस्थान हिंदुस्थानच असलें पाहिजे. व त्यासंबंधानें निरनिराळ्या ग्रंथकारांनीं ठोकळ अनुमानें केलेलीं आहेत. ज्यावेळीं आपण सर्व आर्य एके जागीं-मध्य-आशियामध्यें-रहात होतों, त्यावेळीं सर्वत्रांची भाषा एक (संस्कृत) च होती. ह्या ठिकाणाहूनच कित्येक आर्यांच्या टोळ्या इराण, ग्रीस, इटाली, स्पेन, इंग्लंड, जर्मनी व रशिया या देशांस गेल्या आणि कित्येक पूर्वदिशेकडे सरकत सरकत हिंदुस्थानामध्यें आल्या. पश्चिमेकडे गेलेल्या आर्यांनीं इराणचें राज्य स्थापिलें. कित्येकांनीं अथेन्स नांवाचें शहर वसविलें व कित्येकांनीं रोम शहरीं आपल्या राज्याची स्थापना केली, कित्येक स्पेनदेशामध्यें गेले व रुपें शोधूं लागले, कित्येक इंग्लंडमध्यें गेले व कथलाचा शोध करूं लागले. कित्येक खोरासान, रशिया तसेंच काळा समुद्र ओलांडून ग्रेसदेशापर्यंत गेले. आणि कित्येक आर्मिनीया देशामधून कॉकेशस पर्वत उल्लंघून जर्मनीमध्यें उतरले. ह्याप्रमाणें अनेक शोधकांनीं निरनिराळ्या प्रकारांवरून आर्यांच्या मूळ निवासस्थानाचा शोध केलेला आहे. हिंदु, पारशी, ग्रीक, रोमन, जर्मन आणि इंग्रज एकत्रच रहात होते. यांत तुराणी व शर्मी यांच्या कुटुंबांचा समावेश होत नाहीं, असें विद्वानांचें म्हणणें आहे.

कित्येक भाषा-व्युत्पत्तिकार भाषेच्या तुलनेनें आर्यांची एकच 'संस्कृत' भाषा होती; हें सिद्ध करीत आहेत. ह्याच आर्यांचे आपण वंशज आहों. ज्यावेळीं आर्य हिंदुस्थानांत आले; त्यावेळीं ते रानटी अवस्थेंत तर नव्हतेच, पण त्यांस अनेक गोष्टींची माहिती असून, त्यांनीं स्वसामर्थ्यानें अनेक धातूंचा शोध लाविला होता. लोखंड, तांबें, सोनें, रुपें वगैरे धातूंचा व मोत्यांचा उपयोग करण्याची त्यांस माहिती होती. कापड विणण्याची कला त्यांस अवगत असून शिवणकलाही उत्तम प्रकारें अवगत होती. शिल्पशास्त्रामध्येंही त्यांची उत्तम गति होती. नाण्यांचा उपयोगही ते करीत असत, असे आधार मिळाले आहेत. त्यांच्याजवळ निरनिराळ्या प्रकारचीं वाहनें होतीं. युद्धप्रसंगीं रथ व घोड्यांचा ते उपयोग करीत असत. घरें, वाडे, शहरें, किल्ले, शस्त्रें, वाजिंत्रें इत्यादि जरूरीच्या गोष्टींचे शोध करण्याकडे आपल्या बुद्धीचा उपयोग करून त्यांनीं आपल्या गरजा भागविल्या होत्या.

हिंदुस्थानची रसाळ व आल्हादजनक भूमि पाहून आर्यांस फार संतोष झाला व ज्यानें हीं पृथिव्यादि पंचमहाभूतें निर्माण केलीं, त्या ईश्वराची स्तुति करावी असें त्यांस वाटलें. स्फूर्ति होतांच त्यांच्या मुखांतून प्रेमोद्गार छंदोरूपानें बाहेर पडले. तेच ऋग्वेदामध्यें जसेच्या तसे दृष्टीस पडत आहेत. ऋग्वेदाच्या रचनेपूर्वी आर्यांची वृत्ति सुसंस्कृत झालेली असली पाहिजे. त्यांचें सामर्थ्य, कल्पना व अनुभवही पूर्णत्वास पोहोंचलेले असले पाहिजेत.

ह्या आर्यांचा काल आजपासून* बाराहजार वर्षां-

* 'भाषेच्या इतिहासावरून पाहतां आर्य लोकांचा अति प्राचीन आस्तित्वाचा काल खिस्तीशकापूर्वी दहा हजार वर्षेंपर्यंत लांबविण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.'—

पूर्वीचा असला पाहिजे. आर्यांचा काल पाहिजे तो असो, पण त्यांनीं हिंदुस्थानांत येण्यापूर्वी अफगाणिस्थान-मधील कुभानदी-जिला हल्लीं काबूल नदी—असें म्हणतात. तेथें बहुत दिवस वास केला. व त्याच ठिकाणीं वेदमंत्र गायनस्वरांत म्हणण्यास आरंभ झाला. ऋग्वेदाच्या कित्येक ऋचांमध्यें, कुभानदी, गोमती ( हल्लींची गोमल) सिंधु, शतद्रु ( हल्लींची सतलज ) परुष्णी ( हल्लींची रावी ) असिक्नी किंवा चंद्रभागा ( हल्लींची चिनाब ) वितस्ता ( हल्लींची जेलम ) ह्या नद्यांविषयींचीं वचनें ठिकठिकाणीं आढळत आहेत. त्यावरून अफगाणिस्थान सोडून सिंधुनदी ओलांडून ते पंजाबमध्यें आले असावेत. पुढें कित्येक वर्षांनीं ते पूर्वदिशेकडे गेले, ते थेट गंगा व यमुना नदीजवळ येऊन थांबले. आणि आस्ते आस्ते दक्षिणेकडेही येऊन त्यांनीं समग्र भरतखंड व्यापून टाकिलें.

त्यावेळीं त्यांच्यांत वर्ण नव्हते. सर्वत्र समान भाव होता. उचनीच हे भेद नव्हते. त्याकाळीं होम—हवनादिक कर्मांचें मोठें महत्त्व होतें, त्यामुळें वेदविहितकर्मै करणारे जे ऋषि—विद्वान् होते त्यांजवरच सर्व अधार असल्यामुळें, यज्ञकर्म करण्यासाठीं त्यांचीच विशेष जरूरी लागत असे. अर्थातूच पुरोहितवर्ग, ऋत्विज्वर्ग व श्रोत्रियवर्ग यांची जरुरी पडूं लागल्यामुळें त्यांची संख्या वाढूं लागली. व त्यांस ' ब्रह्म ' असें म्हणूं लागले. ब्रह्म म्हणजे ब्रह्ममंत्र बोलणारे, ते आपणास ' ब्राह्मण ' असें म्हणवूं लागले. परंतु ब्राह्मण शब्दाची दुसरी एक व्युत्पत्ति आहे, ती ही कीं,—

**' जन्मना जायते शूद्रः संस्कारैर्द्विज उच्यते ॥**
**कर्मणा याति विप्रत्वम् ब्रह्म जानाति ब्राह्मणः ॥'**

मनुस्मृति.

ह्या वचनाप्रमाणें, ज्यांनीं ब्रह्म जाणिलें त्यांसच ब्राह्मण जाणावें. असो. पुरोहितवर्ग, ऋत्विज्वर्ग व श्रोत्रियवर्ग यांचें सामर्थ्य अतोनात वाढलें. व वेद-काळच्या इतर मंत्रांविषयीं अज्ञान पडूं लागलें. एवंच ब्राह्मणांस श्रेष्ठत्व मिळालें गेलें. त्याच प्रकारची स्थिति क्षत्रियांची जाहली. कारण आर्यांचें ज्या ज्या ठिकाणीं वास्तव्य होऊं लागलें, त्या त्या ठिकाणीं पृथक् पृथक् असलेल्या जनसमूहावर अधिपति या नात्यानें जे सामर्थ्यवान् पुरुष सत्ता गाजवीत होते, त्यांच्या सत्तेचें महत्त्व वाढूं लागलें व त्यांस आस्ते आस्ते प्रत्येक बाबीची जरूरी वाढूं लागल्यावरून, त्यांनीं शिबंदीची व्यवस्था केली. आपल्या कुटुंबांतील अगर आज्ञेप्रमाणें वर्तणाऱ्यांस मोठमोठे अधिकार देण्याची जरूरी भासली. कायदे-कानू करणें भाग पडलें. अशाप्रकारें क्षत्रियवर्गही उपस्थित जाहला. तदनंतर इतर जनांमधून वैश्यवर्गाची उत्पत्ति जाहली. ह्यानें गुरांढोरांचा प्रतिपाळ, व्यापार, सावकारी आणि शेती हीं कामें आपल्या माथीं घेतलीं. अवशिष्ट सर्व जनांचा चौथा वर्ग ( शूद्र ) झाला. ह्या वर्गाकडे सर्वांची सेवा करण्याचें काम राहिलें.

ह्या चार वर्णांपैकीं वरील तीन वर्ण आपआपल्या स्थित्यनुसारें व पराक्रमानें वरील वर्णांत प्रवेश करूं शकत असत, क्षत्रिय—योद्धा यानें जर ब्रह्मविद्या—ज्ञान संपादन केलें तर त्यास 'ब्राह्मण' म्हणत असत. त्याची गणना ब्राह्मणांत होत असे. ' विश्वामित्र ' क्षत्रिय असूनही ज्ञान-संपादनानें ब्राह्मण झाला होता. 'वसिष्ठ' वेश्यापुत्र असूनही ज्ञान-संपादनानें ब्रह्मर्षि झालेला होता. पराशराची स्त्री 'सत्यवती' तर कोळ्याची मुलगी होती. जमदग्नीची स्त्री 'रेणुका' आणि अगस्तीची 'लोपामुद्रा' ह्या दोघीही राजकन्या असून, ब्राह्मणकुलामध्यें दाखल झालेल्या होत्या. यावरून त्या काळीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तिन्ही वर्णांमध्यें रोटीबेटीव्यवहार होत असे हें निश्चित होतें. 'ययाति' हा क्षत्रिय होता: परंतु त्याची प्रथम-स्त्री ब्राह्मणाचीच मुलगी होती. ह्याप्रमाणें ह्या वर्णांमध्यें त्या काळीं रोटी-बेटी—व्यवहार होत होता.

त्याकाळच्या ब्राह्मणवर्गानेंही जनतेवर फारच उपकार केले आहेत. त्यांनीं आपल्या ब्रह्मज्ञानाचा उपयोग भावी पिढीस व्हावा एतदर्थ अनेक ग्रंथांच्या रूपानें ज्ञानाचा केवल सागरच असें भांडार रचण्यास सुरुवात केली व राजांस प्रसंगोपात्त त्यांचें प्रधानत्व स्वीकारून योग्य सल्ला-मसलत देऊन शत्रूंचा संहार करविला, प्रसंगीं स्वतःही क्षात्रकर्म आचरिलें.

---

असे ता० ५ सप्टेंबर १८९२ रोजीं लंडन शहरामध्यें पूर्वेकडील भाषेच्या पंडितांची सभा भरली होती. त्यावेळीं अध्यक्ष मोक्षमुल्लर यांनीं वरील उद्गार काढले होते.

" The Aryan race on the earth is about a million years old "

' मिस ॲनी बिझांड म्हणतात कीं, आर्यांच्या उत्पत्तीस सुमारें दहालक्ष वर्षें झालीं आहेत. '

वेदकालामध्यें आर्यांनीं फारच काटकपणानें व धैर्यानें आपला ताबा चोंहोंबाजूंस बसविला होता व अनेक शत्रूंचा निष्पात करून ' दस्यु ' म्हणजे अनार्य लोक ( कोळी, गोंड, भील, कातकरी, निषाद वगैरे ) यांस जंगलांत पळून जावयास लाविलें. असें ऋग्वेदामध्यें नजरेस पडत आहे.

वेदकालीन क्षत्रिय जर ब्राह्मणाचींही कर्मे करूं लागले, तर त्यांस ' राजर्षि ' म्हणण्याचा संप्रदाय होता. अशा राजर्षींपैकीं, विश्वामित्र, जनक, ऋतुपर्ण व प्रियव्रत हे राजे प्रसिद्ध आहेत. अशा अभेदबुद्धीनें ज्या कालीं ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि वर्ण वागत होते, त्याकालीं ह्या आर्यावर्तामध्यें शांततेचें साम्राज्य झळकत होतें. सर्व कलांचा निवास असून, ऐश्वर्य, व ज्ञान यांचें भांडार भरलेलें होतें. ह्या शांततेच्या वेदकालानंतर ब्राह्मण व क्षत्रिय ह्या दोन्ही वर्णामध्यें भयंकर विरोध वाढला. प्रत्येकास श्रेष्ठपणा हवा होता. यज्ञ यागादि कर्मे ब्राह्मणांच्या वांटीं आल्यामुळें त्यांस प्रमुखत्व मिळालें व क्षत्रियांच्या हातीं सत्ता असल्याकारणानें तेही शिरजोर होऊं लागले. दोन्हीही पक्ष निरनिराळ्या प्रकारानें सत्ताधारी असल्यामुळें एकमेकांस नमून वागणें हें त्यांस कमी प्रतीचें वाटूं लागलें. अर्थात् वैमनस्यास सुरुवात झाली व ब्राह्मण-क्षत्रिय यांचीं युद्धें सुरू झालीं. त्याचा परिणाम यादववंशीय 'सहस्रार्जुन' याजबरोबर 'जामदग्न्य' (परशुराम) याचें युद्ध झालें आणि त्यांत सहस्रार्जुन मारला गेला व कांहीं काल क्षत्रियवर्ग निर्बल पडला.

यानंतरचा काल म्हणजे श्रीरामचंद्राचा होय. शरयू-नदीच्या तीरीं ' अयोध्या ' ह्या नांवाचें एक शहर वसविलेलें असून तेंच 'सूर्यवंशीय' राजांचें राजधानीचें शहर होतें. त्या शहराचा विस्तार बराच मोठा होता. हल्लीं तें मोडून त्याचीं लखनौ व फैजाबाद हीं शहरें झालीं आहेत. सूर्यवंशाचा वंशविस्तार वाल्मिकीय रामायणामध्यें दिलेला आहे. त्यामध्यें कर्नल टॉड यांनीं सूर्यवंशाची वंशावळी दिली आहे; तीमध्यें बराच फरक दिसून येत आहे. रामायणामध्यें 'वैवस्वतमनू'पासून श्रीरामचंद्रापर्यंत पंचवीस राजे होऊन गेल्याचें वर्णन दृष्टीस पडत आहे; परंतु कर्नल टॉडनें जी वंशावळी दिलेली आहे, तीवरून मनूपासून श्रीरामचंद्रापर्यंत एकुणसाठ राजे दृष्टीस पडत आहेत. असो.

हे सूर्यवंशीय राजे अयोध्येमध्यें राज्य करीत होते, त्यावेळचा त्यांचा काळ* इ० स० पूर्वी ३५०० वर्षें कदाचित् ४००० वर्षें असावा, असें कित्येक पुराव्यांवरून वाटत आहे. ह्याच सूर्यवंशीय श्रीरामचंद्राचा पुत्र 'लहु' याच्यापासून ५४ व्या पिढींत 'सुमित्र' नांवाचा पुरुष झालेला असून त्यापासून आपली उत्पत्ति आहे, असें मेवाडचे राणे म्हणतात. व महाराष्ट्रांतील प्रसिद्ध भोंसले घराण्याचीही उत्पत्ती याच पुरुषापासून झालेली आहे. ती माहिती भोंसले घराण्याच्या कैफियतीमध्यें प्रसिद्ध करण्यांत येईल.

सूर्यवंशीय रामचंद्रानें आपल्या आयुष्यामध्यें जीं जीं संस्मरणीय कृत्यें करून ठेविलीं आहेत. तीं नित्य पठनास योग्य अशींच आहेत, आपल्या बालपणापासूनच त्यास युद्धकलेचें शिक्षण मिळून त्याचा प्रभावही दाखविण्याचा प्रसंग विश्वामित्रासारख्या वाकबगार गुरूकडून मिळाला. स्वसामर्थ्याच्या बळावर नववधू मिळविण्याचा योग प्राप्त झाला. परशुरामासारख्या,-'धनुर्विद्येमध्यें मजप्रमाणें कोणीही कुशल योद्धा नाहीं.'-असें समजणाऱ्या उन्मत्त ब्राह्मणाचा त्याजकडून गर्व हरण करण्यांत आला. आपल्या देहास कितीही कष्ट झाले, तरीही पितृआज्ञेचें उल्लंघन न करितां सपत्नीक वनवासास जाऊन त्यानें इतरांस उदाहरण घालून दिलें. आपल्या सामर्थ्यावर भिस्त न ठेवितां आपल्यापेक्षां सामर्थ्यानें जरी कमी प्रतीचे कांहीं लोक असले, तरी प्रसंगीं त्यांची मदत कितीतरी उपयोगी पडत असते, हें लक्षांत वागवून दूरदर्शित्वानें सुग्रीव, हनुमान्, अंगद, नळ वगैरे दक्षिणदेशच्या योद्धयांस साह्य करावयास घेतलें. व त्या योद्धयांनींहीं आपल्या चिकाटीनें, आपल्या अंगच्या काटकपणानें, रावणासारख्या बलाढ्य राजाच्या नगरास (लंकेस) समुद्र तरून जाऊन, त्यास युक्तिवाद सांगितला. त्याच्या नगरास आग लावून दिली व शेवटीं त्यास मारून सीतेची सुटका केली. ह्या रामचंद्राचें जें धोरण होतें तें फारच वाखाणण्यासारखें होतें. आतां आपण आर्यावर्ताच्या ज्या कालीं, श्रीरामचंद्रांनीं रावणाचा प्राण हरण केला त्या कालाकडे वळूं.

---

* " These lists according to Sir W. Jones would carry us back to 3500 years before Christ. "

( Elphinstone's India ) P. 26,5

ह्या कालाकडे नजर फेंकली असतां, ह्या कालाचा आधार दाखविणारीं पुराणें आपणांस काय सांगतील ? त्याकालीं दक्षिणप्रांतीं वसाहत होती कीं नाहीं ? तर तिचा वानवाच आढळेल. कारण त्या प्रदेशाविषयीं त्यावेळच्या ग्रंथकारांचें अज्ञान हेंच होय. रामायणकालीं दक्षिणप्रांतीं वसाहत असून, त्या ठिकाणीं मोठमोठीं राज्यें होतीं व तीं सर्व प्रकारांनीं व्यवस्थित होतीं. किष्किंधेस,-पंपानदीचें किंवा पंपासरोवराचें स्थान-( कीं, ज्या ठिकाणीं श्रीरामचंद्राची व सुग्रीवाची भेट झाली ) त्यावेळीं वाली राज्य करीत होता. जंबुद्वीपास जांबुवंत होता. त्यांचीं तीं राष्ट्रें बलाढ्य होतीं. ज्यावेळीं हनुमंतानें रामाचें साह्य करण्यास सुग्रीवादि आपल्या अनुचरांस कळविलें व वालीस मारून रामानें सुग्रीवास त्याचें राज्य दिलें, त्यावेळीं सुग्रीवानें सीतेस पळवून नेणाऱ्या रावणाच्या शोधार्थ आपले अनुचर रवाना केले. व त्यांस दक्षिणेकडील आंध्रांच्या, ( तेलगू ) पांड्यांच्या, चोलांच्या व केरलांच्या-विदर्भ, ऋचीक व महिषक ह्या देशांत, तसेंच दंडकारण्यांत व गोदावरीच्या तीरीं जाण्यास सांगितलें, अशी कथा रामायणामध्यें आहे. अर्थात् त्या कालीं हे देश समृद्ध असून तेथें मोठमोठीं राज्यें अगर वसाहती असल्या पाहिजेत.

पांड्यांच्या नगराचें गोपूर-वेस-सोन्यानें व रत्नानें अलंकृत केलेलें तुमच्या दृष्टीस पडेल, असें त्यांस सांगितलें होतें. ह्यावरून एवढें अनुमान करावयास हरकत नाहीं कीं, रामास साह्य करणारे सुग्रीव, हनुमान्, अंगद, जांबुवंत, नल, नील हे वानर नसून, त्याकाळचे प्राचीन वसाहत करणारे सत्ताधारी असले पाहिजेत. **आमच्या पुराणांमध्यें जर भाकडकथा प्रस्थापित झालेल्या नसत्या व निव्वळ आश्चर्योत्पादक गोष्टींनीं तीं भरलीं गेलीं नसतीं किंवा तीं समबुद्धीनें लिहिलीं गेलीं असतीं तर त्यांपासून इतिहासज्ञांस पुष्कळच फायदा झाला असता.**

हनुमानासारखे वज्रदेही पुरुष, अंगदासारखे शिष्टाई करण्यामध्यें चतुर ब्यारिष्टर, नल-नीलासारखे कलाभिज्ञ व धन्वंतरी, वानरांच्या जातीमध्यें झाले होते काय ? तीं मर्कटें होतीं काय ? असें कधींही होणें शक्य नाहीं. ते आर्यच असून पुराणकारांनीं निव्वळ द्वेषबुद्धीनें त्यांस मर्कटें बनविलें असलें पाहिजे. आमच्या मतें ते सर्व महाराष्ट्रांत राहणारे मराठेच असले पाहिजेत. यास प्रत्यंतर पहावयाचें असल्यास इतिहाससंग्रह मासिकामधील श्रीयुत राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेला ‘ कोंकण व नागलोक ’ हा लेख समग्र वाचावा. त्यांत त्यांनीं महाराष्ट्रांतील पुरातन क्षत्रिय जे ‘ नाग ’ त्यांच्यासंबंधानें चिकित्सापूर्वक माहिती देऊन नाग लोक, महीतल ऊर्फ अपरान्त ऊर्फ कोंकण ह्या ठिकाणीं राहणारे असून त्यांच्या संस्कृत नांवांचें महाराष्ट्री व मराठी भाषेमध्यें कसें रुपांतर बनलें असावें तें सिद्ध केलेलें आहे. ह्या नागवंशीय मराठ्यांचीं कुळें त्या कालीं कोंकण प्रांतांमध्यें वास्तव्य करीत होतीं. त्यांचें व ब्राह्मणांचें पूर्वापार हाडवैर असल्यामुळें ब्राह्मणांनीं निव्वळ द्वेषबुद्धिनें त्यांस मर्कटें बनविलीं असलीं पाहिजेत. त्यांचें ज्या सोमवंशीय राजाकडे वर्चस्व होतें त्या पांडववंशीय राजाकडून त्यांचा वध करविला. व त्यास सर्पसत्र हें नामाभिधान देण्यांत आलें. नागवंशीय लोक ही जर सर्पाचीच जात मानिली तर अर्जुनानें उलुपी बरोबर विवाह करून तिजबरोबर सुरतप्रसंग कसा काय केला असेल तें ह्या अशा भाकडकथा रचणारांसच माहित ! श्रीकृष्णानें जांबुवती-अस्विलिनी बरोबर विवाह केला व सौख्यानंदात निमग्न झाला ! ह्या उदाहरणांवरून पुराणकारांनीं निव्वळ द्वेषबुद्धिनें वस्तुस्थितीचा विपर्यास केलेला दिसून येत आहे. त्या कालीं ह्या नागांचें एवढें प्राबल्य होतें कीं, ज्याप्रमाणें आपण रामजयंती, कृष्णजयंती हे उत्सव साजरे करतो त्याचप्रमाणें नागपंचमी हाही उत्सव साजरा करितो. पण वरील दोन पुरुषांच्या जयंत्याप्रमाणें आपण नागपंचमीचा उत्सव साजरा करतो का ? नाहीं. पण त्या दिवशीं आपण सर्पाचें पूजन करतो. वस्तुस्थितीचा विपर्यास झाल्यामुळें किती भयंकर चुका होतात तें पहा !

रामायणकालीन ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या ऐश्वर्याच्या कालानंतर युधिष्ठिराच्या कालास सुरवात झाली. त्या वेळीं कौरव व पांडवांचीं भयंकर रणकंदनें माजून त्यांत बहुतेक क्षत्रियांचा निःपात झाला. संस्कृतीच्या वृद्धीनें व अज्ञानाच्या प्रसारानें त्यांच्या बुद्धीस मांद्य चढलें. आणि उद्योगप्रीति व ज्ञानवृद्धि इत्यादिकांकडे जो त्यांचा कल होता त्याचा लोप झाला. सत्याचा लोप होऊन,

कल्पनांचें साम्राज्य बोकाळलें. आपले इच्छित हेतु पूर्ण करण्यासाठीं अनेक ग्रंथांमध्यें असत्य गोष्टी घुसडूं लागले. शास्ता असा कोणीच उरला नाहीं. खोट्याचें मंडन होऊं लागल्यामुळें अनेक विद्वान्-कीं, ज्यांच्या हातीं विद्या होती त्यांनीं भावी परिणामाकडे दृष्टि न पोहोंचवितां आपल्याच स्वार्थाकडे नजर दिली, त्यामुळें राष्ट्राचें अगणित नुकसान झालें. त्यांचें पूर्वार्जित तेज कर्तव्य व महत्त्वाकांक्षा यांचा लोप झाला.

ह्या कालानंतरचा काल म्हणजे अंधकाराचें साम्राज्य होय. त्या कालाचा संपूर्ण इतिहास प्रकाशांत असता, तर आजचा हिंदुस्थानाचा इतिहास निराळाच झाला असता. असो;

गुरुवर्य डॉ० भांडारकर यांनीं मध्यंतरींच्या काळाचा चिकित्सापूर्वक जो शोध लावलेला आहे, तो कितीतरी उपयुक्त आहे. ह्या शोधाच्या अभावीं महाराष्ट्राचा मध्यंतरीचा काल गुप्तच राहिला असता.

ख्रिस्तीशकाच्या पूर्वी २५० वर्षें मगध देशांतील पाटलीपुत्र नामक नगरींत मौर्य ह्या उपनांवाचे राजे होऊन गेले. त्या कुलांतील अशोक नांवाच्या राजानें आपल्या शिला-शासनांत असें म्हटलेलें आहे कीं, 'आम्हीं रास्टिक, पेटेनिक, अपरान्त ह्या देशीं धर्मोपदेशक पाठविले होते. ह्यांतील अपरान्त देश म्हणजे उत्तरकोंकण, पेटेनिक म्हणजे पैठण व रास्टिक म्हणजे महाराष्ट्रांतील लोक, ज्यांस रट्टा असें म्हटलें आहे, ते रट्ट लोक ज्यांची दक्षिणेमध्यें फार प्राचीन कालापासून सत्ता होती व जे आपणांस राष्ट्रकूट म्हणवीत होते व ज्यांच्या हातून चालुक्य वंशीयांनीं राजसत्ता मिळविली ते; हे आपणांस महारट्टी-महारट्ट-असें म्हणवूं लागले, तसेंच अशोकाच्या वेळीं भोज नांवाच्या राजांचें विदर्भ ( वऱ्हाड ) येथेंही राज्य होतें, यांस महाभोज असें म्हणत, ज्याप्रमाणें रट्टे आपणांस महारट्टे म्हणवूं लागले, त्याप्रमाणें भोज हे आपणांस महाभोज म्हणवूं लागले, त्याप्रमाणें महाराष्ट्रांत रट्ट व भोज यांची सत्ता असून त्यांच्या सत्तेखालीं चोल, पांडय, केरल, अन्ध्र व पुलिंद ह्या लोकांचींही राज्यें सुयंत्रित स्थापित झालेलीं होतीं. असें अशोकाच्या शिला-शासनावरून दिसून येतें. चंद्रगुप्ताचा काल ख्रिस्ती शकापूर्वी ३२० ह्या वर्षाचा आहे. यानेंच मौर्यकुलाची संस्थापना केली. याचा नातू अशोक यानें ख्रिस्ती शकापूर्वी २६३ ते २२९ वर्षापर्यंत राज्य केलें. ह्या मौर्यांनीं उत्तर-हिंदुस्थानावर आपला अंमल बसविला होता. अशोकानें काठेवाडांत आपली सत्ता प्रस्थापित केलेली होती. परंतु राष्ट्रिक, भोज, पेटेनिक, चोल, पांडय यांजवर त्याची सत्ता नव्हती असें दिसतें. ह्या मौर्यवंशानंतर शुंगवंशाची स्थापना झाली व त्यानें ११२ वर्षें राजसत्ता उपभोगिली. नंतर काण्व यांनीं राज्य केलें. अन्ध्रभृत्य ऊर्फ सातवाहन राजांनीं आपली सत्ता स्थापिली. ( इ० स० पूर्वी ७३ वर्षें ते इ० स० २१८ ) या राजांच्याच कारकीर्दीमध्यें, शक जातीच्या परदेशस्थांच्या हातीं कांहीं काळ दक्षिण देश गेलेला होता. शातवाहन ऊर्फ अन्ध्रभृत्य याच कुलास शालिवाहन असें म्हणतात. या राजांच्या अमदानीमध्यें विद्या-कला-कौशल्य यांची समृद्धि झालेली होती. ह्या कुलानंतर क्षत्रप या कुलानेंही कांहीं वर्षें राज्य केलें. वर दिलेल्या सर्व राजांच्या अमदानीमध्येंही महाराष्ट्रामध्यें, रट्टे, भोज वगैरे कुलांचें अस्तित्व कायमच होतें; परंतु अन्ध्रभृत्य वगैरे राजकुलांच्या पूर्ण जोमामुळें त्यांस आपलें डोकें वर उचलतां आलें नाहीं. परंतु अन्ध्रभृत्य व क्षत्रप या कुलांचा विनाश होतांच, रट्टकूड, राठोड किंवा राष्ट्रकूट ह्या उपनांवाच्या राजेरजवाड्यांनीं पुनः स्वातंत्र्य धारण केलें. मध्यंतरीं अभीर किंवा गवळी राजांची सत्ता होती; पण त्यांचा विशेष प्रादुर्भाव नव्हता-ह्या राष्ट्रकूट वंशानें पुनः डोकें वर उचलून ज्यावेळीं राज्यसत्ता मिळविली, ती तिसऱ्या शतकाच्या अखेरीस मिळविली असली पाहिजे व त्यांनीं एकंदर ३८५ वर्षें महाराष्ट्रावर राज्य केलें. ह्या राष्ट्रकूट वंशाच्या सत्तेचें हरण चालुक्यवंशाचा संस्थापक-मूळपुरुष जयसिंह यानें राष्ट्रकूटवंशीय कृष्ण नामक राजाचा पुत्र इंद्र यास जिंकून केलें. व चालुक्य वंशाची स्थापना ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकाच्या आरंभीं केली.

चालुक्यकुलाची संस्थापना ज्याकालीं झाली, त्या कालाचें साधारण अनुमान कळण्याकरितांच हा भाग दाखल केलेला आहे. भारतीय युद्धानंतरच्या कालावर इतिहासाचा प्रकाश पडण्याचीं साधनें मुळींच साध्य नसल्यामुळें, तो काल अंधारामध्येंच आहे. आपल्यांतील विद्वान् मंडळानें त्या कालाचें उपलब्ध साधनांवरून जें अनुमान बांधलें आहे तेंच ह्या ठिकाणीं दाखल केलें आहे. ह्यावरून त्या कालची कीं, ज्यास आम्हीं

' गुप्त काल ' म्हणतां त्या कालाची साधारण कल्पना करितां येईल.

## जयसिंह.

आम्हीं आज ज्या वंशाची कैफियत लिहीत आहों. त्या राजकुलास चालिक्य, चलुक्य, किंवा चालुक्य असें म्हणतात. चालुक्य वंशाचा इतिहास निश्चित होण्यास ताम्रपट्टलेख व शिलापट्टलेख जे बरेच सांपडले आहेत ते कारणीभूत झालेले आहेत; ' विक्रमांकदेवचरित ' ह्या नांवाचें एक काव्य आहे. त्या काव्याचा कर्ता बिल्हण. यानें त्या काव्यांत चालुक्यां वंशाची उत्पत्ति पौराणिक कथेप्रमाणें लिहिलेली आहे; ती अशीः—

" कोणे एके समयीं ब्रह्मदेव प्रातःकालचें संध्यादि कर्मानुष्ठान करीत असतां त्याजकडे इंद्र आला, आणि पृथ्वीवर फार पाप झालें आहे, तींतील एकही मनुष्य यज्ञ-यागादि कर्में करीत नाहीं, किंवा देवांस हवि, बलि इत्यादि यावयाचें तें देत नाहीं, असें ब्रह्मदेवापाशीं गाऱ्हाणें सांगूं लागला. तें ऐकून, अर्घ्यप्रदानासाठीं पाणी धरण्याकरितां 'चुलुक' म्हणजे दोन्ही हातांचे पंजे एकमेकांशीं जोडून अंजलि ( ओंजळ ) केलेला होताच, त्याकडे ब्रह्मदेवानें दृष्टि लाविली. तेव्हां त्या चुलुकापासून तावडतोब एक बलाढ्य वीर निर्माण होऊन तो उडी मारून बाहेर आला. हाच चालुक्य वंशाचा मूळपुरुष होय. तदनंतर कांहीं कालानें त्या कुलांत हारीत व मानव्य ह्या नांवाचे दोन महापराक्रमी पुरुष निर्माण झाले, आणि त्यांनीं आपलें कुल नांवारूपास चढविलें. या वंशाचें मूलस्थान अयोध्या हें होतें. पुढें कालगतीनें त्या वंशाची एक शाखा दक्षिणेंत येऊन स्थायिक होऊन राहिली."

हे चालुक्य मानव्य गोत्री असून 'हारीत' नामक मूळ पुरुषाचे वंशज होते. त्यांच्यानंतर सप्त मातृकांची राखण होती आणि कार्तिकेय म्हणून जो शिवपुत्र होता, त्यानें त्यांस भाग्यास चढविलें. यांना नारायणाकडून एक ध्वज मिळालेला होता व त्यावर वराहाचें ( रानडुकराचें ) चित्र काढलेलें होतें; ह्या ध्वजाच्या छायेखालीं युद्ध करून यांनीं सर्व राजांस पादाक्रांत केलें. ज्याप्रमाणें ह्या वंशाचें मूलस्थान **अयोध्या** होतें म्हणून बिल्हणानें आपल्या काव्यांत वर्णिलें आहे, त्याचप्रमाणें, **येतुर** येथील शिलालेखांत व मिरज येथील ताम्रपट्टांतील लेखांतही वर्णन केलेलें आहे.

दक्षिणेमध्यें ज्या पुरुषानें पहिल्यानें हें कुल विख्यातीस आणिलें, त्या राजाचें नांव जयसिंह ऊर्फ ' विजयादित्य ' असें होतें. याच्यावेळीं दक्षिणेमध्यें राष्ट्रकूट वंशांतील राजे राज्य करीत होते. कित्येक ठिकाणीं, चालुक्यांचा महाराष्ट्रांत प्रवेश व्हावयाच्या सुमारास ' त्रिलोचन पालव ' पालव वंशीय राजाची कारकीर्द होती असें आढळतें* त्यांपैकीं राष्ट्रकूट वंशीय कृष्णराजाबरोबर जयसिंहानें अनेक वेळां संग्राम केलेले असून, निरनिराळया देशांचें प्रभुत्व संपादन केलें होतें.

## रणराग.

जयसिंहाच्या नंतर त्याचा पुत्र रणरागानें राज्य केलें. हा मोठा शौर्यवान् राजा होता. आणि त्याचा देह डौलदार असून तो दैत्यासारखा धिप्पाड होता. त्यानें ' विष्णुवर्धन ' हा किताब धारण करून, पालववंशीय राजकन्येबरोबर विवाह केला व पालवांस आपल्या बाजूस वळविलें.

## पहिला पुलकेशि.

रणरागाच्या मागून त्याचा पुत्र पुलकेशि हा गादीवर बसला. त्यानें आपल्या कारकीर्दीमध्यें एक मोठा यज्ञ केला होता. त्याचें ऐहिक व आमुष्मिक कर्तव्याकडे विशेष लक्ष असे. त्यानें **वातापीपुर** म्हणजे जीस हल्लीं **बदामी** म्हणतात तें आपलें राजधानीचें शहर केलें; हें बदामी गांव कलादगी जिल्ह्यांत ( हल्लींचें विजापुर ) होतें. चालुक्यवंशांतील महापराक्रमी राजा हाच असला पाहिजे. याच्या काळचीं जीं दानपत्रें उपलब्ध आहेत, त्यांवरून याच्यापासूनच चालुक्यवंशास प्रारंभ झालेला आढळण्यांत येतो. ह्या

† सोळंखी ऊर्फ चालुक्य वंश, हे भारद्वाज गोत्रज असून यांचें मूलस्थान 'लोहकोट' म्हणजे लाहोर आहे. हे सामवेदी असून यांचें पूज्य दैवत कपिलेश्वर महादेव आहे.

कर्नल टॉडकृत राजस्थानचा इतिहास पृष्ठ २१.

* Paper by Mr. Walter Elliot of Madras C. S. Published in the Madras B. R. A, Journl of 1858.

राजाचा संपूर्ण किताब 'सत्याश्रय श्रीपुलकेशी वल्लभ-महाराज' असा होता. 'सत्याश्रय' म्हणजे सत्याचा आधार व कित्येकांच्या नांवामागें 'पृथ्वीवल्लभ' ही पदवी जोडलेली आहे. पृथ्वीवल्लभ म्हणजे पृथ्वीचा पति. हें उपपद पुढील सर्व राजांनीं आपल्या नांवांमागें जोडलेलें दिसून येतें.

## पहिला कीर्तिवर्मा.

(इ० स० ५६७-५९१).

पुलकेशीच्या मागून त्याचा पुत्र कीर्तिवर्मा हा गादी-वर बसला. ह्या कीर्तिवर्म्यानें 'नल' ह्या उपनांवाच्या राजवंशास जिंकिलें, व मौर्यांसही आपल्या सत्तेखालीं आणिलें. हे मौर्य उत्तर-कोंकणांतील 'नायकवडे' किंवा रजवाडे असावेत. असें 'ऐहोलि' नांवाच्या स्थळीं जो शिलालेख सांपडला आहे, त्यावरून दिसून येतें. उत्तर-कानडाप्रांतामधील 'बनवासीचे कदंब, यांसही या कीर्तिवर्म्यानें जिंकिलें. कीर्तिवर्म्यास तीन पुत्र होते, पण त्याच्या निधनकालीं ते अल्पवयी असल्यामुळें, त्याच्यामागून त्याचा भाऊ 'मंगलीश' हा गादीवर बसला.

## मंगलीश.

(इ० स० ५९१-६१०).

हा राजा पराक्रमी होता. यानें 'कलचुरि' उपनांवाच्या राजांस जिंकिलें. हें कलचुरि राजकुल 'चेदि' नामक देशावर राज्य करीत होतें. त्यांची राजधानी 'त्रिपुर' म्हणजे जबलपुराजवळ 'तेवुर' म्हणून गांव आहे ती होती. यानें पूर्व व पश्चिम ह्या उभय समुद्रापर्यंत स्वाऱ्या करून देश काबीज केले. पश्चिम-समुद्र-तीरावरील 'रेवतीद्वीप' (रेवती नामक बेट) काबीज केलें. ह्या बेटावरील अंमलदाराचें ताम्रपत्रावर कोरलेलें एक दानपत्र गोंव्याजवळ सांपडलेलें आहे, त्यावरून वेंगुर्ल्याच्या दक्षिणेस कांहीं मैलांवर 'रेडी' नांवाचा पाण्यांत किल्ला आहे, त्याचेंच 'रेवती' हें प्राचीन नांव असावें. बदामी येथें एका गुहेमध्यें एक देवालय आहे. तेथील एका शिलालेखांत लिहिलें आहे कीं, हें देवालय मंगलीशानें डोंगर पोंखरून बांधिलें. या देवालयांत श्रीविष्णूच्या मूर्तीची स्थापना केलेली असून, तिची पूजा, उत्सव वगैरे करण्यासाठीं देवस्थानास एक गांव इनाम दिलेलें आहे. त्यासंबंधीं अशी व्यवस्था केलेली आहे कीं, त्या गांवच्या वसूलाच्या उत्पन्नांतून तेथें नित्य 'नारायणबलि' हा संस्कार व सोळा ब्राह्मणांस भोजनदान होत जावें, व जी शिल्लक राहील ती 'तडी तापडी' यांच्या पोषणाकडे खर्च करावी. ह्या शिलालेखावर शककालाची ५०० वर्षें गुदरून गेल्यावर कोणा एका राजाच्या कारकीर्दीचें १२ वें वर्ष-अशी मिति आहे. ह्या मितीबद्दल अद्याप बराच मतभेद आहे. ती मिति मंगलिशाच्या कारकीर्दीची कीं कीर्तिवर्म्याच्या कारकीर्दीची ? ह्या संशयाचें निराकरण झालेलें नाहीं. गुरुवर्य डॉ० भांडारकर यांनीं आपल्या दक्षिणच्या इतिहासामध्यें, सप्रमाण पुराव्यानिशीं तो मंगलीशच असावा असें सिद्ध केलें आहे.

मंगलीश याचा गादीवर हक्क नसतां ती त्यास मिळाली. कारण कीर्तिवर्म्याचीं मुलें अज्ञान होतीं. परंतु तीं सज्ञान होतांच, मंगलीश, त्यांचा गादीवरील वारसा काढून टाकून आपल्या मुलास गादीचा उपभोग घेतां यावा, म्हणून कारस्थानें करूं लागला. त्याच्या हातीं राज्याधिकार असल्यामुळें त्यास सर्व गोष्टी अनुकूल होत्या. परंतु पुलकेशि किर्तिवर्म्याचा पुत्र थोर होतांच, विलक्षण शक्तिमत्तेचा पुरुष निपजला. त्यानें मंगलीशाचीं सर्व कारस्थानें लटपटून टाकलीं. त्यानें हिंमत व मसलत यांच्या साह्यानें मंगलीशास हतवीर्य केलें. अशा प्रकारें उभयपक्षांचीं कारस्थान चाललीं असतांनाच मंगलीश प्राणास मुकला. व आपल्या मुलांस राज्योपभोग घ्याव-यास लावण्याची त्याची इच्छा जागचे जागीं जिरली.

## पुलकेशि.

(इ० स० ६११-६४०).

मंगलीशाच्या पश्चात् कीर्तिवर्म्याचा पुत्र पुलकेशि हा गादीवर बसला. 'सत्याश्रय श्रीपृथ्वीवल्लभ महाराज' हा त्याचा किताब होता. तो इ०स०६११ व्या वर्षी गादीवर बसला. मंगलीशाच्या पराक्रमानें जे राजे आज्ञांकित झाले होते, ते त्याच्या मरणानें चोहोंकडून उठले. त्यामुळें पुलकेशि फारच भांबावून गेला. 'अप्पायिक' या नांवाचा राजा व 'गोविंद' नांवाचा राजा हे दोघे त्याजवर उठले. अप्पायिकाजवळ उत्तर-समुद्रतीरावरील

घोड्यांचे स्वार होते, तरीही पुलकेशीचें बलाढ्य सैन्य युद्धाकरितां समोर येतांच अप्पायिकानें पळ काढला, आणि 'गोविंद' पुलकेशीस शरण आला व त्याचा मित्र होऊन राहिला. त्याबरोबर पुलकेशीनें त्याजवर कृपा करून बक्षिसही दिलें. ह्या दोन शत्रूंचा पाडाव केल्यानंतर पुलकेशीनें आपलें सैन्य बनवासीच्या कदंबावर वळविलें, व त्यांची राजधानी 'बनवासी' काबीज केली. तदनंतर त्यानें 'चेर' (म्हैसूरजवळ हा देश असावा) देशावर राज्य करणाऱ्या 'गंग' नांवाच्या राजकुलांतील राजा व 'अलुप' उपनांवाचा अधिपति यांजवर स्वारी केली. तेव्हां त्यांनीं त्याजशीं सख्य केलें. अलुपांची सत्ता त्यावेळीं मलबार प्रांतावर होती. पुढें पुलकेशीनें आपलें सैन्य कोंकणांतील मोर्यांवर पाठविलें. त्यांस जिंकण्यास त्यास विलंब लागला नाहीं. नंतर शेंकडों जहाजांचें आरमार बरोबर घेऊन त्यानें पश्चिम-समुद्राची स्वामिनी म्हणून समुद्रतीरीं ' पुरी '* नामक नगरी होती, हीच घारापुरी होय. तिजवर हल्ला केला व लढून ती हस्तगत केली. नंतर 'लाट,' 'मालव' व 'गुर्जर' ह्या देशांच्या राजांस जिंकिलें. व ते सर्व त्याचे आश्रित आणि ताबेदार होऊन राहिले.

ह्या काळाचे सुमारास उत्तर-हिंदुस्थानांत एक महाबलाढ्य राजा होता. त्याचें नांव 'हर्षवर्धन.' तो मूळचा कनोजचा राजा होता. परंतु कालगतीनें तो उत्तरेकडील सर्व मुलुखाचा सार्वभौम राजा झाला. नंतर त्या हर्षवर्धनानें नर्मदेच्या दक्षिणेस आपली सत्ता वाढवावी म्हणून प्रयत्न मांडला. परंतु पुलकेशि त्यास आडवा आल्यामुळें त्याचे सर्व बेत निष्फल झाले. पुलकेशीनें त्याच्या सैन्याचा पराभव करून त्याचे पुष्कळसे हत्ती मारिले. त्या वेळेपासून पुलकेशीनें 'परमेश्वर' म्हणजे 'सार्वभौम' हें उपपद स्वीकारिलें. हर्षवर्धनाचा पराभव केल्याबद्दल सर्वत्र चालुक्य वंशांतील राजांस अभिमान उत्पन्न झाला व तो प्रसंग ते अति महत्त्वाचा मानूं लागले. पुलकेशीनें आपल्या राज्याच्या उत्तरेकडील सरहद्दीच्या संरक्षणार्थ नर्मदेच्या उभयतीरीं प्रबल सैन्य ठेविलेलें होतें, अशाप्रकारें राजनीतिकौशल्य व शौर्य यांच्या योगें 'महाराष्ट्रकें' म्हणून ज्या तीन देशांस म्हणत, व ज्यांत एकंदर नव्याण्णव हजार गांवें होतीं, त्यांचा तो 'सार्वभौम' किंवा 'राजाधिराज' झाला. कोसल व कलिंग ह्या देशांचे राजे तर त्याची स्वारी जवळ येतांच थरथर कांपूं लागले. आणि ताबडतोब शरण आले. पुढें कांहीं कालानंतर त्यानें मोठी फौज घेऊन कांचीपूरच्या ( कांजेवेरमच्या ) राज्यावर स्वारी केली, व त्या शहरास वेढा घातला. तदनंतर कावेरी नदी उतरून पैलतीरीं जाऊन तो चोल, पांड्य व केरल ह्या लोकांच्या देशांत शिरला. परंतु त्या लोकांनीं त्याशीं शत्रुत्व न करितां सख्य जोडिलें व ते त्याचे दोस्त झाले. याप्रकारें दक्षिणेंत आपलें वर्चस्व स्थापून त्यानें परत येऊन आपल्या राजधानींत प्रवेश केला व तेथें सुखानें राज्य केलें.

ह्याच राजाच्या कारकीर्दींत ' **ह्युएनत्संग** ' नांवाचा चीन देशांतील बौद्धधर्मी यात्रेकरू हिंदुस्थानांत आला होता. यात्रा करीत करीत तो महाराष्ट्रांत आला. महाराष्ट्राला तो आपल्या ग्रंथांत ' मोहोलाक्च ' असें म्हणतो. तो पुलकेशीस भेटला होता. तो आपल्या ग्रंथांत असें म्हणतो कीं, " तो ( पुलकेशि ) 'सतलि' ( क्षत्रिय ) ज्ञातीपैकीं आहे. त्याचें नांव '**पुलोकिशे**' त्याचे विचार प्रगल्भ आणि गंभीर आहेत; आणि त्याचा पर-सुख-दुःखाविषयीं कन्हवाळा व परोपकार ह्यांचा व्याप्तिप्रदेश फार विस्तीर्ण आहे. त्याची प्रजा पूर्ण स्वार्पणपुरःसर भक्तीनें त्याची सेवा करिते. सांप्रत महाराज शिलादित्य ( हर्षवर्धन ) आपलें विजयी सैन्य घेऊन पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत स्वाऱ्या करीत आहे. तो दूरदूरच्या राष्ट्रांतील लोकांस जिंकून त्यांवर आपला अंमल बसवीत आहे, आणि आपल्या शेजारच्या राष्ट्रांतील लोकांच्या मनांत आपणांविषयीं दहशत रहावी असें करीत आहे, परंतु ह्या राज्यांतील ( महाराष्ट्रांतील ) लोक मात्र त्यास शरण गेले नाहींत. त्या लोकांस पुरें शासन करावें म्हणून त्यानें वारंवार स्वकीय राज्याच्या पांचही भागांमधील सैन्य एकत्र केलें. सर्व राज्यांतील शूर सेनानायकांस पाचारण करवून आणविलें, आणि आपलें सैन्य बरोबर घेऊन त्यावर स्वाऱ्या केल्या. तथापि त्यांना पूर्णपणें जिंकून त्यांनीं पुनः कधींही वैरभावानें मानसुद्धां वर उचलूं नये असें करणें, त्याच्या हातून

* Puri the modern island of Gharapuri or Elephanta in the Bombay harbour, was also the Capital of the Kingdom of Silahara Kings, who ruled in the North Konkan from A. D. 810 to 1260.

*Bombay Gazette 17, Nov, 1902.*

अद्यापि झालें नाहीं. ह्या गोष्टीवरून त्या लोकांस ( महाराष्ट्रीयांस ) शिपाईगिरीचा अभ्यास व सवई किती आहे, ह्याविषयीं सहज अनुमान करितां येईल.* ह्याप्रमाणें पुलकेशीसंबंधानें **ह्युएनत्संगानें** उद्गार काढिले आहेत. हा प्रवासी इ० स० ६३९ व्या वर्षी महाराष्ट्रांत आलेला होता. त्या वेळच्या त्याच्या ग्रंथामध्यें, महाराष्ट्राचें जें वर्णन केलें आहे, तें मनन करण्यासारखें आहे, तो म्हणतो:—

'त्या राज्याचा (महाराष्ट्राचा) परीघ ६०००ली (१२०० मैल ) होता, आणि एकट्या राजधानीचा परीघ ३० ली (६ मैल) होता, व त्या राजधानीचें पश्चिम अंग एका मोठ्या नदीच्या कांठीं होतें. त्या मुलखांतली जमीन उत्कृष्ट असल्यानें तेथें धान्य विपुल उत्पन्न होत होतें. तेथील हवा उष्ण आहे. रीतीरिवाज साधा व प्रामाणिकपणाचा आहे. तद्देशीय लोक बांध्यानें उंच, स्वभावानें मगरूर व तोरेदार आहेत. जो कोणी त्यांच्या कांहीं तरी उपयोगी पडतो, त्यानें त्यांच्या कृतज्ञतेविषयीं खुशाल भरंवसा ठेवावा; परंतु ज्या कोणाकडून त्यांना राग येण्याजोगें कांहीं तरी घडतें, त्याचा सूड उगविल्यावांचून ते कधींही राहणार नाहींत. कोणी त्यांचा उपमर्द केला, तर तो अपमानाचा डाग घालविण्यासाठीं ते आपले प्राणही धोक्यांत घालतील. संकटांत सांपडलेल्या कोणीही त्यांस हांक मारिली, तर ते ताबडतोब धांव घेतील; त्यावेळीं आपलें काय होईल, याचा ते विचारही करणार नाहींत. एखाद्या अपकाराबद्दल आपल्या शत्रूचा सूड घ्यावयाचा असल्यास 'सावध रहा' म्हणून पूर्वी सूचना करावयास मुळींच चुकत नाहींत. सूचना करून नंतर प्रत्येकजण चिलखत चढवितो आणि भाला हातीं घेतो. लढाईंत शत्रु पळ काढतील, तर त्यांच्या ते मागें लागतात, परंतु जे शरण येतील त्यांस ठार मारीत नाहींत. एखाद्या सेनापतीनें युद्धांत डाव गमविला, तर त्याला शरीरदंड न करतां, ते त्यास बायकांचीं वस्त्रें नेसावयास लावतात, त्यायोगें त्यास आपण होऊनच जीव देणें प्राप्त होतें. ज्यांस जीवाची भीति म्हणून कसलीच नसते. असे कित्येकशें वीर सरकारच्या पदरीं बाळगिलेले आहेत. हे लोक युद्धाकरितां सज्ज होतात, तेव्हां प्रत्येक प्रसंगीं निशा यावी म्हणून मद्य पितात. मग अमलानें धुंद झालेल्या या लोकांपैकीं एकेकजण, भाला हातीं असला म्हणजे शत्रूकडील दहा हजार लोकांना तृणतुल्य मानून लढाईला या म्हणून त्यांपुढें उभा ठाकतो. त्या लोकांनीं मार्गांत भेटलेल्या कोणा माणसास ठार मारिलें, तर त्या गुन्ह्याबद्दल कायद्यांत शासन सांगितलेलें नाहीं. फौज कोणत्याहि मोहिमेवर निघाली म्हणजे हे इमाम दांडगे नौबतीच्या दुमदुमाटाच्या तालावर विनीत झुकत झुकत चालतात. ह्याशिवाय स्वभावानें क्रूर; अशा शेंकडों हत्तींस ते अंमल चारून मस्त करतात. शत्रूंशीं गांठ पडून हातघाईस येण्याची वेळ आली म्हणजे ते लोकही फार मादक मद्य पितात. नंतर माणसें व हत्ती मिळून एक फळी करून ते शत्रूवर धांव घेतात. तेव्हां पुढें जें काय येईल त्याचा पायाखालीं तुडवून चुराडा करून चालते होतात. त्यांच्यापुढें कोणा शत्रूच्यानें टिकाव धरवत नाहीं. येथील राजाला हे असले शूर लोक व हत्ती आपल्या पदरीं आहेत म्हणून मोठा गर्व आहे, व तो त्यांच्या बलावर शेजारचीं राज्यें कसपटासारखीं मानून त्यांची हेलना करतो.' ह्याप्रमाणें महाराष्ट्रीयांविषयीं ह्युएनत्संगानें लिहून ठेविलें आहे. त्यावरून त्यावेळच्या परिस्थितीचें उत्तम प्रकारें ज्ञान होतें. त्याकाळीं दुसरा पुलकेशि हा चालुक्य वंशांत महापराक्रमी राजा होऊन गेला. त्याचा कीर्तिरव परदेशींही जाऊन पोहोंचला होता. एका अरबी ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, 'पुलकेशीनें इराण देशाचा राजा दुसरा '**खोश्रोझ**' ह्याकडे त्या राजाच्या कारकीर्दीच्या ३६ व्या वर्षी, एक वकीलमंडळ पाठविलें होतें.' अर्थात् त्यापूर्वी पुलकेशीकडे इराणच्या राजाकडून वकील वगैरे आला असावा. त्यामुळेंच त्यास वकील-मंडल पाठविण्याची जरूरी पडली. पुलकेशीच्या कारकीर्दीमध्यें, अतीविस्तीर्ण

* The king is of the Kashatriya caste, and his name is Pulokeshi. His Plans and undertakings are widespread, and his beneficient actions are felt over a great distance, His subjects obey him with perfect submission. At the present time Siladitya ( II ) Maharaj of Kanoj has conquered the nations from east to west and carried his arms to remote districts, but the people of the country ( Maharashtra ) alone have not submitted to him. He has gathered troops from the four indies and summoned the best leaders from all countries and himself gone at the head of his army to punish and subdue these people, but he has not yet conquered their troops.

प्रदेशावर चालुक्यांची सत्ता प्रस्थापित झालेली होती. त्याचा धाकटा भाऊ विष्णुवर्धन-विषमसिद्धि-ह्याला सातारा व पंढरपूर ह्या दोन प्रांतांचा राज्यकारभार चालविण्यासाठीं नेमिलेलें होतें. कारण विष्णुवर्धनाचें एक ताम्रपट्टशासन सातारा येथें सांपडलें आहे, त्यांत भीमेच्या दक्षिण तीरीं असलेलें एक खेडें दान दिल्याबद्दलचा मजकूर लिहिलेला आहे. ह्या विष्णुवर्धनानें पुढें गोदावरी व उत्तरकृष्णा या नद्यांमधील वेंगी नांवाचा प्रांत मिळविला व त्यांत त्यानें चालुक्य-वंशाची एक नवीन उदयास येणारी शाखा स्थापन केली. पुलकेशीचा दुसरा धाकटा भाऊ जयसिंह हा नाशकाच्या आसपासच्या प्रांतावर प्रतिनिधि होता. नाशिकजिल्ह्यांतील इगतपुरी तालुक्यांत उपलब्ध झालेल्या एका ताम्रपट्टावरील कोरलेल्या दान-पत्रांत जयसिंहाचा पुत्र नागवर्धन यानें बलेग्राम नांवाचें खेडें कापालिकेश्वराच्या नित्य अर्चेकरितां दान दिल्याबद्दल उल्लेख आहे. हें गांव बलेगांव-तऱ्हाळें नांवाचें इगतपुरीच्या ईशान्येस सुमारें सहा कोशांवर आहे. ज्या प्रांतांत हें खेडें मोडत होतें त्या प्रांतांस त्यावेळीं 'गोपराष्ट्र' असें म्हटलेलें आहे. त्याचप्रमाणें पुलकेशीचा ज्येष्ठ पुत्र 'चंद्रादित्य' हा 'कुडाळ' प्रांतावर ज्याला हल्लीं सावंतवाडी प्रांत म्हणतात, त्या देशखंडाचा कारभार करीत होता. एका ताम्रपत्रांत चंद्रादित्यास 'पृथ्वीवल्लभ' व 'महाराज' हीं विशेषणें योजिलेलीं आहेत. ह्याची राणी विजय-भट्टारिका इनें वेंगुर्ल्याच्या उत्तरेस सुमारें साडेतीन कोसांवर समुद्रकांठीं जो कोचरें + म्हणून गांव आहे त्यांतील एक शेत, व त्याच्या लगतचें 'खाजण' एका ब्राह्मणास दान दिलेलें आहे, असा एका ताम्रपत्रांत उल्लेख आहे.

त्याप्रमाणेंच* नेरूर येथें दोन ताम्रपट्टांवर कोरलेलीं दानपत्रें आहेत. त्यांत तीच राणी आपल्या कार-

---

+ कोचरें गांवांतील एक शेत व त्या लगतचें खाजण दान दिल्याबद्दलचें चालुक्य शासन.

स्वस्ति श्रीमतां सकलभुवनसंस्तूयमानमानव्यसगोत्राणां हारीतिपुत्राणां सप्तलोकमातृभिः सप्तमातृभिरभिवर्धितानां कार्तिकेयपरिरक्षणप्राप्तकल्याणपरंपराणां भगवन्नारायणप्रसादसमासादितवराहलाञ्छनेक्षणक्षणवशीकृताशेषमहीभृतां चलुक्यानां कुलमलंकरिष्णोरश्वमेधावभृथस्नानपवित्रीकृतगात्रस्य श्रीपुलकेशीवल्लभमहाराजस्य प्रपौत्रः पराक्रमाक्रान्तवनवास्यादिपरनृपतिमण्डलप्रणिबद्धविशुद्धकीर्तिश्रीकीर्तिवर्मपृथिवीवल्लभमहाराजस्य पौत्रः समरसंसक्तसकलोत्तरापथेश्वरश्रीहर्षवर्धनपराजयोपलब्धपरमेश्वरापरनामधेयस्य सत्याश्रयश्रीपृथिवीवल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरस्य प्रियतनयो रणशिरसि रिपुनरेन्द्रान् दिशि दिशि जित्वा स्ववंशजां लक्ष्मीं प्राप्य च परमेश्वरतया निवारितविक्रमादित्यस्तस्य ज्येष्ठो भ्राता श्रीचन्द्रादित्यपृथिवीवल्लभमहाराजाधिराजस्तस्य प्रियमहिषी कलिकालप्रतिपक्षभूता श्रीविजयमहादेवी वोद्धि ( ह्रि ) पोथी (थी) सर्वानाज्ञापयति विदितमस्तु वो वैशाखशुक्लद्वादश्यां सोमवासरे अस्मै वत्ससगोत्राय...गोलस्वामिने कोच्चुरकग्रामे बकुलकच्छक्षेत्रं नाम खज्जनसहितं उदकपूर्वं दत्तं अपरपूर्वेनोर्वतः सेतुना निवार्यते योऽस्मद्वंशजोऽन्यो वाऽनुपालयति स पुण्यभाग्भवति 'षष्टिवर्षसहस्राणि स्वर्गे मोदति भूमिदः । आच्छेत्ता चाऽनुमन्ता च तान्येव नरके वसेत् ॥ स्वदत्तां परदत्तांवा यो हरेत वसुन्धराम् । षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥

## चालुक्य शासन.-

* स्वस्ति श्रीमतां सकलभुवनसंस्तूयमानमानव्यसगोत्राणां हारीतिपुत्राणां सप्तलोकमातृभिस्सप्तमातृभिरभिरक्षितानां कार्तिकेयपरिरक्षणप्राप्तकल्याणपरंपराणां भगवन्नारायणप्रसादसमासादितवराहलाञ्छनेक्षणक्षणवशीकृताशेषमहीभृतां चलुक्यानां कुलमलंकरिष्णोरश्वमेधावभृथस्नानपवित्रीकृतगात्रस्य श्रीपुलकेशीवल्लभमहाराजस्य प्रपौत्रः पराक्रमाक्रान्तवनवास्यादिपरनृपतिमंडलप्रणिबद्धविशुद्धकीर्तिश्रीकीर्तिवर्मपृथिवीवल्लभमहाराजस्य पौत्रस्समरसंसक्तसकलोत्तरपृथिवीश्वरश्रीहर्षवर्धनपराजयोपलब्धपरमेश्वरापरनामधेयस्य सत्याश्रयश्रीपृथिवीवल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरभट्टारकस्य प्रियतनयो राजारिपुनरेन्द्रहन्ता दिशि दिशि जित्वा स्ववंशजानां लक्ष्मीं प्राप्य प्राप्य च परमेश्वरतामनिवारिताविक्रमादित्यः तस्य ज्येष्ठभ्रातुः श्रीन्द्रादित्यपृथिवीवल्लभमहाराजस्य प्रियमहिषी विजयभट्टारिका स्वराज्यपर्घोमः संवत्सरे आश्वयुजपौर्णमासस्य द्वितीयायाम् विषुवे बहुपुण्यार्थम् नरकागाहरे वत्ससगोत्राय गृहपतिपौत्राय स्वामिचतुर्वेदस्य पुत्राय आर्यस्वामिदीक्षिताय पोलियमपथादिगिरिकाप्रभृतिदक्षिणोपरिश्वष्टाट्रोक्षिका उदकपूर्वदत्ता

कीर्दीच्या पांचव्या वर्षी एक शेत दान देत आहे असा मजकूर आहे. यावरून चंद्रादित्य हा स्वतंत्र राज्यकर्ता असावा असें दिसून येतें. कारण त्याच्या पत्नीनें आपल्या कारकीर्दीमध्यें जें दान दिलें आहे, तें देण्याची सत्ता म्हणजे तिच्या पतीची पूर्ण सत्ता असल्यावांचून साधणें शक्य नाहीं. अगर पूर्ण प्रतिनिधित्व असल्यावांचून दान देतां येणार नाहीं. यावरून ती त्या नांदत्या राजाची पट्टाभिषिक्ताराणी असावी, असें सिद्ध होतें. पुलकेशीचा आणखी एक पुत्र आदित्यवर्मा हा कृष्णा व तुंगभद्रा यांच्या संगमाजवळ असलेल्या प्रदेशावर राज्य करीत होता.

तस्य वंशजेष्टानिर्विशेषं परिपालयति स दातुः पुण्यभाग्भवति यो अपहर्ता स पंचभिर्महापातकैस्संयुक्तो भवति उक्तं च भगवता व्यासेन–

**स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधराम् ।**
**षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥**

## चालुक्य–शासन.

स्वस्ति श्रीमतां स्वामिमहासेनपादानुध्यानानां मानव्यसगोत्राणां हारीतिपुत्राणां चलिक्यानां वंशे संभूतः मानवपुराणरामायणभारतेतिहासकुशलः नीतौ बृहस्पतिसमः अग्निष्टोमवाजपेयपौण्डरीकबहुसुवर्णाश्वमेधावभृथस्नानपवित्रीकृतशरीरः स्वगुणैर्लोकवल्लभोवल्लभः तस्य पुत्रः परब्रह्मण्यः परराष्ट्रावमर्दी स्वराष्ट्रन्यायानुवर्ती देवद्विजगुरुपूजानिरतः सकलमहीमण्डलव्यापिविमलयशाः स्वभुजबलपराक्रमोपार्जितान्यराजवित्तः वृषभगमननयननिनादः समदवरवारणविलासः सिंहविक्रमः नयविनयदानदयादाक्षिण्यसत्यसंपदोपेतः शक्तित्रयसंपन्नः परमभागवतः मङ्गलराजः बभौ सत्वेन्यप्रतिमानकीर्तिस्तमङ्ग । प्रमृन्दन्स्वगुणांशुजालैः तेन राज्ञा शंकरगणपुत्रं गजतुरगपदातिकोशबलसंपन्नं बुद्धराजं विद्राव्य चालिक्यवंशसंभवं अष्टादशसमरविजयिनं स्वामिराजं च हत्वा संवत्सरपूज्यतमायांकार्तिकद्वादश्यां कृतोपवासेनार्चितविष्णुना काश्यपगोत्रस्य वेदवेदांगविदुषः सुमतिस्वामिनः पुत्राय वेदवेदांगपारगाय प्रियस्वामिने कुलशीलवृत्तसंपन्नाय कोंकणविषये निःश्रेयसमुदकपूर्वं कुण्डिवादकग्रामो दत्तः उक्तं च तेन 'राज्ञा योऽस्मत्कुलाभ्यन्तरोन्यो वा रागद्वेषलोभमोहाभिभूतो हिंस्यात् स पंचमहापातकोपपातकैस्संयुक्तः स्यात्' । धर्मशास्त्रेष्वप्युक्तं 'बहुभिर्वसुधा भुक्ता राजभिः सगरादिभिः । यस्य यस्य यदा भूमिः तस्य तस्य तदा फलम्' ॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधराम् । षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥ षष्टिवर्षसहस्राणि स्वर्गे तिष्ठति भूमिदः आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके वसेत् ॥ स्वं दातुं सुमहच्छक्यं दुःखमन्यस्य पालनम् । दानं वा पालनं वेति दानाच्छ्रेयोऽनुपालनम् ॥ इति.

## विक्रमादित्य.

(इ० स० ६५१–६८०).

पुलकेशीच्या नंतर त्याचा दुसरा एक विक्रमादित्य नांवाचा मुलगा राज्यावर बसला. यास पुलकेशीचा 'प्रियतनय' म्हणजे आवडता मुलगा असें ताम्रपट्टांत म्हटलेलें आहे. यावरून आपल्या निरनिराळ्या मुलांची त्यानें योग्य व्यवस्था केली होती असें नजरेस येतें. ज्याप्रमाणें पूर्वीच्या राजांच्या कारकीर्दीच्या आरंभीं राज्यांत बखेडे उत्पन्न झाले होते, त्याप्रमाणें विक्रमादित्याच्याही कारकीर्दीमध्यें आरंभीं बखेडे उत्पन्न झाले. उत्तरेच्या राजांकडून त्यास त्रास झाला नाहीं, परंतु हे बखेडे दक्षिणेकडे उद्भवले. उत्तरेकडच्या राजांस पुलकेशीनें निर्माल्यवत् करून टाकलें होतें; म्हणून त्यांजकडून विक्रमादित्यास त्रास पोहोंचला नाहीं. कांची किंवा 'कांजेव्हराज' येथील 'पल्लव' नांवाचे राजे, व चोल, पांड्य व केरळ ह्या देशांचे राजे ह्यांवर पुलकेशीनें आपला अंमल बसविला होता, परंतु तो पूर्णपणें बसविला नव्हता. त्या सर्व राजांनीं पुलकेशीच्या मरणानंतर त्याचा अंमल झुगारून देऊन बंड केलें. पण विक्रमादित्य मोठा शहाणा, साहसी व धैर्यवान् होता. त्यानें तत्काल चोल, पांड्य व केरल यांना हतवीर्य केलें, व पल्लव राजाचा पराभव करून त्याची राजधानी कांची हल्ला करून घेतली. हे पल्लव राजे पूर्वी कोणासही मस्तक नम्र करून मुजरा करीत नव्हते पण विक्रमादित्यानें त्यांस दासासारखा मुजरा करावयास भाग पाडिलें. जे जे शत्रु विक्रमादित्यावर चढाव करून आले त्या सर्वांस आपल्या चित्रकंठ नांवाच्या घोड्यावर स्वार होऊन हातीं तलवार घेऊन त्यानें माघारें पिटून लाविलें. व आपल्या बापाच्या सत्तेखालचा सर्व मुलुख त्यानें पुनः जिंकून घेतला. व तिन्हीं समुद्रांमधल्या सर्व देशाचा तो सार्वभौम राजा झाला.

ह्या पहिल्या विक्रमादित्याच्या कारकीर्दीत गुजराथेच्या दक्षिणभागांत–प्राचीनकाळच्या लाट देशांत चालुक्य वंशाच्या एका शाखेची स्थापना झाली. जयसिंहवर्म म्हणून त्याचा एक कनिष्ठ बंधु होता, त्याला विक्रमादित्यानें तो लाट नांवाचा प्रांत तोडून दिलेला असावा. त्या जयसिंहाच्या विनयादित्य युद्धमल्ल नांवाच्या पुत्रानें शके ६५३ मध्यें दान पत्र करून देऊन भूमिदान केलें केलें आहे. आणि श्र्याश्रय शिलादित्य नामक दुसऱ्या एकापुत्रानें नवसरी येथें राहात असतां गुप्तशकाच्या ४२१ व्या वर्षी दानपत्र करून एक गांव दिलेलें आहे. श्र्याश्रयास दानपत्रांत युवराज असें म्हटलेलें आहे. तो आपल्या भावाबरोबर राज्यकारभार करीत असावा. गुजराथेंतील चालुक्यांच्या ताम्रपट्टावर कोरलेल्या एका खेडा येथें सांपडलेल्या दानपत्राचें भाषांतर प्रोफेसर डाउसन यांनीं केलें आहे. त्या दानपत्रांत जयसिंहराज, बुद्धवर्मराज व विजयराज अशीं तीन राजांचीं नांवें आहेत. जयसिंहवर्म पहिल्या विक्रमादित्याचा बंधु यानेंच **गुजराथेंतील चालुक्य वंशाच्या शाखेची स्थापना केली.** जयसिंहराज, बुद्धवर्मराज व विजयराज हे गुजराथच्या दुसऱ्या कोणत्याही अन्य भागावर राज्य करीत असावे. हे जयसिंहवर्म याचेच पुत्र होते.

## विनयादित्य.

(इ० स० ६८०–६९६).

विक्रमादित्याच्या नंतर त्याचा पुत्र विनयादित्य हा गादीवर बसला. ( इ० स० ६८० ). यानें आपल्या बापाला दक्षिणेच्या लढायांत बरेंच साहाय्य केलें; व पल्लवराजा व इतर दुसरे राजे यांच्या फौजांचा विध्वंस करून, सर्व देशांत शांतता प्रस्थापित केली व पित्याचें प्रेम संपादिलें. गंग नांवाचें राजकुल व अलुप नांवाचे लोक यांस जिंकून दुसऱ्या पुलकेशीनें त्यांची भक्तिपुरःसर निष्ठा संपादन केली होती. ते पुढें चालुक्य वंशाच्या गादीचे अढळ दोस्त बनले. त्याचप्रमाणें विनयादित्यानें, इ० स० ६९२ ते ६९५ च्या दरम्यान, पल्लव, कळंभ, केरल, हैहय, विल, मालव, चोल, पांड्य वगैरे देशांच्या राजांस चालुक्य वंशाच्या गादीचे अढळदोस्त बनविलें. कावेरचा राजा, पारसीकांचा राजा, मलबार किनाऱ्यावर येऊन राहिलेले सिरिअन लोक व सिंहलचा राजा ह्या तिघांस जिंकून त्यांस खंडणी देणें भाग पाडलें. यानंतर विनयादित्यानें उत्तर-हिंदुस्थानांतील एका सार्वभौम राजास जिंकून त्याचा पराभव केला व पालिध्वजनामक एक ध्वज विशेष, ढक्का नामक एक दुदुंभिविशेष, इत्यादि चक्रवर्ति राजचिह्नें संपादन केलीं. शके ( ६१८ ) याची कारकीर्द इ० स० ६९६ ह्या वर्षी संपली.

## विजयादित्य.

(इ० स० ६९६–७३३).

विनयादित्याच्या मागून त्याचा पुत्र विजयादित्य गादीवर बसला. त्यानें आपल्या आजाने व बापाने दक्षिणेवरील स्वाऱ्यांत बरीच मदत केलेली असावी. एके समयीं शत्रूंचा पराभव होऊन ते पळत असतां तो त्यांच्या हातीं सांपडला. त्यावेळीं तो कैदेंत असूनही त्यानें आपल्या राज्याचा बंदोबस्त उत्तम प्रकारें ठेविला होता. व मुळींच तंटा बखेडा अगर झोटिंगपादशाई होऊं दिली नाहीं. आणि कैदेंतून मुक्त होतांच त्यानें सर्वत्र आपली सत्ता स्थापन केली. त्यानें चक्रवर्ति राजचिह्नांचा उपभोग घेतला. बदामी येथील शिलालेखांत लिहिलें आहे कीं, त्यानें आपल्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी ( शके ६२१ ) वातापीपूर येथें ब्रह्मा, विष्णु व महेश्वर ह्या तीनही देवांच्या मूर्तींची स्थापना केली. यानें एकंदर ३६ वर्षे राज्य केलें.

## विक्रमादित्य ( दुसरा ).

( इ० स० ७३३–७४७ ).

विजयादित्याच्या पश्चात् त्याचा मुलगा दुसरा विक्रमादित्य हा गादीवर बसला. ( इ० स० ७३३ ). गादीवर बसतांच त्यास त्यांचा पिढिजाद शत्रु पल्लवराज ह्यावर शस्त्र धरावें लागलें. त्या काळीं पल्लवांच्या राजधानींत नंदिपोतवर्म या नांवाचा राजा राज्य करीत होता. विक्रमादित्य त्यावर घाईनें चाल करून गेला. तुडाक नामक प्रांतांत त्याची व याची गांठ पडली. या लढाईत नंदिपोतवर्म याचा पराभव होऊन त्यास पळ काढणें भाग पडलें. त्यावेळीं

या चालुक्य वंशीय राजाला शेंकडोंगणती माणकें, हत्ती व रणवाद्यें अशी लूट मिळाली. नंतर तो कांची नगरांत शिरला, परंतु त्यानें त्या नगराचा नाश केला नाहीं. त्यानें त्या नगरांत राहून ब्राह्मणांस व दीन अनाथ लोकांस पुष्कळ द्रव्य वाटलें. आणि तेथील राजसिंहेश्वराच्या व इतर देवांच्या देवस्थानांतील सर्व सोनें पूर्वींच्या कोणी राजानें हरण केलें होतें, तें ज्यांचें त्यांस परत देवविलें. हें कार्य झाल्यानंतर त्यानें चोल, पांड्य, केरल व कलभ्र ह्या नांवाच्या लोकांशीं युद्धें करून त्यांस जिंकिलें. त्याच्या राणीनें कलादगी–पट्टडकल–गांवीं कांचीच्या राजाशीं संग्राम करून मिळविलेल्या विजयाचें स्मारक म्हणून एक देवालय बांधविलें. ह्या राजानें १४ वर्षें राज्य केलें.

## कीर्तिवर्म ( दुसरा ).

( इ० स० ७४७–७५३. )

विक्रमादित्याच्या मागून त्याचा मुलगा कीर्तिवर्म हा इ० स० ७४७ व्या वर्षी गादीवर बसला. यानें, आपल्या बापास पह्लवांबरोबर केलेल्या युद्धांत साह्य केलें होतें. एके समयीं बापाची आज्ञा घेऊन तो एकटाच पह्लवांच्या राज्यावर स्वारी करावयास गेला. त्यावेळीं त्याजबरोबर लढण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें, पह्लवांचा राजा एका किल्ल्याचा आश्रय करून राहिला. त्यावेळीं त्या चालुक्यवंशीय राजानें कांचीच्या राजाचें ऐश्वर्य भग्न करून पुष्कळ लूट मिळविली व तो स्वदेशीं माघारी आला. ह्या राजाच्या कारकीर्दींत, महाराष्ट्रावरील चालुक्यवंशाची सत्ता नष्ट झाली आणि देशाचें आधिपत्य त्याच्या हातून राष्ट्रकूट नामक वंशांतील राजांच्या हातीं गेलें. चालुक्यवंशाची मुख्य शाखा याप्रमाणें जरी गुप्त झाली, तथापि त्या वंशापासून अनेक लहान लहान घराणीं उत्पन्न झालेलीं होतीं. त्यांतील एका घराण्यानें–त्या घराण्यांत उत्पन्न झालेल्या तैलप नामक पुरुषानें–पुनः सार्वभौम सत्ता मिळविली. शके ६७९ मध्यें ह्या वंशाच्या हातून महाराष्ट्राचें स्वामित्व हरपलें असलें पाहिजे. ज्या राष्टकूटवंशीय राजानें प्रथम चालुक्यांस दांतीं तृण धरावयास लाविलें, त्याचें नांव **दंतिदुर्ग** असें होतें; त्यानें सुरवात करून त्याचा पुत्र **कृष्ण** यानें तें काम शेवटास नेलें.

ह्या चालुक्य वंशाच्या कारकीर्दींत जो काल गेला, त्यांत प्राचीन वैदिकधर्म व समृद्ध झालेला पुराणोक्त ब्राह्मणधर्म लोकांत चालू होतेच; परंतु त्याबरोबरच जैनधर्मही प्रमुखत्व पावूं लागला होता. 'ऐहोलि' येथील शिलालेख ज्यानें लिहिला तो स्वतःला ' मी कवि आहें ' असें म्हणतो, व त्यानें ' रविकीर्ति ' नामक जैनाला दुसऱ्या पुलकेशीनें आश्रय देऊन पदरीं बाळगिलें होतें; आणि दुसरा 'विजयादित्य' ह्यानें एका जैनांच्या वस्तीच्या देवळाचा जीर्णोद्धार करून त्याच्यासंबंधानें कोणा एका ' विजयपंडित ' नामक विद्वान् जैनास दान दिलें आहे. त्यानें असें लिहिलें आहे कीं,–' हा जैनपंडित सभेंत कोटिक्रमानें आपल्या प्रतिपक्षाचीं तोंडें बंद करी. त्याला एकवादी किंवा अद्वितीयवादी असें म्हटलेलें आहे.'

त्याकालीं जैनधर्माचें प्राबल्य दक्षिणमहाराष्ट्रामध्यें होतें. ब्रह्मा, विष्णु व महेश्वर ह्या तिन्ही देवांचीं देवालयें बांधलीं गेलीं. शिवाच्या महाविकाळ स्वरूपाचीही उपासना त्याकालीं होती. वेदशास्त्रपारंगत ब्राह्मणांस दिलेलीं दानें तर असंख्य आढळतात. पौराणिकधर्माच्या अभिवृद्धीसाठींही बरेच प्रयत्न झालेले होते. एकंदरींत त्याकालीं चालुक्यवंशीय राजे, सर्व धर्माविषयीं समता ठेवून वागणारे होते. कोणत्याही धर्माचा द्वेष अगर निषेध करणारे नव्हते.

चालुक्यवंशाची महाराष्ट्रावरील नष्ट झालेली सत्ता पुनः स्थापित होण्यास त्याच्या सहा पिढ्या मध्यंतरीं अशाच गेल्या. ह्या पुरुषांच्या हातून म्हणण्यासारखें कांहींच झालें नाहीं. नष्ट झालेलें ऐश्वर्य ज्या तैलपानें पुनः मिळविलें, त्याच्या पूर्वींच्या वंशजांचीं जीं नांवें आढळून येतात, तींही बरोबर मिळत नाहींत. तैलपाचा ज्या पुरुषांशीं निकट संबंध आहे, त्यांची मिरज येथें सांपडलेल्या 'जयसिंह' नामक राजाच्या ताम्रपत्रांत जी वंशावळ दिलेली आहे, तिच्याच अनुरोधानें आम्हीं ह्यानंतरची चालुक्यवंशाची कारकीर्द देत आहों.

विजयादित्यास दोन पुत्र होते. एक ' दुसरा विक्रमादित्य ' व दुसऱ्या पुत्राचें नांव आढळत नाहीं. दुसऱ्या विक्रमादित्याचा मुलगा दुसरा कीर्तिवर्म, याच्याच कारकीर्दींमध्यें चालुक्यांचें राज्य नष्ट झालें. विजयादित्याचा जो दुसरा पुत्र होता, ज्याचें नांव आढळत नाहीं असें वर लिहिलें आहे, त्यास कीर्तिवर्म ह्या नांवाचा एक पुत्र होता. कीर्तिवर्म्याचा तैलप,

तैलपाचा विक्रमादित्य, विक्रमादित्याचा आय्यण की, ज्यानें कृष्णाच्या कन्येशीं विवाह केला होता. अय्यणाचा विक्रमादित्य, यानें चेदि देशच्या लक्ष्मण नांवाच्या राजाची कन्या बोम्थादेवी इजबरोबर विवाह केला होता. विक्रमादित्याचा तैलप, ह्या तैलपानें राष्ट्रकूट-वंशांतील शेवटचा राजा कक्कल यांजपासून शके ८९५ त पुनः राज्याधिकार मिळविला, अशी माहिती आढळते. परंतु गुजराथच्या इतिहासावरून इ० सनाच्या सातव्या शतकामध्यें कल्याणमध्यें 'भुवड' राजा राज्य करीत होता असें दिसून येतें. तेव्हां त्या हकीकतीचा व गुजराथच्या इतिहासाचा बरोबरसा मेळ जुळत नाहीं. तैलपाच्या उदयकालीं गुजराथमध्यें 'मूळराज' राज्य करीत होता. त्याच्यापूर्वी 'भुवड राजा' व त्याचा पुत्र 'कर्ण' हे कल्याणमध्यें राज्य करीत होते. ती सर्व हकीकत पुढील भागीं दाखल करण्यांत येईल.

## उत्तरकालीन चालुक्य.

### तैलप.

(इ० स० ९७३-९९७).

तैलपानें एकंदर २४ वर्षें राज्य केलें. त्यानें चोलांच्या देशावर स्वारी केली. चेदीच्या राजास पादाक्रांत केलें. '**अनहिलपट्टण**' येथील चालुक्यवंशाची स्थापना करणारा मूळराज ह्यावर स्वारी करण्यासाठीं, त्यानें 'बारप' नांवाच्या सेनानायकास फौज देऊन पाठविलें. परंतु मूळराजानें बारपाच्या फौजेची कत्तल करून त्याचा पराभव केला. हा बारप 'लाट' देशच्या राजाचा सेनापति होता; असें कीर्तिकौमुदी नामक काव्याचा कर्ता 'सोमेश्वर' आपल्या काव्यांत सांगतो. ह्यावरून लाट देश तैलपाच्या सत्तेखालीं असावा असें दिसतें. तैलपानें माळव्यावरही स्वारी केली होती. त्याकालीं महाविख्यात राजा 'भोज' याचा चुलता 'मुंज' हा माळव्याचें राज्य करीत होता. मुंजानें स्वस्थ वसण्याचें सोडून, 'रुद्रादित्य' नामक वयोवृद्ध मंत्र्याचा सल्ला अवमानून तो गोदावरी उतरून अलीकडे आला. त्या वेळीं त्याजबरोबर वरेंच मोठें लष्कर होतें. मुंज गोदावरी उतरून अलीकडे येतांच तैलप त्यास सामोरा आला व उभय दळें युद्धास सिद्ध झालीं. त्या वेळीं तैलपानें मुंजाच्या सैन्याचा चुराडा करून त्यास कैद केलें. मुंजास कैद केल्यावर प्रथम त्यास सन्मानानें वागविण्यांत आलें; परंतु पुढें त्यानें सुटकेचा प्रयत्न केल्याचें उघडकीस आल्यावरून त्यास अपमानास्पद स्थितींत रहावें लागलें. शेवटीं तर त्यास दारोदार भिक्षा मागावयास लावलें आणि अखेरीस त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. याच्या कोणा एका सामंतानें बेळगांव जिल्ह्यांतील 'सौंदत्ती' येथें एक जैनांची वस्ती बांधविली होती; तिला इ० स० ९८० मध्यें यानें कांहीं जमीन दान दिली.

यानें 'जाकव्वा' नांवाच्या राष्ट्रकूट वंशांतील शेवटच्या राजाच्या कन्येशीं विवाह केला. तिजपासून त्यास 'सत्याश्रय' व 'दशवर्म' असे दोन पुत्र झाले.

### सत्याश्रय.

(इ० स० ९९७-१००८).

बापाच्या पश्चात् सत्याश्रय गादीवर बसला. याच्या कारकीर्दीत म्हणण्यासारखें कांहींच घडून आलेलें नाहीं. फक्त दक्षिणकोंकणावर अंमल चालवीत असलेल्या एका 'शिलाहार' ह्या उपनांवाच्या संस्थानिकांनीं दिलेल्या दानपत्रांत येरच उल्लेख आलेले आहेत. हें दानपत्र 'खारेपाटण' येथें सांपडलें आहे.

### पहिला विक्रमादित्य.

(इ० स० १००८-१०१८).

सत्याश्रय यास कांहीं संतान नव्हतें. त्यामुळें त्याच्या पश्चात् त्याचा कनिष्ठ बंधु 'दशवर्म' ह्याला त्याच्या 'भगवती' नामक पत्नीपासून झालेला पुत्र पांचवा 'विक्रमादित्य' गादीवर बसला (इ० स० १००८). यानें फारच थोडा काळ राज्य केलें. त्याच्या मागून त्याचा भाऊ 'जयसिंह ऊर्फ जगदेकमल्ल' हा गादीवर बसला.

### पहिला जयसिंह.

(इ० स० १०१८-१०४०).

जयसिंह गादीवर बसतांच त्यानें माळव्यांतील कट मोडला. भोजराजाचाही त्यानें तेजोभंग केला. तसेंच, चोल व चेर या लोकांचा मांजा मोडला. असें तत्कालीन कोरीव लेखांत लिहिलेलें आहे. मिरज येथील ताम्र-

पत्रांत असें लिहिलें आहे कीं, 'द्रमिल' देशाचा जो बलाढ्य चोल राजा त्याचा पराभव करून व सप्त-कोंकण-देशाधिपतीचें सर्वस्व हरण करून, तो उत्तरेकडील देश जिंकण्यासाठीं निघाला असतां, मार्गांत कोल्हापूर येथें आपल्या विजयी सैन्यासह तळ देऊन राहिला होता. त्या वेळीं त्यानें ताम्रपटलिखित दानपत्र करून दिलेलें आहे, (शके ९४६). जयसिंहाची कारकीर्द इ० स० १०४० त समाप्त झाली.

## आहवमल्ल ऊर्फ पहिला सोमेश्वर.

(इ० स० १०४०–१०६९).

जयसिंहानंतर त्याचा पुत्र पहिला सोमेश्वर हा गादीवर बसला. त्यानें 'आहवमल्ल' व 'त्रैलोक्यमल्ल' हीं बिरुदें धारण केलीं होतीं. यानें गादीवर बसतांच चोलाच्या राजावर स्वारी केली. तदनंतर भोजाची राजधानी जी 'धार' तिजवर स्वारी करून ती हस्तगत गेली; त्यामुळें भोजाला ती नगरी सोडून जाणें भाग पडलें. माळव्याच्या राजांचें व चालुक्यांचें वैर तैलपापासूनच सुरू जाहलें. तैलपानें मुंज राजाचा वध केला त्यावेळीं भोज लहान होता. भोजचरित्रांत असें सांगितलें आहे कीं, ज्यावेळीं भोजराजा वयांत आला, त्यावेळीं एका नाटकप्रयोगामधील मुंज राजाचा शोचनीय वध पाहून; त्यानें आपल्या चुलत्याच्या वधाचा सूड घेण्याचा निश्चय केला व बरोबर मोठी फौज घेऊन जाऊन, महाराष्ट्रावर स्वारी केली आणि तैलपाला धरलें; व त्याचे हालहाल करून त्यास ठार मारिलें. परंतु ह्या कथेंत विसंगतता आहे. भोजानें माळव्याचें राज्य सुमारें ५३ वर्षें केलें. मुंजाच्या मृत्यूच्या वेळीं भोज अल्पवयस्क होता. मुंज हा ९७४ त गादीवर बसला व तैलप ९९७ त मृत्यु पावला. यावरून तैलपानें मुंजास इ० स० ९९४ ते इ० स० ९९७ ह्या तीन वर्षांच्या दरम्यान ठार मारिलें असलें पाहिजे. त्यावेळीं भोज लहान असल्यामुळें, त्याच्यानें तैलपास मारणें कधींही योग्य दिसणार नाहीं; कारण तें घडून येणें शक्यच नाहीं. असें मात्र झालें असेल कीं, भोजानें आपल्या चुलत्याच्या वधाचा सूड उगविण्याकरितां, जवळपासच्या राजांस मिळवून घेऊन कट केला असेल व पांचव्या विक्रमादित्याविषयीं फारसा वृत्तांत कळून येत नाहीं; तेव्हां त्यास ठार मारिलें असेल. हें संभवनीय आहे. त्या कटाचा बीमोड करण्यासाठीं जयसिंहानें भोजावर शस्त्र धरिलें असावें व त्यानें केलेला कट मोडला असावा. यानंतर कांहीं कालानें सोमेश्वरानें 'चेदी' ऊर्फ 'डाहल' ह्या देशावर स्वारी केली. त्या देशाची 'तेवुर' ऊर्फ 'त्रिपुर' ही राजधानी होती व तेथील राजा कर्ण ह्या नांवाचा होता. त्याला त्यानें पदच्युत केलें व ठार मारलें. ही गोष्ट घडण्यापूर्वीच भोज राजाचा मृत्यु झालेला असावा. कारण त्याच्या मरणकालाच्या सुमारास त्या कर्णानें माळव्यावर एकाच वेळीं दोहों दिशांकडून हल्ला करावा या उद्देशानें, पहिला भीमदेव चालुक्य म्हणून त्याकालीं गुजराथचा राजा होता, त्याच्याशीं सख्य करून कट केलेला होता. व यानें भोजाच्या मृत्यूनंतर धारेवर हल्ला करून ती लुटली. बिल्हण कवि म्हणतो कीं,–त्या कर्णाला पदच्युत केल्यानंतर त्या चालुक्यवंशीय राजानें समुद्रकांठच्या देशावर स्वारी केली. त्यानें ते देश जिंकिले, आणि तेथें एक विजयस्तंभ बांधवून, तेथून समुद्रकांठानेंच तो ह्या द्वीपकल्पाच्या दक्षिणाग्रापर्यंत गेला. समुद्रकांठच्या मुलखांतून तो जात असतां, द्राविड ऊर्फ चोल ह्या लोकांच्या राजानें त्याजवर हल्ला केला; परंतु त्यांत त्याचाच पराभव झाला. त्याबरोबर सोमेश्वर त्यांच्या 'कांची' नामक राजधानीवर चाल करून गेला. व ती त्यानें हस्तगत केली. त्यावेळीं चोल राजा आपला जीव वांचविण्यासाठीं पळाला. त्यानंतर कान्यकुब्ज ऊर्फ कनोज ह्या देशाच्या राजाशीं संग्राम करून त्यानें त्याला आपल्या संरक्षणाकरितां पर्वतांतील दऱ्यांचा आश्रय घ्यावयास भाग पाडिलें. असें कोरीवलेण्यांत लिहिलेलें आहे. बिल्हणकवि आपल्या ग्रंथांत लिहितो कीं, **आहवमल्ल ऊर्फ सोमेश्वरानें कल्याण नामक नगरी वसविली.** यास तीन पुत्र होते. सोमेश्वर, विक्रमादित्य, आणि जयसिंह. विक्रमादित्य हुषार असल्यामुळें त्यासच युवराज करण्याचें आहवमल्लानें मनांत योजिलें होतें. परंतु विक्रमादित्यानें तें पद स्वीकारण्याचें नाकबूल केल्यावरून वडील पुत्र सोमेश्वर यासच तें पद देण्यांत आलें. परंतु अधिकारासंबंधीं कामकाज विक्रमादित्यच पाहत असे. बापानें विक्रमादित्यास लढाया करण्याच्या कामीं योजिलें. त्यानें प्रथम चोल लोकांवर स्वारी केली, व त्यांचा पराभव करून त्यांचें सर्व

राज्य हिसकावून घेतलें. माळव्याच्या राजाला कोणी शत्रूनें पळवून लाविलें होतें. त्यानें विक्रमादित्याचें साह्य मागितलें. तेव्हां विक्रमादित्यानें त्याच्या शत्रूंचा नाश करून त्यास गादीवर बसविलें. यानें बंगाला, कामरूपदेश ऊर्फ आसाम ह्यांवरही स्वाऱ्या केल्या. बिल्हणकवि म्हणतो,—त्यानें केरळांवर स्वारी केली, व त्यांस जिंकिलें. सिंहलचा राजा तर तो जवळ येऊन ठेपतांच, त्यास शरण आला. तदनंतर त्यानें 'गंगकुंड' नामक एक शहर घेतलें. आणि तेथून तो चोलांच्या देशांत शिरला. तेव्हां तेथील राजा पळून डोंगराच्या दऱ्यांत दडून राहिला. त्यानंतर त्यानें कांचीशहरांत प्रवेश करून तें लुटलें. तेथून तो वेंगी, चक्रकोट ह्या शहरांकडे वळला.

याप्रकारें विक्रमादित्य विजय-नादांत गुंतला असतां, आहवमल्लास कडक ज्वर आला. त्या ज्वराचा उपशम होत नाहीं असें पाहून व आपला अंतकाल समीप आला आहे असें अनुमान करून, त्यानें आपणांस तशा अवस्थेंत तुंगभद्रा नदीच्या तीरीं नेवविलें. तेथें त्या नदींत स्नान करून त्यानें पुष्कळ सुवर्ण दान केलें. नंतर पुनः नदींत शिरून गळ्याबरोबर पाणी होईल इतक्या पात्रांत पुढें जाऊन, लाटांची गर्जना व शतशः संगीतवाद्यांचा गजर मिळून एकच मोठा कोलाहल होऊन राहिला असतां, त्यानें एकदम जलसमाधि घेतली. ( इ० स० १०६९ ) या आहवमल्लानें पुष्कळ यज्ञयाग केले. विद्वान् लोकांविषयीं तो मोठा उदार होता. त्याच्या सद्गुणांमुळें कवींनीं त्यास अनेक नाटकांत नायक करून, नाटकें, काव्यें, आख्यायिका वगैरे रचलीं आहेत.

## दुसरा सोमेश्वर.

( इ० स० १०६९–१०७६ ).

आहवमल्लाच्या पश्चात् त्याचा ज्येष्ठ पुत्र सोमेश्वर हा गादीवर बसला. त्यानें 'भुवनैकमल्ल' हें बिरुद धारण केलें. वेंगीहून परत येत असतां विक्रमादित्याला वाटेंतच बापाच्या मृत्यूची खबर पोंचली. तेव्हां तो फारच त्वरेनें राजधानीस आला. भावानें परमप्रेमानें त्याचें स्वागत केलें. व विक्रमादित्यानेंही विजययात्रेंत मिळविलेली लूट सर्व भावाच्या हवालीं केली. कांहीं काळपर्यंत त्या उभय बंधूंमध्यें सलोखा होता. परंतु सोमेश्वर हा कमअक्कल व जुलमी होता. त्यानें प्रजेवर जुलूम चालविला, त्यामुळें त्यावरून तिची भक्ति उडाली. शहाण्या पुरुषांच्या सल्ल्यानें तो वागेना. त्यानें चालुक्यांचें महत्त्व गमाविलें. भावाचें मन आपणांविषयीं शुद्ध नाहीं व त्याचा वर्तनक्रम सुधारणें मुष्किल, हें जाणून विक्रमादित्यानें आपला धाकटा भाऊ जयसिंह यास बरोबर घेऊन मोठी फौज घेतली व तो राजधानी सोडून निघाला. तेव्हां सोमेश्वरानें त्याचा पाठलाग केला. परंतु विक्रमादित्यानें त्याच्या फौजेचा पराभव करून मोठी कत्तल उडविली. नंतर विक्रमादित्य तुंगभद्रा नदीच्या कांठीं गेला; आणि तेथून कांहीं दिवसांनीं चोलांच्या मुलखाकडे स्वारीचा रोख वळवून तो निघाला. वाटेंत बनवासी येथें त्यानें मुक्काम केला व तेथें कांहीं दिवस घालवून नंतर तो मलय देशाकडे गेला. त्यावेळीं त्यास गोंवें येथील 'जयकेशी' नांवाचा राजा शरण आला व त्यानें त्याला पाहिजे होती त्याहून अधिक संपत्ति दिली आणि त्यायोगें त्या 'कोंकण-देशांतील स्त्रियांच्या मुखावरील मंदहास्य अक्षय्य राही असें केलें.' असें कवीनें वर्णन केलेलें आहे. यावरून हा जयकेशी कोंकणचा राजा असावा–मिस्टर फ्लीट यांनीं गोंवें येथील कदंबांचीं जीं ताम्रपत्रें प्रसिद्ध केलेलीं आहेत, त्यांतील जयकेशी नामक पहिल्या राजानें चालुक्य व चोल या राजांशीं सख्य करून, गोपकपट्टण ऊर्फ गोंवें हीं आपली राजधानी केली असें वर्णन केलेलें आहे; तोच हा जयकेशी असला पाहिजे. विक्रमादित्य ऊर्फ त्रिभुवनमल्ल यानें आपल्या उत्तरवयांत आपली मल्लमहादेवी नांवाची कन्या, जयकेशीच्या नातवाला विवाह करून दिली. त्या नातवाचेंही नांव जयकेशीच होतें. ही लग्नाची गोष्ट मिस्टर फ्लीट यांनीं छापलेल्या गोंवें येथील कदंबांच्या तिन्ही दानपत्रांत कथन केलेली आहे. कारण दक्षिणेंतील चालुक्यांसारख्या सार्वभौम राजांशीं कदंबांचा शरीरसंबंध आल्यामुळें ह्या कुलास ती गोष्ट अभिमानास्पद वाटली व त्यांस आपल्या कुलाची प्रतिष्ठा वाढल्यासारखें वाटलें. अलुपांच्या राजानेंही ह्या चालुक्यवंशीय राजाला ( विक्रमादित्याला ) शरण येऊन धनी म्हणून मुजरा केला. तेव्हां विक्रमादित्यानेंही त्याजवर अनुग्रह केला. नंतर विक्रमादित्यानें केरळवासियांस म्हणजे मलबार प्रांतांतील लोकांस जिंकून तेथें आपला

अंमल बसविला. तेथून तो द्रविड व चोल राजांवर चाल करून गेला. हें वर्तमान चोल राजांस कळतांच त्यानें 'आपण सल्ला करावयास तयार असून आपली कन्या विवाहार्थ अर्पण करण्यास तयार आहों' म्हणून जासूद पाठवून कळविलें. तें त्याचें म्हणणें विक्रमादित्यानें कबूल केलें व चोल राजाच्या विनंतीवरून तो तसाच माघारा तुंगभद्रा नदीच्या कांठीं जाऊन राहिला. तेथें चोल राजानें आपल्या कन्येसहवर्तमान येऊन तो शरीरसंबंध तडीस नेला. पुढें कांहीं कालानें चोलराजा मरण पावला, तेव्हां त्याच्या राज्यांत धुमाळी सुरू झाली. हें वर्तमान त्या चालुक्यवंशीय राजाच्या कानीं पडतांच तो तत्काल कांचीस गेला व त्यानें तेथें एक महिना राहून चाललेल्या धामधुमीचा अंत लाविला व आपल्या सासऱ्याच्या मुलास गादीवर बसविलें. मेव्हण्यास गादीवर बसवून एक महिन्यामध्यें तेथील सुस्थिति आणून विक्रमादित्य परत फिरला मात्र, तोंच वेंगी देशचा राजा 'राजिग' यानें चोल राजाच्या पदरची मंडळी बेदिल झालेली पाहून संधि साधली आणि त्या राजास पदच्युत करून त्याचें राज्य बळकाविलें. आणि विक्रमादित्याला कांचीवर तुटून पडतां न यावें व त्याला पेंचांत पाडावें म्हणून, राजिगानें विक्रमादित्याचा वडील भाऊ सोमेश्वर यास पाठीमागून हल्ला करण्यास सुचविलें. असा बिकट प्रसंग येऊन ठेपला असतांही विक्रमादित्य मुळींच डगमगला नाहीं. त्यानें कांचीवर कूच केलें. आणि समोर त्या द्रविडराजाची फौज दिसूं लागे इतक्या अंतरावर पोहोंचतांच मागून सोमेश्वरानें त्याजवर हल्ला केला. सोमेश्वराची फौज बरीच मोठी असून, त्याजवळ युद्धसामग्रीही भरपूर होती. त्यावेळच्या लढाईचें बिल्हणकवीनें फारच उत्तम वर्णन केलें आहे. त्यानें आपला धनी जो विक्रमादित्य त्याची बाजू फारच उत्कृष्ट प्रकारें पुढें मांडलेली आहे. तो म्हणतो,–'आपला भाऊ सोमेश्वर हा परकीयांशीं मिळून आपणाबरोबर युद्ध करीत आहे, तें त्यानें करूं नये म्हणून विक्रमादित्यानें सोमेश्वरास पुष्कळ सामोपचाराच्या गोष्टी सांगितल्या; परंतु सोमेश्वराचें अंतःकरण कालकूट–विषानें भरलेलें होतें. त्यानें वरकरणीं मानभावीपणा दाखविला व भावाशीं सख्य करून योग्य संधीची वाट पाहूं लागला. हें विक्रमादित्याच्या लक्षांत येतांच त्यानें दोन्ही फौजांशीं लढाई करण्याचें निश्चित केलें. त्याबरोबर जबरदस्त लढाई होऊन विक्रमादित्य विजयी झाला. राजिग पळून गेला व सोमेश्वर कैदी बनला. सोमेश्वरास घेऊन विक्रमादित्य तुंगभद्रेच्या कांठीं आला. प्रथम त्यास थोडा विचारच पडला. परंतु नंतर त्यानें सोमेश्वरास पदच्युत करून आपणांस राज्याभिषेक करविला. व आपला कनिष्ट बंधु जयसिंह यास बनवासी नामक प्रांताचा अधिकार दिला, (इ० स० १०७६). तदनंतर विक्रमादित्यानें आपल्या 'कल्याण' नामक राजधानींत प्रवेश केला.

## दुसरा विक्रमादित्य.

(इ० स० १०७६–११२६).

त्याची कारकीर्द ५० वर्षांची होती. ह्या कालपर्यंत त्याच्या राज्यांत एकंदरीनें फारसे तंटे–बखेडे झाले नाहींत. त्यानें 'त्रिभुवनमल्ल' हें बिरुद धारण केलें होतें. शिवाय 'कालविक्रम,' व 'पर्माडिराय' ह्या दोन बिरुदांनींही तो प्रसिद्ध आहे. त्यानें शक नांवाचा काल काढून टाकला व त्या जागीं आपल्या नांवाचा नवीन काल चालू केला. परंतु त्याच्या मृत्यूनंतर तो फार दिवस टिकला नाहीं. राज्यपदारूढ झाल्यावर तो कऱ्हाडास गेला व तेथील शिलाहार वंशांतील कोणी एक राजा राज्य करीत होता, त्याच्या कन्येशीं त्यानें विवाह केला. तिचें नांव चंद्रलेखा. ती अपूर्व लावण्यवती होती. बिल्हणकवि तिजविषयीं असें वर्णन करितो कीं, "तिनें स्वयंवर मांडलें होतें; तेथें पुष्कळ राजे जमा झाले होते. त्या सर्वांतून तिनें त्या चालुक्यवंशीय राजाला वरिलें, आणि त्याच्या गळ्यांत वैवाहिकमाला घातली." कोरींव लेखांत चंद्रलेखेला 'चंदलदेवी' असें म्हटलें आहे. व तिच्याशिवाय त्रिभुवनमल्लाच्या दुसऱ्या पुष्कळ भार्या सांगितलेल्या आहेत. त्या सर्व स्त्रियांच्या जातखर्चाकरितां त्यानें कित्येक गांवांचा वसूल तोडून दिलेला होता.

बनवासी प्रांतावर विक्रमादित्यानें आपला कनिष्ट बंधु जयसिंह यास प्रतिनिधी नेमिलें होतें. त्यास विक्रमादित्याबरोबर द्रोह करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यानें प्रजेपासून जुलमानें पुष्कळ द्रव्य काढलें. द्रविडांच्या राजांशीं व इतर संस्थानिकांशीं सख्य केलें. आणि विक्रमादित्याच्या फौजेंत फितुर उत्पन्न करण्याचा

प्रयत्न चालविला. विक्रमादित्यास ह्या प्रकारची जाणीव होतांच, त्याच्या ह्या दुष्कृत्यापासून त्यास परावृत्त करावें म्हणून त्यानें अनेक प्रयत्न केले. पण ते सर्व फोल झाले. पुढें कांहीं दिवसांनीं जयसिंह बरेंचसें सैन्य घेऊन कृष्णेच्या कांठीं तळ देऊन राहिला. त्या-ठिकाणाहून त्यानें भोंवतालचीं गांवें लुटलीं व कित्येक जाळलीं; पुष्कळ लोकांस कैद केलें; आणि थोडक्याशा जयानें फुगून जाऊन विक्रमादित्यास निरोप पाठविला. ह्या थरास गोष्ट येतांच विक्रमादित्य आपलें लष्कर घेऊन कृष्णानदीच्या जवळ आला. तो येत असतां त्यास शत्रूच्या लहान लहान टोळ्यांनीं फारच त्रास दिला. तरी त्यांस पिटाळून तो कृष्णेच्या कांठीं आला व तेथें त्यानें आपल्या सैन्याचा तळ दिला. त्या ठिकाणाहून त्यानें आपल्या बंधूच्या सैन्याची टेहेळणी केली, तेव्हां तें बलाढ्य सैन्य असल्याबद्दल त्याची खात्री पटली. तरीही तो डगमगला नाहीं, त्यानें लढा-ईस सुरवात केली. युद्ध जुंपलें. प्रथम शत्रूकडील हत्ती पुढें सरसावून आले, आणि त्यांनीं विक्रमा-दित्याच्या फौजेच्या फळ्या फोडून त्यांची दाणादाण केली. त्याचे सर्व हत्ती, घोडे, व माणसें तोंडें फिर-वून माघारीं वळलीं. परंतु इकडे विक्रमादित्य स्वस्थ बसलेला नव्हता. तो आपल्या मदोन्मत्त हत्तीवर बसून विचित्र शौर्यानें त्या गर्दीतून पुढें घुसला, आणि दोन्ही बाजूंस जबरदस्त दणके देत चालला. त्यानें शत्रू-कडील हत्ती माघारे पिटून लावले व त्याच्या शिपायां-पैकीं शेंकडों मारले. शेवटीं जयसिंहाच्या फौजेचा परा-जय होऊन, त्यानें व त्याच्या अनुयायांनीं पळ काढला. विक्रमादित्यानें त्याचा पाठलाग केला नाहीं; परंतु समर-भूमीवर शत्रूनीं टाकून दिलेले हत्ती, घोडे, बायका वगैरे सरंजाम घेतला व आपल्या राजधानीस आला. पुढें कांहीं काळानें, जयसिंह एका अरण्यांत छपून राहिला होता, त्यास कोणीं पकडून विक्रमादित्याकडे आणिलें. त्या वेळीं विक्रमादित्यानें त्यास त्याच्या अपराधाची क्षमा केली.

विक्रमादित्याच्या कारकीर्दीच्या अखेर म्हैसूर प्रांतां-तील हळेबीड येथील यादववंशाच्या होयसाळ नांवाच्या एका शाखेंतील राजानें पांड्य, गोवें व कोंकण ह्या तीन देशच्या राजांच्या साह्यानें स्वारी केली. हें होयसाळ कुळ 'विष्णुवर्धन' नामक राजानें नांवारूपास आणिलें व त्याजविषयीं विक्रमादित्याच्या अंतःकरणांतही पूज्य-बुद्धि होती. तो नेहमीं म्हणत असे कीं, लोकहो! सर्व राजांत होयसाळ राजा एवढा एकटाच अजिंक्य आहे, हें लक्षांत बागवा. यावरून विक्रमादित्य आपणांस फारच मान देतो असें विष्णुवर्धनाचीं चाकर-माणसें त्यास वारंवार सांगत. असो; विक्रमादित्यानें त्या चालून आलेल्या शत्रूवर आपल्या आचर्गी नांवाच्या संस्था-निकास पाठविलें. त्याचा देश दक्षिणेकडे होता, आच अगर आचर्गी हा समरांत प्रतिसिंहासारखा व तेजानें उष्णरश्मी सूर्यासारखा होता. त्यानें होयसाळचा पराभव केला; गोवें काबीज केलें; लक्ष्म याजबरोबर युद्ध करून त्यास पळविलें; पांड्यांचा पळत असतां पाठलाग केला; मलय लोकांस पिटाळून लाविलें. आणि कोंकणदेश काबीज केला. त्यानें कलिंग, वंग, मरु, गुर्जर, मालव, चेर आणि चोल या राजांस जिंकून विक्रमादित्याचे ताबेदार बनविलें. ह्या राजांपैकीं चोल राजा सामर्थ्यवान् असल्यामुळें, त्याजवर विक्रमादित्यानें स्वतः स्वारी केली व त्याचा पराभव केला. ह्या विक्रमादित्यानें एक विष्णूचें देवालय बांधलें आहे. व त्या देवालयाशेजारीं एक नगर वसवून त्याचें नांव 'विक्रमपुर' असें ठेविलें आहे. यानें प्रजेचें पालन फारच उत्तम प्रकारें केलें. त्याच्या अमदानीमध्यें लोक सुखी होते. लोकांस निर्भयता तर इतकी वाटत असे कीं, ते रात्रीं आपल्या घराचीं दारें बंद करण्याचीही काळजी ठेवीत नसत. गरिबां-विषयीं तो फार उदार होता. प्रत्येक पुण्यपर्वी तो विधि-युक्त षोडष महादानें करी. तो विद्वानांचा चाहता होता. बिल्हणासारख्या काश्मिरच्या पंडिताला त्यानें आपल्या पदरीं ठेवून 'विद्यापति' म्हणजे पंडितनायक ह्या पदवीस चढविलें, यावरून त्यास विद्वानांची किती आवड होती तें सिद्ध होत आहे. ह्या भरतखंडांतील मोठ्या भागांत आणि विशेषतः मराठ्यांच्या देशांत धर्म व व्यवहारनीति ह्यासंबंधीं हरएक प्रकरणांत सांप्रतकालीं मुख्य प्रमाण म्हणून मानतात असा जो 'मिताक्षरा' नामक ग्रंथ त्या ग्रंथाचा कर्ता 'विज्ञानेश्वर' हा विक्रमादित्याच्याच कारकीर्दीत होऊन गेला. तो कल्याण येथें रहात असे. त्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रतींच्या शेवटीं तीन श्लोक आढळतात. ते असेः--

१. ह्या पृथ्वीच्या पाठीवर कल्याणासारखें शहर मागें नव्हतें, हल्लीं नाहीं व पुढें होणार नाहीं; सकल ऐश्वर्य-

संपन्न–विक्रमार्कासारखा भूपति कोणी कधींही पाहिला नव्हता; किंवा ऐकिला नव्हता, आणि विशेष काय ? विज्ञानेश्वर पंडित अन्य कोणा पुरुषांशीं तुलितां येत नाहीं. ही त्रयी स्वर्गातील कल्पलतेतुल्य आहे, ती कल्पांतापर्यंत राहो.

२. तो तत्त्वविज्ञाननाथचंद्र व दिवाकर आहेत तोंपर्यंत वांचो, तो शब्द निर्माण करितो; त्यांपासून मध स्रवतो, आणि विद्वानांस त्याहून विशेष विस्मयकारक अन्य कांहींच वाटत नाहीं; तो याचकसमुदायास त्यांच्या इच्छेपेक्षांही विपुल धन देतो; मुरमर्दनाच्या स्वरूपाचें ध्यान करतो; आणि देहाबरोबर उत्पन्न होणारे रिपु त्यानें जिंकिले आहेत.

३. रघुकुलोत्तमांकुर जो राम त्याचा जणुं यशोराशीच असा जो सेतु त्यापासून तों तहत हिमालयापर्यंत, आणि पश्चिम-समुद्रापासून तो तहत पूर्व-समुद्रापर्यंत, साऱ्या भूमिखंडांतील राजे पुढें दंडवत करितात; त्यामुळें त्याच्या शिरोभूषणांतील रत्नांच्या तेजानें ज्या विक्रमादित्याचीं पावलें देदीप्यमान असतात, तो प्रभु विक्रमादित्य चंद्र व तारागण जोंवर टिकतील तोंवर ह्या सकल पृथ्वीचें पालन करो.

ह्या वर्णनावरून त्या कालीं विक्रमादित्य हा असामान्य पुरुष होऊन गेला असावा, असें दिसून येत आहे. व त्याच्या अमदानीमध्यें प्रजा सर्व सुखोपभोग निर्वेधपणें घेत असे असें निःसंशय सिद्ध होतें. जरी वरील श्लोकांमध्यें कांहीं अतिशयोक्ति असली, तरी निरनिराळ्या शिलालेखांवरून 'विज्ञानेश्वराच्या' ह्या स्तुतीस पुष्टि मिळत आहे.

## तिसरा सोमेश्वर.

( इ० स० ११२६–११३८ ).

विक्रमादित्याच्या पश्चात् त्याचा पुत्र तिसरा सोमेश्वर हा गादीवर बसला. यानें 'भूलोकमल्ल' हें बिरुद धारण केलें होतें. त्याची कारकीर्द फक्त ११ वर्षांची होती. पण तितक्या अवधींत त्यानें आन्ध्र, द्रविड, मगध व नेपाळ ह्या देशांच्या राजांच्या मस्तकीं पाय दिला. सर्वत्र विद्वज्जन याची फारच तारीफ करीत. कारण, यानें संस्कृत भाषेंत 'मानसोल्लास किंवा अभिलषितार्थ चिंतामणि' या नांवाचा ग्रंथ लिहिलेला उपलब्ध आहे. या ग्रंथांत अनेक प्रकारच्या विषयांची माहिती सप्रमाण दिलेली आहे. त्याचे पांच भाग असून, पहिल्या भागांत राज्यसंपादनाला जे उपयुक्त अशा गुणांचें वर्णन आहे, दुसऱ्या भागांत, प्राप्त राज्याच्या रक्षणार्थ आवश्यक साधनांचें स्पष्ट वर्णन आहे. तिसऱ्यांत कोणाही राजानें आपली सत्ता सुदृढ केल्यावर, त्याला उपभोगाचे जे जे पदार्थ लभ्य असतात ते सांगितलेले आहेत; चवथ्यांत मानसिक आनंद ज्यांपासून होतो, त्या व्यवसायांचे प्रकार सांगितलेले आहेत; आणि पांचव्यांत क्रीडा, करमणुकी अथवा खेळ सांगितलेले आहेत. ह्या प्रत्येक भागाचे वीस वीस उपभेद केलेले आहेत. पहिल्या भागांत अनृताचा त्याग, दुसऱ्यास पीडा किंवा दुःख देण्याच्या प्रवृत्तीचें सर्वथा वर्जन, इंद्रियनिग्रह, महात्मता, सौजन्य, देवांवर श्रद्धा, दरिद्री व पंगू, मित्र व स्वपक्षीय, त्यांस अन्नदान व आश्रय देणें, इत्यादि सद्‌गुणांचा समावेश केलेला आहे. दुसऱ्या भागांत, ज्या कशाला सात अंगें असें म्हणतात त्यांचें वर्णन केलेलें आहे. म्हणजे सर्वोत्कृष्ट राजा, त्याचा प्रधान, पुरोहित व ज्योतिषी ह्यांसुद्धां, जामदारखाना व तो रिता झाला असतां पुनः भरण्याचा मार्ग, सैन्य इ०, तिसऱ्या भागांतील उपभोगांचे प्रकार म्हणून सांगितलेले आहेत ते हे; सुंदर राजमंदिर, जलक्रीडा, अभ्यंजन, बहुमूल्य वस्त्रें, अलंकार भूषणें, इ० चवथ्यांतील व्यवसायांचे प्रकार सांगितले आहेत ते हे कीं, शिपाईगिरीच्या कसरती, घोड्यावर बसणें, हत्ती शिकविणें, कुस्ती करणें, कोंबड्यांच्या झुंझी, कुत्र्यांस शिकविणें, कविता करणें, गान, नृत्य, इ०. पांचव्या भागांत क्रीडांचे प्रकार वर्णिले आहेत ते हे; उद्यानक्रीडा, वनक्रीडा, पर्वतक्रीडा, पुलिनक्रीडा, नानापरीचे खेळ, स्त्रीसमागमोपभोग इ०; सारांश वरील विषयांविषयीं संस्कृत भाषेंत असलेल्या विद्या व कला ह्यांच्यांतून, त्या ग्रंथांत ज्यांचीं मूलतत्त्वें देखील सांगितलेलीं नाहींत, अशा थोड्या. त्या ग्रंथांत राजनीति, ज्योतिष, फलज्योतिष, न्यायशास्त्र, अलंकारशास्त्र छंदशास्त्र, गांधर्वविद्या, चित्रकला, शिल्प, वैद्यक, अश्वशिक्षा, गजशिक्षा, श्वानशिक्षा इत्यादि शास्त्रें व कला वर्णिल्या आहेत. हा तिसरा सोमेश्वर विद्वान् होता. यास 'सर्वज्ञ भूप' हें बिरुद मिळालेलें होतें. 'मानसोल्लास' ह्या ग्रंथांत पंचांग तयार करण्याकरितां कित्येक ग्रह व तारा, त्यांचीं स्थानें गणि-

तानें निश्चित करण्यासाठीं घेतलेला आद्य दिवस म्हणून जो वर्णिलेला आहे तो येणेंप्रमाणें:—'चालुक्य कुल-भूषण' सकलशास्त्रांच्या अर्थसर्वस्वाब्धीला आटविणारा जणूं दुसरा अगस्त्य मुनिच व सर्व शत्रूंचा संहारकर्ता, असा जो राजा सोम, समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करीत असतां, शकनृपकालाचीं वर्षें १०५१ अतीत होऊन सौम्यनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध प्रतीपदा शुक्रवार.' यावरून तो ग्रंथ सोमेश्वरानें गादीवर बसल्यानंतर चवथ्या वर्षी रचला.

## जगदेकमल्ल.

(इ० स० ११३८–११५०).

सोमेश्वराच्या मागून त्याचा पुत्र जगदेकमल्ल हा गादीवर बसला. याच्याविषयीं पुढें कांहीं लिहिलेलें आढळत नाहीं. त्यानें १२ वर्षे राज्य केलें.

## तैलप.

(इ० स० ११५०–११६५).

जगदेकमल्लाच्या मागून त्याचा भाऊ तैलप ऊर्फ नुर्मडीतैल हा गादीवर बसला. ह्या दोन्ही राजांच्या कारकीर्दीमध्यें चालुक्यांची सत्ता भराभर खालावत चालली. चालुक्यांचे मांडलिक प्रबल व उद्धत झाले. त्यांपैकींच एक मांडलिक संस्थानिक 'कलचुरी' नामक कुळांतील 'बिज्जल' अथवा 'बिज्जण' नांवाचा होता. त्याच्याकडे तैलपाच्या कारकीर्दींत 'दण्डनायक' (युद्ध मंत्री) हा अधिकार होता त्यानें ही संधि साधली. आणि राज्यांत बलाढ्य होऊन, अर्धे मुर्धे स्वतंत्रतेनें वागूं लागलेल्या संस्थानिकांतून कित्येकांची त्या कामीं अनुकूलता व साहाय्य मिळण्याकरितां त्यानें प्रयत्न आरंभिला. त्याला साहाय्य करणाऱ्यांपैकीं, कोल्हापूरचा महामंडलेश्वर विजयार्क हा एक होता. आणि तैलंगणांतील 'काकतेय' नामक राजकुलांतील 'प्रोलराज' हा होता. बिज्जलानें आपला धनी तैलप ह्याला इ० स० ११५७ पर्यंत आपल्या पूर्ण कबज्यांत ठेविलें होतें. परंतु त्यावर्षी तैलप कल्याण शहर सोडून धारवाड प्रांतांत 'अभिगेरि' म्हणून एक गांव आहे तेथें तो पळून गेला. ती अभिगेरि तदनंतर, विस्तारानें संकुचित झालेल्या त्याच्या राज्याची राजधानी झाली. त्यानें शके १०८४ पर्यंत मी स्वतंत्र राजा आहें अशी द्वाही फिरविली नसावी. व सार्वभौम राजाची बिरुदेंही धारण केलेलीं नसावींत. ह्या स्वारीनंतर तैलप अभिगेरिहून दक्षिणेकडे बनवासी येथें ठाणें घालून राहिला असावा. ह्याच्या कारकीर्दीचें शेवटचें साल शके १०८७ सांगितलेलें आहे.

चालुक्यांची राजसत्ता कलचुरि नामक कुळांतील राजांच्या हातीं गेली. परंतु ह्या कालाच्या सुमारास 'लिंगायत' नांवाचा एक नवीनच धर्म उदयास आला व त्यामुळें आंतल्या आंत उपस्थित झालेले कलह व बिज्जलाचा मारेकऱ्याकरवीं केलेला प्राणघात, ह्या दोन्ही गोष्टींनीं कलचुरिवंशियांची सत्ता बरीच हीनबल झाली; आणि शके ११०४ ह्या वर्षी नुर्मडितैल नांवाच्या चालुक्यवंशीयाचा पुत्र चवथा सोमेश्वर ह्यानें आपल्या वंशाचें वडिलार्जित राज्य कलचुरीवंशीयांपासून हिरावून परत घेतलें.

## चवथा सोमेश्वर.

(इ० स० ११८२–११८९).

हें राज्य सर्वच जरी त्यास मिळालें नाहीं, तरी राज्याचा बहुतेक भाग त्याच्या हातीं आला. त्यानें अभिगेरि येथें आपलें मुस्तकीम ठाणें घातलें होतें. गमाविलेल्या राज्याची सत्ता प्राप्त होण्यास त्याचाच ब्रह्म किंवा बोम्म नांवाचा एक मांडलिक कारणीभूत झाला. या बोम्मानें आपल्या धन्यासाठीं शत्रूशीं कित्येक लढाया मारल्या; आणि एका हत्तीच्या योगें साठ हत्ती जिंकले असें वर्णन केलेलें आहे. शके ११०६ च्या एका कोरीव लेखांत त्या बोम्मानें कलचुरि वंशीयांचा समूळ नाश करून चालुक्यांस पुनः गादीवर बसविलें असें कथन केलेलें आहे. पुढें थोडक्याच काळांत दक्षिणच्या यादवांचा प्रमुख वीर बल्लाळ व उत्तरेकडील यादवांचा प्रमुख भिल्लम हे त्या चालुक्य राज्यावर एकदम उठले व ह्या उभयतांनीं बोम्माशीं युद्धें केलीं. त्यांत वीर बल्लाळ ह्याच्या सैन्यास यश मिळून त्यानें चालुक्यांकडील सेनानायकास जमीनदोस्त केलें. व शके ११११ ह्या वर्षी चालुक्यवंशाच्या राजसत्तेची समाप्ति केली. वीरसोम ऊर्फ चवथा सोमेश्वर ह्याचा मागमूसही सांपडला नाहीं.

मुख्य चालुक्य वंशाला अनेक शाखा फुटून त्याचीं छोटेखानी रजवाड्यांचीं कुळें उत्पन्न झालीं. असलें एक

घराणें रत्नागिरि जिल्ह्यांतील राजापुर तालुक्यांत तेरवण ह्या नांवाचें गांव आहे, त्या ठिकाणीं एक शिलालेख सांपडला त्यांत असें लिहिलें आहे कीं, केशव महाजनी हा 'काम्बदेव' नांवाच्या महामंडलेश्वराचा दिवाण होता त्यानें तेरवाटक ह्या नांवाचें गोप्रदान दिलेलें आहे. व त्या काम्बदेवास ' चालुक्य कुल कमलकलिका विकासन करणारा सूर्य ' असें म्हटलेलें असून ' कल्याण पुरवराधीश्वर ' म्हणजे कल्याण येथें एकेकाळीं राज्य करीत असणाऱ्या प्रतापी राजकुलांतला असेंही म्हटलेलें आहे. यावरून काम्बदेव हा तेरवणच्या लगत्याच्या कोंकण–प्रांतावरील राजा असला पाहिजे. अशा प्रकारचीं राजकुलें त्या कालीं होतीं. त्यांची माहिती मिळाल्यास इतिहासज्ञांस किती तरी प्रकारचा फायदा होणार आहे. कोल्हापूर येथील अम्बाबाईच्या देवालयांत एक शिलालेख आहे त्यांत कोणा एका सोमदेव नामक राजानें एक गांव दान दिल्याचें लिहिलेलें आहे. तो राजा चालुक्य कुलांतला होता व संगमेश्वर येथें राज्य करीत होता, असा मजकूर आहे. संगमेश्वर हें गांव रत्नागिरीच्या ईशान्येस १२ कोसांवर आहे. सोमदेव हा वेतुगिदेवाचा पुत्र होता, व वेतुगिदेवाचा पिता कर्णदेव म्हणून होता; तेरवण येथील दानपत्रांतला काम्बदेव हा ह्याच संगमेश्वर येथील चालुक्यवंशांतील कोणी पुरुष असावा असें वाटतें. संगमेश्वर तालुक्यांत, किंवा त्याच्या आसपासच्या प्रदेशांत, सालुंखे, चाळके, वगैरे मराठ्यांचीं जीं कुटुंबें अस्तित्वांत आहेत, तीं या घराण्यांतीलच असावीं असें वाटतें.



# साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची कैफियत.

## भाग दुसरा.

### चालुक्य ऊर्फ सोळंखी घराणें.

### अनुक्रमणिका.

राची लूट. सर्व हिंदुराजांची मुसलमानांवर स्वारी. भीमदेव अलिप्त राहतो. अजमीरच्या राजाबरोबर युद्ध तह होतो. उदयामती नांवाच्या स्त्रीशीं लग्न करतो. ती ' राणी बाव ' या नांवाची विहीर बांधते.

**कर्णराजः**--( इ० स० १०७२-१०९४ ). भिल्ल, कोळी यांची वस्ती नाहींशी. करतो दक्षिणेचा रुद्रपूरचा राजा जयकेशी याच्या ' मैनलदेवी ' नांवाच्या कन्येबरोबर लग्न. पति-पत्नींमध्यें वैषम्य. मुंजल प्रधानाची युक्ति. नायकिणीच्या ऐवजीं मैनलदेवीचा राज मंदिरांत प्रवेश. स्वकृत कर्तव्याबद्दल पश्चात्ताप-गौप्य स्फोट. कर्ण राजाचा संतोष. मैनलदेवीस गर्भ राहून सिद्ध राजाचा जन्म.

**सिद्धराज जयसिंगः**—( इ०स० १०९४-११४३ ). मलाव तलावाचें बांधकाम. कसाबिणीचा हट्ट. यशोवर्माबरोबर तह झाल्यानें जयसिंगास वाईट वाटतें. सहस्रलिंग तलावाचें बांधकाम, ओड जातीच्या 'जसमा' नांवाच्या सुस्वरूप स्त्रीबद्दल राजाची आसक्ति. ती अग्निकाष्ठें भक्षण करिते. व शाप देते. तलावास पाणी येत नाहीं. बलीदान-पाणी येतें. यशोवर्मावर स्वारी व त्यास पकडून कैद करतो. हेमाचार्य पंडित संस्कृत व्याकरणाचा ग्रंथ रचतो. त्याची हत्तीवरून मिरवणूक. राणकदेवीसाठीं खेंगाराबरोबर युद्ध. खेंगाराचा मृत्यु. राणकदेवी सती जाते. एका अरबी भूगोलशास्त्रवेत्त्याचें सिद्धराजाबद्दल मत.

**कुमारपालः**—( इ०स० ११४३-११७४ ). कुमारपालास गादी मिळण्यासंबंधें भविष्य. सिद्धराज त्यास मारण्याची इच्छा प्रगट करतो. तो पळतो. त्याचे हाल. हेमाचार्यांचें भविष्य. राज्य मिळवितो. आनाक राज्याची स्वारी व त्याचा पराभव. आनाकराजा आपली मुलगी देऊं करतो. माळव्याच्या राजाची स्वारी व त्याचा पराभव. मल्लिकार्जुन याजवर 'आंबड' यास कोंकणांत रवाना करतो; पण त्याचा पराभव होतो. बाहद याची रवानगी. तो मल्लिकार्जुनाचा पराभव करतो. जैनधर्म स्वीकारतो. आपला भाऊ अर्णोराज सोळंखी यास वाघेल गांव देतो. ते साळुंखे वाघेल म्हणवितात. सिसोदिया वंशाच्या मुलीबरोबर लग्न. जैनसाधूंच्या पायां पडावें लागलें म्हणून ती अपघात करते. भाटही जाळून घेतात. याचा पुतण्या अजयपाल यास विषप्रयोग करून ठार मारतो.

**अजयपाळः**--( इ० स० ११७४-११७७ ). जैन मंदिराचा उच्छेद करितो. 'कपर्दी' नांवाच्या मित्रास प्रधान करितो. त्याचा वध. रामचंद्र नांवाच्या जैनास प्रधानपद देतो. तो अपघात करितो. आंबडचा मृत्यु. द्वारपाल ठार मारितो.

**दुसरा मूळराजः**--( इ० स० ११७७-११७९ ).

**भीमदेवः**—( इ० स० ११७९-१२१५ ). यास भोळा भीमदेव म्हणत. भीमदेव व अजमीरचे चव्हाण यांचें वैर. इच्छिनीकुमारीसाठीं युद्ध. प्रमाराचा पराभव व भीमदेवाचा जय. मुसलमानांची अजमीरवर स्वारी. चव्हाणाचें शौर्य. यवनांचा व भीमदेवाचा पराभव. पुनः स्वारी. भीमदेवाचा जय. पृथ्वीराजाची स्वारी. भीमदेवाचा पराभव. पृथ्वीराज चव्हाणावर यवनांची स्वारी पृथ्वीराज कैद होतो. कुतुबुद्दीन भीमदेवास पळवितो, गुजराथची सत्ता मुसलमानांच्या हातीं जाते.

## सोळंखी ऊर्फ वाघेल वंश.

**वीरधवलः**—वाघेलवंशाची वंशपरंपरा. वस्तुपाल व तेजपाल यांस मंत्री करितो. गुजराथेंतील विजययात्रा. मेव्हण्यास मारून त्याच्या मुलास गादीवर बसवितो. भीमसिंह पडियार याचा पराभव, घुघुल राजाचा पराभव. घुघुल आत्महत्या करितो. सिंधण यादवाची गुजराथेवर स्वारी, तह. वस्तुपालाची शंखराजाबरोबर लढाई. सुलतान मोअज्जीम याचा पराभव. सुलतान मोअज्जीमच्या आईची बंदास्त.

**विसलदेवः**--विरमगांव नांवाचें शहर वसवितो.

**अर्जुनदेवः**--यास 'परमेश्वर भट्टार्क श्रीचालुक्य चक्रवर्ती महाराज श्रीमदर्जुनदेव' अशी पदवी होती. हा यवन सैनिक ठेवतो.

**लवणराजाः**--

**सारंगः**--

**कर्णवाघेलाः**--इ० स० १२९७ त अल्लाउद्दीन खिलजी हा स्वारी करतो. कर्णराजाचा पराभव होऊन तो दक्षिणेंत देवगडच्या राजाच्या आश्रयार्थ जातो. कर्णराजाची सत्ता नष्ट होण्याचीं कारणें. कवलदेवी यवनांच्या स्वाधीन होते. देवलदेवी देवगडच्या राजाच्या मुलास देण्याचें निश्चित होतें. भीमदेवाची व यवनांची लढाई. देवलदेवी यवनांस मिळते. राजा कर्ण दंतागिरीचे आसपास राहतो. तो शेतकी. पाटिलकी करतो व सोळंखी म्हणवितो.

# साळुंखे ऊर्फ फाटणकर घराण्याची कैफियत.

## भाग दुसरा.

## चालुक्य ऊर्फ सोळंखी घराणें.

### चालुक्य ऊर्फ सोळंखी वंशाची गुजराथेंतील कारकीर्द.

मागील भागांत चालुक्य वंशाच्या दोन शाखांच्या कारकीर्दीचें वर्णन केलें आहे. प्राचीन इतिहासामध्यें हीं दोन घराणीं पृथक् गणलीं गेलीं आहेत. प्रथम घराण्यास पूर्वकालीन चालुक्य व द्वितीय घराण्यास उत्तरकालीन चालुक्य असें म्हटलेलें आहे. ह्या कुळाची-पूर्वकालीन चालुक्य वंशाची सार्वभौम सत्ता लयास गेल्यानंतरच्या म्हणजे इ० स० ७५३ ते ९७३ पर्यंतची माहिती उपलब्ध नाहीं. त्यावेळीं कोणकोणते चालुक्य वंशीय राजे राज्य करीत होते, त्याचा मुळींच थांग लागत नाहीं. गुरुवर्य डॉ० भांडारकर यांच्या दक्षिणेच्या प्राचीन इतिहासामध्यें अजमीर येथें सांपडलेल्या शिलालेखावरून कांहीं पुरुषांची नामावलि देण्यांत आलेली आहे. ती जरी विश्वसनीय नसली तरी तूर्त तिजवरच भिस्त ठेवणें भाग आहे. तसेंच गुजराथचा इतिहास व गुरुवर्य डॉ० भांडारकर यांचा दक्षिणेचा प्राचीन इतिहास, यांचा बरोबर मेळ जुळत नाहीं हीही एक खेदास्पद गोष्ट होय. गुजराथेच्या इतिहासामध्यें असें लिहिलें आहे कीं, इ० स० ६९६ ह्या वर्षी गुजराथप्रांतांतील पंचासर येथें चावडा कुलोत्पन्न जयशेखर राजा करीत होता. त्याजवर त्याकाळीं नांवारूपास आलेल्या व प्रतिष्ठेस पावलेल्या कल्याणमधील भूवर नांवाच्या चालुक्यवंशीय राजानें स्वारी करून त्याचें राज्य हस्तगत केलें असें वर्णन आहे. व दक्षिणच्या इतिहासामध्यें, उत्तरकालीन चालुक्य वंशाचा इतिहास देतांना, आहवमल्ल ऊर्फ सोमेश्वर यानें इ० स० १०५३ मध्यें कल्याण नामक नगरी वसवून ती आपली राजधानी केल्याचें बिल्हणानें दर्शविलें आहे. जर इ० स० १०५३ मध्यें कल्याण नामक नगर वसलें गेलें, तर इ०स० ६९६ ह्या वर्षी किंवा पूर्वीपासून कल्याणनामक नगरीमध्यें राज्य करीत असलेल्या भूवर राजाची वाट काय? जर गुजराथचा इतिहास खरा असेल आणि तो खरा असला पाहिजे. तर कल्याण नगरीची स्थापना ६९६ वर्षा पूर्वीपासून झालेली असली पाहिजे.

पूर्वकालीन चालुक्यवंशांतील पहिल्या विक्रमादित्याची कारकीर्द इ० स० ६८० मध्यें संपते ह्या विक्रमादित्याच्या कारकीर्दींत गुजराथच्या दक्षिण भागांत म्हणजे प्राचीनकालीं ज्यास 'लाट' देश असें म्हणत असत, त्याभागांत चालुक्य वंशीय राजांच्या एका शाखेची स्थापना झाली असें म्हटलें आहे व ती स्थापना करणारा पुलकेशीचा जयसिंह ह्या नांवाचा पुत्र होता असें वर्णन आहे. व त्याच्या विनयादित्य युद्धमल्लनामक पुत्रानें इ० स० ७३१ ह्या वर्षी तसेच विक्रमादित्य नामक दुसऱ्या एका पुत्रानें नवसरी येथें राहात असतां इ० स० ७४० ह्या वर्षी दानपत्र केल्याचें लिहिलें आहे. व गुजराथच्या इतिहासावरून पाहिलें म्हणजे ही परंपरा नीटशी जुळत नाहीं. ज्या चालुक्य वंशीय भूवर राजानें इ० स० ६९६ ह्या वर्षी चावडा कुलोत्पन्न जयकेशीवर स्वारी केली, तोच हा जयसिंह असावा परंतु त्यावेळीं त्याचें कल्याणनगरीवर स्वामित्व असलें पाहिजे. कारण त्या भूवरची सर्व साधारण सत्ता गुजराथेवर बसली होतीच असें म्हणतां येणार नाहीं. शिवाय जरी भूवरनें गुजराथचें राज्य काबीज केलें होतें तरी तो त्या ठिकाणीं राहात नव्हता. तो आपल्या कल्याण नामक राजधानीच्याच शहरीं राहात होता. इ० स०६९६ पासून ७४६ पर्यंत गुजराथची सत्ता चालुक्य वंशीयाकडे होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यानंतर

वनराज चावडा यानें * अनहिलपट्टण ही आपली राजधानी करून चालुक्यवंशीयांकडून गुजराथची सत्ता हिसकून घेतली असली पाहिजे. चालुक्यवंशाच्या बाबतीमध्यें भूवराच्या पुढील चार पिढ्यांचा काल-ज्याचा मुळींच थांग लागत नाहीं असा गेलेला आहे. गुजराथच्या इतिहासामध्यें, ह्या भूवर राजाला कर्ण नांवाचा पुत्र असल्याचें लिहिलें आहे. तदनंतर तीन पिढ्यांची मुळींच माहिती उपलब्ध होत नाहीं. कल्याणच्या गादीवर भुवनादित्यास बसवून, त्याचा मुलगा राज ह्याच्यापासून पुढील इतिहास क्रमशः मिळत आहे. ह्या घोंटाळ्याचा बरोबर थांग लावण्याचा प्रयत्न अद्याप कोणीही केलेला नाहीं. कारण प्राचीन इतिहाचीं साधनें उपलब्ध नसल्यामुळें हा थांग लावितां येत नाहीं. तसेंच गुजराथच्या इतिहासामध्येंही भूवरच्या कालामध्यें सनांचा घोंटाळा दृष्टोत्पत्तीस येत आहे. म्हणून जयसिंहवर्म यासच भूवर असें गृहित धरून, ह्या चालुक्य-वंशाच्या गुजराथेंतील सोळंखी-वंशाचा इतिहास लिहिला आहे.

---

## भूवर—भूवड.

इ० स० ६९६ च्या सुमारास झिंझुवाड्याजवळ पंचासर म्हणून एक गांव होतें त्याठिकाणीं चावडा ‡ कुळांतील जयशेखर या नांवाचा राजा राज्य करीत होता, तो मोठा शूर, धीर, बलवान व तेजस्वी असून त्याजवळ संपत्तिही पुष्कळ होती. त्याचें सैन्य अगणित असून त्यांना पुरवठा मोठा होता. ह्या राजावर स्वारी करण्याची इच्छा चालुक्यवंशीय राजास होण्याचें कारण कोणतें त्याचा खालीं खुलासा केलेला आहे.

ज्यावेळीं गुजराथेमध्यें जयशेखर राजा राज्य करीत होता, त्याचकालीं दक्षिणेकडे कल्याण येथें चालुक्य वंशीय भूवर‡ राजा राज्य करीत होता. तो मोठा शूरवीर असून त्याजवळ लढाऊ फौज व शौर्यवान सरदार होते. या सरदारांनीं दूर देशच्या राजांवर स्वाऱ्या करून मुलूख काबीज केले होते. त्यामुळें भूवरची राज्य मर्यादा बरीच विस्तृत झाली होती.

हा भूवर चालुक्य सामान्य नव्हता, त्यानें देशोदेशची संपत्ति, हत्ती, घोडे, उंट व रथ लुटून आणून आपला खजिना भरपूर केलेला होता. त्याची विद्या कलाकौशल्याकडे फारच प्रीती असून त्यांस मोठें उत्तेजन देत असे असा त्याचा लौकिक होता. ह्या त्याच्या लौकिकामुळें, कल्याण नगरांत गांवोगांवचे विद्वान, कसबी व कारागीर येऊन वस्ती करून राहिले होते. त्यामध्येंच कामराज नांवाचा एक महाविद्वान् व सुप्रसिद्ध कवि राजाच्या दरबारीं राहिलेला होता व राजाची त्याजवर बहाल मर्जी असून तो त्यास आपला मित्र असें समजत असे.

एके दिवशीं राजा भूवर, त्याचा पुत्र युवराज कर्ण, त्याचा सरदार मीर व कविवर्य कामराज हे दरबारांत बसले असतां, शंकर या नांवाचा एक गुजराथी कवि राजाचें औदार्य ऐकून त्या ठिकाणीं आला व त्यानें एक नवीन पद्य रचून त्यांत राजाचें अभीष्ट चिंतिलें. त्या कविची काव्यचातुरी पाहून भूवर राजानें, आपल्या पदरच्या कामराज कवीस कांहीं नवीन पद्यें करून त्या गुजराथी कवीस थक्क करावयास सांगितलें. पण शंकर कवीस थक्क करण्यासारखें अगर त्याच्या कवित्वाचें तेज लुप्त होण्यासारखें कामराज कडून एकही कवित्व होईना. तेव्हां राजास फार खेद झाला. व तो त्या शंकर कवीस म्हणालाः-तुम्ही कोठचे? त्यावर शंकर कवि म्हणाला, गुजराथ देशांत जयशेखर या

---

* अन्हिलपूर हें अग्निकुलानीं वसविलेलें असून त्याचें मूळचें नांव वन्हिपूर होतें. पुढें जैन राजांच्या कारकीर्दीत मागधि भाषेनें त्या नांवाचा अपभ्रंश होऊन अन्हिलपूर असें नांव बनलें.

फूटनोट कर्नल टॉडकृत राजस्थानचा इतिहास पृष्ट २१.

‡ ह्या चावाडा कुलाच्या उत्पत्तीसंबंधीं अनेकांनीं अनेक प्रकारचे तर्क केलेले आहेत, चावडा वंशास संस्कृतमध्यें ' चापोत्कट ' ( प्रबलधनुर्धारी ) असें नांव दिलेलें आढळतें परंतु तें संस्कृत कवीचें लाघव असावें, चावडा वंशाच्या नांवाची उत्पत्ति मूळ चौरा या शब्दापासून आहे. आणि ' चौरा ' हें नांव ' चोर ' ह्या शब्दांपासून झालें आहे. हे लोक देवपाटणच्या किनाऱ्यावर राहून समुद्रावर चांचेपणाचा धंदा करीत यावरून त्यांस ' चोर ' असें म्हणत. त्याचें ' चौरा ' आणि ' चौरा 'चें ' चौडा ' किंवा ' चावडा ' असें नांव झालें,

लोकहितवादीकृत गुजराथचा इतिहास.

‡ भूवर हा जयसिंहवर्मा ह्या चालुक्य कुलोत्पन्न पुरुषाची पदवी असावी.

त्यांवाचा राजा फार धार्मिक, उदार व विद्वानांचा पोशिंदा आहे त्याच्या पदरीं मी असतों. या शिवाय हा प्रसंग पाहून शंकर कवीनें जयशेखराच्या शौर्याचीही बरीच वाखाणणी केली. हें ऐकून भूवर राजानें शंकर कवींची संभावना करून त्यास निरोप दिला. पण शंकर कवीच्या तोंडून जयशेखराचे गुणानुवाद ऐकून त्यास मत्सर उत्पन्न झाला. आणि त्यानें तात्काळ आपल्या सरदारांस बोलाविलें. व आपल्या नजरे मधून गुजराथ प्रांत कसा राहून गेला? असा प्रश्न विचारिला त्यावेळीं त्याचा चंद ह्या नांवाचा एक सरदार होता तो म्हणालाः–आम्हीं आबूच्या पहाडावरून परतलों, तेव्हां जयशेखराचा मेव्हणा–बायकोचा भाऊ–शूरपाल याची फौज आम्हांस वाटेंत भेटली होती, पण त्या थोड्या फौजेच्या वाटेस जाऊन तीस जिंकण्यांत पुरुषार्थ नाहीं असें वाटून आम्हीं तसेच सौराष्ट्राकडून इकडे निघून आलों, यामुळें तो प्रांत तेवढा जिंकण्याचें शिल्लक राहिलें, ' हे ऐकतांच राजानें आपलें सर्व सैन्य तयार करण्याचा हुकूम केला, सैन्य तर तयार झालें, परंतु तो काल कूच करण्यास सर्वथैव अनुकूल नव्हता, तरी भूवरचा सक्त हुकूम झाला कीं, ' ताबडतोब कूच-करून एकदम पंचासरावर जाऊन उतरा ' त्यामुळें कोणाचाही इलाज चालला नाहीं, त्यांस निघणें भागच पडलें,

इकडे शंकरकवि कल्याणहून निघाला तो थेट गुजराथेंत आला व पंचासर येथें येऊन जयशेखराचे कानावर सर्व हकीकत घांतली. ही बातमी ऐकून जयशेखर मुळींच डगमगला नाहीं. त्यास ही बातमी ऐकून उलट हर्षच झाला. त्यानें आपल्या सरदारांस कंठ्या, शिरपाव, कडीं वगैरे बक्षिसें देऊन आपआपलीं सैन्यें सज्ज करण्याचा हुकूम दिला. भूवरची फौजही आस्ते आस्ते पंचासरास येऊन दाखल झाली. भूवरची फौजही कांहीं कमी नव्हती. त्याजवळ नुस्ते चार हजार लढाऊ रथ होते. आणि भाले बाळगणारे स्वार व पायदळ हें तर असंख्य होते, लढाऊ फौजा निघाल्या म्हणजे लोकांचें किती नुकसान होत असें हें त्यावेळचे इतिहास वाचकांस अवगतच आहे. ज्या रस्त्यानें लष्कर जातें ते गांव तर बेचिराक होतात, उभीं पिकें जमिनदोस्त होऊन, गांवचे गांव जाळीत असत, भूवराचें सैन्यही मोठें चैनी असून तें ज्या ज्या ठिकाणीं मुक्काम होई त्या त्या ठिकाणीं कसरती कवायती वगैरे करून आपल्या मनोवृत्ती पूर्ण तेजस्वी राखीत असे. ह्या सर्व सैन्याचा ' मीर ' ह्या नांवाचा सरदार होता. हा सरदार शूर, मुत्सद्दी, अनुभविक व युद्धकलाविशारद असा होता, त्यानें आपल्या सैन्याची वीरश्री कायम राखण्यासाठीं शक्य ते प्रयत्न चालविले होते.

भूवरच्या सैन्यानें जुलूम, जबरदस्ती व स्त्रीपुरुषांचा छळ केला, हें वर्तमान ऐकून जयशेखरास राग आला; त्यानें मीर ह्यास लिहून पाठविलें कीं, ' कुत्र्याला दगड मारिल्यावर तें ज्याप्रमाणें वेडेपणानें कातावून त्या दगडालाच चावे घेत सुटतें, तसे तुम्हीं येवढे कातावून भलभलतीं कृत्यें काय करीत सुटलांत ? ' या पत्राचा मीरानें असा जबाब पाठविला कीं, ' तूं दांतीं तृण धरून आम्हांस शरण ये अगर लढाईस सिद्ध हो.'

ह्या प्रकारचा मीराकडून जबाब मिळाला त्या वेळीं जयशेखराचा मेहुणा शूरपाल हजर नव्हता. त्यानें राजाला न कळवितां भूवरच्या सैन्यावर एकाएकीं छापा घालण्याची व्यवस्था केलेली होती व तो योग्य संधीची वाट पहात होता. शेवटीं संधि मिळाली. शत्रूच्या सैन्यांतील कित्येक अधिकारी लूट वगैरे मिळविण्याकरितां आपलीं सैन्यें घेऊन रात्रीं बाहेर गेले आहेत व जे शिल्लक आहेत ते खाण्यापिण्यामध्यें चैन उडवीत आहेत; अशा प्रकारचा गाफिलपणा पाहतांच शूरपालानें भूवरच्या छावणीवर हल्ला केला व शत्रूची दाणादाण उडवून टाकली. ह्या धांदलीमध्यें भूवरचा चंद नांवाचा शूर सरदार मारला गेला; द्वंद नांवाचा सरदार जखमी झाला; आणि प्रमार नांवाचा सरदार आपल्या वांट्यास अपेश आलेलें पाहून लज्जेनें बैराग्याचा वेष घेऊन काशीयात्रेस चालता झाला. याप्रमाणें कल्याणच्या फौजेची धूळधाणी उडाली. हा प्रकार पाहून मीरचें धाबें दणाणलें. त्याचा अभिमान विगलित झाला. आपल्या राजास हें वर्तमान समजलें तर महा अनर्थ होईल असा विचार करून त्यानें आपल्या फौजेची छावणी गुजराथेंतून काढून, कल्याणपासून आठ मजलांवर आणिली.

ही पराजयाची वार्ता ताबडतोब जिकडे तिकडे पसरली. भूवरच्याही कांनीं ही गोष्ट गेली, त्याबरोबर त्यास मनस्वी खेद व क्रोध उत्पन्न झाला. त्यानें दुसरें सैन्य घेऊन गुजराथेवर कुच केलें. ज्या वेळीं मीराची

व राजाची गांठ पडली, त्या वेळीं मांगानें राजास बऱ्याच बढाईच्या गोष्टी सांगितल्या व ही आपल्याला प्रथमच ठोकर बसली आहे, ती एका अर्थी वीरश्रीचें अवसान वृद्धिंगत करण्यास कारणीभूत आहे, वगैरे प्रकारच्या गोष्टी सांगून राजास शांत केलें व राजाकडून, आपल्या सर्व सैन्याची एक टोलेजंग सभा भरवून, त्या ठिकाणीं जोरदार भाषण केलें व सर्वत्र सैनिकांस चेव आणिला, व तावडतोब पुन: पंचासरावर स्वारी करावयास सैन्य निघालें. ह्या फौजेबरोबर भूवर राजाही स्वत: निघाला होता. रणवाद्यें वाजवीत भूवरचें सैन्य पंचासरास येऊन दाखल झालें. या वेळीं किल्ल्याचे दरवाजे बंद करून, जयशेखर राज्यप्रकरणीं मसलतींत गुंतला होता. त्याच वेळीं भूवरच्या सैन्यानें किल्ल्याला वेढा घालून, किल्ला सर करण्याचा प्रयत्न चालविला; परंतु राजशालक शूरपाल यानें मांगाच्या सैन्यास मागें हटविलें व जयशेखर आपल्या सरदारास म्हणाला,–'शत्रुसैन्य पुन: चवताळून आलें आहे. तेव्हां सर्वांनीं प्राणाची पर्वा न करितां लढलें पाहिजे. ज्यास आपला प्राण वांचविण्याची इच्छा असेल, त्यांनीं खुशाल आपआपल्या घरीं जाऊन स्वस्थ बसावें.' त्या वेळीं सर्व सरदार म्हणाले,–'महाराज, आम्ही मरूं अगर मारूं. आम्हांस आमच्या जीवापेक्षां समरभूमि अधिक प्रियकर आहे.'

जयशेखराचें सैन्य आपल्या किल्ल्याचा बचाव करण्यासाठीं फारच शौर्यानें लढत होतें. त्यांनीं बावन दिवसपर्यंत भूवरला दाद दिली नाहीं. भूवरच्या सैन्यानें बावन दिवस आपली शिकस्त केली, तरी किल्ला हस्तगत होईना. तेव्हां भूवर व मांग यांनीं एक मसलत योजिली, ती ही कीं, 'शूरपाल राजाचा मेव्हणा याच्या एकट्याच्याच बळावर जयशेखराची मदार आहे तरी त्यालाच फितुर करून आपणांकडे वळवून घ्यावा म्हणजे आपलीच फत्ते आहे.' अशी मसलत करून त्यांनीं वरील मसलतीस अनुकूल असें एक पत्र शूरपालास लिहिलें. तें पत्र शूरपालाच्या हातीं गेलें व तें त्यांनीं फोडून वाचलें व तावडतोब त्याचें उत्तरही लिहिलें. तें असें कीं, 'मूर्खा, तूं मला व जयशेखराला भिन्न समजूं नकोस. तो व मी एकच आहों. मी स्वत: कुलवान घराण्यांतील आहें. शत्रूंना सामील होऊन आपल्या धन्याशीं निमकहरामपणा करण्याइतका मी अधम नाहीं. अशा कृत्यानें कीर्तीस कालिमा लागतो हें तुला माहित नाहीं काय? जे खऱ्या बीजाचे असतात त्यांजकडून अशीं अधमपणाचीं कार्यें होत नसतात.'

शूरपालाला फितविण्याचा प्रयत्न निष्फल होतांच, पुन: लढाईची सुरवात झाली. यावेळीं जयशेखर आपली पत्नी रूपसुंदरी इजबरोबर वार्ताविनोद करीत बसला होता. यावेळीं रूपसुंदरी म्हणाली,–'महाराज, शुभ-शकून झाल्याशिवाय युद्धास गेल्यास यश मिळत नाहीं.' यावर जयशेखर म्हणाला–'प्रिये, स्त्री वरून आणावयास व शत्रूला हाकून द्यावयास मुहूर्ताची जरूरी लागत नाहीं. ईश्वराचें नांव घेऊन त्या कार्यास लागावें. तोच शुभशकून असें समजावें.' [illegible] यांनीत जयशेकर गुंतला असतां इकडे लढाईची धूमश्चक्री माजून राहिली होती. कृष्णाजी पंडित या नांवाच्या एका ग्रंथकारानें आपल्या 'रत्नमाला' या नांवाच्या ग्रंथांत ह्या लढाईचें जें वर्णन दिलें आहे, त्यावरून भारतीय युद्धाची आठवण होते. दोहों बाजूंचे योद्धे पूर्ण आवेशानें लढत होते; रणभेरी आपला भीषण आवाज काढून योद्ध्यांस रणोन्माद चढवीत होत्या; भाट आपल्या कवित्वशक्तीचा उपयोग करून पळपुट्या व निरुत्साही योद्ध्यांस चेव आणून मागें फिरवीत होते; हें युद्ध जुन्या काळच्या, बाण, गदा, त्रिशूल व तरवारी यांनींच होत होतें. त्यांत परस्परांच्या शक्तीची तुलना होत होती; एखाद्या श्रेयंरा माणसानें एका ठिकाणाहून गोळीबार करून दुसऱ्या माणसाचा क्षणार्धांत प्राण घेण्याइतकी त्या काळाची साधनें नव्हती. सरदार सैन्याच्या मध्यभागीं उभा राहून सैन्याला उत्तेजन देत होता. याचवेळीं, भूवराचा 'मार' नांवाचा एक योद्धा होता; त्यानें अश्रुतपूर्व शौर्य करून शूरपालास एक बाण मारून घायाळ करून खालीं पाडलें. त्याबरोबर जयाचें पारडें शत्रुपक्षाकडे फिरलें. भूवरच्या सैन्यास किल्ल्याच्या पश्चिम बाजूस वाट मिळाली व तिनें तें किल्ल्यावर चढूनही गेलें. शत्रूचा जय झाला हें वर्तमान जयशेखरास समजतांच त्यास त्वेष चढला. त्यानें नुकेंच अचेतनावस्थेंत उचलून आणिलेल्या व नंतर सावध आलेल्या मेहुण्यास–शूरपालास–निरोप पाठविला कीं, तूं इतका वेळ युद्ध करून दमला आहेस. आतां मी शत्रूचा समाचार घ्यावयास जातों; तुम्ही बहीण

राणी रूपसुंदरी गरोदर आहे; तीस एखाद्या सुरक्षित स्थळीं पोंहोंचविण्याचें काम मात्र तूं कर. यदाकदाचित् अपजय झाल्यास व मला मरण आल्यास त्याचें उट्टें काढण्यास तिच्या पोटीं जो पुत्र होईल, तो कारणीभूत होईल. राजानें अशा प्रकारचा निरोप दिला. हा निरोप पोंहोंचतांच शूरपालानें ही गोष्ट करण्याचें नाकारिलें. तो म्हणाला,–'तुम्हींच माझ्या बहिणीचे रक्षणार्थ बसा. मी पूर्वीप्रमाणें युद्ध चालवितों.' परंतु जयशेखरानें त्यास आपलें म्हणणें ऐकण्यास भाग पाडलें व नाइलाजें शूरपालाबरोबर आपल्या गर्भवती पत्नीस सुरक्षित स्थळीं पाठवून दिलें. प्रथम रूपसुंदरी जाण्यास तयार होईना. ज्या ठिकाणीं माझे पती त्या ठिकाणीं मी. त्यांची जी गायाची व माझी. असें ती म्हणूं लागली; परंतु शूरपालानें तीस सामोपचाराच्या गोष्टी सांगितल्यावर ती त्याजबरोबर निघाली.

इकडे जयाचें चिन्ह दिसतांच भूवरनें जयशेखरास सांगून पाठविलें कीं, 'तूं दांतीं तृण धरून मला शरण ये म्हणजे तुझें राज्य तुला देतों.' यावर जयशेखरानें उत्तर पाठविलें कीं, 'असें करून जीव वांचविण्यांत काय पुरुषार्थ आहे? युद्धांत मेलों तर चावडा कुलाची कीर्ति होईल व स्वर्ग मिळेल.'

जयशेखराचें वरील बाणेदार उत्तर ऐकून भुवर क्रोध-संतप्त झाला व त्यानें जयशेखराच्या राहिलेल्या थोड्या माणसांवर निकराचा हल्ला केला. त्यांत जयशेखरासुद्धां त्याचीं सर्व माणसें कामास आलीं. जयशेखर समर-भूमीवर पडतांच, भूवरचें सैन्य 'पंचासर' नगरांत शिरलें व राजाच्या स्त्री–महालापर्यंत जाऊन पोहोंचलें. तेथील सैनिकांनीं राजस्त्रियांच्या रक्षणार्थ बहुत आवेशानें युद्ध केलें; पण त्यांचें शत्रूच्या अफाट सैन्यापुढें कांहींच चाललें नाहीं. स्त्री–महाल शत्रूच्या कबजांत येतांच राजस्त्रियांनीं सहगमन करण्याची तयारी केली व जय-शेखराचें शव आणवून, त्याच्या चार राण्या, दास, दासी, चाकरमाणसें आणि शहरांतील ज्या लोकांस राजाचा आश्रय होता व जे त्याजवर प्रीति करीत अशा लोकांनीं चितेंत प्रवेश करून स्वतःस दग्ध करून घेतलें आणि आपली राजनिष्ठा प्रत्ययास आणून दिली. चिता-प्रवेश करणाऱ्या सर्व लोकांस भूवरच्या लोकांनीं बराच अडथळा केला, परंतु त्यांनीं त्यांच्या हरकतीस जुमानलें नाहीं. यानंतर भूवरनें जयशेखराची उत्तरक्रिया आपल्या हातानें केली व ज्या ठिकाणीं त्याच्या स्त्रिया वगैरे दग्ध झाल्या होत्या, त्या ठिकाणीं जयशेखराचें स्मारक म्हणून एक शिवालय बांधिलें. त्या देवाचें नांव त्यानें 'गुर्जरेश्वर' असें ठेविलें. यावरून भूवरराजाच्या ठिकाणींही आपल्या शत्रूच्या गुणांचें स्मारक करण्यासारखा आदर होता, यांत संशय नाहीं. हा भूवरराजाच्या मनाचा थोरपणा होय!

गुजराथ काबीज केल्यानंतर भूवरराजानें कच्छ व सौराष्ट्र येथील राज्यें काबीज केलीं. तेथील हवा पाणी व सुबत्ता पाहून भूवरचालुक्यास गुजराथेंतच रहावेंसें वाटलें. परंतु त्याच्या प्रधानमंडळानें त्याचा तो बेत रहित केला. त्यांनीं गुजराथेंत न राहण्यासंबंधानें जीं कारणें सांगितलीं होतीं तीं हीं कीं, 'शूरपालासारखे कांटे जोंपर्यंत हयात आहेत, तोंपर्यंत येथें राहणें फारच धोक्याचें होय. त्यांजकडून केव्हां घात होईल तें समजणारही नाहीं. म्हणून आपण जो मुलूख काबीज केला आहे, त्यावर आपल्या तर्फेचा एक अधिकारी नेमून, आपण कल्याणासच जावें हें बरें.' हा प्रधानमंडळीचा सल्ला भूवरराजास मान्य झाला व त्यानें तेथील स्वामित्व आपल्या 'मिलनदेवी' नांवाच्या मुलीस दिलें आणि तिच्या कारभाऱ्याच्या जागीं कोणी एक चावडा कुलोत्पन्न, आपल्या प्रीतींतील व विश्वासांतील मनुष्य पाहून त्यास नेमिलें व त्यास 'शल्यभृत्' ही पदवी दिली. ह्या मनुष्यावर भूवरनें विश्वास ठेविला; परंतु तो त्या विश्वासास मुळींच पात्र नव्हता.

गुजराथचें राज्य चालुक्यांकडे गेलें; परंतु तें त्यांज-कडे फार दिवस राहिलें नाहीं. कारण भूवर राजानें आपल्या मंत्र्यांच्या सल्ल्यानें एक मोठी चूक केली. ती ही कीं, नवीन जिंकलेल्या प्रांतावर थोडे दिवस राहून जर त्यानें प्रजेचें प्रेम संपादण्याचा प्रयत्न केला असता, तर त्याची गुजराथेंतील सत्ता दृढ होणें शक्य होतें. परंतु भूवरकडून अशा प्रकारचा प्रयत्न मुळींच झालेला नाहीं. गुजराथेंतील सर्व प्रजा आज कित्येक वर्षें चावडा कुलांतील पुरुषांच्या अंमलाखालीं होती. अर्थात् त्या कुलाविषयीं अगर त्या कुलांतील पुरुषांविषयीं त्यांस अभिमान वाटणें साहजिक होतें. ती प्रीति संपा-दन करण्याचें व आपल्या लोकोपयोगी कृत्यानें प्रजेस चालुक्यवंशाविषयीं आदर व प्रेम उत्पन्न करण्याचें काम भूवरनें त्या ठिकाणींच थोडे दिवस राहून करणें भाग होतें. अर्थात् तसा प्रयत्न न झाल्यामुळें, नवीन

राजाविषयीं द्वेष व पूर्वीच्या राजकर्त्यांविषयीं आदर ह्या ज्या प्रजेच्या भावना पूर्वीपासून असतात, त्याच दृढतर झाल्या. तशांत चालुक्यवंशियांविषयीं द्वेष व चावडा वंशाविषयीं प्रीति उत्पन्न होण्यासारखी संधिही प्राप्त झाली; त्यामुळेंच चालुक्यवंशाचें गुजराथेचें स्वामित्व फारच अल्प कालांत लयास गेलें.

राजशालक जो शूरपाल आपल्या गरोदर बहिणीस घेऊन गिरनारपर्वताच्या वनांत गेला व तेथेंच तीस सोडून तो जयशेखराच्या मदतीस आला. परंतु जयशेखरची निधनवार्ता ऐकतांच, आपण भूवरच्या सैन्यावरेवर लढून प्राणत्याग करावा असें त्यास वाटलें. पुढें पूर्ण विचारांतीं सांप्रत कांहींही गडबड न करितां, स्वस्थ राहून बहिणीस मुलगा झाल्यास पुढें प्रयत्न करण्याचें निश्चित करून तो बहिणीच्या शोधार्थ निघाला; परंतु त्यानें बहिणीस सोडलें होतें, त्याठिकाणीं ती त्यास आढळली नाहीं. तेव्हां गिरनारपर्वताच्या आसपासच्या डोंगरांत तो राहिला.

+ शूरपालानें गिरनारपर्वताच्या अरण्यांत बहिणीस सोडल्यानंतर तीस एक भिल्ल भेटला व त्यानें तिचा तपास केला. त्यावरून 'ही थोर अशा राजकुलांतील असून राजपत्नी आहे, शिवाय गरोदर आहे, तेव्हां तिला अवश्य आश्रय द्यावा' असा विचार करून तो भिल्ल रूपसुंदरीस म्हणाला,–'तूं माझी प्रियभगिनी आहेस. तूं येथें माझ्या घरीं राहण्यास मुळींच शंका घेऊं नको. या अटवीमध्यें. फळें, फुलें वगैरे जें कांहीं मिळेल तें मी तुला देईन.' ही त्या भिल्लाची सद्वासना ऐकून रूपसुंदरी त्याच्या येथें राहिली व अशा रीतीनें त्या वनवासांतच तीस वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं सूर्योदयीं पुत्ररत्न झालें.

हा पुत्र एक वर्षाचा झाला, तेव्हां त्या ठिकाणीं 'शिलगणसूरी' या नांवाचा एक साधु आला व तो ज्या ठिकाणीं रूपसुंदरी आपल्या बालकासह बसली होती, त्या ठिकाणीं, आपली झोळी एका झाडाच्या फांदीस अडकवून खालीं बसला.

थोडा वेळ गेल्यानंतर त्यानें त्या लहानग्या मुलास इकडे तिकडे फिरतांना पाहिलें, तेव्हां त्याची कांति पाहून त्यास फार आश्चर्य वाटलें व त्यानें तो कोणाचा मुलगा याचा तपास केला. तेव्हां त्यास समजलें कीं, याची आई ही राजस्त्री असून, हाही राजपुत्र आहे. रूपसुंदरीनेंही त्या साधूचा चांगलाच मान ठेविला. त्यानंतर तो साधु म्हणाला,–हा जयशेखराचा वंश आहे, त्यामुळें राज्यसुख भोगण्याचा त्याचाच हक्क आहे, आपण कांहीं काळजी करूं नये, याचें उत्तम प्रकारें रक्षण होऊन, याचें गेलेलें वैभव यास परत मिळेल. असा आशीर्वाद देऊन त्या साधूनें त्याचें नांव तो वनांत जन्मला म्हणून 'वनराज' असें ठेविलें.

वनराज जसजसा मोठा होत गेला, तसतसा त्याचा पराक्रमही लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागला. शूरपाल जो जंगलांत राहून भूवरच्या सैन्यास बिचकावीत होता, त्यास ही हकीकत कळली आणि तो वनराजास व आपल्या बहिणीस जाऊन भेटला, त्यानें वनराजास ज्या वनांत तो रहात होता, त्या ठिकाणीं नेलें, त्यानें तेथें थोडीबहुत तयारीही करून ठेविलेली होती. आपल्या मामाच्या सहवासास वनराज १८ वर्षांचा होईपर्यंत होता, व तितक्या वेळमध्यें त्याच्या अंगीं सिंहासमागें बल व चपलता यांचा प्रादुर्भाव झाला होता.

मोहिमा करण्याजोगें त्याचें वय होतांच तो स्वतः मोहिमांवर जाऊं लागला व मामाच्या सल्ल्यानें आपलें गेलेलें राज्य परत मिळविण्याच्या मार्गास लागला.

कल्याणचा राजा भूवर यानें गुजराथ प्रांत हस्तगत झाल्यानंतर सहा महिने राहून तिकडून बराच पैसा गोळा केला, व त्या वेळीं तिकडील प्रांतीं वाखाणलेले (सोरठी) काठेवाडी घोडे घेऊन जाण्याचा क्रम ठेविला. एकेवेळीं भूवर अशाचप्रकारें घोडे व द्रव्य नेत असतां तें वनराजानें त्याजवर हल्ला करून लुटून नेलें.

याप्रमाणें जिकडून तिकडून, लूट मिळवून सैन्यबळ वाढविलें. व इ० स० ७४६ ह्या वर्षी 'अन्हिलवाड' या नांवाच्या नवीन शहराची स्थापना केली व त्याच ठिकाणीं आपणांस राज्याभिषेक करवून घेतला. याप्रमाणें गुजराथची राजसत्ता चालुक्य वंशियांकडून जाऊन ती पुनः चावडा कुळाकडे गेली.

या वनराजाचा मृत्यु इ० स० ८०६ मध्यें झाला. हा ११० वर्षें वांचला. याच्या मागून याचा पुत्र योगराज हा गादीवर बसला. त्याच्यामागून क्षेमराज,

---

+ कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं, शूरपाल आपल्या बहिणीस तोंड दाखविण्यास लज्जेमुळें गेलाच नाहीं.

क्षेमराजानंतर भूवर किंवा पृथु, त्याच्यामागून वैरिसिंह, त्याच्यामागून रत्नादित्य किंवा रावतसिंग व त्याच्यामागून 'सामंतसिंह' हा गुजराथचा राजा झाला. हा चावडा वंशाचा शेवटचा पुरुष होय.

## कर्ण.

त्याच्या कारकीर्दीसंबंधानें, व कर्णानंतरच्या दोन पुरुषांची कारकीर्द अगर नांवेंहीं मुळींच उपलब्ध नाहींत; हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय.

## भुवनादित्य.

भूवरच्या चवथ्या पिढींतील कल्याणचा राजा + भुवनादित्य होता, अशाबद्दल गुजराथच्या इतिहासामध्यें लिहिलेलें आहे. परंतु त्याच्या कारकीर्दीचा इतिहास उपलब्ध नाहीं. गुजराथच्या इतिहासांत असें लिहिलें आहे कीं, सामंतसिंह चावडा हा गुजराथप्रांतावर राज्य करीत असतां, कल्याणचा भुवनादित्य चालुक्य याचे तीन पुत्र–राज, बीज व दंडक–हे सोमनाथाच्या यात्रेस निघाले होते. यांतील राज हा युवराज असून भुवनादित्याच्या मागाहून त्यासच कल्याणची गादी मिळावयाची होती.

हा भुवनादित्याचा पुत्र होय. हा आपल्या भावांबरोबर सोरटीसोमनाथाच्या यात्रेस निघाला असतां, ते सर्व यात्रेकरूमंडळ अन्हिलवाड्यास आलें. त्यावेळीं सामंतसिंह अन्हिलवाड्याचे गादीवर होता. त्यानें सर्व यात्रेकरूंच्या अग्रभागीं चमकत असलेला राज हा राजपुत्र पाहिला. त्याबरोबर त्यास मोह उत्पन्न झाला व त्यानें त्याच्यासंबंधानें चौकशी केली त्यावेळीं त्यास समजलें कीं, कल्याणचा राजा भुवनादित्य चालुक्याचा हा मुलगा आहे. असें समजतांच त्यानें आपली भगिनी लीलावती त्यास देण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें विवाहही केला. याप्रमाणें चावडा, व चालुक्य ह्या दोन घराण्यांचा शरीरसंबंध जुळून येऊन ऐक्य झालें. विवाहसमारंभ आटोपल्यावर सामतसिंहानें असें प्रसिद्ध केलें कीं, 'आपल्यास पुत्रसंतति नसल्यामुळें लीलावतीच्या पोटीं जो पुत्र होईल तोच अन्हिलवाडच्या राज्याचा अधिकारी होईल.' त्यानें असें जाहीर करतांच हें दंपत्य तेथेंच राहिलें. पुढें कांहीं दिवसांनीं लीलावती गरोदर राहिली, परंतु प्रसववेदनेनें ती एकाएकीं मृत्यु पावली. त्याबरोबर तिचा गर्भाशय फाडून आंतून जिवंत मूल बाहेर काढलें. तो पुत्र होता. हें मूल मुळनक्षत्रावर जन्मल्यामुळें त्याचें नांव मूळराज असें ठेवण्यांत आलें. पूर्वीं प्रसिद्ध केल्याप्रमाणें हा गुजराथचा राजा होणार म्हणून त्यास आपणांजवळ ठेवून सामतसिंहानें त्याचा प्रतिपाळ केला. आपल्या पत्नीच्या मृत्यूनंतर राज सोळंखी त्रासून द्वारकेस यात्रा करण्यास निघाला. तेथून परत फिरल्यावर लाखा राण्याच्या पदरीं मुत्सद्दी म्हणून राहिला. त्या ठिकाणीं त्याच्या आंगच्या गुणावर लुब्ध होऊन लाखानें आपली बहीण रायाजी इजबरोबर त्याचें लग्न केलें. तिजपासून त्यास एक पुत्र झाला. त्याचें नांव 'राखाईच' असें ठेवण्यांत आलें. परंतु पुढें लाखा राणा व राज सोळंखी यांजमध्यें कांहीं मानापमानासंबंधानें तटा उपस्थित होऊन त्यांची बोलाचाली झाली व तेंच प्रकरण पुढें वाढून त्यांजमध्यें लढाई झाली व तींत राज सोळंखी मारला गेला व त्याची बायको सती गेली.

## मूळराज.

(इ० स० ९४२–९९७).

मूळराज हाच गुजराथेंतील चालुक्य ऊर्फ सोळंखी वंशाचा मूळ पुरुष होय. याच्या कारकीर्दीपासून चालुक्य ऊर्फ सोळंखीवंशाची इत्थंभूत माहिती मिळते. त्यानें आपल्या बाळपणापासून आपल्या अंगचे लोकोत्तर गुण, बुद्धिमता व पराक्रमशालिता दाखविण्याचा प्रारंभ केला. यामुळें सर्व लोक त्याजवर प्रीति करीत असत व हा आपला राजा होणार आहे याबद्दल त्यांस आनंद होत असे. तो रंगानें काळासांवळा होता; परंतु त्याचा बांधा नीटस असून फारच स्वरूपवान होता. त्याच्या अंगीं यानंतर व्यभिचार व लोभ हे दोन दुर्गुण बाणले गेले

---

+ दक्षिणेकडे कल्याणासही चालुक्य वंशाचे राजे राज्य करीत असत; असा इतिहास असून, अन्हिलवाड पट्टण येथील चावडा राजास दत्तक देण्याकरितां कल्याणाहून चालुक्य सोळंखी वंशांतील मुलगा नेला होता. त्याचें नांव मूळराज. हा कल्याणचा राजा जयसिंग सोळंखी व त्याची पत्नी भोजराज चावड्याची कन्या यांचा पुत्र होता.

कर्नल टॉडकृत राजस्थानचा इतिहास, पृष्ठ २१.

होतें; म्हणून त्यास थोडासा कर्मापणा येत होता. तो द्रव्याचा इतका लोभ करी कीं, तें तो जमिनीमध्यें पुरून ठेवी. शौर्य वीर्यादि पराक्रमामध्यें जरी तो प्रवीण नव्हता तरी पण शत्रूला कपटानें कसें फसवावें व आपण विजयी व्हावें हें कसब त्यास उत्तम अवगत झालें होतें. तो साधारण वयांत आल्यानंतर एके दिवशीं, सामंतसिंह मदिरापानाच्या धुंदींत असतां त्यानें मूळराजास राज्याभिषेक करण्याबद्दल हुकुम दिला. व त्याप्रमाणें ताबडतोब मूळराजास राज्याभिषेक करण्यांत आला. परंतु सामंतसिंहाची दारूची धुंदी उतरतांच आपण केली ही गोष्ट नीट झाली नाहीं असें समजून त्यानें तो राज्याभिषेक * रद्द केला.

सामंतसिंहाचें हें करणें मूळराजास अपमानास्पद वाटलें व त्यानें आपल्या पक्षाचे लोक जमा करून एकदम मामावर चाल केली व त्यास ठार मारिलें आणि आपण गुजराथचा राजा झाला. † मूळराजाचें हें वर्तन निंदास्पद झालें यांत मुळींच संशय नाहीं. ज्या मामानें लहानपणापासून त्याचा प्रतिपाल केला, त्याजवर शस्त्र उचलून त्याचा वध करणें यासारखें अमानुषपणाचें दुसरें कोणतें कृत्य असणार! मामाचा अनिश्चितपणा जरी त्याच्या दृष्टीस पडला होता, तरी त्यानें थोडे दिवस थांबावयास हवें होतें. पण तें मूळराजाच्यानें झालें नाहीं. आणि मामाचा वध केल्यानंतर त्यानें चावडा कुलांतील कोणीही गादीवर वारसा सांगण्यास शिल्लक राहूं नये म्हणून, सर्व संबंधी माणसांची कत्तल केली आणि आपण निर्भय झाला. मूळराज ज्या साली गादीवर बसला तें साल गुजराथच्या इतिहासामध्यें, इ० स० ९४२ हें दिलेलें आहे. परंतु आमच्या मतें तें हें साल नसावें. कारण, सामंतसिंह इ० स० ९३५ त गादीवर बसला. त्यानंतर राज व लीलावती यांचें लग्न होऊन मूळराजाचा जन्म झाला. तेव्हां जरी आपण मूळराजाच्या जन्माचा काल ९३५ हाच निश्चित केला, तरी अवघ्या सात वर्षांमध्यें मूळराजास मामास मारून सिंहासन बळकाविण्याची शक्ति येण्यासारखें त्याचें वय नव्हतें. तो काल पुढें लोटला पाहिजे, असें आम्हांस वाटतें. मूळराज ज्यावेळीं गादीवर बसला त्यावेळीं, लोकमत त्याच्या विरुद्ध होतें. तो आपल्या मातुलाच्या वधानें लोकांचा नावडता झाला होता. त्याची अशक्तता व असमर्थता जाणून भोंवतालच्या बहुतेक राजांनीं त्याजवर स्वारी करून त्यास जिंकण्याचा विचार केला. आणि त्याप्रमाणें उत्तरेकडून अजमीर येथील राजानें व दक्षिणेकडून तेलंगणाच्या राजाच्या प्रधानानें, ह्याप्रमाणें एकाचवेळीं स्वाऱ्या केल्या. हें वर्तमान कळतांच मूळराजाच्या प्रधानानें मूळराजास अन्हिलवाड येथून निघून कच्छप्रांताचे सरहद्दीवर 'कंठकोट' नावांचा किल्ला होता, तेथें जाऊन रहावयास सांगितलें, व त्याप्रमाणें तो गेलाही. असें करण्यामध्यें प्रधानाचा हेतु इतकाच होता कीं, सध्यां पावसाळ्याचे दिवस असल्यामुळें, अजमीरच्या राजानें अन्हिलवाड्यास वेढा घातल्यास त्याच्यानें चार महिनेपर्यंत टिकाव धरवणार नाहीं. व अन्नसामुग्री न मिळाल्यामुळें त्यास आपणांबरोबर तह करून जाणें भाग पडेल. असाच प्रधानाचा हेतु होता, परंतु तो त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं, अजमीरच्या राजानें आपला वेढा सतत चार महिने कायम ठेविला, व आश्विनमासीं नवरात्रास लढाईची सुरवात केली. त्यावेळीं मूळराजानें त्यास कांहीं खंडणी वजा पैसा देऊन बाजूस काढलें व तेलंगणच्या राजावर स्वारी केली, आणि त्याचे पुष्कळ लोक मारून त्याच्या सैन्याची दाणादाण केली, ह्याप्रमाणें पूर्ण मुत्सद्दीपणा करून मूळराजानें शत्रूची व्यवस्था लाविली व मूळराजास थोडीशी स्वस्थता मिळाली. त्याबरोबर त्याचें चित्त एक * देऊळ बांधण्याकडे लागलें. व त्यानें

* सामंतसिंहाच्या ह्या अनिश्चित वर्तनाबद्दल कोणी एक जैनग्रंथकार असें म्हणतो कीं, सामंतसिंहाचें हें कृत्य त्या चावडा कुलाच्या एकवचनतेला आणि सत्यप्रियतेला अपवादरूप झालें.

† मूळराजाच्या ह्या अमानुष कृत्याचा निषेध करतांना एक ग्रंथकार असें म्हणतो कीं, 'जांवई, सर्पादि, वाघ, विंचू, उन्मत्त, भाचा आणि राजा यांजवर कोणी कधींही उपकार करूं नयेत. त्यांजकडून उपकार फिटण्याची आशा तर नाहींच; परंतु उलट अपकार मात्र होतील!"

'कुमारपाल चरित्र'

* या देवालयासंबंधानें तिकडे अशी एक दंतकथा प्रचारांत होती कीं, शंकरानें मूळराजाची आपल्या चरणीं भक्ति पाहून त्याला सोरटावर स्वारी करून जय मिळविण्याविषयीं स्वप्नामध्यें दृष्टांत दिला. त्यावेळीं गिरनार प्रांतांत 'वामनस्थळी' म्हणून एक राज्य होतें

'रुद्रमाळा' या नांवाचें एक भव्य शिवालय बांधण्यास सुरुवात केली, नंतर त्यानें गिरनार प्रांतांत 'वामनस्थली' म्हणून एक राज्य होतें, त्यावर लढाई करून जाण्याची तयारी केली. तेथील 'ग्राहरिपू' राजास मूळराजाच्या स्वारीची खबर पोहोंचतांच त्यानेंही त्याबरोबर लढण्याची तयारी केली.

त्याचा एक मुलगा भादर नदीचे कांठीं राज्य करीत होता. इतक्यांत ज्यानें मूळराजाच्या बापास मारिलें होतें. तो कच्छचा राजा तसेंच सिंधुराज हे आपआपल्या फौजा घेऊन त्यास मदत करण्याकरितां आले. मूळराजासही मदत मिळाली नव्हती असें नाहीं. त्यास शैलप्रस्थ, मारवाड, काशी आणि श्रीमाल येथील राजे आपआपलें सैन्य घेऊन येऊन मिळाले होते. ह्या दोन्ही सैन्यांचीं काठेवाडांत आटकोट नांवाच्या गांवाजवळील जंबूमाली नदीवर मोठी लढाई झाली. व त्या लढाईत ग्राहरिपु पडला. आपला मित्र रणांत पडल्याचें पाहून, लाखा कच्छी यास अतिशय क्रोध येऊन, तो त्या आवेशांत शत्रुसैन्यावर चालून गेला, पण त्याचीही ग्राहरिपुप्रमाणेंच अवस्था झाली. हा लाखा म्हणजे मूळराजाचा बाप राजसोळंखी याचा सासरा होय. राजसोळंखीचा लाखानें वध केल्यानंतर राजाचा भाऊ बीज यानें मूळराजास, आपल्या बापाच्या वधाचा सूड घ्यावयास सांगितलें होतें. तें सूड घेण्याचें काम मूळराजानें संपूर्ण केलें.

वरील लढाईत लाखा ज्याठिकाणीं आटकोट गांवीं पडला, त्याठिकाणाची मानमान्यता फारच आहे. तेथील लोक प्रतिवर्षी, लाखा ज्या ठिकाणीं पडला त्या ठिकाणीं जमून त्या जागेची पूजा अर्चा करितात. अशा प्रकारें लढाईत जय मिळवून, मूळराज सोमेश्वराचे दर्शनास पाटणा येथें गेला. नंतर तेथून तो लुटीसह अन्हिलवाड्यास आला. यानंतर थोड्याच दिवसांत त्यास पुत्ररत्न झालें, त्याचें नांव 'चामुंड' असें ठेविलें. हा मुलगा समजूं लागल्यापासून, सिद्धपुर येथील 'रुद्रमाळा' नांवाच्या देवालयामध्यें जाऊन बसत असे. व त्या ठिकाणीं पुराणादि ग्रंथांतील कथा, विशेषेंकरून भारतांतील वीरपुरुषांचे इतिहास व त्यांचीं युद्धें ह्या हकीकती ऐकण्याचा त्यास फार छंद लागून त्या योगें त्याचे बाहु स्फुरण पावूं लागले. त्यामुळें हा पुढें महापराक्रमी निपजेल म्हणून सर्वत्रांनीं भविष्य केलें. एके दिवशीं चामुंड सभेंत येऊन बसला असतां, अन्हिलवाड्याच्या राजास खूप करण्याकरितां देशोदेशींचे वकील आपआपल्या राजांकडून नजराणे घेऊन आले होते. त्यांत अंगदेशच्या वकीलानें एक सुंदर रथ आणिला होता. तसेंच वनवास येथून आलेल्या वकिलानें सुवर्ण आणिलें. समुद्रकिनाऱ्यावरून लालमणी आले होते. देवगिरीच्या राजाचा वकील खंडणी घेऊन आला होता. कोल्हापुरच्या राजाच्या वकीलानें जवाहीर आणिलें होतें, काश्मीराहून सुंदर पशम, कुरुदेशाहून रंगीत छत्र, पांचाल देशाहून गाई व दास, वगैरे नजराणे आले होते परंतु लाट देशाचा राजा द्वारप याजकडून भलताच नजराणा आला होता. त्यामुळें सभेंत खळबळ उडाली. त्या राजानें एक हत्ती पाठविला होता. परीक्षकांनीं त्यांत 'खोडी आहेत' असें सांगितलें व ज्योतिष्यांनीं 'तो अपेशी असल्याचें सांगितलें.' त्यावरून सर्वत्रांस खेद झाला. परंतु, द्वारपराजानें मुद्दाम अपशकुन करण्याकरितां हा हत्ती पाठविलेला पाहून, चामुंडबालकास अनिवार क्रोध आला. त्या सिंहबालकाचा चेहेरा पाहून सर्वत्रांस त्याच्याबद्दल अभिमान उत्पन्न झाला. परंतु राजानें चामुंडरायास आंवरून धरिलें व त्या नजराण्याचा तिरस्कार करून तो परत पाठविला. नंतर कांहीं दिवसांनीं शुभमुहूर्त पाहून मूळराजानें लाटदेशाचा अधिपति जो द्वारप त्याजवर स्वारी करण्याची तयारी केली. सोबत चामुंडरायही होता. द्वारपराजाही दक्षिणेंतील आपल्या साह्यास आलेल्या लोकांसह लढाईस सिद्ध झाला. उभयपक्षांची भयंकर लढाई होऊन तींत द्वारप मारला गेला. ह्या लढाईमध्यें चामुंडरायानें अवर्णनीय असा पराक्रम केला. आपल्या तरवारीची रक्तपानाची इच्छा तृप्त करून ज्या वेळीं तो आपल्या बापाजवळ आला त्यावेळीं बापानें—मूळराजानें आपल्या त्या प्रतापी व वीरपुत्रास हर्षानें आलिंगन दिलें आणि सैन्यास अनहिलपुराकडे फिरण्याची आज्ञा केली.

---

व तेथील 'ग्राहरिपु' नांवाच्या राजानें, सोमनाथाच्या यात्रेस जाणाऱ्या यात्रेकरूंस लुटून लुबाडून फार दुःख यातना द्याव्या व त्यांजवर फार जुलूम करावा; असें चाललें होतें. तेव्हां त्याचें पारिपत्य करण्याविषयीं सोमनाथानें वर लिहिल्याप्रमाणें राजाच्या स्वप्नांत जाऊन त्याला आज्ञा केली कीं, 'तूं त्या जुलमी राजास जिंकून पदच्युत कर.'

याप्रमाणें मूळराजानें चारही दिशांच्या राजांस अंकित करून सोडलें व जिकडेतिकडे आपला विजय-दुंदुभि गाजविला. तो सर्वप्रकारें सुखी होता; परंतु त्यानें गादीवर बसण्यापूर्वी जें मातुलवधाचें कर्म केलें होतें तें त्याच्या अंतःकरणास जाचक होई. त्यांतून मुक्त होण्यासाठीं तो नेहमीं तीर्थयात्रा करीत फिरत असे. 'श्रीस्थळ' या नांवाचें एक पवित्र स्थळ आहे; त्या स्थळास ' मातृगया ' असें म्हणतात. त्या स्थळीं जाऊन मूळराजानें अगणित धर्म केला. ब्राह्मणांस मोठमोठ्या दक्षणांसह सिहोर नरांच श्रीस्थळाजवळील गांवें तसेंच १२ गांवांसहीत खंबायत नगर दान दिलें. त्यानें आपलें शेष आयुष्य त्याच पुण्यस्थळीं घालविलें. व तेथेंच त्यानें इ० स० ९९७ त देह ठेविला.

---

## चामुंड.

( इ० स० ९९७–१०२६ ).

मूळराजाच्यानंतर चामुंड हा गादीवर बसण्यास सर्वथैव योग्य होता. त्यानें आपल्या बापानें मिळविलेल्या राज्याचें फारच उत्तम प्रकारें संरक्षण केलें. यास वल्लभराज दुर्लभराज व नागराज असे तीन पुत्र होते. व तिसरा पुत्र नागराज यास भीमदेव या नांवाचा पुत्र होता. हे सर्व पराक्रमी असून ते बापाचाच कित्ता घेऊन चालत होते. नागराजाचा पुत्र भीमदेव यानें सोमनाथाच्या रक्षणार्थ सुलतान महंमद याच्या फौजेशीं फारच मोठ्या बहादुरीनें लढाई केली होती.

सुलतान महंमद गझनवी हा इ० स० १०२४ च्या सप्टेंबर महिन्यांत सोमनाथावर ३००० स्वार घेऊन आला. त्याची ही हिंदुस्थानावर बारावी स्वारी होती. त्यानें गिझनीहून मुलतान व तेथून अजमीर येथें येऊन तो किल्ला घेतला, व गुजराथची राजधानी अन्हिलवाड येथें आला. त्यावेळीं चामुंडराय हा राज्य करीत असून तो सार्वजनिक कार्यांत गुंतला होता. त्यामुळें त्यास सैन्य जमविण्यास अवसर सांपडला नाहीं. म्हणून त्यानें शत्रूशीं लढून टिकाव धरवणार नाहीं असें जाणून अन्हिलवाड्याहून पलायन केलें. त्याच्या पश्चात् मुसलमानांनीं अन्हिलवाडयाचा कबजा घेतला. सुलतान महंमदाच्या स्वारीचा उद्देश राज्य घ्यावा असा नव्हता; परंतु संपत्तीकडे त्याचें लक्ष होतें. त्यानें अनेक देवस्थानांचा उच्छेद करून पैसा मिळविला. अन्हिलवाडचा कबजा मिळतांच तो सोमनाथ–पट्टणाकडे गेला. व तेथें जाऊन त्यानें सोमनाथाच्या देवस्थानाचा कबजा घेण्यासाठीं यत्न चालविला. त्यावेळीं त्यास अडथळा करून त्याजबरोबर युद्ध करण्यासाठीं, बहुतेक रजपूत राजे तयार झाले होते; परंतु सुलतान महंमदाच्या फौजेपुढें त्यांचें कांहींच चाललें नाहीं. ह्या लढाईत चामुंडरायाचा पुत्र वल्लभसेन व नागराजाचा मुलगा भीमदेव यांनीं अवर्णनीय पराक्रम केला परंतु शेवटीं सोमनाथाचें देऊळ यवनांच्या ताब्यांत गेलें. त्यावेळीं सुलतानानें सोमनाथाचें लिंग फोडिलें. त्याखालीं त्यास बरीच संपत्ति मिळाली. तें लिंग न फोडण्याबद्दल ब्राह्मणांनीं सुलतान महंमुदाची विनवणी केली व शेवटीं बरेंच द्रव्यही देऊं केलें; परंतु मूर्ति विक्रयकार असें म्हणण्यापेक्षां मूर्तिभंजक असें म्हणून कीर्ति मिळवावयाचा निश्चय झाल्यामुळें ब्राह्मणांच्या विनवणीचा कांहींही उपयोग झाला नाहीं, सोमनाथाच्या मूर्तीचा भंग करून सुलतान अन्हिलवाड्यास आला व त्यानें तेथील गादीवर *दुर्लभसेनास बसविलें, व आपण गिझनीस परत गेला; जातेवेळीं त्याची अत्यंत दुर्दशा झाली.

---

## दुर्लभसेन.

( इ० स० १०२६–१०३६. )

चामुंडरायाच्या मागाहून हा गादीवर बसला. यानें राज्य उत्तम प्रकारें चालविलें. अन्हिलवाड येथें ' दुर्लभसरोवर ' या नांवाचा एक मोठा तलाव आहे तो यास राजानें बांधविला. यानें ' जिनेश्वर सूरी ' ह्या आपल्या गुरूच्या उपदेशानें जैन धर्म स्वीकारिला. यानें व याचा भाऊ नागराज यांनीं, मारवाडचा राजा महेंद्र याच्या बहिणीशीं स्वयंवरांत लग्नें लाविलीं होतीं. यास आपल्या कल्याणार्थ तप–तीर्थ–यात्रादि करण्याची इच्छा झाल्यामुळें यानें भीमदेवास–नागराजाचा मुलगा–गादीवर बसविलें; हा उंच असून, याच्या ठिकाणीं साधुवृत्ति

---

* मुसलमान इतिहासलेखक असें लिहितात कीं, महंमदानें गुजराथचें राज्य ' बिशलीम ' या नांवाच्या मुसलमान सरदारास दिलेलें होतें. पण हिंदु इतिहासकार तसें लिहित नाहींत ते दुर्लभसेन असें म्हणतात.

ओतप्रोत भरलेली होती. जीवहत्या करण्याकडे याची मुळींच प्रवृत्ति नव्हती.

---

## भीमदेव.

( इ० स० १०२६–१०७२. )

दुर्लभसेनाच्या नंतर अन्हिलवाडच्या गादीवर भीमदेव बसला. हा पुरुष बलाढ्य असून बाणेदार होता. ह्याच्याविषयीं 'हेमाचार्य' या नांवाचा एक ग्रंथकार लिहितो कीं,–'हा आपलें राज्य उत्तम प्रकारें चालवीत होता. तो चोर आणि लुटारू लोकांस पकडून शासन करीत असे; त्यामुळें त्याच्या राज्यांत चोर व लुटारू यांचें वास्तव्य नव्हतें. यास 'राजाधिराज' असें म्हणत. त्याच्या महापराक्रमाचीं काव्यें मागधी वगैरे भाषांमध्यें प्रसिद्ध आहेत एकवेळ सिंध–चेदीच्या राजांनीं याचा तिरस्कार करून त्याच्या निंदापर ग्रंथ केल्यामुळें यानें त्याजवर स्वारी केली व त्याजकडून अपरिमित द्रव्य आणिलें. ज्यावेळीं भीमदेव चेदीच्या राज्यावर स्वारी करण्यास गेला, त्यावेळीं माळव्याच्या भोजराजानें आपल्या 'कुलचंद्र' नांवाच्या सेनापतीबरोबर सैन्य पाठवून पाटण शहर लुटून टाकिलें. हा राजा प्रमारवंशी असून तो धारा नगरीस राज्य करीत होता. त्याच्यासारखा काव्यकुशल धर्मात्मा राजा त्याकाळीं तरी नव्हता. त्याजबरोबर तह करण्यासाठीं भीमदेवानें आपला वकील भोजराजाच्या दरबारीं पाठविला होता; पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. उलट उभयतांमध्यें वैर मात्र माजलें. हे दोघे राजे एकमेकांवर कविता लिहून पाठवीत असत. भोजराज हा धर्मात्मा व कवि होता; परंतु भीमदेव हा शूर होता. ह्या उभयतांमध्यें बरीच भानगड उपस्थित होऊन शेवटीं त्यांचा तह झाला. याचवेळीं चंद्रावती नगरीचा धुंडिराजप्रमाज हा भोजराजास वश झाला होता. त्याचा सूड उगविण्याकरितां भीमदेवानें 'विमलशा' नांवाच्या प्रधानास त्या मुलखाची वहिवाट सांगितली. ह्या विमलशानें अबूच्या पहाडावर मोठमोठीं जैन मंदिरें बांधिलीं आहेत.

भीमदेवाचे कारकीर्दींत दाहलदेश हल्लीं ज्यास 'टिपरा' असें म्हणतात तेथें आणि काशीच्या पवित्र वाराणसी नगरींत 'कर्ण' नांवाचा राजा राज्य करीत होता. यानें १३६ राजांस मांडलिक बनविलें होतें. भोजराजाची कीर्ति यास दुःसह होऊन त्यानें भीमदेवाच्या सल्ल्यानें माळव्यावर स्वारी करण्याचा बेत केला व त्याप्रमाणें ते दोन्ही राजे ससैन्य निघाले, परंतु त्यावेळीं भोजराज आसन्न मरणावस्थेंत होता, तो थोडक्याच दिवसांत मरण पावला. त्यावेळीं कर्णराजानें धारा नगरींत प्रवेश करून तेथील भांडारखाना लुटला, भीमदेवाच्या वकिलानें त्यांतील अर्धा हिस्सा मागितला; तेव्हां असा ठराव झाला कीं, "यापुढें माळवाप्रांताचें जें उत्पन्न येईल, तें सर्व भीमदेवानें घ्यावें. ह्या लुटींतून हिस्सा मागूं नये."

यावेळीं गिझनीवंशाचे राज्यास उतरतीकळा लागली होती. महंमूद गिझनीचा नातु मोदूद हा यावेळीं तक्तावर होता. त्याच्या राज्यांतील अव्यवस्था पाहून सर्वत्र हिंदुराजांनीं इ० स० १०४३ मध्यें मुसलमानांवर स्वारी केली; परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. त्यांस मुसलमानांनीं मागें हटविलें. या सैन्याचा पुढारी अजमीरचा 'विसलदेव चव्हाण' हा होता, विसलदेव व भीमदेव या दोघांचें पूर्वीपासून वांकडें असल्यामुळें, भीमदेवानें या युद्धांत भाग घेतला नाहीं. तो तटस्थ होता. त्यामुळें विसलदेवास त्याचा अतोनात राग येऊन त्यानें भीमदेवावर स्वारी केली. भीमदेवही मुळींच डगमगला नाहीं. तो ३०००० स्वार बरोबर घेऊन लढण्यास तयार झाला. अजमीरचा राजा विसलदेव चव्हाण याजवळ ७०००० सैन्य होतें. उभयदळाचें घनघोर युद्ध झालें. त्यांत भीमदेव व विसलदेव यांनीं आपल्या पराक्रमाची शर्थ केली; शेवटीं त्यांचा तह झाला.

भीमदेवानें एका उदयामती नांवाच्या स्त्रीशीं लग्न केलें होतें. इच्या नांवाची 'राणीबाव' म्हणून एक विहीर अन्हिलवाड इथें अद्याप आहे. ईस कर्ण या नांवाचा एक पुत्र होता. ह्याखेरीज दुसऱ्या राण्यांपासून मूळराज व क्षेमराज असे दोन पुत्र भीमदेवास होते.

मूळराज हा फार दयाळु होता. त्यानें एकवेळ बापाजवळून वचन घेऊन 'कुणबी लोकांस कर माफ करविला होता' हा बाळपणींच निवर्तला.

---

## कर्णराज.

( इ० स० १०७२–१०९४ ).

यानें एकंदर २२ वर्षें राज्य केलें. ह्याच्या कारकीर्दीमध्यें सर्वत्र शांतता होती. यानें भिल्ल कोळी वगैरे लोकांचा

नाश करून चांगल्या लोकांची वस्ती केली. त्यानें कर्णेश्वर कर्णमेरुप्रासाद, व जयंतीदेवीचें ह्याप्रमाणें तीन देवळें बांधिलीं. शिवाय कर्णसागर तसेंच कर्णावती नांवाचें नगरहि बांधिलें. यानें दक्षिणचा चंद्रपुरचा राजा जयकेशी याची कन्या मैनलदेवी इजबरोबर लग्न केलें. परंतु पुढें कांहीं कारणानें ती स्त्री त्यास पसंत पडली नाहीं. त्या वेळीं मैनलदेवी अपघात करण्यासाठीं तयार झाली; परंतु मुंजल ह्या नांवाच्या राजाच्या प्रधानानें एका युक्तीनें मैनलदेवीस संतोषविलें. तो प्रकार असा. नमुंजला नावांच्या नायकिणीवर राजाचें मन बसलें असून तो तिजविषयीं इच्छा धारण करीत आहे असें प्रधानास समजतांच त्यानें मैनलदेवीस नमुंजला नायकिणीच्या वेषानें राजाच्या अंतःपुरांत रवाना केलें. व उभयतां संतोषित झालीं, त्यावेळीं राणीनें खुणेकरितां राजाजवळून आंगठी मागून घेतली. कांहीं वेळानें राजास नायकिणीशीं संग केल्याबद्दल पश्चात्ताप झाला. व तो त्या पातकाच्या निवारणार्थ ब्राह्मणाच्या विचारें तप्त लोहमूर्तीस आलिंगन देण्यासही तयार झाला; तेव्हां प्रधानानें राजास सर्व हकीकत कळविली. त्यावरून राजा संतोषित झाला. सदरील प्रसंगापासून मैनलदेवीस गर्भ धारणा होऊन तीस पुत्ररत्न झालें. त्याचेंच नांव सिद्धराज जयसिंग.

कर्णराज इ० स० १०९४ त स्वर्गवासी झाला.

---

## सिद्धराज जयसिंग.

( इ० स० १०९४–११४३ )

हा राजा लहान असल्यामुळें याची आईच सर्व कारभार पहात असे. तिनें सामत मुंजन आणि उदा या तिघां जैन मंत्र्याच्या मार्फत कारभार चालविला होता.

इच्या कारकीर्दीचा इतिहास उदाहरण घेण्याजोगा आहे. ज्यावेळीं मलाव तलाव बांधण्याचा इचा विचार ठरला त्यावेळीं तलावाच्या पूर्व कांठावर एका कसबिणीचें घर होतें तें तलावाच्या सारखेपणास अडचण करीत होतें ती अडचण दूर करण्यासाठीं राणीनें त्या कसबिणीस पुष्कळ द्रव्य देऊं केलें परंतु ती कबूल झाली नाहीं. ती म्हणाली, 'तुमची जशी तलाव बांधण्यामध्यें कीर्ती आहे तशीच माझी झोपडी आणण्यामध्यें आहे' हें ऐकतांच राणीनें तिजवर मुळींच जुलूम केला नाहीं. व तसाच एका बाजूनें वांकडा असा तलाव बांधिला. त्यावरून 'न्याय पहाणें असेल तर मलाव तलाव पहा' म्हणून सर्व साधारण म्हण प्रचारांत आलेली आहे.

सिद्धराज आपल्या आईसह देवनगरींत असतांना माळव्याचा राजा यशोवर्म यानें गुजराथवर स्वारी केली. त्यावेळीं कारभाऱ्यानें त्यास पैसा देऊन परत पाठविलें. ही गोष्ट सिद्धराजास खपली नाहीं. त्यानें माळव्यावर स्वारी करण्याचा बेत केला पण त्यावेळीं त्यानें सहस्रलिंग नांवाचा तलाव बांधण्याचें काम सुरू केलें होतें. तें अर्धवटच टाकून त्याच्यानें जावेना. या संबंधानें एक चमत्कारिक दंतकथा प्रचारांत आलेली आहे. ती अशी; "एक जसमाया नांवाची ओड जातीची सुस्वरूपस्त्री माळव्यामध्यें होती तिजवर सिद्धराजाचें मन बसलें. त्यावरून त्यानें तलावाचें निमित्त करून माळव्यांतील ओड जातीच्या लोकांस तिकडून बोलावून कामावर लाविलें. त्या लोकांबरोबर जसमाया ही आपल्या नवऱ्याबरोबर आली. तीस राजानें राणी करण्याचें वचन दिलें; परंतु ती ऐकेना तेव्हां तीस अशी भीती पडली कीं, राजा आपणांस बलात्कारानें अडवून ठेविल, या साठीं ती मजुरीचे पैसेही नघेतां तशीच चालली झाली. राजानें तिचा पाठलाग केला, तेव्हां अग्निकाष्टें भक्षण करून ती मृत्यु पावली. शेवटीं जाळून घेतेवेळीं 'ह्या तलावास कधींही पाणी यावयाचें नाहीं, म्हणून तिनें श्राप दिला. तो तिचा श्राप खरा ठरला–शेवटीं तलावास पाणी येत नाहीं असें पाहून प्रधानाच्या सल्ल्यानें माया नांवाचा धेड बळी दिला व त्याचें रक्त आंत पडतांच तलावास पाणी आलें. तलावास पाणी येतांच पूर्व संकेताप्रमाणें त्यानें माळव्यावर स्वारी करून यशोवर्म राजास पकडून आपल्या नगरांत आणिलें. ह्या प्रसंगाचें जैन धर्मी साधु हेमाचार्यानें श्वेतांबरींत वर्णन केलें आहे. हा हेमाचार्य महापंडित होता. तो जयसिंगाच्या दरबारीं होता. यानें जयसिंगाच्या वेळीं एक संस्कृत व्याकरण ग्रंथ रचला होता. त्या ग्रंथाबद्दल ब्राह्मण पंडितांनीं त्याजबरोबर वादविवाद केला. त्यांत हेमाचार्य जय पावला. त्यावरून राजानें त्या ग्रंथाची हत्तीवरून मिरवणूक काढून त्यास भांडारामध्यें ठेविलें.

सौराष्ट्र–काठेवाड देशांतील गिरनारचा राजा खेंगार याबरोबर युद्ध करून त्यानें त्यास ठार मारिलें. ही लढाई होण्याचें कारण, मजेवडी येथील एका कुंभाराच्या घरीं राणकदेवी नांवाची एक लावण्यसंपन्न स्त्री होती. तिचा विवाह जयसिंगाबरोबर व्हावयाचा होता, परंतु तितक्यांत खेंगारानें तिचें बलात्कारेंकरून हरण केलें; त्यावरूनच त्यानें खेंगारबरोबर १२ वर्षे लढाई करून त्यांत त्यास मारून राणकदेवीस कबजांत घेतलें व घराकडे वळला. वर्धमान शहरीं आल्यावर त्यानें राणकदेवीस विचारलें कीं, 'तुझी काय इच्छा आहे ?' राणकदेवी ही महापतिव्रता असल्यामुळें ती म्हणालीः– 'तूं माझ्या इच्छेप्रमाणें कबूल होशील तर सांगतें'– जयसिंगानें 'होय' म्हणतांच '—माझा नवरा मेला, मलें मेलीं, आतां माझी इच्छा इतकीच आहे कीं, नवऱ्याच्या अस्थी मजजवळ आहेत त्यांसह सती जावें.' असें तिनें उत्तर दिलें. त्याबरोबर त्यानें तिची सती जाण्याची तयारी करून दिली व ती भोगा नदीवर जयसिंगासमक्ष सती गेली.

या राजाच्या कारकीर्दीत जैन व ब्राह्मण यांमध्यें वाद चालले होते. तरी जयसिंगासंबंधानें तो शैव कीं वैष्णव किंवा जैन असें कांहींच निश्चयात्मक सांगतां येणार नाहीं.

हा राजा स्त्रैण होता. परंतु पराक्रमी होता. यास कीर्तीची विशेष हाव होती. तो भटांस अगणित द्रव्य बक्षिसादाखल देत असे. यास पुत्र संतान नव्हतें– याच्यासंबंधानें हिंदुस्थानांत त्यावेळीं आलेला अल् इद्रिसी या नांवाचा भूगोलशास्त्रवेत्ता अरब म्हणतोः– "मी सिद्धराज जयसिंग याचे दरबारांत गेलों होतों. सिद्धराज हा बौद्धधर्मी असून संपत्तिवान् होता. त्याचे राज्यांत व्यापार व देवघेव मोठी चालत असून पूर्व पश्चिमेकडील सर्व माल सिद्धराजाचे राज्यांत जमत असे."

---

## कुमारपाल.

(इ० स० ११४३–११७४.)

सिद्धराजजयसिंग यास पुत्र नसल्यामुळें त्याचे पश्चात् त्याचा चुलता क्षेमराज याचा पणतु कुमारपाल हा गादीवर बसला. क्षेमराजाचा पुत्र देवप्रसाद यास त्रिभुवनपाल म्हणून पुत्र होता, त्यास महीपाल, कीर्तिपाल, कुमारपाल, असे तीन पुत्र असून प्रेमलदेवी व देवलदेवी ह्या दोन मुली होत्या. प्रेमलदेवीचें लग्न सिद्धराजाचा मंत्री कान्हलदेव याजबरोबर व देवलदेवीचें काश्मिरच्या राजाशीं लागलें होतें.

या कुमारपालाविषयीं कोणी एका ज्योतिषानें, सिद्धराजाच्या कारकीर्दीत असें भविष्य केलें होतें कीं,– 'तुझ्यामागें गादीचा वारस कुमारपालच होईल.' हें भाकित राजास समजल्यावरून त्यानें कुमारपालास ठार मारण्याचा विचार केला. व त्याप्रमाणें हुकूमही सोडले. ह्या बाबतीची कुणकुण कुमारपालास कळतांच तो पळून गेला. ज्या ज्या ठिकाणीं तो गेला त्या त्या ठिकाणीं त्यास साह्य मिळत गेलें. शेवटीं तो साधूच्या वेषानें पाटण मुक्कामीं आला. त्यावेळीं, सिद्धराज आपल्या बापाच्या श्राद्धतिथीच्या दिवशीं सर्व साधूंस बोलावून त्यांचें पादक्षालन करीत असतां, कुमारपालाचे पाय धुण्याची पाळी आली; त्यावेळीं, त्याचे पाय अति कोमल लागले व त्यानें त्याच्या पायावर ऊर्ध्व रेषा पाहिली. त्यावरून हाच कुमारपाल असें सिद्ध राजानें ओळखलें. आपणांस सिद्धराजानें ओळखलें असें समजतांच, तो दुसऱ्या वेषानें तेथून पळाला. त्यावेळीं त्याचे फारच हाल झाले. त्यास धड अन्नही खावयास मिळालें नाहीं. तो भटकत असतां एके ठिकाणीं उंदराच्या बिळाच्या तोंडाजवळ त्यास कांहीं मोहरा सांपडल्या, त्यावर त्यानें कित्येक दिवस काढले शेवटीं तो खंबायत मुक्कामीं आला, त्याठिकाणीं जैनमंदिरांत हेमाचार्यांनीं त्यास पाहतांच 'हे पाटणच्या राज्याचे भावीराजे आले' असें म्हणून त्याचें स्वागत केलें. तें त्यास असंभवनीय वाटलें, तरीही त्यावेळीं, 'जर अशी गोष्ट घडली तर मी जैनधर्म मान्य करीन' म्हणून आचार्यांस त्यानें वचन दिलें.

थोडक्याच दिवसांत सिद्धराज वारला, ही बातमी कुमारपालास समजतांच तो अन्हिलपुरास आला, पण सिद्धराजानें मरणापूर्वी कुमारपालास राज्य न देण्यासंबंधानें प्रधान मंडळांचें वचन घेतलें होतें. त्यामुळें त्यास संशय होता परंतु त्यानें आपला मेहुणा कान्हदेव याच्या साह्यानें राज्य मिळविलें.

कुमारपाल हा आपल्या उतार वयांत गादीवर बसला होता. त्यानें गादीवर बसतांच आपल्या विरुद्ध अस–

लेल्या मंडळीस दूर केलें. तसेंच ज्याच्या साह्यानें राज्य मिळविलें तो कान्हदेव आपला नेहमीं पाणउतारा करीत असे म्हणून प्रथम त्यास परोपरीनें सांगून पाहिलें तरी ही तो ऐकेना म्हणून त्यास ठार मारिलें.

त्यानें उदायनाचा मुलगा वाग्भटदेव यास मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं. व त्याचा दुसरा मुलगा बाहड हा जयसिंगाचा प्रीतिपात्र असल्यामुळें तो नागोरच्या विसलदेवाचा नातू आनाक याजकडे जाऊन राहिला व त्यास गुजराथेवर स्वारी करण्याचें उत्तेजन दिलें.

फॉर्बस साहेबांनीं हेमाचार्यांनीं रचिलेल्या द्व्याश्रय नांवाच्या काव्यामधून, आनाक व कुमारपाल यांच्या युद्धाचें वर्णन उतरून घेतलें आहे तें वाचण्यासारखें आहे.

आनाकराजानें उज्जनीच्या बल्लाळ राजाशीं स्नेह करून त्यास व गुजराथच्या पश्चिमेकडील राजांसही अनेक प्रकारची लालूच दाखवून साह्यास घेतलें. व कुमारपालावर स्वारी करण्याची तयारी चालविली. हें वर्तमान कुमारपालास कळतांच, त्यानें भिल्ल, कोळी इत्यादि रानटी लोकांचें सैन्य गोळा केलें. तसेंच कच्छ व सिंध येथील राजांचीही मदत घेतली व तो अबूपहाडानें पुढें जाऊं लागला, त्याबरोबर त्यास बरेच डोंगरी लोक येऊन मिळाले. अबूचा प्रमार विक्रमसिंह हाही कुमारपालाच्या मदतीस आला. गुजराथचें सैन्य पहाड ओलांडून पलीकडे गेलें. व उभय सैन्याची लढाई जुंपली. इतक्यांत कुमारपालानें आनकराजावर बाण सोडला तो त्यास मर्मी लागून आनकराज मूर्छित पडला. त्याबरोबर सर्वत्र शरण आले. व लढाईचा शेवट झाला. आनकराजानें कुमारपालास आपली मुलगी देऊं केली व तीस घेऊन तो पाटणास आला. तेथें जल्हणाईबरोबर कुमारपालाचें लग्न झालें. याच सुमारास अशी बातमी मिळाली कीं, माळव्याच्या बल्लाळराजावर स्वारी करावयास पाठविलेले विजयसामंत व कृष्णसामंत हे सरदार फितूर होऊन माळव्याच्या राजास मिळाले व माळव्याचाराजा गुजराथवर हल्ला घेऊन येत आहे. असें कळतांच कुमारपाल पुनः सैन्य घेऊन बाहेर पडला व माळव्याच्या राजाचा पराभव करून परत आला;

एकेवेळीं दरबारामध्यें कुमारपाल बसला असतां, त्याच्या भाटानें कोंकणांतील मल्लिकार्जुन राजाच्या कीर्तीचें वर्णन केलें. व त्यास 'महामंडलेश्वर' म्हणून उपमा दिली. हें राजास मुळींच आवडलें नाहीं. त्यानें प्रधानपुत्र आंबड यास ससैन्य कोंकणांत रवाना केलें. पण तो कलविणी नदीजवळ जातो न जातो तोंच कोंकणच्या फौजेनें त्याजवर हल्ला करून त्याचा पराभव केला. हें अपेश पदरीं आल्यामुळें आंबड यास लज्जा उत्पन्न झाली व तो राजास तोंड दाखविण्यास शरमूं लागला. त्यावेळीं कुमारपालानें त्यास अभय देऊन परत बोलाविलें व दुसरें सैन्य कोंकणप्रांतीं रवाना केलें. त्या सैन्याचें बाहड याजकडे आधिपत्य होतें. त्यानें मल्लिकार्जुनाचा पराभव करून कोंकणप्रांत हस्तगत केला व अगणित धन आणिलें.

यानें आपल्या वचनाप्रमाणें राज्य प्राप्तीनंतर जैन धर्म स्वीकारिला होता. यानें बरींच जैन मंदिरें बांधिलीं. कुमारपालानें आपला मावसभाऊ आनाक (अर्णोराज) सोलंखी यास वाघेल गांवचा गिरासा देऊन आपल्या दरबारचा सामंत केलें. त्याला पावेलीं लवणप्रसाद या नांवाचा पुत्र झाला होता. हे राजे यापुढें आपणांस वाघेल म्हणवूं लागले.

कुमारपालानें मेवाडच्या सिसोदिया घराण्यांतील राजकन्येशीं विवाह केला होता. पण जैन साधूंच्या पायां पडावें लागेल म्हणून ती इकडे येईना. शेवटीं भाटांनीं तिची समजूत केल्यावर ती नवऱ्याकडे आली. परंतु तीस जैन साधूंच्या पायां पडावें लागल्यामुळें ती भाटांबरोबर पळून गेली. त्यावेळीं राजानें त्यांचा पाठलाग केला. इतक्यांत राणीनें अपघात केला व भाटांनीं आपली अब्रू गेली म्हणून तीन चिता करून जाळून घेतलें.

यानें एकंदर ३१ वर्षें राज्य केलें. विद्वान् लोकांस याचा आश्रय असे याचा पुतण्या अजयपाल यानें यास राज्यलोभास्तव विषप्रयोग करून ठार मारिलें.

## अजयपाल.

(इ० स० ११७४-११७७)

कुमारपालास मारून अजयपाल गादीवर बसला. यानें जैन देवस्थानांचा उच्छेद आरंभिला. तो जैनधर्म द्वेष्टा असून शिवभक्त होता. त्यानें आपला प्रीतिपात्र कपर्दी ह्या नांवाचा एक मित्र होता त्यास प्रधानकीचीं

वस्त्रें दिलीं. परंतु आपला अपमान करतो असें दृष्टीस पडतांच त्यानें त्याचा वध केला. पुढें रामचंद्र नांवाच्या जैन अधिकाऱ्यास त्यानें त्या जागीं नेमिलें. हा रामचंद्र फार विद्वान होता. त्यानें कित्येक ग्रंथ लिहिले होते. यानें राजाच्या जुलमास त्रासून जीभ आंसडून प्राण-त्याग केला. आंबड ( आमरभट ) हा जैन धर्मी असल्यामुळें त्यानें त्याचा द्वेष आरंभिला व त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवून दरबारांत चौकशी करितां बोलाविलें. पण त्या वीर पुरुषानें लढाई शिवाय हस्तगत होण्याचें कबूल केलें नाहीं. त्यानें कित्येक हत्यारबंद लोक बरोबर घेऊन राजवाड्यांत प्रवेश केला. देवडीवरील शिपायांस मारिलें. तोंच अजयपाल समोर आला. त्यांची लढाई होऊन तींत अमरभट मारला गेला.

अजयपाल हा फार जुलमी राजा होता. त्यानें फक्त तीनच वर्षें राज्य केलें. तो सर्वांस अप्रिय होता. शेवटीं वैजलदेव नांवाच्या द्वारपालानें त्याच्या पोटांत कट्यार खुपसून ठार मारिलें.

---

## दुसरा मूळराज.

( इ० स० ११७७–११७९ ).

अजयपालानंतर त्याचा पुत्र मूळराज गादीवर बसला. यास बालमूलराज असें म्हणत. हा अजयपालाची पत्नी परमर्दी राजाची कन्या नैकीदेवी इच्या उदरीं आला होता. नैकीदेवीनें आपल्या पुत्रास ओट्यांत घेऊन गादुरार गडावर लढाई चालविली होती. तिचा दीर भीमदेव हा पराक्रमी असून सेनापतीचें काम करून कारभारही पहात असे. इ० स० ११७८ त शहाबुद्दीन घोरीनें गुजराथेवर स्वारी केली त्यावेळीं भीमदेवानें त्यास हांकून लाविलें. बाळमूळराज इ० स० ११७८ त निवर्तला.

---

## भीमदेव.

( इ० स० ११७९–१२१५ ).

मूळराजाच्यानंतर भीमदेव गादीवर बसला. यास भोळा भीमदेव असें म्हणत. याच्या वेळीं दिल्ली येथें अनंगपाल राजा राज्य करीत होता. त्याजवर कनोजच्या विजयपाल राजानें स्वारी केली. त्या वेळीं सोमरचा राजा आनंददेव चव्हाण याचा मुलगा सोमेश्वर हा अनंगपालाच्या मदतीस आला. त्यानें विजयपाल राठोडास हरविलें. त्या उपकाराबद्दल अनंगपालानें आपल्या दोन मुलींपैकीं एक सोमेश्वरास देऊन तिच्याशीं त्याचा विवाह केला. या कन्येस पुढें पृथ्वीराज नांवाचा पुत्र झाला त्या पुत्रासच अनंगपालानें राज्य दिलें. त्यावरून दिल्ली व अजमीर हीं राज्यें एक झालीं.

या वेळी भीमराजा महाबलाढ्य गणला जात असे. त्याची सत्ता बहुतेक सर्व प्रांतावर निर्वेध चाललेली असून त्याच्या दरबारीं अमरसिंह शेवडा या नांवाचा एक जैन साधु होता.

आपसांतील वैरामुळेंच, मुसलमानांस ह्या भारतभूमींत आपला पाय शिरकतां आला. जर रजपूतांची त्या वेळीं एक जूट असती तर यवनांचें कांहीं चाललें नसतें; परंतु भरतभूमीच्या नशिबीं तें सुख नव्हतें. तिचे धिंडवडे व्हावयाचे होते. हे कलह होण्याचीं कारणें बहुतकरून स्त्रिया हींच असत. गुजराथचा भीमदेव व अजमीरचा व दिल्लीचा चव्हाण यांच्या दरम्यान मोठें वैर उभें व्हावयास स्त्रियाच कारणीभूत झालेल्या आहेत.

अबूगडांत जैतसीप्रसार या नांवाचा एक राजा होता त्यास सलख नांवाचा पुत्र व इच्छिनीकुमारी नांवाची लावण्यवती कन्या होती. ती पृथ्वीराजास वधू करून द्यावयाची होती. परंतु ती सुस्वरूप आहे असें ऐकून भीमदेवानें तिची मागणी करण्यासाठीं अमरसिंह शेवडा यास अबूगडास रवाना केलें. त्यानें जैतसीराजास भीमदेवांचा पराक्रम सांगून मुलगी देण्यास सांगितलें पण राजानें चारपांच दिवस त्यास राहवून घेतलें; पण उत्तर कांहींच दिलें नाहीं. तेव्हां त्याचा पुत्र सलख म्हणाला ' अबूगडचें राज्य घेतलें तरी देईन; परंतु त्या जैनधर्मी भीमदेवाशीं मी आपल्या बहिणीचें लग्न करणार नाहीं ! भीमदेवाचे सर्व पराक्रम आम्हांस माहीत आहेत. तो चव्हाणास ओळखत नाहीं. मारवाडदेशांत एक लक्ष सैन्य तयार आहे ! शिवाय आमच्या हुकमखालीं १८ राज्यें आहेत तीं मदतीसाठीं नच आलीं तर मग आमचा वाली ईश्वर आहे !

ह्याप्रमाणें अजमीरचे चव्हाण, व दिल्ली येथील पृथ्वीराज हे खवळले व युद्धास तयार झाले. इकडे भीमदेवानेंही सर्व राजांस पत्रें लिहून त्यांच्यासह अबूवर

स्वारी केली. घनघोर युद्ध झालें त्यांत प्रमार पराभव पावले व भीमदेव चालुक्याचा जय झाला.

प्रमाराचा पराभव करून झाल्यावर भीमदेव चव्हाणावर चाल करून जाण्याचा विचार करूं लागला. त्यावेळीं, त्याच्या सर्व सरदारांनीं त्यास आपसामध्यें लढाई न करितां शत्रूचें पारिपत्य करण्याकडे आपल्या शक्तीचा व्यय करण्याची विनंति केली, परंतु भीमदेवानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. तो म्हणाला–प्रथम 'माझ्या अपमानाचा सूड आणि मग यवनांशीं लढाई.' असें म्हणून भीमदेवानें अजमीरास प्रयाण केलें. ही आपसांमधील लट्टालट्टी अवलोकन करून मुसलमानही अजमीरावर आले. त्यावेळीं अजमीरच्या राजास चिंता उत्पन्न झाली तरी त्यानें धीर न सोडतां प्रथम गुर्जराधिपतीवर हल्ला करून त्यास पळावयास लाविलें व नंतर मुसलमानांवर हल्ला करून त्यांचाही पराभव केला,

भीमदेवाचा पराभव झाल्यानें त्यास अनिवार त्वेष उत्पन्न झाला. त्यांतच त्याचा चुलता सारंगदेव याचे सात पुत्र प्रतापसिंह, अरिसिंह वगैरे भीमदेवावर रुसून अजमीरच्या चव्हाणाच्या आश्रयास गेले. ते सर्व एके दिवशीं दरबारांत बसले असतां प्रतापसिंहानें मिशांस पीळ दिला. तें कज चव्हाणानें अवलोकन करितांच प्रतापसिंहास तरवारीनें छाटून टाकिलें. त्याबरोबर इतर सहाही भाऊ चव्हाणावर उठले व त्या ठिकाणीं जबरदस्त लढाई होऊन तींत ते मारले गेले. ही बातमी भीमदेवास समजतांच त्याच्या पूर्वीच्या त्वेशांत भर पडली. व त्यानें आपलें सैन्य तयार करून चव्हाणावर पुनः स्वारी केली. ह्या लढाईत सोमेश्वर पडला व भीमदेव विजयी झाला.

सोमेश्वराचा वध होतांच त्याच्या पुत्रास–पृथ्वीराजास अतोनात त्वेष आला व त्यानें बासष्ट हजार फौजेनिशीं गुजराथेवर स्वारी केली. ही लढाई फारच निकराची झाली. हींत पृथ्वीराजाचा जय होऊन गुजराथची वाताहत झाली.

यानंतर लवकरच म्हणजे इ० स० ११९१ त मुसलमानांनीं पृथ्वीराजावर स्वारी केली. तींत त्यांचा पराभव होऊन ते परत गेले. पुनः ११९३ मध्यें सुलतान महंमदानें पुनः स्वारी केली. ह्या लढाईत पृथ्वीराजानें आपली शिकस्त केली; परंतु काल उलटला होता. त्यामुळें त्याचें कांहींच चाललें नाहीं. पृथ्वीराज कैद पकडला गेला. दिल्लीचें हिंदुपद यवनांकडे गेलें. व यवनांनीं हिंदुस्थानांत आपलें वास्तव्य केलें. ११९४ त ज्यावेळीं कुतुबुद्दीन अन्हिलवाडपट्टणांवर फौज घेऊन आला त्यावेळीं, भीमदेवाचा सरदार जीवनराय लष्करासहीत पडून राहिला होता त्याची व कुतुबुद्दीनाची लढाई होऊन तींत तो मारला गेला. त्याबरोबर भीमदेव राज्य सोडून पळून गेला.

पुनः ११९६ त भीमदेवानें आपलें राज्य परत घेण्याचा प्रयत्न केला, त्याबरोबर कुतुबुद्दीन दिल्लीहून फौज घेऊन आला. तींत त्याचा पराजय झाला परंतु लवकरच गिझनीहून नवीन लष्कर त्याच्या मदतीस आल्यामुळें हिंदु लोक जे अजमीरच्या किल्ल्यांत कुतुबुद्दीनास कोंडून घेऊन वेढा देऊन बसले होते ते निघून गेले. पुढें कुतुबुद्दीन बरा होतांच, पाटणावर आला–मार्गांत अबूचे राजे गुजरार्थेत शिरण्याच्या मार्गाचें रक्षण करीत होते त्यांजवर हल्ला केला. ह्या युद्धांत ५००० हिंदु मेले व २०००० कैद झाले. नंतर मुसलमान गुजराथेंत आले व त्यांनीं गुजराथेचा लुटून फडशा उडविला व पाटणास आपलें ठाणें ठेविलें. भीमदेव १२१५ मध्यें स्वर्गवासी झाला. त्यानें मरेपर्यंत गुजराथचें स्वामीत्व गमाविलें नाहीं.

---

## वीरधवल
## सोळंखी ऊर्फ वाघेलवंश.

अन्हिलपट्टण यवनांच्या ताब्यांत गेलें म्हणून गुजराथेंतील सोळंखी राज्याची अखेर झाली असें म्हणतां यावयाचें नाहीं. वाघेलचे चालुक्य जे वाघेल या नांवानें ओळखले जात त्यांनीं गुजराथेंत आपलें राज्य स्थापन केलें. वाघेल शाखेचा मूळपुरुष अर्णोराज यास लवणप्रसाद या नांवाचा मुलगा होता. हा भीमदेवाच्या कारकीर्दीत प्रधानपदीं आला होता. यास वाघेलची जहागीर–वाघेलचा परगणा जहागिरीदाखल मिळाला होता. भीमदेवाच्या मृत्यूनंतर, या लवणप्रसादानें हळूहळू धोलका ही आपली गादी ठरवून गुजराथ व सोरट यांवर अंमल बसाविला. त्याचाच पुत्र वीरधवल हा होय. हा पृथ्वीराजाबरोबरच्या युद्धामध्यें भीमदेवाबरोबर होता. या वीरधवलानें वस्तुपाल व तेजपाल ह्या वाण्यांस आपली मंत्र्याची जागा दिली व

गांवच्या श्रीमान लोकांकडून पैसा जमा करून स्वार व शिबंदीची तयारी केली. सैन्याची तयारी झाल्यावर लवणप्रसादाकडे धोलक्याचें राज्य व वस्तुपालाकडे खंबायतचा कारभार सोंपविला. व वीरधवल आणि तेजपाल हे गुजराथेंत विजययात्रा करण्यास गेले. त्यांनीं कित्येक राजांस जिंकलें. व सौराष्ट्रांत आले. तेथून ते वामनस्थळींस आपले मेहुणे सांगण व चामुंड हे राज्य करीत होते तेथें येऊन आपल्या बायकोस शिष्टाईस पाठविलें. तिनें आपल्या नवऱ्याच्या पराक्रमाचें वर्णन करून त्यास खूप ठेवण्यास भावास सांगितलें, परंतु तिच्या भावांनीं तिच्या शिष्टाईकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, उलट लढण्याची तयारी केली. या लढाईंत सांगण व चामुंड हे मारले गेले. तेव्हां तें राज्य काबीज करून त्या राज्याच्या गादीवर त्याच्या मुलास बसविलें व त्याजकडून खंडणी घेण्याचें ठरवून अगणीत लुटीसह खेट प्रांतांमधून धोलक्यास आले. वीरधवलानें १४०० रजपूत पदरीं बाळगिले होते. त्यांच्या साह्यानें त्यास जिकडे तिकडे विजय मिळत गेले.

भद्रेश्वर नांवाच्या बंदर किनाऱ्यावरील शहरांत भीमसिंह पडियार या नांवांचा शूर व श्रीमान राजा होता. त्याजकडे वकील पाठऊन त्यास शरण येण्यास वीरधवलानें सांगितलें. परंतु त्यानें उलट तूंच शरण ये म्हणून जबाब पाठविला. त्या बरोबर वीरधवल फौज घेऊन भद्रेश्वर नगराकडे चालता झाला. या भीमसिंहाजवळ सामंतपाल, अनंगपाल, आणि त्रिलोकसिंह असे शूरवीर रजपूत योद्धे होते. हें सरदार मंडळ प्रथम वीरधवलाकडे आलें होतें, परंतु त्यास पगार फारच कमी मिळेल असें समजल्यावरून तें भीमसिंहाकडे राहिलें. भीमसिंह व वीरधवल यांची पंचग्राम या गांवाजवळ लढाई झाली. तींत त्यास अपयश आलें. त्यावरून त्यानें भीमसिंहाबरोबर तह केला. व तो परत आला.

महीकांठा प्रांतांतील गोधा येथें घुघुल नांवाचा राजा होता तो यात्रेकरूंस फार त्रास देत असे. तो वीरधवलाचा मांडलिक होता. त्यानें त्यास निरोप पाठविला कीं, तूं आमचा मांडलिक असून आमचे हुकूम अमान्य करतोस तर चामुंड व सांगण यांच्याप्रमाणें तुझी दशा करीन' हा निरोप पोहोंचतांच त्यानें निरोप घेऊन गेलेल्या भाटाबरोबर आपला भाट देऊन त्याबरोबर वीरधवलास देण्याकरितां काजळ व लुगडें पाठविलें. व असा निरोप पाठविला कीं, मी सकलराजमंडलास स्त्रियांप्रमाणें निर्बल व निर्वीर्य समजतों' हा निरोप ऐकतांच वीरधवलानें तेजपालाबरोबर रजपुतांचें सैन्य देऊन गोध्रयास रवाना केलें. तेजपालानें त्या रजपूत स्वारांस उत्तेजनपर भाषण करून नेटाचा हल्ला करावयास सांगितलें व घुघुलाच्या सैन्यावर हल्ला करून घुघुलराजास जिवंत पकडून आणिलें. त्यावळीं वीरधवलानें घुघुलराजानें पाठविलेलें लुगडें व काजळ याचा उपयोग त्याच्यावरच करून त्यास भर दरबारांत लुगडें नेसविलें व त्याच्या तोंडास काजळ फांसलें. हा अपमान असह्य होऊन घुघुल राजानें जीभ ओढून आत्महत्या केली.

यानंतर थोडेच दिवसांनीं, यादव ( जाधव राजा सिंघण ह्यानें गुजराथेवर स्वारी केली. त्याची फौज तापी नदीपर्यंत आली व तिचा अटकाव करण्याकरितां वीरधवलाची फौज महीनदीपर्यंत आली. उभयतांची भडोचच्या पुढें गांठ पडली. त्याजवर लवणप्रसाद व वीरधवल चालून गेले; परंतु तितक्यांत मारवाडचे चौघे राजे गोधा व लाट या देशाच्या राजमंडलासह चालून आले. वीरधवलास सहा शत्रूंबरोबर लढाई करणें भाग पडलें, तरीही तो यादव राजांबरोबर व धारवाडच्या राजांबरोबर लढत होता. शेवटीं त्यांनीं तह केला व या लढाईचा शेवट झाला. '

ही लढाई चालली असतां धोलक्याचा कारभार वस्तुपाल पहात होता. त्यालाही खंबायतच्या शंखराजाबरोबर लढाई करणें भाग पडलें. त्यानें शंखराजास सामोपचारें वागण्यास सांगून पाठविलें, परंतु तो ऐकत नाहीं असें पाहून त्यानें त्याजवर स्वारी केली व शंखराजास मारून अगणित द्रव्य आणिलें व त्याची रास वीरधवलाच्या पुढ्यांत ठेविली. तें पाहून वीरधवल संतोष पावला.

यानें मुसलमानांसही वर डोकें काढूं दिलें नाहीं, त्यांची जरी त्यास भीती होती तरी तो मुळींच डगमगला नाहीं. दिल्लीचा सुलतान मोअज्जीम हा गुजराथेवर स्वारी करण्यास आला होता त्याजवर वीरधवलानें वस्तुपालास एक लाख सैन्य देऊन पाठविलें. त्या फौजेच्या साह्यानें वस्तुपालानें बादशाहाचें सैन्य कापून काढिलें. एकवेळ सुलतान मोअज्जीमची आई गुजराथ देश फिरावयास आली होती, तीस यांचे लुटारू लोकांनीं

लुटलें हें वर्तमान ऐकून यांनीं शासन केलें व तिची उत्तम प्रकारें बरदास्त ठेविली. व वस्तुपालाबरोबर देऊन तिची रवानगी केली. त्यामुळें बादशहा फार खुष झाला व त्यानें वस्तुपालास पाहिजे तें बक्षिस मागण्यास सांगितलें; त्या वेळीं त्या एकनिष्ठ सेवकानें 'गुजराथेवर आपली कृपा असावी व त्याला उपद्रव देऊं नये' हें मागणें मागितलें व तें सुलतानानें कबूल केलें.

वीरधवलानें आपलें राज्य फारच न्यायानें आणि कर्तबगारीनें चालवून रयतेस सुखी केलें. तो दयाळू, सत्यप्रतिज्ञ व धर्मनिष्ठ होता. त्याची प्रजा त्यास फार चहात असे. तो ज्या वेळीं मेला त्या वेळीं त्याच्या चितेंत त्याच्या १८० सेवकांनीं आपणांस जाळून घेतलें. त्यास विरमदेव व विसलदेव असे दोन पुत्र होते. विरमदेव हूड स्वभावाचा असल्यामुळें विरधवलचे मागून विसलदेव गादीवर बसला.

## विसलदेव.

यानें आपला राज्यकारभार उत्तम प्रकारें चालविला. याच्या कारकीर्दींत सिंध प्रांतांमधून प्रमारवंशीय सोडा हे प्रथमच सौराष्ट्रांत आले व त्यांनीं राजापासून मिरास मिळवून वेगळेंच संस्थान स्थापिलें. त्याच्या भावानें वीरमदेवानें वीरमगांव या नांवाचें शहर वसविलें.

## अर्जुनदेव.

विसलदेवामागून अर्जुनदेव हा राजा झाला. इ. स, १२५८ चा सोमनाथ मंदिरांत एक लेख आहे. त्यांत अर्जुनदेवाला परमेश्वर भट्टारकश्री चालुक्य चक्रवर्ती 'महाराजाधिराजश्रीमदर्जुनदेव' अशी पदवी दिलेली आहे. हा शैव होता. याच्या राज्याचे सोमेश्वरदेव राकण, ओरा सरदार चालुक्यदेव, रामदेव, भीमसिंह वगैरे मांडलिक राजे होते. त्याचा कारभारी श्रीमल्लदेव होता. याचे सैन्यांत बेलाकुलांतील होरमज आणि नाखुदानुरुद्दीन फिरोजचा मुलगा खोजा इब्राहीम वगैरे यवन सरदार होते.

## लवणराजा.

विसलदेवामागून लवणराजा गादीवर बसला. याच्या कारकीर्दीचा इतिहास उपलब्ध नाहीं.

## सारंग.

इ. स. १२९४ चा अबूवर एक लेख आहे, त्यावरून असें समजतें कीं, हा अन्हिलवाड येथें राज्य करीत होता. चंद्रावतीचा राजा विसलदेव हा याचा मांडलिक म्हणून गणला जात होता.

## कर्ण वाघेल.

सारंगदेवाचे मागून कर्ण वाघेल हा गादीवर बसला. इ० स० १२९७ मध्यें दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन खिलजी यानें अलफखान व वजीर नुसरतखान यांजबरोबर १००००० स्वार, ६००० पायदळ, १५०० हत्ती आणि ८५ लहान मोठे अमलदार देऊन गुजराथ काबीज करण्यास पाठविलें. त्यांनीं गुजराथेंत येऊन त्या देशाची जी पायमल्ली केली ती तर कांहीं अपूर्वच! अन्हिलवाडचा किल्ला त्यांच्या ताब्यांत जाऊन तेथेंच यवनांचें ठाणें बसलें; आणि गुजराथचा कर्ण राजा हा पळून दक्षिणेंतील देवगडचा राजा रामदेव याच्या आश्रयास राहिला.

त्याची सत्ता नष्ट होण्यास जें कारण झालें, तें कर्ण राजाच्या कीर्तीस कालिमा आणण्याजोगें आहे, तरी त्याचा ह्या ठिकाणीं उल्लेख केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

कर्णराजाचे माधव व केशव या नांवाचे दोन नागरजातीचे ब्राह्मण प्रधान होते. त्यांत माधवाची 'पद्मिनी' नांवाची स्त्री असून ती सुस्वरूप होती. एके दिवशीं माधव घरीं नसतां कर्णराजानें पद्मिनीला बलात्कारें आपल्या महालांत नेलें. हें ऐकतांच माधवाचा भाऊ केशव हा आपल्या भावजयीच्या मुक्ततेसाठीं हत्यारबंद होऊन कर्णावर गेला; पण त्याच्या हातून भावजयीची मुक्तता न होतां उलट कर्णाच्या हातून तो मारला गेला. हें वर्तमान माधव घरीं येतांच त्यास कळलें. त्याबरोबर त्यास अनावर क्रोध उत्पन्न झाला. त्यानें मागचा पुढचा विचार न करितां राजाचा सूड घेण्याचा निश्चय केला व दिल्लीस जाऊन बादशहाची भेट घेतली व त्यास गुजराथेवर स्वारी करण्याची इच्छा उत्पन्न करविली. त्या इच्छेवरूनच अल्लाउद्दीनानें गुजराथवर स्वारी करून त्या देशाची राखरांगोळी केली. कर्णराजाची स्त्री कमलादेवी ही अलफखानाच्या हातीं सांपडली. तीस

त्यानें बादशहाकडे रवाना केलें. बादशहानें तीस आपली बेगम केलें.

कर्ण राजा राज्य सोडून जो पळाला तो कांहीं दिवस बागलाणांत होता. त्याजकडून आपली मुलगी देवलदेवी ईस घेऊन येण्यासंबंधानें कमलादेवीनें बादशहास सांगितलें व बादशहानें मलिककाफूर यास तसा हुकूमही केला होता. त्यावरून बागलाणांत कर्ण राजास मलिककाफूरनें निरोप दिला व मुलीस स्वाधीन करण्यास सांगितलें; पण कर्ण इतका कांहीं स्वाभिमानशून्य नव्हता. त्यानें मलिकला चकचकीत निरोप पाठविला कीं, 'माझी मुलगी मी तुमचे स्वाधीन करणार नाहीं. मग या उपर तुम्हांला जें करणें असेल तें करावें.' त्याबरोबर मलिकनें अलफखानास ससैन्य बोलाविलें. कर्णही ससैन्य तयार होताच. उभय पक्षाची लढाई झाली तींत थोडे दिवस कर्णराजास जय मिळाल्यासारखें दिसलें. त्याबरोबर त्यास अंशतः गर्व उत्पन्न झाला. इतक्यांत देवगडच्या राजाचा पुत्र शंकरदेव याजकडून देवलदेवीस मागणें आलें, तें त्यानें प्रथम नाकारिलें; पण पुढें पूर्ण विचार करून कबूल केलें. इतक्यांत शंकरदेवाचा भाऊ भीमदेव हा मोठा नजराणा घेऊन कर्णाकडे आला व देवलदेवीचें लग्न शंकररावाबरोबर नक्की केलें.

हें वर्तमान मलिककाफूर व अलफखान यांस समजतांच त्यांस चिंता उत्पन्न झाली व ते देवगडच्या मार्गाचा नीट बंदोबस्त करूं लागले. इतक्यांत कर्णराजाही किल्ला सोडून कन्येसहवर्तमान देवगडास जाण्यास निघाला. त्यास यवनांनीं हरकत केल्याबरोबर विरुद्ध दिशेनें भीमदेवानें देवलदेवीसह प्रयाण केलें. त्याच दिवशीं मुसलमानांची एक ३०० स्वारांची तुकडी वेरुळची गुंफा पहाण्याकरितां गेली होती, तिची व भीमदेवाच्या तुकडीची गांठ पडली. भीमदेवाजवळ देवगडचें निशाण होतें तें पाहून त्यांनीं भीमदेवावर हल्ला केला. भीमदेवाच्या मनांत लढाई करण्याचें नव्हतें. तसेंच रेंटीत रेंटीत देवगडास जावें असें त्याच्या मनांत होतें, म्हणून तो देवगडाचा रस्ता काढीत चालला; पण सर्व रस्ते यवनांनीं अडवून धरिले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडतांच त्यास निरुपायानें युद्ध करणें भाग पडलें. भीमदेवाची तुकडी फारच लहान व यवनसैन्य पुष्कळच असल्यामुळें त्याचा टिकाव लागेनासा झाला. इतक्यांत देवलदेवी ज्या घोड्यावर स्वार झाली होती त्या घोड्यास तीर लागून तो खालीं पडला व त्याबरोबर देवलदेवीही पडली त्याबरोबर तिच्या एका दासीनें घाबरून 'अहो! राजकन्या देवलदेवी आहे, इचें रक्षण करा' म्हणून किंकाळी फोडली. हे शब्द ऐकतांच देवलदेवीच्या सभोंवती यवन जमा झाले व त्यांनीं तीस सन्मानानें डोलींत घालून अलफखानाच्या गोटांत नेलें. ज्या हेतूस्तव लढाई केली तो हेतु पूर्ण होतांच बादशहाचें सैन्य दिल्लीस आलें व देवलदेवीस कमलादेवीच्या स्वाधीन केलें. तिजबरोबर शाहाजादा खिजरखान यानें विवाह केला.

येणेंप्रमाणें राजा कर्ण हा शाखाफलपर्णरहित असा वृक्षाच्या बुंधासारखा अनेक यातना व दुःखें भोगीत देवगडच्या राजाच्या आश्रयास जाऊन राहिला, पण मलिकंबरानें तेथेंही त्यास स्वस्थ बसूं दिलें नाहीं. त्यानें देवगडच्या राजावर स्वारी करून त्याचा पराभव केला. तेव्हां कर्ण तेथूनही गुप्तपणें आयुष्याचा शेषकाल दंतागिरीचे आसपास शेतकऱ्याप्रमाणें शेतकी व पाटिलकी करून आक्रमूं लागला. त्यानें आपलें पूर्व नांव चालुक्य ऊर्फ सोळंखी हें सोडून सोळांखी म्हणवूं लागला. येणेंप्रमाणें ह्या गुजराथेंतील चालुक्य शाखेचा लय होऊन महाराष्ट्रांतील चालुक्य घराणें पुनः आपल्या जन्मभुमीस येऊन साळुंखे या नांवानें ओळखूं लागलें.

---

## चौदाव्या व तेराव्या शतकाच्या मध्यंतरींची महाराष्ट्राची स्थिति.

ह्यावेळीं हिंदुस्थानची स्थिति फारच भयंकर झालेली होती. आपसांतील भांडणांमुळें आर्यावर्तावर यवनांचा अंमल पूर्णपणें बसून चुकला होता. गुजराथेंतील चालुक्यांची, दिल्ली येथील चव्हाणांची, तसेंच देवगड येथील यादवांची सत्ता लुप्त झाल्यानें, हिंदुमात्रास यवनांबरोबर लढाई करून जय मिळविण्याचा काल नाहींसा झालेला होता. स्वतंत्रतेनें आपलें पाऊल मागें घेऊन परतंत्रता तोंड पसरून उभी राहिली होती व तींत आर्यावर्तांतील सर्व शूर व नांवाजलेल्या रत्नांचा स्वाहा होत होता. त्यामुळें एके काळीं ज्या सुवर्णभूमीमध्यें, समाधान, कुटुंबप्रेम व शौर्यवास करीत होतें, त्याऐवजीं, औदासीन्य, भय व दारिद्र्य वास करूं लागलें. ज्या ठिकाणीं सदोदित सिंहाच्याच गर्जना ऐकूं याव-

याच्या त्याठिकाणीं कोल्ह्यांचें ओरडणें ऐकूं येऊं लागलें. कुलाभिमानाची जागा रिकामी होऊन त्या जागीं लोंचटपणाचा प्रादुर्भाव झाला. स्वाभिमान नाहींसा होऊन हांजी हांजी करण्याची प्रवृत्ति वाढूं लागली. केक शतकें स्वतंत्रतेनें रुळत पडलेल्या आर्यावर्तीयांस यवनांचा जुलूम असह्य वाटूं लागला. त्यामुळें केक स्त्रियांनीं आपल्या अब्रूच्या बचावार्थ प्राणनाश केले. या कालावधींत प्राचीन राजकुटुंबें नामशेष झालीं होतीं. त्यांनीं शेतकी व पाटिलकी करून आपलें आयुष्य क्रमणें सुरू केलें. कित्येक यवन दरबारीं राहून आपल्या सामर्थ्याचा उपयोग आपल्याच बांधवांचे गळे कापून यवनसाम्राज्य वाढविण्याकडे करूं लागले. कित्येकांनीं वारा वाहिल तशी पाठ फिरवून हा कनिष्ठ वेळ सेवाधर्म पतकरून, आपलें क्षात्रतेज सतेज राखण्याकडे केला.

महाराष्ट्रांतील मराठावीरांची ह्यावेळची स्थिति ही फारच चमत्कारिक होती. त्यांचें स्वतंत्रतादर्शक असें देवगिरीचें राज्य खालसा होतांच ते यवन पाच्छाईमध्यें मर्दुमकी गाजवूं लागले. ह्या त्यांच्या मर्दुमकीचा उपयोग ब्राह्मणीराज्यामध्यें बराच झाला. कारण, मूळ ब्राह्मणीराज्य ज्यानें स्थापन केलें तो जफीरखान हा दिल्लीमध्यें कांगो नांवाच्या ब्राह्मणाच्या पदरीं गुलाम होता. परंतु पुढें एका दैविक प्रकारानें हा पुरुष योग्यता पावेल असें त्या ब्राह्मणास वाटल्यावरून त्यानें त्यास मुक्त केलें व त्याचा उत्कर्ष होण्यासाठीं त्याला कांहीं द्रव्यही दिलें. त्या द्रव्याच्या साहाय्यानें जाफरखान दिल्लीच्या दरबारीं नोकरी करून राहिला व आस्ते आस्ते वाढत प्रसिद्ध सरदार झाला. याचवेळीं दक्षिणेंतील मुसलमान लोकांनीं बादशहाच्या सत्तेचें जूं झुगारून देऊन देवगडास नासरुद्दीन नांवाचा बादशहा करून स्वतंत्रपणें राज्यकारभार सुरू केला. त्यांजवर दिल्लीचा बादशहा महंमदशहा यानें स्वतः स्वारी करून देवगडास वेढा घातला. परंतु लवकरच दिल्लीस मोठें बंड झाल्यामुळें त्यानें इकडील वेढ्याचें काम आपल्या सरदारांवर सोंपविलें व आपण दिल्लीस गेला. त्यावेळीं वारंगूळच्या राजाची मदत घेऊन जाफरखानानें बादशहाचा सरदार आमाद उल्मुलक याचा पराभव केला. व देवगडाचा वेढा उठविला. त्यावेळीं नासरुद्दीन यानें आपण होऊन देवगडचें स्वामित्व त्यास दिलें. त्या वेळीं जाफरखान पूर्वीच्या आपल्या धन्याचे उपकार विसरला नाहीं. त्यानें कृतज्ञतापूर्वक आपल्या नांवास कांगो ब्राह्मण ही पदवी जोडून त्या ब्राह्मणास जामदारखान्याचें काम दिलें. व आपणांस सुलतान अल्लाउद्दीन हसन कांगो ब्राह्मणी हें नांव घेतलें. ह्या बादशहाच्या कारकीर्दींत हिंदूंवर जुलूम होत नसे. तो त्यांच्या गुणांचा आदर करी. मराठे लोकांच्या जुन्या जहागिरी वगैरे कायम ठेवून कित्येकांस त्यानें नव्या जहागिरी दिल्या. व त्यांजवर विश्वासानें मोठमोठे अधिकार सोंपविले. ह्यामुळें मराठ्यांस आपलें शौर्य दाखविण्याचा अनेक प्रसंगीं उपयोग झाला. याच्याच अमदानीमध्यें, हिंदूंना देशमुखी वगैरे वतनें मिळूं लागलीं. मुसलमान लोक आपला पूर्वीचा क्रूरपणा व द्वेष विसरून हिंदुलोकांच्या शौर्य-वीर्यादि गुणांचें योग्य चीज करूं लागल्यामुळें राजवंशीय व इतर थोर मराठा घराण्यांतील क्षत्रिय वीर आपलें गुप्त क्षात्रतेज हळूहळू प्रकट करूं लागले. चालुक्य वंशांतील शेवटचा राजा पदभ्रष्ट होऊन अज्ञातवासांत राहिला; परंतु त्याचे पुढील वंशजांस तें दुःख फार दिवस काढावें लागलें नाहीं. राखेंत गडप झालेला अग्नि वाऱ्याच्या योगानें पुनः प्रदीप्त होतो, तद्वतच बादशहाकडून उत्तेजन मिळतांच दुसऱ्या पिढींतच त्यांनीं आपली आवडती कट्यार हातांत धरिली, व दिल्लीचे बादशाचा पक्ष घेणारे लोकांचा व इतर लहानमोठ्या बंडवाल्यांचा मोड करून त्यांनीं ब्राह्मणी बादशहाचें महत्कार्य केलें. ह्यामुळें बादशहानें खूष होऊन साळुंखे यांस दंतागिरी व गुणवंतगडची देशमुखी दिली. अशाप्रकारें शस्त्रधारी होऊन त्यांनीं आपल्या थोरकुलाचा आवडता धंदा पुनः स्वीकारला. या वेळीं दंतागिरी व गुणवंतगड यांच्या व्यवस्थेचें काम साळुंखे करीत होते.

पुढें पंधराव्या शतकाच्या अखेरीस ब्राह्मणी राज्याचा विस्तार अतिशय वाढल्यामुळें तें मोडकळीस येऊन त्याचीं थोडक्याच काळांत पांच राज्यें झालीं. ( इ०स० १४८९ ) आदिलखानसावी म्हणून विजापुरचा सुभेदार होता, त्यानें आपल्या ताब्यांतील मुलूख स्वतः बळकावून ब्राह्मणी राज्याचें स्वामित्व झुगारून दिलें व विजापुरी नवीन राज्य स्थापन केलें. व आपणांस सुलतान युसफ आदिलशहा हें नांव धारण केलें.

# साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची कैफियत.

## भाग तिसरा.

### पाटणकर घराणें.

### अनुक्रमणिका.

## पाटण येथील वंशजांचा इतिहास.



## श्री. नागोजीराव ऊर्फ बाबासाहेब यांची कारकीर्दः—





# साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची कैफियत.

## भाग तिसरा.

## पाटणकर घराणें.

### मराठ्यांच्या कांहीं कुळांचा त्रोटक वृत्तांत.

अगदीं प्राचीन काळापासून हिंदुस्थान देशाच्या इतिहासाकडे आपण नजर दिली तर अनेक घडामोडी झालेल्या आपल्या दृष्टीस पडतील. प्रथम आर्यांचा प्रवेश झाला व त्यांनीं येथील मूळ रहिवाशांस स्वसत्तेखालीं आणिलें. तद्नंतर उत्तरहिंदुस्थानामध्यें रजपूत व दक्षिणेस मराठे स्वसत्तेचा उपभोग घेत होते. चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, कलचुरी, शिलाहार वगैरे कुळांतील पुरुषांनीं महाराष्ट्रामध्यें सार्वभौम या नात्यानें राज्य केलेलें आहे. पुढें मुसलमानांचा ह्या देशांत प्रवेश होऊन मोठ्या राज्यक्रांत्या झाल्या व त्यांतच देवगिरीच्या जाधव घराण्यास मारा मिळून, इ० स० १३१८ मध्यें त्या घराण्याच्या राज्याचा नाश झाला. व मुसलमानांकडे ह्या देशाचें प्रभुत्व गेलें. तरी ही त्यावेळचे मराठे सरदार मुळींच डगमगले नाहींत. त्यांनीं, पूर्ण जोमानें ' *होयसाळबल्लाळ ' ह्या यादव वंशाच्याच एका पुरुषाच्या प्रमुखतेखालीं इ० स० १३३६ मध्यें विजयानगरच्या स्वतंत्र राज्याची स्थापना केली. मुसलमानांची सत्ता जरी प्रस्थापित झालेली होती तरी मराठ्यांच्या अंतःकरणीं स्वातंत्र्य लालसा जागृत होती. ते फौजबंद होते. त्यामुळेंच त्यांच्या हातून देवगिरीच्या स्वतंत्र मराठी राज्याचा नाश होतांच ताबडतोब फक्त १८ वर्षांच्या अवधीमध्यें ' विजयनगरच्या ' राज्याची स्थापना झाली. हें राज्य एवढें बलाढ्य झालें होतें कीं, त्यानें बरींच वर्षें मुसलमानी सत्तेस अवरोध केलेला होता. तालिकोटच्या प्रसिद्ध लढाईमध्यें (इ० स० १५६५) ह्या वंशाचें राज्य यवनांनीं खालसा केलें. हें राज्य खालसा होतांच मराठ्यांचा आधार नाहिंसा झाला. त्यामुळें मराठे सरदार बहुतेक यवनसाम्राज्यामध्यें नोकरी करूं लागले. विशेषतः बहामणी राज्याच्या ज्या पांच शाखा झाल्या होत्या, त्यांतील आदिलशाही, निजामशाही व कुतुबशाही ह्या तीन शाखांमध्यें बरेच मराठे सरदार उदयास आलेले होते. त्यांजकडे मोठमोठ्या मनसबी असून त्यांचें यवनदरबारीं प्रमुखत्व होतें. विजापूरच्या आदिलशाहीमध्यें, १ चंद्रराव मोरे, राव नाईक निंबाळकर, ( फलटणराव ) झुंझारराव घाटगे, राव माने, घोरपडे, डफळे, सावंतबहादूर वाडीचे देशमुख, बाजी दळवी, पाटणकर वगैरे सरदार होते. तसेंच अहमदनगरच्या निजामशाहीमध्यें, जाधवराव, राजे भोंसले व दुसरे बरेच मराठे सरदार होते. गोंवळकोंड्याच्या कुतबशाहींत; जगदेवराव, रायराव, कदमराव हे मराठे सरदार प्रख्यातीस पावलेले असून मुरारराव व मदनपंत हे ब्राह्मण सरदार मोठमोठ्या हुद्यावर होते.

---

*यांसच बुक्क हें नांव असावें असें दिसून येतें. म्हणजे याच राजांच्या दुसऱ्या हरिहर राजाच्या कोरिव लेखांत, आसीदसीममहिमा वंशे यादवभूभृतां अखंडितगुणोदारः श्रीमान्बुक्क महीपतिः ' म्हणजे यादव राजांच्या या घराण्यामध्यें बुक्क नामक अत्यंत पराक्रमी राजा झाला असें म्हटलें आहे. ' परंतु ह्याच्या विरुद्धही अनेक पुरावे आहेत. एका रशियन प्रवाशानें The hindu sultan kadam तो हिंदु सुलतान कदम आहे असें म्हटलें आहे. सिवेलसाहेबानीं A Forgotten empire ( Vijayanagar ) या नांवाच्या पुस्तकांत विजयनगरचे राजे धनगर असल्याबद्दल उल्लेख केला आहे. परंतु त्यास कांहींच आधार नाहीं. बनवासीचे कदम यांचें विजयनगरच्या राज्यांत बरेंच प्रस्थ असल्यामुळें रशियन प्रवाशानें सुलतान ( राजा ) कदम होता असें म्हटलें आहे.

# मुसलमान व हिंदुपदपादशाही मधील मराठ्यांचीं प्रसिद्ध कुळें.

स्वराज्याची स्थापना होण्याच्या सुमारास यवन साम्राज्यामध्यें व हिंदुपद्पादशाहीमध्यें मराठ्यांचीं कोणतीं घराणीं, उदयास आलेलीं होतीं, त्यांची साधारण कल्पना यावी म्हणून ह्या घराण्यांची त्रोटक माहिती दिली आहे. ह्या माहितीवरून त्या काळीं यवनांचें साम्राज्य असूनही, मराठ्यांचें त्यांच्या दरबारीं किती प्राबल्य होतें याची कल्पना करितां येईल. ह्या व इतरही कीं, ज्यांचा नामनिर्देष ह्या ठिकाणीं स्थलसंकोचास्तव केलेला नाहीं; त्याही सर्व घराण्यांतील पुरुषांनीं आपआपल्या कुळांच्या हकीकती त्वरित पाठविण्याची कृपा करणें.

---

## भोंसले.

हें कूळ निजामशाहीच्या पदरीं, जाधवरावांच्या आश्रयानें राहून पुढें आपल्या अंगच्या मर्दुमकीनें उदयास आलें. या भोंसले घराण्याच्या उत्पत्तीसंबंधानें आजपर्यंत बऱ्याच ग्रंथकारांनीं चर्चा केलेली आहे. कित्येक ग्रंथकारांनीं श्री शिवाजीमहाराज ज्या कुळामध्यें उत्पन्न झाले तें कूळ हीन ठरवावें म्हणून प्रयत्न केलेला आहे. परंतु त्यांचा तो प्रयत्न सर्वस्वी द्वेषबुद्धिचा आहे असें आम्हांस म्हटल्यावांचून राहवत नाहीं. इतिहासाच्या तुटपुंज्या ज्ञानानें—सारासार विचार न करितां हे विद्वान् ज्या कुळामध्यें महाराजांचें जन्म झालें त्या कुळास हीन ठरवितात. ह्या त्यांच्या अज्ञानास काय म्हणावें ? त्यांनीं येवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, काजव्याच्या उजेडानें सूर्याचें तेज मुळींच कमी होत नसतें. उलट सूर्याच्या तेजाच्या प्रभावानें काजव्याचें तेज फिकें पडतें. आज आम्हीं महाराजांच्या कुळासंबंधानें जी माहिती दिलेली आहे ती विश्वसनीय अशी आहे. इची चर्चा अनेक विद्वानांनीं केलेली आहे. व तीबद्दल जे पुरावे मिळाले आहेत तेही विश्वसनीय आहेत.

भोंसले यांचें कूळ मूळ महाराष्ट्रामध्येंच राज्यशकट हांकीत होतें. भोंसल्यांचा एक पूर्वज महाराष्ट्रदेशांत गोदावरीच्या तीराजवळ 'निर्लीतीलपट्टण' म्हणजे हल्लीं ज्यास दौलताबाद म्हणतात त्या शहरांत रहात होता. त्या वेळीं त्यास भोंसले म्हणत नसून 'शिसोदे' म्हणत होत. हें कूळ महाराष्ट्रांतून मेवाडमध्यें जाण्याचें कारण टॉड साहेबांनीं आपल्या राजस्थानच्या इतिहासांत असें दिलें आहे कीं, "गौतमीपुत्र शातवाहन व पुलमावीनें ज्या वेळीं सर्व क्षत्रिय मराठ्यांचा गर्व नष्ट केला त्या वेळीं जी राज्यक्रांति झाली त्या वेळीं हें कूळ मेवाडमध्यें पळून गेलें" असें टॉड साहेबांच्या राजस्थानावरून समजतें. गौतमीपुत्र शातवाहन व पुलमावी यांचा काळ व शिसोद्यांचा पूर्वज सुमित्र याचा काळ साधारण जुळता येतो. गौतमीपुत्र शातवाहन ऊर्फ शालिवाहन यानें विक्रमराजाचा पराभव केल्याची दंतकथा सर्वांस विदित आहेच. ह्या विक्रमाचा काळ व सुमित्राचा काळ यामध्यें मुळींच तफावत नाहीं. विक्रमाच्या वेळेसच सुमित्र मारला गेला होता. व त्याचा मुलगा शतधन्वा हा बालकावस्थेंत विंध्याद्रीच्या पायथ्याशीं जाऊन नंतर त्यानें मेवाडचा मार्ग सुधारला होता. पुराणांतील आंध्रभृत्य राजे तेच हे महाराष्ट्रांतील क्षत्रिय राजे होत. इ० स० पूर्वी ह्या भारत वर्षामध्यें, शक, हूण इत्यादि परकीयांनीं येऊन आपली सत्ता प्रस्थापित केली होती. त्यावेळीं राजस्थानादि प्रांत ओसाड होते. आंध्रभृत्य व क्षत्रप वगैरे राजे त्याकालीं, उत्तरमहाराष्ट्रामध्यें प्रमुखत्वानें राज्य करीत होते. त्याच आंध्रभृत्य राजांचे शिसोदे हे वंशज असावे. रजपूतांचीं जीं ३६ कुळें टॉड साहेबांनीं आपल्या राजस्थानच्या इतिहासामध्यें वर्णिलेलीं आहेत. त्यांपैकीं कित्येकांचे पूर्वज नर्मदेच्या दक्षिणतीरीं व कित्येकांचें 'मुंगीपैठण' येथें राहणारे होते असें त्यांनीं म्हटलें आहे. महाराष्ट्रामध्यें सर्वांत प्राचीन असें मौर्यकूळ. त्याकालींही दक्षिणेमध्यें बरींच कुळें पूर्ण ऐश्वर्याचा उपभोग घेत होतीं. कालांतरानें हीं कुळें उत्तरेकडे जाऊन तेथें त्यांनीं वसाहत केलेली आहे, असें गुरुवर्य डॉ० भांडारकरकृत दक्षिणच्या प्राचीन इतिहासावरून दिसून येतें. प्राचीनकाळचे सार्वभौम सत्ताधारी राजे राष्ट्रिक–राष्ट्रकूट हेच होत. ह्या राष्ट्रकूटांचे राठोड झालेले आहेत. ह्या राठोडांनीं महाराष्ट्रामधून निघून जाऊन उत्तरहिंदुस्थानामध्यें वसाहत केलेली आहे. व ते रजपूत ह्या नामाभिधानास पावले गेले. एकंदरींत महाराष्ट्रांतील प्राचीन मराठे हेच राजस्थानांतील रजपूत होत, यांत मुळींच संशय नाहीं. रजपूत व मराठे ह्यांमध्यें देशपरत्वें जरी चालीरिती बदलून भिन्न स्वरूप आलेलें आहे

तरी ते मूळचे एकच होत. कल्याणचे चालुक्य यांची सत्ता अन्हिलवाड्यास, गुजराथेंत झाल्यानंतर त्यांस पूर्वस्मृति राहिली नाहीं. देशपरत्वें त्यांच्यात रजपूतत्वाचा जो अभिमान जागृत झाला त्यामुळेंच कर्ण सोळंखीनें यादव उर्फ जाधवघराण्यांमध्यें आपली मुलगी देण्यास कांकूं केलें. त्याचवेळेस देवगिरीच्या रामराजानें मराठे व रजपूत यांतील भेदाचें स्पष्टीकरण करून त्यांस दाखविलें असतें तर महाराष्ट्राचा बराच फायदा झाला असता. परंतु त्यावेळीं आपण रजपूतवंशीय असून आपणांबरोबर शरीरसंबंध करण्यास योग्य आहों हें त्यांनीं सिद्ध करून दाखविलें. त्यामुळें कर्ण सोळंखी हा आपली मुलगी देण्यास कबूल झाला. असा कथाभाग वर्णन केलेला आहे. ह्यावरून ज्या प्रांतामध्यें बरींच वर्षें वास्तव्य झालें. त्या प्रांतांतील रीतिरिवाजान्वयें त्यांच्या मतांत फरक होणें साहजिक आहे. तसाच फरक झाल्यास आज दोन हजार वर्षें झालीं आहेत. अर्थात् रजपूत व मराठे हे भिन्न गणले गेले. परंतु ते भिन्न नसून एकच होत यांत मुळींच संशय रहात नाहीं.

सूर्याच्या किरणापासून समुद्रांतील पाण्यास कांहीं दिवस आकाशामध्यें वास करावा लागून, त्यास मेघाचें स्वरूप येतें व कालांतरानें थंड वायूच्या स्पर्शापासून पुनः तेंच पाणी पर्जन्याप्रमाणें समुद्रांत पडतें. त्याचप्रमाणें ह्या 'शिसोदे' वंशाचें झालें आहे. हें कूळ महाराष्ट्राच्या प्राचीन राजवंशापैकीं असून, शालिवाहनाच्या वेळीं घडलेल्या राज्यक्रांतीच्या वेळीं स्वस्थानभ्रष्ट होऊन सातपुडा व विंध्याद्री पर्वताच्या आश्रयानें राहतें जाहलें. नंतर त्यानें कित्येक शतकें मेवाडांत आपली सत्ता प्रस्थापित केली. व पुनः एका राज्यक्रांतीच्या वेळीं तें आपल्या जन्मभूमीस बाराशें वर्षानंतर येतें झालें. उलट यावरून असें सिद्ध होतें कीं, राज्यस्थानामध्यें सर्व रजपूतांमध्यें जें कुल उच्च, जुनाट व ज्यापासून प्रत्येक रजपूतास अभिमान वाटतो तें कुल दक्षिणेंतील महाराष्ट्र राजवंशापासूनच उत्पन्न झालें आहे. ह्या गोष्टीचा सर्व मराठ्यांस अभिमान वाटला पाहिजे.

कित्येक ग्रंथकारांनीं शिवाजीच्या मूळ पुरुषाचा चिकित्सापूर्वक शोध न करितां शिवाजीस हीनत्व येईल अशा प्रकारची माहिती आपल्या ग्रंथांत घुसडून दिलेली आहे. कित्येक शिवाजीचा पणजा जो बागभोंसला तो राणा भीमसिंह यापासून, एका सुतार जातीच्या दासीच्या पोटीं उत्पन्न झाला होता. तो खानदेशाचा सुभेदार जो 'राजा अलीमोहन' त्याच्या पदरीं नोकरी करीत असे; परंतु आपल्या कर्तबगारीनें थोड्याच दिवसांत तो इतका योग्यतेस चढला कीं, राजा अलीमोहनानें मृत्युसमयीं त्यास प्रतिनिधि नेमून आपल्या लहान मुलास त्याच्या हातीं सोंपून दिलें. बाग भोंसल्यानें कांहीं दिवस वजिरी करून तें काम सोडलें व पुण्यानजीक कांहीं गांवच्या पाटिलक्या खरेदी करून तो राहूं लागला. त्यास चार पुत्र होते. त्यांतील मालोजीपासून सातारच्या राजघराण्याची व बंबजीपासून नागपूरच्या भोंसल्यांची उत्पत्ति झाली. असा उल्लेख केलेला आहे. परंतु ह्या मजकुराचा खोडसाळपणा मेवाडच्या राजप्रशस्तीनें सिद्ध करून दाखवितां येतो. मेवाडच्या राजप्रशस्तीमध्यें या घराण्यासंबंधानें जी माहिती दिलेली आहे ती आम्हीं या खालीं देत आहों, त्यावरून वरील मजकुराचा खोडसाळपणा, आपोआप नजरेस येईल.

महाराणा रायमल्ल याचा ज्येष्ठ पुत्र संग्रामसिंह हा इ० स० १५०९ मध्यें मेवाडच्या गादीवर बसला, तो १५३० मध्यें वारला. त्याच्या मरणानंतर 'राणा रतन' संग्रामसिंहाचा मुलगा गादीवर बसला, तो १५३५ सालीं वारला. त्याच्या मागून त्याचा धाकटा भाऊ विक्रमाजित हा गादीवर बसला; परंतु त्याच्या दुर्वर्तनास कंटाळून मेवाडच्या सरदारमंडळीनें त्यास पदभ्रष्ट केलें व महाराणा संग्रामसिंहाचा 'पृथ्वीराज' या नांवाचा जो भाऊ होता त्याच्या एका दासीपुत्रास गादीवर बसविलें. त्याच्या आईस 'दासी सीतलसेनी' असें म्हणत व त्या दासीपुत्रास बनबीर असें म्हणत. हा फार धूर्त, शहाणा, बुद्धिमान् व धार्मिक वृत्तीचा होता; परंतु त्यास गादी मिळतांच लोभामुळें त्याच्या वृत्तींत फरक झाला. त्यानें विक्रमाजिताचा धाकटा भाऊ 'उदयसिंह' या नांवाचा सहा वर्षांचा एकच गादीचा वारस होता त्यास ठार मारण्याचा प्रयत्न करून निष्कंटक होण्याचा प्रयत्न केला, परंतु पन्ना दाईच्या स्वामिभक्तीमुळें त्याचा तो प्रयत्न निष्फल झाला. व त्यानें वयांत आल्यावर इ० स० १५४१ मध्यें बनबीराबरोबर लढाई मारून त्यास राज्यांतून हांकून

लाविले. हा **बनवीर** चितोड सोडुन दक्षिणेंत पळून आला, व याच्याच संततीपासून नागपूरकर भोसल्यांची उत्पत्ती झाली आहे, असें मेवाडच्या राजप्रशस्तीमध्यें लिहिलें आहे. व *भारतवर्षकारही तसेंच म्हणतात. रजपूतलोक जात्याच स्वाभिमानी आहेत व नशांत त्यांची आपल्या कुलाचा निर्मळपणा राखण्याकडे विशेष प्रवृत्ती दिसून येत होती व त्या प्रित्यर्थ त्यांनीं यवनांबरोबर अनेक लढाया दिलेल्या आहेत. त्यांच्या इतिहासामध्यें शिवाजीच्या पूर्वजांची जी उत्पत्ती दिलेली आहे ती खोटी असें कधींही म्हणतां येणार नाहीं. दासीपुत्रास औरस संतती बनविण्याचा प्रयत्न निदान मेवाडवासियांकडून तरी व्हावयाचा नाहीं. म्हणून सातारकर भोसले यांचा संबंध बनबीराशीं दाखविणें हें गैरच होय. भोसल्यांचें कुळ हीन आहे हें दाखविण्यासाठींच बनवीरास शिवाजीचे पूर्वज बनविण्याचा बादरायण संबंध केलेला आहे. बनबीर ज्या वेळीं दक्षिणेमध्यें आला त्या काळामध्यें व मेवाडच्या इतिहासामध्यें जो शिवाजीचा पूर्वज लिहिलेला आहे त्या राणा लक्ष्मणसिंहाचा मुलगा सज्जनसिंग यांमध्यें २४० वर्षांचें अंतर आहे. बनबीराच्या पूर्वी दोनशेंचाळीस वर्षें अल्लाउद्दीन खिलजीनें पद्मिनीच्या प्राप्ती साठीं चितोडवर स्वारी केली. त्यावेळीं आस्तित्वांत असलेल्या लक्ष्मणसिंह राण्याला एकंदर ११ पुत्र होते. त्यांपैकीं १० लढाईंत पतन पावले. व शिल्लक अजयसिंग ह्या नांवाचा राहिला होता.

हा अजयसिंग, चितोड यवनांच्या ताब्यांत गेल्यामुळें, केलवाडास जाऊन राहिला होता. यास त्याच्या बापानें लक्ष्मणसिंह महाराण्यानें मरतेसमयीं असें सांगितलें होतें कीं, ' तुझा वडील भाऊ ऊरसिंह (आरसिंह) हा लढाईमध्यें मरण पावला आहे. त्याचा गादीवर हक्क होता. तरी तूं त्याच्या मुलास गादीवर बसवावें ' ह्या बापाच्या वचनाचें स्मरण ठेवून अजयसिंगानें आपला पुत्र सज्जनसिंह यास पुढें आपल्या भावाच्या मुलाबरोबर तंटा करूं नये म्हणून मेवाड सोडण्यास सांगितलें. त्यावरून त्या पितृभक्त सज्जनसिंहानें बापाच्या आज्ञेनुसार मेवाड सोडलें व सोंधवाडा येथें येऊन राज्य स्थापिलें. (इ० स० १३४० ) याच सज्जनसिंहापासून शिवाजी महाराजांची उत्पत्ती झालेली आहे. असें *मेवाडच्या इतिहासांत लिहिलें आहे.

सज्जनसिंहाचा पुत्र दिलीपसिंह महाराणा, त्याचा पुत्र शिवाजी ( सिंहाजी ) महाराणा, यास पुत्र दोन, एक सोंधवाडकर यांची शाखा. या शाखेस घोरपडे असें म्हणतात. व दुसरा भोसाजी महाराणा. भोसाजी महाराणा यास पुत्र दोन, नेपाळवाले व देवराजजी. देवराजजी महाराणे हे दक्षिणेंत येऊन आपणांस भोसावंत म्हणवूं लागले. पुढें त्यांस भोंसले असें नांव पडलें. यांस पुत्र दोन. पहिला महादेव, हा खानवट, हिंगणी, देऊळगांव, बाव्ही वगैरे शाखांचा मूळपुरुष. व दुसरा इंद्रसेन महाराज, इंद्रसेनाचा शुभकृष्णजी महाराज, त्याचा रूपसिंहजी महाराज, त्याचा भूमिंद्र महाराज, त्याचा धापजी महाराज, त्याचा बरहटजी महाराज, त्याचा खेलोजी महाराज, त्याचा कर्णसिंह महाराज, त्याचा संभाजी महाराज, त्याचा बाबजी महाराज. यांचे मालोजी व विठोजी. मालोजीचा शहाजी व विठोजीचे वंशज इंदापूर तालुक्यांत करून, निरगुडी, शंभुमहादेव मुंगीपैठण, तंजावर, वनसेंद्री, कांबरी, मंजूर वगैरे ठिकाणीं आहेत.

ह्या हकीकतीवरून शिवाजीचें कुळ दासीपुत्रांपैकी नसून उच्च अशा कुळांतील होतें हें सिद्ध होतें. मेवाडच्या इतिहासामध्यें भोसल्यांच्या पूर्वजांची नांवनिशी देतेवेळीं बऱ्याच चुका झालेल्या आहेत परंतु त्या सातारच्या दफतरावरून चिटणिसांनीं दुरुस्त केलेल्या आहेत. व सातारच्या प्रतापसिंह महाराजांनींही आपल्या कुळाचा अभिमान बाळगून आपली वंशावळ शुद्ध केलेली आहे. त्यावरून तीच सत्य मानणें हें श्रेयस्कर होईल. घोरपडे घराण्यासंबंधानें विचार करितां, आमच्या मतें ह्या वंशावळींत आणखी थोडा फरक होणें इष्ट आहे. हा फरक आमच्याकडे जी घोरपडे घराण्याची हकीकत आलेली आहे तीवरून तो करणें इष्ट वाटत आहे. तो फरक हाच कीं, वर आम्हीं जी वंशावळ दिलेली आहे तींतील दिलीपसिंगाचा मुलगा शिवाजी यास पुत्र दोन. एक सोंधवाडकरांची शाखा व दुसरी भोसाजी राणा यांची शाखा असें लिहिलें आहे. पण घोरपड्यांची वंशावळ बहुतेक टॉडच्याच ग्रंथावर भिस्त ठेविते आहे. त्यांचे म्हणणें असें आहे कीं, लक्षुमणसिंहाचा, अजयसिंग, अजयसिंगाचा सज्जनसिंग त्याचा दिलीपसिंग, त्याचा

*भारतवर्ष अंक ५ पृष्ट ८ पहा.

* कर्नल टॉड कृत राजस्थानचा इतिहास पृष्ट २९

शिवाजी, त्याचा भोराजी, त्याचा देवराज, त्याचा उग्रसेन, त्याचा मालोजी. या मालोजीस कोंकणांतील एक किल्ला घोरपडीच्या साह्यानें घेतल्यावरून घोरपडे म्हणूं लागले. ह्या मालोजीस चार पुत्र. पहिला बाजी हा मुधोळकर घोरपड्यांचा पूर्वज, दुसरा लहानपणींच निवर्तला. तिसरा वल्लभसिंग, आणि चवथा सयाजी ह्या सयाजीस भोसाजी ह्या नावांचा मुलगा होता व त्यास भोंसले असें म्हणूं लागले. व ह्याच भोंसले घराण्यामध्यें छत्रपति उदयास आले व वल्लभसिंगाच्या वंशजांपासून वाघापुरकर, सोनधुरकर, व कापसीकर अशा शाखा उदयास येऊन त्या घोरपडे या नांवाखालीं विजापुरमध्यें नोकरीस राहिल्या होत्या. वरील वंशावळींत व ह्या वंशावळींत अशाप्रकारचा फरक दिसून येतो. हा फरक म्हणण्यासारखा आहे असें नाहीं. घोरपड्यांची उत्पत्ती ह्याच वंशापासून झालेली आहे येवढें मात्र यावरून निश्चित होतें. पुढें ती उत्पत्ती शिवाजी महाराण्यापासून ( सोंधवाडकर ह्या शाखेनें ) होवो किंवा मालोजीपासून होवो परिणाम एकच. असो,

भोंसले घराण्याच्या मूळउत्पत्तीसंबंधानें कांहीं इंग्रज इतिहासकारांनीं माहिती दिलेली आहे ती या ठिकाणीं दिल्यास अप्रासंगिक होणार नाहीं. मि. हिके म्हणतात.

The Bhonslay family was of a very ancient date. In the Prophetical Purans, designated Bhavishyottara, and in the historical volumes, called Bhagwatam, and Harivansam, and in other minor works, we find it stated that the ancient king Satadhanva sprung of the solar race, set out from Northern India, most probably from the regions near ancient Oude, and settled near the Vindiha Mountains, South of the Nurbbuda. He was known under the name of Sissoday, whose ancestor was a Rajpoot by birth and descent. Sissoday founded the Royal House and principality of Chitore, now existing as one of the most ancient states in the province of Rajputana, which country might aptly be styled as tho Motherland of the Hindu Rajahs.

The kingdom of Sissoday before it merged into the principality of the Rana of Chitore, had existed 1,680 years, before its conquest by Shalivahan who put the whole of the Members of this family to death, except one woman, who, having escaped with her infant son found shelter and subsistence in a miraculous manner amongst the Satpoora Mountains. This son was satadanva surnamed Sissoday, who became the founder of the family of the Rana of Chitore, from whom sprang the Ranas af Odyapore.

Sissoday gave birth to a son named hutchmanpal, who travelled into strange countries, and returned bringing with him a beautiful damsel from Singala Dweep the ancient Sanskrit name of the Island of Ceylon. This maiden was of the Padmini race, and was remarkable for symmetry, beauty and accomplishments. The fame of the transcendant loveliness of this woman spread so far and wide that it reached the ears of the Emperor of Delhi, who inflamed with unholy passion, used every endeavour to obtain her, and sever her, from the arms of Lutchman Pal, her consort. Many a battle was fought, and Lutchman Pal, on account of his great knowledge and abilities, his vast foreign travels, his military Prowess, and his unparalleled deeds of valour, won for himself the name and title of Maharana. Lutchman Pal fell in battle, fighting against the Emperor of Delhi, and his sons dispersed into different countries and founded various principalities. Taking Lutchman Pal as the main stock or the first generation, the Kingdoms of Kutch and Udyapoor were founded by princes of his family, of the third generation; the Kingdoms of Nepal and Saindhawada by the Princess of the Sixth generation of the aforesaid family and of the Seventeenth generation, Malojee sprung, whose Royal family in course of time gave birth to Shivajee the great, the founder of the Mahratta Empire.

Thus it will be seen that the Mahratta Royal families were purely of the Rajpoot origin but were erroneously called Mahratta by Native and more Particularly by European Historians simply because these Princes adopted the Mahratta language as their Mother tongue. This will born out by the genealogical chart, furnished to the Home

Authorities and to the Indian Government by Pratapsing Maharatah of Satara.

Thus the Principalities of Chitore and Odyapoor are as Mothers that have given birth to the daughter—principalities of Satara, Kolhapoor, Tanjore, Saindhwada, Nagpore, Kutch, Bhooj, and Nepal.

ह्या ग्रंथकारानें भोसलें घराण्याचें जसें प्राचिनत्व सिद्ध करून दाखविलें आहे तसें दुसऱ्या कोणत्याही ग्रंथकारानें केलेलें नाहीं. लक्ष्मणसिंहानें पद्मिनी आणल्याबद्दलचें विधान मात्र चुकीचें केलेलें आहे. या ग्रंथकाराप्रमाणेच सरवॉर्टल फ्रीयर यांनींही मुंबई सरकार करतां जी माहिती लिहिलेली आहे तीही ह्या घराण्याचें प्राचिनत्व सिद्ध करून देणारी असल्यामुळें ती आम्हीं या ठिकाणीं देत आहों.

The heroic genealogy of this House is traced through the Ranas of Odeypoor Cheytore, to the Sissoday Raja of Asseer, conquered and slain by Shalivahan, whose era Commences in A. D. 77. The only historical value of legends on this subject seems to be to corroborate other Proofs that the Bhoslays like most of the old Maratha families, had pretensions to a Rajpoot Origin. They appear to have been a family of considerable influence previous to the time of Kellojee, the great grandfather of Shivajee. There are still existing four acknowledged branches, which had separated from the main stem before Kellojee's time, and who had then acquired separate Patelships in the Deccan, which their descendants still hold. There are the families of Koral Bamboree, Manjoor, and Bansidree. The authentic records of the Satara House Commences with Kellojee.

ह्याप्रमाणें दोघां इंग्रज इतिहासज्ञांचा भोंसले कुळासंबंधाचा अभिप्राय दर्शित केलेला आहे. यावरून या कुळाच्या निर्मळपणाबद्दल सहज खात्री होईल. मराठ्यांचे प्रसिद्ध इतिहासकार ग्रँटडफ यांनीं भोंसले कुळासंबंधानें सविस्तर न लिहितां. A respectable maratha family एवढेच उद्गार काढले आहेत.

सारांश, ज्याप्रसिद्ध मराठा कुळामध्यें श्रीछत्रपतिचें जनन झालें तें कूळ मूळ महाराष्ट्रीय असून, तें कालांतरानें रजपुतान्यामध्यें गेलें व तेथें त्यानें प्रमुखपणानें स्वातंत्र्यसुख अनुभवून पुनः तें महाराष्ट्रांमध्यें आलें व त्यानें मराठी साम्राज्याची टोलेजंग इमारत उभी केली. व सर्व मराठ्याचा कीर्तीरव दिगंत फडकावयास लाविला; याबद्दल या कुळाचे आम्हीं सर्व मराठाबांधवांनीं ऋणी असलें पाहिजे. ह्या कुळाच्या दोन शाखा झालेल्या आहेत. सातारकर व कोल्हापूरकर. तूर्त साताऱ्याची गादी खालसा असून, कोल्हापूरच्या गादीवर श्री. शाहू-छत्रपति सरकार करवीर हे विद्यमान आहेत. ह्या कोल्हापूर संस्थानची स्थापना सुप्रसिद्ध ताराबाई यांनीं शाहूच्या आगमनानंतर आपल्या पुत्रासह पन्हाळ्यास जाऊन तेथून कोल्हापुरास जाऊन इ० स. १७०८ मध्यें ही गादी स्थापन केली. ही गादी स्थापन करण्याच्या कामीं रामचंद्रपंत अमात्य, कागलकर सरजेराव घाटगे वगैरे मंडळी अनुकूल होती. श्रीमंत छत्रपती शाहु महाराज आपल्या कुळाची कैफियत लिहिण्याचीं साधनें देतील अशी आम्हांस उमेद आहे.

*मोरेः—मोरे ह्या नांवाचा एक सरदार विजापुरच्या आदिलशहाच्या पदरीं होता. हा कर्नाटकांत नाईक ह्या नांवानें प्रसिद्ध होता. यास युसुफ आदिलशहानें १२००० पायदळाची सरदारी देऊन नीरा आणि वारणा यांमधील प्रदेश जिंकण्याला रवाना केलें. तो प्रदेश मोरे यांनीं काबीज केला, या प्रदेशामध्यें राजे शिर्के, गुजर, मोहिते, महाडिक वगैरे मराठे सरदार राज्य करीत होते. ते आदिलशहास जुमानित

* आमच्या संग्रहीं मोऱ्यांची अस्सल वंशावळ, आमचे मित्र श्रीयुत व्यंकटराव धुळप यांजकडून प्रसिद्धीस्तव आलेली आहे. श्री शिवाजी महाराजांनीं मोऱ्यांस मारून त्यांचें राज्य काबीज केल्यानंतर ह्या वंशातील पुरुषांची फारच शोचनीय स्थिति झालेली होती. त्यांनीं स्वसंरक्षणार्थ आपलें मोरे हें नांव बदललें होतें. व त्याच वंशांतील पुरुष स्वराज्याच्या कितीं उपयोगीं पडले हें ती हकीकत प्रसिद्ध झाल्यानंतर कळून येईल. श्री. बाबासाहेब धुळप, विजयदुर्ग. यांजकडून त्यांच्या पदरीं असलेले कागदपत्र आल्यावर या माहितीस विशेष स्वरूप येणारें आहे. तरी श्री. बाबासाहेब आपल्या दफतरची हकीकत लवकरच पाठवितील अशी आशा आहे.

ग्रंथकर्ता.

नसत. मोरे यांनीं हा प्रांत काबीज केल्यानंतर त्यांस आदिलशहानें 'चंद्रराव' हा किताब दिला, याचा पुत्र यशवंतराव मोरे यानें आदिलशहाच्या वतीनें परिंड्याच्या लढाईंत बुऱ्हाण निजामशहाचा पराभव करून त्याचें हिरवें निशाण काबीज केलें. त्यावरून प्रसन्न होऊन मोऱ्यांस आदिलशहानें तें हिरवें निशाण बक्षिस दिलें व जावळीचा राजा केलें, ह्या मोऱ्यांनीं पुढेंही विजापुरकरांची बरीच सेवा केलेली असून आदिलशहाचीही त्याजवर विशेष भिस्त असे. यांनीं जावळी येथें सात पिढ्यापर्यंत राज्य केलें. ( १६६५ ) यांनीं तेथील ओसाडप्रांताची सुबत्ता केली. यांस बादशहास खंडणी वगैरे देण्याची मुळींच जरूरी नसे व आदिलशहानेंही ती कधीं मागितली नाहीं; कारण त्यांनीं बेकैद असलेला प्रांत सुधारून आपल्या हुकमतीखालीं आणला, हेंच त्यांस विशेष वाटत असे. हे मोरे आपल्या नांवापुढें चंद्रराव हा किताब जोडीत असत.

**निंबाळकर:**—विजापुरच्या आदिलशाहीमध्यें हें घराणें फार प्रसिद्ध होतें. यांस रावनाईक निंबाळकर अगर फलटणराव असेंहि म्हणतात. यांचें मूळ आडगांव पवार, परंतु यांस ज्या ठिकाणीं हे रहात होते त्या निंबाळगांवावरून निंबाळकर असें म्हणतात. आदिलशहानें यांस फलटणची देशमुखी दिलेली होती. हे आपणांस राजे असें न म्हणतां नाईक असें म्हणत. वंगोजी नाईक ऊर्फ जगपाळराव निंबाळकर हा पाणीदार सरदार असून याचीच बहीण दीपाबाई ही मालोजी भोंसल्यास केलेली होती. इच्याच पोटीं शहाजी जन्मले. ज्यावेळीं लुखजी जाधवराव आपली मुलगी जिजाबाई शहाजीस देईना त्यावेळीं ह्या जगपाळराव निंबाळकरांनीं मालोजीस बरेंच साह्य देऊन लग्न जुळवून दिलें. ह्या घराण्यानें मराठशाही स्थापन झाल्यावरही बरेंच पराक्रम केलेले आहेत. इ० स० १६२०त मलिकंबर आणि शहाजहान यांची जी लढाई झाली तींत हा जगपाळराव मारला गेला. सांप्रत फलटणच्या घराण्याचें अस्तित्व असून, ह्या घराण्याच्या पदरीं आपल्या पुरुषांची कारकीर्द उत्कृष्टपणें मांडण्याचीं साधनेंही आहेत, तरी त्यांनीं आपल्या घराण्याचा इतिहास प्रसिद्धीकरितां दिल्यास उपकार होणार आहेत. सध्यांचे राजे हें मनावर घेतील का ?

**शिर्के:**[*]—कोंकणप्रांतामध्यें शिर्क्यांचें वास्तव्य पुरातन काळापासून होतें. हा कोंकणप्रांत जिंकण्यासंबंधानें ब्राह्मण सुलतानानीं पुष्कळच प्रयत्न केले होते; परंतु ते प्रयत्न प्रथम विशेषसे फलद्रूप झाले नाहींत. प्रसिद्ध दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर कृष्णा व गोदावरी त्यांच्या दरम्यानचा प्रदेश ओसाड पडला असतां, तेथील मराठे सरदारांनीं बंडें करून सर्व डोंगरी किल्ले मुसलमानांच्या हातून घेतले. व रयतेजवळून करभार घेण्याचा प्रारंभ केला, हें वर्तमान सुलतान अहमदशहावली ब्राह्मणी यास समजल्यावरून त्यानें १४२९ मध्यें, खरदार मलिक उत्तुजार यासमागमें दादो नरसो काळे या हुषार ब्राह्मणास देऊन हीं बंडें मोडण्यास रवाना केलें. त्यावेळीं तो शिर्के यांच्या वाटेस गेला नाहीं. पुढें अलाउद्दीनशहाच्या कारकीर्दींत मलिक उत्तुजार कोंकणप्रांत काबीज करण्यासाठीं आला. ( इ० स० १४५३ ) त्यावेळीं त्यानें चाकण किल्ल्यावर आपलें ठाणें केलें. त्यावेळीं शिर्क्यांचें राज्य मलिकउत्तुजारानें काबीज केलें व त्यास तूं मुसलमान हो, नाहींतर तुझा जीव घेतों. म्हणून बळजबरी चालविली. परंतु त्या धूर्त सरदारानें तो प्रसंग मोठ्या युक्तीनें टाळला. त्याचवेळीं खेळणापरगण्यामध्यें शंकरराय ह्या नांवाचा राजा राज्य करीत होता, तो माझा शत्रु आहे यासाठीं 'प्रथम आपण दोघे मिळून त्यास मुसलमान करूं नंतर मी होईनच' असें शिर्क्यांनें तुजारास सांगितलें. तें तुजारनें कबूल केलें. पण खेळणा परगण्यामध्यें प्रवेश होणें फारच मुष्किलीचें आहे असें तुजारास दिसून आल्यावरून तो कांकूं करूं लागला. परंतु ती हिंमत शिर्के यांनीं घेतल्यावरून शेवटीं तुजार कबूल झाला. ह्या खेळणापरगण्यांत राजापूर आणि संगमेश्वर यांमधील कोल्हापूरच्या पश्चिमेकडील घाटमाथ्याचा समावेश होतो. हा प्रांत फारच भयंकर असून अवघड आहे. या प्रांतांत तुजारबरोबरच्या

[*] लवकरच शिर्के घराण्याची जी माहिती आमच्याकडे आलेली आहे ती प्रसिद्ध करण्यांत येईल. अद्यापही ज्या पुरुषांकडे शिर्के घराण्यासंबंधाची माहिती दर्शविणारे कागदपत्र असतील ते त्यांनीं पाठविण्याची कृपा करावी. श्री० वाघोजीराजे शिर्के, श्री० मनाजी कुवरजी राजे शिर्के हें मनावर घेतील का ?

ग्रंथ कर्ता.

दक्षिणी व हबशी सैनिकांनीं प्रवेश करण्याचें कबूल केलें नाहीं. त्यामुळें ते बाहेरच राहिले व तुजार हा शिर्क्यांच्या मसलतीप्रमाणें त्या खेळणा प्रांताच्या अवघड व बिकट जंगलांत शिरला. तेथील हवा विषारी असल्यामुळें तुजारचे बरेच सैनिक आजारी पडले. अशा स्थितींत शिर्क्यांनीं शंकररायाबरोबर गुप्त कारस्थान करून आपल्या फौजेसह तुजारवर हल्ला करून त्याची दाणादाण उडविली. तुजारही मारला गेला. कांहीं लोक बांचले ते बाहेरच्या दक्षिणी फौजेस मिळाले व ते सर्व चाकणच्या किल्ल्यावर आले. ह्या हकीकतीनंतर इ० स० १४७३ मध्यें महंमद् गवान हा पहाडीपायदळ घेऊन खेळणा प्रांतावर आला; त्यावेळीं सर्वत्र हिंदु राजांनीं त्याजबरोबर दोन वर्षे टक्कर दिली. परंतु शेवटीं खेळणापरगणासुद्धां सर्व कोंकणपट्टी ब्राह्मणी राजाच्या ताब्यांत गेली. ह्या शंकर राजाचें आडनांव मुळींच प्रचारांत आलेलें नाहीं. हा कोणत्या कुळाचा पूर्वज आहे तें ज्यांस माहीत असेल त्यांनीं आम्हांस कळविल्यास आम्ही त्यांचे अत्यंत आभारी होऊं. याच्याजवळ तीनशें लढाऊ जहाजांचें आरमार असून इराण, अरबस्थान वगैरे देशांतून मुसलमान व्यापारी कोंकणचे बंदरांतून व्यापार करीत. कोंकणांतून आपल्या सत्तेचें निर्मूलन होतांच शिर्के जावळी प्रांतांत जाऊन राहिले. मोरे जावळी प्रांतांत येऊन राहण्यापूर्वी तो प्रांत शिर्क्यांच्या स्वाधीन होता. मोऱ्यांनीं शिर्क्यांस पदच्युत करून त्या प्रांताची सत्ता आपल्या स्वाधीन करून घेतल्यानंतर शिर्के हे घाटमाथ्याचे खालीं, तळकोंकणांत शृंगारपुर म्हणून गांव आहे तेथें सुर्वे* म्हणून सरदार स्वतंत्रतेनें रहात होते. त्यांजकडे जाऊन राहिले.

* शृंगारपुरी दळवी होते असें ग्रँट डफ म्हणतो व व कित्येक बखरकार सुर्वे म्हणून म्हणतात. परंतु आम्हांस जी माहिती मिळाली आहे. तीवरून त्या ठिकाणीं दळव्यांचें प्राबल्य विशेष असावें असें दिसतें. सध्यां शृंगारपुरीं दळव्यांची वाटलेलीं घराणी अस्तित्वांत असून तेथील देवीस, त्या ठिकाणचे वतनदार मानपान देतेवेळीं दळव्यांच्या नांवचा वीडा ठेवण्याचा प्रघात आज बरींच वर्षे अबाधित चालू आहे. हें शृंगारपूर संगमेश्वर तालुक्यामध्यें आहे.

ग्रंथ कर्ता.

पुढें हें शृंगारपुरचें राज्य शिवाजी महाराजांनीं घेतलें त्यावेळीं सुर्व्यांचे कारभारी शिर्के यांजबरोबर मैत्री करून त्यांची कन्या येसूबाई ही संभाजीस केली. व त्यांस गांव व महाल इनाम करून दिले. यानंतरही ह्या शिर्के घराण्यानें मराठशाहीची ततोंपरी सेवा केली. मध्यंतरी संभाजी महाराजांनीं 'शिरकाण' करून बहुतेक शिर्के कुळांतील पुरुषांचा वध केला, तरीही. पुढें राजारामाच्या वेळीं ह्याच शिर्के कुळाचा जिंजीच्या वेढ्यांतून निसटण्याच्या कामीं राजाराम महाराजांस उपयोग झालेला होता. सध्यां शिर्के घराण्याची कोठें वगैरे ठिकाणीं वस्ती असून अद्यापही त्यांचें मराठा जातीमध्यें प्रमुखत्व आहे. हें 'घराणें' महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या पुरातन घराण्यांपैकीं एक असून उच्चपदाचें आहे.

**घाटगे**:—इतर मराठे सरदारांप्रमाणेंच घाटग्यांचें कुळही प्रमुख घराण्यांत मोडतें. हे मूळचे वऱ्हाडदेशाचे राहणारे. मलवडीचे देशमुख. यांस ब्राह्मणी राज्यांतून माण प्रांतांची देशमुखी व *सरदेशमुखी मिळाली. यांचा मूळपुरुष कामराज घाटगे. इब्राहिम आदिलशहानें नागोजीराव घाटगे यांस इ० स० १५७६ त सरदेशमुखी व झुंझारराव हा किताब दिला. कामराज घाटगे यांस ब्राह्मणी राज्यामध्यें एक लहानशी मनसब होती. याशिवायही ह्या घराण्यास विजापूर मधून पुष्कळ जहागीरी मिळाल्या होत्या. व ते आपल्या सैन्यानिशी विजापूरदरबारची नोकरी करीत असत. यांस सर्जेराव, प्रतापराव वगैरे बरेच किताब मिळाले होते. सांप्रत कागल वगैरे प्रांतीं घाटग्यांचीं कुळें राज्यसुख अनुभवीत आहेत. ह्या घराण्यांतील बरेच पुरुष स्वराज्याच्या उपयोगी पडलेले आहेत. श्री. बापुसाहेब घाटगे कागलकर यांनी आपल्या पूर्वजांचा इतिहास लिहिण्याचें कार्य मनावर घेऊन त्या संबंधींचें कागद पत्र पाठविल्यास, आम्हांस बरेंच प्रोत्साहन येणार आहे. श्रीमंत इकडे लक्ष देतील काय?

**अलिजाबहाद्दर शिंदे**:—हें एक मराठ्यांचें प्रसिद्धीस आलेलें कूळ आहे. ह्या घराण्याचा मूळपुरुष राणोजी शिंदा. हा साताऱ्याजवळील कन्हेरखेड म्हणून

* सरदेशमुखास वसूलाचे शेंकडा दहा पर्यंत मिळण्याची पद्धत औरंगजेबाच्या कारकीर्दीमध्यें होती.

फूट नोट ग्रांटडफ हिस्टरी. पेज. ७६.

गांव आहे तेथील पाटील होता. यानें स्वसामर्थ्यावर उदयास यावें म्हणून नांगर व धोंगडी फेंकून देऊन बाळाजीबाजीराव पेशव्यांचा आश्रय धरिला. बाळाजीच्या मृत्यूनंतर बाजीराव पेशव्याच्या खास तैनातींत त्याचा शिरकाव झाला, व थोडक्याच काळांत त्याच्या स्वाधीन पेशव्यांची खास पागा झाली. इ० स० १७२५ त तो येवढ्या योग्यतेस चढला कीं, तो सर्व सेनानायकांत अग्रणीय झाला. हिंदुस्थानांत स्वारी करून मराठ्यांनीं जो मुलुख काबीज केला त्यांपैकीं सुमार अर्धा यांस फौजेच्या खर्चाकरितां जहागीर नेमून देण्यांत आला होता. बहुतेक अर्धा माळवा त्यांच्या ताब्यांत होता. ह्या कुळांतील प्रसिद्ध मुत्सद्दी व वीराग्रणी महादजी शिंदे यांच्यासारखा पराक्रमीपुरुष शिवाजी महाराजांनंतर कोणीही झाला नाहीं. ह्यांच्या साहसाचें कौतुकच करावें असें वाटतें ! त्यांच्या विरुद्ध बाजूस त्यावेळीं जर नानाफडणविसासारखा धूर्त व कुत्सबुद्धीपुरुष पेशव्यांच्या दरबारीं नसता तर सर्व मराठशाहीची सत्ता महादजीच्या एकट्याच्याच हातीं आली असती. यानें आपल्या अश्रुतपूर्व पराक्रमानें दिल्लीपद बादशाहीसही शह दिला. ह्या घराण्याची पुढील कारकीर्दही मनोरंजक असून इतिहासावर प्रकाश पाडणारी आहे. ती शिंदे घराण्यांची स्वतंत्र कैफियत प्रसिद्ध करण्याचीं साधनें श्री० अलिजाबहाद्दर माधवराव शिंदे यांनीं मनावर घेऊन दिल्यास इतिहासज्ञांस पुष्कळच फायदा होऊन ह्या घराण्याची खरी मर्दुमकी दृष्टोत्पत्तीस येणारी आहे.

**पवार**—हें कूळ फार पुरातन असून सर्वत्रांस वंदनीय असें आहे. प्रमार उर्फ पवार यांची माहिती ज्यांस नाहीं असा पुरुषच विरळा ! विक्रमादित्य, राजा भोज वगैरे महान पुरुष ज्या कुळांत उत्पन्न झाले तेंच हें कूळ होय. ह्या घराण्याची एक शाखा, दक्षिणेंत येऊन पुण्याजवळ ठाणें देऊन राहिली. पुण्याच्या ईशान्येस मलठाण म्हणून खेडें आहे. तेथील पाटिलकी शिवाजी पवार ह्या पुरुषाकडे होती. शिवाजीला कृष्णाजी या नांवाचा एक पुत्र होता. तो व त्याचे पुत्र बाबाजी, रायजी, केरोजी हे शिलेदार होते. बाबाजीचे पुत्र संभाजी व मालोजी हे छत्रपती शिवाजीमहाराजांकडे सरदार होते. संभाजीचे तीन पुत्र उदाजी, आनंदराव, व जगदेवराव हे शाहूमहाराजांच्या पदरीं होते. उदाजी पवार हा असामान्य पुरुष झाला. त्यास सेनाबसहस्र असें म्हणत. उदाजीचें व बाजीराव पेशव्यांचें वैमनस्य सुरू होऊन त्यानें त्यास कैदेंत ठेविलें. व त्याचा भाऊ आनंदराव यास सरदारी दिली. यास माळवा व गुजराथ या प्रांतांच्या वसुलीच्या कामावर नेमिलें. तो धारेस जाऊन राहिला व त्यानें तेथें संस्थान स्थापन केलें. वरील बाबाजी पाटलाचे मुलगे संभाजी व काळोजी हे शाहूमहाराजांच्या पदरीं सरदार होते. पैकीं काळोजीला कृष्णाजी, तुकाजी, जिवाजी आणि मानाजी असे चार पुत्र होते. पैकीं तुकाजी व जिवाजी हे बाजीराव पेशवे यांजबरोबर इ० स० १७२५ मध्यें माळव्यावर स्वारी करावयास गेले होते. त्या वेळीं जो प्रांत मिळाला त्यांतून देवास, सारंगपूर, अलोट, व इतर मिळून २४२९७० रुपये वसुलाचे महाल ह्या उभयतांस दिले. हे देवास संस्थान उभय बंधूंस मिळाल्यामुळें प्रथम तें समाईक होतें; परंतु पुढें एकमेकांत वितुष्टें आल्यामुळें त्यांनीं मुलुख वाटून घेतला. परंतु पुढें त्यांच्या वंशजांच्या मनांत एकत्र रहावें असें आल्यावरून अमल एकच चालू झाला व मानपान वसूल वगैरे निमेनिम वाटून घेऊं लागले. व हीच पद्धत अद्यापहीचालू आहे. ह्या कुळाची धार देवास ह्या ठिकाणीं दोन संस्थानें आहेत. श्री० तुकोजीरावमहाराज सेनासप्तसहस्र हे आपल्या माननीय घराण्याची कैफियत लिहिण्याचीं साधनें देतील तर पवार घराण्याची खरी कर्तबगारी इतिहासज्ञांस फायदेशीर होईल धार व देवासचे महाराज इकडे लक्ष देतील काय ?

**सेनापती दाभाडे**:—हें एक मराठशाहीमध्यें उदयास आलेलें मराठ्यांचे कूळ आहे. यांचा मूळ पुरुष येस पाटील बीन बाज पाटील दाभाडे मोकदम मौजे तळेगांव, हे श्रीशिवाजी महाराजांच्या पदरीं हुजरे होते व त्यांचे चिरंजीव खंडेराव दाभाडे हे सरदार होते. यांजकडे किल्ले पन्हाळगडची व्यवस्था सांगितलेली होती. राजाराम महाराजांच्या संकटकालीं हे मराठशाहीच्या बरेच उपयोगी पडले होते. खंडेराव दाभाडे हे फारच पराक्रमी निपजले. त्यांस सेनाखासखेल हें पद देण्यांत आलें होतें. छत्रपति शाहू महाराजांच्या वेळीं ह्या दाभाडे कुळांनीं ताराबाई व छत्रपति शाहू यांचा समेट करून देण्यासंबंधानें बरीच मेहेनत घेतलेली

आहे. पुढें बाळाजी विश्वनाथ यांस प्रधानकीचीं वस्त्रें दिल्यानंतर खंडेराव दाभाडे यांस सेनापतीचीं वस्त्रें देण्यांत आलीं. यांच्या मृत्यूनंतर शाहू महाराजांनीं त्रिंबकराव दाभाडे यांस सेनापतीचीं व यशवंतराव दाभाडे यांस सेनाखासखेलचीं वस्त्रें दिलीं. सेनापती त्रिंबकराव दाभाडे व बाजीराव पेशवे यांची गुजराथच्या उत्पन्नावरून चुरस वाढून लढाई झाली व तींत त्रिंबकराव मृत्युमुखीं पडले. त्यानंतर सेनापती पदाचीं वस्त्रें यशवंतराव दाभाडे यांस मिळालीं व बाबुराव दाभाडे यांस सेनाखासखेलचीं वस्त्रें दिलीं. बाबुराव दाभाडे हे मर्द होते. सुरतेवर स्वारी करून त्यांनीं तेथील नबाबास आपल्या अल्प वयामध्यें जवळ मनुष्यबळ नसतांही कसें जेरीस आणिलें व आपला कार्यभाग साधिला हा कथाभाग फारच मनोरंजक आहे. ह्या शौर्योत्पादक कामगिरीबद्दल दाभाडे यांस छत्रपतिनीं सोन्याचा तोडा पायांत घालावयास दिला व अबदागीर दिली. यानंतर गुजराथच्या स्वारीमध्यें, प्रसिद्ध उमाबाई दाभाडे याही बरोबर होत्या. त्यावेळीं त्या वीर स्त्रीनें प्रतिज्ञा करून अहमदाबाद काबीज केलें. ही कामगिरी पाहतांच श्रीमंत शाहू छत्रपतीनीं, "उमाबाई बायकोमाणूस असतां शिपाईगिरीची शर्त केली त्यापेक्षां इजला बक्षीस काय द्यावें ? गांव जाहगिरी व पदें पुरुषांस दिलींच आहेत त्यापेक्षां यांस जास्त काय द्यावें ?" असे उद्गार काढून बाईस "सोन्याचे तोडे पायांत घालावयास दिले." गुजराथचा बंदोबस्त पिलाजी गायकवाड यांजकडे सोंपविला. पिलाजी गायकवाडच्या मृत्यूनंतर सेनापती यांनीं दमाजी गायकवाड यांस सुभ्याचीं वस्त्रें दिलीं. पुढें ह्या गुजराथच्या प्रांताच्या उत्पन्नामध्यें पेशवे व गायकवाड यांनीं मिळून तोड काढण्याचा प्रयत्न केला पण तो शाहूच्या अमदानीमध्यें फळास आला नाहीं. यानंतर अनेक राजकारणें होऊन दाभाडयांचा गुजराथेवरील कबजा निघून गेलेला आहे व ह्या सर्वांस पेशवे कारणीभूत झालेले आहेत. हें दाभाडयांची कैफियत प्रसिद्ध झाल्यानंतर कळून येईल. दाभाडे सेनापती यांच्या घराण्याचा सर्व पत्रव्यवहार प्रसिद्ध झाल्यास त्यावेळची पेशव्यांची कारकीर्द प्रकाशांत येईल. सध्यांचे श्रीमंत दाभाडे आपली कैफियत व पत्रव्यवहार प्रसिद्ध करावयास देतील तर महाराष्ट्रेतिहासाचा एक अपूर्ण भाग पूर्ण होईल अशी आमची खात्री आहे.

**सेनाखासखेल गायकवाड**—हें इतिहासप्रसिद्ध मराठ्यांचें कूळ पूर्ण प्रख्यातिस आलेलें आहे. यांचा मुळपुरुष दमाजी गायकवाड हा खंडेराव दाभाडे सेनापति यांजकडे नोकर होता. याचा बाप केरोजी हाही दाभाडयांकडेच होता. दमाजी गायकवाडांचें शौर्य साहस इत्यादि गुण अवलोकन करून खंडेराव दाभाडे सेनापति यांनीं शाहूमहाराजांजवळ त्यांची शिफारस करून, समशेरबहादुर असा किताब व सरनोबतीच्या पदावर चढविलें. त्यानें बाळापुरच्या लढाईमध्यें पुष्कळच मर्दुमकीचीं कामें केलीं. हा १७२० मध्यें वारला याचा पुत्र पिलाजी गायकवाड हाही शूर पुरुष होता. यास त्रिंबकराव दाभाडयांच्या मृत्यूनंतर यशवंतराव सेनापतीचा मुतालिक नेमिलें. यानें सेनाखासखेल हा किताब मिळविला. पिलाजीच्या मरणानंतर दमाजी गायकवाड यांस सरदारीचीं वस्त्रें मिळालीं. शाहूमहाराजांनीं यांस वचन देऊन त्याप्रमाणें वर्तन न केल्यामुळें; हे धन्यास डाव्या हातानें मुजरा करूं लागले. पेशवाईच्या वेळचा इतिहास ह्या घराण्याच्या मर्दुमकीनें भरलेला आहे. सध्यां ह्या कुलांतील कीर्तिमान सत्पुरुष श्री० सयाजीराव गायकवाड हे गुर्जराधिपती आहेत त्यांच्यासारखा महात्मा यावेळीं तरी दुर्लभच होय ! विद्यार्जनाकडे यांचे लक्ष असून ते त्यासाठीं अहर्निश उद्योग करीत असतात. त्यांस आमची एवढीच विनंती आहे कीं, त्यांनीं आपल्या संस्थानचा खरा इतिहास लिहिण्याचीं साधनें आमच्या स्वाधीन करावीं. ह्या विनंतीचा महाराज अव्हेर करणार नाहींत अशी आम्हांस आशा आहे.

**भोंसले नागपूरकरः**—हें घराणें महाराष्ट्रामधील मराठ्यांच्या घराण्यापैकीं असून बरेंच योग्यतेस पोहोंचलेलें व कीर्तिमान असें आहे. रघोजीराजे भोंसले हे आपणांस मराठशाहीचे अंकित न म्हणविता स्वतंत्र म्हणवीत व पेशव्यांस मुळींच जुमानित नसत. रघोजी सारखा पराक्रमी पुरुष विरळा. यानें बंगालपर्यंत मराठ्यांचा दरारा बसविला होता. खानदेश व वऱ्हाड ह्या प्रांतामध्यें त्यांचें सर्वस्वी वर्चस्व होतें. यांस सेनासाहेब सुभा असें म्हणत. यांचा पत्रव्यवहार उपलब्ध झाल्यास, पेशवे व भोंसले या घराण्यासंबंधाचीं बरींच राजकारणें उघडकीस येतील. सध्याचे श्री. रघोजीराजे भोंसले व श्री. लक्ष्मण राजे भोंसले इकडे लक्ष देतील काय !

**कदम बांडे:**—हें घराणें प्रथम विजापुरास होतें. ते तिकडून ताराबाई साहेबांच्या अमदानीमध्यें दक्षिणेंत आलें. यांचे अमृतराव कदम, त्रिंबकराव कदम, संताजी कदम हे पुरुष प्रख्यातिस आलेले होते. यांनीं सेनापती दाभाडे यांस गुजराथ प्रांत काबीज करण्यासंबंधानें बरीच मदत केलेली आहे. त्यावरून त्यांस जहागीर देण्यांत आली. ह्या पुरुषांची मर्दुमकी प्रकाशांत येणें अत्यंत अगत्याचें आहे. सध्या हें घराणें, कोपरली, ठाणें व रनाळे याठिकाणीं आहे कदमराव मराठा कुळांच्या इतिहासांत प्रसिद्धीसाठीं आपली हकीकत पाठवितील अशी आशा आहे.

* **उफळे ऊर्फ चव्हाण:**—औरंगजेब बादशहाच्या पदरीं हें घराणें होतें. यांनीं सातारा काबीज करतेवेळीं मोठ्या शर्तीनें लढून एक बुरूज काबीज केला. यावरून त्या बुरुजास डफळ्यांचा बुरुज असें म्हणूं लागले. हे मूळचे चव्हाण पण यांस डफळापूरची देशमुखी मिळाल्यामुळें डफळापूर ह्या गांवावरून डफळे असें म्हणूं लागले. डफळापूर हें गांव विजापुराच्याजवळ आहे. शेट्याजीराव राजे चव्हाण डफळे देशमुख यांनीं जत, करजगी बरडोल व हानवड असे चार परगणे जहागिरी दाखल मिळविले. ह्या शूर घराण्याचें संस्थान जत येथें असून तेथील संस्थानिक श्रीमंत रामराव अमृतराव डफळे हे आहेत.

**माने:**—हें घराणें विजापुरच्या दरबारीं नामांकित शिलेदार होतें. हे म्हसवडचे देशमुख. ह्या घराण्याची हकीकत आमच्याकडे आमचे मित्र श्रीयुत आनंदराव हैबतराव माने यांजकडून आलेली असून ती लवकरच प्रसिद्ध होईल. परंतु ज्यांच्या संग्रहीं ह्या घराण्याची हकीकत असेल ती त्यांनीं पाठविण्याची कृपा करावी. श्री. दादासाहेब माने, श्री. राजाराम माने रहिमतपूरकर व श्री. लक्ष्मणराव माने मानकरी. बडोदा. हे इकडे लक्ष देतील काय?

‡**घोरपडे:**—हें प्रमुख कूळ ब्राह्मणी राज्यामध्यें उदयास आलें. ब्राह्मणी राज्याचे पांच विभाग झाल्यानंतर हें विजापूरकरांच्या पदरीं राहिलें. यांचें मूळचें उपनांव भोंसले. परंतु पुढें ह्या कुळांतील एका पुरुषाच्या पराक्रमावरून यांस "घोरपडे" म्हणूं लागले, हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, "एकेवेळीं विजापूरचे बादशहाचे कारकीर्दीत, ह्या घराण्यांतील एका पुरुषानें कांहीं फौजेनिशीं कोंकणांतील एक बळकट किल्ला सर करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो किल्ला अत्यंत दुर्गम असल्यामुळें त्यास हस्तगत होईना. म्हणून त्यानें घोरपडीच्या कमरेस दोर बांधून ती किल्ल्यावर सोडून दिली, आणि आपण दोराच्या साह्यानें त्या किल्ल्यांत मोठ्या शिताफीनें चढून जाऊन तो जिंकून घेतला, ह्या मर्दुमकीमुळें विजापूर दरबारांत ह्या पुरुषाचा मोठा लौकिक होऊन, त्यांस कांहीं प्रांतांची देशमुखी देण्यांत आली व त्यावेळेपासून ह्या घराण्याचें मूळ नांव बदलून तें घोरपडे असें प्रचारांत आलें, हें घराणें पुष्कळ जुनें असून यांची 'कापसीकर,' 'सोंडूरकर,' 'मुधोळकर,' 'गजेंद्रगडकर,' दतवाडकर अशीं अनेक घराणीं इतिहासांत प्रसिद्ध आहेत, पैकीं कापसीकरांस अदिलशाही मधून 'अमीर–उल्–उमराव' हा किताबही मिळाला होता, मुधोळकर बाजी घोरपडे हा शहाजीप्रमाणेंच विजापूरकरांचा विश्वासू सरदार होता,

मूळ हें घराणें उदेपूरच्या शिसोदिया वंशाशीं संबंध दर्शवीत आहे, श्री छत्रपति शिवाजी महाराज यांच्या कुळांशीं निकटचें संबंधीं आहे. मेवाडच्या लक्ष्मणसिंग राण्याचा मुलगा अजयसिंग त्याचा सज्जनसिंग हा आपणांस गादी मिळत नाहीं असे जाणून दक्षिणेस आला. त्याचा शिवाजी, त्याचा भोराजी, त्याचा देवराज, त्याचा उग्रसेन, त्याचा मालोजी यानेंच घोरपडीच्या साह्यानें कोंकणांतील किल्ला जिंकून घेतला होता व तेथपासूनच ह्या घराण्यास घोरपडे म्हणूं लागले, ह्या मालोजीस चार पुत्र होते, त्यांपैकीं वडील हा मुधोळकरांचा मूळपुरुष होय. दुसरा मुलगा बापाच्या

* या घराण्याची हकीकत आमच्याकडे प्रसिद्धिस्तव आलेली आहे ती लवकरच प्रसिद्ध होईल. ग्रंथकर्ता.

‡ The Kapseekur and Mudholker were known under the Bijapoor government, the former by the nowkus, the latter by the sathkus Ghorepurays—a distinction which both families keep up, but for which they can give no satisfactory reason; the first Ghorepuray that joined Shivajee was one of the former, the Head of the latter is the Patell of a village near Satara.

Foot Note G. D. History Page 73—74.

पूर्वीच मरण पावला होता तिसरा वल्लभसिंग व चवथा सयाजी ह्या सयाजीस एक भोसाजी ह्या नांवाचा पुत्र होता, ह्या भोसाजी नांवावरूनच ह्या कुळांस भोंसले असें म्हणू लागले, ह्या भोसाजीच्याच वंशामध्यें श्री. छत्रपति शिवाजी महाराजांचा जन्म झालेला आहे, वल्लभसिंगाच्या वंशामधून, वाघापूरकर, सोंडूरकर व कापसीकर अशीं तीन घराणीं उपस्थित झालीं. व तीं सर्व विजापुरामध्येंच होतीं, महालोजीनें छत्रपति शिवाजी महाराजांस स्वराज्य संस्थापनेच्या कामीं बरीच मदत केलेली होती. ते पन्हाळ किल्यावर सरनोबत होते. संभाजी महाराजांस ज्यावेळीं कैद करून नेलें त्या गर्दीमध्यें ते वारले. त्यांस संताजी, बहिरजी व मालोजी असे तीन पुत्र होते ह्या तीनही बंधूंच्या कामगिरीसंबंधानें मराठशाहीचा इतिहास पूर्ण भरलेला आहे. प्रसिद्ध संताजी घोरपडे यानें संभाजी महाराजांच्या वेळीं कर्नाटकामध्यें चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मिळवून देण्यासंबंधानें बरीच मेहनत घेतलेली आहे. यांस अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री सेनापति ही पदवी, तसेंच वाघापूर हें गांव इनाम मिळालें होतें. ह्या वाघापूर गांवावरूनच यांस वाघापूरकर असें म्हणूं लागले यांनीं मराठ्यांचें खरें शौर्य प्रगट करून हिंदुपदपादशाहीचा दरारा आसमंतात् फडकविला. औरंगजेब बादशहाच्या लष्करावर छापा घालून त्याच्या डेऱ्याचे सोन्याचे कळस आणल्याबद्दल ह्या तीनही बंधूंस राजाराम महाराजांनीं ' ममलकतमदार ' ' हिंदुराव ' व 'अमीर-उल-उमराव' हे किताब देऊन त्यांच्या मर्दुमकीचें चीज केलें. याच सुमारास यांस सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं. धनाजी जाधव, संताजी घोरपडे ह्या व्यक्तींमुळेंच राजाराम महाराजांच्या वेळीं मराठ्यांचें राज्य टिकलें. ह्या पुरुषांची मर्दुमकी, त्यांचें अचाट धैर्य, त्यांच्या निधड्या छातीचा प्रभाव, त्यांची स्वामिभक्ति, यांमुळेंच त्यावेळच्या भयंकर संकटामध्येंही मराठ्यांचें राज्य टिकलें. नाहीं तर तें केव्हांच रसातळास गेलें असतें. संताजी घोरपड्यासारख्या शूर पुरुषाचा म्हसवडचे देशमुख नागोजीराव यांजकडून खासगी द्वेषामध्यें वध झाला, ही अत्यंत अनुचित गोष्ट झाली. यांच्या मृत्यूनंतर पिराजी घोरपडे संताजीचे चिरंजीव यांस सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं. संताजीचे बंधु हेही अत्यंत पराक्रमी असून, त्यांनीं त्रिचनापल्लीपर्यंत मराठ्यांचा अंमल बसविला होता. त्यांचा मुलगा सिधोजी हाही पराक्रमी असून, त्यानें कर्नाटकांतील बेरड लोकांचें पारिपत्य करून तेथें आपला दरारा बसविला. यानें सोंडूर नांवाचा बळकट किल्ला काबीज करून तो तेथें राहूं लागला, त्यास सोंडूरकर म्हणूं लागले. हेंच घोरपड्यांचें सोंडूर संस्थान होय. शिधोजीस दौलतराव, गोपाळराव, मुरारराव व भुजंगराव असे चार पुत्र होते. त्यांपैकीं दौलतराव हे गजेंद्रगड संस्थानचे अधिपति झाले. गोपाळराव ऊर्फ सुभानराव हे सोंडूरचे अधिपति झाले. तिसरे प्रसिद्ध मुरारराव हे स्वतःच्या कर्तबगारीनें कर्नाटकांत स्वतंत्र राज्य मिळवून प्रख्यातीस आले. त्यांची राजधानी 'गुत्ती' ही होय.यांस गुत्तीकर घोरपडे म्हणतात. हा मुरारराव घोरपडे लहानपणापासूनच पाणीदार होता. त्याच्या अंगीं मराठ्यांचें पाणी वास करीत होतें. यानें कर्नाटकामध्यें फारच मर्दुमकी करून तिकडील प्रांत मिळवून देण्यासंबंधानें मराठ्यांस मदत केलेली होती; त्यामुळेंच शाहूमहाराजांनीं ह्या वीरपुरुषास कर्नाटकाच्या सरदेशमुखीचें वतन बक्षिस देऊन त्रिचनापल्लीच्या किल्याची सुभेदारी सांगितली. यानंतरही ह्या वीर पुरुषानें अनेक पराक्रमाचीं कामें केलेलीं आहेत. ग्रँट डफ, आर्म वगैरे इतिहासकारांनीं मुराररावाच्या कर्तृत्वशक्तीबद्दल अभिमानास्पद शेरे दिलेले आहेत. संताजीच्या मागून ह्या पुरुषानें संताजीच्या तोडीचेच किंबहुना त्यापेक्षांही जास्त शौर्य प्रगट करून इतिहासामध्यें घोरपडे कुलाचें नांव अजरामर केलेलें आहे.*

**वाडीचे सावंत बहादुरः**—हें घराणें सिसोदिया घराण्यापैकीं आहे. हे मूळ होडावडें गांवीं रहात असत. त्या वेळीं कुडाळप्रांतावर-कुडाळदेशस्थ प्रभूंचें स्वामित्व होतें. त्यांचा सेनापति देव दळवी ह्या नांवाचा पराक्रमी पुरुष होता. यानें व सावंत कुलांतील मांग सावंतानें बंड

* 'घोरपडे' घराण्याचा सगतवार इतिहास प्रसिद्ध करण्याबद्दल श्री. चीफ ऑफ 'दत्तवाड' यांजकडून आम्हांस विचारण्यांत आलें आहे. त्याप्रमाणें आम्ही ह्या घराण्याचा इतिहास लवकरच प्रसिद्ध करणार आहों. यांत 'घोरपडे' घराण्याच्या सर्व शाखांचा विस्तारेंकरून इतिहास प्रसिद्ध होईल, त्यावरून घोरपडे घराण्यांतील पराक्रमी पुरुषांची खरी कर्तबगारी दृष्टोत्पत्तीस येईल.

ग्रंथ कर्ता.

करून देसायांची सत्ता हिसकावून घेण्याचा इ०स०१५८० च्या सुमारास प्रयत्न केला; पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं. परंतु देसायांस विजापुरच्या बादशहाकडून मदत मिळून सावंत व दळवी यांचा मोड होऊन ते प्राणास मुकले; व पुढें इ० स० १५९७ च्या सुमारास देसायांचा दुसरा सेनापति नागदळवी यानें पुनः बंड केलें. परंतु त्यावेळींही त्यास यश न येतां तो व त्याचा पुत्र भाम दळवी हे दोघेही ठार मारले गेले. मांगसावंत ज्यावेळीं मारला गेला, त्यावेळीं त्याची बायको गरोदर होती तीस फोंड सावंत हा मुलगा झाला. त्याचा खेम सावंत हा पुरुष पराक्रमी निपजला. त्यास माणगांव तर्फेची नायकी मिळाली. पण तो देसाई यांस वसूल देईना आणि दुसऱ्यांकडूनही वसूल घेऊं लागला; त्यावरून त्याजवर म्हामद राजा ह्या नांवाचा एक सरदार विजापुराहून आला. त्यास खेम सावंतानें कैद केलें; पण जीवदान देऊन सोडून दिलें. त्यावरून त्यानें विजापुरीं गेल्यावर बादशहाकडे खेम सावंताची तारीफ केली. त्यावरून बादशहानें खूष होऊन खेमसावंत यांस देशमुखीची सनद दिली, ( इ० स० १६२७ ). खेमसावंतानंतर सोमसावंत, नंतर फोंड सावंत, नंतर लखम सावंत हे देशमुख झाले. याचे पुतणे खेम सावंत हेही अत्यंत शूर होते. ह्या दोघा चुलत्या-पुतण्यांनीं कुडाळ देशस्थ प्रभूंची सत्ता आपल्या शौर्याच्या प्रभावेंकरून नाहींशी केली. याच सुमारास श्री-शिवाजी महाराजांचा पराक्रमरवि उदयास येत होता. त्यांनीं बहुतेक कोंकणपट्टी काबीज करण्याचा सपाटा आरंभिला. त्या वेळीं लखम सावंत यांनीं विजापूरच्या बादशहाच्या अनुमतीनें महाराजांकडून कोंकणप्रांत सोड-वून घेण्याचा हुकूम आणविला व बादशहांनीं त्यांच्या मदतीस खवासखान नांवाचा सरदार १०००० फौजे-निशीं पाठविला आणि मागावून बाजी घोरपडे मुधोळकर हे १५०० स्वारांनिशीं येत होते; इतक्यांत त्यांजवर शिवाजी महाराजांनीं हल्ला करून बाजी घोरपडे व त्यांचे बंधु यांस मारिलें व खवासखानाचाही पराभव केला. त्यावेळीं सावंत पोर्तुगीज लोकांच्या आश्रयास राहिले. पण पोर्तुगिजांनीं शिवाजी महाराजांबरोबर सख्य जोड-ल्यामुळें त्यांचा निरुपाय झाला व ते महाराजांचे अंकित झाले. त्यावेळीं महाराजांनीं सावंताचे सरदार राम दळवी व तान सावंत यांस एक एक हजार स्वारांच्या मनसब-दारीवर ठेवून ही निधां पराक्रमी वीरांची जूट विस्क-ळीत केली. (इ० स० १६५९) यानंतरही ह्या घराण्यामध्यें अनेक भानगडींचा इतिहास प्रचारांत आलेला आहे. कुडाळ देशस्थ प्रभूंचा समूळ उच्छेद केल्यानंतरच ह्या घराण्याकडे वाडीची देशमुखी स्थिरावली. ह्या घरा-ण्यांतील खेमसावंत, ह्या पुरुषानें सुंदरवाडी शहर वस-विलें. वाडकरांच्या पदरीं कोंकणपट्टीतील, ३०० सर-दार होते. त्यांपैकीं सिदसावंत भोंसले, नार सावंत पेंडूरकर, नाईक साटम, भिरवंडेकर व नाटळकर, मसू-रकर, पाटणकर, तांबुळकर देसाई, प्रभावळीकर; हेवाळकर, उपरकर, परमेकर देसाई, तळगांवकर दळवी, होडावडेकर, मानगांवकर, माझगांवकर, नळवडेकर दळवी भोंसले, सुभराबराणे, जांबोटकर देसाई, नडेकर देसाई, वार्वेकर सावंत, वगैरे कोंकणपट्टीतील बहुतेक मराठे सरदार सावंतवाडीकरांच्या पदरीं होते. त्यांच्या वंशाजांजवळ त्यावेळच्या पुरुषांच्या कर्तबगारीचे कागद पत्र जरूर असले पाहिजेत; ते त्यांनीं, आपआपल्या घराण्याचा इतिहास लिहिण्यास दिल्यास अभार होतील. सांप्रत हें संस्थान उत्तम स्थितीमध्यें असून, त्याचे अधिपति श्रीमंत श्रीरामसावंत ऊर्फ रावसाहेब हे आहेत.

**दळवीः—**हें कूळ विजापुरच्या दरबारीं चांगलें प्रसिद्धीस आलेलें होत. हे मूळचे पवार. यांच्या एका पुरुषाच्या आधिपत्याखालीं बरेंच सैन्य असून त्यानें परा-क्रमाची शर्थ केल्यामुळें, यांस–दळवई–दळवी असें म्हणूं लागले. बहुतेक सेनापतीस दळवी असें म्हणतात. म्हैसूरच्या नंदराजास दळवई म्हणत असत. जो दळाचा नायक तो दळवी किंवा प्रो. भागवत यांनीं व्युत्पत्ति केल्याप्रमाणें दळ–म्हणजे सैन्य व वी–म्हणजे वाग-विणारा तो दळवी होय. सुप्रसिद्ध मुरारराव याच्या हाताखालील फौजेचें आधिपत्य, सरदार बाजी दळवी यांजकडे होतें. हे दळवी चंद्रराव मोरे ज्यावेळीं जावळीस आले त्या वेळीं, त्यांजबरोबर बादशहाच्या हुकमानें जावळीस येऊन राहिले. व त्यांनीं आपल्या अंगच्या मर्दुमकीनें जावळी प्रांतीं मोऱ्यांची सत्ता दृढ करण्याचा प्रयत्न केला. यावेळीं कोंकणपट्टीचा बहुतेक प्रांत चंद्रराव मोरे यांनीं काबीज केलेला होता. त्याचवेळीं शृंगारपूर हें शहर दळव्यांच्या स्वामित्वाचें झालें असलें पाहिजे. ज्यावेळीं हे विजापुराहून निघाले, त्यावेळीं त्यांस मुरार-रावांनीं तळकोंकणांत शिरून महाडच्या बाजूचा निजाम-

शाहीचा मुलूख जिंकण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें बाजी दळवी यांनीं निजामशहाच्या कोंकणप्रांतीच्या सुभेदाराचा पराभव करून बहुतेक कोंकणचा भाग काबीज केला. त्याचवेळीं शृंगारपुरही काबीज केलेलें असलें पाहिजे. कारण शृंगारपुरीं दळव्यांचें राज्य बरींच वर्षें अस्तित्वांत असल्याबद्दल आधार मिळतो. निरनिराळ्या बखरकारांनीं शृंगारपुरीं सुर्वे होते असें म्हटलें आहे तथापि या बाबतीमधील ग्रँटडफचें शृंगारपुरीं दळवी यांचें राज्य होतें हें म्हणणें सयुक्तिक असून भरंवसा ठेवण्यालायक दिसून येतें. कारण आम्ही जो तपास केला आहे त्यावरून शृंगारपुरीं म्हणजे ज्या शहरास हल्लीं निवळी असें म्हणतात तेथें दळवी या उपनांवाचीं बाटलेलीं मुसलमानांचीं घराणीं आहेत. सदर निवळी हें गांव संगमेश्वर तालुक्यांत आहे. तेथें श्रीभवानी देवीचें मंदीर असून, तेथील रहिवासी लग्न कार्य वगैरे प्रसंगीं दळवी यांच्या वंशाच्या नांवें विडा ठेवितात हा विडा ठेवण्याचा सांप्रदाय अद्यापही रूढ आहे. ह्या विवेचनावरून शृंगारपूरकर दळवी यांचेंच राज्य शृंगारपुरीं असलें पाहिजे असें अनुमान बांधावयास मुळींच हरकत नाहीं. बाजी दळवी यांनीं तळकोंकणांतील निजामशाहीची सत्ता संपुष्टात आणल्याचें निजामच्या दरबारीं समजतांच तिकडून फौज पाठविण्यांत आली व तिनें बाजी दळवी याचा पराभव करून त्यास ठार मारलें. याच संधीस दळवी कुटुंबास बाटविण्यांत आलें असलें पाहिजे. त्यावेळीं जी पळापळ झाली त्यावेळीं हें दळवी यांचें कुटुंब फरारी होऊन त्यांनीं कोंकणपट्टीमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं वास्तव्य केलेलें असावें. सध्यां महाड कसबें विन्हेरे येथें एक घराणें असून दुसरें तळगांव येथें आहे. हीं दोन्हीं घराणीं शृंगारपूरकर दळव्यांचींच असलीं पाहिजेत. असें आमचें अनुमान आहे. शृंगारपुराहून दळव्यांच्या सत्तेचें उच्चाटण होतांच ते सावंतवाडीकरांच्या आश्रयानें स्वतंत्रपणें राहिलेले असावे. व तेथें सुर्वे यांचें राज्य झालें असावें. तळगांवकर दळवी यांची जी पूर्वपरंपरा आमच्या माहीतींत आहे तीवरून त्यांनीं शृंगारपुरचें स्वामित्व हरण होतांच तळगांव, पेंडूर, बाव बांबोळी वगैरे बारा गांवावर सत्ता मिळविली होती. त्या त्या ठिकाणीं त्यांचें सत्तादर्शक चिन्ह अस्तित्वांत आहे. पुढें वाडीकर सावंत व शृंगारपूरकर दळवी यांनीं श्रीशिवाजी महाराजांस आदिलशहाच्या वतीनें बराच त्रास दिलेला होता. परंतु महाराजांच्या सद्दीपुढें त्यांचें कांहींच चाललें नाहीं व ते ज्यावेळीं सावंतवाडीकरांबरोबर महाराजांचा तह झाला, त्यावेळीं महाराजांचे अंकित झाले. हा अंकित होणारा शृंगारपूरकर राम दळवी हा होय. पुढें तळगांवकर दळव्यांच्या पुरुषांनीं सावंतवाडीकरांच्या अमदानीमध्यें बरीच मर्दुमकीचीं कामें केलेलीं आहेत. नारदळवी, मदनाजी दळवी हे पुरुष सावंतवाडीकरांच्यापदरीं सरदार असून, त्यांनीं वाडकरांची किती तरी सेवा केलेली आहे. परंतु त्या सेवेचा मुळींच उपयोग झाला नाहीं, हें तळगांवकर दळव्यांची सारी हकीकत आम्हीं ज्यावेळीं प्रसिद्ध करूं त्यावेळीं अवलोकनांत येईल. सांप्रत विजापुर शहरीं तळगांवकर दळव्यांचा संबंध दर्शविणारीं दोन घराणीं अस्तित्वांत आहेत. त्यांचा व यांचा संबंध आहे हें कागदोपत्रीं सिद्ध आहे. तसेंच जावळीप्रांतीं देशमुख दळव्यांचें वास्तव्य आहे; ते तेथें इनामदार आहेत. तसेंच विन्हेरें मुक्कामीं दळव्यांचीं घरें असून ते त्या गांवचे खोत आहेत. जानवलकर दळवी यांचीही माहिती कळणें अगत्याचें आहे. दळवी कुळाची सारी मर्दुमकी कळावयास प्रत्येक दळवी कुळांतील पुरुषानें आपआपल्या संग्रहीं असलेले कागद पत्र पाठविल्यास आभार होतील. आमच्या ह्या विनंतीचा आमचे बंधु अव्हेर करणार नाहींत अशी आम्हांस आशा आहे.

**आंग्रे:**—हें प्रसिद्ध कुळ मराठ्यांच्या अमदानीमध्यें उदयास आलें. पुण्याच्या पश्चिमेस तीन कोसांवर आंगरवाडी येथील हे राहणारे असल्यामुळें यांचें पूर्वीचें संकपाळ हें नांव बदलून आंग्रे असें पडलें. यांचा मूळ पुरुष तुकोजी संकोजी संकपाळ, हे श्रीशिवाजी महाराजांच्या पदरीं राहून आरमार, आरमार दारूण सुवर्णदुर्ग किल्ल्याचे सुभे अचलोजी मोहिते यांच्या पदरीं राहिले. पुढें सुवर्ण दुर्गावर जंजिरेकर सिद्द्याची स्वारी आल्यावेळीं, अचलोजी मोहिते कच खातात असें पाहून तें वर्तमान महाराजांस कळविलें व आपण पूर्ण जोमानें लढून किल्ला राखिला. ही मर्दुमकी अवलोकन करून पुढें राजाराम महाराजांनीं आरमारचा सुभा आंग्रे यांस दिला, तसेंच पुढील शाहूमहाराजांच्या कालीं, राजाराम महाराजांनीं आंग्रे यांची मर्दुमकी अवलोकन करून त्यांस 'सरखेल' हा किताब व कोंकणचा

सुभा सांगितला. तेव्हां ते विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग ह्या ठिकाणीं जमाव करून समुद्रावर व त्या लगतच्या कोंकणप्रांतावर हुकमत चालवूं लागले. यांस पुढें शाहूमहाराजांनीं विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, कुलाबा, निकटगड वगैरे सत्तावीस किल्ले, चौतीस लक्षांचा मुलूख व आरमारचा सुभा व सरखेल हें पद दिलें होतें, यानंतरच्या आंग्रे यांच्या घराण्यामध्यें संभाजी आंगरे व मानाजी आंगरे हे फार प्रख्यातीस आले होते. ह्या उभय बंधूंचें वैषम्य सुरू होऊन पुष्कळ भानगडी उपस्थित झाल्या परंतु छत्रपतीनें मानाजी आंगरे यांस संस्थान कुलाब्याची व्यवस्था व वजारत महा हा किताब दिला व संभाजी आंगरे यांस विजयदुर्ग संस्थानचा अधिकार सांगितला. कोंकणपट्टीचा बहुतेक इतिहास आंगरे यांच्या मर्दुमकीनें भरलेला आहे. आंगरे यांची मर्दुमकी अवर्णनीय अशी आहे. उपलब्ध साधनें प्राप्त झाल्यास ह्या कुळाची स्वतंत्र कैफियत लिहून प्रसिद्ध करण्यांत येईल.

**थोरातः**—हें कूल मराठशाहीमध्यें उदयास आलें. शकोजीराव थोरात हे छत्रपतीकडे नोकर होते त्यांनीं एके प्रसंगीं अचाट कामगिरी केल्यावरून त्यांस दिनकरराव हें नांव दिलें व नवलक्षांच्या सनदा दिल्या. ह्या कुळांतील पुरुषांनीं स्वराज्याची बरीच सेवा केलेली आहे. सध्यां हें कूल अहमदनगर जिल्ह्यामध्यें आहे.

**भोंसले अक्कलकोटकरः**—ह्या घराण्याचें नांव लोखंडे. श्रीशाहूमहाराजांनीं यांस पालक पुत्र घेतल्यावरून यांस भोंसले असें नांव पडलें. फत्तेसिंग भोंसले यांच्या वेळीं बरींच महत्वाचीं कार्यें झालेलीं आहेत. तीं सर्व प्रसिद्ध झाल्यास इतिहासज्ञांस पुष्कळ फायदा होईल.

**दळवी भोंसलेः**—हें मराठ्यांचें कूलही आपल्या सेनाधुरंधरत्वानें प्रकाशांत आलेलें आहे. हे मूळचे भोंसले. हे कुडाळप्रांतावरील प्रभू देसायांच्या सत्तेच्यावेळीं त्यांजकडे सेनानायक होते. त्यावरूनच त्यांस दळवी म्हणूं लागले. वाडकर सावंत व होडावडेकर दळवी यांचा जवळचा संबंध आहे. यांचे देवदळवी नागदळवी, दौलतदळवी, रघुनाथदळवी, वगैरे पुरुष सावंतवाडीदरबारच्या अमदानीमध्यें उदयास आलेले आहेत. ह्या पुरुषांची खरी कर्तबगारी ह्या वंशियांकडून येणाऱ्या कागदपत्रांवर अवलंबून आहे. दळवी भोंसले सेनापती इकडे लक्ष देतील काय?

**जाधव ऊर्फ साटमः**—हें सुप्रसिद्ध जाधव घराण्याच्याशाखेचें एक मराठ्यांचें प्राचीन घराणें आहे. ह्यांनीं यवनांच्या कारकीर्दीमध्यें अचाट पराक्रम करून साठ पठाण मारल्यावरून यांस साटम हा किताब मिळाला आहे. हा किताब मिळाल्यापासून ह्या घराण्याचें पूर्वीचें जाधव हें नांव लुप्त होऊन साटम हें नांव प्रचारांत आलें. ह्या पुरुषांनीं पुढें राजाराम महाराजांच्या कारकीर्दी पासून स्वराज्याची अप्रतीम सेवा सेवा केलेली आहे, सावंतवाडीमध्येंही नाईक साटम यांच्या हाताखालीं २८७ लोकांची तुकडी होती. शिवाय हे पेशव्यांस अनेक राजकारणांमध्यें उपयोगीं पडलेले आहेत. ह्या घराण्याच्या पुरुषांनीं आडवल, त्रिंबक, बांदिवडें. शिरगांव, कोईळ वगैरे ठिकाणीं आपल्या मर्दुमकीनें वतनें मिळविलीं आहेत. यांस *नाईकवाडी असें म्हणतात. ह्या कुळांतील पुरुषांनीं आपल्या कुळांतील पुरुषांची खरी मर्दुमकी प्रकाशांत यावी म्हणून आपल्या संग्रहीं असलेले कागदपत्र व जुनी वंशावळी आमच्या स्वाधीन केलेली आहे, तीं सर्व पत्रें सुमारें १५० होतील. त्या सर्व पत्रांमध्यें त्यावेळची साटम घराण्याच्या पुरुषांची मर्दुमकी कीं, जी आज कोणत्याही इतिहासामध्यें प्रकाशित झालेली नाहीं ती लिहिलेली आहे, लवकरच आम्ही साटम घराण्याची स्वतंत्र कैफियत प्रसिद्ध करणार आहों तीवरून साटमांच्या घराण्यांतील वीर पुरुषांचें अचाट शौर्य दृष्टोत्पत्तीस येईल.

**वाघोलीकर व वाडीकर जाधवरावः**—हें जाधवांचे एक घराणें, सुप्रसिद्ध पिलाजीराव जाधवांनीं अत्यंत विख्यातिस आणिलें आहे, पिलाजीराव जाधवरावासारखा धाडसी सेनापती पेशव्यांस अनुकूल

* Naikwaree, which is now used to denominate a particular officer, a sort of hereditary land measurer on the village establishment, was formerly a title of respect, like the present Jee, or as we would say the Mahratta officers in charge of forts under the Beejapoor government are frequently termed Naikwaree in Persian Mss. and deeds.

Foot Note G.D.H. Page 72

**जाधवः**—ह्या घराण्याची सबंध कैफियत प्रसिद्ध केलेली आहे ती पहावी, भाग १ ला.

झाला म्हणूनच पेशवाई कांहीं काळ टिकली असें म्हणा-वयास मुळींच हरकत नाहीं. सत्रावें शतक ह्याच पुरु-षाच्या मर्दुमकीनें पूर्णपणें भरलेलें आहे, प्रत्येक राज-कीय हालचालींत पिलाजीराव नाहीं असें बहुशः होत नव्हतें, प्रत्येक मर्दुमकीच्या लढाईत पिलाजीराव जाधव प्रथम असे, ह्या घराण्याची हकीकतही मनोरंजक व अभिमानास्पद होणारी आहे, वाघोलीकर जाधवांचे वंशज आपल्या पदरीं असलेली माहिती पाठवितील तर तिचा बराच उपयोग होणारा आहे. वाडीकर जाधव हेही ह्याच वंशांतील आहेत त्यांचे सटवोजी जाधवराव, सुभानजी जाधवराव, ज्योत्याजी जाधव-राव वगैरे पुरुष प्रसिद्धिस आलेले आहेत त्यांनींहि आपल्या पदरचीं पत्रें वगैरे पाठविण्याचीं कृपा करणें.

**महाडिक**—हें चालुक्यांचेंच घराणें असून बरेंच प्रख्यातिस आलेलें आहे. यांच्या पुरुषांनीं स्वराज्याची अप्रतीम सेवा केलेली आहे. ह्या घराण्याची हकीगत श्री० रुद्राजीराव राजे महाडिक यांनीं प्रसिद्धीस्तव देण्याचें कबूल केलें आहे. त्याप्रमाणें ती येतांच प्रसिद्ध होईल.

**बंगोजी जगदेवराव नाईक**:—हा कुतुबशाही मध्यें फारच मोठा नामांकित सरदार होऊन गेला. गोवळकोंड्याच्या दरबारीं याचें एवढें प्रस्थ माजलेलें होतें कीं, जगदेवरावांवांचून कोणतेंही कार्य तडीस जात नसे. तो जसा शूर तसा मुत्सद्दी होता. कुतबशहास राज्यपद मिळवून देण्याचे कामीं याचा बराच उपयोग झाला होता. तो इतका पराक्रमी होता कीं, त्यानें कुतुबशाही, निजामशाही व आदिलशाही या तीन राज्यांस भीति उत्पन्न केली होती. वाटेल त्यास गादीवर बसविण्याची धमक त्याच्यांत होती. यामुळें मुसलमानांनीं त्यास वेगळा मुलूख तोडून दिला. याची विशेष हकीकत रा० रा० मोडककृत निजामशाहीच्या इतिहासामध्यें विस्तृत दिलेली आहे; परंतु त्याचें पुढें काय झालें तें मात्र मुळींच आढळत नाहीं. हा पुरुष ज्या कुलामध्यें उत्पन्न झाला असेल, त्या कुळांतील पुरुषांनीं यांची माहिती आम्हांस कळविल्यास आम्ही त्यांचे अत्यंत आभारी होऊं.

ह्या घराण्यांखेरीजही पुष्कळ घराणीं प्रसिद्धीस आलेलीं आहेत. त्या सर्वांची त्रोटक हकीकत देणें योग्य होतें; परंतु स्थलसंकोचामुळें ह्याभागीं तरी ही हकीकत येथेंच संपविणें भाग आहे.

# साळुंखे ऊर्फ पाटणकर.

सुलतान युसुफ आदिलशहानें विजापूरच्या राज्याची स्थापना केली त्यावेळेस त्याच्या ताब्यांत निरानदीपासून घटप्रभा नदीपर्यंत व पश्चिमेस समुद्र किनाऱ्यावरील बाण-कोटपासून रामसपर्यंत कोंकणपट्टी, पूर्वेकडे रायचोर पर-गणा व इद्गीर परगणा व बेदर आणि मलकर हे चार परगणे इतका मुलूख होता. ह्या राज्याचे उत्तरेस अहमदनगरचें राज्य होतें. विजापूरच्या बादशहाचें राज्य महाराष्ट्र देशांत असल्यामुळें त्या राज्यांत मराठे लोकांचा भरणा फार असे; मोठमोठे मानकरी, अमीर उमराव वगैरेंत मराठे लोकांचा भरणा फार होता. त्यापैकीं चंद्रराव मोरे, फलटणचे निंबाळकर, झुंजारराव घाटगे, रावमाने, घोरपडे, डफळे, सावंतबहादर, वाडीचे देशमुख, भोंसले वगैरे सरदार प्रमुख होते, इ० स० १५१० चे सुमारास पोर्च्युगीज लोक हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं गोवें शहर हस्तगत करून घेतलें. तें शहर विजापूरचा बादशहा यूसफअदिलशहा याच्या ताब्यांत होतें, त्यामुळें त्यानें हल्ला करून पुनः तें शहर आ-पल्या ताब्यांत घेतलें, यावेळीं वाडीकर देशमुख यांनीं फार पराक्रम केला, पुढें कांहीं वर्षांनीं पोर्च्युगीज लोकांनीं पुनः गोवें शहर घेतलें, व चौलपासून वसईपर्यंत समुद्रकांठच्या प्रदेशाची त्यांनीं बरीच नासाडी केली.

---

# जोत्याजीराव.

इ० स० १५७२ चे सुमारास पुनः पोर्च्युगीज लोकांनीं बाणकोटापासून गोंवेंपर्यंत समुद्रकांठच्या प्रदे-शांत लुटालूट व जाळाजाळ आरंभिली; तेव्हां विजापू-रचा बादशहा व अहंमदनगरचा बादशहा या दोघांनीं चौल व गोवें ह्या दोन शहरीं पोर्च्युगीज लोकांवर स्वारी केली, विजापूरच्या बादशहानें गोव्यांस वेढा दिला; ह्यावेळेस दंतागिरीचे देशमुख नागोजीराव साळुंखे यांचे पुत्र जोत्याजीराव हे विजापूरच्या बाद-शहाच्या पदरीं असून, ह्या समयीं बरोबर होते; त्यांनीं मोठा पराक्रम केला. जोत्याजीराव हे शूर व धाडसी होते, त्यांना ह्यावेळीं पांचशें स्वारांचें आधिपत्य असून बादशहापर्यंत त्यांची कीर्ति गेली होती. गोवें शहरास वेढा घातल्यानंतर लढाई सुरू झाली, व ती बरेच

दिवस चालली होती. एके प्रसंगीं जोत्याजीरावाच्या स्वारांची फळी ज्या बाजूस होती, त्या बाजूवर पोर्च्युगीज लोकांनीं मोठ्या निकरानें हल्ला केला, तेव्हां जोत्याजीराव आपल्या सर्व स्वारांसह एकदम तुटून पडले व कत्तल सुरू केली; यामुळें पोर्च्युगीज मागें हटले. व त्यांचा फार नाश झाला. हें पराक्रमाचें वर्तमान ऐकून बादशहा फार खुष झाला. पुढें बादशहानें तो वेढा कांहीं कारणानें उठविला, व तो विजापुरास सैन्यासह निघून गेला. पुढें वारणेच्या पलीकडील कांहीं डोंगरी मुलखांत रामोशी वगैरे लोक सरकार-सारा न देतां नेहमीं दरवडे वगैरे घालून फार त्रास देत असत; ही बातमी बादशहाच्या कानीं आली. जोत्याजीराव साळुंखे यांनीं विनंति केली कीं, 'मी तिकडे जाऊन बंदोबस्त करितों.' हें ऐकून बादशहा खूष होऊन त्यानें पाटण-महालांतील साठ गांवची देशमुखी-वतनाची सनद जोत्याजीराव यांस देऊन त्यांना तिकडील मुलखाचा बंदोबस्त करण्याकरितां पाठविलें. अशा रीतीनें यांनीं पाटण-महालची देशमुखी मिळविली. या नव्या वतनामुळें त्यांना व यांचे पुढील वंशजांस 'पाटणकर' असें म्हणूं लागले व त्याच उपनांवानें सांप्रत ते प्रसिद्ध आहेत.

'पाटणकर' साळुंखे यांचे घराण्यांतील पुरुष निरनिराळे ठिकाणीं जाऊन त्यांनीं तेथें मोठमोठे पराक्रम करून वतनें संपादन केलीं. त्यांपैकीं एक शाखा ग्वाल्हेर येथें, दुसरी सावंतवाडी येथें, तिसरी हैद्राबाद येथें; अशा आहेत. ह्या घराण्यांतील बहुतेक पुरुष फार शूर होऊन गेले, व त्यांनीं अनेक पराक्रम केले; तथापि प्रत्येकानें काय काय पराक्रम केले तें असावें तसें उपलब्ध नाहीं. या ठिकाणीं पाटणकर वंशाचे इतर शाखांतील पुरुषांविषयीं कांहीं एक वृत्त न लिहितां फक्त पाटणच्या जहागिरीवर स्थानापन्न होणाऱ्या पुरुषांची मिळालेली माहिती थोडक्यांत दिली आहे.

असो जोत्याजीरावांनीं पाटणचा बंदोबस्त फार चांगल्याप्रकारें राखिला. रामोशी लोकांना आश्वासनें देऊन त्यांनीं नोकरी व शेतीभाती करावी म्हणून पुष्कळ श्रम केले व उजाड प्रदेशांत लागवड होण्यासाठीं लोकांना उत्तेजन देऊन त्यांनीं वसूल वाढविला. जोत्याजीराव मोठे शूर असून दूरदर्शी असत. त्यावेळेस जावळी येथें चंद्रराव मोरे नांवाचा विजापूरकरांच्या पदरचा एक मराठा सरदार असे. विजापूरचा बादशहा यूसफ आदिलशहा यानें मोरे यांना निरा आणि वारणा ह्या दोन नद्यांमधील मुलख हस्तगत करण्यासाठीं १२००० पायदळ फौज देऊन पाठविलें होतें. हा प्रदेश त्यावेळीं एकाच राजाच्या ताब्यांत नसून शिरके, गुजर, मामुलकर वगैरे सरदार आपलें स्वामित्व त्या प्रांतावर आहे असें म्हणत. मोरे यांनीं लढाई करून त्या सरदारांचा पराभव केला. पुढें बादशहानें मोरे यांस 'चंद्रराव' असा किताब देऊन जावळीच्या सभोंवतालचा कांहीं भाग त्यांना जहागीर दिला व 'राजा' असा किताब देऊन त्यानें त्या प्रांतीं रहावें व मुलखाचें संरक्षण करावें, असा हुकूम दिला. पाटण-महालची देशमुखी जोत्याजीरावास मिळाली. ही गोष्ट त्यावेळीं राज्यावर असलेल्या चंद्रराव मोरे याला पसंत न वाटून त्यानें जोत्याजीरावांवर हल्ला करण्याचा घाट घातला. ही गोष्ट जोत्याजीराव ह्यांना कळतांच त्यांनीं मोठ्या शहाणपणानें विजापूरच्या दरबारांतून चंद्ररावांना एक आज्ञापत्र परभारें पाठविण्याची तजवीज केली. व त्यांचें मनांतील मत्सरभाव काढून टाकिला. नंतर सुमारें एक हजार लोक बरोबर घेऊन ते जावळीस चंद्रराव मोरे याला भेटण्याकरितां गेले व त्यांचा स्नेह संपादन करून परत विजापुरास गेले. इ० स० १५९० सालीं दिल्लीचा बादशहा अकबर यानें दक्षिणेंतील सर्व मुसलमानी राज्यें बुडविण्याकरितां आपल्या सरदाराबरोबर मोठें सैन्य रवाना केलें. त्या सरदारानें खानदेश वगैरे मुलख काबीज करून अहंमदनगरास वेढा दिला. तेव्हां आपल्या राज्याचा बंदोबस्त करण्यासाठीं विजापूरच्या बादशहानें आपल्या सरहद्दीवर ठिकठिकाणीं सैन्य पाठवून बंदोबस्त केला. जोत्याजीराव यांची दोन हजार स्वारांच्या पथकावर नेमणूक होऊन तेही सरहद्दीवर जावयास निघाले. यांची नेमणूक 'इद्र' परगण्यावर झाली होती. इद्र-परगण्यांत एका डोंगरांत त्यांनीं तळ दिला. पुढें थोड्याच दिवसांत मोंगल लोकांची एक टोळी फिरत फिरत त्या ठिकाणीं आली. उभयतांची लढाई होऊन तींत मोगलांचा फार नाश झाला व जोत्याजीरावांनीं मोठा पराक्रम करून आपलें संरक्षण केलें. पुढें थोड्याच दिवसांनीं जोत्याजीराव कैलासवासी झाले.

---

## बहिरजीराव.

अहंमदनगरच्या राज्यांत मोंगलांनीं धूमाकूळ चालविला होता. अकबरनें वारंवार दक्षिणेंत सैन्य पाठवून निजामशाहीचें बहुतेक राज्य आपल्या अमलाखालीं घेतलें व शेवटीं अहंमदनगर किल्ला सर केला. त्या राज्यांत हिंदु व मुसलमान अशा दोन फळ्या झाल्या असून हिंदु सरदार मोंगलास मिळाले होते. मोंगल लोकांनीं तेथील अल्पवयस्क बादशहा बहादूर-निजामशहा याला नेऊन प्रतिबंधांत ठेविलें; परंतु मलिकंबर यानें दौलताबादेजवळ 'खिडकी' शहर वसवून तेथें नवीन बादशाही स्थापन केली व मूर्तिजा निजामशहास गादीवर बसवून राहिलेल्या प्रांतांचा बंदोबस्त केला; तथापि, मोंगलांच्या राज्याचा विस्तार वाढून त्याची हद्द विजापूरच्या राज्यापर्यंत येऊन भिडली.

पुढें अहंमदनगरच्या राज्याची व्यवस्था फत्तेखान पाहूं लागला. हा फार दुष्ट व जुलमी होता. अहंमदनगरचें राज्य विजापूरचा बादशहा व मोंगल यांनीं समूळ नाहींसें करावें व त्याबद्दल मोंगलांनीं विजापूरकर यांना धारवाड किल्ला व आणखी मुलूख आणि सोलापूरचा किल्ला द्यावा असें ठरलें होतें, त्याप्रमाणें विजापूरच्या बादशहानें रणदुल्लाखान यांजबरोबर सैन्य देऊन त्यास मोंगलांचे मदतीस पाठविलें. त्यावेळीं जोत्याजीराव यांचे पुत्र बहिरजीराव यांना त्या सैन्यांत बरेंच प्रमुखत्व होतें. पुढें रणदुल्लाखानानें मोंगल सरदारापाशीं धारवाड किल्ला वगैरे मुलूख मागितला, परंतु त्यांनीं मुलूख व किल्ला देण्याचें नाकारलें. इतक्यांत अहंमदनगरच्या बादशहाकडून सोलापूर किल्ला विजापूरकरांस मिळाला, तेव्हां ते मोंगलांचा पक्ष सोडून अहंमदनगरकरांस मिळण्याच्या बेतांत होते; परंतु कांहीं कारणानें रणदुल्लाखानानें मोंगलांशीं लढाई दिली, ह्या लढाईत बहीरजीराव पाटणकर यांनीं मोठा पराक्रम केला व मोंगलांचा पाडाव होण्याचा रंग दिसूं लागला. परंतु शेवटीं रणदुल्लाखानाच्या हयगयीनें मोंगल लोकांना यश येऊन विजापूरच्या सैन्यास अपयश आलें.

फत्तेखान अहंमदनगरच्या बादशहास ठार मारून आपण कारभार करूं लागला. व शहाजहान बादशहापाशीं क्षमा मागून "खावंदां करितां मीं हें भयंकर कृत्य केलें" वगैरे मजकूर त्यानें त्याला कळविला. तेव्हां बादशहानें त्याजकडून अहंमदनगरच्या खजिन्यांतील अमोलिक रत्नालंकार व कांहीं जहागिरदारांचे मुलूख नजराण्यादाखल मागितले. फत्तेखानानें नाइलाज झाल्यामुळें बादशहाच्या म्हणण्याप्रमाणें व्यवस्था केली. परंतु त्यामुळें शहाजी भोंसले यांचा कांहीं मुलूख मोंगलांकडे गेला. तेव्हां शहाजी विजापूरच्या बादशहाच्या चाकरीस राहिला. व पुढें त्यानें फत्तेखानाची सत्ता झुगारून देऊन अहंमदनगरच्या राज्याची व्यवस्था स्वतःकडे घेतली.

शहाजहान यानें अहंमदनगरचें राज्य बहुतेक घेतलें खरें; परंतु शहाजीच्या पुंडाव्यानें मोंगलांना त्या प्रांताचा वसूल सुरळीत मिळेना. तेव्हां शहाजहान बादशहानें इ० स० १६३५ सालांत विजापूरच्या बादशहावर स्वारी करण्याचा बेत केला. त्यानें प्रथम विजापूरच्या दरबारीं वकील पाठवून त्याच्या मार्फत बोलणें लाविलें कीं, शहाजीचा पक्ष तुम्हीं सोडावा. परांड्याहून नेलेली *'मुलुख-मैदान' तोफ परत द्यावी. व

* त्या किल्ल्यावर मुल्क-इ-मैदान (रणभूमीचा राजा) नांवाची प्रसिद्ध तोफ होती. आतां ती महांकाळी नांवानें प्रसिद्ध आहे. पूर्वी हा किल्ला निजामशहाच्या ताब्यांत होता, त्यावेळीं ही तोफ चलीबी रूमीखाननें निजामशहाचे हुकुमावरून अहंमदनगरापासून एक कोशावर ओतली असून, तालिकोटच्या लढाईत रामरायावर जातांना हुसेन निजामशहानें बरोबर घेतली होती. ही अष्टधातूंची ओतलेली आहे. हिचें वजन ६० खंडी आहे असें म्हणतात. पण एका इंग्रज कामगाराचें मत असें आहे कीं, तिचें वजन ४० खंडी किंवा बत्तीस हजार रत्तल आहे. लांबी १४ फूट व घेराव तितकाच आहे. तोंडाच्या पोकळीचा व्यास बरोबर २ फूट ४ इंच आणि जाडी १ फूट आहे. तिच्या तोंडास सिंहाच्या जबड्याचा आकार आहे; आणि त्यानें तोंडात हत्ती धरिला आहे असें दाखविलें आहे. औरंगजेबानें विजापूर घेतलें. तेव्हां हिच्यावर कांहीं लेख कोरून ठेविला आहे. भाविक लोक अजून तिची पूजा करितात. लोकांनीं वरचेवर हात फिरविल्यामुळें ती साफ चकचकित होऊन तिच्यांत पाहणारांचें रूप दिसतें. ही तोफ महंमद आदिलशहानें हुकूम पाठवून मुराररावाकडून परिंड्याहून विजापुरास आणविली. दुसरी कडकबिजली म्हणून एक तोफ होती, ती आणण्यासही त्यास हुकूम झाला होता; पण आणतांनां ती रस्त्यांत कृष्णानदींत बुडाली, ती अद्यापि तेथें दिसते.

स. दे. कृत मुसलमानी रियासत पृष्ट २७२-७३.

अहंमदनगरच्या राज्यांतील घेतलेले सर्व किल्ले परत द्यावे; म्हणजे सोलापूर किल्ला तुमच्याकडे राहून तुमची पूर्वीची राज्यसीमा कायम केली जाईल. परंतु विजापूरकर यांना ही गोष्ट मान्य झाली नाहीं. तेव्हां दिल्लीच्या बादशहानें मोठें सैन्य जमवून शहाजीवर व विजापूरच्या बादशहावर पाठविलें. मोंगल सरदार खानडौरान विजापूरच्या मुलखांत शिरून त्यानें नळदुर्ग, सोलापूर वगैरे प्रांत घेऊन कोल्हापूर व मिरज यांचे आसपास छावणी देऊन राहिला. विजापूरकरांनींही आपले सैन्याची तयारी केली. 'बहिरजीराव' व त्याचे पुत्र 'हिरोजीराव पाटणकर' यांना त्यावेळीं दोहोंकडून मोठें संकट प्राप्त झालें होतें. मोंगलांची शक्ति फार वाढल्यामुळें, व त्यांना वारंवार दिल्लीकडून कुमक येत असल्यामुळें, त्यांचा पराभव करणें हें स्वतः त्यांचे शक्तींत नव्हतें; तथापि बादशहाचे कार्याकरितां प्राणांतिक संकटें सोसण्यास व पराक्रम करण्यास ते तयार होते, व आपल्या वतनी गांवांतील प्रजेस त्रास होऊं नये, अशी तजवीज त्यांना करावयाची होती. नंतर त्यांनीं आपसांत अशी मसलत ठरविली कीं, बहिरजीरावांनीं मोंगलांबरोबर लढण्याकरितां विजापूरच्या सैन्यांत जावें व हिरोजीरावानें कांहीं लोकांनिशीं पाटण-महालाचें संरक्षण करण्याचा प्रयत्न करावा.

नंतर बहिरजीराव विजापूरच्या लष्करास जाऊन मिळाला. त्यावेळेस उभय सैन्यांची एकच लढाई झाली नाहीं. मोंगल सैन्यांच्या निरनिराळ्या तुकड्या स्वतंत्रपणानें शहरावर व किल्ल्यावर हल्ला करीत. बहिरजीरावानें पांच हजार सैन्य बरोबर घेऊन मोठ्या शूरपणानें अनेक ठिकाणीं मोंगल सैन्याच्या टोळ्यांचा पराभव केला व त्यांचें कांहीं चालूं दिलें नाहीं. पुढें खानडौरान खानदेशांतून मोठ्या सैन्यानिशीं वाटेनें मुलूख उद्ध्वस्त करीत विजापुरास येऊन पोंहोंचला. परंतु विजापूर त्याचे हातीं लागलें नाहीं. पुढें विजापूरचें लष्कर व शहाजीचें सैन्य एकत्र झालें, यामुळें मोंगलांचा इलाज चालेना, तेव्हां मिरज, कोल्हापूर व आसपासचा प्रदेश लुटून फस्त करावा, असा मोंगली दरबारांतून हुकूम सुटला. हा हुकूम होतांच बुभुक्षित लांडग्याप्रमाणें मोंगल लोकांच्या सैन्याच्या तुकड्या जिकडे तिकडे भटकूं लागल्या व धर, मार, लूट, जाळ, असा सपाटा सुरू झाला. त्यांपैकीं कित्येकांनीं निरानदीपर्यंत मजल केली. हिरोजीराव पाटणकर हे रामोशी वगैरे लोक जमवून पाटण-महालांतील प्रजेचें संरक्षण करीत होते. त्यांना बरेच वेळां मोठ्या निकरानें झगडावें लागलें व एका प्रसंगीं एका मोठ्या टोळीचीं व यांची गांठ पडून मोठी लढाई झाली. शत्रूचें सैन्य त्यांच्या सैन्याच्या दुप्पटीजवळ जवळ होतें, तथापि हिरोजीरावांनीं त्या लोकांबरोबर मोठ्या पराक्रमानें एक दिवस सामना करून त्यांचा पराभव केला व कित्येक लोक मारून बाकीच्यांना हुसकून दिलें.

असो; या लढाईचा शेवट होऊन मोंगल व विजापूरचा बादशहा यांचे दरम्यान तह झाला व विजापूरकरांचा बराच मुलूख मोगलांना मिळाला.*

ह्या लढाईमुळें शिवाजीला विजापूरकर यांच्या मुलखांत धुंडावा करून मुलूख मिळविण्यास चांगली सबब सांपडली.

---

## हिरोजीराव व नागोजीराव.

इ० सन १६५६ सालीं महंमद अदिलशहा विजापूरचा बादशहा मयत झाला. व त्याच्या पाठीमागून त्याचा पुत्र अल्ली आदिलशहा गादीवर बसला. परंतु त्यानें तक्तारूढ होण्याबद्दल दिल्लीच्या बादशहास कळविलें नव्हतें. यामुळें बादशहास राग येऊन त्यानें आपला वजीर मीरजुमला याजबरोबर मोठें सैन्य देऊन त्याला विजापुरावर पाठविलें. औरंगजेब स्वतः या स्वारींत होता. मोंगलांनीं अल्ली आदिलशहा महंमद आदिलशहाचा पुत्र नव्हे, असें खोटेंच कारण पुढें आणून हा युद्धप्रसंग आणिला.

विजापूरचे दरबारीं मोंगलांच्या स्वारीचें वर्तमान येऊन पोंहोंचलें, परंतु मैदानावर लढाई देण्यापुरतें सैन्य अल्पावकाशांत त्यांना जमवितां आलें नाहीं. तथापि आपलें सर्व सैन्य एकत्र करून, सर्जेराव घाडगे, बाजी घोरपडे, व हिरोजीराव पाटणकर वगैरे मराठे सरदार यांना आपआपलें सैन्य घेऊन बादशहानें मदतीस बोलाविलें. व आपल्या राज्यांत ठिकठिकाणीं सैन्य

---

* सरदेसाईकृत मुसलमानी रियासत नवी आवृत्ती पृष्ट २७४.

ठेवून घोडेस्वारांचा सरदार खानमहंमद यानें फिरतें राहून ज्या ठिकाणीं युद्धप्रसंग येईल तेथें कुमक करावी, असा हुकूम करून एकंदर व्यवस्था केली.

हिरोजीराव पाटणकर यांनीं त्यावेळीं पांचहजार सैन्य स्वतःचें जमविलें असून, बादशहाकडून आणखी कांहीं सैन्याचें त्यांना आधिपत्य मिळालें होते व त्यांची नेमणूक शहरच्या बंदोबस्ताकडे होती. अवरंगजेब इ० स० १६५७ सालांत विजापूरकरांच्या मुलखांत शिरला व कालीयान बेदर, कलबुर्गें, वगैरे किल्ले त्यानें सर केले. परंतु खानमहंमद यानें त्याची फार नुकसानी केली. घोडेस्वारांपुढें त्याचा कांहीं इलाज चालेना. तेव्हां त्यानें खानमहंमद याला कांहीं द्रव्य देण्याचें कबूल करून आपल्याकडे वळवून घेतलें; यामुळें तो मनापासून युद्ध करीना. पुढें अवरंगजेबानें विजापूरवर हल्ला केला; त्याठिकाणीं मोठ्या निकराचें युद्ध झालें. हिरोजीराव पाटणकर, सर्जेराव घाटगे व इतर मराठे सरदार यांनीं फार पराक्रम केल्यामुळें, शहर हस्तगत झालें नाहीं. तथापि तो दिल्लीचा बादशहा तहाचें बोलणें मान्य करीना. विजापूरचें राज्य बुडवावें असा त्याचा पक्का निश्चय होता. परंतु तो मराठे सरदारांनीं सिद्धीस जाऊं दिला नाहीं. इतक्यांत त्याला शहाजहान आजारी असल्याबद्दल रोशन-बेग इचें पत्र आलें. त्यामुळें तो लढाई बंद करून सैन्यासह दिल्लीस निघून गेला. ‡

तथापि तें राज्य पुढें फार दिवस टिकलें नाहीं. शिवाजी राजाचा उत्कर्ष होऊन त्यानें विजापूरकरांच्या मुलखांतील बराच भाग काबीज केला व पुष्कळ किल्ले घेतले. इ० स० १६८६ सालांत अवरंगजेबानें आपला पुत्र सुलतान अजीमशहा याजबरोबर मोठें सैन्य देऊन विजापूरचें राज्य घेण्याकरितां पाठविलें. त्यासालीं विजापूर प्रांतांत दुष्काळ पडला होता, त्यामुळें अवरंगजेब बादशहानें अहंमदनगर येथील सरदार गाजीउद्दीन याला धान्याचा पुरवठा करण्याचा व सैन्यासह आपल्या पुत्रास मदत करण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें गाजीउद्दीन २०००० गोण्या घेऊन मोठ्या सैन्यानिशीं विजापुराकडे निघून आला. ही बातमी विजापूरच्या दरबारांत कळतांच बादशहानें आपलें सैन्य त्याच्यावर हल्ला करण्याकरितां पाठविलें. ह्या लढाईत हिरोजीरावाचे पुत्र नागोजीराव पाटणकर यांनीं चांगला पराक्रम केला. परंतु सरतेशेवटीं विजापूरकरांचा मोड झाला.

नंतर अवरंगजेब दक्षिणेंत येऊन त्यानें सैन्यासह विजापूर शहराला वेढा दिला. विजापूरकरांचें सैन्य ठिकठिकाणीं गुंतलें होतें. यामुळें अवरंगजेबाबरोबर युद्ध करण्याची त्यांना कुवत राहिली नव्हती. खेरीज कांहीं सरदार फितूर झाले, यामुळें बादशहासुद्धां सर्व लोक अवरंगजेबाच्या स्वाधीन झाले.

अवरंगजेब यानें मोठमोठ्या सरदारांस आपल्या आश्रयास ठेविलें. व लहानसहान जहागिरी पूर्वीप्रमाणें चालविल्या.

अशा रीतीनें विजापूरचें राज्य मुसलमानांच्या फितूरीनें बुडणार होतें, तें मराठे सरदारांच्या शौर्यानें कांहीं दिवस राहिलें.

अशा रीतीनें सन १६८७।८८ सालीं विजापूरच्या राज्याचा शेवट झाल्यावर नगोजीराव पाटणकर 'पाटण' येथें येऊन देशमुखीची वगैरे व्यवस्था पाहूं लागले व पुढें तेथेंच कैलासवासी झाले.

‡ सरदेसाईकृत मुसलमानी रियासत. पृ० २७५.

---

## चांदजीराव.

नागोजीरावांचे पुत्र चांदजीराव हे तरुण शूर असल्यामुळें रिकामें बसणें यांना आवडेना. मराठी राज्याची स्थापना होऊन बराच विस्तार झाला असून एकाएकीं संभाजीच्या दुर्वर्तनामुळें शिवाजीचे सारे प्रयत्न व्यर्थ जाण्याच्या बेतांत आले होते. शिवाजीचे वेळचे मोठमोठे पराक्रमी सरदार व मुत्सद्दी नाखूष होऊन राजाश्रयास मुकले. यामुळें त्यांच्या कर्तबगारीचें व पराक्रमाचें तेज फिक्कें पडत चाललें. अवरंगजेब यानें शिवाजीचा बहुतेक मुलूख हस्तगत केला. परंतु मराठे सरदारांच्या पराक्रमांमुळें डोंगरी किल्ले त्यांच्या स्वाधीन झाले नाहींत. मराठे लोक प्रसंगविशेषीं अवरंगजेबाला नम्र होऊन त्याची चाकरी करण्याचें कबूल करीत, परंतु सवड सांपडली म्हणजे त्याच्या सैन्यावर तुटून कत्तल उडवीत.

अवरंगजेब विजापूर शहरीं वर्षभर राहिला. परंतु शेवटीं रोग उत्पन्न झाल्यामुळें, तो तेथून अकलूज म्हणून निरेचे कांठीं एक मोठें गांव होतें तेथें जाऊन राहिला.

चांदजीराव विजापूरचें राज्य बुडाल्यावर इ० स० १६८८ सालाच्या आरंभीं आपल्या लोकांसह बाहेर पडले.

त्यांना शौर्याचीं व साहसाचीं कृत्यें करण्याची फार हौस होती. व अशा शूर मनुष्यांची त्यावेळीं फार जरूर असून, अवरंगजेबाच्या धामधुमीमुळें मराठे लोकांस आपला पराक्रम दाखविण्यास मोठी संधि आलेली होती. मोंगल सैन्याला आपल्या शक्त्यनुसार त्रास देण्याचा हेतु धरून चांद्जीरावांनीं प्रथमतः त्या सैन्याची एक टोळी विजापुराकडे जात होती, तीवर हल्ला करण्याचा बेत केला व मिरजेजवळ त्या टोळीला गांठून त्यांनीं रात्रीं अचानक जाऊन छापा घातला. मोंगललोक गर्वानें उन्मत्त होऊन, आपल्या पराक्रमावर भरंवसा ठेवून एका आंबराईत उतरले होते. कित्येक पोषाख उतरून खुशाल झोंपा घेत होते व कांहीं मोठमोठे पलीते पेटवून व लांकडाचे ढीग जाळून त्याच्या उजेडांत गाणें बजावणें करीत होते. चांद्जीरावांचे लोक त्यावेळीं पायदळपैकीं असून अगदीं गोंगाट केल्याशिवाय त्या टोळीच्या जवळ गेले. परंतु कांहीं कारणानें मोंगलांस त्या लोकांचा सुगावा लागल्यामुळें, ते उठून तयारी करूं लागले. इतक्यांत चांद्जीराव स्वतः पुढें होऊन त्यांनीं आपल्या लोकांसह त्यांच्यावर हल्ला केला. मोंगल लोकांनीं सुमारें एक प्रहर मोठ्या निकरानें युद्ध केलें व चांद्जीरावाचे कांहीं लोक ठार करून त्यांना मध्यें कोंडिलें, तथापि चांद्जीरावांनीं आपलें धैर्य न सोडितां हातांतील तरवार अशा शिताफीनें चालविली कीं, थोड्याच वेळांत त्यांच्या आसपास शत्रुपक्षाकडील एकही मनुष्य राहिला नाहीं. ह्या लढाईत त्यांना कित्येक घोडे व बहुत हत्यारें सांपडलीं, तीं घेऊन ते राहिलेल्या लोकांसह कोल्हापूराकडे जाऊन एखाद्या मराठे सरदारास मिळावें, अशा हेतूनें पुढें चालले. त्यावेळेस घोरपडे, माने, निंबाळकर वगैरे मराठे सरदार बंड करण्याच्या घाटांत होते. परंतु तो बेत त्यावेळेस साधला नाहीं. एक मुक्काम पुढें गेल्यावर त्यांना पांच हजार मोंगल स्वारांची एक टोळी भेटली. ह्या लोकांबरोबर युद्ध करून जय मिळविण्याची आशा नव्हती. मोगलांकडे मराठे सरदार व घोडेस्वार पुष्कळ होते, यामुळें चांद्जीरावांनीं त्यावेळीं हिकमतीनें व चातुर्यानें आपण बादशहाचे नोकर आहों, असें त्या टोळीच्या मुख्यास सांगितलें. परंतु तो बेत आंगावर आला. कारण रिसालदारानें असें सांगितलें कीं, बादशहाचे हुकमावरून आपण राजगडाकडे जात आहों व तुम्हीही आमच्या बरोबर तिकडेच चलावें. चांद्जीरावांना त्याचे बरोबर जावें असें वाटलें नाहीं. परंतु ह्या वेळेस विरुद्ध बोलण्याची सोय नव्हती, यामुळें त्याचें म्हणणें कबूल करून, ते त्या स्वारांच्या टोळीबरोबर निघाले. त्यांच्या मनांत असें आलें कीं, ह्या स्वारांचा वाटेंतच मोड करण्याची कांहीं तरी तजवीज करावी. त्यांनीं आपल्या लोकांपैकीं चार विश्वासु मनुष्यांस तो बेत कळवून आसपास कोठें मराठे लोक किंवा मावळे असल्यास शोध करून त्यांना बरोबर घेऊन येण्यास सांगून त्यांची रवानगी गुप्तपणें केली. पुढें ते सर्व लोक घांटमाथ्याचे आसपासचे रानांत आले व त्यांनीं एका ओढ्याचे कांठीं मुक्काम केला. चांद्जीरावांनीं पाठविलेल्या मनुष्यांपैकीं, एका नावजी नांवाच्या मनुष्यानें सुमारें ३ हजार मावळे लोकांची टोळी जमा करून ती हकीकत त्यानें त्यांना येऊन कळविली. तेव्हा रात्रीं छापा घालावयाचा संकल्प करून त्यांनीं तो बेत आपल्या लोकांस कळविला. भुरटी झाडी व डोंगराळ प्रदेश यामुळें सर्व लोकांस एकाच मैदानांत पाण्यानजीक उतरण्याची सोय नव्हती. यास्तव चांद्जीरावांनीं आपल्या लोकांचा तळ ओढ्याचे दुसरे बाजूस मोंगल घोडेस्वारांचे तळापासून थोड्याशा अंतरावर दिला असून, ती जागा उंचवट्याची होती. मध्यरात्रीच्या सुमारास मुसलमान लोक आपआपल्या पथाऱ्या टाकून खुशाल घोरत पडले. चांद्जीरावांना व त्यांचे लोकांना झोंप मुळींच आली नाहीं. प्रत्येक इसम मावळे येण्यासाठीं वाट पहात तयारीनें आपआपले गाशावर व घोंगडीवर पडून राहिला. नंतर हळूहळू एक दोन असे पुष्कळ मावळे जमा झाले. शिवाजीच्या कारकीर्दीतील कृति ते विसरले नव्हते. सर्व तयारी झाल्यावर त्यांनीं भराभर घोड्यांचीं दवासनें व पायबंद तोडून कांहीं घोडे उधळून लाविले. त्यांचें खिंकाळणें व टापांचा आवाज ऐकून मुसलमान धडपडून उठले. व आपआपलीं शस्त्रें सांवरून आरडाओरड करून तयार झाले. चांद्जीरावाकडे घोडेस्वार फार नसून बहुतेक मावळे पायदळपैकींच होते. व मुसलमानांचे घोडे पळून गेल्यामुळें तेही पादचारीच झाले. घोडेस्वारांचा मुख्य सरदार पांचशें धिप्पाड मुसलमानांसह चांद्जीरावांवर तुटून

पडला. रात्रीचा प्रसंग, शत्रू मित्र समजण्यास सुद्धां पंचाईत. तथापि रानांत नेहमीं भटकणारे मावळे लोकांस त्यांचा कांहीं हिशेब वाटला नाहीं, ही झटापट उजाडेपर्यंत चालली. विजयी कोण होईल हें कळेना. परंतु मुसलमानांचा सरदार असह्य जखम लागून पडला. त्यामुळें मोंगलाचें धैर्य सुटून ते इकडे तिकडे पळूं लागले, व मावळे त्यांचे पाठीस लागले, युद्धाचें सर्व जोखीम चांदजीरावावर पडलें असल्यामुळें, त्यांनीं आपल्या जिवाकडे न पाहतां मोठा पराक्रम करून विजय संपादिला. मावळे लोकांनीं दुसऱ्या दिवशीं रानांतून बहुतेक घोडे शोधून आणिले व ते स्वार बनले, व कांहीं दिवस त्या ठिकाणीं मुक्काम करून ते परत कोल्हापुराकडे यावयास निघाले. त्यावेळेस अवरंगजेब अकलूजेसच होता. मराठे लोक त्याला वारंवार उपद्रव देत असत. संभाजी राजाच्या व्यसनाधीनतेमुळें ते हताश झाले होते. तथापि त्यांचें शौर्य कमी झालें नव्हतें. नासिकाजवळ पुष्कळ मराठे सरदार मोंगलाशीं लढत होते. त्यामुळें अवरंगजेबानें तिकडील सैन्याच्या मदतीकरितां आपला पुत्र आदिलशहा याजबरोबर कांहीं सैन्य देऊन त्याची तिकडे रवानगी केली. आणि वजीराचा पुत्र सादतखान याजबरोबर कांहीं सैन्य देऊन कोंकणप्रांत सर करावयास त्याला पाठविलें व कोल्हापूर प्रांताचा राहिलेला भाग सर करण्यासाठीं तकरीबखान नांवाचा एक सरदार पाठविला.

तकरीबखान कोल्हापुरास आल्यावर त्याला संभाजी संगमेश्वरास थोड्या लोकांनिशीं एका बागेंत राहिला आहे अशी बातमी समजली. तेव्हां तो कांहीं विश्वासू शूर लोक बरोबर घेऊन आपल्या पुत्रासह संगमेश्वरी आला व त्यानें संभाजीच्या वाड्यावर हल्ला केला. संभाजीच्या तर्फे कलुषा यानें कांहींसा प्रयत्न केला; परंतु त्याला जखम लागल्यामुळें बाकीचे लोक पळून गेले व संभाजी त्याच्या हातीं सांपडला. नंतर त्यानें संभाजीस कैद करून कोल्हापुराकडे आणिलें व बादशहा तुळापुरीं होता. तेथें त्याला—संभाजीला धरल्याबद्दल वर्दी दिली.

चांदजीराव कोल्हापुराकडे जात असतां वाटेंत त्यांना पुष्कळ संकटें सोसावीं लागलीं. पुढें तकरीबखान कोल्हापुरास आल्याची बातमी लागतांच ते कोल्हापुरास न जातां मिरजेच्या आसपास वाट चुकवून रानांत राहिले. कोल्हापूर येथें राहिलेल्या सैन्यापैकीं एखादी टोळी लुटीला वगैरे आसपास गेली, तर तिच्यावर हल्ला करून चांदजीराव त्या तुकडीचा मोड करीत व समयविशेषीं कोल्हापूरच्या आसपास येऊन मुसलमान लोकांवर हल्ला करीत. अशा रीतीनें बरेच दिवस त्यांनीं मोंगल सैन्याशीं झुंझण्यांत व त्यावर हल्ले करण्यांत घालविले.

इकडे औरंगजेबानें संभाजीस क्रूरपणानें ठार मारल्याची बातमी सर्व मराठे लोकांना समजतांच त्यांना अतिशय त्वेष आला. राजाराम व त्याचें कुटुंब आणि संभाजीची बायको व मुलगा रायगडावर होतीं. म्हणून मराठे सरदार व मुत्सद्दी रायगडावर येऊन मसलती करूं लागले. चांदजीरावही त्यावेळीं रायगडीं गेले होते. संताजीराव घोरपडे त्यांच्यावर फार प्रीति करीत असत. चांदजीरावांनीं आपली सर्व हकीकत त्यांना सांगितली. पुढें जनार्दनपंत हणमंते, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत बहुरकर, खंडो बल्लाळ चिटणीस, संताजीराव घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे वगैरे सरदार व मुत्सद्दी मंडळीनें संभाजीची बायको येसूबाई इचा विचार घेऊन संभाजीचा पुत्र मोठा होईपर्यंत राजारामानें राज्यकारभार करावा असा ठराव केला. नंतर राजाराम आपल्या कुटुंबासह विशाळगडावर रहावयास गेला. तथापि मुसलमान लोकांना राजारामाचा ठिकाण न लागावा म्हणून त्यानें एकाच ठिकाणीं न राहतां रायगडापासून पन्हाळा किल्ल्यापर्यंत चालून चालून रहावें. व स्वार शिबंदीनें तो असेल त्याचें आसपास असावें, असें ठरविलेलें होतें. पुढें मोंगलांनीं रायगड किल्ला हस्तगत करून येसूबाई व तिचा पुत्र शिवाजी यांना बादशहाकडे नेलें. परंतु अवरंगजेबानें त्यांचा योग्य सन्मान राखून त्यांना आपले जवळ इतमामानें बाळगिलें.

नंतर मोगलांनीं मिरज व पन्हाळा किल्ला घेतला. तेव्हां प्रल्हाद निराजी, धनाजी जाधव वगैरे मुत्सद्यांनीं विचार करून राजारामानें जिंजीस जाऊन राहावें असें ठरविलें; व त्याला तिकडे सुरक्षित पोंचविण्यासाठीं ते सर्व सरदार व चांदजीराव व आणखी कांहीं निवडक लोक बरोबर घेऊन तडक करून कर्नाटकांत जिंजीकडे निघून गेले, परंतु वाटेंत कांहीं कारणानें राजारामाविषयीं मोगलांच्या लोकांना संशय आल्यावरून

कारभाऱ्यांनीं चांद्जीराव, धनाजीराव आणि राजाराम ह्या तिघांना जिंजीकडे रवाना करून आपण मोंगल लोकांच्या स्वाधीन झाले; व युक्ति प्रयुक्तीनें सुटून जाऊन जिंजीस गेले.

राजाराम जिंजीस जात असतां त्याला वाटेंत बरेच मराठे लोक येऊन मिळाले. मोंगल लोकांच्या टोळ्या इकडे तिकडे भटकत होत्या. त्यांनीं कित्येक वेळां राजारामावर हल्ले केले, परंतु मराठा सरदारांच्या पराक्रमानें व युक्तीनें राजाराम जिंजीस सुखरूप पोंहचला. यावेळीं चांद्जीरावाचें शौर्य व पराक्रम राजारामाच्या प्रत्यक्ष अवलोकनांत येऊन तो फार खुष झाला.

नंतर अष्टप्रधान व कारभारी जिंजीस आल्यावर त्यांनीं राजाराम याला तक्ताधिपति केलें. तेव्हां त्यानें आपल्या प्रधानांच्या वगैरे नेमणुका करून सर्व मराठे सरदारांना पोषाख, इनामें व जहागिरी वगैरे दिल्या, चांद्जीरावाच्या पराक्रमानें संतुष्ट होऊन राजाराम यानें इ० स० १६९२ त पाटण वगैरे साठ गांवची इनाम जहागिरी सनद् व ताम्रपत्र चांद्जीरावास दिलें.

राजारामासंबंधानें हें वर्तमान अवरंगजेबाला समजलें. त्या वेळेस त्यानें प्रथम 'जिंजी' घेण्याचा बेत करून झुलफिकारखान सरदाराबरोबर कांहीं सैन्य देऊन त्याला तिकडे रवाना केलें. झुलफिकारखान जिंजीस आला; परंतु वेढा घालण्यास पुरेसें सैन्य नाहीं, असें समजून त्यानें आणखी सैन्य मदतीकरितां बोलाविलें. त्यानें कांहीं लोक जिंजीचे नजीक ठेविले व त्रिचनापल्लीकडे स्वारी केली.

इकडे कारभारी मंडळीनें मिरज, पन्हाळा वगैरे किल्ले घेऊन वांईचे सुभेदारावर छापा घातला व तो मुलूख मिळविला. त्यांनीं मोंगलांच्या मुलुखांत चौथाई व सरमुखीचे हक्क वसूल करण्याकरितां कांहीं लोक पाठविले.

संताजीराव, धनाजीजाधव, व चांद्जीराव यांनीं उत्तरेकडील मुलूख उद्ध्वस्त करून कित्येक प्रसंगीं मोंगल लोकांचा पराभव केला. नंतर वीस हजार स्वार बरोबर घेऊन ते साताऱ्यावरून थेट कर्नाटकांत गेले, व जिंजीजवळ गेल्यावर धनाजी जाधव यानें सुमारें सातहजार घोडेस्वार बरोबर घेऊन मोंगलाचें ठाणें घेतलें. संताजीराव व चांद्जीराव यांनीं आपल्या लोकांच्या दोन टोळ्या करून ते मोंगललोकांचीं कर्नाटकांतील लहान मोठीं ठाणीं दोन्हींकडून उठवूं लागले, त्या वेळीं चांद्जीरावांनीं मोठ्या पराक्रमानें मुसलमानांशीं कित्येक ठिकाणीं मोठ्या निकरानें व शौर्यानें युद्ध केलें. मुसलमान लोक हजारों मृत्युमुखीं पडले, व जिवंत राहिलेले हतवीर्य होऊन जिंजीकडे थोरले फौजेस येऊन मिळाले.

पुढें औरंगजेबानें आपला पुत्र कामबक्ष आणि वजीर जासदखान यांजबरोबर मोठें सैन्य देऊन जिंजीवर पाठविलें. झुलफिकारखान हा ह्या प्रकारामें नाउमेद् झाला.ह्या प्रकरणचा फायदा घेऊन शिर्क्यांच्या मदतीनें राजाराममहाराज किल्ल्यांतून बाहेर निसटले व नंतर मोगलांनीं किल्ला सर केला.

चांद्जीरावांनीं कर्नाटकांत दादोरी नांवाचा एक लहान किल्ला होता, त्या ठिकाणीं संताजी घोरपडे यांनीं हुसकून लाविलेलें बरेंच मोंगल सैन्य आश्रयास राहिलें होतें, त्याला वेढा देऊन हल्ला केला. मोंगल लोक दरवाजे बंद् करून राहिले होते. त्यांचे जवळ धान्य फार थोडें होतें. सुमारें दोन महिने त्यांनीं मोठ्या निकरानें दम धरिला. चांद्जीराव मोठ्या हिंमतीनें वरचेवर किल्ल्यावर हल्ले करीत. यामुळें आंतील सैन्याचा नाईलाज झाला व ते दार उघडून बाहेर आले. त्या ठिकाणीं मोठी चकमक उडाली. मुसलमान लोक चढणीवर बरेच बाजूस होते व चांद्जीराव खालच्या बाजूनें त्यांच्यावर हल्ला करीत होता. चढावामुळें त्यांचे लोक माघार घेऊन कच खाऊं लागले व मुसलमान लोक ईर्षेनें पुढें सरसावले. इतक्यांत चांद्जीरावांनीं आपल्या लोकांस उत्तेजन देऊन स्वतः पुढें होऊस शत्रूची फळी फोडली व कत्तल सुरू झाली. त्यांचे लोकही मागोमाग गेले व थोड्याच वेळांत चांद्जीरावांच्या माऱ्यानें घाबरून जाऊन मुसलमान लोक सैरावैरां पळूं लागले व चांद्जीराव विजयी झाले.

ह्या हल्ल्याची बातमी औरंगजेबास समजतांच त्यानें तेथील लोकांस कुमक करण्याकरितां कांहीं सैन्य रवाना केलें होतें. परंतु संताजी घोरपडे यानें वाटेंतच त्या सैन्यावर हल्ला करून त्यांची अगदीं धूळधाण उडवून दिली.

हा जय मिळविल्यावर चांद्जीराव साताऱ्याकडे गेले. पुढें कांहीं दिवसांनीं राजाराम मोठें सैन्य घेऊन साताऱ्याहून निघून उत्तरेकडील मुलखाचा बंदोबस्त करण्याकरितां निघाला. त्या

वेळेस चांदजीराव यांसही बरोबर नेलें होतें. त्यांनीं त्या स्वारींत अनेक धाडसाचीं कृत्यें करून राजाराम महाराजांस फार खुष केलें. पुढें थोडयाच वर्षांनीं हे कैलासवासी झाले.

चांदजीराव शरीरानें उंच व धिप्पाड असून त्यांचा चेहराही उग्र होता. ते लढाईच्या वेळीं चिलखत व शिरस्त्राण घालीत. तें चिलखत, शिरस्त्राण व लक्ष्मी नांवाचें त्यांचें खड्ग हीं फार जड व प्रेक्षणीय असून हल्लीं **श्री० बाबासाहेब पाटणकर** यांच्या पाटण येथील वाड्यांत ठेविलेलीं आहेत. ह्यांची धर्मावर मोठी निष्ठा असे. समर्थ श्रीरामदास स्वामींनीं यांना दर्शन देऊन त्यांना सद्बोधामृत पाजून अनुग्रह दिला होता. पुढें एके दिवशीं समर्थ श्रीरामदासस्वामी कोयना नदीच्या डोहांत बुडाले. त्यांस कल्याणस्वामींनीं चौथ्या दिवशीं बाहेर काढिलें, त्यावेळेस त्यांनीं एक राममूर्ति नदींतून वर आणिली व ती त्यांनीं चांदजीरावांस दिली. चांदजीरावांनीं मोठ्या भक्तीनें तिचा स्वीकार करून ते तिचें पूजन करूं लागले. तेव्हांपासून हल्लींपर्यंत ती मूर्ति पाटणकर यांच्या देव्हाऱ्यांत असून सरदार बाबासाहेब तिचें नित्य मोठ्या भक्तीनें पूजन करीत असतात.

---

## रामराव.

इ० स० १७०७ सालीं अवरंगजेब बादशहाचा अंत झाला, व दक्षिणेंतील लष्कर घेऊन बादशहाचा पुत्र अजीमशहा नर्मदेच्या पलीकडे निघून गेला, त्यामुळें मराठे लोकांना आपला गेलेला मुलुख पुनः मिळविण्यास व मोंगलांच्या ताब्यांतील प्रदेश लुटण्यास चांगली सवड सांपडली. चांदजीरावांचे पुत्र रामराव हे आपल्या वडिलांप्रमाणेंच शूर व धैर्यवान् होते. त्यांनीं स्वतंत्रपणें आपले लोक बरोबर घेऊन मोंगलांच्या मुलखांत स्वारी केली, व त्यांचीं कित्येक लहान लहान ठाणीं घेऊन ते उत्तरेकडे निघाले. इकडे अजीमशहानें शाहुराजापासून मराठ्यांचा दंगा धोपा वगैरे बंद करून दिल्लीच्या बादशहाच्या आज्ञेंत वागेन असा करार करून घेऊन त्याला सोडून दिलें. शाहू दक्षिणेंत येतांच त्यानें वऱ्हाड व खानदेश येथील मराठे सरदारांस आपल्या भेटीस बोलावून त्यांना वश करून घेतलें. पुढें थोडयाच दिवसांनीं रामरावांची व शाहूची भेट होऊन रामराव शाहूला मिळाले व त्याच्या बरोबर पुण्यास यावयास निघाले. शाहूराजा बरींच वर्षें मोंगलांच्या प्रतिबंधांत असल्यामुळें त्याच्यावर रयतेचें प्रेम असण्याचा संभव नव्हता. यामुळें ताराबाईचा पुत्र हाच आपला राजा व त्याचेंच हित आपण केलें पाहिजे असें समजून वाटेंत एका गांवकऱ्यांनीं शाहूला प्रतिबंध करून तोफांची मारागिरी चालविली. तेव्हां प्रथमतः रामरावांनीं त्या लोकांस सामोपचाराच्या गोष्टी सांगितल्या, परंतु त्यांनीं त्या न मानितां शाहूच्या लोकांवर हल्ला केला. तेव्हां रामरावांना आपलें शस्त्र उचलावें लागलें. त्यांनीं मोठ्या चपळाईनें आपला घोडा फिरवून कांहीं लोकांसह शत्रूच्या पिछाडीवर हल्ला केला. व बराच वेळ दोन्ही पक्षांचें युद्ध होऊन शेवटीं रामराव विजयी झाले. शाहू रामरावांचा पराक्रम व युद्धचातुर्य पाहून आनंदित झाला. व त्यानें रामरावांच्या बहादुरीची मोठी प्रशंसा केली.

ह्या युद्धाच्या गर्दींत एका बाईनें आपलें तान्हें मूल शाहूराजाच्या पायांवर ठेवून विनंति केली कीं, हा मुलगा मी आपल्या सेवेस अर्पण केला आहे. पुढें जय मिळाल्यावर शाहूनें त्या मुलाचें नांव फत्तेसिंग भोंसले असें ठेवून पुढें त्याला अक्कलकोटचें राज्य दिलें.

इकडे ताराबाईच्या मनांत शाहूला राज्य द्यावयाचें नव्हतें म्हणून तिनें धनाजी जाधव व प्रतिनिधि यांजबरोबर सैन्य देऊन त्यांस शाहूवर पाठविलें. उभय सैन्यांची गांठ पुण्याच्या उत्तरेस १५ कोसांवर पडली व लढाई सुरु झाली परंतु धनाजी जाधव शाहूला मिळाल्यामुळें प्रतिनिधि आपले लोक घेऊन साताऱ्यास पळून गेला. नंतर शाहूमहाराज, रामराव व धनाजीराव यांनीं चंदन आणि वंदन हे दोन किल्ले हस्तगत केले. नंतर सातारा किल्ला घेऊन शाहूनें राज्यपद मिळविलें.

नंतर कांहीं दिवसांनीं शाहूनें रामरावांबरोबर कांहीं सैन्य देऊन त्यांस राजगड किल्ला सर करण्याकरितां पाठविलें. रामराव तेथें जाऊन किल्लेदारापाशीं प्रथम सामोपचारानें किल्ला मागूं लागले. परंतु तो किल्लेदार मान्य करीना; किल्ल्यास वेढा घालून बसण्याइतकें त्यांच्याजवळ सैन्य नव्हतें यामुळें रामराव विचारांत पडले. तथापि किल्ल्यासभोंवतीं ठिकठिकाणीं आपले लोक ठेवून त्यांनीं स्वतः कांहीं लोक बरोबर घेऊन दरवाज्यावर हल्ला करण्याचा यत्न केला. परंतु

वरील मारामुळें त्यांना मागें यावें लागलें. सरतेशेवटीं त्यांनीं सर्व सैन्य एके ठिकाणीं जमवून एकदम पुनः मोठ्या नेटानें दरवाज्यावर हल्ला केला व त्यांत त्यांना यश येऊन आंत शिरण्यास मार्ग मिळाला. मग मोठी चकमक झडून त्यांत किल्लेदार पडला. व रामरावांनीं शाहूचें निशाण किल्ल्यावर चढविलें; अशा रीतीनें अनेक पराक्रमाचीं कृत्यें केल्यामुळें शाहूराजानें करवीरइलाख्यापैकीं भूदरगड पेट्यांतील १०।११ गांवची सरदेशमुखी त्यांजकडे चालत होती, ती मुसलमानांच्या दंग्यामुळें मध्यें कांहीं वर्षें सुरळीत चालत नव्हती. तें वतन रामरावांकडे निर्वेध चालू केलें.

रामरावांनीं शाहूमहाराजांची फार मोठी कामगिरी बजाविली व पुढें ते याहून जास्त लौकिकास चढले असते. परंतु इ० स० १७१३ त अकस्मात् ते स्वर्गवासी झाले.

---

## नागोजीराव.

इ० स० १७१३–१७४२.

रामराव मयत झाले त्यावेळीं त्यांचें पुत्र नागोजीराव १८।१९ वर्षें उमरीचे होते. यामुळें ते आपल्या वडिलांबरोबर एखादे मोहीमेवर गेले नव्हते. तथापि युद्धकलेचें बहुतेक शिक्षण त्यांना मिळालें होतें. पुढें थोड्याच दिवसांनीं ते शाहू महाराज यांना भेटावयास जाऊन त्यांनीं एखादे मोहीमेवर आपणांस पाठविण्याविषयीं विनंति केली. त्यावरून महाराजांनीं शंभू महादेवाचे डोंगराकडे कृष्णराव खटावकर फार उपद्रव करीत होता, त्या मोहीमेवर त्यांस बाळाजी विश्वनाथ यांजबरोबर जाण्याचा हुकूम केला.

कृष्णराव खटावकर फार धाडसी व शूर होता. आपणावर बाळाजी विश्वनाथ चाल करून येत आहे. ही खबर त्याला कळतांच तो आपले लोक बरोबर घेऊन औंधपर्यंत आला. त्या ठिकाणीं उभय पक्षांची लढाई होऊन बाळाजीचा जय झाला. नागोजीरावांना यापूर्वी युद्धप्रसंग प्रत्यक्ष माहीत नव्हता, तरी त्यांनीं मोठा पराक्रम करून आपल्या शौर्यानें बाळाजी विश्वनाथास फार खुष केलें. कृष्णराव खटावकरास धरून कैद केलें. व शाहू महाराजांपुढें आणिलें. खटावकरानें आपल्या अपराधांची क्षमा मागून आपली मुक्तता होण्याविषयीं विनंति केली. तेव्हां महाराजांनीं त्याच्यावर दया केली व खटाव गांव वंशपरंपरा इनाम करून देऊन त्याला सोडून दिलें.

बहिरोपंत पिंगळे कोकणांत आंग्र्यांशीं लढाई करीत होता. परंतु त्याचा पराभव होऊन आंग्र्यानें लोहगड व राजमाची किल्ले घेतले. तेव्हां शाहू महाराजांनीं आपलें सैन्य जमा करून बाळाजीस आंग्र्यावर जाण्याचा हुकूम केला. परंतु बाळाजीनें युद्ध न करितां मोठ्या युक्तीनें आंग्र्याशीं अनुकूल असा तह केला व त्याला शाहूकडे वळवून घेतलें. ह्या तहांत सिद्दीनें जो मुलूख घेतला होता, तोही शाहू महाराजांकडे आला. ह्यामुळें सिद्दीनें आंग्र्यांचे मुलुखावर स्वारी केली. तेव्हां बाळाजी विश्वनाथ नागोजीरावांस बरोबर घेऊन सैन्यासह आंग्र्याच्या मदतीस गेला. ह्यावेळीं उभयतांनीं मोठा पराक्रम करून शिद्दीचा पराभव केला. व बाळाजी परत सातार्‍यास येऊन शाहुमहाराजांना भेटला. तेव्हां शाहूनें त्याचा मोठा सन्मान करून, त्याला इ० स० १७१४ त पेशवाई दिली.

दमाजी थोरात नांवाचा एक मराठा सरदार हिंगणगांवचे किल्ल्यांत राहून शाहूमहाराजांच्या मुलखांत फार उपद्रव करीत असे व आपणास स्वतंत्र म्हणवी. त्याचा मोड करण्याकरितां शाहू महाराजांनीं सचिवास पाठविलें होतें. सचिवानें जाऊन मोठ्या शौर्यानें युद्ध केलें; परंतु शेवटीं त्याचा पराभव होऊन तो आपल्या मुतालीकासह थोराताचे हातीं सांपडला. तेव्हां थोरातानें त्याला हिंगण–गांवच्या किल्ल्यांत प्रतिबंधांत ठेविलें. पुढें शाहूमहाराजांनीं बाळाजी विश्वनाथ व नागोजीराव पाटणकर यांजबरोबर सैन्य देऊन थोराताचा मोड करण्यास पाठविलें. प्रथमतः युद्ध सुरू केलें तर कदाचित् सचिवाच्या जीवास अपाय होईल, असें समजून बाळाजी विश्वनाथानें सचिवास सोडविण्याची तजवीज केली. नागोजीरावांनीं मोठ्या शहाणपणानें व वीरास योग्य अशी शिटाई करून सचिवाची मुक्तता करविली, नंतर युद्धास आरंभ झाला. थोरात मैदानावर युद्ध करीत असतां किल्ल्यावर जाऊन लढूं लागला. बाळाजीनें किल्ल्यावर तोफांचा मारा चालविला; परंतु बरेच दिवस आंत रिघाव झाला नाहीं. शेवटीं दरवाज्यावर मारा करून तो उडविला. तेव्हां नागोजीराव उत्कंठेनें कांहीं लोक बरोबर घेऊन वेगानें किल्ल्यांत

घुसले, ते पुढें असल्यामुळें आंतील लोक एकदम त्यांजवर तुटून पडले व कत्तल सुरू झाली. बाळाजी मागच्या बाजूस जवळच होता, पण त्यास पुष्कळ सैन्य एकदम आंत नेतां आलें नाहीं, यामुळें शत्रूच्या लोकांनीं तोंडावर हल्ला केला. नागोजीराव जिवावर उदार होऊन हळूहळू पुढें चाल करीत होते; यामुळें त्यांच्या बाजूकडील बऱ्याच लोकांना आंत घुसण्यास सवड मिळाली. पुढें कांहीं वेळ उभय पक्षांची लढाई होऊन थोरातांचा मोड झाला, व बाळाजी विश्वनाथानें त्याला धरून कैद केलें आणि किल्ल्याचा तट पाडून टाकिला.

त्या वेळेस दिल्लीच्या तक्तावर फर्रुकशेअर नांवाचा बादशहा होता, व सय्यद नांवाच्या दोघां बंधूंचें त्या दरबारीं फार वजन पडून फर्रुकशेअरला त्यांच्या मदतीनेंच गादी मिळाली होती. यामुळें त्यांचा वरचढपणा बादशहास खपत नसे. म्हणून त्यानें दोघां भावांना निरनिराळे करून दिल्लीच्या बाहेर पाठविण्याची तजवीज केली. सय्यदांपैकीं धाकटा हुसेन अल्लीखान याला दक्षिणचा सुभेदार नेमून त्याची बादशहानें रवानगी केली. व पूर्वीचा सुभेदार दाऊदखान याला गुजराथचा सुभेदार नेमून बादशहानें त्याला गुप्तपणें असें कळविलें कीं, सय्यदाला दक्षिणचा अधिकार मिळूं देऊं नये. त्यावरून पुढें उभयतांची लढाई झाली, व दाऊदखान पडला. अल्ली विजयी होऊन त्यानें शाहू महाराजांशीं तह केला. परंतु तो तह बादशहास मान्य झाला नाहीं, बादशहाची कपटकृति हुसेनअल्लीला समजतांच त्यानें त्याला पदच्युत करण्याचा निश्चय करून त्यानें मराठ्यांची मदत मागितली, तेव्हां शाहूमहाराजांनीं खंडेराव दाभाडे, नागोजीराव पाटणकर व बाळाजी विश्वनाथ यांजबरोबर सैन्य देऊन सय्यदाच्या मदतीस पाठविलें.

पुढें सय्यद मराठे लोकांसह दिल्लीस गेला. फर्रुकशेअरबादशहा युद्धविद्येत निपुण नव्हता. त्याचा थोड्याच वेळांत मोड होऊन सय्यदानें त्याला ठार मारिलें, व उभयतां बंधूंनीं महंमदशहा नांवाच्या बादशहास तक्तावर बसविलें. नंतर मराठ्यांशीं केलेला तह त्यानें पुरा करून त्यांना बादशहाकडून सनदा देवविल्या; परंतु ही गोष्ट दिल्लींतील इतर लोकांस आवडली नाहीं. त्यांनीं जमाव करून बाळाजी विश्वनाथाच्या सैन्यावर हल्ला केला व उभयपक्षीं मोठी लढाई झाली. बाळाजीनें मोठ्या युक्तीनें सनदांचें संरक्षण केलें व नागोजीराव व खंडेराव यांनीं मोठा पराक्रम करून मोंगल सैन्याचा पराभव केला, व स्वारीखर्च घेऊन ते दक्षिणेंत आले.

बाळाजी विश्वनाथाच्या मरणानंतर त्याचा पुत्र पद पावला. इ० स० १७२५ च्या सुमारास बाजीरावानें माळव्यावर प्रथम स्वारी केली, त्यावेळीं राजा गिरधर हा माळव्याचा सुभेदार होता. नागोजीराव वगैरे बरेच शूर सरदार या स्वारींत बाजीरावाबरोबर होते. बाजीरावाच्या सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्या माळव्यांत चोहोंकडे पसरल्या. राजा गिरधर यानें बाजीरावाचा प्रतीकार करण्याची बहुत खटपट केली; परंतु त्याचा उपाय चालला नाहीं. तथापि बाजीरावाच्या मनांत यावेळीं फक्त माळवाप्रांत लुटावयाचाच होता. नागोजीराव उज्जनीपासून बरेच दूर पर्यंत गेले. त्यांना द्रव्यप्राप्तीपेक्षां मुसलमानावर तरवार चालविण्याची इच्छा फार होती. यामुळें त्यांनीं अनेकवेळां मोंगल लोकांवर हल्ले केले. मुसलमानवस्तीच्या खेड्यांवर व शहरांवर त्यांचा कटाक्ष होता. उज्जनीपासून थोड्याच अंतरावर एका रानांत तलावानजीक एके दिवशीं यांनीं मुक्काम केला. त्याच तलावाच्या पाण्याच्या आश्रयावर कांहीं मोंगल घोडेस्वार पूर्वीच उतरले होते. पुढें पाण्यावरून मराठ्यांची व मुसलमानांची कांहीं बोलाचाली होऊन एका स्वारानें नागोजीरावाकडील शिपायास ठार मारिलें. त्यावरून उभयतांची लढाई सुरू झाली. शत्रुपक्षाकडे किती लोक आहेत याचा नागोजीरावांना सुमार लागला नव्हता. तरी त्यांनीं मुसलमानावर शस्त्र उचलिलें. दोन तासपर्यंत दोन्ही सैन्याचें युद्ध चाललें. नागोजीरावाकडे लोक फार थोडे होते, तरी त्यांनीं मोठ्या शौर्यानें मुसलमानावर हल्ला केला व त्यांच्या पैकीं बरेच लोक मारून कित्येक जखमी केले. व त्यांचा सर्व असबाब लुटून आपल्या लोकांस वांटून दिला. व ते बाजीरावाच्या सैन्यास मिळण्याकरितां जलदीनें निघाले; परंतु एका गांवी गांवकऱ्यांनीं त्यांच्यावर हल्ला केला. त्या गांवांत मुसलमानांची वस्ती फार होती. यामुळें त्यांनीं इतर हिंदूंस उत्तेजन आणून हा युद्ध प्रसंग आणिला. शत्रुपक्षाकडे लोकांचा जमाव फार मोठा होता, व युद्ध केल्याखेरीज गत्यंतर नव्हतें. यामुळें त्यांनीं आपले लोक बोलावून त्यांना धैर्यानें युद्ध करण्याविषयीं

उत्तेजन दिलें. व आपण पुढें होऊन शत्रुपक्षावर तुटून पडले. प्रसंग मोठा आणिबाणीचा होता. एक दोन वेळां तर त्यांना एखादी असह्य जखम होते असें वाटलें; परंतु त्यांनीं धैर्य न सोडतां मोठ्या नेटानें तसेंच युद्ध चालविलें. व शेवटीं कांहीं गांवकरी लोक पळून गेले. ह्या चकमकींत त्यांना एक लहानशी जखम झाली होती, पुढें राहिलेल्या लोकांनीं सल्ला करून त्यांना कांहीं द्रव्य दिलें. व नंतर ते फिरत फिरत मुख्य सैन्यास येऊन मिळाले व दक्षिणेंत परत आले.

नंतर कांहीं वर्षांनीं बाजीराव दिल्लीवर चाल करून गेला. त्या लढाईत नागोजीराव गेले होते. नागोजीरावांनीं बाजीरावाबरोबर कित्येक लढायांत मोठ्या बहादुरीचीं कामें केलीं. व आपल्या बाहूंचें सार्थक केलें. दंतागिरी व गुणवंतगड येथें बंडावा झाला होता, तो मोडून त्यांनीं दोन्हीं किल्ल्यांवर पुनः आपलीं ठाणीं बसविलीं. यांचें बहुतेक आयुष्य युद्धांतच गेलें. द्रव्यार्जनाकडे यांचें विशेष लक्ष नव्हतें. अनेक ठिकाणीं लढाईवर जाऊन मराठी राज्याची सेवा करावी हेंच आपलें काम आहे असें ते समजत असत. हे इ० स० १७४२ त परलोकवासी झाले.

---

## जोत्याजीराव.

( इ० स० १७४२–१७६३. )

चांदजीरावांचे पुत्र सुभानराव यांना एकच पुत्र असून त्याचें नांव जोत्याजीराव असें होतें. हे फार पराक्रमी व शूर होते. मराठ्यांच्या राज्यांत पूर्वजांनीं पराक्रमानें मिळविलेल्या जहागिरींत राहून हिस्सेरशी करीत बसणें त्यांच्या स्वभावाला आवडलें नाहीं. स्वतंत्रपणें आपल्या पराक्रमानें नवीन जहागीर मिळून लौकिक वाढवावा अशा स्तुत्य हेतूनें जोत्याजीराव निजामच्या राज्यांत गेले व त्या ठिकाणीं त्यांनीं अनेक पराक्रम करून थोड्याच काळांत तीन लक्षांची जहागिर मिळविली. हे शक्तिमान्, साहसी, व युद्धकलानिपुण होते. तरवार, बंदूक, भाला वगैरे त्यावेळीं उपलब्ध असलेल्या सर्व शस्त्रांचा उपयोग निरनिराळ्या प्रसंगीं ते मोठ्या कुशलतेनें करीत व नेहमीं बारा हत्यारें जवळ बाळगीत यामुळें यांच्याशीं युद्ध करणें इतर योध्यांस फार धोक्याचें वाटे.

जोत्याजीराव धनुर्विद्येंतही निपुण होते. त्यामुळें उंचस्थानीं हत्तीवर अंबारींत बसून कित्येक वेळां हे लढत. शाहुमहाराजांच्या कारकिर्दींत कित्येक मराठे सरदार निजामास मिळाले. त्यांपैकीं बहुतेक इकडील दरबारची इतराजी झाल्यामुळें तिकडे गेलेले होते; परंतु जोत्याजीरावांची स्थिति तशी नव्हती. यांचे बहुतेक पराक्रम निजामच्या राज्यांत झाले. त्यांनीं कोण कोणत्या प्रसंगीं कसकशीं शौर्याचीं कामें केलीं, त्याबद्दल खुलासेवार माहिती मिळत नाहीं. ह्यांच्या ठिकाणीं शारीरिक शक्ति जबर होती. लक्ष्मी नांवाचें हातांतील शस्त्र ( खड्ग ) फार तेजस्वी व अमोलिक असून तें त्यांनीं आपल्या बहुतेक हयातींत वापरल्यामुळें त्यावेळीं शेंकडों लोकांचें काळखड्गच झालें होतें. हल्लीं हें शस्त्र त्यांच्या वंशजांजवळ आहे. एके दिवशीं निजामानें छावणींत एका मोठ्या, विस्तीर्ण, तंबूमध्यें मोठा दरबार भरविला होता. सर्व सरदार मानकरी, अमीर उमराव, मुसलमान व मराठे त्या वेळीं आप आपल्या दर्जाप्रमाणे स्थानापन्न झाले होते. जोत्याजीराव व रणनवरे सुभानराव हे तंबूच्या खांबाशी बसले होते. रणनवरे हा निजामच्या दरबारीं पराक्रमी व सशक्त म्हणून नावांजलेला होता व त्याला शक्तीची बढाई फार होती. जोत्याजीरावांनीं बसूनच सहज थट्टेनें तंबूचा खांब उचलून सुभानरावांच्या आंगरख्याच्या घोळावर ठेविला. दरबार ऐन भरांत आल्यावर कांहीं कारणानें रणनवरे उठून उभे राहू लागले; परंतु आंगरखा खांबाखालीं अडकल्यामुळें त्याला उठतां आलें नाहीं. तो अर्धवट उठून बसल्यामुळें सर्व दरबारी लोकांचें लक्ष त्यांच्याकडे जाऊन त्याचा हिरमोड झाला. तेव्हां जोत्याजीरावांनीं पुनः तो खांब उचलून आंगरख्याच्या घेराच्या बाहेर ठेविला. परंतु ह्या गोष्टीनें रणनवरे याला आपल्या आपमानाबद्दल विषाद वाटून तो जोत्याजीरावांचा द्वेष करूं लागला.

पुढें एके प्रसंगीं रणनवरे सुभानरावानें आपले अपमानाचा सूड घेण्याकरितां जोत्याजीरावाशीं युद्धप्रसंग आणिला. व उभयपक्षांचें मोठ्या निकरानें युद्ध होऊन दोघे खासे वीर समोरासमोर लढूं लागले. खवळलेल्या भयंकर वाघाप्रमाणें ते दोघे एकमेकांचें प्राण हरण करण्यासाठीं आपआपल्या शस्त्रांचे प्रहार करूं लागले. दोन्हीं पक्षांकडील वीर चकित

होऊन वैरभाव विसरून त्यांच्या सामन्याकडे लक्ष देऊन पाहूं लागले. अशा रीतीनें युद्ध बराच वेळ झालें. परंतु शेवटीं जोत्याजीरावांची आयुर्मर्यादा सरून ते पडले. ही गोष्ट इ० स० १७६३ सालीं झाली.

## जानराव.

इ० स० १७४२-१८०२.

नागोजीराव कैलासवासी झाल्यावर त्यांचे पुत्र जानराव पाटणच्या व इतर जहागिरीचे अधिकारी झाले, शाहू महाराज निवर्तल्यावर पुणें ही पेशव्यांची राजधानी झाली. तेव्हांपासून जानराव बहुधा पुणें दरबारीं असत, व वारंवार अनेक लहान मोठ्या स्वाऱ्यांबरोबर जाऊन आपल्या बाहुबलाचें सार्थक करीत, इ० सन १७५३ च्या सुमारास बाळाजी बाजीरावानें कर्नाटकांत स्वारी करून श्रीरंगपट्टणपर्यंत चाल केली, ह्या स्वारींत जानराव पाटणकर यांनीं मोठा पराक्रम केला. बहुली ओनोरचा किल्ला सर करण्यांत आपलें क्षात्रतेज दाखवून त्यांनीं मराठे लोकांस व शत्रुपक्षास चकित करून सोडिलें. पुढें इ० सन १७५६ सालीं पेशव्यानें पुनः कर्नाटक प्रांत सर करण्याचा निश्चय करून श्रीरंगपट्टणावर चाल केली, त्यावेळीं म्हैसूरच्या राजाचा दिवाण नंजीराज यानें बंड करून त्या शहरांत स्वतंत्रपणें कारभार करीत होता, पेशव्यांनीं श्रीरंगपट्टणास वेढा घालून तोफांचा मारा सुरू केला व दिवाणाकडे वकील पाठवून बहुत द्रव्य व मूलूख मागितला. परंतु त्यानें त्या मागणीचा धिक्कार करून लढाई सुरू केली. पूर्वीच्या स्वारींत पराक्रम केल्यामुळें पेशव्यानें जानरावांस आणखी एक हजार स्वारांचें प्रमुखत्व दिलें होतें. शहराचा सर्व परिघ तोफांच्या माऱ्यांत रहावा इतक्या तोफा त्यावेळीं मराठ्यांच्या सैन्यांत नव्हत्या. ह्यामुळें मुख्य ठिकाणीं तोफा लावून बाकीचा भाग फौजेंतील सैन्यानें घेरला होता. खेरीज त्या प्रांतांतील इतर लहान लहान मुसलमान नबाब आपआपल्या लोकांनिशीं बाहेरून हल्ले करीत. व शहरांतून शत्रुपक्षाचे लोक गोळ्या घालीत. अशाप्रकारें पेशव्यांच्या सैन्याला दोहों बाजूंनें त्रास सोसावा लागला. जानराव ज्या बाजूकडे होते. त्या बाजूवर तोफा नव्हत्या. शहरांतून धान्य वगैरे आणण्याकरितां बाहेर जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या टोळ्या आंतून वारंवार हल्ले करीत. तथापि जानराव त्यांना दाद देत नसत. नंतर एके प्रसंगीं शहरावर नेटानें हल्ला चालला असतां कांहीं मुसलमान लोक दुसऱ्या बाजूनें जानरावांवर तुटून पडले. इकडे लढाई जोरानें चालल्यामुळें, शहरासभोंवतीं असलेली सर्व फौज युद्धांत गुंतली होती, यामुळें जानरावांच्या मदतीस त्या गर्दींत कोणाच्यानें जाववलें नाहीं तथापि त्यांनीं न भितां आपल्या स्वारांपैकीं पांचशें स्वारांसह उलटून मुसलमान लोकांवर मोठ्या नेटानें हल्ला केला. शत्रुपक्षाकडील बरेच लोक पडले. व तरवारीनें हातघाई सुरू झाली, तेव्हां मुसलमान माघार घेऊं लागले. जानरावांस युद्ध सोडून त्यांचा पाठलाग करण्यास सवड नव्हती. तथापि त्यांनीं मोठ्या नेटानें पुढें होऊन त्यांना हुसकून लाविलें. व ते पुनः परत फिरून आपल्या कामावर हजर झाले. पुढें नंजीराज यानें आपणांस जय मिळत नाहीं, असें पाहून पेशव्यांशीं तह केला. व पांच लक्ष रुपये रोख देऊन बाकीची रक्कम पोंचेपर्यंत कांहीं मुलूख ताब्यांत दिला. नंतर बाळाजीनें सर्व कर्नाटकप्रांत आपल्या ताब्यांत घेण्याचा बेत करून शेग परगणा हस्तगत केला; पण पर्जन्यकाळ समीप आल्यामुळें बाळाजी बाजीराव आपलें खाजगत सैन्य घेऊन पुण्यास यावयास निघाला व बाकीचें सैन्य बळवंतराव मेहेंदळे यांच्या ताब्यांत देऊन त्यांना उसकटा, बंगलोर, बाळापूर, कोल्हापुर वगैरे प्रांत हस्तगत करण्यास कर्नाटकांत ठेविलें. बळवंतरावाबरोबर खास फौज फार थोडी होती; परंतु कित्येक जहागिरदार व सरदार लोक आपआपल्या आपखुषीनें राहिले असून, बळवंतरावांचें प्रमुखत्व यांनीं कबूल केलें होतें.

जानराव कर्नाटकांत राहिले. कडप्पाच्या नबाबांशीं लढाई करून बळवंतरावानें उसकटा परगणा घेतला. व अर्काटचे नबाबाच्या मुलखांतील चौथ व सरदेशमुखीबद्दल बळवंतरावानें मागणें केलें. इंग्लिश लोकांनीं या कामीं नबाबाच्या तर्फे मागणी केली, परंतु तिचा उपयोग झाला नाहीं. नबाबानें आपल्या मुलखांतून अडीच लक्ष रुपये वसूल करून घेण्याची मराठ्यांस परवानगी दिली. नंतर कडपा व करनोलच्या नबाबांनीं एकत्र होऊन मराठ्यांशीं युद्धप्रसंग आणिला. व मोठी भयंकर लढाई झाली. ह्या लढाईंत जानरावांनीं अतिशय पराक्रम केला, व कडपाचा नबाब युद्धांत मारला

गेला, व बळवंतराव व जानराव विजयी होऊन त्यांनीं खडपा शहर लुटिलें. तथापि नबाबाच्या लोकांनीं सहज रीतीनें तो मुलूख मराठ्यांस मिळूं दिला नाहीं. ह्यावेळेस कित्येक लहान मोठ्या लढाया झाल्या, त्यांमुळें मराठे लोकांना आपल्या सैन्याच्या तुकड्या करून लढावें लागलें. जानरावांनीं स्वतंत्रपणानें कांहीं लोक बरोबर घेऊन दोन तीन लहान लहान लढाया मारिल्या व जय मिळविले. ह्यापैकीं एका लढाईत त्यांनीं अवर्णनीय धैर्य दाखवून क्षात्रतेजानें शत्रुपक्षास दिपवून टाकिलें. जानराव एके राइंत रात्रीचे मुक्कामास उतरले असतां, मुसलमान लोकांनीं अकस्मात् येऊन चोहींकडून त्यांच्या लोकांस वेढा दिला, जानराव बेफाम नव्हते, शत्रुपक्षाची चाहूल कळतांच त्यांनीं आपल्या लोकांस इशारत देऊन ते आपला गोट आंवळून तयार झाले. परंतु बाहेरून मोठा गराडा पडल्यामुळें त्यांना मार्ग मिळेना. तथापि न डगमगतां त्यांनीं एका बाजूनें मार्ग काढण्याच्या इरायानें आपला मोरच्या फिरविला व तरवार हातांत घेऊन ते शत्रूवर तुटून पडले. हें पाहतांच त्यांच्या लोकांना धैर्य येऊन तेही पाठोपाठ निघाले. मुसलमान लोकांनीं त्यांना अडविण्याचा फार प्रयत्न केला; परंतु ह्यांच्या तरवारीपुढें उभें राहणें अशक्य होऊन शेंकडों लोकांची कत्तल करून ते फळी फोडून निघून गेले. ह्या वेळेस त्यांचे बरेच लोक मेले.

नंतर सावनूरच्या नबाबाशीं लढाई होऊन, त्यांत नबाबाचा पराभव झाला व बळवंतराव मेहेंदळे आणि जानराव वगैरे सरदार परत महाराष्ट्रांत आले.

पुढें इ० स० १७६० सालीं भाऊसाहेब पेशवे यांनीं निजामावर स्वारी केली व उद्गीर मुक्कामी मोठी लढाई होऊन निजामाचा पराभव झाला, व ६२ लाखांचा मुलूख पेशव्यास मिळाला, ह्या लढाईत जानराव यांचे फार शिकस्तीचे श्रम व शौर्य दिसून आल्यामुळें पेशव्यांच्या दरबारीं त्यांची मोठी वाहवा झाली.

ही लढाई झाल्यावर थोड्याच दिवसांनीं म्हणजे इ० स० १७६१ सालीं पानिपत येथें मराठे व अहमदशहा अबदाली यांचेमध्यें भयंकर युद्धसंग्राम झाला, या युद्धांत निरनिराळ्या वेळीं कित्येक लढाया होऊन त्यांत मराठ्यांचा जय झाला. व शेंकडों महाराष्ट्रवीरांनीं आपला पराक्रम दाखविला. जानराव ह्या लढाईत असून त्यांनींही आपल्या शक्तीप्रमाणें कर्तबगारी दाखविली. परंतु सरतेशेवटीं मोठी लढाई होऊन त्यांत मोठमोठ्या नामांकित वीरांच्या पराक्रमांचा यदृच्छेनें कांहीं एक उपयोग न होतां, मराठ्यांचा पराभव झाला व शेंकडों वीर समरदेवतेस बळी पडले. भाऊसाहेब पेशवे, विश्वासराव, जसवंतराव पवार, समशेरबहादूर, वगैरे सरदारांनीं आपली कीर्ति अजरामर केली. व राहिलेले लोक नाइलाजास्तव परत फिरले. त्यांत जानजीरावही त्या लोकांबरोबर परत आले. या युद्धांत मराठ्यांचा फार नाश झाला. बाळाजीराव पेशवे, भाऊसाहेब व विश्वासराव यांच्या मरणानें दुःखित होऊन थोड्याच दिवसांनीं मरण पावले. तेव्हां रघुनाथरावानें त्यांचा दुसरा पुत्र माधवराव यांच्या नांवें पेशवाईचीं वस्त्रें आणवून आपण मुकत्यारीनें कारभार करूं लागला. माधवराव अल्पवयी होता तथापि दूरदर्शी व शूर असल्यामुळें त्यानें आपलें स्वातंत्र्य राखण्याची योग्य वेळीं खबरदारी घेतली. त्यामुळें रघुनाथरावाचें व माधवरावाचें ऐक्य नाहींसें झालें. ही संधि पाहून निजामानें युद्धाची तयारी करून कित्येक मराठे सरदारांस आपणाकडे वळवून घेतलें. हें पाहून रघुनाथरावानें इ० स० १७६३ सालीं निजामावर स्वारी केली. उभय सैन्यांची गांठ राक्षसभुवन येथें पडली व लढाई सुरू झाली. माधवराव पेशवे प्रथमतः युद्धांत नव्हता. तो कांहीं निवडक लोकांसह समरभूमीपासून दोन कोस अलीकडे असून तेथून युद्धाची बातमी काढीत होता. जानराव त्यांच्या बरोबर होते. या युद्धांत निजामाचा दिवाण राजे विठ्ठल सुंदर याच्या पराक्रमानें रघुनाथरावाचा मोड होऊन तो शत्रूच्या हातीं सांपडण्याचा प्रसंग आला होता. ही बातमी माधवराव याला कळतांच त्यानें जानराव व इतर मराठे लोकांस विचारिलें कीं, आपण दूर राहून पराभवाचें वर्तमान ऐकावें हें योग्य आहे काय ? त्यावेळीं जानरावांनीं उत्तर केलें कीं, आपली इच्छा असेल तर आम्हीं सर्व एकजुटीनें शत्रुसैन्यावर तुटून पडून त्यांची धुळधाण करण्यास तयार आहों. हें ऐकून माधवरावानें घोड्याचा लगाम उचलून सर्वांना इशारत दिली व ते भरधांव घोडे टाकीत मोठ्या वेगानें सैन्याच्या मध्यभागीं आल. यामुळें मराठे लोकांना अवसान येऊन निजामाच्या सैन्याचा सर्वस्वी मोड

होऊन ते लोक सैरावैरां धावूं लागले. ह्या लढाईंत जानरावांच्या तरवारीनें शेकडों लोकांस यमसदन जवळ केलें.

नंतर इ० स० १७६७ सालीं माधवरावानें स्वतः कर्नाटकावर स्वारी करून, शेरा, उसकटा वगैरे प्रांत घेऊन हैदरापासून ३० लक्ष खंडणी व इतर नबाबापासून बहुत द्रव्य घेऊन तो परत आला. पूर्वीच्या लढाईंत जानरावांनीं बहुत पराक्रम केल्यामुळें माधवरावानें त्यांना ह्या स्वारींत मुद्दाम आपणाबरोबर नेलें होतें.

पाटणकर घराण्यांतील बहुतेक पुरुष युद्धकलेंत निपुण असून धैर्यवान् होते. एके प्रसंगीं माधवराव व नारायणराव पुण्यानजीक गुलटेंकडीजवळ तंबूमध्यें हत्तींचा खेळ पहावयास बसले होते दोन मदोन्मत्त हत्ती एकमेकांपाशीं त्वेषानें सामना करीत असतां, त्यांपैकीं एक हत्ती आपल्या प्रतिस्पर्द्धयाला सोडून इकडे तिकडे धावूं लागला. त्यावेळेस प्रेक्षकांची अगदीं गाळण उडून गेली. भालाईत त्याला अडविण्याचा प्रयत्न करूं लागले, परंतु त्यांच्या प्रयत्नाचा कांहींएक उपयोग न होतां तो मोठ्या जोरानें माधवराव, नारायणराव वगैरे खाशी मंडळी बसली होती, त्या तंबूकडे येऊं लागला हें पाहून नारायणराव भिऊन आंत जाऊ लागला परंतु माधवरावानें त्याचा हात धरून खालीं बसविलें, व तो नारायणरावास म्हणाला,–"आखबारनीस तुझ्या भित्रेपणाबद्दल दोष देतील. मरणास भिऊन भित्रेपणाचा दोष घेणें बरोबर नाहीं." हें ऐकून नारायणराव खालीं बसला व पुढें हत्ती अगदीं जवळ आला. इतक्यांत आप्पाजीराव पाटणकर यांनीं मोठ्या धैर्यानें हत्तीकडे धांवत जाऊन आपला खंजीर त्याच्या सोंडेंत मोठ्या शिताफीनें खुपसला व त्यामुळें हत्ती चीं चीं करीत निघून गेला.

आप्पाजीराव हे चांद्‌जीरावाचे नातू असून पेशव्यांच्या पदरीं शिलदारी करीत असत. पेशव्यांच्या बखरींत ही गोष्ट निराळ्या रीतीनें लिहिली आहे. खंडेराव दरेकर व हिरोजीराव पाटणकर ह्या दोघांनीं हत्ती फिरविला. दरेकर यांच्या हातांत सांग ( भाला ) असून पाटणकर यांजवळ तरवार होती; त्यांनीं आपआपल्या शस्त्रांचा उपयोग करून हत्ती मागें फिरविला, ह्या कामगिरीबद्दल माधवराव पेशवे यांनीं पाटणकर यांना चौघडा व दरेकर याला सरलष्कर असा किताब दिला. हिरोजीराव हे चांद्‌जीरावाचे बंधु हणमंतराव यांचे पुत्र होत. पण हे हिरोजीराव नसून आपाजीरावच असले पाहिजेत. कारण वंशावळीचा मेळ घातला म्हणजे हें दिसून येतें. मूळ चांद्‌जीराव यांचे बंधु हणमंतराव. चांद्‌जीराव यांस तीन पुत्र रामराव, सुभानराव, ह्यारकोजीराव, तसेंच हणमंतराव यांस पुत्र तीन, हिरोजीराव, ह्यारकोजीराव, व धारराव हा हिरोजी चांद्‌जीरावाचा मुलगा रामराव यांच्या समकालीन असल्यामुळें, हा तो नव्हे हें सिद्ध होतें. म्हणून यावरून ह्यारकोजीरावांच्या तीन पुत्रांपैकीं, आप्पाजीराव हेच हे शिलेदार होत. हे आपाजीरावच असल्याबद्दल ग्रँटडफनें ही मराठ्यांच्या इतिहासामध्यें लिहिलें आहे.*

चांद्‌जीरावांचे बंधु हणमंतराव यांचे पुत्र धारराव पाटणकर यांच्या संबंधानेंही बरीच माहिती मिळते. धारराव पाटणकर हे शाहू महाराजांच्या पदरीं सरदार असून, त्यांनींही बरींच मर्दुमकीचीं कामें केलेलीं आहेत. यांचे वडील हणमंतराव हे चांद्‌जीराव ज्यावेळीं मराठ्यांस येऊन मिळाले त्याच वेळीं इकडे आले असावे. धारराव हे फौजबंद असून शाहू महाराजांचा त्यांजवर विश्वास होता व त्यांच्या मर्दुमकीबद्दल त्यांस खात्री वाटत होती. इ० स० १७८२-८३ अर्बैन मया व अलफ रबिलावल १८ चें एक पत्र उपलब्ध झालें आहे, त्यावरून धाररावांची बरी कामगिरी दिसून येईल.

---

* There is a well-known Poona anecdote, which, though oftener told of Mahadeo rao, was one from which the latter used to say his brother would become an enterprizing officer. While spectators of a Elephant fight at the Gooltekree, a small hill in the environs of the city, one of the animals, when enraged, came full speed towards the spot where they sat. Most of the attendants, and all the principal people, whose fears overcame their politeness for the Peshwa, hurried off, and Narainrao jumped up to run with the rest. Mahdoo Rao caught his arm—"Brother," said he, "What will the Ukhbars say of you?" He instantly sat down with composure, and the danger, which became imminent, was averted by the extraordinary bravery of a Maratha Sillidar named Appajee rao Pahtunkur, who, drawing his dagger, sprung in front of the Peshwa, and turned the animal aside, by wounding him in the trunk.

Grant Duff's History Page 703.

" कित्तापत्रें चिटनिशी तीथवार छ० मजकूर राजश्री धारराऊ पाटणकर यांस आज्ञा केली ऐसीजेः– तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. महाराजांची आज्ञा घेऊन स्वार जाहलां ते राजश्री हिंदुराज घोरपडे ममलकत मदार यांची भेट घेतली. पुढें त्रिचनापल्लीकडे जाण्याचा विचार आहे म्हणून लिहिलें. ऐसीयास निजामउल्मुल्क त्रिचनापल्लीस जाऊन बैसला आहे. तेथील उपराळ्यास जावयाची आज्ञा राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलकतमदार यांस केली आहे. ते फौजेसहवर्तमान जातील. त्यासमागमें तुम्हीं फौजेसहवर्तमान जाऊन तेथील उपराळा करून आपले सेवेचा मजरा करून घेणें म्हणून पत्र."

शाहूमहाराजांची रोजनिशी
पत्र नं० ७३ A पृष्ठ २९.

ह्या पत्रावरून त्रिचनापल्लीकडील लढाईत धारराव हे होते, ह्यांनीं त्या प्रांतीं बरीच मर्दुमकीचीं कामें केलेलीं असावींत; परंतु उपलब्ध साधनांच्या अभावीं कांहींच लिहितां येत नाहीं. चांदजीराव व हणमंतराव हीं दोनही घराणीं निरनिराळीं होऊन पुढें विभक्त झालेलीं असावीं व त्यांच्यांत वितुष्ट माजलें असावें असें दुसऱ्या एका पत्रावरून दिसून येतें. इ० स० १७५२-५३ चें एक पत्र उपलब्ध झालें आहे, त्यावरून चांदजीरावांचे पुत्र रामराव व हणमंतरावाचे पुत्र धारराव यांच्यामध्यें वितुष्ट आलेलें असून, रामरावांच्या मृत्यूनंतर त्यांची पत्नी राजसबाई पाटणकर यांनीं छत्रपतीस धाररावाच्या धांदलीबद्दल पत्र लिहिलें असून, त्याचें महाराजांकडून जें उत्तर आलें तें चिटणीशी पत्र याखालीं दिलेले आहे. यावेळीं शाहूमहाराज हयात नव्हते. रामराजे हे गादीवर होते.

इ० स० १७५२–५३ सलास सुरुसैन
मया व अलफ मोहरम १३.

'राजसबाई पाटणकर यांसी आज्ञापत्र जे, तुम्हीं विनंतिपत्र पाठविलें, लिहिलें वर्तमान विदित जाहालें. कित्येक आपले एकनिष्ठेचा अर्थ लिहिला ऐशियास तुम्हीं पुरातन सेवक एकनिष्ठच आहां. यानंतर धारराव पाटणकर यांणीं संभापूर पेठेंतून उदमी नागविले म्हणून लिहिलें तर तुम्हीं व ते भाऊबंद आहां, आपल्यामध्येंच समजावें हें उत्तम आहे; दरबारीं या गोष्टी कार्याच्या नाहींत. राजश्री धारराव यांसही आज्ञापत्र सादर केलें असे म्हणून पत्र छ ११ मोहोरम १ "

" राजश्री धारराव पाटणकर यांसी आज्ञापत्र जे, संभापूर येथील पेठेंत बाजारास कसबे पाटण येथील लोक व कुळें, कासार, शिंपी व साळी वगैरे कुळें जातात, त्यांस तुम्हीं धरून नेऊन अटकाव करून मारामार करतां म्हणून विदित जाहलें. दरम्यान मुलखांत नानाप्रकारच्या टंगाईच्या गोष्टी कोणी केल्या त्यांस हुजुरून पारिपत्य करावें, परंतु हें वर्तमान तुम्हांकडून न व्हावें, आणि तुम्हीं लोक एकनिष्ठ सेवक पुरातन राज्यांतील, यावरून हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर देखत आज्ञापत्र जीं कुळें नेलीं असतील तीं सोडून देणें. एकघडी उजूर न करणे. फिरोन आपला कमावीसदार अगर दिवाण असतील त्यांस ताकीद करणें जे. ऐसी मनस्वी वर्तणूक न करीत. फिरोन बोभाट येऊं न देणें. म्हणून पत्र छ ११ माहरमे १.

शाहूमहाराजांची रोजनिशी
पत्र नं० ३१८ पृष्ठ १८७–१८८.

माधवरावांच्या मरणानंतर रघुनाथरावानें नारायणरावास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. परंतु पुढें थोड्याच दिवसांनीं गारद्यांचा मुख्य सुमेरसिंग यानें त्याचा शनवारच्या वाड्यांत खून केला. गारद्यांनीं वाड्यांत प्रवेश केल्यावर सर्व सरदार, मानकरी व मुत्सद्दी वगैरे पेशव्यांच्या बचावाचा विचार करण्याकरितां कोतवालचावडींत जमले होते, त्यांत जानराव पाटणकर व आप्पाजीराव पाटणकरही गेले होते.

पुढें नारायणरावाच्या मरणानंतर रघुनाथराव पेशवे झाले, परंतु नाना फडणीस, हरिपंत फडके वगैरे मुत्सद्यांनीं रघुनाथरावाविरुद्ध कट करून नारायणरावाचा पुत्र सवाई माधवराव यांच्या नांवें पेशवाईचीं वस्त्रें आणविलीं. व रघुनाथरावाचा बंदोबस्त करण्याचा ठराव केला. रघुनाथराव त्यावेळीं गुजराथेंत होता, कारभाऱ्यांनीं हरिपंत फडके यांजबरोबर ३७ हजार स्वार देऊन त्यांस रघुनाथरावाचा बंदोबस्त करण्याचें काम सांगितलें, व त्यांचेबरोबर जानराव पाटणकर यांना जावयास सांगितलें. रघुनाथरावाला ही बातमी समजतांच त्यानें आपला मोर्चा हरिपंताच्या सैन्याकडे फिरविला दोन्ही सैन्यांची गांठ वासदा येथें पडून मोठी लढाई झाली व शेवटीं रघुनाथरावाचा पराभव होऊन

तो कांहीं निवडक स्वार बरोबर घेऊन खंबायतेकडे पळून गेला. ह्या लढाईंत जानरावांनीं मोठा पराक्रम केला व वळोवेळीं हरिपंत याला पोक्त सल्ला मसलत दिल्यामुळें कारभारी मंडळीनें सवाई माधवरावांच्या नांवे त्यांना नंबर १८९ चें बहादुरी पत्र दिलें.

सवाई माधवरावांच्या लग्नसमारंभास जानराव पाटणकर यांना निमंत्रण आल्यामुळें, ते त्या विवाहाच्या मंगलकार्यास गेले होते, व त्या ठिकाणीं त्यांचा योग्य सत्कार झाला.

महादजी शिंदे हिंदुस्थानांतून पुण्याच्या दरबारीं कारभार करण्याच्या इच्छेनें पुण्यास आले, त्या वेळेस रंग खेळण्याच्या मोठ्या समारंभास जानराव व बहिरोजीराव पाटणकर हेही गेले होते. त्यांना मनांतून अशा प्रकारचा समारंभ होऊन तोफांच्या गोळ्यांऐवजीं गुलालाचे गोळे लीलेनें उडवावे व राजधानीच्या शहरांत गुलालाच्या लाल पाण्याचे पाट वहावे असें मुळींच नव्हतें, परंतु महादजीच्या मर्जीपुढें, वृद्ध व अनुभवशीर शहाण्या मनुष्यांच्या दूरदर्शी विचारांचाही त्यावेळेस कांहीं उपयोग होण्याचा संभव नव्हता.

इ० स० १७९५ सालीं निजामाबरोबर पेशवे यांनीं खर्डे येथें मोठी लढाई देऊन त्यांत निजामाचा पराभव करून टाकला. जानराव ह्या लढाईंत गेले असून त्यांनीं वृद्धावस्थेंत सुद्धां फार पराक्रम केला. पुढें इ० स० १८०२ सालीं बादामीच्या स्वारींत जानराव हे पेशव्याचे तर्फेनें लढत असतां धारातीर्थीं पतन पावले.

---

## नागोजीराव.

( इ० स० १८०२–१८२२ ).

श्रीमंत जानराव यांना अपत्य नव्हतें, यांना दोन स्त्रिया असत. त्यांची वडील पत्नी रमाबाईसाहेब ( बयासाहेब ) ह्या तारळेकर महाडिक यांची कन्या. यांनीं आपल्या पतीच्या मरणानंतर ठ्राकोजीराव यांचे पुत्र नागोजीराव यास, या बाईनें इ० स० १८०२ यासालीं दत्तक घेतलें. जानराव हे राक्षसभुवनामध्यें ( खर्ड्याच्या लढाईंत ) धारातीर्थीं पडले, [ स्वर्गवासी झाले,] त्यावेळेपासून जहागिरीचें सर्व कामकाज बयासाहेब ह्याच पहात होत्या. बयासाहेब ह्या परमधार्मिक व सदाचारी आणि पापभीरुही असत, व त्या महासाध्वीही होत्या. यांच्या सद्गुणाबद्दल बऱ्याच अनुभवाच्या गोष्टी पाटण तालुक्यांतील सर्व लोकांच्या तोंडून अद्यापिही ऐकूं येत आहेत. यांच्या आंगीं पूर्ण ईश्वरभक्ति असल्यानें सर्व लोक यांना देवतेप्रमाणें मानून दिवसेंदिवस यांच्या भक्तीस लागूं लागले, कित्येक लोक नवस करूं लागले, आणि त्यांच्या भावनेप्रमाणें फलही त्यांस येऊं लागलें. त्यांपैकीं एक गोष्ट वाचकांपुढें ठेवितों.—

पाटणतालुक्यांत राहणारा नाथा खांडके शिंपी हा साताऱ्याहून व्यापाराकरितां पैठण्या, शालू वगैरे सणगें घेऊन पर्जन्यकालांत येत असतां, वाटेंत उरमोडी नदीच्यामध्यें आला असतां, अकस्मात् नदीच्या पाण्याचा लोंढा येऊन त्या शिंप्याचा बैल व ओझीं ( सणगांचीं दिंडें ) पाण्याच्या वेगानें वहात जाऊन हाही शिंपी गंटगळ्या खाऊं लागला, त्यावेळीं दीनस्वरानें पाटणच्या या साध्वीबाईस, हे बयासाहेब! या संकटांतून मला आपण काढा, आपल्यावांचून माझें संरक्षण करणार यावेळीं कोणी दिसत नाहीं, करितां मी आपल्यास शरण आहे, तर माझें तारण करावें, [ तारावें, ] अशी खऱ्या प्रेमानें व भक्तिपूर्वक हांक मारिली. त्यावेळीं अकस्मात् एक पांढरें पातळ नेसून तेजःपुंज बाई तेथें येऊन तिनें या शिंप्यास पैलतीरीं काढिलें, त्याचप्रमाणें त्याचीं सर्व सणगें व बैल तीराला येऊन लागला, अशा भयंकर प्रसंगांत त्याचें कांहीं–एक नुकसान न होतां, त्याचें सर्व कापडाचें दिंड त्यास मिळालें, तेव्हां मोठ्या आनंदानें बयासाहेब ह्या नवसास पावल्या, आणि त्यांनीं आपल्या प्राणाचें रक्षण केलें, असें मनांत आणून दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रहर दिवसाच्या सुमारास बयासाहेब ह्या पूजा करीत बसल्या असतां, ह्या शिंप्यानें दीडशें रुपये किंमतीची एक पैठणी आणून बयासाहेब यांच्यापुढें ठेवून साष्टांग नमस्कार घातला. त्यावेळीं तेथें असणारीं देवघरचीं मंडळी व दिवाण, फडणीस आणि सबनीस वगैरे मंडळीनें त्या शिंप्यास हें काय ? व ही पैठणी बयासाहेब यांचे पुढें कां आणून ठेविलीस? वगैरे विचारिलें, तेव्हां त्या शिंप्यानें वरील सर्व वर्तमान सांगितलें, म्हणजे मी पाण्यांत बुडत असतां, बयासाहेब यांना अनन्यगतीनें हांक मारिली, तेव्हां मला त्या

संकटांतून बयासाहेब यांनीं काढिलें, आणि माझें संरक्षण केलें; करितां ही पैठणी मी अर्पण करण्याकरितां आलों आहें;. तेव्हां बयासाहेब यांनीं सांगितलें कीं, बाबा ! आम्हांसारखे मनुष्य नवसास पावतात काय ! व मी येऊन पाण्यांतून तुला काढिलें म्हणतोस हें कसें सत्य समजावें वगैरे भाषण केलें. असो; ही पैठणी तूं परत घेऊन जा, त्यावेळीं तो म्हणाला कीं, ही पैठणी मी परत घेऊन कधींही जाणार नाहीं, आपण वाटेल ती या पैठणीची व्यवस्था करावी. मी पैठणी परत नेणार नाहीं, असें ऐकतांच बयासाहेब यांनीं पाटण गांवीं असलेले श्रीविठ्ठलमंदिरांत श्रीरखुमाबाईस ती पैठणी दिली, ती अद्याप श्रीरखुमाबाईच्या अंगावर आहे,

याचप्रमाणें त्यांच्या कीर्तीचीं उदाहरणें हजारों पाटण तालुक्यांत आहेत. व त्या बाईसाहेब अद्यापि नवसास पावत असतात, व न्यायासनाच्या ठिकाणीं ( कोर्टापुढें ) यांच्या शपथा घेत असतात, व त्यांच्या न्यायासंबंधानें ( न्यायकर्तृत्वासंबंधानें ) ही पुष्कळ गोष्टी घेण्यासारख्या त्यांनीं केल्या आहेत. त्यांना सर्व प्रजाजन देवतेप्रमाणें मानीत असत. या बाईचा जेव्हां देहान्त झाला, त्या वेळीं दहनानंतर दुसऱ्या दिवशीं चितेंत पाहतात तों पांच निऱ्या दग्ध न होतां, जशाच्या तशाच राहिल्या होत्या, याप्रमाणें या बाई अद्भुत पुण्यशील अशा होत्या. अद्यापिही या पाटण तालुक्यांतील सर्व लोक आपल्या इच्छित कार्यसिद्धीकरितां, बयासाहेब यांना नवस करित असतात.

हल्लींचे श्री० नागोजीराव बाबासाहेब यांनीं बयासाहेब यांची छत्री अलिकडे नवीन बांधून, तिच्यापुढें सुशोभित दिव्य मंडप बांधिला आहे व त्याच्या सभोंवतीं रमणीय असा उत्तम बगीच्याही केला आहे आणि या छत्रीची पूजा, नंदादीप, नैवेद्य वगैरे उत्तम तऱ्हेनें चालू आहेत.

ह्या बयासाहेब सद्गुणी व साध्वी असल्यामुळें, यांचे हयातींत सातारचे महाराज श्रीमंत छत्रपति बुवासाहेब व आप्पासाहेब हे वारंवार भेटण्याकरितां येत असत.

ह्या बयासाहेब इ० स० १८३८ त स्वर्गवासी झाल्या. यांच्या सापत्नी [ सवत ] जिजाई म्हणून होत्या, ह्याही मोठ्या साध्वी व पुण्यशील आणि सदाचारी असून, या बयासाहेब यांच्या अनुज्ञेंत वागत असत.

श्रीमंत जानरावांचे पुत्र नागोजीराव यांचा विवाह कोल्हापूरच्या श्रीमंत शिवाजी महाराज छत्रपति यांची कन्या चिमाबाई आक्का यांच्याशीं इ० स० १८०९ सालीं झाला. पुढें इ० स० १८११ त सातारच्या महाराजांनीं इनामदार, जहागिरदार व इतर श्रीमान् लोकांची यादी केली, त्या वेळीं त्या यादींत नागोजीराव यांच्या नांवें ४३ गांवें इनाम जहागीर असल्याबद्दल सातारच्या दप्तरांतील फेरिस्त रुमाल नंबर ३६७ यांत दाखला आहे.

दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत मराठी राजवृक्ष डळमळूं लागल्यामुळें, लहान मोठ्या शूर सरदारांना व पराक्रमी पुरुषांना आपली नैसर्गिक क्षात्रतेजदीप्ति विचारानें व औदासीन्यानें आच्छादित करून निरुपायास्तव स्वस्थ बसणें भाग पडलें. त्यामुळें, त्यांच्या कारकीर्दींत नागोजीरावांना आपला खरा पराक्रम दाखविण्याची संधि आली नाहीं. तेव्हां अर्थात्च ते वडिलोपार्जित जहागिरीचा उपभोग घेत पाटण, सातारा, वगैरे ठिकाणीं राहिले होते. पुढें इ० स० १८१८ सालीं पेशव्यांनीं इंग्रजसरकारच्या हवालीं सर्व राज्यसूत्रें करून देहाचें सार्थक करण्याकरितां किंवा भीरुत्वाचा परिणाम भोगण्याकरितां ह्मणा–यांनीं ब्रह्मावर्ती गमन केलें. यामुळें सर्व राज्यसत्ता इंग्लिशांस मिळाली. त्यावेळीं ग्रान्ट डफ साहेब रेसिडेंट होते. त्यांनीं सर्व राज्याचा बंदोबस्त करून पेशव्यांचा राज्यभार इंग्रजसरकारानें घेतला. व पुढें ग्रान्ट डफ साहेब सातान्यास आले. आणि त्यांनीं प्रतापसिंह महाराजांस सातारा येथील तक्ताधिपति केलें.

ग्रॅन्ट डफ साहेब सातारा जिल्ह्यांत तासगांव मुक्कामीं होते. तेव्हां नागोजीरावांनीं २७ बंडवाले पकडून त्यांना साहेबांकडे रवाना केलें. तेव्हां साहेबांनीं ता० ७ माहे फेब्रुवारी स० १८२१ रोजीं नागोजीरावांना पहिल्या प्रतीच्या सरदाराच्या मानानें एक बहादुरी पत्र लिहिलें आहे.

नंतर इ० स० १८२१ सालीं कांहीं बंडवाले हत्यारबंद लोक धारेश्वर तालुका पाटण येथील डोंगरांत एक मोठी घळ आहे, त्या ठिकाणीं जमाव करून राहिले होते, त्यांवर नागोजीरावांनीं मोठ्या युक्तीनें हल्ला करून सर्वांना पकडून ग्रँन्ट डफ साहेबांकडे सातान्यास

रवाना केलें. हें पाहून साहेब बहादूर खुष होऊन त्यांनीं नागोजीरावांस इ० स० १८२१ च्या एप्रिल महिन्याच्या २७ तारखेस एक बहादुरी पत्र दिलें.

नंतर इ० स० १८२२ या वर्षी मुगरी रामोशी यानें बंड केलें. त्या बंडाचा बंदोबस्त करण्याकरितां ग्रॅन्ट डफ साहेबांनीं नागोजीरावांस बंडवाल्यांना पकडण्याविषयीं लिहिलें, त्या वेळींही नागोजीरावांनीं बंडवाल्याचा पाठलाग करून त्यांच्यापैकीं कांहीं लोक पकडून साहेबांकडे रवाना केले. तेव्हां त्यांनीं नागोजीरावांस आणखी एक बहादुरी पत्र पाठविलें. पुढें नागोजीराव इ०स० १८२२ त मरण पावले.

## व्यंकटराव.

( इ० स० १८२२–१८४८ ).

नागोजीरावांना व्यंकटराव आणि रामचंद्रराव ऊर्फ दादासाहेब असे दोन पुत्र होते.

नागोजीरावांच्या मरणानंतर व्यंकटराव हे पाटणच्या जहागिरीची व्यवस्था पाहूं लागले. यांचा विवाह सन १८३३ त शिदोजीराव ऊर्फ अप्पासाहेब निंबाळकर निपाणकर यांच्या कन्येशीं तानीबाई (लक्ष्मीबाई) यांच्याशीं झाला. यांच्या कारकिर्दीत इ० स० १८२३ सालीं सातारच्या श्रीमंत छत्रपति प्रतापसिंहमहाराज यांची स्वारी पाटणास आली होती. त्याचप्रमाणें स० १८२६ त कोल्हापूरचे श्री० छत्रपति बुवासाहेब महाराज यांची स्वारी पाटण मुक्कामीं आली होती. त्यावेळीं व्यंकटराव पाटणकर यांनीं त्यांच्या सन्मानार्थ मोठा दरबार भरवून त्यांचा मोठ्या आनंदानें सत्कार केला.

चोरटे बंडवाले लोक पाटण महालांत येतील तर त्यांना धरून मारावें व त्यांच्या आश्रयाचे किल्ले वगैरे जागा असल्यास भिंती पाडून टाकाव्या, असें सातारचे श्री० छत्रपति प्रतापसिंह महाराज यांनीं ता० १७ नोव्हेंबर सन १८२७ चें व्यंकटराव पाटणकर यांस एक आज्ञापत्र पाठविलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं बंडवाल्यांचा चांगला बंदोबस्त केला. तसेंच महाराजांनीं पुन: व्यंकटराव यांस ता० ७ एप्रील स० १८३० चें दुसरें आज्ञापत्र लिहिलें, तेव्हांही त्यांनीं मोठ्या शूरत्वानें बंडवाल्यांचा मोड करून चोहोंकडे स्वस्थता राखिली. व्यंकटराव हे इ० सन १८४८ त स्वर्गवासी झाले. ह्या *व्यंकटरावास आबासाहेब असें म्हणत असत यांच्या संबंधानें सावंतवाडी मेमोयरमध्यें बरीच वाखाणणी केलेली आहे.

## रामचंद्रराव.

( इ० स० १८४८–१८६८ ).

व्यंकटराव यांना पुत्रसंतान नसल्यामुळें त्यांचे धाकटे बंधु रामचंद्रराव ( दादासाहेब ) हे जहागिरीची व्यवस्था पाहूं लागले. यांचा विवाह इ० स० १८४६ यासाली कोल्हापूरचे श्री० छत्रपति बुवासाहेब (शहाजी) महाराज यांची कन्या आऊबाई आक्का यांच्याशीं झाला. नंतर इ० स० १८५० सालांत त्यांना एक पुत्र झाला, त्याचें नांव नागोजीराव असें ठेविलें.

इ० स० १८४४ सालीं पन्हाळा किल्ल्यावर बंडवाल्यांनीं हल्ला केला, त्यावेळीं दादासाहेब यांनीं किल्ल्यावर महाराजांचें रक्षण केलें. पुढें सामानगडच्या बंडाच्या वेळेस कोल्हापूर येथील कारभारी रा० ब०

* Venkut Rao alias Aba Saheb Patankar, the present Khasgi Karbharee, is a Native Gentleman of high and honorable character, and has always used his best endeavours to promote the good government and best interests of the state. From our first connection with waree in 1838, four Political Superintendents have borne testimony to the high sense entertained of his services, as well as to his intelligence, conciliatory disposition, and general upright behaviour in all matters relating to the welfare of the people and country. He is a person in whom every confidence may be placed; he rendered good and faithful service to Government during the rebellion in 1844 and 1845; and it is recorded that he made himself equally useful during the earlier disturbances in 1838–39; in a word, his conduct has been honest and straightforward from first to last in his relations with us, and he is entitled to all credit and consideration, which he has fairly and justly earned by a long course of faithful Services.

Savantwaree—Memoir Page 32.

दाजीसाहेब पंडित यांच्यावर बंडखोर लोकांनीं मोठा दुर्घट प्रसंग आणिला होता, तेव्हां दादासाहेबांनीं मध्यस्थी करून दाजीसाहेबांचा बचाव केला.

रामचंद्रराव यांचें कुटुंब ( आऊबाई आक्का ) ह्या इसवी सन १८५३ या वर्षी स्वर्गवासी झाल्या. त्यांचे पुत्र नागोजीराव ( तात्यासाहेब ) हे राजवाड्यांत छत्रपति बाबासाहेब महाराज यांचे जवळच सतत रहात असत. हे गुणानें फार उत्तम असून शांत, मनमिळाऊ आणि दक्ष वगैरे सद्गुणांनीं परिपूर्ण होते. म्हणून श्रीमंत बाबासाहेब यांनीं इ० स० १८६५ ता० ३० सप्टेंबर रोजीं मोठा दरबार भरवून नागोजीराव यांना ३॥ साडेतीन वस्त्रें देऊन 'मनसूबबहाद्दर' असा किताब दिला. पुढें दुसऱ्या वर्षी म्हणजे इ० सन १८६६ त छत्रपति शिवाजी ऊर्फ बाबासाहेब महाराज यांनीं आपल्यास पुत्रसंतति नसल्यामुळें, आपले भाचे ( रामचंद्रराव यांचे पुत्र नागोजीराव ) यांना दत्तक घेतलें. आणि त्यांना राजाराम महाराज असें नांव ठेवून कोल्हापूरचे राज्याधिपति केलें. पुढें थोड्याच दिवसांनीं रामचंद्रराव यांनीं आपलें दुसरें लग्न इ० स० १८६६ त दादासाहेब भोंसले खानवटकर यांच्या कन्येशीं केलें.

बाजीराव पाटणकर यांचे पुत्र जोत्याजीराव हे सद्गुणी, धर्मनिष्ठ आणि सुबुद्ध असून ते जात्या हुषार व चलाख असल्यावरून ते रामचंद्रराव यांच्या जवळ रहात असत. त्यांचे ठिकाणीं रामचंद्रराव यांचें पुत्रवत् प्रेम होतें; म्हणून इ० स० १८६८ या सालीं ता० २९ मे रोजीं रामचंद्रराव यांनीं जोत्याजीराव यांस दत्तक घेतलें. आणि नागोजीराव बाबासाहेब असें नांव ठेविलें. नंतर इ० स० १८६८ त रामचंद्रराव हे थोडया दिवसांनीं कैलासवासी झाले.

---

## नागोजीराव पाटणकर.

ब्रह्मदेवाच्या अंजलीपासून उत्पन्न होणारा जो चालुक्य राजा, यापासून ते रामचंद्रराव दादासाहेब पाटणकर यांच्या कारकीर्दीच्या शेवटापर्यंत प्रत्येक पुरुषाची उपलब्ध असलेली संक्षिप्त माहिती दिली आहे. आतां प्रस्तुत पाटणच्या जहागिरीच्या ठिकाणीं अधिकारी ( आसनारूढ ) असलेले श्रीमंत नागोजीराव बाबासाहेब यांचें इतिहासरूपानें थोडक्यांतच वर्णन करावयास उपक्रम करितों.

पाटण जहागिरीचे मूळ संपादक चांदजीराव यांना तीन पुत्र होते. त्यांपैकीं द्वारकोजीराव हे सर्वांत लहान होते. वडील वारसाच्या संबंधानें रामराव व त्यांच्या पुढील सरळ वारस यांजकडे जहागीर चालावयाची असें समजून, द्वारकोजीराव मोंगल सरकारच्या आश्रयानें मोठमोठे पराक्रम करून लौकिकास चढले. त्यांना त्या राज्यांत ७५ हजार रुपयांची जहागीर मिळाली होती. पण पुढें त्यांच्या वारसांस तिकडे जाऊन राहण्यास सवड न झाल्यामुळें, कांहीं वर्षांनंतर ती त्यांजकडे चालेनाशी झाली. म्हणून सांप्रत त्या जहागिरीबद्दल पोलिटिकल एजंटमार्फत काम चालू आहे. ह्या द्वारकोजीरावांपासून जोत्याजीराव म्हणजे नागोजीराव बाबासाहेब हे तिसरे पुरुष आहेत. ह्यांच्या आजाचें नांव द्वारकोजीराव. यांचे पुत्र बाजीराव ऊर्फ नानासाहेब, ह्यांचे चिरंजीव जोत्याजीराव म्हणजे नागोजीराव बाबासाहेब. यांचा जन्म शके १७६३ मिति आषाढ शुद्ध ४ रोजीं पाटण येथें झाला. यांच्या मातोश्रींचें नांव नानीबाईसाहेब असें होतें. ह्या सातारा जिल्ह्यांतील मलवडीकर देशमुख बाबासाहेब राजे घाटगे झुंजारराव पंचहत्यारी यांच्या कन्या होत. ह्या घाटग्याचे पूर्वज निपाणकर यांच्या पदरीं होते.

जोत्याजीराव यांच्या बालपणीं ग्रहलक्षणावरून व इतर बऱ्याच गोष्टींनीं हे मोठे भाग्यवान् निघतील असें दिसत होतें. हे आपल्या वयाच्या ६ व्या वर्षापासून कोल्हापुरांत रामचंद्रराव पाटणकर यांच्या वाड्यांत राहत असत. त्यांचेच संबंधानें छत्रपति बाबासाहेब महाराज यांचेही वाड्यांत जोत्याजीराव हे राहत असत. रामचंद्रराव दादासाहेब पाटणकर यांचे पुत्र नागोजीराव ऊर्फ तात्यासाहेब व जोत्याजीराव हे सरकार वाड्यांत राहत असतेवेळीं, बाबासाहेब महाराज यांनीं राजपुत्र व सरदारपुत्रांकरितां गणेशबागेंत शाळा स्थापन केली होती; त्या शाळेंत नागोजीराव आणि जोत्याजीराव यांनीं विद्याभ्यास केला. त्याचप्रमाणें घोड्यावर बसणें वगैरेची विद्या, सरकारी वस्ताद मिरासाहेब व समनभाई यांनीं शिकविली; तसेंच दांडपट्टा, खड्गविद्या वगैरे जमालभाई वस्ताद यांनीं शिकविली. नानासाहेब इंगळे यांची अचूक निशाण मारण्याची प्रसिद्धी असल्यानें; जोत्याजीराव यांनीं त्या विद्येंत निष्णात होण्याकरितां, नानासाहेब इंगळे यांच्याकडून निशाण मारण्याचा अभ्यास केला.

नानासाहेब, त्यांची ग्रहणशक्ति पाहून फार खुष होत असत; व मोठ्या उत्सुकतेनें त्या कलेंतील सर्व मर्में जोत्याजीरावांना सांगत असत, त्याचप्रमाणें अनुभवसिद्ध ज्ञान प्राप्त होण्याकरितां महाराज आपणाबरोबर शिकारीस जोत्याजीरावांस नेत असत. जोत्याजीराव आपल्या वयाच्या १५-१६ व्या वर्षी शस्त्रकलेंत प्रवीण झाले. निशाण मारण्यांत त्यांची नजर व कुशलता उत्तम असल्याबद्दल सतत प्रशंसा होत असे.

एके वेळीं बाबासाहेब महाराज लवाजम्यासह पन्हाळगडाच्या नजिकच्या रानांत शिकारीस गेले होते, त्यावेळीं त्यांच्याबरोबर तात्यासाहेब ( नागोजीराव ) पाटणकर, जोत्याजीराव पाटणकर, जिजासाहेब इंगळे वगैरे सरदार मंडळी गेली होती. तेव्हां रान वेढिलें आणि शिकारी कुत्र्यांच्या मोठ्या भुंकण्यानें (ओरडण्यानें) लहान मोठीं सावजें आदिकरून जनावरें इकडून तिकडे धावूं लागलीं, व शिकारही सुरू झाली. इतक्यांत एक भयंकर वाघ जाळींतून मोठ्या आवेशानें जोत्याजीराव जिकडे होते, तिकडे चाल करून आला. त्या वेळीं बाबासाहेब महाराज वगैरे मंडळी जोत्याजीरावांपासून बऱ्याच अंतरावर दूर होती. वाघ ज्या ठिकाणीं आला, तेथें फक्त एकटेच जोत्याजीराव होते. त्या वेळीं वाघ आपल्या अगदीं जवळ ( अजमासें ७-८ हातांवर ) आलेला पाहून मोठ्या धैर्यानें आपली मनोवृत्ति गडबडून न देतां आपल्या जवळच्या बंदुकीचे दोन्ही घोडे चढवून वाघावर निशाण धरून निश्चल उभे राहिले होते; कारण महाराज सरकारची गोळी सुटल्यावांचून इतरांनीं गोळी मारण्याची नसल्यानें, त्या नियमास अनुसरून केवळ निशाण धरूनच उभे होते. जोत्याजीराव यांची सशस्त्र व शौर्ययुक्त मुद्रा पाहून, वाघही तेथेंच जाळींत दबकून उभा राहिला होता. अशा भयंकर प्रसंगांत छत्रपति बाबासाहेब महाराज हे ही स्थिति दुरून पाहून तेथें वेगानें धांवत आले, आणि त्यांनीं आपल्या बंदुकीचा बार सोडून वाघास जखमी केलें. लागलेंच जोत्याजीराव यांनीं बार काढिला, तथापि तो वाघ ठार न होतां अंगावर आला, त्यावेळीं जोत्याजीराव व जिजासाहेब इंगळे या दोघांनीं भाले मारिले; व पुनः महाराजांनीं दुसरा बार मारून वाघ ठार केला. नंतर जोत्याजीरावाच्या अप्रतिम धैर्याबद्दल महाराजांस अत्याश्चर्य वाटून इंगळे वगैरे मंडळीपुढें, जोत्याजीरावाचें केवळ १५-१६ वर्षांचें अल्प वय असून मोठ्या धैर्यानें वाघापुढें उभे राहिल्याबद्दल त्यांची तारीफ केली. त्या वेळेपासून जोत्याजीरावांवर महाराजांची अतिशय मर्जी बसून ते त्यांना आपल्याजवळ ठेवूं लागले. व कोठें शिकारीस अगर अन्यत्र कोठेंही स्वारी बाहेर जावयाची झाल्यास ते जोत्याजीराव यांना बरोबर नेत असत.

श्री० छत्रपति बाबासाहेब महाराज मे. पोलीटिकल एजंट हॅवलाक साहेब आणि सरदार मंडळीसह पंतप्रतिनिधींच्या व पंत अमात्यांच्या मुखत्यारीच्या समारंभाच्या वेळीं मलकापुरास व बावड्यास गेले होते, त्यावेळेस जोत्याजीराव स्वारीबरोबर गेले होते. तेव्हां त्या संस्थानाधीपतींनीं जोत्याजीराव यांचा योग्य सत्कार केला होता.

पुढें जोत्याजीराव पाटणकर यांचा विवाह वय वर्षे २१ म्हणजे इ० स० १८६२ त श्रीमंत नारायणराव थोरात वाळवेकर यांची कन्या माईसाहेब यांच्याशीं मोठ्या समारंभानें झाला. नंतर जोत्याजीराव करवीरास परत येऊन, रामचंद्रराव पाटणकर यांच्या वाड्यांत रहात असून, मधून मधून ते सरकारवाड्यांतही रहात असत.

## नागोजीराव पाटणकर.

( इ० स० १८६८ )

इ० स० १८६६ त रामचंद्रराव पाटणकर यांचे पुत्र नागोजीराव पाटणकर ( तात्यासाहेब ) यांना, श्रीमंत छत्रपति बाबासाहेब महाराज यांनीं आपल्यास पुत्रसंतति नसल्यानें दत्तक घेतलें, असें वर नमूद केलेंच आहे; परंतु रामचंद्रराव पाटणकर यांना द्वितीय पुत्र नसल्यानें, पूर्वीपासून आपल्या जवळ असणारे जोत्याजीराव पाटणकर यांजवर त्यांचें पुत्रवत् प्रेम असल्यामुळें ता० २९ मे सन १८६८ या सालीं रामचंद्रराव पाटणकर यांनीं जोत्याजीराव यांना दत्तक घेतलें, आणि नागोजीराव असें नांव ठेविलें. नंतर थोड्याच काळानें रामचंद्रराव स्वर्गवासी झाले! तेव्हां पाटण संस्थानचे सर्व अधिकार श्रीमंत नागोजीराव बाबासाहेब यांना प्राप्त झाले.

बाबासाहेब लहानपणापासून करवीरी रहात असल्यामुळें त्यांचें पूर्व घराण्यांतील आपल्या हिश्शाचें सर्व उत्पन्न शिल्लक असलेलें त्यांनीं आपले बंधु रखमाजीराव यांना दिलें; हे रखमाजीराव मोंगलाच्या पदरीं होते.



कै० श्रीमंत नागोजीराव ऊर्फ बाबासाहेब पाटणकर.

## पाटणगांवचें वर्णन.

येथें ठिकाणीं पाटणगांवची थोडीशी माहिती लिहिणें अप्रासंगिक होणार नाहीं, असें वाटल्यावरून लिहीत आहें. पाटण हें सातारा जिल्ह्यापैकीं एका तालुक्याचें ठाणें आहे. त्या गांवास पाटण हें नांव असल्यानें त्याला पाटण तालुका असें म्हणतात. हा तालुका सातारा जिल्ह्यांत आग्नेयी दिशेस आहे. या तालुक्याच्या पूर्वेस कऱ्हाड तालुका, दक्षिणेस वाळवें तालुका, पश्चिमेस सह्याद्रि, कुंभारली घांट व पलीकडे रत्नागिरि जिल्ह्यापैकीं चिपळूण, व संगमेश्वर, उत्तरेस सातारा आणि आवळी तालुका हे आहेत. या तालुक्याची दक्षिणोत्तर लांबी २५ मेल व पूर्व पश्चिम रुंदी १४ मेल आहे.

पाटण गांव उत्तरअक्षांश १७।२२ व पूर्वरेखांश ७३।३८ यांवर कोयना व केरा या दोन नद्यांचे कांठीं संगमावर आहे. सातारा शहरापासून हा गांव २५ मैलांवर नैर्ऋत्य दिशेस आहे. हा गांव डोंगराळ आहे. श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांचा वाडा मोडकळीस आला होता, त्याची त्यांनीं दुरुस्ती करून कांहीं भाग अजी नवीनच बांधिला आहे; याचें काम फार दर्शनीय झालें असून मजबूतही आहे. या वाड्यामध्यें श्रीमंत पाटणकर यांची कचेरी व यांचे कुलस्वामी दाशरथि श्रीरामचंद्र यांचें सुंदर मंदिर असून, ह्या वाड्याच्या सभोंवतीं सुशोभित व मोठा तट असल्यानें दुरून त्याचा देखावा एखाद्या किल्ल्याप्रमाणें दिसतो. त्या तटास सुशोभित असे सभोंवतीं बुरूज आहेत. त्याचप्रमाणें बंदुकीच्या गोळ्या मारण्याकरितां, गवाक्षें ( जिंग्या ) जागोजाग ठेविलीं आहेत. संस्थानच्या कामकाजाची कचेरी ह्याच वाड्यांत असते. पाटणभागच्या जहागिरीचा कारभार पहाण्याकरितां एक स्वतंत्र कारभारी तेथें नेमिलेला असून कारकून, शिपाई, सनदी, जमादार, पहारेकरी वगैरे सर्व प्रकारचे नोकर संस्थानच्या मानानें ठेविलेले आहेत. कांहीं सनदी वंशपरंपरा जमिनीच्या उत्पन्नाचे व कांहीं नक्त पगाराचे नेमिलेले आहेत. हा गांव पेठेचा असून तेथें शाळा, पोष्ट व रहदारीचा बंगला आहे; त्याचप्रमाणें इंग्रज सरकारची मामलेदारकचेरी व मुनसफकोर्ट, इंजिनियर ऑफिस आणि फॉरेस्ट ऑफिस वगैरेंच्या कचेऱ्या आहेत. इ० स० १८७३ सालीं वाड्याजवळच दवाखाना स्थापन झाला आहे, ती इमारत दगडी बांधलेली असून फार चांगली व सुशोभित आहे. वाड्यांत मोठे विस्तृत पांच चौक असून दर चौकास पहारे आहेत. वाड्यामध्यें चौघडा व तास, कोतवालपागा, स्वारांचीं घोडीं वगैरे आहेत. खासगी कारभारी, तसेच मानकरी, भले लोक दरकदार-मंडळी, अव्वल कारकून, जंगल–कामगार, वगैरे आहेत. जामदारखाना, कोठी वगैरे सर्व संस्थानचे कारखाने आहेत. वैदिक, शास्त्री, पुराणिक, वैद्य, अग्निहोत्री वगैरेंच्या संस्था नवीनच केल्या आहेत. त्याचप्रमाणें श्रीदत्ताचें मंदिर, श्री गणपतीचा मंडप आणि श्रीलक्ष्मीचें देवालय, त्याचप्रमाणें बयासाहेब यांचें देवालय, बागबगीचे वगैरेही सर्व व्यवस्था बाबासाहेब पाटणकर यांनीं केली आहे. येथें एक मोठी जुनी विहीर असून, पाण्याची सोय तेवढ्यानें चांगली होत नसल्यानें सर्व लोकांच्या उपयोगाकरितां नवीन एक मोठी विहीर ५००० रुपये खर्चून बांधिली आहे. तेथील लक्ष्मी आदिकरून ग्रामदेवतांचे उत्सव व देवस्थानांचीं कामें, बारा वतनदार जमून, श्रीमंत पाटणकर यांच्या कारभाऱ्यांच्याच अनुमतानें करितात. वरील सरकारी वाड्याजवळ दर सोमवारीं बाजार भरत असतो. तेथें वाड्यापुढें पेठ असून, सणगांचीं व किराणे जिनसांचीं मिळून १२५ दुकानें आहेत. या गांवांतून चिपळूण-बंदराकडे रस्ता गेला असल्यानें, गांवच्या मानानें व्यापारही बराच मोठा होत असतो. या वाड्याचें काम इ० स० १८८६ त सुरू होऊन, सन १८९१ त पूर्ण झालें. या वाड्यास एकंदर खर्च अदमासें ६०–७० हजार रुपये झाला आहे; परंतु या वाड्याच्या मानानें पाहतां हा खर्च अगदीं थोडा झाला आहे. श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांच्या चातुर्यानें व कर्तृत्वशक्तीनें यांनीं कोल्हापुरांतच राहून रा० रा० मन्यासाहेब घाटगे झुंजारराव यांच्या देखरेखीखालीं मेस्त्री वगैरे कामगार-मंडळींच्या हातून हें काम पूर्ण तडीस नेलें. इतक्या थोड्या पैशांत एवढ्या मोठ्या इमारतीचें काम बाबासाहेब यांनीं केलें, यावरून यांच्या चातुर्याची साक्ष हा वाडाच देत आहे.

पाटण–गांवचा दुसरा भाग कोयना नदीच्या डाव्या बाजूस असून त्याच्या आग्नेयीस आंब्यांचीं, फणसांचीं, वगैरे सुंदर झाडें गर्द लागलीं आहेत. त्यायोगानें गांवास एक तऱ्हेची उत्तम शोभाच आली आहे; या

भागास ' रामपूर ' असें म्हणतात. येथें दर शुक्रवारीं बाजार भरत असतो. याच भागांत चांदजी-रावांच्या वंशापैकीं सातभाई व दिवसकर यांचीं घराणीं राहतात. येथें सुंदर व दाट आंबराई असल्यामुळें, युरोपियन लोक हवा खाण्याक-रितां येतात. श्री० बाबासाहेब पाटणकर यांच्या पूर्वजांनीं वतनदार मंडळीस घरें व जमिनी दिल्या आहेत. तेथें एक सुंदर श्रीमारुतीचें मंदिर बांधिलें आहे. या रामपूर भागांत यांनीं धर्मादाय नाव कोयना नदींत ठेविली आहे, अशी लोकांस यांच्याकडून जमिनी देण्यांत आल्या आहेत.

---

## व्यवस्था व अधिकार.

श्री० बाबासाहेब यांचें दत्तविधान झाल्यावर कांहीं दिवस जहागिरीच्या कारभाराची सर्व व्यवस्था करवीर सरकारचे खासगी कारभारी यांच्या देखरेखीखालीं गोविं-दपंत काळे व प्रल्हाद नाईक भुरे हेच पहात होते; परंतु पुढें थोडयाच कालानें म्हणजे १८६९ सालीं यांची हुषारी, कामकाजाची दक्षता नियमितपणा व व्यवस्थितपणा वगैरे गुण पाहून हे मोठया टापटिपीनें आपल्या जहागिरीचा कारभार करतील, अशी त्या वेळच्या पोलिटिकल एजंट मे० कर्नल अंडरसन साहेब यांची पूर्ण खात्री असल्यामुळें, त्यांनीं बाबासाहेब यांस आपल्या जहागिरीचा स्वतः पूर्ण मुखत्यारीनें कारभार करण्याचा अधिकार ( मुखत्यारी ) दत्तक झाल्यापासून ७ महिन्यांनीं दिला, व कोल्हापूर इलाख्यांत त्यांच्या गांवापुरता दिवाणी ५००० रुपयेपर्यंत रकमेच्या दाव्याचा निकाल करण्याचा व फोजदारींत माजिस्ट्रेटचा व मुलकींत कलेक्टरचा व पोलिसांत चिफ पोलिसचा असे अधिकार दिले. तसेंच पुढें इ० स० १८७३ सालीं पाटणा तालुक्यांतील त्यांच्या गांवापुरता मॉजिस्ट्रेटचा अधिकार मुंबई सरकारच्या ठरावावरून त्यांस मिळाला. त्याबद्दल साताऱ्याचे कलेक्टर यांजकडून दि० मा० जा० नंबर २१ ता० ७ माहे मार्च सन १८७४ ची यादी बाबासाहेब यांना आली आहे.

याप्रमाणें श्रीमंत बाबासाहेब पाटणकर अधिकार व ऐश्वर्य संपन्न झाले, तथापि त्यांच्या सुखांत कांहीं दिवस तरी न्यूनता आणणारी एक मोठी गोष्ट होती व तिच्याबद्दल त्यांना मोठी चिंता होती.

कोणीही मनुष्य श्रीमंत असो किंवा गरीब असो, त्याला कर्ज हा भयंकर शत्रु असून, त्याच्याशीं टक्कर देणें म्हणजे फार जोखमीचें व शहाणपणाचें काम आहे. कर्जामुळें प्रत्येक मनुष्याला अत्यंत क्लेश भोगण्याचा प्रसंग येतो ! त्याचप्रमाणें चित्तास चिंता व असमाधान उत्पन्न होतें; ऋणासारखा दुसरा शत्रु नाहीं. या विषयीं प्रमाण—

॥ श्लोक ॥

न विषं विषमित्याहुर्ब्रह्मस्वं विषमुच्यते ॥ विषमेका-किनं हन्ति ब्रह्मस्वं पुत्रपौत्रिकम् ॥ १ ॥

पापं कर्तुमृणं कर्तु मन्यन्ते मानवाः सुखम् ॥ परिणा-मोऽतिगहनो महतामपि नाशकृत् ॥ २ ॥

लोकद्वयप्रतिभयैकनिदानमनार्द्रिक प्राणिनामृणमहो परिणामघोरम् ॥ एकः स एव हि पुमान् परमाखिलोक कुटुस्य येन धनिकस्य मुखं न दृष्टम् ॥ ३ ॥

कर्जामुळें अगर आपत्कालीं कांहीं अंशीं धैर्याचा अभाव असतो, कित्येक थोर लोक ऋणाकरितां संसार-सुखाचा त्याग करून जातात ! कांहीं धैर्यवान् लोक अशा प्रसंगीं आपल्या बुद्धीचा उपयोग करून शांतपणानें ऋणसमुद्रांतून पार पडण्याचा यत्न करितात, त्यांस त्यांच्या सद्गुणांना दैव अनुकूल होऊन ह्या जगीं ऋणमुक्त होऊन धन्यतेला व सुखाला पावतात; असो.

पाटणकर घराण्यांतील पूर्व पिढींतील कांहीं पुरुषांना देशसेवेकरितां उत्पन्नापेक्षां जास्त खर्च करणें भाग पडलें असावें, ह्मणून म्हणा किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणानें ह्मणा, बाबासाहेब यांच्या हातीं जहागिरीचीं सूत्रें आलीं, त्यावेळेस त्या जहागिरीला अदमासें दोन सव्वादोन लक्ष रुपये कर्ज होतें. वार्षिक उत्पन्नापैकीं कांहीं भाग कर्जाच्या व्याजाच्या फेडीला जात असल्यामुळें, शिल्लक राहिलेला ऐवज पूर्वस्थितीप्रमाणें वर्तणूक करण्यास ( कायम ठेवण्यास ) पुरेसा नव्हता; यामुळें जुनें कर्ज फिटण्याची आशा नसून आणखी नवीन वाढण्याचा मात्र संभव होता. श्री० बाबासाहेब यांच्या मनांत ह्या गोष्टीविषयीं अप्रस्तुत आणि भावी स्थितीबद्दल वारंवार विचार येऊन, त्यापासून त्यांच्या मनास फार त्रास होऊं लागला. अखेर त्यांनीं ऋणमुक्त होण्याच्या दृढनिश्चयानें एकंदर खर्चाची टापटिपीनें व्यवस्था लावून सावकारांस हप्तेबंदी वगैरे करून देऊन बऱ्याच सावकारांच्या तड-

जोडी करून मोठ्या युक्तीनें व मुत्सद्दीपणानें थोड्याच वर्षांत सर्व कर्ज फेडून टाकिलें. परंतु साधारण विचार केला असतां, दोन सवादोन लाख रुपये कर्ज, संस्थानची आहे ती व्यवस्था कायम ठेवून, थोडया कालांत फेडणें म्हणजे किती मुष्किलीचें काम आहे, हें सहज वाचकांच्या लक्षांत येणार आहे. श्री० बाबासाहेब यांनीं आपल्या घराण्यांत पूर्वापार चालत आलेल्या कोणत्याही गोष्टीस उणेपणा आणूं न देतां, नोकर, चाकर व आश्रित यांपैकीं कोणाचें वेतन कमी न करितां, व कोणास विन्मुख न दवडितां खर्चाच्या बाबतींत मोठ्या दक्षतेनें व दूरदर्शीपणानें सुव्यवस्था केली, आणि सर्व कर्ज फेडिलें. श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांचें हें उदाहरण सर्वांनीं घेण्यासारखें आहे.

पुढें थोड्याच कालांत आपल्या दौलतींत जवाहीर, सुवर्ण, व मौक्तिकांचे अलंकार खरेदी करून नवीन संप्रदायाप्रमाणें थोर लोकांनीं वापरावयाचें सामानसुमान खरेदी केलें. बाबासाहेब यांच्या पदरीं एकंदर ५०० लहान–मोठीं मनुष्यें, कामगार, नोकर, आश्रित वगैरे मिळून आहेत. त्यांपैकीं कांहीं इसम नवीन पद्धतीप्रमाणें शिपाईगिरीच्या पोशाखाचे आहेत. व हल्लींच्या पद्धतीप्रमाणें वाहनें (रथ) स्वारांचीं घोडीं कोतवाल घोडे, मेणे, पालख्या, लगी डंका वगैरे सरंजाम आहे. आपल्या बुद्धिचातुर्यानें संस्थानची व्यवस्था उत्तम प्रकारची ठेविली असून, सत्कर्मांच्या ठिकाणीं, देव-ब्राह्मण यांच्या ठिकाणीं व दान–धर्माच्या ठिकाणीं, यांची पूर्ण निष्ठा आहे. श्री० बाबासाहेब यांना इंग्लिश सरकारांतून २० हत्यारें मिळालीं आहेत. व करवीर सरकारांतून यांचे सरंजामास भूषणभूत होण्याकरितां १०० हत्यारें मिळालीं आहेत. यांना नौकरी माफ आहे. बाबासाहेब पाटणकर यांचा श्रीमंत दिनकरराव सावर्डेकर यांच्या कन्येशीं (कै० शिवाजी महाराज छत्रपति यांच्या पूर्वघराण्यांतील भगिनीशीं) इ० स० १८७१ सालीं द्वितीय विवाह झाला. त्या संबंधापासून बाबासाहेब यांना दोन अपत्यें झालीं होतीं, परंतु तीं मुलें व त्यांची मातोश्री इहलोकच्या सुखास सोडून थोडयाच कालानें परलोकचें शाश्वत सुख भोगण्याकरितां निघून गेलीं.

नंतर श्री० बाबासाहेब यांचा बापुसाहेब घाडगे सांवतवाडीचे सरदार यांच्या कन्येशीं इ० स० १८७७ सालीं तृतीय विवाह झाला, परंतु पुढें थोड्याच कालांत बाबासाहेबांची स्वारी पाटणास जात असतां, वाटेंतच बाईसाहेबांना वातविकृति होऊन त्या पाटण मुक्कामीं इ० स० १८७८ या सालीं स्वर्गवासी झाल्या. नंतर मौजे कुटरें, तालुके चिपळूण, जिल्हा रत्नागिरि, येथील श्रीमंत आप्पासाहेब राजे शिरके (मलेकर इनामदार) यांच्या कन्येशीं बाबासाहेब यांचा इ० स० १८७८ सालीं विवाह झाला. हें यांचें चौथें कुटुंब होय. यांचें नांव श्रीमती सौभाग्यवती गजराबाईसाहेब असें होतें.

श्रीमंत नागोजीराव बाबासाहेब पाटणकर यांच्या जेष्ठ पत्नी सौ० माईसाहेब (जिजीसाहेब) यांना दोन मुली व पांच मुलगे अशीं अपत्यें झालीं होतीं, त्यांतील वडील कन्या आक्कासाहेब यांचा विवाह इ० स० १८८१ या सालीं सावंतवाडीच्या घराण्यांतील श्रीमंत दत्ताजीराव रावसाहेब भोंसले सं० हेरे यांच्याशीं मोठ्या समारंभानें करवीरींच झाला. पुढें आक्कासाहेब यांना दोन अपत्यें झालीं होतीं, परंतु श्रीमंत सौ० जिजीसाहेब यांना इश्वरेच्छेनें संततिसौख्य पूर्ण लाभलें नाहीं.

श्रीमंत बाबासाहेब यांच्या वयाच्या ४५।४६ वर्षपर्यंत यांना संततिसंबंधानें बरेच क्लेश सोसावे लागले. त्यामुळें सदोदित त्यांचें चित्त उद्विग्न व सचिंत असे. परमेश्वराच्या कृपेनें ऐश्वर्यादि सर्व सुखोपभोगाच्या गोष्टी यथास्थित असून, पुत्र–संततिसंबंधानें मात्र औदासीन्य उत्पन्न झालें होतें! परंतु श्री० पाटणकरसाहेब हे देव–ब्राह्मणांच्या ठिकाणीं परमभक्तिमान् असल्यानें यांनीं पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून दान, धर्म, व्रतें; अनुष्ठानें वगैरे शास्त्रोक्त बरेच उपाय केलें. पुढें इ० स० १८८४ सालीं ईश्वरकृपेनें बाबासाहेब यांच्या पत्नी सौ० गजराबाईसाहेब यांना शके १८०६ फाल्गुन शु० १५ स एक कन्यारत्न झालें, या मुलीचें नांव हौशाक्का ठेविलें होतें. यानंतर बाबासाहेब यांना पुत्रलाभ होऊन पुढें थोडयाच दिवसांनीं हौशाक्का यांच्या नांवाची सार्थकता झाली.

इ० सन १८८७ सालांत (शके १८०९ पौष शु० १ प्रतिपदा) श्रृंगेरी मठाधिपति स्वामी श्रीजगद्गुरु शंकराचार्य यांची स्वारी करवीरीं आली होती. स्वारीचा मुक्काम श्री विठ्ठलमंदिरांत होता. त्यांचे दर्शनार्थ श्रीमंत बाबासाहेब पाटणकर केव्हां केव्हां पूजेच्या वेळीं जात असत.

श्रीमज्जगद्गुरु मठ-शृंगेरी यांची पादपूजा श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांनीं पौष शुद्ध ९ स केली, त्यावेळीं शहरांतील शास्त्री, वैदिक, पुराणिक वगैरे सर्व मंडळींस निमंत्रण देऊन श्रीमंतांनीं विठ्ठलमंदिरापासून श्रीजगद्गुरूंना मोठ्या समारंभानें आणिलें, नंतर पादपूजेचा समारंभ अत्युत्तम झाला. श्रीमज्जगद्गुरूंच्या पादपद्मापुढें दक्षिणार्थ रोख रुपये २०० ठेविले. त्याच प्रमाणें श्रीमज्जगद्गुरु यांस एक शालजोडी व छाटी दिली. याबद्दल नरहरकवि म्हणतातः—

> तद्वच्चैवाकरोत्पूजां नागेशः पाटणाधिपः ॥
> भिक्षामप्यर्पयांचक्रे बह्वींचादात् सदक्षिणाम् ॥
> महावस्त्रं तथा शाटीमर्पयामास भक्तितः ॥

असा पूजासमारंभ झाल्यानंतर श्रीजगद्गुरूंनीं पाटणकरसाहेब यांना व इतर परिवार मंडळींसही प्रसाद दिला. नंतर श्रीच्या बरोबर असलेल्या व निमंत्रित विद्वान् मंडळींस तांबूल, दक्षिणा वगैरे दिली, ही एकंदर शिष्टसंभावना अदमासें रुपये १६० झाली. पुढें श्रीजगद्गुरूंची स्वारी विठ्ठलमंदिरांत गेली. त्याच दिवशीं श्रीमंत पाटणकरसाहेब यांनीं त्यांस भिक्षा विठ्ठलमंदिरींच केली. एकूण पादपूजेचा ( भिक्षा वगैरे ) ४०० रुपये खर्च झाला.

पाटणकर यांचा, कोल्हापूर प्रांतांतील जें प्रसिद्ध व शूर घराणें कागलचे घाटगे, यांच्याशीं संबंध असून इतिहासप्रसिद्ध, व शूर महासाध्वी. बायजाबाई शिंदे यांचें मातूळ घराणें हें होय. यासंबंधानें थोडीशी माहिती बायजाबाई शिंदे यांच्या इतिहासांत मिळते ती येणेंप्रमाणें

## कागल घराण्यांपैकीं.

"बायजाबाईचे वडील ज्याप्रमाणें पुरातन, घरंदाज, पराक्रमी व अस्सल मराठे घराण्यांतील होते; त्याप्रमाणें त्यांच्या मातुश्री ह्याही जुन्या व इतिहास प्रसिद्ध घराण्यांतील होत्या. हें घराणें अस्सल मराठ्यांपैकीं असून, ह्यांतील पुरुषांनीं महाराष्ट्र राज्यरक्षणाच्या कामीं पराकाष्ठेचें साहाय्य करून, आपली स्वामिनिष्ठा व स्वदेशभक्ति व्यक्त केली आहे. औरंगजेब बादशहानें दक्षिणेंत येऊन सर्व महाराष्ट्रप्रांत काबीज केला; व छत्रपति शिवाजी महाराजांनीं संस्थापित केलेलें मराठी राज्य व महाराष्ट्रधर्म ह्याचा समूळ विध्वंस होण्याचा बिकट प्रसंग प्राप्त झाला; त्यावेळीं, कर्नाटकप्रांतीं, राजाराम महाराजांस अप्रतिम साहाय्य करून ज्यांनीं आपल्या अलौकिक शौर्याची, अचाट साहसाची, अतर्क्य देशभक्तीची आणि अपूर्व स्वार्थत्यागाची सीमा करून दाखविली; आणि यवनांचा पराभव करून महाराष्ट्र राज्य व महाराष्ट्रधर्म ह्यांचे रक्षण केलें; त्या वंदनीय वीरश्रेष्ठांपैकीं ह्या घराण्यांतील मूळ पुरुष एक होत एवढें सांगितलें, म्हणजे ह्या घराण्याच्या थोरपणाबद्दल किंवा कुलीनतेबद्दल अधिक प्रशंसा करण्याचे प्रयोजन नाहीं. हणमंतराव पाटणकर मूळ जहागीर संपादक चांदजीराव पाटणकर यांचे कनिष्ठ बंधु हणमंतराव पाटणकर हें नांव महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. ह्यांनीं राजाराम महाराजांच्या चंदीच्या राजकारणांत उत्कृष्ट स्वामिसेवा केल्यामुळें त्यांस ' समशेरबहादुर ' हा किताब व पाटणा खोऱ्यांतील ४३ गांवांची पाटण कसब्यांसुद्धां जहागीर इनाम मिळाली होती. त्यांच्या पूर्वजांचें पूर्वीचें उपनांव साळुंखे हें असून, हे पूर्वापार पाटणचे देशमुख होते. पुढें हे पाटणास राहूं लागल्यापासून ह्यांस पाटणकर हें नांव प्राप्त झालें. ह्यांचें राहण्याचें ठिकाण पाटण हें असून, तें साताऱ्याच्या नैर्ऋत्येस १५ कोसांवर कोयना नदीच्या कांठीं आहे. येथें त्यांचा पूर्वींचा जुना वाडा वगैरे असून तेथील इनामदार ह्या नात्यानें त्यांच्या वंशजांची योग्यता अद्यापि फार आहे; व दक्षिणेंतील सरदारांच्या पटामध्यें ते उच्च प्रतीचे सरदार आहेत.

हणमंतराव पाटणकर ह्यांस द्वारकोजीराव हिरोजीराव आणि *धारराव असे तीन पुत्र होते. ते आपल्या वडिलांप्रमाणेंच कर्तृत्ववान व पराक्रमशाली होते. ह्यापैकीं पहिले द्वारकोजीराव ह्यांस सात पुत्र होते. त्यांपैकीं रामराव व लक्ष्मणराव ह्यांचा वंश नष्ट झाला; व बाकीचे आपापल्या योग्यतेप्रमाणें नांवारूपास आले. ह्या पांचजणाचीं नांवें येणेंप्रमाणें:-बाबूराव, बाळोजीराव, राघोजीराव, बाजीराव व जयरामराव. ह्यांपैकीं चौथे-बाजीराव हे बायजाबाई साहेबांचे मातामह होत. हे मोठे रणशूर पुरुष होते. पेशव्यांनीं अखेरच्या अमदानींत जुन्या मराठे घराण्यांतील शूर पुरुषांचा परामर्ष न घेतल्यामुळें अनेक तेजस्वी व बाणेदार पुरुष निराश झाले, व जिकडे अवकाश मिळेल तिकडे आपली शिपाईगिरी दाखविण्याकरितां निघून गेले. त्यामुळें मराठ्यांचें ऐक्य व तेजस्विता लोपली जाऊन महाराष्ट्र

* मागील पृष्ट ७७ वरील पत्रें पहा.

मंडळाचा नाश झाला. अशा पुरुषांपैकीं बाजीराव पाटणकर हे एक होत. पुणें दरबारीं ह्यांच्या शौर्यगुणांचें योग्य अभिनंदन व चीज न झाल्यामुळें हे मुधोजी भोंसले नागपुरकर ह्यांच्याकडे गेले. तेथें त्यांनीं अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं, व भोसल्यांच्या दरबारांत फार लौकिक मिळविला. पुढें बाजीराव पेशवे ह्यांनीं त्यांस पाचारण करून पुण्यास आणविलें. आणि त्यांस आपल्या दरबारांत ठेवून घेतलें. बाजीराव साहेबांनीं त्यांचें शौर्य पाहून त्यांस मौजे तांबवें हा गांव इनाम दिला. तो त्यांजकडे व त्यांचे बंधु जयरामराव ह्यांजकडे इ. स. १८१८ पर्यंत चालत होता. पुढें इ० स० १८१८ सालीं महाराष्ट्रामध्यें राज्यक्रांति घडून आली; व पेशव्यांची सत्ता नष्ट होऊन, इंग्रजसरकार महाराष्ट्राचें सार्वभौमप्रभु बनलें. त्यावेळीं मि० एल्फिन्स्टन ह्यांनीं, बाजीराव पाटणकर ह्यांची योग्यता व खानदान हीं लक्ष्यांत घेऊन, त्यांस तीन हजार रुपये सालीना पेनशन करून दिलें. परंतु बाजीराव पाटणकर लवकरच मृत्यु पावले. नंतर त्यांच्या स्त्रीस १२०० रुपये तैनात झाली. ती साताराचे छत्रपति प्रतापसिंह ऊर्फ थोरले महाराज ह्यांच्या कारकीर्दीपर्यंत चालत होती.

बाजीराव पाटणकर ह्यांस सुंदराबाई ऊर्फ नानीसाहेब नामक एक कन्या होती. ती कागलचे जहागीरदार सखारामराव घाटगे सर्जेराव ह्यांस दिली होती. ती बाई फार साध्वी व सुशील असे. हिच्या पोटीं सर्जेराव ह्यांस जयसिंगराव व बायजाबाई अशीं दोन आपत्यें झालीं. जयसिंगराव ह्यांचा जन्म इ० स० १७७९ ह्या सालीं झाला; व बायजाबाई ह्यांचा जन्म इ. स. १७८४ सालीं झाला. बायजाबाईच्या बाळपणाची माहिती उपलब्ध नसल्यामुळें ती देतां येत नाहीं. तथापि ती लहानपणीं फार बाळसेदार व देखणी असून, तिजवर सुंदराबाईचें फार प्रेम होतें, एवढें सांगण्यास हरकत नाहीं. सखारामराव घाटगे ह्यांच्या स्थित्यंतराचें व त्या वेळच्या देशस्थितीचें चित्र लक्ष्यांत घेतलें, तर बायजाबाईचें बाळपण राजवाड्यांतील राजलक्ष्मीचे बहुविध विलास उपभोगण्यांत गेलें असावें, असें मानितां येत नाहीं. अनेक वेळां प्राप्त झालेलीं राजकीय संकटें, सदासर्वदां अनुभवलेले घोड्यावरील प्रवासांचे कष्ट, आणि प्रसंगविशेषीं प्राप्त होणारें शिलेदारी पेशाचें सुखपर्यवसायी दुःख, अशा प्रकारच्या परिस्थितीमुळें मराठे सरदारांच्या मुलांवर जे संस्कार होणें साहजिक आहेत, ते बायजाबाई व त्यांचे बंधु ह्यांच्यावर झाले होते, असें म्हणण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं. हीं मुलें अशा प्रकारच्या परिस्थितींत वाढल्यामुळें सुदृढ, सशक्त, धाडसी, व घोड्यावर बसण्यांत पटाईत अशीं निपजलीं होतीं. बायजाबाई ही अगोदरच रूपसंपन्न असून, तिच्यामध्यें हे वरील गुण वास करीत असल्यामुळें तिची कीर्ति महाराष्ट्रांतील थोर थोर सरदारांमध्यें पसरली व दौलतराव शिंद्यासारखे तरुण व रंगेल सरदार तिच्या सौंदर्यावर लोलुप होऊन तिला वरण्यास उत्सुक झाले. बायजाबाई शिंदे ह्यांस कित्येक इतिहासकारांनीं 'दक्षिणची सौंदर्यलतिका' (Beauty of the deccan) अशी संज्ञा दिली आहे. ती अगदीं यथार्थ आहे. राजस्थानांतील कृष्णाकुमारी इत्यादि लोकप्रसिद्ध लावण्यवतींच्या लग्नाचे प्रसंग ज्याप्रमाणें मोठमोठीं राजकारस्थानें घडविण्यास कारणीभूत झाले, त्याप्रमाणें बायजाबाई ह्यांचें लग्न हें देखील महाराष्ट्रांतील एक राजकारस्थान घडवून आणण्यास कारणीभूत झालें. पाटणकर घराण्याचा कागलकर घाटगे घराण्याशीं पूर्वापार संबंध आहे."

त्याचप्रमाणें श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य हे करवीरमठांत आले त्या वेळीं श्रीमंत पाटणकरसाहेब यांनीं लव्याजम्यासह पादपूजेकरितां बोलाविण्यासाठीं मठांत जाऊन समारंभानें श्रीस वाड्यांत आणिलें, आणि त्यांच्याकरितां जें भव्य सिंहासन केलें होतें त्याजवर श्रीजगद्गुरु आरूढ झाले. त्या वेळीं विद्वज्जन, वैदिक, शास्त्री वगैरे निमंत्रित सर्व मंडळी जमून सभा सिद्ध झाल्यानंतर पाटणकरसाहेब यांनीं श्रीजगद्गुरूंच्या पादपूजेस आरंभ केला. त्यामध्यें श्रीजगदगुरूंस एक उत्तम शालजोडी व छाटी दिली. तसेंच श्रीचरणापुढें दक्षिणा २०० रुपये समर्पण केली व श्रीमंत बाबासाहेब यांना श्रीजगद्गुरूंनीं प्रसाद दिला. नंतर श्रींच्या बरोबर आलेली व निमंत्रित विद्वज्जनमंडळी या सर्वांनां पानसुपारी व शिष्टसंभावना दिली. याप्रमाणें हा समारंभ झाल्यानंतर श्रीजगद्गुरु आपल्या मठीं गेले. त्याच दिवशीं पाटणकरसाहेब यांनीं मठांतच भिक्षा करविली; हा समारंभ शके १८०९ पौष महिन्यांत झाला. या पादपूजेसंबंधानें व भिक्षेसंबधीं एकंदर खर्च अदमासें तीन चारशें रुपये झाला.

याचप्रमाणें रामेश्वरमठाचे स्वामी यांची ता० २४ माहे दिसेंबर सन १८८७ इ० रोजीं श्री० पाटणकरसाहेब यांनीं पादपूजा केली, त्यास अदमासें २०० रुपये खर्च आला.

याप्रमाणें श्रीजगद्गुरूंच्या प्रसादानें व वर नमूद केलेल्या दानधर्म, व्रतापिकांच्या योगानें, त्याचप्रमाणें पाटण वगैरे ठिकाणीं सर्व देवतांच्या पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरे सत्कर्मानें, आणि ईश्वराच्या ठिकाणीं बाबासाहेब यांची पूर्ण निष्ठा असल्यानें चैत्र शु० ४ शके १८१० ( इ० सन १८८८ ) रोजीं श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांच्या पत्नी सौ० गोजराबाईसाहेब ह्या नांदणी मुक्कामीं प्रसूत होऊन पुत्ररत्न झालें. हें सर्व सत्कर्माचेंच फल होय; याविषयीं प्रमाण असें आहे कीं, [ याच देहीं याच डोळां ] म्हणजे ज्या देहानें सदाचार घडला त्याच देहास सुखोत्पत्ति निश्चयानें होते. असो. पुत्रोत्पत्ति झालेलें वर्तमान श्री० बाबासाहेब व इतर मंडळींनां समजतांच जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. त्यावेळेस श्री० बाबासाहेब हे करवीराहून नांदणीस गेले, तेथें जातकर्म व नामकर्माचा मोठा समारंभ होऊन पाटणकर घराण्याचे मुळपुरुष व जहागिरीचे संपादक, शूर, व पराक्रमी असे जे चांदजीराव त्यांचें नांव या मुलास ठेविणें. या पुत्राचा जन्म चतुर्थीच्या दिवशीं झालें म्हणून यांना गणपतराव असें म्हणतात.

जातकर्माच्या समारंभाच्या वेळीं गांवोगांवचे शास्त्री, वैदिक, भिक्षुक, वगैरे ब्रह्मसमाज बराच जमला होता, शिवाय पदरचे मानकरी, नोकर वगैरे लोक आले होते. गांवकरी प्रजानन तो आनंदोत्सव पहाण्यास जमले त्यांनीं घरोघर आपल्या शक्तीप्रमाणें तो आनंदाचा दिवस साजरा करून उत्साह केला. श्रीमंत बाबासाहेब यांनीं त्यावेळीं ब्राह्मणभोजनें घालून दानधर्म बहुत केला, व पदरच्या लोकांस देणग्या देऊन संतुष्ट केलें.

त्याचप्रमाणें श्रीनृसिंहवाडीस जाऊन श्रीपादवल्लभास पूजा अभिषेक, ब्राह्मणभोजन वगैरे धर्मकृत्य करून पाटणकरसाहेब यांची स्वारी करवीरास परत आली. पुढें शके १८१३ ( इ० सन १८९१ ) सालीं बाबासाहेब यांच्या पत्नी सौ० गोजराबाईसाहेब यांस द्वितीय पुत्ररत्न झालें, या मुलाचें नांव भीमराव ( भाऊसाहेब ) असें ठेविलें. व दानधर्म, देणग्या वगैरे दिल्या.

पाटणकर यांच्या घराण्यांत मूळ पुरुषापासून पहिल्या प्रतीच्या सरदारांच्या पटांत नांवें बादशाही अमलापासून दाखल आहेत. व त्याबद्दल करवीर सरकारच्या दप्तरांत व सातारच्या दरबारांत तक्ते व याद्या आहेत; कारण या घराण्यांतील एकंदर पुरुषांनीं मोठमोठ्या लढाया व पराक्रम करून, *कर्नाटक वगैरे देशांत

**श्री.**

* " विज्ञापना: —राजश्री मालोजी घोरपडे जखमी. घरास जाऊन दोन महिने उपाय जाल्या खेरीजे बरे होणार नाहीं, याजकरितां निरोप दिला, व आपाजीराव पाटणकर यांस समाधान नाहीं, म्हणोन निरोप दिला. यशवंतराव माने पांच वर्षे घरास गेले नाहींत. म्हसवडचा बंदोबस्त जाला नाहीं, म्हणोन निरोप दिला, गुदस्तांची नालबंदी सर्वांची देणें. त्यास ज्यांणीं निरोप घेतला, त्यांचे समजावीस नालबंदीचा फडशाकरून वराता दिल्या आहेत. वरकडांच्या मागाहून येतील. थोरले फौजेचे फडशे केले पाहिजेत. गुदस्तांची नालबंदी पावली पाहिजे. लोकांनीं चाकरी मेहेनतीस अंतर केलें नाहीं. आपाजीराव, मालोजी घोरपडे, यशवंतराव माने स्वामी सन्निध येतील, त्यांचा बहुमान करावा. आपाजीरावांस व घोरपड्यांकडील पानसी यांसी सविस्तर बोलिलों आहोंत. विनंति करतील. मालोजी घोरपड्यांनीं शिरा तरवार मारली. दोन वेळां जखमा लागल्या. परंतु वस्त्रें बहुमान कांहीं घेतला नाहीं. त्यांस तेथें आल्यावर वस्त्रें द्यावीं, व बहुमान एक मोत्यांची कंठी चांगली द्यावी. ते निरोप घेतात ते समयीं चौकडा पावत असतो. मागील दाखला दप्तरीं निघेल. त्याप्रमाणें द्यावा. पैक्याचाही निकाल, कांहीं तूर्त, कांहीं मुदतीनें, याप्रमाणें निकाल करून, निरोप देऊन उमेदवार करणार धणी समर्थ आहेत. शहाजी नाईक निंबाळकर प्रथम दिवशीं लढाईत पडले. त्यांस पांच हजारांचा गांव इनाम द्यावा असें सर्वांचे रजबदलीनें जालें, इतकें द्यावयाचें नव्हे. परंतु मालोजी घोरपडे यांनीं फारच रजदबल केली, यामुळें डोकावें लागलें. आपाजीराव विनंति करितील. बहुमान केला पाहिजे. वरकड फौजेचे नालबंदीचा पैका कधीं पावेल, वराता कशा कराव्या, ते आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

इतिहाससंग्रह पृष्ट ५०.

शूरत्वाचीं कृत्यें करून यश मिळविलें. कर्नाटकच्या मोहिमेमध्यें ज्यांचें नांव सुप्रसिद्ध झालेलें आहे असे आप्पाजीराव पाटणकर यांनीं सदर मोहिमेमध्यें पराक्रम केल्यावरून त्यांचा गौरव करण्याबद्दल, कर्नाटकच्या मोहिमेवरील मुख्य सेनापति हरिपंत फडके यानें पेशव्यांस पत्र पाठविलें आहे, त्या पत्रावरून अप्पाजीराव पाटणकरांची मर्दुमकी दृष्टोत्पत्तीस येईल. मरहूम मेजर ग्रॅहामसाहेब यांनीं इ० सन १८५४ सालीं मुंबईसरकारास जो स्टॅटिस्टिकल रिपोर्ट सादर केला त्यांत पृष्ठ ३०२ याजवर श्री० नागोजीराव यांचे वडील रामचंद्रराव यांचें नांव महाराज सरकारचे उजव्या बाजूस असून त्यांच्या नांवासमोर कोष्टकांत पहिल्या प्रतीचे सरदार हा हुद्दा लिहिला आहे. श्रीमंत बाबासाहेब यांना जहागिरीची मुखत्यारी मिळाल्यानंतर इ० स० १८७३ सालीं मुंबईसरकारानें ठराव करून त्यांचें नांव पहिल्या प्रतीच्या सरदारांच्या पटांत पूर्वीप्रमाणें दाखल केलें आहे. व त्याबद्दल सातारा जिल्ह्याचे कलेक्टर यांजकडून नंबर ३४७२ सन १८७३ चें पत्र आलें असून ता० ७ माहे आगष्ट सन १८७३ चें ( भाग १ पृष्ठ ६६४ ) ग्याझिटांतही गोष्ट प्रसिद्ध झाली आहे.

कोल्हापूरचे व साताराचे महाराजांकडून व इंग्रजसरकाराकडून यांना थैली ( पत्रें ) येण्याची कशी वहिवाट आहे, हें फेरिस्तावरून व त्या त्या सरकारच्या दप्तराच्या माहितीवरून समजेल. सातारा जिल्ह्यांत श्री० बाबासाहेब यांना, हे वडील घराण्यांतील मुख्य असल्यानें शिक्केकरी हा किताब चालू आहे. बादशाही अमलांत यांच्या पूर्वजांना "समशेर बहाद्दर" हा किताब आहे. व पेशवाईच्या अमलांत सवाईसुभानराव असे किताब होते.

## पाटण तालुक्यांत व करवीर इलाख्यांत, असलेले हक्क इनाम गांवें वगैरे.

या घराण्यांतील मूळ पुरुषांनीं जीं वतनें व जहागिरी स्वहस्तें संपादन केलीं तीं मोठ्या युक्तीनें आणि शौर्यानें केलीं. प्रथम इ० सन १५७२ सालीं जोत्याजीराव पाटणकर यांनीं पाटणमहालच्या देशमुखीचे वतन विजापूरच्या बादशहाकडून मिळविलें, नंतर इ० स० १६९० सालीं पाटण महालपैकीं अकरा गांव व कऱ्हाड तालुक्यांपैकीं एक गांव अशीं मिळून बारा गांवें संपादन केलीं. पुढें इ० स० १६९२ सालीं सर्व पाटणमहाल इनाम मिळविला. नंतर या पाटणमहालांत सर्व प्रकारें आपला अधिकार रहावा म्हणून या तालुक्यांत सरदेशमुखीचें वतन हिंदुराव घोरपडे यांजकडे चालत होतें तें त्यांजकडून काढून घेऊन इ० सन १६९६ सालीं श्रीमंत छत्रपति राजाराम महाराज यांनीं रामराव पाटणकर यांस अजरामरत इनाम करून दिलें. याप्रमाणें आपल्या जहागिरीच्या मुलखांत सर्वप्रकारें आपला अधिकार कायम ठेवून दुसऱ्याचा शिरकाव करून दिलेला नाहीं. शिवाय महाराजांनीं या पाटण तालुक्यांत जे आपले अधिकार होते ते संपूर्ण पाटणकर यांस दिले. व त्याचप्रमाणें साताऱ्याच्या राजधानीकडून चालविण्यांत आले.

यांना पाटण तालुक्यांत गांवांखेरीज देशमुखी, सरदेशमुखी, चौगुले, खोती, व शेऱ्या आणि वतनी पाटिलकी वगैरेचीं उत्पन्नें ( वतनें ) मिळालीं असून तीं हल्लीं चालू आहेत. पाटिलकी असलेलीं गांवें, मौजे इंदुली तालुके कऱ्हाड, मौजे मारूल ता० पाटण, मौजे ठोमसें ता० पाटण, कसबा पाटण, वगैरे गांवीं आहे. ६० गांवांत देशमुखी, सरदेशमुखी आहे. करवीर इलाख्यांतील नांदणी, सांवर्डे, पिरळें हीं इनाम गांवें आहत. तसेंच करवीर इलाख्यांत १०१॥ एकशें-दीड गांवांत देशमुखी आहे. नांदणी गांवांत नायकी इनाम, तळाशीगांवांत अर्जी इनाम, नागांव कुरण, धरणगुत्तीमळा व हुजूर शेतसनदी वगैरे वतनी हक्कांचीं उत्पन्नें मिळालीं आहेत. नांदणी गांवीं श्री० पाटणकरसाहेब यांनीं लोकोपयोगाकरितां ३-४ हजार रुपये खर्च करून विहीर बांधिली आहे.

पाटण तालुक्यांत यांनां ५८ गांवें इनाम जहागिर मिळाली असून त्यांपैकीं ४३ गांवें मात्र यांजकडे हल्लीं चालत आहेत. बाकीच्या गांवांपकीं दंतागिरीच्या किल्ल्याचे खर्चाकडे १० व गुणवंतगडाच्या खर्चाकडे ४ अशीं १४ गांवें अजमासें १५ हजार रुपये उत्पन्नाचीं जहागिरींतून तोडून दिलीं आहेत; तथापि या चौदा गांवच्या वाड्यांच्या जागा व देशमुखांचीं वतनें, मानपान, धनगरांवरील व देवस्थानांवरील हक्क श्री० बाबासाहेब यांजकडे चालू आहेत. या

गांवांतील नक्त इनामाचा वसूल यांनाच मिळतो. धन-गरमहाल मात्र चालत नाहीं. त्याबद्दल हल्लीं काम चालू आहे. करवीर इलाख्यांत यांनीं पाचगांव, कुडुत्रें व पाडळी या तीन गांवांत रयताव्याची सुमारें ५०० एकर जमीन २०००० रुपये खर्च करून तयार केली केली आणि तेथें कुरणें केलीं आहेत. नागांव व धरणगुत्ती येथें कांहीं जमिनी व इनाम मळे आहेत करवीर शहरांत रंकाळेतलावाचे नजीक यांची पूर्वापार खडकाची जमीन आहे, त्याठिकाणीं बाबासाहेब यांनीं चांगली दुरुस्ती करून येथें एक उत्तम बाग तयार केला आहे. त्यामध्यें पाण्याची वगैरे सोय-चांगल्या प्रकारची केली आहे. यासंबंधानें एकंदर खर्च २५००० रुपये आजपर्यंत झाला आहे. ( या बागेंत जागजागीं लहान लहान सडका व दोहों बाजूस रांकेनें सुवासिक फुलझाडें व तुळसी, बन व फळफळावळींचीं झाडें लाविलीं आहेत, आणि मध्य-भागीं लहानशी इमारत बांधिली आहे. ) त्याठिकाणीं हल्लींचें करवीराधिपति श्रीमंत छत्रपति शाहुमहाराज यांच्या मुखत्यारीच्या समारंभाचे वेळेस महाराज सरकारच्या अभीष्ट चिंतनार्थ बाबासाहेब यांनीं गोरगरीब लोकांना मोठा दानधर्म केला.

मोंजे सांवर्डे, पिरळें, नांदणी या तीन गांवच्या जंगलांचा अधिकार सरकारांतून यांचाच ठरला आहे.

श्रीमंत बाबासाहेब यांचें करवीर इलाख्यांतील सालिना उत्पन्न अदमासें २०००० वीस हजार रुपयांचें व पाटण तालुक्यांतील उत्पन्न अदमासें ३२००० बत्तीसहजार रुपयांचें आहे.

ह्या घराण्यांतील जहागिरीच्या अधिकारारूढ पुरुषांस गव्हरनर साहेबांची मुलाखत घेणें झाल्यास त्यांस २१ मोहोरांचा नजराणा द्यावा लागतो, भेट झाल्यावर गव्हरनर साहेब यांनीं पाटणकर यांस परत भेट देऊन पांच वस्त्रें देण्याची वहिवाट आहे; व गव्हरनरसाहेबांचे सेक्रेटरी यांनीं यांस सामोरें येऊन गव्हरनरसाहेब यांनीं उठून मान देण्याची चाल आहे. त्याचप्रमाणें मोठमोठे साहेबलोक यांनीं सामोरें येऊन भेट घेण्याची व परत भेट देण्याची वहिवाट आहे.

करवीरचे महाराज श्री० छत्रपति यांचे भेटीच्या वेळीं पाटणकर यांनीं एक मोहोर महाराजांस नजर दिल्यावर व सत्कार केल्यावर महाराजांनीं यांचे आंगावर चादर घालून शिवाय साडेतीन वस्त्रें ( पांचनग ) देण्याची वहिवाट आहे.

बादशाही अमलापासून सातारा आणि कोल्हापूर या दोन्हीं राजघराण्याशीं यांचा आप्तपणाचा निकट संबंध असल्यामुळें, पायांत सुवर्णालंकार घालण्याचा यांना पूर्वापार हक्क आहे. व महाराजसरकारच्या बरोबर उजव्या बाजूस आसन घालून चांदीचे ताटांत भोजन करण्याचा अधिकार यांच्या घराण्यास आहे. तसेंच मोराच्या पिसांच्या चवऱ्या, पालखी, भालदार, बारलीच्या अबदागिऱ्या व लगेडंका आणि स्वारीबरोबर जाणें झाल्यास जरीपटक्याचे पुढें चालण्याचा मान यांचेकडे पूर्वापार आहे. बाबासाहेब यांचें निशाण पिंवळ्या रेशमी वस्त्राचें असून त्यांचा पोषाखही पीतवर्ण असतो. कार्यप्रसंगी सरकारचे खासगी कारकून यांनीं पाटणकर यांचे वाड्यांत येऊन व्यवस्था ठेवण्याची वहिवाट आहे.

पाटणकरसाहेब यांना जेव्हां सातारा जिल्ह्यांत फिरण्याचें कारण पडतें तेव्हां सरबराईकरितां व यांचा मान सन्मान राखण्याकरितां, सातारा जिल्ह्याचे कलेक्टराकडून व पोलिटीकलसाहेब यांजकडून तालुक्याचे मामलेदार यांना हुकूम झालेले आहेत.

श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांच्या ठिकाणीं अपरिमित भूतदया वास्तव्य करीत आहे, यांच्या कारकीर्दींत प्रथमतः इ० स० १८७६ सालीं मोठा दुष्काळ पडला होता, त्यावेळेस यांनीं आपले दुमाले गांवांतील रयत उपाशीं मरूं नये म्हणून कांहीं ठिकाणीं अन्नछत्रें घालून अनाथ लोकांचें पोषण केलें; व ठिकठिकाणीं धान्य वांटण्याची व्यवस्था केली व रयतेचे प्राण वांचविले. यामुळें गोरगरीब बाबासाहेबांवर अत्यंत प्रेम करीत असून त्यांचें कल्याण चिंतित आहेत. बाबासाहेब यांनीं दुष्काळग्रस्तांस वांचवून जीवदान देण्याच्या सत्कारणीं बरीच रक्कम खर्च केली. दुष्काळांत उत्तम प्रकारचा बंदोबस्त ठेविल्याबद्दल कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट व सातारचे कलेक्टरसाहेब यांच्याकडून बाबासाहेबांना मोठ्या सन्मानाचीं पत्रें आलीं आहेत. पावसाळ्यांत उतारू लोकांनां व शेतकरी यांनां जाण्यायेण्याकरितां यांनीं पाटण येथें कोयना नदीवर व नांदणी गांवीं पंचगंगा नदीवर व पिरळें व सावर्डे येथील नदीवर धर्मार्थ नांवा व होड्या ठेविल्या आहेत. त्याचप्रमाणें

धर्मशाळा, तळीं, विहीरी, दवाखाने वगैरे सार्वजनिक उपयोगाच्या कृत्यांस हे मनापासून द्रव्यद्वारा योग्य मदत करितात.

बाबासाहेब यांनीं आपल्या दुमाल गांवांत प्रवासी लोकांस व अंमलदार, कामदार वगैरे मंडळीस उतरण्याकरितां सोईवार धर्मशाळा व देवालयें बांधिलीं आहेत, व त्या ठिकाणीं अवश्य लागणारीं भांडीं वगैरे किरकोळ सामान मिळण्याची योग्य सोय करून ठेविली आहे.

विद्यावृद्धीकडे यांचें फार लक्ष्य आहे. अनाथ व गरीब मुलांस आपल्या खर्चानें ( स्कॉलरशिपा ) योग्य मदत करून त्यांना शिकण्यास उत्तेजन देतात. व कांहीं ठिकाणीं नवीन शाळा होण्याबद्दल यांचा प्रयत्न चालू आहे.

श्री० बाबासाहेब यांनां कोर्टांत जाण्याची माफी आहे. साक्ष देण्याचें कारण पडल्यास कमिशन मार्फत किंवा न्यायाधीशांनीं त्यांच्या वाड्यांत येऊन साक्ष घेण्याची वहिवाट आहे.

राजाराममहाराज छत्रपति यांनां दत्तक घेतल्याबद्दल पाटणकर यांच्या घराण्याचा फायदा झाला नाहीं; म्हणून तें नुकसान भरून येण्याकरितां मेहेरबान अंडरसनसाहेब माजी पोलिटिकल एजंट यांनीं सरकारास रिपोर्ट केल्यावरून ता० १० माहे सप्टंबर सन १८६८ सालीं इतर जहागिरदार लोकांकडून शेंकडा १५ रुपये नजराणा घ्यावा, व पाटणकर यांजपासून वतनासुद्धां आदमासें शेंकडा ५ रुपये घ्यावा, असा नंबर २४३८ चा मुंबईसरकारचा ठराव झाला आहे त्याप्रमाणें हल्लीं वहिवाट चालू आहे.

रॉयलजुबिलीचेवेळीं बाबासाहेब यांनीं आपल्या दुमाले गांवांतही उत्साह करविला होता. त्याबद्दल कलकत्ता येथें रॉयलजुबिली नांवाच्या ग्रंथांत पृष्ठ १६९ यावर समग्र हकीकत छापून प्रसिद्ध झाली आहे.

श्रीमंत बाबासाहेब पाटणकर यांच्या निमंत्रणावरून हल्लींचे श्रीमन्महाराज शाहूछत्रपतिसाहेब सरकार करवीर यांचीं स्वारी ता० २० माहे एप्रील सन १८९२ रोजीं पाटण येथें लवाजम्यासह गेली होती, त्यावेळेस रस्त्यावर दुतर्फा चित्रविचित्र निशाणें उभीं करून कोंवळ्या पल्लवांच्या भव्य कमानीं करून शहर सुशोभित केलें होतें. तशीच वाड्यांत दरबारची फार उत्तम प्रकारची सिद्धता करून ठेविली होती. नागोजीराव बाबासाहेब यांची सरकारांनां सलामी होतांच दरबारच्या वहिवाटीप्रमाणें सरकारांतून बाबासाहेब यांस भरजरी दुपेटा देण्यांत आला व बाबासाहेब यांनीं महाराज सरकारांनां एक मंदील दुपेटा व किनखापी भरगच्ची तागा आणि मलमलीचीं ठाणें दोन अशीं चांदीचे ताटांत घालून अर्पण केलीं. तसेंच बरोबरच्या सरदार, कामदार वगैरे लोकांस मौल्यवान् पोषाख देऊन शिपाई प्यादे वगैरे यांस एकंदर ४००–५०० पागोटीं दिलीं. ह्याप्रमाणें सरकार स्वारीचा मोठ्या आनंदानें सत्कार केला.

साताराजिल्ह्यांतील सेटलमेंट ऑफिसर मे० आर्थरसाहेब यांची स्वारी ता० २९ माहे एप्रील सन १८९३ रोजीं कारवटचे रानांत शिकारीस गेली होती, त्या वेळेस त्यांच्या शिपायाची गोळी चुकून त्यांना लागली, त्या जखमेमुळें ते फार हैराण झाले; ही बातमी बाबासाहेब यांस कळतांच ते स्वतः बरोबर मेणा, भोई वगैरे घेऊन साहेबांजवळ गेले व त्यांचा योग्य बंदोबस्त करून त्यांना पाटणास घेऊन आले व साताऱ्यास तार करून बाबासाहेब यांनीं डाक्तर आणवून योग्य वेळीं उपचार करविला व आपले फेटणांत त्या साहेबास बसवून टप्याचे घोडे ठेवून त्यांनीं त्याच दिवशीं त्यांना महाबळेश्वराकडे त्यांच्या मडमसाहेबाजवळ पोंचतें करविलें. अशा प्रकारें बाबासाहेब यांनीं संकटावस्थेंत त्या साहेबास योग्य मदत केल्याबद्दल साताराजिल्ह्याचे कलेक्टर यांजकडून दि० मु० जा० ४०१ ची आभारप्रदर्शक यादी* श्री० बाबासाहेब यांस आली आहे.

---

* यादी मेहेरबान नागोजीराव ऊर्फ बाबासाहेब पाटणकर तालुके पाटण जिल्हा सातारा यांजकडे.— आर० इ० क्यांडी साहेब कलेक्टर, जिल्हा सातारा, यांजकडून जाण्याची ऐसीजे. कारवटें तालुके पाटण येथें मेहरबान आर्थरसाहेब फॉरेस्ट सेटलमेंट ऑफिसर, जिल्हा सातारा, हे शिकारीस गेले होते, तेथें साहेब बहादुरांस जो अपघात झाला त्याजबद्दलची हकीकत सायंत आम्हांस समजली. यास साहेबबहादुरांस कारवट्यांहून पाटणास व पाटणाहून कराडास पोंचविण्याचे कामीं आपण फार मेहनत घेऊन त्यांनां सर्व प्रकारची मदत आपण योग्य वेळीं केल्याचें ऐकून आम्हांस फार संतोष झाला. आपण केलेल्या या स्तुत्य कृत्याबद्दल

श्रीमंत बाबासाहेब यांची ईश्वराच्या ठिकाणीं फार भक्ति आहे, ते रामोपासक असल्यामुळें पाटण संस्थानांत श्रीरामाच्या देवस्थानाकडे पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरे व देवापुढें पुराण, गायन इत्यादि व्यवस्था फार चांगली ठेविली आहे. त्याचप्रमाणें करवीरींही श्रीरामाची पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरेची व्यवस्था केली आहे. यांनीं आपल्या पदरीं पुराणिक ठेविले असून त्यांजकडून नित्य वाल्मीकिरामायण, भक्तिविजय वगैरे ग्रंथाचें श्रवण ते करित असतात. करवीर इलाख्यांतील भूदरगड पेट्यांत श्रीचक्रेश्वर म्हणून एक शंकराचें स्वयंभू देवस्थान आहे, त्याचा उत्सव प्रतिवर्षी माघ महिन्यांत ते करीत असतात. पांच दिवस मुक्तद्वार ब्राह्मणभोजन, पूजा, अभिषेक, कथा, कीर्तन, पुराण वगैरे गोष्टी उत्तम तऱ्हेनें होतात. ह्या उत्सवाप्रीत्यर्थ एकंदर खर्च बराच होत असतो. सहा सात खंडी धान्य लागतें. उत्सवानिमित्त येणारे लोकांस, राहण्याची वगैरे गैरसोय होऊं नये म्हणून बाबासाहेब यांनीं तेथें धर्मशाळा वगैरे नवीन बांधिल्या आहेत; व सर्व प्रकारची सोय करून ठेविली आहे. यांनीं करवीर येथें आपले वडील रामचंद्रराव पाटणकर यांची छत्री, पंचगंगा नदीच्या कांठीं श्रीमंत छत्रपति थोरले शिवाजी महाराज व श्रीमंत छत्रपति बाबासाहेब महाराज यांचे छत्रीनजीक बांधून त्यामध्यें शिवलिंगाची स्थापना केली आहे व पूजा नैवेद्याची व्यवस्था केली आहे; या छत्रीस प्रतिवर्षी श्रावण मासांत अभिषेक होत असतो. यांनीं आपले कारकीर्दींत अभिषेक अनुष्ठानें वगैरे बरींच सुरू केलीं आहेत. सत्कर्माकडे यांचें चांगलें लक्ष्य आहे. यामुळें शास्त्री, पंडित, भिक्षुक वगैरे बरीच मंडळी यांच्या भेटीस नेहमीं जात असते, त्या लोकांचा बहुमान करून त्यांच्या योग्यतेनुरूप त्यांची संभावना करितात. हरिदास वगैरे कोणी आल्यास त्यांचीं कीर्तनें करवून संभावना करितात.

---

आम्हांस निरंतर स्मरण राहील आणि हा मजकूर आपल्यास कळण्याकरितां ही यादी आपल्यास लिहिण्यांत आली आहे. आपणांस या कामीं फार तसदी पडली हें आम्हांस पूर्णपणें कळून आलें आहे. मेहेरवानांस, कळावें. ता० ३ माहे मे सन १८९३ इसवी.

सही,

**आर० इ० क्यांडी, कलेक्टर सातारा.**

ह्यांनीं आपल्या संततीच्या कल्याणार्थ करवीर शहरांतील काशीविश्वेश्वराची नित्यपूजा व अभिषेक वगैरे करण्याची व्यवस्था दौलतींतून कायम केली आहे.

श्रीमंत बाबासाहेब यांनीं नवीन इमारती बऱ्याच बांधिल्या आहेत. त्यांपैकीं पाटण येथें सन १८९१ सालीं सुमारें ६०१७० हजार रुपये खर्चून एक टोलेजंग वाडा बांधिला आहे. व पाटण शहरांत पाणी आणण्याचाही त्यांचा विचार चालला आहे.

पुणें शहरांत पेशवाईत पाटणकर यांच्या लष्कराचे लोक उतरण्याची एक जागा होती, तिची, पेशवाई बुडाल्यानंतर तिकडे वरचेवर जाण्याचें कारण पडेनासें झाल्यामुळें आजुबाजूचे लोक वहिवाट करूं लागून ती यांचे ताब्यांतून दुसऱ्याचे ताब्यांत गेली होती, व लोक तीवर आपला हक्क सांगूं लागले होते. तथापि बाबासाहेब यांनीं हायकोर्टपर्यंत काम चालवून ती आपले कबज्यांत घेतली व त्या ठिकाणीं सुमारें १०००० रुपये खर्च करून नवीन टुमदार इमारत बांधिली व तिच्या पश्चिम बाजूस एक लहानसा बाग करून पाण्याची वगैरे व्यवस्था केली आहे.

नांदणी येथें बाबासाहेब यांनीं एक वाडा बांधिला आहे. हा वाडा इ० सन १८९४ सालीं पुरा झाला. यालाही ७००० रुपये खर्च झाला, ही इमारत फार भव्य व सुशोभित झाली आहे.

इ० स० १८९२ सालीं बाबासाहेब यांनीं कोल्हापूर येथें रंकाळवेशीच्या बाहेर आपले पागेनजीक एक वाडा बांधण्याचें काम सुरू केलें तें इ० स० १८९४ सालीं पूरें झालें. ह्या वाड्याचें काम चांगलें झालें आहे. याला २०००० रुपये खर्च आला.

बाबासाहेब यांनीं वाड्याच्या कामावर असणाऱ्या गंवडी, सुतार, मेस्त्री वगैरे लोकांस मंदील, पागोटीं, व सोन्यारुप्याचीं कडीं वगैरे बक्षिसें दिलीं.

इ० सन १८६५ सालीं श्री० बाबासाहेब यांनीं सावर्डे व पिरळें या गांवीं वाड्याचें काम २००० रुपये खर्च करून केलें आहे.

चक्रेश्वर येथें देवालय, धर्मशाळा विहीर वगैरे बांधण्याचा एकंदर खर्च ५००० रुपये झाला.

रंकाळेतलावानजीक जी उत्तम बाग तयार आहे त्या संबंधानें एकंदर खर्च २५००० रुपये झाला आहे.

पांचगांव वगैरे गांवीं ५०० एकर जमीन नवीन खरेदी करून कुरणें तयार केलीं व त्यासंबंधानें त्यांस एकंदर २०००० रुपये खर्च आला होता. इमारतींचें वगैरे वर्णन वर जागजागीं आलेंच आहे.

श्रीमंत बाबासाहेब यांनीं आपले संस्थानांत फरासखान्याचें सामान व बिलोरी सामान आणि रत्नादि अलंकार वगैरे हजारों रुपयांचे नवीन खरेदी करून संग्रहीं ठेविले. त्यांची देवावर व ब्राह्मणांवर फार भक्ति होती. नरसिंहवाडी येथें वे० शा० सं० रा० रा० रामदीक्षित यांनीं ज्यावेळीं यज्ञमहोत्सव केला होता, त्यावेळीं श्रीमंत बाबासाहेब हे सहपरिवार वाडीस गेले होते; त्यांनीं यज्ञनारायणाचें दर्शन घेऊन देवतेपुढें सुवर्णदक्षणा ठेविली व दीक्षित यांची वस्त्रालंकारानें दांपत्य पूजा केली. त्याचप्रमाणें यज्ञाला चांगली मदत करून स्वारी परत करवीरास आली.

यानंतर कांहीं दिवसांनीं हौशाकांच्या विवाहासंबंधानें श्री• बाबासाहेब यांच्या मनांत विचार घोळूं लागला व ते स्थलाची योजना करूं लागले; पुढें धार येथील पोवार यांचें घराणें पसंत पडून वरनिश्चय झाला. व करवीर शहरीं मोठ्या समारंभानें व थाटानें यांनीं कन्यादान केलें. या लग्नासही बराच खर्च आला होता.

इ० स० १८९४ सालीं श्री० बाबासाहेबांवर एक दुःखाचा फारच मोठा डोंगर कोसळला, त्यांच्या प्रियपत्नी श्रीमती सौ. गोजराबाई ह्या निवर्तल्या. त्यामुळें त्यांस व त्यांच्या लहान मुलांस अनिवार दुःख झालें. आश्रित व प्रजाजन त्या साध्वीचे गुणानुवाद वर्णन करून हळहळूं लागले. श्री० सौ० गोजराबाई ह्या परम साध्वी होत्या. आपल्या पतीप्रमाणेंच त्यांची देवधर्मावर निष्ठा असून त्या स्वभावानें सोज्वल होत्या. पतिनिष्ठा हा गुण त्यांच्या आंगीं इतका भिनलेला होता कीं, पति आज्ञेबाहेर वर्तन करणें म्हणजे महत्पाप करणें आहे असें त्यांस वाटत असे व त्याप्रकारचें त्यांचें वर्तनही होतें. गोरगरीब व अनाथ यांचा परामर्ष घेण्याकडे त्यांची प्रवृत्ति होती. अशा ह्या साध्वीच्या मरणानें कोणास बरें दुःख होणार नाहीं?

स्त्रीविरहाचें दुःख-शमन होतांच इ० स० १९०२ मध्यें आपल्या परमपूज्य महाराणी व्हिक्टोरिया एम्प्रेस ऑफ इंडिया ह्या ख्रिस्तवासी झाल्यामुळें त्यांच्या गादीवर लोकप्रिय व शांतता साम्राज्यवादी असे त्यांचे चिरंजीव सातवे एडवर्ड हे गादीवर बसले; त्यावेळीं हिंदुस्थानांतील प्रजाजनांस बादशहांचा जाहीरनामा वाचून दाखवावा व बादशहांच्या नांवाची द्वाही फिरविली जावी म्हणून त्यावेळचे व्हाइसराय लॉर्ड कर्झन साहेब बहादूर यांनीं दिल्ली येथें दरबार भरविला. ह्या दरबारास हिंदुस्थानांतील राजे-रजवाडे सरदार, जहागीरदार, ऑफिसर यांस आमंत्रण करण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें श्री० बाबासाहेब यांस व त्यांचे उभय चिरंजीव श्री० चांदजीराव ऊर्फ गणपतराव व श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब हल्लींचे सरंजामदार यांसही दरबारास हजर होण्यासंबंधाचें आमंत्रण आलें होतें. त्या आमंत्रणाप्रमाणें श्री० बाबासाहेब हे आपल्या सर्व परिवारासह दिल्लीस जावयास निघाले. त्यावेळीं त्यांनीं आपल्या धार्मिक वृत्तीस अनुसरून एक पंथ और दो काज करण्याचा संकेत केला. अनायासें इतक्या लांबचा प्रवास तर करीत आहोंच, तेव्हां जवळच आपलें परमपूज्य काशीक्षेत्र आहे, तेथील यात्राही केल्यास महापुण्य संग्रहीं पडेल अशी भावना धरिली व त्यांनीं ह्या इच्छेप्रमाणें दिल्ली येथील दरबार संपतांच सपरिवार काशीयात्रा करून त्या ठिकाणीं अगणित दानधर्म केला व स्वारी परत आली. दिल्लीदरबारहून परत येतांच. लवकरच एक लग्नसोहळा करण्यांत आला. श्री० बाबासाहेब यांचे ज्येष्ठ चिरंजीव श्री० चांदजीराव ऊर्फ गणतराव यांचा विवाह इ० सन १९०४ या सालीं, श्री० सिद्धराज पोंवार देसाई मंगसुळकर यांच्या कन्येशीं मोठ्या थाटानें झाला. ह्या लग्नसमारंभास श्री० छत्रपति सरकार करवीर यांनीं उभयतां युवराजांस, श्री. पिराजीराव ऊर्फ बापुसाहेब घाटगे चीफ ऑफ कागल ( सिनिअर ) व इतर मोटमोठ्या सरदार मंडळीबरोबर रवाना केलें होतें. त्यामुळें लग्न-समारंभास अप्रतिम शोभा आली होती. लग्नसमारंभ निर्विघ्नपणें शेवटास जातांच, खासे मंडळी स्पेशल गाडीनें परत करवीरीं दाखल जाहली. पुढें सोहळा आटोपून श्री० बाबासाहेब करवीरीं आल्यावर त्यांनीं, श्री० महाराजसरकार करवीर यांस एक बडी मेजवानी दिली व या लग्नसमारंभामुळें जिकडे तिकडे आनंद व्यापून राहिला. पण ह्या आनंदाचा उपभोग बरेच दिवस घ्यावा असें श्री. बाबासाहेबांच्या प्राक्तनीं नव्हतें. लग्नसमारंभ आटोपून सरासरी ८-१० महिन्यांनीं त्यांस अर्धांग वायूचा आजार झाला. अनेक वैद्यांचे औषधोपचार केले. बाबासाहेबांची देवधर्मावर विशेष श्रद्धा असल्यामुळें त्या बाजूनेंही अनेक प्रकारचे यत्न केले. परंतु त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. व त्याच दुखण्यांत श्री० बाबासाहेब यांचा ता० २६ दिसेंबर १९०६ रोजीं एकादशीच्या पुण्यप्रद दिवशीं अंत झाला.

श्री. बाबासाहेबांच्या मरणानें त्यांच्या कुटुंबांत हाहाःकार वर्तणें साहजिकच होय! परंतु त्यांच्या प्रजाजनांस, आप्त इष्ट मित्रमंडळीस तसेंच ज्यांच्याशीं

श्री० बाबासाहेबांचा थोडासा तरी परिचय झालेला होता त्यांस, ही श्री० बाबासाहेबांच्या निधनाची वार्ता समजतांच अतिशय दुःख झालें. त्यांनीं आपल्या सौजन्यानें सर्वत्रांस आपलेंसें केलें होतें. त्यामुळें लहान असो कीं मोठा असो, त्यास श्री० बाबासाहेबांची निधनवार्ता ऐकून दुःख वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

श्री० बाबासाहेब यांनीं आपल्या हयातींत जो पुण्याचा सांठा करून ठेविला होता, त्या पुण्याच्या सांठ्यामुळेंच त्यांस एकादशीसारख्या पवित्र दिवशीं मरण आलें. व त्यांस सद्गति प्राप्त जाहली. त्यांच्या अंतकालची सर्व व्यवस्था श्री० महाराज सरकार करवीर यांनीं श्री० पिराजीराव ऊर्फ बापुसाहेब यांस पाठवून त्यांच्या लौकिकाप्रमाणें केली. त्यांच्या प्रेतयात्रेस मोठमोठे सरदार, मानकरी व राजवाड्यांतील मंडळी गेली होती. कारण पाटणकर घराण्याचा संबंध राजघराण्यांशीं विशेष असल्यानें त्यांस अप्रतिम मान देण्यांत आला.

श्री० बाबासाहेब हे फार थोर मनाचे असून परोपकारी होते. आश्रितलोकांवर व नोकरचाकर वगैरे मंडळींवर त्यांचें पुत्रवत् प्रेम होतें. औदार्य हा गुण त्यांच्या ठायीं इतका वास करीत होता कीं, त्यांनीं कोणासही विन्मुख परत पाठविलें नाहीं. त्यांचा स्वभाव शांत असून मनमिळाऊ होता. अहंकाराचा त्यांस स्पर्शही झाला नव्हता. ब्रह्मवृंदाचा परामर्ष घेण्याचे बाबतींत यांचा हातखंडा असे. ते दुर्गुणाचा तिरस्कार करून सद्गुणांचा गौरव करीत. पिढीजाद मराठ्यांच्या अंगीं जे गुण अवश्य असले पाहिजेत, ते श्री० बाबासाहेबांच्या ठिकाणीं वास करीत होते. त्यांचा चेहरा उमदा असून त्यांस पाहतांच दुसऱ्या मनुष्यावर त्यांची छाप बसत असे. ब्रिटिश राजकर्त्यांच्या हातीं हिंदुस्थानचीं सूत्रें आल्यापासून हिंदुस्थानांत शांततेचें साम्राज्य वास करीत आहे; परंतु तसाच जर प्रसंग आला असता तर आपल्या पूर्वार्जित क्षत्रियत्वाच्या बाण्यास श्री० नागोजीरावांनीं खात्रीनें प्रज्वलित केलें असतें व इंग्रजसरकारास मदत केली असती; अशी त्यांच्या अंगीं शक्ति, व धैर्य होतें. निशाणबाजीमध्येंही ते प्रवीण होते. असा हा सर्वगुणसंपन्न मोहरा नाहींसा झाल्यानें सर्वत्रांस खेद होणें हें साहजिकच होय !

## श्री० चांदजीराव ऊर्फ गणपतराव.

### इ० स० १९०६ ते—१९०७.

श्री० बाबासाहेबांच्या मृत्यूनंतर त्यांचें ज्येष्ठ चिरंजीव श्री० चांदजीराव ऊर्फ गणपतराव यांस, श्री० छत्रपति सरकार करवीर यांच्या कृपेनें श्री० बाबासाहेब यांच्या दौलतीचा कुल अखत्यार देण्यांत आला. यांनीं आपलें प्रथम कुटुंब अशक्त असल्यामुळें सातारचे श्री० अण्णासाहेब महाराज यांच्या कन्येशीं द्वितीय शरीरसंबंध केला. श्री० अण्णासाहेब महाराज यांनीं पाटणकर घराण्याचा भोंसले घराण्याशीं जो पूर्वापार निकटचा संबंध आहे, तो लक्षांत घेऊन ह्या जुन्या व खानदानीच्या घराण्यांत आपली कन्या दिली. हा लग्नसोहळा उत्तम प्रकारें सिद्धीस गेला.

लग्नसोहळा होऊन थोडा काळ लोटतो न लोटतो, तोच काळानें यांजवर घाला घातला व ता. १ नोव्हेंबर १९०७ रोजीं श्री० चांदजीराव ऊर्फ गणपतराव यांचा प्लेगनें अंत झाला. त्यावेळीं नुकतीच प्लेगची सुरवात झालेली होती; त्यामुळें श्रीमंतांसह सर्वत्र मंडळी मुक्काम उदगांव पेटा शिरोळ ह्या ठिकाणीं हवा फेरबदल करण्यासाठीं गेलेली होती. परंतु कोठेंही गेलें तरी काळ पिच्छा सोडीत नसतो व त्यास अटकाव करणें हें मनुष्याधीन नसतें. श्री० चांदजीरावांनीं पूर्णपणें १० महिनेही दौलतीचा उपभोग घ्यावा अशी ईश्वरी योजना नव्हती, त्यास नाइलाज आहे. प्रत्येक मनुष्यानें त्याच्या इच्छेस मान देणें हें त्याचें कर्तव्य आहे.

श्री० चांदजीराव ऊर्फ अण्णासाहेब यांच्या निधनाची वार्ता श्री० सरकार छत्रपति यांस कळतांच त्यांनीं आपले सर्व बडेबडे सरदार वगैरे मंडळी रवाना करून, श्री० चांदजीरावांच्या प्रेतयात्रेची तयारी केली; व अंत्यविधिसुद्धां सर्व विधींची तजवीज सरकारकडूनच झाली. श्री० चांदजीरावांच्या मृत्यूनंतर सुमारें एक महिन्याच्या आंत त्यांचें प्रथम कुटुंब श्रीमती लक्ष्मीबाई साहेब (मंगसुळकर यांच्या कन्या) ह्यांचा ता० २४नोव्हेंबर १९०७ रोजीं अंत जाहला.

## श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब.

### इ० स० १९०७.—

श्री० चांदजीराव ऊर्फ अण्णासाहेब यांची कारकीर्द सुरू होऊन त्यांचें नांव कागदोपत्रीं दाखल होतें न होतें तोंच त्यांचा अंत झाल्यामुळें सर्वत्रांस ननस्वी दुःख झालें. परंतु झाल्या गोष्टीस इलाज नव्हता. पुढील व्यवस्था करणें अगत्याचें होतें. त्याप्रमाणें श्री० बाबासाहेब यांचे कनिष्ठ चिरंजीव श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब यांस श्री० छत्रपति महाराज सरकार करवीर यांनीं आपल्या नजरेखालीं घेऊन श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब यांच्या नांवें दौलत करण्याचा हुकूम मुंबईहून तारेनें केला व करवीरच्या उत्पन्नाप्रमाणें सातारा तालुक्यांतील पाटण गांवचें उत्पन्न मे० कलेक्टर साहेब बहादुर जि० सातारा यांनीं भीमराव ऊर्फ भाऊसाहेब यांचे नांवें दाखल केलें.

यानंतर लवकरच श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब यांचें लग्न,–श्री० सयाजीराव महाराज गायकवाड

यांच्या मातोश्री श्री०महाराणी जमनाबाईसाहेब यांच्या बंधूंच्या कन्येशीं झालें. हा लग्नसमारंभ श्री० छत्रपति सरकार करवीर यांनींच पुढाकार घेऊन आपल्या नजरेखालीं सिद्धीस नेला. हा लग्नसोहळा होतांच, श्री० भाऊसाहेब यांस आपल्या दौलतीची कुल मुखत्यारी देण्यांत आली व सर्व अधिकारसूत्रें त्यांच्या हस्तगत झालीं.

श्री० कै० बाबासाहेब यांनीं आपल्या कारकीर्दीमध्यें एक महत्त्वाचें कार्य शिरावर घेतलें होतें. तें कार्य शिरावर घेण्याचें कारण असें उपस्थित झालें होतें कीं, इंग्रज सरकारांनीं पाटणकरांच्या हक्कास बाध येण्यासारखे कांहीं हुकूम केल्यावरून त्यांनीं आपल्या ह्यातीमध्यें,-ज्या आपल्या पूर्वजांनीं-चांदजीरावांनीं-पूर्ण राजनिष्ठेनें जहागीर संपादन केली, त्यांचे कोणते व कशा प्रकारचे हक्क होते, त्याचा बाबासाहेबांपर्यंतच्या कोणींही वंशजांनीं विचार केलेला नव्हता. ज्याच्या मनास जसें वाटेल तसें त्यानें वागावें. प्रतिबंध मुळींच नाहीं, अशी अव्यवस्था असल्यामुळें-या गोष्टीचा कायमचा निकाल लागावा म्हणून त्यांनीं आपल्या हक्कासाठीं सरकारवर दिवाणी कोर्टांत दावा केला व पुराव्यासाठीं कागदपत्र दाखल केले. करवीर सरकारनें महालचे जे हक्क व अधिकार होते ते यापूर्वींच दिले होते. परंतु इंग्रज सरकाराकडूनही ते हक्क मिळावे, एतदर्थ हा प्रयत्न होता. दयाळु इंग्रज सरकारच्या समतोल न्यायबुद्धीचा मासला लवकरच दृष्टोत्पत्तीस आला. श्री. पाटणकर यांचे अस्सल कागदपत्र पाहून न्यायाधिशांनीं जो शेरा दिला तो योग्य असाच आहे. कागदांच्या अवलोकनानें न्यायाधिशांची पूर्ण खात्री होऊन त्यांनीं पाटणकर यांचे हक्क "**एखाद्या राजेलोकांच्या हक्काप्रमाणें आहेत.**" असा ठराव दिला. हें न्यायमूर्तींच्या निरपेक्ष न्यायबुद्धीस अत्यंत भूषणावह होय! हे हक्क मिळविण्यासाठीं श्री०बाबासाहेब यांनीं आपल्या ह्यातींत अविश्रांत श्रम केले. अतोनात खर्च केला. हक्काच्या प्राप्तीस्तव पैशाकडे पाहिलें नाहीं. परंतु हें सिद्ध झालेलें पाहण्याचें त्यांच्या नशिबीं नव्हतें. हुकूम होण्यापूर्वींच त्यांचा अंत झाला होता. व त्याचें श्रेय श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब यांस मिळावयाचें होतें. ह्या ईश्वरी योगामुळें श्री० बाबासाहेबांनीं जें महत् कार्य आरंभिलें होतें, त्याचा शेवट श्री० भाऊसाहेबांच्या कारकीर्दीमध्यें लागून त्याचीं मधुर फळें श्रीमंत भाऊसाहेबांस चाखावयास मिळालीं हें भाऊसाहेबांचें थोर भाग्य नाहीं असें कोण म्हणेल? श्री० भाऊसाहेब यांच्या पितृनिष्ठेचेंच हें फल आहे. त्यांचें आपल्या वडिलांवर जें प्रेम होतें, त्याचा बदला त्यांस उत्तमप्रकारें मिळाला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब हे जरी वयानें लहान आहेत, तरी त्यांच्या आंगीं त्यांच्या पूर्वजांचे अमोलिक गुण वास करीत आहेत. ते हुषार असून कार्यदक्ष आहेत. स्वतः चाणाक्ष असून एवढा पसारा सांभाळण्याचा वकूब त्यांचे आंगीं पूर्णत्वानें दिसून येत आहे. वडलांप्रमाणेंच ते मनमिळाऊ असून आपल्या प्रजेचें प्रेम एवढ्या लहान वयांतच त्यांनीं संपादन केलें आहे. ह्यावरून ते आपल्या कुळाच्या लौकिकांत विशेष भर घालतील अशीं सुचिन्हें दिसून येत आहेत. नुक्तेच ते आपले परमपूज्य बादशहा पंचम जॉर्ज यांस राज्याभिषेक झाला, त्यावेळीं दरबारास हजर राहण्याबद्दलचें आमंत्रण आल्यावरून दिल्लीस गेले होते. तसेंच दिल्ली येथील समारंभ आटोपतांच ते विलायतचा प्रवासही करून आलेले आहेत. प्रवासामुळें मनुष्याच्या आंगीं बहुश्रुतपणा, व्यवहारदक्षता, सभ्यपणाचे रीतिरिवाज वगैरे गुणांचा प्रादुर्भाव होत असतो. त्याप्रमाणें यांचेही आंगी ह्या गुणांचा प्रादुर्भाव होऊं लागला आहे. श्री०भाऊसाहेब यांजवर श्री०शाहू छत्रपति सरकार करवीर तसेंच श्री० मातोश्री महाराणीसाहेब सकवारबाई यांचें पूर्ण प्रेम असून, श्री० पिराजीराव ऊर्फ बापूसाहेब घाटगे चीफ ऑफ कागल (सिनियर) यांचा त्यांस पाठिंबा आहे. ह्या वरील माननीयांच्याच कृपेनें आपला विद्याभ्यास वगैरे झालेला असल्याबद्दल ते वारंवार उद्गार काढून त्यांचा पाठिंबा आपणांस चिरकाल असावा म्हणून ईश्वराची प्रार्थना करीत असतात.

हे तरुण सरदार श्री० भीमराव ऊर्फ भाऊसाहेब कीर्ति संपादन करून आपल्या पूर्वजांनीं जो लौकिक मिळविला आहे, त्यांत भर घालतील व आपल्या वडिलांच्या ठिकाणीं असलेले सर्व सद्गुण यांचा कीर्तिध्वज, "यावच्चंद्र दिवाकरौ" फडकत राहील असें करितील अशी आशा आहे. हे तरुण सरदार दीर्घायु होऊन यांच्या दीर्घकालीन कारकीर्दीत अनेक उत्तमोत्तम गोष्टी होऊन ह्या साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याच्या कैफियतींत भर पडावी अशी जगच्चालक प्रभूजवळ आमची सविनय प्रार्थना आहे.

## ग्वाल्हेर येथील पाटणकरांचें घराणें.

### श्री० सरदार रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब पाटणकर-ग्वाल्हेर.

श्री० सरदार रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब पाटणकर यांचे पूर्वज कोल्हापूर दरबारामध्यें पहिल्या प्रतीचे सरदार होते. पाटणकर घराण्यास कोल्हापूर संस्थानची नामी नोकरी बजाविल्यामुळें, त्यांना ज्या जहागिरी मिळाल्या होत्या त्या व निजामाच्या राज्यांतून मिळालेल्या मिळून सालीना १२५००० रुपयांचे उत्प-

त्राची जहागीर व पहिल्या प्रतीच्या सरदाराचे सर्व मान मिळाले होते. नारायणरावसाहेब पाटणकर यांची तिसरी मुलगी अंबिकाबाई ही वाडीचे खेम सावंत यांस दिलेली होती. ह्या घराण्याची परंपरा अशी आहे. मूळ चांदजीरावांचे बंधु हणमंतराव, यांचे हिरोजीराव, द्वारकोजीराव व धारराव; पैकीं द्वारकोजीराव यांस पुत्र सात, रामराव, लक्ष्मणराव, बाबुराव राघोजीराव, बाळोजीराव, बाजीराव व जयरामराव; ह्या सात बंधूंपैकीं बाळोजीराव यांचे चिरंजीव नारायणराव व मानसिंगराव, वडील नारायणरावसाहेब पाटणकर; यांचा धाकटा भाऊ मानसिंगराव पाटणकर. हे लक्ष्मणराव यांचे पुत्र सुलतानराव यांस दत्तक दिले होते. ते जहागिरीचे मालक झाले. त्यांचें लग्न कोल्हापूर संस्थानांतील सरदार खानविलकर यांचे मुलीबरोबर झालें होतें. ह्या मानसिंगराव* पाटणकरांनीं फारच शौर्याचीं कामें केलेलीं आहेत. खानविलकरांच्या मुलीच्या पोटीं त्यांना रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब हे झाले. त्यांनीं सर्व पाटणकरांत अतिशय कीर्ति मिळविली. त्यांचा जन्म इ० स० १८०१ मध्यें अकोला येथें झाला. लहान वयांतच त्यांनीं संस्थानचे कारभारसंबंधीं आपले बुद्धिवैभवानें, हुशारीनें व चातुर्यानें प्रतिष्ठा मिळविली.

पेशव्यांनीं दौलतराव शिंदे यांचे मुलीबरोबर त्यांचें लग्न लावून दिलें. ( इ० सन १८१६ ) व त्यामुळें त्यांना दरसाल सवा १। लाख उत्पन्नाची जहागीर मिळाली. पण ह्या जहागिरीमुळें, पूर्वीच्या जहागिरीचें नुकसान झालें. इ० स० १८१८ मध्यें पेशवाईचा ऱ्हास झाल्यानंतर मानसिंगराव हे शिंदे व इंग्रज सरकार यांमधील तहाची वाटाघाट करण्याच्या खटपटींत गुंतले. या त्यांच्या कामगिरीमुळें, त्यांस शिंदे सरकारांनीं पावागड तालुका दिला. यानंतर राजपुतान्यामधील केन्हेरा तालुक्यांतील रजपुतांनीं शिंद्याच्या विरुद्ध डोकें उचललें, त्यांचें पारिपत्य करण्याकरितां जॉन बॅट्स हा शिंद्याचा सेनापति फौजेसह गेला; परंतु दोन महिनेपर्यंत त्याची डाळ शिजली नाहीं. त्यावरून रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब यांस अरबांच्या लष्करांसह रवाना करण्यांत आलें. त्यांनीं मोठ्या बहादुरीनें जय मिळविला. त्याच वेळीं शिंदेमहाराजांचे राज्यांत गृहकलह लागून बायजाबाईसाहेब ग्वाल्हेर सोडून दक्षिणेंत गेल्या. रामचंद्रराव आप्पासाहेब व त्यांचे बंधु हिंदुराव त्यांच्या पाठीमागून गेले. परंतु हिंदुराव लवकरच ग्वाल्हेरला परत आले आणि रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब बायजाबाईबरोबर राहिले. बायजाबाईसाहेब परत ग्वाल्हेरला आल्यानंतर, रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब यांस पालखी, छत्री, चवरी व आणखी दरबारांतील मानाची जागा देऊन, त्यांच्या पूर्वीच्या जहागिरींत व पदवींत सुधारणा केली.

इ०स०१८५६त जेव्हां ते त्या वेळच्या शिंदेमहाराजांबरोबर कलकत्त्यास गेले होते, त्यावेळीं त्यांना एक घोडा, एक हत्ती, हिऱ्याची कंठी, मोत्यांचा तुरा आणि मानाचा पोषाख देण्यांत आला. ते १८५९ त मृत्यु पावले, त्या वेळीं त्यांचा मुलगा त्रिंबकराव ऊर्फ बाबूसाहेब यांच्या हातीं जहागीर आली. तो इ०स० १८८५ पर्यंत जिवंत होता. त्रिंबकराव ऊर्फ बाबूसाहेबांचे मरणानंतर रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब जहागिरीचे मालक जाहले. त्यांनीं कोल्हापूरचे सरलष्कर खरडेकर यांचे भगिनीबरोबर लग्न केलें. तिच्यापासून त्यांना श्री० त्रिंबकराव व सूर्याजीराव असे दोन मुलगे आलेले असून पैकीं वडील पुत्र श्री० महाराज शिंदे यांनीं इ० स० १८९८ त स्थापन केलेल्या, ग्वाल्हेरच्या सरदार स्कूलमध्यें अभ्यास करित आहेत.

श्री०शिंदेसरकार यांनीं बदलमुशाहिराबद्दलची व्यवस्था श्री०रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब यांजवर सोंपविली आहे.

---

* फोंड सावंत यांची वडील बायको पार्वतीबाई ही सुबराव घाटगे कागलकर यांची भाची. या सुबरावाचा व आप्पासाहेब निपाणकरांचा कांहीं आप्तपणा होता. व त्यासंबंधानें सुबराव निपाणीस राहत असे, तो व आपासाहेब निपाणकर या दोघांनीं मिळून अशी मसलत केली कीं, फोंड सावंत यांस कैद करून त्यांचा पार्वतीबाईच्या पोटीं झालेला मुलगा खेम सावंत यांस लक्ष्मीबाईच्या मांडीवर देऊन गादीस अधिकारी करावें आणि सुबराव घाटगे यानें निपाणकरांचे लोक वाडीस होते, त्यांच्या मदतीनें राज्यकारभार करावा. त्याप्रमाणें सुबराव घाटगे आणि निपाणकरांचा मावसभाऊ मानसिंगराव पाटणकर हे बरोबर चार पांचशें स्वार व पायदळ घेऊन खेम सावंतासह वाडीस आले, व खेम सावंत यांस लक्ष्मीबाई यांच्या मांडीवर बसविलें. सुबराव घाटगे चार आठ दिवस वाडींत राहून तोरगलास परत गेला. इकडे मानसिंगराव पाटणकर हा सैन्यासह वालावलीस फोंड सावंत यांस भेटण्याकरितां म्हणून गेला. व तेथें त्यांस त्यानें देऊळांत वेढा दिला. तेव्हां फोंड सावंत हे देऊळाच्या दवाजावरील माडीच्या कडण्या कापून बाहेर पडले. ते काळसें, कलमठ, नांदगांव, खारेपाटण या गांवांवरून महाडास जाऊन पोहोंचले. मानसिंगराव पाटणकरानें राजापुरापर्यंत त्यांचा पाठलाग केला; परंतु फोंड सावंत त्यांच्या हातीं लागले नाहींत. नंतर तो सिंहगडास परत आला. तेथें त्यास कोल्हापुरावर हल्ला करण्याचा एक बेत चालला आहे अशी बातमी समजली; तेव्हां तो तावडतोब कोल्हापुरास परत निघून गेला.

सावंतवाडी संस्थानचा इतिहास, पृष्ठ १०६.



कै० श्रीमंत सरदार रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब पाटणकर.

( कै० श्री० बायजाबाई साहेब शिंदे यांचे जांवई. ) ग्वाल्हेर येथील पाटणकर घराण्याच्या शाखेचे मुळ पुरुष.



कैं० श्रीमंत सरदार त्रिंबकराव रामचंद्रराव ऊर्फ आप्पासाहेब पाटणकर.



श्रीमंत सरदार रामचंद्रराव त्रिंबकराव पाटणकर, ग्वाल्हेर.



श्रीमंत सरदार त्रिंबकराव रामचंद्रराव पाटणकर.
( श्री० स० रामचंद्रराव पाटणकर यांचे ज्येष्ठ चिरंजिव .)



श्रीमंत सरदार सूर्याजीराव रामचंद्रराव पाटणकर.

( श्री० स० रामचंद्रराव पाटणकर यांचे कनिष्ठ चिरंजिव. )

ते नेहमीं संस्थानचे नामांकित पाहुण्यांचा आदरसत्कार करण्यांत गुंतलेले असतात. रेसिडेंट साहेबांचे भेटीच्या वेळीं त्यांना देहसंरक्षकाचा मान मिळतो. ते मनमिळाऊ स्वभावाचे व योग्य रीतीचे असून नेहमीं गरीबांस मदत करण्यास तयार असतात. ते बळकट आणि खंबीर असून सुधारणेचे भोक्ते आहेत. लोकांमध्यें त्यांचें बरेंच वजन आहे. श्री० महाराजांकडून व संस्थानांतील इतर सरदारांकडून त्यांची पुष्कळ चहा होते.

---

## मिरकर सावंत ऊर्फ साळुंखे यांची हकीकत.

कोंकणांतील रत्नागिरी जिल्ह्यांत मिऱ्या, झाडगांव, रत्नागिरी, नाचणें व शिवरें या चार गांवीं सावंत–साळुंखे ह्या उपनांवाचे मराठे आहेत. ते " सोळंकी उर्फ साळुंखे वंशाचे कल्याण येथें जे राजे झाले; त्यांचे आपण वंशज आहों " असें म्हणतात. तें त्यांचें म्हणणें बहुतांशीं खरें आहे असें आम्हांस वाटतें; कारण चालुक्य ऊर्फ सोळंकी वंशाच्या कुळगोत्र वगैरेचा मेळ त्यांच्या कुळगोत्राशीं तंतोतंत जुळतो. शिवाय सातारा जिल्ह्यांतील पाटण येथील राजे नागोजीराव साळुंखे पाटणकर हेही त्यांना आपले भाऊबंद असें म्हणतात व त्यांनीं बरेच वेळां त्या प्रकारचे उद्गारही काढिले आहेत.

यांचा मूळ पुरुष सोरबाजी साळुंखे, हे विजापुरचे बादशहाकडून कोल्हापूर प्रांतीं शिरगांवीं आपल्या एकंदर सरंजामासह नेमणुकीवर होते. त्यांचे पश्चात् त्यांचे पुत्र तुकबाजी व रामराय साळुंखे यांस बादशाहानें बोलावून आणून, त्यावेळीं कोंकणांत जे पठाण लोक रत्नागिरीच्या आसपास रयतेस त्रास देत होते; त्यांचें पारिपत्य करून आणण्याकरितां पाठविलें. त्याप्रमाणें ते रत्नागिरि येथें येऊन पठाणांबरोबर लढाई करून त्यांस मोठ्या शौर्यानें जिंकून किल्लेदार अनंतसिंग ऊर्फ रतनसिंग यास कैद केलें. या लढाईत रामराय साळुंखे हे मरण पावले, तेव्हां त्यांची बायको सती गेली. त्यांस संतति नव्हती.

तुकबाजी साळुंखे यांनीं किल्लेदारास बादशहापुढें नेऊन हजर केलें; तेव्हां बादशहानें फार खूष होऊन त्यांस सामंत ( सावंत ) हा पदवी देऊन मोठ्या मानास चढविलें. शिवाय रत्नागिरी येथील बंदोबस्ताचें काम त्यांजकडेच सोंपवून, त्यांस परत कोंकणांत पाठविलें. त्याप्रमाणें ते कोंकणांत रत्नागिरी झाडगावांत येऊन राहिले. त्यावेळीं रत्नागिरी व त्याचे आसपासचा मुलूख त्यांचे ताब्यांत होता.

तुक सावंत साळुंखे, यांस काळ सावंत साळुंखे, म्हणून एक पुत्र होता. त्यास १ कुक सावंत साळुंखे २ येस सावंत साळुंखे ३ गण सावंत साळुंखे ४ पील सावंत साळुंखे, असे चार पुत्र होते. त्यांचे वंशज अनुक्रमें हल्लीं मिऱ्या, झाडगांव, नाचणें व शिवरें, तालुका रत्नागिरि या गांवीं आहेत. पैकीं मिऱ्या गांवीं त्या एका पुरुषापासून झालेल्या लोकांची संख्या एक हजारांवर असून घरें अडीचशांवर आहेत. बाकी तीन गांवीं अनुक्रमें सात, पांच व चार घरें आहेत.

कुक सावंत साळुंखे यांचा पुत्र गण सावंत साळुंखे यास पुत्र दोन–हर सावंत साळुंखे व माक सावंत साळुंखे. पैकीं दुसऱ्यास संतती नव्हती. हर सावंत साळुंखे यांनीं रत्नागिरी नजीक शिरगांव म्हणून महाल होता, तेथील नाईक तहशीलदार पवार म्हणून एक नामांकित सरदार होता, त्याच्या मुलीशीं लग्न केलें. तेव्हां त्या पवारांकडून त्यांस मिऱ्या हा गांव आंदण मिळाला. नंतर हरसावंत हे रत्नागिरी येथील आपला हक्क कायम ठेवून, मिऱ्या गांवीं जाऊन राहिले. पुढें या दंपत्यास चार पुत्र झाले. १ रामसावंत साळुंखे, २ मानसावंत साळुंखे. ३ पीलसावंत साळुंखे. ४ तुकसावंत साळुंखे. पैकीं पहिले निपुत्रिक होते; बाकी तीन इसमांचा वंश हल्लीं मिऱ्या गांवीं नांदत आहे.

हे शिरगांवचे पवार जेव्हां काशीयात्रेस जावयास निघाले, तेव्हां त्यांस पुत्र नसल्यामुळें आपला जांवई हरसावंत साळुंखे यांस त्यावेळीं दोन पुत्र होते; त्यांपैकीं एक आपल्याबरोबर न्यावयास मागितला. परंतु त्यांनीं दिला नाहीं. तेव्हां पवारांनीं आपल्या पुरोहिताचा मुलगा बरोबर नेला. पुढें त्यांचा तिकडेच अंत झाल्यामुळें, त्यांनीं त्या मुलासच मृत्युपत्र करून दिलें. त्यांत " माझ्या सर्व जिनगीचे व मालमत्तेचे तुम्ही मालक होऊन, फक्त माझ्या मुलीच्या वंशजांचा मान राखावा " असें लिहिलें आहे. याप्रमाणें हा गांव ब्राह्मणांचे स्वाधीन झाला. हल्लीं या पवारांचा वाडा कालचक्राच्या फेऱ्याप्रमाणें जगीं नाहींसा झाला आहे; तरीही त्याचा पडका

तट व भिंताडें आणि आंतील भव्य जागा हीं त्याच्या पूर्व वैभवाची साक्ष देत आहेत.

पुढें हळू हळू रत्नागिरीचीही* मालकी या साळुंख्यांकडे असलेले वानस व फाटक या उपनांवाचे कारकुनांनीं बळकाविली; कारण मराठे हे मूळपासून उदार बुद्धीचे, परंतु अक्षरशत्रु, त्यांचा ब्राह्मणांचे ठिकाणीं पूर्ण भाव व दृढविश्वास असे. या त्यांच्या सद्गुणांचा ब्राह्मण कारकुनांनीं फायदा घेऊन, आपल्या धनीरूपी गाईची वतनदारी व जहागिरीरूपी मान कलमकसाईपणानें कापिली. अशीं उदाहरणें या महाराष्ट्रांत तरी निदान शेंकडों सांपडतील. अशा तऱ्हेनें मराठ्यांच्या वैभवास आंतून कीड लागल्यामुळें, मराठ्यांचें क्षात्रतेज फिक्कें पडलें, यांत नवल तें काय ?

या साळुंखे वंशाचा मूळ पुरुष सोखाजी हा कोण व तो कोठून आणि कां आला, या संबंधाची माहिती, सनद, ताम्रपट अगर शिलालेख यांवरून दिलेली नसून, वडिलोपार्जित परंपरेनें चालत आलेल्या माहितीवरून तेथील लोक जी माहिती देतात; तीवरून दिलेली आहे; कारण अशा पुराव्याचे कागद त्यांचे होते, ते त्यांच्या कारकुनांकडून हरवले. अगर गडप केले गेले; तरी इतकी गोष्ट खरी आहे कीं, सुमारें पांच सहाशें वर्षांमागें चालुक्य कुळांतील कल्याणचा शेवटचा राजा चौथा सोमेश्वर याचे विपत्तिकाळानंतरचा काळ व सोखाजी साळुंखे यांचा उदयकाळ हे एकच दिसतात. शिवाय मोठमोठ्या विद्वानांनीं मराठ्यांचा इतिहास, महाराष्ट्रांतील किल्ल्यांचीं वर्णनें वगैरे फार बारकाईनें व मोठे परिश्रम करून लिहिलेलीं आहेत; तरीपण रत्नागिरीसारख्या जुन्या व विजापुरच्या बादशहाच्या अमदानींतील बऱ्याच किल्ल्यांची; त्याचप्रमाणें आज अगदीं गरीब स्थितींत असलेल्या कोकणांतील व देशावरीलही पुष्कळ अस्सल मराठे घराण्यांची माहिती दिलेली नाहीं. व जी आहे, ती अगदीं मोघम आहे. एका जुन्या बखरीमध्यें अशी माहिती मिळते कीं, विजापूरचे कल्याण सुभ्यातून प्रतापराव, हंबीरराव, जगपाळराव बिन तुकाजीराव साळुंखे हे तिघे बंधु ५००० फौजेसह स्वारीस निघून सातारा प्रांतीं आले व त्यांनीं पाटण परगणा सर केला. यांतील धाकटे बंधु जगपाळराव यांच्या अती शौर्यामुळें त्यांस फारच थकवा आला होता. सबब जिंकलेल्या प्रांताची व्यवस्था राखण्यास त्यांस तेथेंच ठेवून प्रतापराव व हंबीरराव हे उभय बंधु फौजेसह कोंकणप्रांताचा बंदोबस्त करीत रत्नागिरी येथें आले व त्याठिकाणीं लहानसें ठाणें बांधुन राहिले. त्याठिकाणीं लहानशी चकमक झडून तींत हैबतराव पडले. तरी प्रतापराव मुळींच डगमगले नाहींत. त्यांनीं त्याठिकाणीं आपल्या जोगेश्वरी कुळस्वामिणीची स्थापना करून देवळा समोर आपल्या बंधुच्या मूर्तीचीही स्थापना केली. तो देखावा अद्याप तसाच आहे. ही हकीकत लौकिक वार्तेशीं जुळत नाहीं. खरा पुरावा मिळाल्यावांचून इजवर विश्वास ठेवितां येणार नाहीं.

हल्लीं चिपळूण तालुक्यांतील पाटपन्हाळें येथील चव्हाण व त्यांचे ओक उपनांवाचे कारकून यांचा मुंबई हायकोर्टांत देशमुखीचे हक्कासंबंधानें वाद लागलेला आहे. ही देशमुखी मिळविणारा चव्हाण कोण व कोणत्या कारकिर्दींत उदयास आला, याचा खुलासा हल्लीं उपलब्ध असलेल्या कोणत्याही इतिहासांत सांपडेल असें आम्हांस वाटत नाहीं. त्याचप्रमाणें कोल्हापूर संस्थानांत हल्लीं पहिल्या प्रतीचे मानलेले सरदार पाटणकर साळुंखे यांचे दर्जाप्रमाणें, जसे निंबाळकर, जाधव, शिर्के, मोहिते वगैरे सरदारांचीं वर्णनें व पराक्रम इतिहासांत सांपडतात, त्याप्रमाणें या साळुंखे सरदारांचे पराक्रम वर्णन केल्याचें प्रचलित इतिहासांत फारसें उपलब्ध नाहीं. यावरून, पूर्वकालीन बऱ्याच कुलीन मराठ्यांचे पराक्रमांची माहिती इतिहासकारांना मिळालेली नाहीं अगर ती माहिती न मिळण्याचें दुसरेंही एक कारण दृष्टीस पडतें तें हेंच कीं, प्रमुख सरदार वगैरे मंडळींचीं कागदपत्रें उपलब्ध झाल्यामुळें त्यांची माहिती इति-

* ह्या संबंधीं बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या रोजनिशींत एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्या पत्रांत बाळाजी खंडो वाणस यानें बाळकृष्ण केशव वर्तक यांजविरुद्ध बनावट दस्तऐवज केल्याबद्दल फिर्याद केलेली असून मौजें मजकूर देखीलवाडे याचें कुळकर्ण व पेठ मजकूरचें मीठबंदरचें पथकीपण, आपले प्रपितामह सुधो खंडरस यांस सांवतांनीं दिलें आहे. अशी फिर्याद करून आपल्या नांवें निवाडपत्र करून घेतलें आहे. (यावरून रत्नागिरीचे सावंत साळुंखे होते हें सिद्ध होतें.)

बा. बा. पेशवे यांची रोजनिशी पत्र नं. ९६ पृष्ठ ६३.

ह्यांत घेण्यांत आली व ज्यांचे कागदपत्र मिळाले नाहींत त्या घराण्यांतील पुरुषांनीं जरी अचाट पराक्रम केले होते तरी ती माहिती लुप्त झाली. या कुळांतील पुतळाजीराव बावाजीराव साळुंखे हे छत्रपति प्रतापसिंह महाराजांचे कारकीर्दीत दुय्यम सेनापती असून त्यांस पालखी अबदागीर वगैरे सरंजाम होता. त्यांचीही माहिती प्रचलित इतिहासामध्यें पूर्णशी मिळत नाहीं, यावरून सर्वत्र मराठा बांधवांनीं आपल्या पदरच्या कागदपत्राच्या साह्यानें आपल्या घराण्यांतील पुरुषांची मर्दुमकी प्रकाशांत आणण्याची किती आवश्यकता आहे हें त्यांनींच पूर्ण विचारानें ठरवावें.

वर लिहिलेले सावंत, साळुंखे यांचा हल्लींचा मुख्य धंदा शेती व हिंदुस्थान सरकारची नोकरी हा होय. विशेषतः मराठ्यांच्या लष्करी बाण्यास अनुसरून, ते लष्करी किंवा पोलिसखात्यांत नोकरी धरून, निवळ शिपाईगिरीपासून तों इन्स्पेक्टरपर्यंतचे हुद्यावर आहेत. रावसाहेब जिवाजी राघोजीराव सावंत साळुंखे राहणार मिऱ्या हे बी. ए. होऊन, सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेस विलायतेस गेले होते; परंतु दुर्दैवानें पास झाले नाहींत. तरी ते हल्लीं सातारा जिल्ह्यांत कोरेगांव येथें मामलेदार आहेत. खुद्द मिऱ्या गांवीं सरकारची सेवा निमकहलालपणें करून, पेन्शन घेऊन आलेली मंडळी शंभरांवर आहे व सहाशेंवर नोकर आहेत.

या गांवीं मराठी शाळा असून, तींत पांच इयत्ता आहेत. पुढील शिक्षणाची सोय नसल्यामुळें बऱ्याच मुलांना अभ्यासक्रम सोडून द्यावा लागतो. तरीही सुमारें वीस–पंचवीस इसम पब्लिकसर्व्हिसची, पांच–सहा इसम म्याट्रिकची व एक बी. ए. ची परीक्षा पास झालेले आहेत. यावरून या लोकांत विद्येची अभिरुचि वाढत आहे असें दिसतें.

हा गांव रत्नागिरीपासून पांच मैल लांब असल्यामुळें इंग्रजी शाळेंत जाण्यास लहान मुलांस कठीण पडतें. सबब गांवची कांहीं होतकरू व स्वार्थत्यागी मंडळी लवकरच या गांवीं इंग्रजी तिसऱ्या इयत्तेपर्यंत शिकण्याची सोय होईल अशी शाळा स्थापण्याच्या विचारांत असल्याचें कळतें. येथील लोकांस विद्येचें खरें महत्त्व व तिच्या अभावीं वाडवडिलांपासून आजपर्यंत झालेलें नुकसान समजूं लागल्यामुळें, या गांवांतील प्रमुख गृहस्थ या कामीं स्थाईक फंडाची व्यवस्था करून, आपल्या भावी पिढीची स्थिति सुधारतील, अशी आशा आहे. रा० सा० जिवाजीरावांप्रमाणें बरेच पदवीधर या गांवीं निर्माण होऊन, समाजकार्यास व देशकार्यास त्यांची मदत होवो; अशी जगदीश्वराजवळ आमची प्रार्थना आहे.

---

## साळुंखे ऊर्फ अनेराव.

संगमेश्वरापासून १४ मैलांवर आंगवली म्हणून एक गांव आहे, या आंगवली गांवापासून जवळच कुंडीघाटाजवळ निगुरवाडी या नांवाचें गांव आहे. तेथें महीपतगड हा किल्ला आहे. त्या गडावरील सरदार अनेराव हे होत. गडाच्या जवळपासच्या गांवामध्यें मराठ्यांची वस्ती नसल्यामुळें, त्या ठिकाणीं वस्ती करण्यासाठीं अनेराव यांस हा किल्ला सोंपविण्यांत आला होता. ह्या अनेरावांचे वंशज पाटणकरांशीं संबंधी आहों असें समजतात. ते ज्यावेळीं कांहीं अडचणीमुळें पाटण सोडून ह्या प्रांतीं आले, त्यावेळीं त्यांजकडे आंगवलीसुद्धां बारा गांव होते. पुढें त्यांजकडे ते गांव राहिले नाहींत. तरी सध्यां त्यांजकडे आंगवली व सोनारवाडी हे गांव चालू आहेत. देवरूखपासून तीन मैलांवर सह्याद्रीमध्यें मार्लेश्वर या नांवाचें एक देवस्थान आहे; ह्या देवस्थानाचे ते मालक आहेत. ह्या देवस्थानास अकबर बादशहाकडून इनाम आहे. ह्या देवरुखाजवळ मुरादपूर या नांवाचें एक गांव आहे, त्या गांवावर मुराद यानें स्वारी करून सर्वत्रांस बाटविण्याचा सपाटा आरंभिला. त्या वेळीं मालोजी व शिवाजी अनेराव ऊर्फ साळुंखे हे महिपत गडावर सरदार होते. त्यांस ही हकीकत समजतांच, मालोजी अनेराव आपल्या सैन्यासह मुसलमानांवर चालून आला. त्याप्रसंगीं उभयपक्षांची घनघोर लढाई झाली, ह्या लढाईंत मोंगलांचा पराभव होऊन मुख्य सरदार मुरादखान मशिदींत लपला. त्यास मालोजी अनेराव यानें शोधून काढून ठार मारलें. ह्या मुरादखानाचें शव ह्या ठिकाणीं पुरलें असल्यामुळें ह्या गांवास मुरादपूर असें नांव पडलें. सध्यां ह्या गांवीं मुरादखानाचा दर्गा असून वर जें देवस्थान लिहिलें आहे, त्याची पौषमासांत मकरसंक्रांतीस मोठी

यात्रा भरत असते. ह्या यात्रेस श्री शंकराचार्यांचीहि स्वारी येत असते. अनेराव ही ह्या मंडळींची पदवी आहे. ती अद्यापही ते लावितात. ह्यांस साळुंखे ऊर्फ अनेराव असें म्हणतात, हेंही कुळ साळुंख्यांशीं संबंध दर्शवित असल्यामुळें त्यांची त्रोटक हकीकत जेवढी आम्हांस मिळाली, तेवढी या ठिकाणीं दिली आहे. याखेरीजही बरीच घराणीं आहेत, पण तीं उपलब्ध झालीं नाहींत; उपलब्ध झाल्यास पुढील भागीं घेऊं.

## साळुंखे ऊर्फ इंद्प.

हेंही कूळ, साळुंखे ह्या घराण्यांपैकींच आहे. यांचा मूळपुरुष पुणेंप्रांतांतील इंदापुर नांवाच्या गांवीं रहात होता. इंदापुरीं यांचें वास्तव्य असल्यामुळें, यांचें साळुंखे हें नांव लुप्त होऊन यांस ' इंद्प ' असें म्हणूं लागले. श्री० छत्रपति राजाराम महाराजांच्या कारकीर्दीमध्यें यांचा एक पुरुष, साळशीमहालामधील कोळोशी या गांवीं जकातीचा वसूल घ्यावयास आला होता. त्यावेळीं कोळोसी येथें त्यांचा एक भाऊ वास्तव्य करून राहिला. नंतर तोतयांचें बंड मोडण्यास्तव, इंदापूराहून ह्या इंद्पांची फौजेसह रवानगी करण्यांत आली होती; त्यावेळीं त्यांनीं फारच मर्दुमकी गाजविली आहे. ज्यावेळीं हे बंड मोडण्यास्तव आले त्यावेळीं त्यांनींही कोळोशी मुक्कामींच वास्तव्य केलें. सध्यां कोळोसी तर्फ साळशीमध्यें घराणें स्थाइक असून, त्यांचा त्या ठिकाणीं जुना व भव्य वाडा आहे. ह्या घराण्यांतील पुरुष सोलापूर वगैरे किल्ल्यांवर सरदार असून त्यांचा कांहीं अस्सल पत्रव्यवहारही उपलब्द झालेला आहे. तो जुळवून लवकरच आम्हीं ह्या घराण्याची संगतवार हकीकत प्रसिद्ध करूं. शेवटीं ज्या जगचालकाच्या कृपेनें ही साळुंखे घराण्याची कैफियत पूर्ण झाली. त्याचे मनःपूर्वक आभार मानून, ह्या साळुंखे वंशियांस सुख, ऐश्वर्य व कीर्ति लाभ होवो असें इच्छितों.





श्री० सरदार आप्पाजीराव शितोळे देशमुख अंकलीकर,
अमीर-उल-उमरा. सेनाहरदुसहखो, ग्वाल्हेर.

ही

# अंकलीकर शितोळे घराण्याची

# कैफियत.

ज्या शितोळे घराण्यांमध्यें जन्म घेणारे मान्यवर, श्रीमंत सरदार
आप्पासाहेब शितोळे देशमुख, अमिर-उल्-उमरा सेना
हरदु सहस्त्री, सेकंडक्लास सरदार ग्वाल्हेर यांस, त्यांच्या
आंगीं जे अप्रतीम गूण वास करीत आहेत त्या
गुणांवर लुब्ध होऊन ही, त्यांच्या
पराक्रमी पूर्वजांची कृति त्यांस
प्रेमपूर्वक अर्पण
करीत आहें.

ग्रंथप्रकाशक.

# अंकलीकर शितोळे घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

### अनुक्रमणिका.

# अंकलीकर शितोळे घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

### अंकलीकर शितोळे घराण्याची पूर्वस्थिति.

जे गुण मनुष्यांच्या स्वतःच्या गौरवास, त्यांच्या कुलाच्या कीर्तीस आणि त्यांच्या देशाच्या कल्याणास कारणीभूत होतात; त्यांत शौर्य हा गुण श्रेष्ठ होय! ह्या गुणाच्या श्रेष्ठत्वामुळेंच शूर पुरुषांच्या कथा, सर्व लोकांत अत्यंत श्रवणीय मानितात. महाभारतासारख्या वंद्य ग्रंथांतील जीं वर्णनें श्रोत्यांस अत्यंत चित्ताकर्षक वाटतात, त्यांत मुख्यत्वेंकरून भीष्मपर्व, गदापर्व यांची गणना आहे. शूरत्वामध्येंही एक विशेष प्रकार असा आहे कीं, शूरपुरुषास त्यांनीं अंगिकारिलेल्या कार्यांत जरी यश आलें नाहीं, तरी त्यांनीं दाखविलेल्या मर्दुमकीवरून त्यांचा जो लौकिक होतो, तो अत्यंत वर्णनीय असा असतो. शूरांच्या कथा श्रवण करून, निर्बल मनुष्यांच्याही अंतःकरणांत शौर्याचा प्रादुर्भाव होतो. त्याला आपल्या कुलांतलि वीर्यशाली पूर्वजांच्या कृतीबद्दल अभिमान वाटतो. राष्ट्रांतील पूज्य व माननीय व्यक्तींबद्दल आदर उत्पन्न होतो. हें श्रीशिवाजीमहाराज, श्रीमंत बाजीराव पेशवे इत्यादि वीरपुरुषांच्या चरित्रांवरून व्यक्त होतें. प्रस्तुत अंकलीकर शितोळे यांच्या घराण्याचें वृत्तही असेंच आहे.

अंकलीकर शितोळे यांचें घराणें मूळ कोठून आलें, त्याचा पुराव्याच्या अभावीं कांहींच तलास लागत नाहीं. ते उत्तर-हिंदुस्थानचे रहिवासी होते असें म्हणतात. त्यांचा पूर्वापार शिपाई बाण्याचा पेशा असून त्यांनीं बादशाही अमलांत पुणें प्रांतीं येऊन चांगलाच लौकिक संपादन केला; इतकेंच नव्हे तर त्यांनीं आपल्या शौर्य वीर्यादि पराक्रमानें आपल्या मालकांस सुप्रसन्न ठेवून पुणें प्रांताची देशमुखी व पडवी येथील पाटिलकी अशीं दोन वतनें संपादन केलीं. हीं वतनें कशीं व कोणाकडून मिळविलीं, या बाबतीचा खुलासा होणें अगत्याचें होतें; परंतु पूर्वकाळीं, आपल्यामध्यें कागदपत्रांचा संग्रह करून ठेवण्याचा प्रघात नसल्यामुळें, पुराव्याच्या अभावीं स्वस्थ बसावें लागत आहे. शिवाय या घराण्याच्या संग्रहीं जे कागदपत्र होते, ते चोरीस गेल्यामुळें ह्या घराण्याचें अत्यंत नुकसान झालें आहे. वंशपरंपरेनें प्रचारांत असलेली माहिती व उपलब्ध कागदपत्रें यांच्या साह्यानें ही अंकलीकर शितोळे यांची कैफियत लिहिली आहे. ह्या घराण्यासंबंधीं विशेष माहिती दर्शविणारे कागदपत्र जर संग्रहीं असते, तर शितोळे घराण्याची कैफियत अप्रतिम झाली असती; यांत मुळींच संशय नाहीं. तरीही जी माहिती उपलब्ध आहे; तिजवरूनही ह्या घराण्याचें खरें कर्तृत्व दृष्टीस पडण्याजोगें आहे.

ह्या घराण्याच्या मूळपुरुषास सात मुलगे होते. त्यांपैकीं तमाजीराव शितोळे यास आधारस्तंभ धरून ह्या पुरुषापासून पुढें ह्या घराण्याचा विस्तार व भरभराट कशी-काय जाहली, त्याची संगतवार हकीकत ह्या कैफियतींत दर्शविलेली आहे. निरनिराळ्या पुरुषांची कारकीर्द वेगळी लिहिलेली नाहीं. कारण ती लिहावयाचीं साधनें भरपूर नसल्यामुळें, नाइलाज आहे. ही शितोळे घराण्याची कैफियत जरी संपूर्ण नाहीं तरीपण तिचा, इतिहास-संशोधकांस बराच उपयोग होईल.

मौजें अंकली, तालुके चिकोडी, जिल्हा बेळगांव, प्रांत पुणें हा गांव कर्नाटक प्रांतीं श्री कृष्णानदीच्या किनाऱ्यावर अत्यंत रमणीय स्थानीं आहे. हें ह्या घराण्याचें वास्तव्याचें स्थान असून, मौजें पडवी, तालुके हवेली, जिल्हा पुणें, या गांवीं देशमुखी व पाटिलकीचें वतन आहे. सदरहू वतनाचे संपादक तमाजीराव शितोळे हे होत. हें वतन संपादन केल्याला आज दोन-अडीचशें वर्षें झालीं असावीं; परंतु हें घराणें इ० स० १७३८ पासून अंकलीस स्थित झालें अशाबद्दल आधार मिळतो.

तमाजीराव शितोळे यांचे चिरंजीव यमाजीराव यांस अडबाजी, केडबाजी व दयाजीराव असे तीन पुत्र होते. त्यांपैकीं अडबाजी व केडबाजी ह्यांचा वंश पडवीकडे असून, दयाजीराव यांचे पुत्र बाजीबा शितोळे हे श्रीशाहू छत्रपतींच्या पदरीं नोकरी करून

असत. त्यांस सुलतानजी, अपाजी, खेत्रोजी व माहादजी असे चार पुत्र होते. तेही आपल्या वडिलांप्रमाणेंच शूर, हुषार व स्वामिकार्यदक्ष असेच निपजले. सुलतानजीस फिरंगोजी, व आपाजीस महादजी व सटवाजी असे दोन पुत्र होते. ह्या घराण्याची कर्तबगारी नीट लक्षांत यावयास, त्या वेळच्या महाराष्ट्रांतील वडामोडीचें चित्र थोडक्यांत निरूपण करणें अगत्याचें आहे. त्याखेरीज शितोळे घराण्याची खरी मर्दुमकी दृष्टीस पडणें अशक्य होय.

## महाराष्ट्राच्या स्थितीचें दिग्दर्शन.

सोळाव्या शतकामध्यें यवन-साम्राज्यापासून त्रस्त झालेला महाराष्ट्र, निराळेंच स्वरूप प्राप्त करून घेण्याच्या तयारींत होता. त्याचा उद्धार करण्याचें श्रेय सिसोदावंशीय कुलभूषणांच्या वाट्यांस आलेलें होतें. महाराष्ट्रपूर्णस्वातंत्र्य देण्याचा विडा श्री शिवछत्रपति यांनीं उचलून त्याप्रमाणें यवनपादशाहीस 'त्राहि भगवन्' करून सोडलें व महाराष्ट्रीय, मराठे, मावळे आदिकरून शूर व काटक लोकांकडून तिची यवनांच्या मगरमिठींतून मुक्तता केली. पण त्या शूर पुरुषानें फारच थोडीं वर्षें राज्यसुख उपभोगिलें. शिवाजी महाराजांच्या पश्चात्, संभाजीनें गादी मिळविण्याकरितां फारच क्रूर कर्में केलीं, त्यांमुळें सर्वत्र जनसमूहाला तो नावडता झाला.

दिल्लीचा बादशहा औरंगजेब यानें इ० स० १६८६ मध्यें विजापूर व गोवळकोंडें हीं दोन्ही दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें खालसा करण्याचा निश्चय करून इ० स० १६८७ मध्यें तीं राज्यें काबीज करून आपल्या राज्यास जोडलीं. हें मोठें व महत्त्वाचें कार्य झाल्यानंतर त्यानें आपला मोर्चा मराठी राज्याकडे फिरविला. औरंगजेबाचा प्रतीकार करण्यास संभाजीनें मुळींच माघार घेतली नाहीं. तो शूर व बापाप्रमाणें धाडसी होता, पण त्याच्या धाडसाचा मुळींच उपयोग झाला नाहीं. मोंगलांनीं आस्ते आस्ते थोडा थोडा प्रांत काबीज करण्याचा सपाटा चालविला. या लढाईंत शितोळे यांचे पूर्वज खूब शर्तीनें लढत होते. त्यांचा पराक्रम पाहून प्रसन्न झालेल्या बादशहानें त्यांस पुणें प्रांताची देशमुखी व पडवी येथील पाटिलकी दिली. यानंतर लवकरच त्यांनीं मुसलमान बादशहांच्या चाकरीस शेवटचा रामराम केला व ते दक्षिणप्रांतीं येऊन आपला योगक्षेम करून राहिले.

## तमाजीराव शितोळे.

तमाजीराव शितोळे हे पडवी येथील पाटिलकी संपादन करून आल्यानंतर बहुतकरून पुण्यासच राहूं लागले. त्यानंतर त्यांनीं आपलें शेष आयुष्य ईश्वरभजनांत घालविण्याचा संकेत केला व त्याप्रमाणें ते शांततेनें निवास करीत होते. यांच्या कारकीर्दीची पूर्णशी माहिती नसल्यामुळें स्तब्ध राहणें भाग आहे.

## बाजीबा शितोळे.

तमाजीराव शितोळे यांचे नातू बाजीबा शितोळे हे राजाराम महाराजांच्या पदरीं होते. हे शूर असून स्वामिकार्य-तत्पर होते. राजाराम महाराजांच्या वेळीं ज्याप्रमाणें प्रत्येक मराठा सरदार स्वामिभक्ति व देशभक्ति यांनीं प्रेरित होऊन, स्वराज्यसंरक्षणाच्या मार्गास लागला होता, त्याप्रमाणें बाजीबा शितोळे हेही स्वामिकार्यार्थ झटत होते. त्यांनीं जिंजीस प्रयाण करण्याच्या पूर्वी राजाराम महाराजांस इतर मराठा सरदारांप्रमाणें बरेंच साहाय्य केलें होतें. त्यावेळीं संताजी घोरपडे, विठोजी चव्हाण व बाजीबा शितोळे यांनीं तुळापुरीं बादशहाच्या छाविन्यावर हल्ला करून बादशहाच्या डेन्याचे तनावे तोडून, डेन्याचे सोन्याचे कळस आणले हें अश्रुतपूर्व पराक्रमाचें वृत्त कळतांच राजाराम महाराजांनीं, संताजी घोरपडे यांस 'ममलकतदार', बहीरजी घोरपडे यांस 'हिंदुराव' मालोजी घोरपडे यांस 'अमीरुल्उमराव' विठोजी चव्हाण यांस 'हिंमतबहाद्दर' असे किताब देऊन बाजीबा शितोळे यांस घोरपड्यांच्या पथकाची 'सरनोबती' सांगितली.* ह्याप्रमाणें घोरपडे व शितोळे या दोन्ही शूर सरदारांचा गौरव होऊन, घोरपड्यांशीं शितोळे यांचा विशेष घरोबाही वाढत चालला. व पुढेंही घोरपड्यांनीं मागील ऋणानुबंधानुसार शितोळे यांस प्रसंगीं साह्य केलें आहे. तें वृत्त पुढें येईल.

* मल्हार रामरावकृत थोरले राजाराम यांचें चरित्र पृष्ठ २७.

महाराजांनीं जिंजीस प्रयाण करून तेथें आपणांस राज्याभिषेक करवून घेतला. मराठे सरदारांनीं औरंगजेबास जर्जर करून सोडलें. जिंजीचा वेढा सतत सात वर्षें पडला होता, तरीही त्यास दाद दिली नाहीं. अखेर राजाराम महाराज जिंजीच्या वेढ्यांतून, मोंगलांच्या हातावर तुरी देऊन निसटून आले. त्याबरोबर सर्वत्र मराठे सरदारांस चेव येऊन त्यांनीं आपलीं गेलेलीं ठाणीं परत घेतलीं. ह्या स्वारीमध्यें राजाराम महाराज स्वतः असत. परंतु पुनः महाराष्ट्राचें दुर्दैव ओढवलें व राजाराममहाराजांस नवज्वराची भावना होऊन ते इ० स० १७०० मध्यें मरण पावले. त्यावेळीं, राजारामाचे वडील पुत्र शिवाजी राजे यांस ताराबाईच्या आग्रहावरून मुत्सद्दीमंडळींनीं राज्याभिषेक केला. त्यांनीं १७०७ पर्यंत राज्य केलें. ते साधारण वेडसर असल्यामुळें राज्याचा सर्व कारभार प्रसिद्ध ताराबाईसाहेब याच पहात होत्या. अखेर औरंगजेबाच्या निधनानंतर शाहूमहाराजांची मुक्तता झाली व ते आपल्या हक्काच्या राज्याचा कबजा घेण्यास महाराष्ट्रांत निघून आले. यावेळीं त्यांजला इतर सरदारांबरोबर बाजीबा शितोळे हेही साह्य झाले होते.

इ० स० १७०७ मध्यें शाहूमहाराज परत दक्षिणेंत आल्यावर ताराबाई साहेब यांस त्यांजबद्दल संशय उत्पन्न झाला. व त्यांनीं महाराजांस अवरोध केला. पण शाहू महाराजांचा वास्तविक खरा हक्क आहे असें जाणून धनाजी जाधवराव प्रभृति मराठे वीर त्यांस मिळाल्यानें ताराबाईचें कांहींच चाललें नाहीं. व ज्यांचा हक्क त्यांस मिळाला. तथापि ताराबाईसाहेबही सामान्य नव्हती. तिनें कोल्हापुरास स्वतंत्र राज्याची संस्थापना केली.

शाहू महाराजांनीं सर्वत्र सुव्यवस्था केल्यावर त्यांनीं व त्यांच्या पराक्रमी सरदारांनीं मराठी साम्राज्यांत पुनरपि शक्ति उत्पन्न केली. राष्ट्रास जोम प्राप्त झाल्यामुळें शत्रूंस वचक उत्पन्न झाला व यवनपादशाहीस मराठी राज्याचा दरारा वाटूं लागला.

या वेळीं बाजीबा शितोळे यांचें अगदीं उतारवय झालें होतें. त्यांच्यानें यापुढें लष्करी नोकरी सांभाळावयाचें काम होईना; म्हणून त्यांनीं श्री० शाहू छत्रपति यांस अशी प्रार्थना केली कीं, 'माझें उतार वय झालें आहे. वार्धक्यामुळें प्रकृति क्षीण झाली आहे; म्हणून यापुढें माझे चिरंजीव सुलतानजी, आपाजी, खेत्रोजी व महादजी यांस सरकार चाकरींत घेऊन, मजला शिल्लक आयुष्य ईश्वरभजनांत घालविण्याची परवानगी यावी.' ही प्रार्थना ऐकून महाराजांनीं बाजीबांच्या चौघां पुत्रांस चाकरीस राहण्याची आज्ञा देऊन बाजीबा शितोळे यांस आपल्या वतनाच्या गांवीं राहण्याची परवानगी दिली व त्यांस सरकार चाकरींतून मुक्त केलें. बाजीबा आपल्या गांवीं इ० स० १७२८ त निवर्तले.

बाजीबासारखा स्वामिभक्त पुरुष निवर्तल्याचें एकतांच पेशव्यांस अत्यंत वाईट वाटलें व त्यांनीं श्री० शाहू छत्रपति यांस पत्रद्वारें हें दुःखकारक वर्तमान कळविलें. तें वाचून महाराजांसही अत्यंत खेद झाला व आपल्या राज्यांतील एक शूर मोहरा गमविल्यानें राज्याचें फारच नुकसान झालें, असे त्यांनीं उद्गार काढले व बाजीबा शितोळे यांनीं मरेपर्यंत जी सरकारची चाकरी केली तीबद्दल अंशतः तरी उतराई व्हावें; म्हणून त्यांच्या चारही पुत्रांस सरकार नोकरींत राहण्याबद्दल जी आज्ञा केली होती, ती पूर्णपणें अमलांत आणण्यासाठीं पेशव्यांस लिहून कळविलें कीं, बाजीबा शितोळे यांच्या चारही पुत्रांस सैन्यांत चाकरी देण्याकरितां हजर करावें. हा हुकूम जातांच बाजीराव पेशवे यांनीं त्या चौघां मुलांस समागमें नेऊन छत्रपतींच्या पायांवर घातलें. त्यावेळीं महाराजांनीं त्यांचें सांत्वन करून त्यांस सरदारीचीं वस्त्रें दिलीं व ते म्हणाले.—"आज पावेतों तुमच्या वडिलांनीं गादीची सेवा केलेली आहे. याउपर आपण आमचे स्वामिनिष्ठ चाकर जाहलां आहां. तेव्हां सेवा एकनिष्ठपणें चालविणें" असा बोध करून महाराजांनीं शितोळे-बंधूंस सरकार चाकरीत ठेविलें. व त्यांस पेशव्यांनीं आपल्या समागमें पुण्यास आणून चाकरीवर रुजू केलें.

## सुलतानजी, आपाजी, खेत्रोजी व महादजी शितोळे.

शाहू छत्रपतींच्या नोकरींत शितोळे-बंधु एकनिष्ठपणें राहिले. त्यांनीं श्री शाहूछत्रपति यांस अशी विनंति केली कीं, आमच्या वडिलांनीं मिळविलेला वतनी गांव मौजे 'पडवी' हा यवनसाम्राज्यांतून मिळालेला आहे, तरी त्या गांवची आपणांस मालकांनीं दया करून सनद करून यावी.

शितोळे-बंधूंस ही सनद मागण्याचें कारण येवढेंच पडलें असावें कीं; नवीन राजा गादीवर बसल्यानंतर पूर्वी मिळालेल्या जहागिरी वगैरे वतनांचे नूतन सनदा अगर लेख करून देण्याची वहिवाट होती; त्यामुळेंच शितोळे बंधूनीं आपल्या गांवची सनद नूतन करून मागितली व श्री० शाहूमहाराज यांनींही ती मोठ्या आनंदानें करून दिली व त्या सनदेबरोबर एक

ताकीदपत्रही दिलें. ह्या ताकीदपत्रामध्यें खेत्रोजी-राव शितोळे यांस 'सेनाहरदुसहस्री' असें म्हटलेलें आहे. त्यावरून त्यांस त्यापूर्वी अगर शाहू-महाराजांस ज्यावेळीं राज्याभिषेक जाहला, त्यावेळीं 'सेनाहरदुसहस्री' हा किताब मिळाला असला पाहिजे. परंतु इतिहासामध्यें त्याबद्दलचा पुरावा मुळींच पुढें आलेला नाहीं. मात्र शितोळे यांच्या ताकीद-पत्रांत त्याबद्दल उल्लेख आहे. यावरून शितोळे यांस 'सेनाहरदुसहस्री' हा किताब मिळाला असावा हें सिद्ध होतें. शाहूमहाराजांनीं शितोळे-बंधूंच्या विनंतीवरून मौजें पडवी गांवची जी सनद दिली, तिची नक्कल याखालीं दिलेली आहे.

मोहर शिक्का.

श्री.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३८ खर नाम संवत्सरे अधिक भाद्रपद बहुल चतुर्थी भौम वासरे क्षत्रिय कुलावंतस श्री राजा शाहू छत्रपतिस्वामी यांनीं खेत्रोजी शितोळे यांस दिलें इनाम पत्र ऐसीजे तुम्हीं स्वामीकार्यावरी एकनिष्ठ राहून पुढें विशेष स्वामीकार्य करून आपला गुजारा करून घ्यावा. हे उमेद धरील्याकरितां, तुम्हांवरी स्वामी कृपाळु होऊन मौजें पडवी तालुके पाटस सुभा प्रांत पुणें हा गांव खेरीज हकदार व इनामदार वजा करून देऊन कुलबाब कुलकानु इनाम तुमचे वंशपरंपरेस दिला असे. तुम्हीं मौजे मजकूर इनाम वंशपरंपरेनें अनुभवून स्वामिकार्य एकनिष्ठपणें करीत जाणें. लेखनालंकार. छ० १७ खबा खमाइसन सुरुसुद्रबार.

श्री
शाहू नरपति हर्ष
निधान मोरेश्वर-
सुत भैरव प्रधान.

श्री
आई आदिपुरुष श्री राजा
शाहू छत्रपती स्वामी कृपानिधी
तस्य परशराम त्र्यंबक
प्रतिनिधि.

बार. मर्यादेयं विराजते.

श्री.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर नाम संवत्सरे अधिक भाद्रपद बहुल चतुर्थी भौमवासरे क्षत्रिय कुलावंतस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांनीं देशमुख व देशपांडे तालुके पाटस यांस आज्ञा केली ऐसीजे, खेत्रोजीराव शितोळे, सेनाहरदुसहस्री, यांनीं विनंति केली कीं, आपण स्वामींचे सेवक पुरातन राज्यामध्यें श्रमसाहस केलें, पुढेंही स्वामीच्या पायापाशीं श्रमसायास करावयाची उमेद धरितों ऐसियास आपला वतनी गांव मौजें पडवी ता० मजकूर हा गांव इनाम दिला पो म्हणून विदित केलें. त्यावरून मनास आणितां मशार निल्हेनी राज्यांत श्रम साहस बहुतच केलें. पुढें ही सेवा एकनिष्ठपणें करावयाची उमेद धरितात. याकरितां मौजें मजकूर खेरीज हक्कदार व कदिम इनाम-असतील ते वजा करून इनाम दिला असे. मौजें मजकूर मशारनिल्हेस इनाम खेरीज हक्कदार इनामदार चालविणें हें इनाम अनुभवून स्वामिकार्य करितील. कुलबाब कुलकानु मशारनिल्हेकडे इनाम चालविणें. लेखनालंकार, छ० १७ रजब सुभाइसन अशर मयातैन व अलफ. सुरु सुद्रबार.

मर्यादेयं विराजते

बार.

शिक्का. शिक्का.

ह्याप्रमाणें सनदापत्रें घेऊन हे चौघे शितोळे बंधु श्री० शाहू छत्रपति यांची एकनिष्ठपणें सेवा चाकरी करून राहिले. मात्र खेत्रोजी शितोळे हे आपल्या वडलांच्या मागें फार दिवस जिवंत राहिले नाहींत. याचसालीं त्रिंबकराव दाभाडे व बाजीराव पेशवे यांचें वितुष्ट आलें. हें वितुष्ट येण्याचें कारण अनेक इतिहासकारांनीं निरनिराळें लिहिलें आहे. त्यांत कित्येकांनीं त्रिंबकराव दाभाडे यानांच दोषी ठरविलें आहे; परंतु न्याय दृष्टीनें पाहतां, तसा प्रकार नव्हता. दाभाडे हे दोषी नव्हते. परंतु बाजीरावच दोषी होते असें दाभाडे सेनापति यांच्या प्रसिद्ध झालेल्या हकीकतीवरून दिसून येतें.

त्रिंबकराव दाभाडे यांस महाराजांनीं गुजराथेंतील मोहिमेवर जाण्याची आज्ञा केली; त्यावरून त्रिंबकराव दाभाडे, यशवंतराव दाभाडे व बाबुराव दाभाडे हे गुजराथच्या मोहिमेवर निघाले. त्याचवेळीं बाजीराव पेशवे यांस माळव्याची मोहिम सांगितली होती; त्यावेळीं बाजीराव पेशवे यांनीं सेनापतीस सांगितलें कीं, गुजराथेंतील महाल तुम्हीं निमे आम्हांकडे द्यावे. व माळव्यांतील महाल आम्हीं सर करूं. त्यांत निमे महाल तुम्हीं घ्यावे. परंतु हें बाजीराव पेशव्यांचें म्हणणें दाभाडयांस कबूल झालें नाहीं. ते म्हणाले, "श्रीमंत महाराजांनीं तुम्हांस माळव्यांतील मोहीम सांगितली व आम्हांस गुजराथची पेशजीच सांगितली आहे. तुम्हीं आपला मुलूख काबीज करावा, आम्हीं आपला करावा. तुमच्या मुलुखांत आम्हीं वांटणी मागूं नये व आमच्या मुलुखांत तुम्हीं वांटणी मागूं नये. येविशीं तुम्हीं हुजूर विनंति करावी व आम्हींही हुजूर विनंति करितों."

नंतर ठरल्याप्रमाणें उभयतांनीं महाराजांना विदित केलें. त्यावेळीं महाराजांनीं आज्ञा केली कीं, "माळव्यांत तुम्हीं अंमल करावा. गुजराथेंत त्यांनीं अमल करावा. उभतांत कलह नसावा." याप्रमाणें उभयतांस ताकीद करून मोहिमांस रवाना केलें. उभयतांही मोहिमेस गेले. परंतु याविषयीं आकस बाजीरावांच्या मनांत राहिला. ते डभई महाल गुजराथेंतील याजवर येऊन अम्मल बसवूं लागले. हें वर्तमान दाभाडे यांस कळतांच ते फौजेनिशीं डभईवर आले. या फौजेंत बाजीराव पेशवे यांनीं कारकून पाठवून फितूरी केली होती. हें त्यांस माहित नव्हतें. फौज फितूर झाली व ती घोड्यास पाणी पाजावयाचें निमित्तकरून बाजीरावास मिळाली. तरीही त्रिंबकराव दाभाडयांनीं हिंमत सोडली नाहीं. या वेळीं दाभाडयांजवळ अवघे पांच हजार स्वार होते व पेशवे यांजकडे चाळीस हजार फौज होती. त्रिंबकराव दाभाडे हे हत्तीच्या अंबारींत बसून तिरंदाजी करीत होते. तिकडे बाजीराव घोड्यावर बसून तरवार फिरवीत होते. बाजीरावाच्या सेनेचें अधिपत्य शितोळे बंधूकडे होतें. त्यांनीं या लढाईत शिकस्त केली. त्रिंबकराव दाभाड्यासारखा तिरंदाजीमध्यें कुशल असा दुसरा योद्धा त्या काळीं तरी नव्हता. त्यास अर्जुनाचीच उपमा देणें सर्वथा योग्य होतें ह्या शूर पुरुषाचा गोळा लागून प्राणनाश झाला. ती गोळी त्रिंबकराव दाभाडे यांचे सापत्न मामा भाऊसिंगराव ठोके हे पेशव्यांच्या फितुरांत होते, त्यांनीं एका बारगिराकडून मारविली होती. त्रिंबकराव दाभाडे यांनीं देह ठेविल्याचें वर्तमान यशवंतराव दाभाडे व बाबूराव दाभाडे-त्रिंबकरावांचे बंधु यांस कळतांच ते तावडतोब बडोद्याहुन डभईस आले व त्यांनीं आपल्या बंधुचें प्रेत दहन करून डोकीस रुमाल बांधून बाजीराव पेशव्यांचें पारिपत्य करावयास उभे ठाकले. त्याबरोबर बाजीरावानें कच खाल्ली व ते वीस कोस माघारी गेले. दाभाड्यांनीं बाजीरावाचा पाठलाग आरंभिला. शेवटीं ते सातान्यास येऊन पोहोंचले. त्यावेळीं पेशव्यांनीं शाहूमहाराजांस विनंति केली कीं, "मजपासून अपराध जाहला आतां स्वामींनीं आपल्या हातें पारिपत्य करावें, अथवा बचाव करावा, माझा परिणाम लागत नाहीं." हें वर्तमान ऐकून महाराज उदास जाहले, आणि विचार केला कीं, "अपराध पेशवे यांचा जाहला आहे. पारिपत्य करावें तर हे ब्राह्मण आहेत, व यांच्या बापांनीं माझी सेवा एकनिष्ठेनें केली व यांनीं, अपराध केला परंतु शरण मजलाच आला, त्यापेक्षां यास अपराध माफ करून बचावच करावा." ह्याप्रमाणें विचार करून महाराजांनीं पेशव्यांस अभय दिलें आणि तुमचा व त्यांचा सल्ला करून देतों" म्हणून सांगितलें.

यानंतर यशवंतराव दाभाडे व बाबुराव दाभाडे हे उभयतां बंधु महाराजांच्या भेटीस आले. त्यांनीं पेशव्यांनीं दगा केल्याचें सर्व वर्तमान सांगितलें व ते म्हणाले,–"आपण पेशवे यांस माळव्याची मोहीम सांगितली व आम्हांस गुजराथची सांगितली असतां, पेशव्यांनीं दगा केला. तरी महाराजांनीं–त्यांनीं अपराध केला असतांही त्यांस पाठीशीं घातलें, त्यापेक्षां आतां आम्हांस चाकरी करावयाची नाहीं." असें म्हणून उभय बंधूंनीं महाराजांच्या पायांवर आपल्या तरवारी ठेवून निरोप घेतला. त्या वेळीं महाराजांनीं प्रतिनिधि, मंत्री वगैरे मंडळीस त्यांची समजूत करावयास रवाना केलें. परंतु त्यांचें न ऐकतां ते तळेगांवीं आले. तोंपर्यंत त्यांनीं वडील बंधूचें और्ध्वदेहिक वगैरे कांहींच केलें नाहीं. नंतर महाराजांनीं स्वतः तळेगांवीं जाऊन दाभाडे बंधूंची भेट घेतली व त्यांची समजूत केली. तसेंच आपण जवळ बसून क्रियाकर्मांतर करविलें. तसेंच सेनापति खंडेराव दाभाडे यांच्या पत्नी उमाबाई

याजवळ बाजीराव पेशवे यांजला नेलें व ते म्हणाले,-“ त्रिंबकराव तुझा पुत्र. बाळाजी विश्वनाथ यांचा व खंडेराव दाभाडे यांचा भाऊपणा होता, त्यास हाही तुझाच पुत्र आहे. त्यापक्षीं तूं यास आपले हातें मार.” असें म्हणोन तरवार पुढें ठेविली व बाजीराव यांस उमाबाईचे पायांवर घातलें. त्यासमयीं उमाबाई म्हणाल्या,-“ महाराज ! आपण धनी मायबाप आहांत. सर्व लेंकरें आम्ही तुमचीं आहोंत. जी आज्ञा कराल ती सर्वांस मान्य आहे.” त्यावरून महाराज, दाभाड्यांस म्हणाले,-जी गोष्ट घडों नये ती घडली. याउपरी तुम्हीं व बाजीराव यांनीं माझे पायांवर हात ठेवावा कीं, याउपरी जाहल्या गोष्टींची चुरस मनांत नाहीं.” याप्रमाणें उभयतांकडून पायांवर हात मारून घेऊन, पेशवे व दाभाडे यांचा तह करून दिला.

ह्या दाभाड्यांवरील लढाईमध्यें, शितोळे बंधूनीं मर्दुमकी गाजविल्यावरून बाजीराव पेशव्यांनीं सुलतानजी व आपाजी शितोळे यांस महाराजांकडे नेऊन त्यांच्या पराक्रमाची तारीफ केली व हे बरोबर होते; म्हणून माझा कार्यभाग झाला असे उद्गार काढिले.

यावरून महाराजांनीं संतोष पावून शितोळे यांस मांजरी हा गांव अर्धा व अंकली हा गांव पुरा वंशपरंपरेनें इनाम दिल्याबद्दलच्या सनदा करून देण्याविषयीं पेशव्यांस आज्ञा केली. ह्यावरून सुलतानजी व आप्पाजी शितोळे यांस हे दोन गांव इनाम करून देण्यांत आले. त्याबरोबर शितोळे-बंधूंनीं आपलें ठाणें पुण्यांतून उचलून, अंकलीस ठेविलें व यानंतर ते आपल्या सर्व कुटुंबांतील माणसांसह अंकलीस राहूं लागले.

हे गांव मिळवून देण्याच्या कामीं, पिराजीराव घोरपडे सेनापति यांनीं शितोळे बंधूंची श्री० शाहू छत्रपति यांजकडे राजश्री अंताजी नरसिंह यांजमार्फत पत्र देऊन विनंति केलेली आहे, असें सनदेवरून दिसून येतें. शितोळे-बंधु हे घोरपड्यांच्या पथकामध्यें असल्यामुळें, त्यांस त्यांचें अगत्य वाटणें साहजिक होय.

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृत् नाम संवत्सरे आषाढ बहूल दशमी सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांनीं राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा प्रांत कोल्हापूर यांस आज्ञा केली ऐसीजे. राजश्री सुलतानजी व आप्पाजी शितोळे हे स्वामींच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक स्वामींच्या पायांसीं निष्ठा धरून कार्य करीत आहेत यांचें चालवणें स्वामींस परम आवश्यक, यांचे विषयीं राजश्री पिराजी घोरपडे सेनापति यांनीं राजश्री अंताजी नरसिंह यांजमार्फत विनंति सांगोन पाठविली. त्याजवर स्वामी यांजवरी कृपाळू होऊन यांस नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हक्कदार व इनामदार करून मौजे मांजरी ता० टकेसंचे प्रांत मजकूर हा गांव हद एक यांस इनाम करून दिला असे. तरी मौजे मांजरी पूर्व मर्यादेप्रमाणें यांचे स्वाधीन करणें आणि इनाम वंशपरंपरेनें चालविणें. या सनदेची नालीक लेहोन घेऊन सनद भोगवटियास देणें. निदेश समक्ष. छ० २२ रमजान सुरुसन सफसद. मर्यादेयं विराजते.




श्री.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५१ साधारण संवत्सरे श्रावण शु० ६ भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांनीं मोकदम मौजे अंकली रायबाग यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री सुलतानजी शितोळे व आपाजी शितोळे दोन बाजाचा शितोळे हे निष्ठेनें सेवा करितात. यांचें वंशपरंपरेनें चालवणें आवश्यक जाणोन यांजवर स्वामी कृपाळू होऊन मौजे मजकूर पेशजीच्या मुकासी यांजकडून दूर करवून हल्लीं यांसीं विषयीचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें मौजे मजकूर नूतन इनाम कुलबाब कुलकानू हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हक्कदार व इनामदार दिला असे. तर तुम्हीं त्यांचे आज्ञेंत वर्तोन चतुःसीमा पूर्वी याद्दीप्रमाणें मौजे मजकूरचा ऐवज यांशीं त्यांचे वंशपरंपरेनें वसूल हेत जाणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची नालीक लेहोन घेऊन पत्र मशार

निल्हेकडे भोगवटियास परतोन देणें. जाणिजे लेखनालंकार. छ० ४ मयातेन व अलफ. मर्यादेयं विराजते.




बार




येणेंप्रमाणें सनद मिळाल्यावर त्या इनामाचा उपभोग कांहीं दिवस शितोळे-बंधूंनीं घेतला. शेवटीं इ० स० १७४० च्या सुमारास कांहीं थोड्या अंतरानें हे दोघेही बंधु निवर्तले. आपाजीस महादजी व सटवाजी, तसेंच मुलतानजीस फिरंगोजी ह्याप्रमाणें पुत्र होते.

ह्या शितोळे-बंधूंनीं अनेक लढायांत आपल्या मालकांची निष्कपट सेवा केलेली असून, स्वामींस संतोषित केलें होतें.

---

## महादजी, सटवाजी व फिरंगोजी

शितोळे-बंधूंच्या निधनवृत्ताच्या जवळपासच प्रसिद्ध बाजीराव पेशवे ह्या कर्तृत्ववान् पुरुषानें इ० स० १७४० च्या एप्रिल महिन्याच्या २८ तारखेस नर्मदेच्या कांठीं आपला देह ठेविला.

ह्या पुरुषाच्या अकालिक मरणानें मराठ्यांच्या राज्याचें अतोनात नुकसान झालेलें आहे. दाभाड्यांबरोबर झालेलें बाजीरावाचें वर्तन वजा केलें तर त्यानें आपल्या विरुद्ध बरीच मंडळी असतांही निव्वळ मराठी राज्याच्या कल्याणार्थ तो झटलेला दिसून येत आहे. निजाम उल्मुलुकासारख्या शत्रूच्या मुखांतूनही त्यानें 'एक बाजी और सब पाजी' असे उद्गार काढविले आहेत. ज्यावेळीं बाजीराव पेशव्यांचें निधनवृत्त शाहूमहाराजांच्या कानीं गेले त्यावेळीं शाहूमहाराज म्हणाले, "बाजीराव नाहीं मेला पण साक्षात् मृत्यूनें हिसडा देऊन आज माझ्या राज्यरूपी इमारतीचा आधारस्तंभ जमीनदोस्त करून टाकिला." ह्या महाराजांच्या उद्गारावरून त्यांस बाजीरावाचें किती अगत्य होतें हें स्पष्ट दिसून येत आहे. बाजीरावानें मराठ्यांचें राज्य घशाखालीं लोटण्याची इच्छा कधींही मनामध्यें ठेविली नव्हती. त्याच्या आयुष्याचा बहुतेक काळ लढायांमध्यें गेलेला आहे. त्यास पेशवाईचें पद मिळण्यासंबंधीं अटकाव करणारे त्याचे प्रतिस्पर्धी, यांजला, आपल्या शौर्यवीर्यादि पराक्रमानें शत्रूंस पादाक्रांत करून मराठी राज्याचें महत्त्व वाढवून दाखविण्याच्याच भावनेनें तो प्रेरित झाल्यामुळें त्यास मराठ्यांचें राज्य घशाखालीं घालण्याची बुद्धि सुचली नाहीं. त्याच्यासारखा पाणीदार पुरुष त्याकालीं तोच होय! त्याच्यासंबंधानें निजाम उल्मुलकानें जे शब्द उच्चारिले आहेत, ते येथें दिले असतां अप्रासंगिक होणार नाहींत. तो म्हणालाः—

"खुदा इतने जलदी मेरे दुशमानको क्यों मोत बक्षी. अब मेरे साथ जंग करके कोन फते पायगा. इस दुनयामें एक बाजी और सब पाजी. फिलहाल मेरी उम्मर ९६ वर्ष है. इस्के दरम्यान बाजीके मुआफिक अक्कल मंद, रहेमदील और जवानमर्द इस दुनयाके परदेपर सिवाय रुस्तमके दुसरा पैदा नहीं हुवा था. अफसोस उस्के मोत पर."

ह्याप्रकारचे उद्गार त्याच्या शत्रूंनींहि काढले होते. ह्यावरून बाजीरावाची योग्यता कळून येते. बाजीराव पेशव्याच्या मरणोत्तर शितोळे-बंधूंचें चिरंजीव, महादजी सटवाजी व फिरंगोजी हे फिके पडले. पेशव्यांच्या दरबारीं शितोळे बंधूंचें प्राबल्य बरेंच असल्यामुळें, पुष्कळ सरदार त्यांचा हेवा करीत असत. तशांत त्यांचा सर्वस्वी आधार असा बाजीराव इहलोक सोडून गेल्यानें वडलांच्या पश्चात् त्यांना कोणीच मार्गदर्शक राहिला नाहीं. मध्यंतरी त्यांनीं शाहूमहाराजांकडे विनंति केली परंतु दरबारमध्यें मराठे व ब्राह्मण यांचे जे दोन तट व्हावयाची सुरवात झालेली होती तीमुळें ह्या नवीन शितोळ्यांच्या विनंतीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट शाहूमहाराजांच्या निधनापर्यंतचा काळ त्यांस बेकार अवस्थेंत काढावा लागला.

इ० स० १७४८ मध्यें दिसेंबरच्या नवव्या तारखेस, मराठ्यांच्या गादीच्या शेवटच्या व स्वतंत्र अशा राजानें आपला देह ठेविला. हे वर्तमान जिकडे तिकडे पसरतांच हलकल्लोळ माजून राहिला, आज मराठी राज्य सूर्यास मेघानें पार आच्छादून टाकिलें. छत्रपति शिवाजी, संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीमध्यें ज्या मुलखांवर मराठ्यांचें स्वामित्व होतें, त्यापेक्षां किती-

तरी पट जास्त मुलखावर शाहूमहाराजांच्या कारकीर्दीमध्यें अंमल बसलेला होता. मराठी राज्य एकसारखें वाढत होतें, व त्याचा कीर्तिदुंदुभी जगभर निनादित होत होता. ही कीर्ति ज्याप्रमाणें शाहूमहाराजांनीं संपादिली त्याचप्रमाणें त्यांनीं जर शिवाजीमहाराजांची शिस्त अखत्यार केली असती व वंशपरंपरेनें अधिकार न देतां ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें दिले असते; तर मराठी राज्य त्यांच्यामागें पुष्कळ वर्षें टिकलें असतें यांत संशय नाहीं. शिवाय स्वतंत्र जहागिरी तोडून देण्याची पद्धत शाहूमहाराजांनीं अमलांत आणल्यामुळेंच बहामणी राज्याचे ज्याप्रमाणें तुकडे तुकडे झाले व ज्याच्या हातांत ससा तो पारधी अशी स्थिति झाली व निरनिराळे सरदारच स्वतंत्र होऊन बहामणी राज्याचें अस्तित्व नाहींसें झालें; त्याचप्रकारची मराठी राज्याची स्थिति झाली. शाहूच्यावेळीं ब्राह्मण व मराठे असे दोन पक्ष उत्पन्न झाले. हे दोन पक्ष उत्पन्न व्हावयास मूळ पेशव्यांचें वर्चस्व हेंच होतें. मराठीराज्यामध्यें भट पेशवे यांचें वर्चस्व झाल्याकारणानें पिढिजाद मराठे सरदारांचीं मनें शाहूविषयीं गढूळ झालीं. तीं शुद्ध करण्याचा प्रयत्न वेळींच जर शाहूकडून झाला असता तर हे दोन तट उत्पन्न झाले नसते. तशांत प्रसिद्ध ताराबाईनें पन्हाळ्यास नवीन राज्याची स्थापना केल्यामुळें मराठ्यांची जूट विभागिली गेली. व जे पिढिजाद मराठे सरदार कीं, ज्यांस एकट्या पेशव्यांचें वर्चस्व सहन झालें नाहीं ते ताराबाईस जाऊन मिळाले. भट पेशवे यांचें वर्चस्व एकट्या मराठ्यांसच सहन होत नव्हतें असें नाहीं परंतु ज्यांनीं मराठी राज्याची एकनिष्ठपणें सेवा केली त्या देशस्थ ब्राम्हणांसही त्यांचें वर्चस्व असह्य होऊन तेही ताराबाईस जाऊन मिळाले.

अशाप्रकारें जुनी व प्रमुख पिढी ताराबाईच्या पक्षास मिळल्यामुळेंच, आजपर्यंत तें राज्य अस्तित्वांत राहिलें यांत मुळींच संशय नाहीं. पेशवे हे खरोखरीच महाराष्ट्राच्या व राज्याच्या उपयोगीं पडण्यास खऱ्या देशभक्तीनें प्रेरित होऊन कारणीभूत झाले असते तर त्यांजला नवे मराठे सरदार उत्पन्न करण्याची जरूरीच पडली नसती. ज्याप्रमाणें शाहू महाराजांनीं पेशव्यांस वंशपरंपरेचा अधिकार देऊन, पुणें हें वास्तव्याचें ठिकाण करण्यास परवानगी दिली, ही जशी शाहूची चुकी झाली. तशीच चुकी पेशव्यांचीही झालेली आहे. त्यांनीं आपणांस अनेक स्वाऱ्यामध्यें मदत करणाऱ्या सरदारांस मोठमोठ्या जहागिरी देववून त्यांस प्रबळ केलें व शेवटीं त्यांसही ज्या ज्या वेळीं पेशव्यांच्या वर्चस्वाचा तिटकारा आला त्या त्या वेळीं त्यांनीं हीं पेशव्यांस जुमानलें नाहीं व उलट पुणें लुटण्यांपर्यंत मुद्धां पाळी आली. ह्या चुकामुळें, मराठ्यांचें राज्य पेशव्यांच्या हातीं गेलें असूनही तें टिकलें नाहीं. थोडा वेळ त्याची भरभराटी होऊन ज्याप्रमाणें एखादा अधिकारी आपल्या अधिकारानें उन्मत्त होऊन दुसऱ्याच्या सल्यास तुच्छ मानितो व शेवटीं तोच तोंडघाशीं पडतो तशीच स्थिति पेशव्यांनीं बळकाविलेल्या मराठी राज्याचीही झाली व तें इंग्रज प्रभूच्या स्वाधीन झालें. असो.

मराठ्यांच्या राज्यामध्यें मराठे व ब्राह्मण असे दोन तट झाल्यामुळेंच शितोळ्यांची सात आठ वर्षें दाद लागली नाहीं. कारण हे पेशव्यांचे सरदार होते. अर्थात् नानासाहेब पेशवे यांस बाजीराव पेशवे यांच्या नंतर अधिकार मिळाला असतांही त्यांची दाद लागली नसावी. म्हणूनच त्यांस ताराबाईसाहेबांनीं स्थापन केलेल्या कोल्हापूरच्या राजाकडे जाण्याची इच्छा उत्पन्न जाहली. ही इच्छा उत्पन्न होण्यास, व राणोजी घोरपडे सेनापति यांनींही आपल्या पूर्व स्नेहानुसार शितोळे यांची कोल्हापूर दरबारा तारीफ केली.

श्री. शाहू छत्रपति यांच्याच पदरीं राहण्याची शितोळे बंधूंची इच्छा तृप्त होत नाहीं असें दिसून येतांच, राणोजी घोरपडे सेनापति यांनीं, महादजी शितोळे व फिरंगोजी शितोळे यांची कोल्हापूर सरकारजवळ तारीफ करून, अशा पिढीजाद मराठे सरदारांस आपला आश्रय देऊन जवळ बाळगावें व त्यांस रायबाग गांव इनाम देववावा म्हणून विनंति केल्यावरून, छत्रपति कोल्हापूर सरकार यांनीं रायबाग गांव इनाम देऊन त्यांस आपल्या संग्रहीं ठेविलें व पूर्वी मिळालेल्या सनदेचें पुनरुज्जीवन करून दिलें.

श्री.

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ७५ शकनाम संवत्सरे पौष शुद्ध सप्तमी सोमवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपतिस्वामी यांनीं राजश्री महादजी बिन आपाजी व फिरंगोजी बिन सुलतानजी शितोळे यांस दिल्हें इनामपत्र ऐसीजे:—तुमचेविशीं राजश्री राणोजी

घोरपडे सेनापति यांनीं करवीरच्या मुक्कामीं स्वामीसंन्निध विनंती केली कीं, सुलतानजी शितोळे यांनीं महाराजांचे पायापाशीं सेवा निष्ठेनें केली, यासीं पूर्वी कै० महाराजांनीं मौजे अंकली ता. रायबाग हा गांव इनाम करून दिला आहे त्याप्रमाणें इनाम अनुभवून ते निधन पावले. त्यांचे पुत्र हे उभयतां. यावरी महाराज मेहरबान होऊन इनामगांव कीर्द करून यांचे नांवें पत्रें भोगवट्यासीं करून देविलीं पाहिजेत; म्हणून त्यावरून मनास आणितां तुम्हीं पुरातन सेवक तुमच्या पित्यांनीं सेवा निष्ठेनें केली त्यांचे पुत्र तुम्हीं तुमचें चालवणें स्वामीस आवश्यक यास्तव स्वामी कृपाळू होऊन तुम्हांस इनाम कुलबाब कुलकानू हल्लींपट्टी व पेस्तरपट्टी, जल, तरु, पाषण निधिनिक्षेपसहित खेरीज हक्कदार व इनामदार करून मौजे अंकली ता० रायबाग हा गांव देह एक इनाम पूर्ववत् प्रमाणें दिला असे. तरी तुम्हीं मौजें मजकूर पूर्व चतुःसीमा आपले स्वाधीन करून घेणें आणि इनाम गांव व जकातचे करार देखील तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें जाणीजे. निदेश समक्ष.

छ० ६ सफर सुरुसन खमसेन मयातेन व अलफ.

रुजू सुरूनिविस. सुरु सुदबार.

बार.

श्री.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७५ शुक्ल नाम संवत्सरे पौष शुद्ध ७ सोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी यांनीं राजश्री महादजी व सटवाजी बीन आपाजी शितोळे यांस दिल्हें इनाम पत्र ऐसीजेः- तुमचे विशीं राजश्री राणोजी सेनापती घोरपडे यांनीं करवीरचे मुक्कामी स्वामीसंन्निध विनंती केली कीं हे महाराजांचे पुरातन सेवक यांचे वडीलांस महाराजा राजश्री कै० स्वामिनीं कसबा नेज व देहसात इनाम करून दिला होता त्यास ते मृत्यू पावले. त्यांचे पुत्र हे उभयतां स्वामीसेवा निष्ठेनें करीत आहेत यांस पेशजी मजकूर इनाम करार करून पत्रें यांचे नांवें भोगवटियासी करून देविलीं पाहिजेत म्हणून विदित केलें. त्यावरून मनास आणितां तुमचे पिते आपाजी शितोळे यांनीं स्वामीची सेवा बहुत दिवस केली त्यांचे पुत्र तुम्हीं तुमचें चालवणें स्वामीस आवश्यक आहे यास्तव स्वामी तुम्हांवर कृपाळू होऊन कसबें नेज परगणे हुकेरी व देहसात कुलबाब कुलकानू हल्लीं पट्टी व पेस्तरपट्टी जल तरु पाषाण निधि निक्षेप सहित खेरीज हक्कदार व इनादार करून इनामपूर्ववतप्रमाणें दिला असे तरी तुम्हीं सदरहू कसबे मजकूर पूर्व चतुःसीमा आपले स्वाधीन करून घेऊन आणि इनाम व कसबेची जकात तुम्हीं वडीलाचें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें जाणिजे निदेश समक्ष. रुजू समत मंत्री.

छ० ६ सफर सुरुसन खमसेन मयातेन व अलफ.

रुजू सुरू निविस. सुरू सुदबार.

बार.

ह्या दोन सनदा करून दिल्या व पालखी हत्ती वगैरे सरदारी बहुमानाची देणगी देऊन चांगला गौरव केला. ह्याप्रमाणें हे दोन सरदार पेशवाईतून कोल्हापूर दरबारीं त्या दरबारचे सेनापति राणोजी घोरपडे यांजकडे चाकरीस राहिल्याचें बाळाजी बाजीराव यांस कळतांच त्यांनीं पुणें मुक्कामीं समक्ष भेटण्याकरितां यावें म्हणून एका हुजऱ्यास पत्र देऊन रवाना केलें. तें पत्र उभयतां शितोळे बंधुनीं वाचून पाहिलें व पेशव्यांस जाऊन भेटावें अशी त्यांस इच्छा उत्पन्न झाली. व त्याप्रमाणें त्यांनीं करवीर सरकार व राणोजी घोरपडे यांचा निरोप मागितला. पण तो त्यांनीं स्वसंतोषानें दिला नाहीं. परंतु एकवेळ तरी पेशव्यांची समक्ष भेट घेणें आवश्यक आहे असें जाणून त्यांनीं महाराजांशीं विशेष आग्रह धरिला. शितोळे बंधूंचा विशेष आग्रह पाहून त्यांनीं त्यांस पेशव्यांस भेटावयास जाण्याची परवानगी दिली; परंतु त्या दिवसापासून उभयपक्षीं दुजाभाव दिसूं लागला.

शितोळे बंधु पुण्यास येतांच त्यांनीं पेशव्यांची भेट घेतली. त्या वेळीं पेशव्यांनीं त्यांची समजूत केली व असा प्रश्न केला कीं 'इतके दिवस तुमच्या पूर्वजांनीं आमची चाकरी केली असून, आतां तुम्हीं दुसऱ्या ठिकाणीं जावें, असा तुमच्यावर प्रसंग आला आहे काय ?" नंतर ते म्हणाले; "जों पावेतों मी जिवंत आहे; तों पावेतों, तुम्हीं माझ्यापाशींच राहुन वडलांप्रमाणें लौकिक संपादन करावा." नानासाहेबांनीं अशा प्रकारचे उद्गार काढतांच शितोळे बंधूंनीं त्यांचें म्हणणें मान्य केलें व त्याप्रमाणें बोलूनहि दाखविलें. त्याबरोबर बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं त्यांचा सन्मान

करून त्यांस पूर्ववत आपले पदरीं सरदारी सांगोन साडेतीन पोषाख, पालखी, हत्ती, जरीपटका, लगी, डंका, नोबत, वालम, रुप्याचे छडीचा भालदार, चांदीचे दागिन्याचा तोडर-वाळा, याचाब घोडा व सिंह त्यावर तुमा व सिंग असा सरंजाम देऊन, हा मान वंशपरंपरेनें कायम केला. हा मान छत्रपति सरकार व पेशवे या उभयतांपासून मिळालेला असून, तो आजपर्यंत अव्याहत चालत आहे.

यानंतर श्री०बाळाजी बाजीराव यांनीं हिंदुस्थानांतील स्वारीवर जाण्याचा विचार केला व त्याप्रमाणें फौजही जमा केली. ह्या फौजेमध्यें महादजी व सटवाजी शितोळे हे उभय बंधुही होते. त्यांनीं मजल-दरमजल करीत नेमाड माळव्यावरून होतहोत ते हिंदुस्थानाकडे आले. व त्या ठिकाणीं अनेक राजेरजवाड्यांकडून खंडण्या घेऊन ते उदेपूर संस्थानांतून दिल्लीस पोहोंचले. त्यावेळीं दिल्लीच्या बादशहानें पेशव्यांच्या सैन्यास दाणापाणी वगैरे कांहींच दिलें नाहीं, त्यामुळें क्रोध येऊन त्यानें बादशहाबरोबर संग्राम करून त्यास जेरीस आणिलें. शेवटीं बादशहानें पेशव्यांबरोबर तह करून त्यास बरेच प्रांत दिले. तेथून ते ग्वाल्हेरकडे कूच करून तेथील किल्ला व भोंवर वगैरे मुलूख हस्तगत करून बऱ्याच दिवसांनीं पुण्यास आले. हें वर्तमान इ० स० १७५६ त घडलें. पुढें सन १७५७ त पेशव्यांनीं मोठा दरबार भरवून, पेशवाईंतील सर्व मानकरी एकत्र करून त्यांस हिंदुस्थानांतील मोहिमेची सर्व हकीकत निवेदन केली व अनेक शूर पुरुषांची प्रशंसा केली. त्यांतच महादजी व सटवाजी शितोळे यांचीही गणना करून त्यांस पूर्वी दिलेला मांजरी गांव अर्धा, हल्लीं पुरा इनाम देऊन शिवाय दुसरीही गांवें दिलीं व त्यांच्या सनदा पुनः करून दिल्या. हीं गांवें मिळण्याचें कारण शितोळे बंधूंची मर्दानगी हेंच होय. राक्षसभुवनचे लढाईंत महादजी शितोळे यांनीं पराक्रमाची खूप शर्थ केलेली आहे. त्याबद्दल हरिवंशाच्या बखरींत जी माहिती लिहिली आहे ती याखालीं देतों.

"राक्षसभुवनचे लढाईंत मोंगल यांची फौज, खासा मोंगल विठ्ठल सुंदर कारभारी व इकडून सरकारची फौज, श्रीमंत दादासाहेब व श्रीमंत माधवरावसाहेब व श्रीमंत नारायणराव साहेब, याप्रमाणें जे समयीं लढाईस प्रारंभ जाहला ते समयीं तोफखाना इकडील व तिकडील सुरू जाहला. याप्रमाणें लढाई चालली. तिकडून मोंगलांचे कारभारी विठ्ठल सुंदर यांनीं साडेतीनशें हौदे निरंदाजीचे रिकामे केले! याप्रमाणें तिरांचा मारखासा निजामअल्ली जनानखान्यासुद्धां लढाईपासून एका कोशावर होते. अशी लढाई होत असतां विठ्ठल सुंदर यांनीं निरंदाजीचे हौद्याचे हत्ती आपले तोफखान्यापुढें घातले. ते मोंगल यांनीं दुर्बिणींतून पाहिले आणि बोलिले जे, लढाई बिघडली. आतां मोड होतो! असें म्हणोन ते जनानखाना संभाळून मागें सरूं लागले. तों विठ्ठल सुंदर हे यवनी भाषेनें म्हणों लागले, काय पाहतां! पेशवे यांचा हत्ती असाच वळवा! असें म्हणून श्रीमंतांचे अंबारीवरच गर्दी केली. ते समयीं श्रीमंतांचे खवासखान्यांतील चवरीबारदार उभा होता तो गोळी लागून उडाला, हें पाहतांच श्रीमंतांस धीर धरवेनासा जाहला आणि बाबा महान यास बोलले कीं, हत्ती बसव. त्यानें उत्तर केलें जे महाराज हत्ती बसवावयाची ही वेळ नव्हे. जर हत्ती बसविला तर लढाई बिघडेल. याप्रमाणें बोलतांच पुढें सरून त्याचे गळ्यास धरून बोलले जे, अरे मला मारतोस कीं काय? मी घोड्यावर बसणार. याप्रमाणें बोलतांच फौजदार (महान) यांनीं हत्ती बसविला. तों गनीम यांनीं येऊन हत्ती वेढिला. इकडील फौज हत्ती बसवितांच बेदिल जाहली. तों श्रीमंतांचा हत्ती मोगलांनीं तसाच वळविला.

हें श्रीमंत माधवरावसाहेब यांनीं पाहिलें. ते केंदेंत होते रखवालीस हुजुरातचे मानकरी खासे पांचशें असामी होते. ते सारे घोड्यावर बसोन तयार होते. तेव्हां श्रीमंत रावसाहेब बोलले कीं, अहो दादासाहेब यांचा हत्ती वळला हें तुम्हीं काय पाहतां! तेव्हां मानकरी बोलले कीं, आमची चाकरी पाहणार धनी कोण आहे! श्रीमंतांनीं विचारिलें कीं, मी धनी नव्हे कीं काय? तेव्हां मानकरी बोलले कीं, आपण ज्यास हटकून मारावयास सांगाल त्यास मारूं. परंतु जें मागूं तें बक्षीस स्वामींनीं द्यावें लागेल. ते समयीं श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, विठ्ठल सुंदर यांचे हत्तीवरील महान भाल्यानें जाऊन मारावा. तेव्हां महादजी शितोळे बोलले कीं, दहा हजारांचा गांव इनाम व बसता हत्ती घेईन. ते समयीं श्रीमंतांनीं कबूल केलें. नंतर महादजी शितोळे यांणीं घोड्यास येड केली आणि आंत शिरले.

जाऊन विठ्ठल सुंदर यांचा महात भाल्यानें ठार मारिला आणि येऊन श्रीमंतांस मुजरा केला. नंतर अंकली मांजरी हे गांव दहा हजारांचे इनाम दिले, ते अद्यापि शितोळे यांजकडे चालले आहेत. याप्रमाणें मानकरी यांनीं कामकाज केलें. त्या लढाईत विठ्ठल सुंदर ठार झाले. त्यांचे चिरंजीवही टार झाले. मोगलांकडील निशाणें, तोफा, हत्ती वगैरे पाडाव आले. मोगलांकडील सारी फौज लुटून टाकिली. खासा मोंगल मात्र जनानखाना बचावून दौलताबादेस गेले. श्रीमंतांस यश आलें, श्रीमंत माधवराव साहेब यांचें तेज फौजेवर पडलें. तेच दिवशी साऱ्या फौजेंत हुकूम श्रीमंत रावसाहेब यांचा बसला. सर्वांचे चित्त श्रीमंत रावसाहेब यांचे पायांशीं लागलें. याप्रमाणें जाहलें."

त्याप्रमाणें महादजी शितोळे यांच्या मर्दुमकीचा कथा-भाग हरिवंशाची बखर पृष्ठें २१-२२ मध्यें आहे.

श्री.

राजश्री महादजी बीन आपाजी शितोळे गोसावी यांसः-

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने० बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सुमासंबाखमसेन मया व अलफ, तुम्हीं हुजूर येऊन कसबें पुणें येथील मुक्कामीं अर्ज केला कीं, मौजें मांजरी पो कागल हा गांव आपणांस पूर्वी महाराज शाहू छत्रपति कै० स्वामी यांनीं स्वराज्यतर्फे इनाम करून देऊन राजपत्र भोगवटियास करून दिलें व साहेबांचींही इनामपत्रें आहेत. त्यास आजपर्यंत स्वराज्यतर्फेनें आपणांकडे इनाम चालत आहे, तरी यास हल्लीं साहेबीं कृपाळु होऊन मोंगलाई अम्मल इनाम करार करून देऊन दरोबस्त गांव आपणाकडे इनाम चालावा म्हणोन विनंति केली त्याजवरून मनांत आणोन तुम्हीं पुरातन राज्यांतील सेवक श्रम-साहस करून स्वामीसेवा एकनिष्ठेनें केली व पुढेंही करावयास उमेदवार आहां. तुमचें चालवणें आवश्यक जाणून तुम्हांवर कृपाळु होऊन, तुम्हांस स्वराज्य तर्फेचा अमल पेशजी पो व हल्लीं मोंगलाई अमल ठेवून दुतर्फा दरोबस्त मौजें मजकूरचा अमल कुलबाब कुलकानू हल्लीं पटी व पेस्तर पटी खेरीज हकदार व इनामदार करून, जल तरु पाषाण निधीनिक्षेप आदिकरून इनाम करार करून देऊन हें पत्र तुम्हांस करून दिलें असे, तरी तुम्हीं मौजें मजकूर दरोबस्त दुतर्फा आपले दुमाला करून घेऊन तुम्हीं वडिलांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनुभवून स्वामिसेवा एकनिष्ठपणें करून सुखरूप राहणें. जाणिजे छ० ६ रा. व. आज्ञा प्रमाण लेखनसीमा. बार




श्री

राजश्री फिरंगोजी बीन सुलतानजी व महादजी बीन आपाजी शितोळे गोसावी यांसी.—

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो. बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. सुरुसन इसने खमसेन मया व अलफ. तुम्हीं कसबे पुण्याचे मुक्कामीं हुजूर येऊन विनंति केली कीं, मौजें मांजरी पो कागल हा गांव महाराज शाहूराजे कै० स्वामी यांनीं कृपाळु होऊन आम्हांस इनाम दिला आहे. राजपत्रें आहेत तीं मनास आणोन पत्र भोगवटियास करून दिल्हे पाहिजे, म्हणोन त्यावरून पुर्वील राजपत्रें मनास आणून हें पत्र भोगवटियास तुम्हांस करून दिल्हें असे. तरी मौजें मजकूर कुलबाब कुलकानू हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हक्कदार व इनादार इनाम दिल्हा असे. तरी मौजे मा राजपत्राप्रमाणें तुम्हीं वडिलांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें जाणिजे. छ. ४ मोहरम आज्ञाप्रमाण. लेखनसीमा. बार.



श्री.

राजश्री माहादजी शितोळे गोसावी यांसीः—

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने० बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. सुरु सन इसने सितेन मया व अलफ कसबे* नेज पो० हुकेरी हा गांव दरोबस्त तुम्हांकडे आहे, त्यास कसबें मजकूरची वाडी चिकोडीकरांनीं खंडोजी पिसाळ यांजकडे दिली होती. तें मनांत आणितां वाडी तुमची खरी, पिसाळ तुमचे चाकर, परंतु पिसाळ मजकुराचा पुत्र बापूजी पिसाळ हजर नाहीं. हिंदुस्थानांत चाकरीस गेला आहे. याकरितां वाडींत पिसाळानें रहावें घ्यावें. तुमचे वाडींत असावें. पिसाळ आल्यावर वाडी तुम्हांकडे घ्यावी. याप्रमाणें सरकारांतून करार केला असे. जाणिजे. छ ७ जिल्हेज बहुत काय लिहिणें.

श्रीराजा शाहू
छत्रपति हर्षनिधान
बाळाजी बाजीराव प्रधान

शिक्का

ह्या सनदांमध्यें जे शिक्के आहेत त्यांचा बरोबर मेळ जुळत नाहीं. शाहूच्या मरणानंतरही बाळाजी बाजीराव पेशवे शाहूचा शिक्का वापरीत होते असें दिसून येतें. तसेंच रामराजाच्या ऐवजीं राजाराम असा शिक्का आहे.

याखेरीजही आणखी बऱ्याच गांवच्या सनदा मिळालेल्या होत्या, पण तीं गांवें आतां चालत नाहींत. शितोळ्यांच्या भोगवट्यास जीं गांवें होतीं त्यांचा तपशील देत आहें.

१ मौजें एडगांव हा गांव सुलतानजी व महादजी शितोळे यांजकडे चालू होता. छ. २५ शाबान.
२ मौजें सरदंवडगड " "
३ लायगांव व डावगांव " छ २४ रबिलाखर.
४ रणदाळगांव से. घोरपडे यांजकडून मिळाला. छ. ५ रजब.
५ कुरुंदवाड " छ. १३ शाबान.
६ पटलूर " छ. ११/१६ सफर.
७ चिमगांव शंभु छत्रपतींनीं दिलेला. छ. १६ सफर.
८ कागलगांव श्रीनिवास परशराम यांनीं दिलेला छ. १० शाबान.
९ जालीबार से. घोरपडे यांनीं दिलेला छ. २९ जिल्हेज.
१० हुकेरीगांव श्रीनिवास परशराम यांनीं दिलेला छ. २६ शाबान.

ह्याप्रमाणें अनेक गांवच्या सनदा शितोळे यांस मिळालेल्या होत्या. पण ते गांव आतां त्यांच्याकडे चालत नाहींत. शितोळे ह्या कुळानें बादशाही, मराठशाई व पेशवाई ह्या तीनही कारकीर्दीमध्यें आपल्या आंगच्या शौर्य—औदार्यादि गुणानें प्रसिद्धीस येऊन, स्वामिनिष्ठेचें वर्तन केल्यामुळेंच त्यांनीं सरदारीचा मान, पुणें प्रांताची देशमुखी, पदवी गांवची पाटिलकी आणि अंकलें, मांजरी व नेज हीं गांवें इनाम म्हणून संपादन केलीं. त्यावरून ह्या घराण्यांतील पुरुषांची खरी कर्तबगारी दृष्टोत्पत्तीस येते. आपला जो धनी असेल त्याची एकनिष्ठपणें सेवा करणें हेंच शितोळे कुळांतील पुरुषांचें ब्रीद होतें व अद्यापिहि तेंच ब्रीद आहे. ते दयाशालीही तसेच होते त्यांच्याबद्दल हरिवंशाच्या बखरीमध्यें ( पृष्ठ ९३ टीप ३ ) असें लिहिलें आहे कीं,

" पटणकुडीच्या लढाईंत जखमांनीं घायाळ झालेले गणपतराव समरभूमीपासून कांहीं अंतरावर येऊन मूर्च्छित होत्साते घोड्यावरून पडले. ते कांहीं वेळ तसेच पडले होते. मागून त्या काळचे प्रसिद्ध शिलेदार शितोळे लढाईतून परत येत होते; त्यांनीं काळोखांत यांस पाहिलें व घोड्यावरून उतरून यांचे अंग चांचपून पाहिलें तों यांचे कमरेस देवांचें संपुट होतें तें खडखड वाजलें. त्यावरून हा ब्राह्मण आहे. व यास येथेंच टाकून गेलों तर फुकट मरून जाईल, असें जाणून त्यांस त्यांनीं भाल्याचे झोळींत घालून मिरजेस पोंचवून दिलें."

हे प्रसिद्ध शितोळे शिलेदार महादजीच असले पाहिजेत. त्या वेळीं शितोळे हे पेशव्यांचे मानकरी असून अनेक प्रसंगीं, त्यांनीं पेशव्यांस मदत

* कसबें नेजच्या वाडीसंबंधानें पिसाळ मजकूरचा कांहीं बखेडा उत्पन्न झाल्या बाबतचें हें पत्र आहे. ह्या पत्रानें शितोळ्यांकडे वाडीचा हक्क पोहोंचविला आहे.

केलेली आहे. तसेंच थोरल्या महादजींचे पुत्र नारोजी यांचे चिरंजीव यशवंतराव, त्यांनींही चंद्रसेनाबरोबरच्या युद्धांत पराक्रम गाजविल्यावरून त्यांस शिफारसपत्र पाठविण्यांत आलें होतें; तें पत्र जाधव घराण्याची कैफियत पृष्ठ ११४–११५ वर छापिलें आहे तें पहावें.

मराठ्यांचें राज्य पेशव्यांनीं आपल्या स्वाधीन करून घेतलें व त्याची थोडे दिवस चांगली भरभराट केली. परंतु पुढें पेशव्यांच्या जागीं येणारे पुरुष कर्तृत्ववान् नसल्यामुळें त्यांसही तें राज्य सांभाळविलें नाहीं. अनधिकारी माणसाच्या हातीं सत्ता आल्यास ती त्यास सांभाळणें जसें जड जातें, तशीच स्थिति पेशव्यांची झाली. ज्याप्रमाणें छत्रपतीस बाहुलें करून सर्व सत्ता आपल्या स्वाधीन रहावी अशी इच्छा पेशव्यांस उत्पन्न झाली होती व त्याप्रमाणें बाळाजी बाजीरावासारख्या धूर्त पेशव्यानें ती सत्ता आपल्या स्वाधीन करून घेतली व ते व त्यांचे सरदार * छत्रपतीस मोजीनातसे झाले. त्याचप्रमाणें पेशव्यांनीं संपादित केलेल्या ब्राह्मणपादशाहीची सत्ता आपल्या स्वाधीन असावी अशी इच्छा प्रसिद्ध मुत्सद्दी नानाफडणविसास होणें हें साहजिक होय. अर्थात् प्रत्येक मुत्सद्दी कीं ज्याचें राज्यांत चलन होतें तो सर्व अधिकार आपणांकडे असावा म्हणून खटपट करूं लागला. बाजीराव पेशवे व नानाफडणवीस यांचें वांकडें असल्यामुळें पेशवे पद त्यांस न मिळावें अशी नानाफडणविसांची इच्छा होती. परंतु तें साध्य झालें नाहीं व बाजीराव पेशवे यांसच पेशवे पद मिळालें. त्याबरोबर नानाफडणविसांनीं सातारच्या छत्रपतीस मोकळें करून पुनः मराठशाई स्थापन करण्याचा बेत केला; परंतु तो साध्य झाला नाहीं. ज्या छत्रपतीस पेशव्यांच्या चलतीच्यावेळीं नानाफडणविसांनींसुद्धां ते आमचे धनिच नव्हेत. पेशवे हेच आमचे धनी असें म्हणावें, त्यानेंच त्यांस मुक्त करून पुनः मराठशाही प्रस्थापित करण्याचा उद्योग आरंभावा, हेंही सकृतदर्शनीं चमत्कारिक दिसतें. यावरूनच मुत्सद्दी मंडळ अधिकार आपल्या हातीं घेण्याबद्दल किती उत्सुक असतें तें ह्या नानाफडणविसांच्या वर्तनावरून दृष्टोत्पत्तीस येतें. एका अर्थी शेवटचा बाजीराव पेशवा जर पेशवे पदावर न येता व पुनः छत्रपतीची कारकीर्द सुरू झाली असती तर मराठशाही कांहीं काळ तरी टिकली असती व त्याबद्दलचें यश नानाफडणविसांस मिळालें असतें, यांत कांहीं संशय नाहीं. पण त्या वेळच्या छत्रपतींतही वकूब नव्हता म्हणून तो प्रयत्न व्यर्थ जाऊन शेवटच्या रावबाजीच्या दुष्कृत्यानें मराठशाई खालसा करण्यांत येऊन तिचीं सूत्रें इंग्रज सरकारच्या स्वाधीन झालीं. यावेळीं महादजी व सटवाजी शितोळे हे मयत झाले होते.

* यासंबंधाचीं पत्रें प्रसिद्ध इतिहास संशोधक राजवाडे, यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ह्याआपल्या खंडांत प्रसिद्ध केलीं आहेत. त्या वेळीं चिमणाजी आप्पानेंही शाहूची अमर्यादा केलेली आहे. तसेंच नानासाहेब पेशव्यांसही त्यांच्या वरचढपणामुळें शाहूनें एक वेळ बडतर्फही केलें होतें व त्यांजवळचे शिक्के वगैरे आपल्या स्वाधीन घेतले होते. यावरून नानासाहेब पेशवे शाहूच्या मर्जीतून उतरले होते हें सिद्ध होतें. त्यांस शाहू आपल्या मरणोत्तर राज्य देईल हें असंभवनीय होय.

## आपासाहेब शितोळे.

ज्यावेळीं इंग्रज बहादुरांच्या हातीं पेशवाईचीं सूत्रें आलीं, त्यावेळीं या अफाट प्रदेशावर अमल बसविण्याचें काम मोठें महत्वाचें होतें. इतर मराठा सरदारांच्या साह्यावांचून इंग्रज बहादुरांस सर्व मुलखांवर अंमल बसविण्याचें कठीण गेलें असतें. हें लक्षांत घेऊन त्यावेळचे कलेक्टर मे० जोसिया निसपट साहेब बहादुर यांनीं आपासाहेब शितोळे यांचें नांवें दोन खलिते पाठविले. त्यांत कोल्हापूर संस्थानांतील लोक लूट व दरोडे घालतात या साठीं आपण आपली शिबंदी ठेवून ते दंगे मोडण्यासंबंधानें आम्हांस मदत करावी म्हणून विनंति केली. यावेळीं, महादजी व सटवाजी शितोळे हे मयत झाले असून, त्यांस म्हणजे महादजीस आपाजीराव शितोळे दत्तक (हे थोरल्या महादजीचे पणतू होत.) व बापूजी शितोळे असे दोन पुत्र होते. त्यापैकीं आपाजीराव यांच्या नांवें ता० १४–९–१८२० रोजीं एक व ता० १८–९–१८२० रोजीं एक, ह्याप्रमाणें दोन पत्रें आलीं होतीं. त्याबरोबर आपाजीराव शितोळे यांनीं समयास अनुसरून तो हुकूम मान्य केला. व जास्त शिबंदी ठेवून लूट फाट व दरोडे यांचा उत्तम बंदोबस्त ठेवून देशांत शांतता राखिली. ही शितोळे सरदारांची कर्तबगारी

लक्ष्यांत घेऊन त्या वेळचे गव्हर्नरसाहेब यांनीं आपाजीराव शितोळे यांस एक गौरवपर पत्र पाठविलें व त्यांचे आभार मानिले. ज्यावेळीं इंग्रजबहादुरांचा मुंबई इलाख्यांत पूर्ण अम्मल बसला, त्यावेळीं श्री० आपाजीराव शितोळे यांस पेशवाईमधून ज्याप्रमाणें साडेतीन पोषाशांचा मान मिळत "असे त्याप्रमाणें तो मान कायम ठेवून त्यांचें नांव सेकंड क्लास सरदारांत नोंदण्यांत आलें. त्याचप्रमाणें इ० स० १८२७ पासून म्हणजे इंग्रजी अंमल पूर्णपणें प्रस्थापित झाल्यापासून दिवाणी फौजदारीचे अधिकार आपाजीराव शितोळे यांजकडे चालू केले.

इ० स० १८१८ या वर्षी पेशव्यांचें राज्य नष्ट जाहल्यानंतर प्रसिद्ध पुरुष हैबतरावबुवा यांस असा दृष्टांत झाला कीं, "श्री० आपाजीराव शितोळे देशमुख अंकलीकर व त्यांच्या पत्नी श्रीमती रमाबाईसाहेब शितोळे यांस श्रीक्षेत्र आळंदी येथें आणवून त्यांजला गादीचे शिष्य करावें व त्यांजकडून पालखीच्या मिरवणुकीची सेवा करवावी. यानंतर श्री० आपाजीराव शितोळे व त्यांचे वंशज यांजकडूनच सेवा करवावी. तसेंच श्रीमती रमाबाईसाहेब यांजकडून प्रत्येक महिन्यास पंढरीची वारी न्यावी " असा दृष्टांत झाल्यावरून, सदर सत्पुरुष हैबतराव यांनीं आपाजीराव शितोळे यांस त्यांच्या पत्नीसह पाचारण केलें. व त्यांच्या गळ्यांत माळ घालून त्यांस आपला शिष्य केलें. आणि झालेला दृष्टांत निवेदन केला. त्या श्रींच्या आज्ञेचा श्रद्धापूर्वक स्वीकार करून श्री० आपाजीराव शितोळे हे गादीची एकनिष्ठपणें सेवा करूं लागले. व श्रीमती रमाबाई ह्या प्रत्येक महिन्याच्या शुद्ध एकादशीस पंढरपूरची वारी करूं लागल्या. त्यांच्या स्वारीबरोबर श्रीपादराव कामत या नांवाचे कारकून जात असत. ह्याप्रमाणें सतत चाळीस वर्षें त्यांनीं वारी केली. पुढें त्यांची प्रकृति अशक्त झाल्यामुळें, त्यांच्यानें वारी होईना म्हणून ती करण्याचा प्रघात कामत घराण्यापैकीं इसमांनीं सुरू केला. व त्यांनीं प्रत्येक तीन महिन्यांनीं वारी करण्याचा क्रम सुरू ठेविला. त्या वारीच्या खर्चाप्रीत्यर्थ श्री० आपासाहेब शितोळे यांनीं कसबें मांजरीपैकीं जमीन इनाम करून दिलेली अद्याप चालत आहे.

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या दृष्टांताअन्वयें, पूर्व सांप्रदायाप्रमाणें श्रीज्ञानेश्वर महाराजांची पालखी आषाढ शुद्ध पक्षांत पंढरपुरास जात असे; त्या पालखीबरोबर श्री० आपाजीराव शितोळे यांनीं जाण्याचा सांप्रदाय सुरू ठेविला. ही वहिवाट हा कालपर्यंत चालू आहे.

श्रीआळंदी येथें श्रीज्ञानेश्वर महाराजांची पालखी पूर्ण सरंजामासह गेल्यावर तेथील वारकरी पादुकापर्यंत सामोरे येऊन तिला समारंभानें बोलावून नेतात व तेथें त्यांना श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या संस्थानांतून एक दिवसाचा शिधा मिळत असतो. तदनंतर सर्व सरंजामासह ती पालखी श्रीक्षेत्र पंढरीस जात असते. तेथें पंढरीस प्रदक्षिणा करून तेथून अहेर मिळतो. तो घेतल्यावर गोपालकाला झाल्यानंतर मौजें वाकेरीपर्यंत श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या पालखीस पोहोंचवून नंतर गांवीं येण्याची अद्याप वहिवाट आहे. त्याचप्रमाणें कार्तिकमासीं वद्य पक्षीं श्री नामदेव महाराजांची पालखी श्री पंढरीहून निघण्याचा सांप्रदाय आहे.

श्री० आपाजीराव शितोळे यांनीं इंग्रज सरकारच्या विनंतीवरून कोल्हापूर प्रांतांतील चोर व लुटारू यांचा बंदोबस्त केल्यावरून कोल्हापूर सरकारानें शितोळे यांच्या गांवची लुटालूट केली व त्यांची सर्व चीजवस्त व कागदपत्र वगैरे लुटून नेले. हा प्रकार पाहून शितोळे यांस फारच वाईट वाटलें. त्यांनीं या बाबतीसंबंधानें मे० साहेब बहादुर पोलिटिकल एजंट सुभा धारवाड यांजकडे फिर्याद केली; त्यावरून त्यांनीं करवीर सरकारकडून शितोळे यांस, १६११५-१२-० नुकसानीदाखल देवविले. यानंतर कांहीं दिवसांनीं इंग्रज सरकारांतून इनाम कमिशनाची चौकशी सुरू जाहली, त्यावेळीं शितोळे यांचे महत्त्वाचे कागद लुटींत गेल्यामुळें, त्यावेळीं आपासाहेब यांजकडे इनामें चालविण्याचा ठराव जाहला. नंतर इनाम-चौकशीचें काम बंद होऊन सेटलमेंटचा खल चालू झाला. त्यावेळीं श्री० आपाजीराव शितोळे यांनीं बरीच खटपट करून दोन तृतीयांश जुडीवर गांवें वंशपरंपरेनें चालविण्याविषयींचा हुकूम मिळण्याबद्दल अर्ज केला; पण त्यांच्या हयातीमध्यें त्यांच्या त्या खटपटीस यश देण्यापूर्वीच त्यांनीं आपला देह ठेविला, त्यांस पुत्रसंतान मुळींच नव्हतें; त्यामुळें त्यांच्या भाऊबंद घराण्यापैकीं, म्हणजे थोरल्या महादजीचा दुसरा मुलगा बाजी याच्या वंशांतील सर्जेराव दादासाहेब शितोळे यांस दत्तक देऊन इनाम गांवची व्यवस्था चालू केली.

## सरजेराव दादासाहेब शितोळे.

सरजेराव दादासाहेब हे जरी मूळचे गरीब स्थितींतील होते, तरी त्यांचे अंगीं नांवाजण्यासारखे गुण होते. श्रीमंती–पदावर चढल्यावर पूर्वपदाची आठवण न ठेवणाऱ्यांपैकीं सरजेराव दादासाहेब हे नव्हते. सर्वत्रांनीं एकोप्यानें रहावें अशी त्यांची बलवत्तर इच्छा होती व त्या इच्छेस अनुसरूनच त्यांचा नेहमींचा वर्तनक्रम होता. त्यांनीं आपल्या वडिलांनीं दिलेल्या इनाम गांवांसंबंधींच्या अर्जीचा निकाल होण्याकरितां सरकारांत काम चालवून, बासष्ट हजार रुपये नजराणा भरला व इ० स० १८७६ त $\frac{२}{३}$ ज्युडीवर तीनही इनाम गांवची मोकळीक करून घेऊन, तिन्ही गांवच्या सनदा आपल्या नांवें करून घेतल्या. या गांवांच्या उत्पन्नाचा व ज्युडीचा तपशील येणेंप्रमाणें:—

| नं० | नाम मौजा. | जमाबंदी. |
|---|---|---|
| १ | मौजें मांजरी | ९४९२–१०–५ |
| २ | मौजें अंकली | ५७२७—३–९ |
| ३ | मौजें नेज | २९७०—३–० |
| ४ | मांजरी सेरी | १०३३८—७–९ |
| ५ | अंकली सेरी | १०४१––६–० |
| ६ | अंकली-मांजरी दरम्यान नदींतील तरीमराग | ५००—०–० |
| ७ | पडवीकडील | ३००—०–० |
| | | ३०३६९–१४–११ |

| नं० | वजा जुडीबद्दल. | बाकी निव्वळ बचत. |
|---|---|---|
| १ | ३२२४—४–५ | ६२६८–६–० |
| २ | १९४२—३–० | ३७८५–०–९ |
| ३ | १९८०—२–० | ९९०–१–० |
| ४ | ३००८—३–३ | ७३३०–४–६ |
| ५ | ६७१–१२–३ | ३६९–९–९ |
| ६ | ० | ५००–०–० |
| ७ | ० | ३००–०–० |
| | १०८२६–४–११ | १९५४३–०–१० |

याप्रमाणें उत्पन्न चालू आहे.

श्री० सरजेराव दादासाहेब शितोळे हे दत्तक असल्यामुळें, ठराव नं० ४०२८ ता० २८–८–१८७८ इसवीच्या आधारें त्यांचें नांव सरदारपटांत नमूद होऊन त्यांस पूर्ण अधिकार मिळाला. पोलिटिकल एजंट साहेब बहादुर यांजकडील हुकूम जा० नं० २९५ ता० २–१२–१८७८ रोजीं होऊन त्यांचें नांव सेकंड क्लास सरदारांत कायम जाहलें. व शितोळे घराण्यास ज्याप्रमाणें पेशव्यांच्या दरबारीं साडेतीन पोषाख मिळण्याची वहिवाट होती, ती वहिवाट चालू ठेवून श्री० सरजेराव दादासाहेब यांस ता० २४–५–१८७९ रोजीं मलिकामाआझमा व्हिक्टोरिया महाराणीसाहेब एम्प्रेस ऑफ इंडिया यांच्या वाढदिवसानिमित्त पुणें मुक्कामीं दरबार झाला;त्यावेळीं सरकारतर्फें साडेतीन पोषाख देण्यांत आले.

श्रीज्ञानेश्वर महाराजांची पालखी पंढरपुरीस घेऊन जाण्याचा वडिलांचा संप्रदाय श्री० सरजेराव दादासाहेब यांनींही अव्याहत कायम ठेविला. व श्रीस पुत्रप्राप्तीस्तव नवस करण्यांत आला. त्यावेळीं श्रीच्या कृपेंकरून त्यांस पुत्ररत्न झालें. मनेप्सित कामना पूर्ण होतांच, त्यांनीं पंढरपुरीं श्री नामदेव महाराजांचे मंदिरीं इ० स० १८९१ पासून चौघडा चालू केला व त्याच्या खर्चाबद्दल सालीना ३०० रुपयांची नेमणूक करून दिली. ती अद्याप चालत आहे.

श्री० सरजेराव दादासाहेब शितोळे यांच्यासारखा शिपाईबाण्याचा कडवा पुरुष त्याकालीं तरी विरळाच ! त्यांस अश्वपरीक्षेचें उत्तम ज्ञान असून, वनौषधींचीही उत्कृष्ट माहिती होती. त्यांनीं अनेक धर्मकृत्यें करून सर्वांभूतीं दया ठेविली व मोठा लौकिक संपादन केला. ते श्रद्धावान् भक्त असल्यामुळें, त्यांच्या हातून दैविक कृत्येंही होत असत, अशी त्यांची ख्याति होती. ते उत्तम घोडेस्वार होते. त्यांचें शरीर पोलादी असून सशक्त होतें. त्यांजला पंचवीस वर्षेंपर्यंत मुळींच लिहितां वाचतां येत नव्हतें. परंतु पुढें ते साधारण मराठी लिहितांवाचतां येण्यापुरतें शिकले होते. त्यांचा स्वभाव फार दयाळु असून, ते आपल्या प्रजेवर पुत्रवत् प्रेम करीत. त्यांचे वडील आप्पाजीराव शितोळे यांच्या मृत्यूनंतर सरकारनें इ०स० १८६५मध्यें त्यांची जहागीर जप्त केली होती. परंतु श्री० सर्जेराव दादासाहेब यांनीं सतत ११ वर्षें इंग्रज सरकारांशीं दाद लावून जहागीर खुली करविली. हा त्यांचा पराक्रम पाहून सर्व आश्चर्यचकित झाले. व त्यांच्या चिकाटीचें अभिमानपुरस्सर कौतुक करूं लागले. त्यांस एकंदर सहा अपत्यें झालीं; त्यांत एक पुत्र व पांच कन्या होत्या.

ता० २१-१२-१८७१ रोजीं श्री० सरजेराव दादासाहेब यांस औरस संतति झाल्यामुळें त्यांच्या सर्व प्रजाजनांस संतोष झाला. पुत्राचें नांव 'आप्पाजीराव' शितोळे असें ठेवण्यांत आलें. हा पुत्र फार भाग्यशाली व अद्वितीय असा झाला. त्याच्या नंतरच्या कन्या होशा अक्कासाहेब ह्या श्रीमंत जयसिंगराव आप्पासाहेब घोरपडे चिफ-आफ-कापसी यांस दिल्या होत्या. त्यांस दोन अपत्यें आहेत. घोरपडे व शितोळे यांचा हा संबंध पूर्वीच्या त्यांच्या ऋणानुबंधाप्रमाणेंच घडून आलेला होता.

---

## आप्पासाहेब शितोळे.

श्री० आपासाहेब शितोळे यांची बुद्धि तीव्र होती. त्यामुळेंच त्यांनीं श्रीयुत बळवंतराव मास्तर कोटरखागी ह्या गुरूंजवळ मराठी अभ्यास सुरू करून, त्यांत फार तत्परता दाखविली. त्यांचें विशाल भाल पाहून अनेक ज्योतिषांनीं ते आपल्या कुळाचा ऊर्जितकाळ आणितील म्हणून भविष्यें केलीं होतीं. आणि त्या भविष्याप्रमाणें लवकरच योग जुळून आला.

श्रीमंत कै० जयाजीराव शिंदे महाराज सरकार अलिजाबहाद्दुर ग्वाल्हेर यांची कन्या श्रीमती सौ० मनुराजासाहेब ह्या उपवर झाल्यावर त्यांस योग्य व अनुरूप असा वर शोधण्यासाठीं संस्थानांतून अनेक मंडळी दक्षिणप्रांतीं पाठविण्यांत आली होती. त्यावेळीं, विधिसूत्राप्रमाणें श्री० आपासाहेब शितोळे व श्रीमती मनुराजासाहेब यांचा योग जुळून येऊन ता० १-५-१८९० रोजीं, श्री० आपाजीराव शितोळे व राजकन्या श्रीमती मनुराजासाहेब यांचें लग्न झालें. ह्या विवाहनिमित्त पांच लक्ष रुपये खर्च झाला.

ह्या विवाहप्रसंगामुळें श्री० आपाजीराव शितोळे यांच्या स्थितींत पुष्कळच फरक घडून आला. त्यांच्या वैभवाची, इभ्रतीची वगैरे भरभराट झाली. यानंतर त्यांचें राहण्याचें ठाणें ग्वाल्हेर मुक्कामीं झालें. त्यांस त्या ठिकाणीं सरकार मार्फत महाल बांधून देण्यांत आला. शिवाय त्यांच्या खर्चाकरितां श्रीमती सौ० मनुराजासाहेब यांच्या नांवें सालीना एक लाख रुपयांची ( चांदवड ) नेमणूक करून देण्यांत आली. ह्या नेमणुकीबद्दल कौंसिल ऑफ रिजन्सी संस्थान ग्वाल्हेर नं० १४ व अगाहीपत्र नं० ५ संवत् १९४७ इ० स० १८९० मध्यें देण्यांत आलें. शिवाय श्री० आपाजीराव शितोळे यांस लग्नसमारंभांत वैभवयुक्त, इनमाम मिळाला. त्याची यादी याखालीं दिली आहे.

१ शिंदे सरकारच्या डावे बाजूस दरबारांतील बैठक गादियावर व अवल नंबरची खर्डी नाजीम.
२ हत्ती-अंबारीच्या सरंजामासह भरगची झूल, हत्तीच्या पायांत जंजिरा चांदीच्या व इतर दागिन्यांसहित.
३ घोडे, चांदी सोन्याच्या सामानासह. खोगीर वगैरे किनखाबी.
४ छत्री हिरवी अतलसी, तांस सोन्याचा कळस व गोवरण्याचें काम.
५ अबदागिरी कलकामताट इलफी व कळस सोन्याचा.
६ जासुदाच्या छड्या चांदीच्या.
७ मशाली कुप्या चांदीच्या.
८ सोटा चांदीचा जाड मुरबी.
९ भोजनास ताट-वाट्या चांदीच्या व सोन्याच्या.
१० पागोट्यास तोडा सोन्याचा.
११ मोरचल सोन्याच्या दांडीचें.
१२ भालदारी छड्या चांदीच्या.
१३ बालम चांदीचे चार.
१४ बाणसे फरारे.
१५ रथ खासा व खर्च किनखापी.
१६ पालखी.
१७ चवरी चांदीच्या दांडीची.
१८ तोडेदार बंदुक, ढाल, तरवार, बास वगैरे.
१९ सांडका २
२० घडी घंटा मोठा.

### लग्नांत सरकारांतून पोशाख मिळाला तो.

१ मंदील, १ दुपटा, १ किनखाप ठाण, २ महेमुद्या, १ कंठी मोत्यांची, १ सिरपेंच जडाऊ, १ ढाल, तरवार, १ बंदुक, १ हत्ती, १ घोडा.

येणेंप्रमाणें श्रीमंत या पदास शोभणाऱ्या अनेक देणग्या मिळाल्या, दागिने, कापड, चांदी सोन्याची व इतर धातूंची भांडीं वगैरे बहुत सामान मिळालें.

ह्या लग्न-समारंभापासून सर्जेराव दादासाहेब यांस अत्यंत आनंद झाला. व त्यांनीं हें कार्य लौकिका-

प्रमाणें उरकून मुलास ग्वाल्हेर मुक्कामी ठेविलें व आपण अंकलीस, सर्व परिवारासह रवाना झाले.

शिंदे व शितोळे ह्या दोन्ही घराण्यांमध्यें हा नवीन संबंध जुळून आपल्यापासून शितोळे यांच्या मानमरातबामध्यें दिवसेंदिवस वृद्धि होऊं लागली.

एजंट रेसिडेंट अगर दुसरे कोणीही पाहुणे वाड्यांत आल्यास शितोळ्यांसही आमंत्रण असतें व त्यांच्या परत भेटी होत असतात. कोणताही दरबार भरलेला असल्यास त्या ठिकाणीं शितोळ्यांचा मानपानही अव्वल नंबरचा राहतो. शिवाय त्यांस सात पोशाख मिळतात. तसेंच श्रीमंत महाराणीसाहेब अगर शिंदे सरकार यांची स्वारी संस्थानांत आल्यास त्यांजवरून प्रत्येकीं पांच रुपये सत्कार शितोळे साहेब व त्यांच्या पत्नी यांनीं करण्याचा सांप्रदाय आहे.

ह्याप्रकारें शितोळे यांस पूर्ण ऐश्वर्याचे दिवस येऊन सर्वत्र आनंदाचें साम्राज्य प्राप्त झालें. त्यांत श्रीमती रमाबाई साहेब ऊर्फ मनुराजा साहेब शितोळे ह्यांस ता० ७–९–१८९१ रोजीं पुत्ररत्न झाल्यानें विशेषच भर पडली. हा दिवस श्रीमंत माधवराव महाराज शिंदे सरकार यांनीं व श्री० सौ० मनुराजा साहेब यांच्या मातोश्री श्रीमती महाराणी लक्ष्मीबाई यांनीं दानधर्म करून मोठ्या आनंदानें साजरा केला. व मुलाचें नांव बाळाराजा शितोळे असें ठेविलें. त्या मुलाच्या लक्षणावरून हा पुढें भाग्यशाली निपजेल असें वाटत होतें; परंतु दैवी विचित्रगतिः

ता० १२–१०–१८९२ च्या विजयादशमीच्या दरबारांत श्रीमंत शिंदे सरकार यांजकडून शितोळे यांस बहुमान मिळाला, त्याचा तपशील.

१ सोन्याचा नाहरमुखी सोटा.

१ भालदाराची छडी सोन्याची.

१ चवरी सोन्याचे दांडीची.

१ इतर्नी.

हा लवाजमा शिंदे सरकारचे शागिर्दपेशा ऑफिसर नानासाहेब कदम यांनीं शितोळे यांच्या संस्थानांत आणून पोहोंचता केला. त्यावेळीं त्यांस कंठी–मोत्यांची किंमत १२०० रुपये व पोशाख, वस्त्रें पांच, पागोटें, दुपटा, किनखाप, मेहमुद्या दोन किंमत १२३॥=। रुपयांची देण्यांत आली व नाहरमुखी सोटा घेऊन येणाऱ्या जमादारास ३६। रुपयांचा पोशाख, भालदाराची छडी घेऊन येणारास ४८ रुपयांचा पोशाख व इतर्नी आणणारांस ३० रुपयांचा पोशाख ह्याप्रमाणें देणगी देऊन संस्थानांतून भूषविलें.

ह्या संसारचक्रामध्यें सुखामागून दुःख व दुःखामागून सुख हीं ठेविलेलींच असतात. ‘ जगीं सर्व सुखी असा कोण आहे ! ’ हें श्रीरामदास स्वामींचें वाक्य सत्य आहे. शितोळे सरकारच्या पूर्णवैभवकालींच त्यांजवर ता०५–१२–१८९३ रोजीं फारच भयंकर व दुःखकारक प्रसंग ओढवला. त्यांचा एकुलता एक पुत्र काळानें हिरावून नेला ! श्रीमती मनुराजाबाईसाहेब, शिंदेसरकार, व शितोळे यांस हें दुःख अनिवार्य झालेंच; परंतु ग्वाल्हेर स्टेटच्या प्रजाजनांसही ह्या प्रसंगाबद्दल अत्यंत दुःख झालें.

सर्वत्रांनीं ह्या प्रसंगीं दुखवट्याचीं पत्रें पाठवून शितोळे यांचें दुःख कमी करण्याचा प्रयत्न केला. त्यांतील एजंट गव्हर्नरजनरल सेंट्रल इंडिया इंदोर यांजकडून आलेलें दुखवट्याचें पत्र खालीं देत आहों; त्यावरून श्री० शितोळे यांच्या प्रिय मुलाच्या मृत्यूमुळें ज्यांनीं ज्यांनीं त्यांचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला, त्यांस शितोळ्यांचें किती अगत्य होतें व त्यांस त्यांच्याबद्दल किती अभिमान वाटत होता, हें दृष्टोत्पत्तीस येईल.

**No. 9020 of 1893.**

*From*

Colonel E. S. Reynolds

Resident at Gwallier,

*To,*

The Residency Vakil

Gwallier,

Dated Gwallier Residency

the 28th December 1893.

Sir,

In continuation of my letter dated the 6th December 1893 I beg that Appajee Rao Shitolay Aukliker may be informed that the agent to the Governor General has heard with regret the news of the death of his Son.

I have the honour to be

Sir

Your most obedient servant.

Sd. E. S. Reynolds Colonel

Resident of Gwalier,

ह्या पत्राचा आशय असा आहे कीं,—

श्री० आपाजीराव शितोळे यांस कळवें कीं, गव्हर्नर जनरलचे एजंट या नात्यानें त्यांच्या मुलाची निधनवार्ता ऐकून आम्हांस अति दुःख होत आहे.

असें त्यावेळचे इ० एस० रेनॉल्स कॉलोनल रेसिडेंट ग्वाल्हेर हे लिहितात. अशा प्रकारचीं पुष्कळ दुखवट्याचीं पत्रें आलेलीं असून, शिवाय निरनिराळ्या वर्तमानपत्रांत दुःखप्रदर्शक लेख प्रसिद्ध झालेले होते.

सृष्टीचा नियमच असा आहे कीं, दुःखाचा वेग कालांतरानें शमन होऊन मनुष्य आपल्या कार्य–कर्तृत्वाकडे लक्ष घालूं लागतांच त्यास दुःखाची विस्मृति होत असते. त्याप्रमाणें एक वर्षानंतर श्री० आपाजीराव शितोळे यांनीं श्री० शिंदे सरकारची परवानगी घेऊन आपल्या कुळस्वामीच्या व वडिलांच्या दर्शनास सहकुटुंब अंकलीस जाण्याचा निश्चय केला. व इ० स० १८९४ मध्यें ते अंकलीस जाण्यास निघाले. जाण्यापूर्वीं मुहूर्त वगैरे पाहिला होता. आपल्या पूर्ण वैभवासह श्री० शितोळे व श्रीमती रमाबाईसाहेब शितोळे हीं अंकलीस पोहोंचलीं. तेथून उभयतां श्रीमती सौ० रमाबाईसाहेब यांच्या आजोळीं म्हणजे सावंतवाडीचे राजेबहाद्दर सरदेसाई यांच्या मातोश्री सावित्री आईसाहेब भोंसले सरदेसाई यांच्या भेटीस सावंतवाडीस गेलीं. त्या ठिकाणीं व अंकली येथें श्री० आपाजीराव शितोळे यांनीं आपल्या वैभवानुरूप दानधर्म वगैरे केला. ह्या पर्यटणांत त्यांस पन्नास हजारांवर खर्च आला, शिवाय आपल्या पुत्राच्या व स्नुषेच्या वैभवास साजेसा खर्च श्री० सर्जेराव दादासाहेब यांनीं संस्थानांतून केला तो वेगळाच, त्यांनीं स्वारीबरोबरच्या सर्वत्र लोकांस पागोटीं, दुपेटे, नगदी वगैरे इनामें देऊन संतोषित केलें.

श्री० आपासाहेब शितोळे हे आपल्या पत्नीसह ग्वाल्हेर मुक्कामीं येण्याकरितां मुंबई बंदरास येण्यास निघाले, त्यावेळीं अनेक सावकार, महाजन व विद्वान् लोकांनीं त्यांस नजर नजराणे, पानसुपाऱ्या मानपत्रें वगैरे दिलीं, त्यांपैकीं फक्त एकाच मानपत्राचा मसुदा नमुन्याकरितां याखालीं देत आहों.

## श्री अर्पणपत्रिका.

स्वस्ति श्रीमद्ग्वालवपत्तनाधिष्टितसकलस्वाश्रितगोविप्रदीनप्रतिपालकजयश्रीपरिशोभितश्रीजयासिंहपदाधिष्ठित-श्रीमाधवसिंहपरिषदाधिष्टितान् सितोलेइत्यतिप्रथितकुलाब्धिचंद्रान्स्वशौर्यौदार्यादिगुणैर्ग्लहीकृतराजकन्यकान् - स्वकुलश्रिया सपत्नीकृतमनुराजद्वितीयान् राजश्रिया विराजित सितोलेकुलोत्पन्नान् आपासाहेबान् प्रति अखंडैश्वर्याभिवृद्धिपूर्विका आशिषः समुल्लसंतु

## श्रीमंत रा० आपासाहेब शितोळे.

श्रीगीर्भ्यां सेवितो नित्यं<br>मंगलाचरणे रतः<br>तथा कलासु निपुणो<br>रा०जते राजपूजितः ॥ १ ॥

आ ददाति गुणं लोकात्<br>पाति पृथ्वीं प्रजावर्ताम्<br>साधयत्यखिलानर्थान्<br>हेयास्त्यजति दूरतः ॥ २ ॥

बलं दर्शयते शत्रौ<br>सितां कीर्तिं तनोत्यसौ<br>तोषयत्यखिलं विश्वम्<br>लेखान् पितॄंस्तथा बुधान् ॥ ३ ॥

## श्रीमंत अखंड सौ० मनुराजा.

मता सर्वासु साध्वीषु<br>नुता गुणि गणे र पि ।<br>राकेव दर्शनसुखा<br>जाता कुलविभूषणा ॥ ४ ॥

मनुराजा इति ख्यातिरतः सार्थकतां गता ।<br>स्वस्त्यस्तु, दीर्घ मायुरस्तु, शुभं भवतु ॥

श्रीमन्महाराज शिंदे कुलोत्पन्न अलिजाहदर राजाधिराज जयाजीरावो मालववाख्यदेशे ग्वाल्हेरीनाम नगर्यामासीत । तस्य तनुजा औदार्यादि प्रथित गुणवती । माणिक्यादि सकल सौभाग्याद्यलंकृत मनुराजानाम्नी शितोळे कुलोत्पन्नेन श्रीमदापा साहेबाख्येन अंकली तथा मांजरी इत्यादि देशमुख्येन स्वभर्त्रा सह सांप्रतं मुंबापुर्यामागता तत्स्वागतानंदेन अत्यादरेण रोगपरीक्षानामा यग्रंथ समर्पितो मया तैः सनाथीकृतश्चिरं विलसत्वित्याशासे—

गणेश हरी शेवडे वैद्य सावंतवाडीकर.<br>भारतसंजीवनी औषधालयाचे मालक.

या प्रकारचे अनेक लोकांचे अत्यादरपूर्वक सन्मान घेत आप्पासाहेब शितोळे ग्वाल्हेर मुक्कामीं येण्यास निघाले, वाटेंत त्यांचे सामानसुमानाचें बरेंच नुकसान झालें. परंतु श्रीच्या कृपेंकरून उभयतां ग्वाल्हेरीस सुरक्षित येऊन पोहोंचलीं.

या स्वारींत श्रीमती सौभाग्यवती मनुराजा साहेब शितोळे यांस सावंतवाडी संस्थानांतून बरीच देणगी मिळाली असून कांहीं वर्षासन देण्याचा ठराव झाला.

शिंदे सरकारांशीं संबंध झाल्यानंतर मध्यंतरी सर्जेराव दादासाहेब शितोळे अंकलीकर एकवेळ पुनः ग्वाल्हेर मुक्कामीं आले होते. त्यानंतर मात्र आले नाहींत. दिवसेंदिवस वृद्धापकाळ होत जाऊन त्यांची प्रकृति अगदीं क्षीण झाली होती. त्यांजला ज्वर येत राहून, त्यांनीं अंकलीसच इसवी सन १८९५ चे ता. १९ माहे फेब्रुवारी रोजीं मृत्युलोकची यात्रा संपाविली.

सर्जेराव दादासाहेबांचे मृत्यूची वार्ता ऐकून त्यांच्या आप्तजनांस अत्यंत वाईट वाटलें. सकल प्रजाजन आमचा अन्नदाता मायाळु मालक गेला म्हणून अत्यंत हळहळूं लागले. ही वार्ता आपाजीराव शितोळे यांस समजतांच त्यांस फारच दुःख झालें. आज आपल्या शिरावरचें छत्र गेलें म्हणून त्यांनीं फारच खेद केला व ते त्यांचें उत्तरकार्य करण्याकरितां अंकलीस रवाना झाले.

कर्नाटक प्रांतांत सर्जेराव दादासाहेबांसारखा धैर्यवान् गृहस्थ त्यावेळीं कोणीच उरला नव्हता. दक्षिणेंतील बहुतेक वर्तमानपत्रकारांनीं त्यांच्या मृत्यूसंबंधानें लेख लिहून आपलें दुःख प्रदर्शित केलें; व फारच कळकळ दाखविली. त्यापैकीं बडोदें वत्सल नांवाच्या प्रसिद्ध पत्राचे अंक २१ वर्ष १० ता. ३ माहे मार्च सन १८९५ इसवींत ह्यांचेसंबंधी लिहिलेल्या उद्गारांचा उतारा येथें देतों.

" आम्हांस लिहिण्यास अतिशय वाईट वाटतें कीं, कर्नाटक प्रांतांतील सेंकंडक्लास सरदार श्रीमंत सर्जेराव दादासाहेब शितोळे अंकलीकर यांस गेल्या मंगळवारीं ज्वराचे विकृतीनें देवआज्ञा जाहली, औषधोपचार करण्यांत आले. पण परमेश्वर सत्तेस इलाज नाहीं. सर्जेराव यांचें मूळचें उत्पन्न कमी असलें, तथापि मोठ्या घराण्यांत ते दत्तक झाल्यानें बरेंच उत्पन्न त्यांना मिळालें व इनाम कमेटींत त्यांच्याकडेसच तें उत्पन्न चालविण्याचा ठराव झाला, हे जात्या थोर मनाचे असून त्यांचें औदार्य चांगलें असें, तसेच हुषार धैर्यवान् आणि मुत्सद्दी असत. वनौषधींची यांना उत्तम माहिती असे. अश्वपरीक्षा ते फार चांगली जाणत असत. याप्रमाणें यांच्या अंगीं बरेच गुण विराजित होते. यांना एक पुत्र व एक कन्या अशीं दोन आपत्यें आहेत. परमेश्वर सर्जेरावांचे आत्म्यास अक्षय चिरशांति देवो हें त्यापाशीं सविनय मागणें आहे. "

सर्जेरावांच्या मरणानें ह्याप्रकारें अनेक लोकांनीं दुःखाचे उद्गार काढून त्यांच्या गुणांचें त्यांच्या औदार्याचें निःपक्षपातानें वर्णन केलें. त्याचप्रमाणें आपल्या वडिलांचा कित्ता आपाजीराव शितोळे यांनीं गिरवून प्रजावात्सल्य व मायाळुपणा कायम ठेविला. अशा कार्यांत प्रथम दिवशीं व **मातम पुरशीं** (पाचारण) संबंधानें दहा दिवसांचें आंत शिंदे सरकार व महाराणीसाहेब यांस यावें लागत असून दुखवटा येणेचा रिवाज आहे.

सर्जेराव दादासाहेब कैलासवासी झाल्यापासून आपाजीराव बाबासाहेब शितोळे यांच्या मनास फारच धक्का बसला पण ईश्वरइच्छेस उपाय काय! सद्यस्थितींत आपाजीरावाचे अंगीं मोठा गूण म्हटला म्हणजे 'अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ' हा होय. यांचें धर्मकृत्याकडे विशेष लक्ष असून, ते स्वामिकार्यदक्ष आहेत. ग्वाल्हेर संस्थानासंबंधी त्यांस विशेष अभिमान असून ते सरकारचे फारच हितेच्छु असल्यानें, महाराज सरकार माधवराव महाराज सिंदे यांनीं त्यांस इसवी सन १८९६ सं० १९५३ सालीं ता. २८ माहे जानेवारी रोजीं, आपल्या प्रायव्हेट सेक्रेटरीचें मोठें हुद्याचें काम दिलें. हें काम त्यांनीं अत्यंत मेहनतीनें व मोठ्या इमानें इतबारें सरकारच्या मर्जीप्रमाणें चालविलें. आपल्या वडीलांच्या पश्चात् दक्षिण प्रांतीं इंग्रज सरकारच्या दरबारांत पूर्वीप्रमाणेंच आपलाहि मानपान कायम रहावा, याबद्दल आपाजीराव ऊर्फ बाबासाहेब यांनीं खटपट चालविली. त्यांच्या अंगीं असलेल्या अलौकिक गुणांच्या योगें त्या खटपटीस यशहि आलें. हें त्यांचें मुख्य शील होय.

आपाजीराव शितोळे यांचें नांव सर्जेराव दादांचे ठिकाणीं दक्षिणप्रांतीं सेकंडक्लास सरदारांत सरदार लोकांच्या यादींत दाखल केल्याबद्दलचा मुंबई गव्हर्मेंटचा ठराव ग्वाल्हेर रेसिडेन्सितून पत्र नंबर १६४५

ता. २०।३।९७ चा चिफ सेक्रेटरी मॉ। हुजूर दरबार महाराज शिंदे सरकार येथें आला. तो चीफ सेक्रेटरींतून वमुनवा पत्र नंबर १९४९ इंग्रजी ऑफिस ता. १२।४।९७ दसकती ले. क. मायलोक फिक्लेनसाहेब बहादूर चीफ सेक्रेटरी सादर जाहला. त्या ठरावाची नकल इंग्रजी येथें सादर करितों.

DECCAN SARDARS.

Enrolment of the name of Appajeerao Shetoly in the List of 2nd class for rank and precedence only.

No. 1264.

Political Deptt.

Bombay Castle 19th February 1897.

Letter from the Political Agent Kolhapur and Southern Maratha Country No. 860 Dated 30th July 1896. submitting Under the circumstances mentioned an application from Appajeerao Shetoly who requests that his name may be substituted for the name of his deceased father in the List of 2nd class sardars of the Deccan.

Memorandum from the agent for sardars in the Deccan No. 55 Date 17th August 1896 Reporting that the name of the applicants Grand-father Appajeerao Mahadjeerao Alias Baba Saheb Shetoly was originally entered in the List of second class sadars in black ink on the 4th January 1827. when the lists were prepared by Government that the name of applicants father Snrjerao Appajeerao Shetoly was entered in the List of Sadars of the Second Class for rank and precedence only, under Government Resolution No. 4028 Dated 28th August 1878 and there is nothing on the records of that office to show whether the original honor was conferred for personal or special reason.

Letter From Do. Do. No. 73 Dated 23-10-96 further-letter from ,, ,, No. 7 Dated 26-1-97 Resolution the name of Appajeerao Shetoly should be entered in the List of Second class Sardars of the Deccan for rank and precedence, only in succession, to his deceased father Sarjerao Appajeerao Shetoly. He should be presented with the usual Poshak on his first attendance at the Agents Durbar,

S. W. Redgerley

Acting Secretary to Government.

From the acting Secretary to the Government Bombay Agent to the Governor General in central India Indore. No. 1265 Dated 19-2-97.

I am directed to enclose here in for your information a copy of a Resolution of Government in this Department No 1264 of to-days date conferring the dignity of a second class sardar of the Deccan for rank and precedence only on Mr. Appajeerao Shetoly of Gwaliar who is reported by the Resident there to be a first class sardar of the Gwaliar Darbar and the Brother-in-law of His Highness the Maharaja Scindia.

I have &c.

(Sd) S. W. Redgerley

Acting Secretary to Government.

Bombay.

No. 2567

Central India Agency Office.

Copy with copy of enclosar forwarded to the Resident at Gwalior for information and favour of Communication to the Gwalior Darbar.

(Sd.) L. S. Newmarch

1st Assistant to the Agent to the Governor General for C. I. 11-3-97.

No. 1645 of 1897.

Copy with copy of enclosure forwarded to the Chief Secretary to H. H. the Maharaja Scindia with reference to correspondence ending with his No. 89.

Date 9-1-97 (Sd.) I Mac Ivor Major

Resident at Gwalior

20-3-97

True copy

L. G. Gandhay

Asssistant Secretary

Huzur Darbar Gwalior

## दक्षिणेंतील सरदार.

### दुसऱ्या नंबरच्या सरदारांच्या पटांत पदवी आणि अधिकारांसह नांव दाखल करण्याबद्दल.

नंबर. १२६४.

### पोलिटिकल खातें.

मुंबई फोर्ट १९ फेब्रुवारी १८९७

पोलिटिकल एजंट ( कोल्हापूर आणि दक्षिणदेश ) यांजकडून, आपाजीराव शितोळे यांनीं आपल्या स्वर्गवासी पित्याच्या नावांऐवजीं दुसऱ्या नंबरच्या सरदारांच्या दक्षिणेंतील पटांत आपलें नांव दाखल व्हावें, अशाबद्दल केलेला अर्ज एजंटसाहेबांच्या तारीख ३० जुलै १८९६ च्या ८६० नंबरच्या पत्राबरोबर सादर करण्यांत आला.

दक्षिणेंतील सरदारांच्या ता० ७ आगष्ट १८९६च्या ५५ नंबरच्या खालित्यावरून कळून येतें कीं, जेव्हां इंग्रज सरकारनें सन १८२७ च्या ४ जानेवारीला नांवनिशी तयार केली; त्यावेळीं अर्जदाराचा आजा अपाजीराव माधवराव ऊर्फ बाबासाहेब शितोळे यांचे नांव दुसऱ्या नंबरच्या सरदारांच्या नांवनिशींत काळे शाईनें दाखल केलें आहे. आणि अर्जदाराचा बाप सर्जेराव आपाजीराव शितोळे यांचें नांव दुसऱ्या वर्गाचे दक्षिणेंतील सरदारांचे नांवनिशींत पदवी आणि अधिकारासह सरकारचा ठराव १४०२८ ता० २८ आगष्ट १८७८ नें दाखल केलें आहे. आणि हा मान व्यक्तीकरितां अगर कोणत्या कारणानें दिलेला आहे, असें दाखविणारें त्या वेळच्या ऑफिसच्या रेकॉर्डांत कांहीं नाहीं.

दक्षिणेंतील सरदारांचे एजंट यांजकडून खलिता नंबर ७३.

२३–१०–९६

आणखी दक्षिणेंतील सरदारांचें एजंट यांजकडून खलिता नंबर ७.

२६–१–९७

आपाजीराव शितोळे यांचें नांव त्यांचा स्वर्गवासी बाप सर्जेराव आपाजीराव शितोळे यांच्या नांवाऐवजीं दक्षिणेंतील दुसऱ्या वर्गाचे सरदारांचे नांवनिशीचे पटांत दाखल करण्याविषयीं ठराव झाला आहे व त्यांना एजंट साहेबांच्या दरबारीं पहिल्या भेटीस नेहमींचा पोषाख बक्षीस मिळावा.

**एस. डब्ल्यू. रेडगरली,**
सरकारचे ॲक्टिंग सेक्रेटरी.

मुंबई सरकारच्या ॲक्टिंग सेक्रेटरीकडून मध्य-हिंदुस्थानांतील गव्हनर जनरलचे एजंट इंदूर यांस.—नंबर १२६५, ता. १९–२–९७ तुम्हांस कळविण्याकरितां, आपाजीराव शितोळे, जे ग्वाल्हेरचे रेसिडेंट साहेबांचे रिपोर्टावरून ग्वाल्हेर–दरबारामध्यें पहिल्या प्रतीचे सरदार आहेत व महाराज शिंदेसरकार साहेब यांचे मेहुणे आहेत असें कळतें, त्यांस पदवी आणि अधिकारासह दक्षिणेंतील दुसऱ्या नंबरचा मान देण्यांत येत आहे अशी आज तारखेच्या ह्या खात्याच्या १२६४ नंबरच्या सरकारचे ठरावाची नक्कल सोबत पाठवीत आहें.

आपला,
**एस० डब्ल्यू० रेडगरली,**
सरकारचे ॲक्टिंग सेक्रेटरी, मुंबई.

नंबर २५६७.

### मध्यहिंदुस्थान एजन्सी ऑफिस.

ग्वाल्हेर दरबारास ही बातमी कळविण्याकरितां व ग्वाल्हेरच्या रेसिडेंट साहेबांस कळविण्याकरितां त्यांच्या नकलेसहीत पुढें पाठविणें.

**एल० एस० न्यूमार्क.**
फर्स्ट असिस्टंट टू धी एजंट टू धी गव्हरनर जनरल.

नंबर १६४५/१८९७.

महाराज शिंदे सरकार साहेब यांचे मुख्य सेक्रेटरी यांजकडे नकलेच्या नकला सोबत पाठवून या हकीकतीसंबंधीं कळविणें व अखेर निकाल नं० ८९ प्रमाणें होणें. ता० ९।१।९७.

**आय० एम० आयव्हर मेजर.**
रेसिडेंट ग्वाल्हेर.

खरी नक्कल.
पळशी, गांधी,
असिस्टंट सेक्रेटरी,
हुजुर दरबार,
ग्वाल्हेर.

याप्रमाणें उभयसरकारांत व आपाजीराव शितोळे यांनीं आपल्या गांवीं आपला मान उत्तम प्रकारचा

राखून मोठा लौकिक व कर्तबगारी संपादन केली. श्रीमंत महाराजे शिंदे सरकार यांनीं आपाजीरावांची मुत्सद्दी व हुषारी पाहून त्यांस राज्याचे प्रत्येक डिपार्टमेंटमध्यें सन्मानाची जागा दिली.

इसवी सन १८९८ सं० १९५५ चे सालीं महाराजांनीं सर्व कमेटी स्थापन केली, तींत आपाजीराव शितोळे यांस प्रेसिडेंट करून त्यांचेच विचारें काम चालविण्याचा अधिकार रामकृष्ण जठार मेंबर्स व कमेटी यांस दिला. आपाजीराव सितोळे यांजला कोणतींहि कामें सरकारांनीं सांगितली तरी तीं ते निरपेक्ष बुद्धीनें म्हणजे पगार घेऊन करीत नसल्यानें सरकारची मर्जी त्यांजवर बहुत प्रसंगीं राहून कोणतेंहि काम त्यांचे सल्ल्यावाचून बहुधा होत नाहीं असा प्रघात आहे. तसें हे त्यासंबंधानें देण्याघेण्याचा प्रसंग आल्यास व्यवहार चतुर आहेत. ही आपाजीराव शितोळे यांची निस्पृहता पाहून श्रीमंत शिंदे सरकार यांनीं त्यांस ता० २० माहे जून सन १८९८ इसवी सं० १९५५ चे सालीं, ( प्रा० सें० पत्र नंबर ९ ) रुपये दोन लाख देऊन त्यांचें सर्व कर्ज फेडिलें. ता० २२ आगष्ट सन १८९८ इसवी सं० १९५५ चे सालीं म्युनिसिपालिटीसारख्या सार्वजनिक कामीं आपाजीराव यांस मुकर केलें. अशा सार्वजनिक कामांत आपाजीराव शितोळे यांचे विशेष लक्ष असल्यानें अनेक सभेच्या लोकांनीं त्यांचा आश्रय घेतला, म्हणजे कन्याधर्मवर्धिनी सभेचे त्यांस प्रेसिडेंट नेमिलें. लष्कर टेंम्परन्स असोसिएशन सभा कीं, जिची शाखा विलायतेस असून उपकारी मासिकपत्र निघतें त्या सभेनें आपाजीराव यांस बहुत सन्मानपूर्वक आपल्या पेट्रनचा मान दिला. दक्षिण प्रांतींहि श्री. आपाजीराव शितोळे हे अनेक उपयुक्त संस्थांचे लाईफ मेम्बर आहेत. म्हणजे बडोदा ग्रंथसंपादक मंडळीचे लाईफ मेंबर आहेत. बेळगांव सरदार स्कूलचे मेंबर आहेत. मराठा एज्यूकेशन सोसायटीचे कोल्हापूरास मेंबर आहेत. याप्रमाणें बहुतेक संस्थांस यांजकडून आज पावेतों हातभार लागत असतो.

चीफ सेक्रेटरी मायकल साहेब यांजकडून नंबर ६५ ता. १३ जुलई सन १८९८ इसवी सं० १९५५ रोजीं श्रीमंत शिंदे महाराजांचे हुजूरनें खेरीज मुशाहिरेचा चार्ज गणपतराव साहेब माहूरकर यांजकडून निघून आपाजीराव शितोळे यांजकडे आला. हेंही काम त्यांनीं दक्षतेनें केलें. सं० १९५६ सन १८९९ इसवी सालीं जिकडे तिकडे दुष्काळ पडला. त्यावेळीं आपाजीराव शितोळे यांनीं आपल्या संस्थानांतून अनेक दानधर्म करून हजारों गोरगरिबांचे प्राण वांचविले. त्यांचे दानधर्माची ख्याति आज मान्या लष्करांत उत्तम प्रकारची गाजत आहे. जेथें धर्म तेथेंच जय. त्यांचे होणारे उत्कर्षावरून सहज धर्माचरणांनीं वागणाऱ्या वाचकांच्या लक्षांत आपासाहेबांचा उदय कां होत आहे हें नजरेस येणारें आहे.

आपाजीराव शितोळे यांस घोड्यावर बसून निशाण मारण्याचा, बंदुक चालविण्याचा, कसरत करण्याचा इत्यादि शिपाई बाण्यास साजणाऱ्या गुणांची बहुत आवड असल्यानें त्यांनीं कित्येक वेळां या कामांत श्रीमंत शिंदे सरकारकडून शर्यतींत इनाम घेतलेलें आहे. या व अशाच प्रकारच्या त्यांच्या अचाट शौर्यावर लुब्ध होऊन श्रीमंतांनीं सन १९०० चे ता. १४-९-०० सालीं कीं ज्यावेळीं चीनच्या लढाईच्या वेळीं जखमी शिपायांच्या इलाजाकरितां शिंदे सरकारांनीं नवीन बॅटलशिप हॉस्पिटल, वीस लाख रुपये खर्च करून तयार करविलें आणि आपण चीनला कलकत्ता बंदरावरून रवाना झाले, त्यावेळीं त्यांनीं आपासाहेब शितोळे यांस बरोबर नेलें होतें. तेथून ता० २४ माहे डिसेंबर सन १९०० इसवी रोजीं सकाळीं नऊ वाजतां, स्पेशल गाडीनें श्रीमंत शिंदे सरकार आणि आपासाहेब शितोळे हे विजयी होऊन आले, त्यावेळची उभयतांची शोभा सकल नागरिक जनांस नरनारायणाप्रमाणें भासूं लागली. म्हणूनच चहूंकडून उभयतांचे अंगावर पुष्पवृष्टि होत असून ग्वाल्हेर नगरास अमरावती प्रमाणें शृंगारल्यांत आलें होतें. कित्येक विद्वान् कविजनांनीं उभयतांचे गुणानुवाद गायन करून काव्यहारानें महाराजांस संतोषित केलें होतें, ग्वाल्हेर गॅझेट नंबर १ वर्ष ५० ता० ६ जानेवारी सन १९०१ रोजीं छापलेल्या कवितेचा उतारा येथें रसिकांचें रंजन होण्यासाठीं ग्रथित करितों.

### आर्यारूप-पुष्पमाला.

सिन्देवंश–समुद्रीं अवतरला माधव स्वरूपानें ॥
शूर यशस्वी धी मान् दिग्मंडल गाजवी प्रतापानें ॥ १ ॥
जो सार्वभौम राजा त्याचा प्रिय जो जगांत सन्मान्य ॥

कीर्ति जयाची ऐकुनी देवहि म्हणती दुजा नसे अन्य २
राज्य-कीर्ति-धुरंधर अन्यद्वीपांत चीन देशांत ॥
जाऊनि यश-धन मिळवी शत्रूसी टाकिलें किं पाशांत ३
ऐसा सुरुती दाता होवो दीर्घायु पुत्रप्राप्तिफल ॥
आशीर्वाद जनाचा लागो सत्वर रिपूशी हो काल ॥ ४॥
वाग्मी सत्यप्रतिज्ञ दीनाला अर्थ देतसे नित्य ॥
त्याची सेवा करितां प्राप्ति फलाची असे जगीं सत्य॥५॥
माधव माधव लोकीं गाती बलभद्र कींच बलवंत ॥
विद्यागुणनिधिदाता दीनासि नित्य हो रूपावंत ॥ ६ ॥
रामचंद्र आणि आपाजी सितोळे प्राणधन सहायानें ॥
चालति आज्ञा धरूनी मानानें मान्य कीं महा यानें ॥७॥
सेवक पूर्वापरचा अन्नार्थी दास नित्य पायांचा ॥
पटवरधन कुलनाना भजतो तारा रुपा करा वाचा ॥८॥

श्री. आपासाहेब शितोळे चीनहून, श्रीमंत शिंदे सरकार यांजबरोबर परत आल्यावर त्यांजला सरकारांतून व इतर सरदारांकडून मेजवान्या होऊन अनेक बहुमानाच्या देणग्या मिळाल्या. आज पावेतों लग्न झाल्यादिवसापासून सरदारी खर्चा करितां मिळणारी एक लाखाची रक्कम श्रीमती सौभाग्यवती मनुराजासाहेब यांच्या नांवानें चालत होती. ती महाराजांनीं ता. १ सपटंबर १९०१ इसवी सं० १९५८ पासून आपासाहेब शितोळे यांचे नांवांनीं दरमहा रुपये ७२९२ सिा कलदार नेमणूक कायम केली, त्याजबद्दल पत्र सिो माफी नंबर ५७१ ता. ४।१०।५८ चे संस्थानांत प्रसिद्ध होण्याकरितां आलें व त्या दिवसापासून श्रीमती सौभाग्यवती मनुराजासाहेब यांचे ऐवजीं श्री० आपासाहेब शितोळे यांचें नांव दाखल झालें.

इसवी सन १९०१ चे जानेवारी महिन्यांत श्रीमंत सरकारांनीं आपासाहेब शितोळे यांस कौन्सिल ऑफ आदिलचे ज्युडिशिअल महलाम्याचे मेंम्बर मुकरर केलें. हें कामही त्यांनीं उत्तम प्रकारचें करून प्रजेकडून न्यायाच्या कामांत धन्य म्हणवून अनेक लोकांचा दुवा घेतला. त्याचें कारण कोणापासून लांच न घेतां खरा न्याय करावयाचा हें त्यांचें ब्रीद असल्यानें त्यांच्या हातून बहुधा अन्याय घातपात होत नाहीं, या योगेंच महाराजांच्या प्रीतीला उतरून महाराजांनीं त्यांस कित्येक वेळां कसोटीस उतरविलें आहे, त्या त्यावेळीं त्यांस यांजकडून चोख उत्तरें मिळत गेलीं आहेत. यांजकडून कधींच कामाकाजांत गाफिलपणा किंवा सुस्ती घडल्याचें आजपावेतों आढळून आलेलें नाहीं. हीच काम करण्याची उत्तम शैली होय. ती ह्यांस पूर्ण साहाय्य असल्यानें दिवसेंदिवस यांचें पाऊल पुढेंच पडत आहे हीच यांच्या उत्कर्षाची सहायकारी मुख्य मुद्याची गोष्ट होय.

सर्जेराव दादासाहेबांचे पश्चात् श्री० आपाजीराव शितोळे यांचें नांव इंग्रजी दरबारांत लागू झाल्या दिवसापासून, यांजला ज्यावेळीं पुण्यास गव्हरनरसाहेबांचा दरबार होई, त्या त्या वेळीं आमंत्रण पत्रें पुण्याचे सरदारांचे एजंट यांजकडून येण्याची अद्याप वहिवाट असून प्रसंगविशेषीं मुंबईच्या नामदार गव्हरनर साहेबांकडूनही पत्रें येण्याचा सांप्रदाय आहे. दरबारच्या आमंत्रणपत्रिकेचा नमुना मासल्याकरितां खालीं दिला आहे.

मेहरबान आपाजीराव सर्जेराव शितोळे यांस—

दक्षिणेंतलि सरदाराचे एजंट यांजकडून सलाम मलिकामा अज्ञमा कैसरेहिंद यांचे वाढ दिवसानिमित्त उत्साहाचा दरबार ता० ९ माहे नवम्बर सन १९०१ इसवी. शनिवार रोजीं संध्याकाळीं पावणे पांच वाजतां कौन्सिल हालांत एजंटसाहेब भरविणार आहेत, त्यावेळीं दरबारास येणेची मेहेरबानगी करावी. ता० १ नवम्बर १९०१ इसवी मु० पुणें. याप्रमाणें नेहमीं आमंत्रण—चिठ्या येण्याची वहिवाट आहे.

श्रीमती महाराणी विक्टोरिया एम्प्रेस ऑफ इंडिया ह्या ख्रिस्तवासी झाल्यावर त्यांचे चिरंजीव एडवर्ड बादशहा हे गादीवर बसण्याचा समारंभ ता०९ आगष्ट सन १९०२ इसवी रोजीं ठरला होता; त्याकरितां श्रीमंत माधवराव शिंदे सरकार यांस विलायतेस बलावणें आलें. त्यावेळीं त्यांनीं आपल्या समागमें श्री० आपासाहेब शितोळे यांस ता० ९ माहे मे सन १९०२ इसवी सं० १९५८ रोजीं कारोनेशनच्या दरबाराकरितां नेलें होतें; त्यावेळींही त्यांवर महाराजांची मर्जी सुप्रसन्न राहिली. ता० १ सपटेंबर सन १९०२ सं० १९५९ सोमवारीं दिवसा सात वाजतां श्रीमंत महाराज सरकार दरबार झांशीला येऊन सरकारवाड्यांत महाराज समागमें मोठ्या थाटानें हत्तीवरून मिरवत उभयतांची स्वारी गेल्यावर तेथेंच मांगलिक स्नानें भोजन वगैरे करण्यांत आलें. हा उत्सवहि मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला.

पुढें त्यावेळचे व्हाइसराय लॉर्ड कर्झन साहेब बहादूर यांनीं दिल्ली दरबार भरविण्याचें योजून त्यांनही हिंदु-

स्थानचे सर्व भागाचे राजे व इतर परद्वीपाचे प्रतिनिधि यांस आमंत्रणें पाठविलीं होतीं. हा समारंभ ता. १ सन १९०२।१९५९ जानेवारीपासून होण्याचें निश्चित ठरविलें होतें.

शिंदे सरकार यांसही निमंत्रण आल्यावरून त्यांनीं आपल्या समागमें बरेच सरदार नेले होते. त्यांत श्री० आपासाहेब शितोळे यांची प्रथम योजना होती. याजबद्दल आगाहि नामा प्रा. से. हुजूर यांजकडून, सरदार साहेब यांस आपल्या बरोबर स्पेशल गार्डानें सहा माणसें घ्यावीं, असा आल्याप्रमाणें, संस्थानांतून ता. २४ माहे दिसेंबर सं० १९५९ रोजीं स्पेशल गार्डानें सहा माणसें पाठविण्यांत आलीं व आपासाहेब शितोळे ता. २५ दिसेंबर सन १९०२ रोजीं अकरा वाजतां रात्रौ श्रीमंत महाराज सरकारांबरोबर दिल्लीदरबाराकरितां दिल्लीस रवाना जाहले. दिल्लीदरबारच्या प्रोसेशनमध्यें श्रीमंत शिंदे सरकारच्या हत्तीच्या हौद्यांत कीं, ज्यांत आमचे दयाळु महाराज बसले होते त्यांत बसण्याचा मान श्री० आपासाहेब शितोळे यांसच देण्यांत आला होता.

सत्कृत्य करणारांचा जगांत अखंड वास राहतो असें जें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. कारण जे कोणी धर्मात्मे साधुसंतांची सेवा करून कांहींना कांहींतरी धर्मसंस्था चालवून गेले, त्यांचें नांव अजरामर गाजत राहतें. त्याचप्रमाणें आमचे भाग्यशाली श्री० आपाजीराव शितोळे यांनीं ग्वाल्हेर राज्यांतील सर्वत्र लोकांस नित्य आठवण देणारें असें मोठें चिरस्मरणीय कृत्य करून ठेविलें आहे.

श्री. आपाजीराव शितोळे यांस साधुसंतांच्या दर्शनांचा फारच नाद आहे. त्यांजला आपल्या वैभवाचा मान बिलकूल नसून ते सर्वत्रांबरोबर ममतेनें वागतात. त्यांत साधुसेवेला तर बिलकूल अभिमान ठेवीत नाहींत. त्यांनीं कांहीं दिवस येथील सत्पुरुष भाऊ महाराज दळवी यांची उत्तम प्रकारें सेवा केली. त्यांस भोजनाकरितां ताट यांजकडून जात असे. पुढें सं० १९५९ चे सालीं भाऊ महाराजांनीं समाधि घेतली त्यावेळीं त्यांचे समाधीचें काम श्री. आपासाहेब शितोळे यांनीं चालवून त्याठिकाणीं मोठें मंदिर व त्याच्या आसपासची जागा अत्यंत प्रेक्षणीय अशी बांधली. मूळ ही जागा एका पहाडाच्या उंचवट्यावर असून आसपास मोठमोठे पाहाडाचे कडे तुटले आहेत. चहूंकडून वर्षाऋतूमध्यें धरणें वाहत असून ठिकठिकाणीं स्वामींच्या बसण्याच्या गुंफा आहेत. या जागेवरून जंगलाची व ग्वाल्हेर लष्करची नगररचनेची अत्यंत मौज वाटत असते. अशा चित्ताकर्षक ठिकाणीं ही देवळाची जागा फारच प्रेक्षणीय व चिरस्मरणीय झाली असल्यानें ज्यांचे त्यांचे तोंडातून आपासाहेबांस धन्यवाद झाल्यावांचून राहतच नाहींत हीं व अशींच कित्येक प्रशंसनीय धर्मकृत्यें त्यांजकडून नित्य घडत असतात हें यांच्या कुलशीलास मोठें भूषणावह आहे.

श्री. आपासाहेब शितोळे अत्यंत कुशाग्र बुद्धीचे आहेत. त्यांनीं थोड्या अवधींत बऱ्याच विद्या साध्य केल्या आहेत. प्रथम महाराजांनीं सर्विस स्कूल स्थापन केलें त्यांत शिक्षण घेण्याकरितां आपासाहेब शितोळे यांजलाहि जावें लागत असे; परंतु त्यांनीं थोड्या काळांतच सर्व्हीस स्कूलचा अभ्यास पूर्ण करून घेतला. या शाळेंत त्यांस पटवर्गीमालचे कानाची, दिवाणी, फौजदारी व पैमाष वगैरेंची चांगली माहिती जाहली होती. ती माहिती त्यांच्या हरएक कामांत उपयोगी पडत गेली असल्यानें, त्यांजला कोणत्याही कामाची अडचण पडत नाहीं.

यांजला साधारण इंग्रजी लिहितां वाचतां येत असल्यानें हे भाषण सर्व समजून घेतात, संस्थानचे कायदे सर्व माहीत झाले आहेत, यांत विशेष नवल नाहीं; परंतु त्यांनीं इंग्रजी कायद्यांचीही वाकबगारी संपादन करून घेतली आहे. मिलिटरी खात्यांत यांचें अंग पडावें म्हणून महाराज सरकार यांनीं, त्यांस ता० २६ माहे जून सन १९०३ इसवी रोजीं फर्स्ट लॅंसरमध्यें ऑनररी पेटूनचा हुद्दा दिला. त्याजबद्दल जनरल ऑर्डर ( हुकूम ) झाली तिचा खुलासा येणेंप्रमाणें:—

## जनरल आर्डर.

बाय

मेजर जनरल सरदार बहादूर कान्हेराव साहेब सुर्वे सि० एस० आय० कमांडर इन चिफ ग्वालिअर आर्मी — हेड क्वार्टर

मोतीमहाल ता० २६ जून सन १९०३ इसवी.

अर्ज कायोम मुबारीक फाल याने सालगीर रहान मोस्ट ग्रेशस मॅजस्टी धी किंग एडवर्ड दी सेव्हन्थ ॲण्ड एम्परर ऑफ इंडिया दाम इकबलहु व इजलाहु काहे. लिहाना श्रीमंत हुजूर मोकदाम इकबलहु व मरूकहु के

ह्या से निहायत खुषीके साथ ऑर्डर माा किया जाता है के जेलके साहेबांनु ऑनररी रँकस सरफराज फरमाये गये.

सरदार आपासाहेब शितोळे वे रँक क्यापटन फर्स्ट लान्सरमे.

सरदार यादवराव घोरपडे साहेब वे रँक क्यापटन सेकंड लान्सरमे.

राव राजे गणपतराव रघुनाथ राजवाडे साहेब वे रँक क्यापटन थर्ड इन्फन्ट्रीमें.

पंडित कैलास नारायण साहेब प्रोफेसर वे रँक क्यापटन फोर्थ इन्फन्ट्रीमें.

बाय ऑर्डर

**हिरासिंह,**

अड्जुटंट जनरल शिंद्याज आर्मी.

श्री० आपासाहेब शितोळे यांस महाराज सरकारनीं मिलिटरी खात्याचें काम दिल्यापासून त्यांनीं त्या कामांत उत्तम प्रकारची तयारी करून थोड्याच दिवसांत महाराजांचे नजरेसमोर आणून दाखविली, त्यायोगें त्यांच्या मिलिटरी कामापासूनही महाराजांची मर्जी अत्यंत खुष राहिली.

ग्वाल्हेर रियासतींत कोणी राजे महाराजे युरोपियन कामदार ( रॉयल फॅमिलीचे ) वगैरे आल्यास त्यांच्या आदरसत्काराचें काम महाराज सरकार बहुधा शितोळे आपाजीरावांकडेसच सांगतात; त्यायोगें एकंदर पाहुणेमंडळ अत्यंत प्रसन्न राहून शितोळे यांजवर फारच प्रेम करितात. त्यांतील महाराज होळकर सरकार, इंदोर महाराजा, म्हेसूर महाराजा, बिकानेर, जयपूर वगैरेचीं उदाहरणें घेतल्यासही चालेल; कारण या सर्व लोकांची यांजवर पूर्ण कृपा असून त्यांचे व यांचे पत्रव्यवहारही अत्यंत घरोब्याचे असे होतात. ह्या गोष्टी निकट संबंधाशिवाय घडण्यासारख्या नाहींत. रॉयल फॅमिलिचे मोठ मोठे युरोपियनसुद्धां यांजवर विशेष प्रेम करितात. त्याजबद्दल मासल्याकरितां एका पत्राचा नमुना येथें देतों.

"जानेवारी महिन्यांत ता० २०-१९०३ च्या सुमारास कीं, ज्या वेळीं हिज रॉयल हायनेस डयुक ऑफ हिसे साहेब बहादुर यांची स्वारी श्रीमंत शिंदे सरकार यांचे पाहुणे म्हणून ग्वाल्हेरीस आली होती त्या वेळीं त्यांचे व्यवस्थेकरितां श्री० आपासाहेब शितोळे यांची नेमणूक झाली होती. साहेब बहादूर यांची त्यांजवर अत्यंत प्रीति राहिली व त्यांच्या आदरसत्कारापासून ते फार आनंदित झाले. त्या प्रीतीचा मोबदला त्यांनीं आपले राज्यांत पोहोंचल्यावर आपासाहेब यांस भेट म्हणून एक सोन्याचें घड्याळ, श्रीमंत शिंदे सरकार यांजमार्फत देण्यासाठीं पाठविलें, तें घड्याळ महाराजांचे मिलिटरी सेक्रेटरी साहेब बहादूर यांनीं खालील पत्रान्वयें शितोळे साहेब यांजकडे पाठवून आनंद प्रदर्शित केला. त्या पत्राचा उतारा येणेंप्रमाणें:—

Office of the Military Secretary to H. H. the Maharaja Scindia Jaibilas Palace.
Gwaliar 19th January 1904

My dear Appasaheb,

His Highness desires me to send you the accompanying Gold watch and chain which has been sent for you by His Royal Highness the Grand Duke of Hissi.

His Highness wishes you to write acknowledgment with thanks and send it here to be forwarded with a letter from His Highness.

Yours sincerely
C. A. FILOSE.

शिंदे सरकारचे मिलिटरी सेक्रेटरीकडून.
ग्वाल्हेर ता० १९ जानेवारी १९०४ इसवी.

प्रियकर आपासाहेब.

राजाधिराज डयुक हिसे यांनीं तुम्हांकरितां पाठविलेलें सोबतचें सोन्याचें घड्याळ ( सांखळी सहित ) तुम्हांकडे पाठवून देण्याची महाराजांनीं इच्छा दर्शविली आहे. तदनुसार वरील वस्तू पोहोंचल्या बद्दल व त्यांचा आनंदानें स्वीकार केल्याबद्दल पत्र लिहून तें इकडे पाठवावें म्हणजे तें महाराजांचे पत्रासहित पुढें पाठविणेंचे होईल.

आपला,
सि० ए० फिलोस.

या पत्राच्या अवलोकनानें श्री० आपासाहेब शितोळे यांची लोकांचें चित्त सुप्रसन्न ठेवण्याची शैली कशा प्रकारची आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईल. त्यांजकडून कधींही अमर्याद भाषण निघावयाचें नाहीं व दुसऱ्यांनीं 'अमर्यादा केली तरी ती त्यांस खपावयाची नाहीं असे ते सत्यप्रिय आहेत. त्यांजला खोटं बिलकूल आवडत नाहीं. कोणी

कितीही मोठा अपराध केला असला आणि तो त्यांनीं विचारितां त्यांना खरा सांगितला तर ते कधींही रागावत नाहींत. ही त्यांची सत्यप्रियता विशेष वाखाणण्यासारखी आहे. कारण त्यांनीं अशाप्रकारचे बहुतेकांचे अपराध माफ केले आहेत, हे फारच प्रामाणिक आहेत ह्यांच्या प्रामाणिकपणाची–ज्या ज्या इसमांवर प्रसंग आला असून त्यांनीं आपलें सर्व वित्तसुद्धां यांच्या हवालीं केलें व पुनः बरेच महिन्यांनीं जसेंच्या तसेंच परत घेतलें– त्यांच्याकडून खात्री पटण्यासारखी आहे. या ठिकाणीं त्याबद्दल विशेष खुलासा करण्याची जरुरी नाहीं. एकंदरींत यांजमध्यें जे जे अलौकिक गुण भरले आहेत ते फार प्रशंसनीय आणि श्रीमंतीस शोभण्यासारखे आहेत.

चीफ सेक्रेटरी हुजूर दरबार यांच्या हातचें, रावराजे रघुनाथराव दिनकर ई० चिफ सेक्रेटरी साहेब रेव्हिन्यू डिपार्टमेंट, नंबर १४० ता० १४ जुलई सन १९०३ इसवी संवत् १९६० पासून श्रीमंत हुजूरमोला साहेबांच्या आज्ञेवरून मेंबर प्रॉ॥ सदर बोर्ड ऑफ रेव्हिन्यू व ॲग्रीकलचर ई० सेक्शन अ० या खात्यामध्यें तारिख १३।७।३ पासून श्री० आपाहेब शितोळे मुकरर झाले. व ता० १३।७।३ पासून कामाचा चार्ज घेणें म्हणून त्यांस हुकूम जाहला व बोर्ड सेक्रेटरीकडेहि नंबर १४५ ता० १४।७।३ चा हुकूम जाहीर झाला. तिकडूनही पत्र नंबर १६३ ता० १४।७।४ चे दामोदर हरि कुंठे सेक्रेटरी बॉर्ड ऑफ रेव्हिन्यु संस्थान मजकूर शितोळे साहेबांचें नांवें यांनीं पाठविलें.

सरकार हुकमाचा अमल श्री० आपासाहेब शितोळे यांनीं तात्काळ केला. प्रायव्हेट सेक्रेटरीचा चार्ज ता० १५।७।३ रोजीं हुकूम नंबर १४० ता० १४।७।३ चे आधारें कैलास नारायण प्रोफेसर यांचे स्वाधीन केला व ते आपल्या नवीन कामावर रुजू झाले. शितोळेसाहेब यांचे जाण्यानें प्रा. से. ऑफिसचे मंडळीस यांची उणीव भासत होती पण ती पंडीत कैलास नारायणजीसाहेब यांनीं फारच लौकर भरून काढिली.

ह्या भागच्या कामाची पाहणी व बंदोबस्त करून गांवोगांव फिरून चांगल्या प्रकारची करून सर्वत्र श्री. आपासाहेब शितोळे यांनीं आपली वाहवा करवून घेतली व सरकार स्वारीकडून शाबासकी मिळविली. त्यांनीं नफा-नुकसानी बद्दल विशेष दक्षता दाखविली. त्यायोगें आतां हेंच काम त्यांजकडून बहुत समाधानकारक स्थितींत चालत असून यांजविषयीं कोणीही नाखूष नाहींत.

तारिख २२ माहे नवंबर सन १९०४ इसवी संवत् १९६१ रोजीं जनरल हुकूम नंबर ४५ चा होऊन श्री० आपासाहेब शितोळे क्यापटनचे मेजर झाले. त्याचा खुलासाः—

## जनरल ऑर्डरस.

बाय.

मेजर जनरल सरदार बहादूर काशीराव साहेब सुर्वे सि. आय. नाईट कमान्डर इनचीफ ग्यालिएर आर्मी हेडकारटर्स मोती महाल. ता. १२ नवंबर सन. १९०४ इसवी सं० १९६१.

प्रमोशन ॲन्ड ट्रॅन्स्फर नंबर ४५

ता. १२ माहे नवंबर व रोज शनिवार सनहालको बशाशत ऐदोज एंजीवर खरीबदेड्यानीं साल्गीर हहे लहाना श्रीमंत हुजूर मोला दाम इलाबलहू व इषमतहु कि इनायत ॲंड परवर्षसे प्रमोशन ॲंड ट्रॅन्सफरी गटेबद्दल तपशील—

फर्स्ट ग्वालिअर इम्पीरिएल सरव्हीस क्लानसरमे सरदार आबाजीराव साहेब शितोळे ऑनररी कॅप्टनसे मेजर.

सेकंड ग्वालिअर आई. एस कन्सरमे सरदार यादवरावसाहेब घोरपडे ऑनररी कॅपटनसे मेजर.

फोर्थ ग्वालिअर आई एस इन्फन्ट्रीमें प्रायव्हेट सेक्रेटरी कैलास नारायण सोा. ऑनररी कॅप्टनसे मेजर.

थर्ड ग्वालीयर आई एस इन्फन्ट्रीमें गणपतराव रघुनाथ राजवडे ऑनररी कॅप्टनसे मेजर.

बायऑर्डर.

**हिरासिंह कर्नल.**

ॲड्जुटंट जनरल शिंदयाज आर्मी.

याप्रमाणें जनरल ऑर्डर होऊन सरकार हुकमाप्रमाणें शितोळे साहेब आपल्या ह्याही कामाचा मोबदला फारच हुशारीनें देऊं लागले.

श्रीमती सकल सौभाग्यादिसंपन्न मनुराजासाहेब शितोळे यांस–सावंतवाडी संस्थानचे राजे बहादूर सर देसाई, यांनीं मातोश्री राजे सावित्री आर्जी बाईसाहेब भोंसले सरदेसाई यांनीं मरनेसमयीं देणगी देण्याचें

योजिलें होतें. ती बमुनबा ठराव पत्र स्टेट कारभारी संस्थान सावंतवाडी नंबर८४ तारीख सन १०।२।१९०४ चे आल्यावरून पोलिटिकल एजंट साहेब बहादूर यांनी संस्थान प्रो इनाम जमिनींचें सालिना उत्पन्न रुपये १२४८–॥ सि॥ सलदारचे चालू केलें व कांहीं वाड्याचे मदतीकरितां इमारती उत्तम लांकूड व इतर मोल्यवान सामान देण्यांत आलें, याचीहि सर्व मालकी-अर्थातच श्री० आपासाहेब शितोळे यांजकडेस आली. या उत्पन्नाची व्यवस्था स्टेट कारभारी सावंतवाडी यांजकडेसच सोंपविण्यांत आली असून ग्वाल्हेर संस्थानांतून शितोळे साहेब यांजकडून एक वहिवाटदार वसूल व सकतीकरितां ठेवण्यांत आला आहे.

आपल्या उत्कर्षाबरोबर आपल्या वडिलोपार्जित अंकली संस्थानच्या वाड्याचाहि उत्कर्ष व्हावा. कारण तो अगदीं पुरातन जीर्ण झाला असल्यानें केव्हां पडेल, याचा नेम नाहीं ही गोष्ट आप्पासाहेबांच्या ध्यानीं येऊन त्यांनीं आपल्या वडिलांची आज्ञा घेऊन ठेविली होती. त्याप्रमाणें त्यांनीं त्यांचे पश्चात् सं० १९५४ पासून हळूहळू नवीन वाडा बांधण्याचें काम चालू केलें. ईशदयेनें तें काम उत्तम प्रकारें हल्लीं पूर्ण झालें असल्यानें त्याच्या वास्तुशांतीकरितां आपासाहेब शितोळे व श्रीमती सौभाग्यवती मनुराजा साहेब ह्या उभयतांच्या स्वाऱ्या अंकलीस मे सन १९०५ मध्यें रवाना झाल्या.

हा वाडा त्या आसमंत भागीं फारच प्रेक्षणीय महाला प्रमाणें शोभूं लागला असून, त्याचें काम ग्वाहेर येथून कारागिर मेस्त्री पाठवून केलें असल्यानें फारच सुबक झालें आहे. तें पाहण्याकरितां ठिकठिकाणाहून म्हणजे कोल्हापूर, मुंबई, पुणें वगैरे कडील ही लोक येऊन तेही त्या कामाची तारिफच करितात.

उभयतांची स्वारी अंकलीस पोहोंचल्यावर तेथें चांगल्या मुहूर्तानें वाड्याची वास्तुशांति झाली. अनेक ब्राह्मणांस दक्षिणा दिली. गरीब लोकांस पांच सात दिवस नित्य मिष्टान्न भोजन दिलें. आपल्या वतनाच्या सगळ्या गांवच्या लोकांस पुरणपोळी तूपसाखरेचें जेवण दिलें. अशाप्रकारें सर्व प्रजेचे मनोरथ पूर्ण केले. ठिकाठिकाणाहून आलेल्या हर हुजरी लोकांचा इनामी पोपाख वगैरे देऊन चांगला सन्मान केला. तात्पर्य ह्या प्रसंगीं कोणाला अन्न-दानाला नाहीं असें म्हटलेंच नाहीं. वाड्याच्या कामाची ज्यांनीं देखरेख केली अशा कालेखां नांवाच्या मिस्त्रीस सोन्याचें कडें व दुपेटा पागोटें बक्षीस देऊन त्याजला ह्या कामगिरींतून उत्तीर्ण केलें.

नेकीनें नियत चांगली ठेवून मालकांचें काम करीत राहिल्यास त्याचा मोबदला चांगलाच मिळतो. हें मात्र जे कोणी शितोळे यांचे चाकर असतील त्यांनीं तरी चांगलें लक्षांत वागवून सुमार्ग स्वीकारला पाहिजे. यांतच खरें हित आहे. ह्या स्वारींत श्री. आपासाहेब यांस सन्मानपूर्वक श्री. कोल्हापूरच्या महाराजांचें बोलावणें येऊन उत्तम थाटाची मेजवानी देण्यांत आली.

एकंदरींत वडीलांची व त्या संबंधीं झालेल्या पांच-पन्नास हजार पात्रांच्या भोजनखर्चाची, दानधर्माची व बहुमान इनाम देणगी वगैरेची ख्याति कर्नाटकप्रांतांत उत्तम प्रकारची दुमदुमूं लागली, इतकेंच नाहीं; पण कित्येकांच्या मुखांतून हेच उद्गार निघाले कीं, थोर पुण्याई सर्जेराव दादासाहेबांची कीं ज्यांच्या पुत्रानें आपल्या भाग्याचा उदय दिवसेंदिवस वृद्धिंगत केला. हें त्यांच्या प्रजा वात्सल्याचें व प्राणिमात्राच्या जीवाचें शांतवन करीत राहिल्याचेंच फल होय.

आपल्या वडीलांप्रमाणेंच श्री. आपाजीराव शितोळे यांनीं प्रजेच्या ठिकाणीं प्रेमाचा व त्यांचे सुखदुःख ऐकून घेऊन त्याप्रमाणें योग्य निवाडा करून देण्याचा मार्ग स्वीकारला असल्यानें याप्रसंगीं त्यांजला प्रजेकडून मिळालेल्या मानपत्राचा उतारा येथें देतों. कारण अंकली मांजरी वगैरे त्यांच्या इनाम गांवची कुल प्रजा त्यांस देवाप्रमाणें भजत आहे. यांत विशेषसें नवल नाहीं. कारण ती तर त्यांची प्रजाच आहे. त्यांचे तारणार मारणार त्यांजला आईबाप कायते हेच. परंतु इतर गांवची प्रजा सुद्धां देवाप्रमाणें मानते. यांतच खरें मोत्यांचें पाणी पारखण्याचें मर्म सुज्ञ वाचकांच्या ध्यानीं येईल.

मोजे सौंदत्ती इलाखा कोल्हापूर, येथील ग्रामस्थानीं दिलेलें मानपत्र.

"श्रीमंत सकल गुणैश्वर्यसंपन्न आपाजीराव बाबासाहेब शितोळे, देशमुख इनामदार, अंकली मांजरी, वगैरे स्वामींचे शेवर्सी—

कृपाभिलाषी समस्त ग्रामस्थ राहणार सौंदत्ती महाल रायबाग सविनय श्रुत करितों ऐसाजे:—स्वारीचें आगमन ह्या प्रांतीं अगदीं योग्यवेळीं त्यांत दुधांत साखर घातल्याप्रमाणें सहकुटुंब झालें. याजबद्दल आम्ही सर्व शितोळे घराण्याचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. सूर्याला पाहिल्याबरोबर ज्याप्रमाणें कमलें प्रफुल्लित होतात, त्याप्रमाणें श्रीमंतांचें दर्शन झाल्याबरोबर आमच्या आशाअंकुरास पुनः टवटवीत पालवी फुटूं लागली आहे.

सरकार आमच्या गरीब दुर्दैवी सौंदत्ती संस्थानावर आज कोणता भयंकर प्रसंग येऊन गुदरला आहे. तें सर्व श्रीमंतास अवगत झालेंच आहे, अशा हतभाग्य स्थितींत वाडवडीलांपासून आम्हांस अंकली संस्थानचाच काय तो आधार आहे. आमच्या करितां स्वारींनीं व रा. रा. गोविंदरावांसारख्या प्रमुख कारभाऱ्यांनीं थेट श्रीमन्महाराज सरकारांकडे पत्रें पाठवून व अन्य तऱ्हेनें आजपर्यंत तनमन धनें करून शक्तीपलिकडे खटपट केली आहे. म्हणून आम्हीं खावंदाचे व समस्त मित्र मंडळींचे अत्यंत ऋणी आहों.

हुजूर मुलकींतून आमच्या कामाचा निकाल विरुद्ध झाला आहे. तथापि दिवाणी कामाचें अपिल कोल्हापूरच्या कौन्सिल ऑफ ॲडमिनिस्ट्रेशनच्या समोर हल्लीं चालू आहे. ह्या वेळीं सक्त मेहनत झाल्यास हटकून यश येण्याचा बराच संभव दिसतो.

स्वारी थोडक्या दिवसांत कोल्हापुरास जाईलच. तेथें श्रीमन्महाराज सरकारची मुलाखत होईलच. श्रीमंतांनीं आम्हांस वेळोवेळीं वचन दिल्याप्रमाणें ह्या हरिहर भेटीमध्यें कांहींतरी शेवटचा समाधानकारक निकाल लागेल अशी आम्ही बळकट आशा धरितों."

अंकलीचा वाडा ता० १ माहे जून सन १९०५ इसवी. समस्त ग्रामस्त सौंदत्ती.

ह्या मानपत्राप्रमाणें शितोळे साहेब यांनीं प्रजेच्या दुःखनिवारणार्थ महाराज सरकार करवीर यांस सर्व श्रुत केलें आहे.

स्वारी अंकली मुक्कामीं आल्यापासून परत जाई पावेतों त्यांनीं केलेल्या लोकोत्तर कृतीचें चित्र अनेक वर्तमानपत्रकारांनीं वठविलें आहे. त्यांत विशेष गोष्ट ही कीं केसरीसारख्या जगन्मान्य पत्रानें श्री. आपासाहेब शितोळे यांचा व त्यांच्या या धर्मकृत्याचा आपल्या पत्रीं खुलासा दिला आहे, तो वाचला म्हणजे श्री. आपासाहेबांसहि केवळ श्रीमंत समजूनच मान मिळत नसून त्यांच्या अंगच्या गुणाची तारीफच केली आहे असें दिसून येईल. आजपावेतों शितोळे आपाजीराव यांजकडे कोणतेंहि काम दिलें तरी तें त्यांनीं न डगमगतां मोठ्या हुषारीनें केलें. म्हणजे दिवाणी, फौजदारी, ज्युडिशिअल, मिलीटरी, कारखानेजात, रेव्हिन्यु कीं ज्यांत संस्थानचें नफा-नुकसानीची मोठी जोखीम तें मुद्दां चांगलें केल्यानें श्रीमंत शिंदे सरकार अत्यंत खुष झाले व त्यांनीं सहा महिन्याकरितां पूर्ण अधिकारासह, त्यांस फर्मानसाहेब बहादूर डायरेक्टर मो कागजातदेही हे रजेवर विलायतेस गेले, त्यांच्या कामाचा चार्ज त्यांस दिला. ह्या कामांत पैमापयबंदी जमीनीची व्यवस्था समजते. हें काम त्यांनीं इतक्या उत्तम प्रकारें केलें कीं, जसें कांहीं हें काम त्यांस पूर्वीपासून येत होतें कीं काय ? असें वाटत असे. कोणत्याहि कामांत श्री. आपासाहेब शितोळे यांनीं नाहीं म्हटलें नाहीं इतकेंच नाहीं, तर त्यांच्या कामापासून उलट सरकारची मर्जी बहाल होत गेली. हें त्यांच्या अचाट बुद्धीचें व वैभववृद्धीचें द्योतक होय ! सर्व कामाकाजांत श्री. आपासाहेब यांची पूर्ण हुषारी पाहून महाराजांनीं त्यांजकडे मजलमिंबर म्हणजे खास हुजूर पेशांतले काम सोंपविलें आहे ता. ३१।८।५.

अशाप्रकारें स्वामिकार्यदक्ष राजासारख्या जहाजाला चालविणारे उत्तम उत्तम राज्यकार्यधुरंधर लोक असल्यावर राज्यांत कोणत्याही बाबतींत अन्याय होईल असें वाटत नाहीं.

श्री. आपासाहेब शितोळे यांचें ग्वाल्हेरीस ठाणें कायम जाहल्यास आज बरींच वर्षे झालीं आहेत. त्यांनीं आपल्या इतक्या ह्या कालांत ग्वाल्हेर राज्याचा पूर्ण अभिमान धरून मोठमोठीं सरकारी कामें केलीं आहेत, व श्रीमंत शिंदे महाराजांचा, महाराणीसाहेबांचा मानकरी व कामदार यांचा व सकल प्रजाजनांचा अत्यंत लोभ संपादन केला आहे. ही गोष्ट कांहीं सामान्य नाहीं. 'ज्याचा त्राता कोणी नाहीं, त्याचे त्राते श्री. आपासाहेब शितोळे हे होत.' ही एक म्हण सर्वतोमुखी प्रख्यात आहे. याचें कारण इतकेंच कीं, त्यांजकडे कोणीही आपली संकटावस्थेची स्थिति सांगावयास गेल्यास ती

त्याची स्थिति सर्व नीट विचारपूर्वक ऐकून घेऊन, योग्य सल्ला सांगावयाचा व त्याप्रमाणें तो वागल्यास त्याचें कार्य हटकून व्हावयाचें व बनेल तर आपणही साह्य करावयाचें हा मोठा सद्गुण ह्यांचे अंगीं वास्तव्य करीत आहे. अशा गोष्टींबद्दल त्यांनीं अनेक रसातळास गेलेल्या कुलीन घराण्यासंबंधीं केलेल्या उपकारांचीं उदाहरणें हल्लींच घडून आलेलीं आहेत व पुढेंही घडतील. सर्वत्रांबरोबर एकी राहून प्रेम वृद्धिंगत व्हावें, ह्या सदिच्छेनें श्रीमंत शिंदेसरकार यांनीं एक लीगल क्लब ह्या नांवाची जागा स्थापन केली आहे. त्या जागेंत सर्व सरदार, कामदार वगैरे मंडळींनीं सायंकाळीं जमून, एकोप्यानें आनंद करावा अशी वहिवाट आहे. त्या वहिवाटीस अनुसरून श्री. आपासाहेब शितोळे यांनीं महाराजांची इच्छा उत्तम प्रकारें पूर्ण केली आहे, तितकी इतरांनीं क्वचितच ग्रहण केली असेल.

हल्लीं थोड्या दिवसांपूर्वी मराठाक्षत्रिय सहाय्यकारी सभा ग्वाल्हेर मुक्कामीं स्थापन झाली आहे. तींत हेच मुख्य प्रमुख असून यांनीं कुलनियम वगैरे चालू केले आहेत.

अंकली हें गांव यांचें वतनाचें मुख्य स्थान आहे. हें कृष्णा तिरावर उंचवट्यावर असल्यानें त्या जागेवरून आसमंत भागाची शोभा अत्यंत रमणीय दिसते. ह्यांच्या इनाम गांवची एकंदर प्रजा बारा तेरा हजारांवर असून ग्वाल्हेर संस्थानांत एकंदर तीनशेंवर चाकर, शिपाई, स्वार वगैरे मिळून आहेत. इतक्या प्रजेचे श्री. आपासाहेब शितोळे हेच मालक आहेत. अंकली मांजरी वगैरे गावें हल्लीं तालुके चिकोडी जिल्हा बेळगांव येथें मोडत आहेत.

श्री. आपाजीराव शितोळे यांनीं आपला वतन गांव अंकली मांजरीची दिवसेंदिवस चांगली सुधारणा केली आहे. अंकलीस हवा चांगली असल्यानें तेथेंच नवीन वाड्याचे समोर एक मराठी कानडी शिकविण्याकरितां स्कूल स्थापन करून त्याच्या इमारतीकरितां आपल्या संस्थानांतून रक्कम दिली आहे. त्यावर श्री. बळवंतराव मास्तर कोल्हागी हेच शिक्षक असल्यानें ते मुलांस उत्तम प्रकारचें शिक्षण देत आहेत तसेंच एक ब्रँच पोस्ट ऑफिसही तेथें थोड्या दिवसा मागें सरकारांतून स्थापन करविलें आहे. त्यायोगें टपालाची फारच सोय झाली आहे. नाहींतर पत्रें वगैरे पाठविणें असल्यास चिकोडीस पाठवावीं लागत असत. ही मोठी अडचण दूर झाली आहे.

श्री. आपासाहेब शितोळे यांनीं आपल्या संस्थानचा म्हणजे ग्वाल्हेरी आणि अंकली येथील बंदोबस्त योग्य कामदाराची नेमणूक करून जमाखर्चाचा पट बांधून चांगल्या प्रकारचा केला आहे, व त्यावर आपली पूर्ण देखरेख ठेविली असल्यानें सर्व कामें वेळच्या वेळीं त्यांचे नजरेखालून जाऊन कांहीं एक भानगड राहत नाहीं त्यायोगें उभय संस्थानचीं कामें सुरळीत बिनबोभाट चाललीं आहेत.

एकंदर संस्थानचें उत्पन्न सरासरी सवा लाखाचें आंत आहे. त्या मानानेंच सर्चही व्यवस्थेशीर तितकाच किंबहुना कांहीं बचत ठेवून होतो.

सं० १९६१च्या सालीं श्री. आपासाहेब शितोळे यांनीं स्वतंत्रतेनें प्रथमच मंगल कार्य केलें. म्हणजे आपले पुतणे श्री. नारोजीराव दादासाहेब यांचा विवाह गुलाबराव हबीराव शिंदे यांच्या कन्येशीं केला. या कार्यांत त्यांनीं व श्रीमती सौभाग्यवती मनुराजासाहेब यांनीं अत्यंत व्यवहार प्रचुरता दाखविली. त्या गोष्टी मुख्यत्वें लिहिण्याचा हेतु इतकाच कीं सोय जाणे तो सोयरा, ह्या म्हणीप्रमाणें गरीबाला कसें निभवून घ्यावें हें पूर्ण मनांत आणून मोठ्या आनंदानें लग्न समारंभांत ते जरी यांच्या बरोबरीचे नव्हते तरी ती कोणतीही बाजू त्यांनीं उघडी पडूं दिली नाहीं. ही गोष्ट बहुतेकांला साधत नाहीं, म्हणून या उभयतांची अत्यंत धन्यता वाटते.

श्री. आपासाहेब सितोळे हे जसे राजकार्य दक्ष तसे व्यवहार चतुरही आहेत हीं दोन्हीं आंगें त्यांचे ठिकाणीं वास्तव्य करित असल्यानें त्यांची सदासर्वदा उर्जितावस्थाच होत असते. श्रीमती सौभाग्यवती मनुराजा उर्फ रमाबाईसाहेब शितोळे ह्या आपल्या पती प्रमाणेंच अत्यंत मायाळु व ईश्वरावर भक्ति ठेवणाऱ्या, धर्मावर श्रद्धा धरणाऱ्या आहेत. हा श्री ज्ञानेश्वर महाराजानीं जो दृष्टांत ह्यांच्या आजेसासू रमाबाईसाहेब यांस देऊन सेवा घेतली त्याचाच प्रताप होय.

शेवटीं त्या जगन्नियंत्या प्रभूपाशीं अनन्य भावें प्रार्थना आहे कीं, श्रीमंत माधवराव महाराज शिंदे सरकार अलिजा बहाद्दर व श्रीमंत सरदार आपाजीराव बाबासाहेब शितोळे अंकलीकर या उभयतां नरनारायणांस उभयतांच्या निःसीम प्रेमांत कधींच व्यत्यय न पाडतां अखंड शंभर वर्षाचें पूर्ण आयुष्य देवो व श्री० आपाजीराव शितोळे यांच्या वंशजांचा जयजयकार होवो !

समाप्त.

## साळुंखे ऊर्फ पाटणकर घराण्याची वंशावळ.

जोत्याजीराव
बहीरजीराव
हिरोजीराव
नागोजीराव

१ चांदजीराव

१ रामराव — २ सुभानराव — ३ द्वारकोजीराव

रामराव: १ नागोजीराव २ जानराव ३ चांदजीराव ४ अर्जोजीराव
सुभानराव: जोत्याजीराव दत्तक
द्वारकोजीराव: १ जोत्याजीराव नक्कल २ बाजीराव ३ आप्पाजीराव

नागोजीराव — जानराव — नागोजीराव ( दत्तक ) — १ रामचंद्रराव २ व्यंकटराव
रामचंद्रराव: १ ...जीराव (कोल्हापुर महा... स दत्तक दिले ...राम महाराज) २ नागोजीराव ऊर्फ बाबासाहेब (दत्तक मूळ नांव जोत्याजीराव)
...: १ ...जीराव ऊर्फ ...नराव २ भीमराव ऊर्फ भाऊ साहेब.

चांदजीराव — रामचंद्रराव (नक्कल)
अर्जोजीराव — पद्माजीराव — धोंडजीराव ( नक्कल ) — १ लक्ष्मणराव २ सुभानराव ३ खलोजीराव
लक्ष्मणराव — खलोजीराव — १ बाबासाहेब २ बाळासाहेब ३ तात्यासाहेब ४ बाबासाहेब ५ नांव माहीत नाहीं.
सुभानराव — जोत्याजीराव ऊर्फ (बाबासाहेब

जोत्याजीराव दत्तक: १ खेलोजीराव २ सुभानराव
सुभानराव — जोत्याजीराव — १ खलोजीराव २ धारराव ३ जोत्याजीराव ( दत्तक )
खलोजीराव — बापूसाहेब ( दत्तक ) — १ गिरजोजीराव २ तात्यासाहेब ३ बापूसाहेब (दत्तक)
गिरजोजीराव: १ बाजीराव २ सुभानराव ३ बाबुराव ४ व्यंकटराव
तात्यासाहेब — बाळाजीराव

बाजीराव: १ द्वारकोजीराव २ सखारामराव ३ जिजाजीराव
द्वारकोजीराव: १ बाजीराव २ नागोजीराव(दत्तक)
सखारामराव — बाळकृष्णराव — १ अप्पाजीराव २ भाऊराव (परागंदा नागपुराकडे)
जिजाजीराव — सुभानराव

आप्पाजीराव: ४ जोत्याजीराव ५ रघुनाथराव
जोत्याजीराव: १ माधवराव २ गोविंदराव ३ रामचंद्रराव
माधवराव — जोत्याजीराव (सावंतवाडीस दत्तक घेतला) स आहेत)
रामचंद्रराव: १ कृष्णराव २ जोत्याजीराव (दत्तकदिले)
कृष्णराव: १ जोत्याजीराव २ हणमंतराव (नक्कल) ३ धोंडजीराव
जोत्याजीराव — बळवंतराव ( दत्तक दिले )
धोंडजीराव — बहिरजीराव अण्णासाहेब ( दत्तक दिले )
रघुनाथराव — अप्पाजीराव (नक्कल)

१ मनाजीराव २ बहिरजीराव
मनाजीराव — बापूजीराव (दत्तक घेतले) — द्वारकोजीराव (दत्तक घेतले)
बहिरजीराव — जोत्याजीराव — १ बहिरजीराव २ बापूजीराव(दत्तक दिले)

२ हणमंतराव — ३ हिरोजीराव ( नक्कल ) — ४ राघोजीराव ( नक्कल )

१ हिरोजीराव — २ द्वारकोजीराव — ३ धारराव

हिरोजीराव: १ अप्पाजीराव — २ सुभानराव

अप्पाजीराव: १ हिरोजीराव — २ जोत्याजीराव

हिरोजीराव: १ अप्पाजीराव — २ बळवंतराव

अप्पाजीराव: १ सिंगराव — २ हणमंतराव — ३ रामचंद्रराव

हणमंतराव: बाळासाहेब

सुभानराव: नारायणराव

नारायणराव: १ हिरोजीराव — २ व्यंकटराव — ३ गोविंदराव (नक्कल)

हिरोजीराव: रामराव (नक्कल)

व्यंकटराव: नारायणराव (दत्तक घेतले)

द्वारकोजीराव: १ रामराव — २ लक्ष्मणराव — ३ बाबुराव — ४ राघोजीराव — ५ बाळोजीराव — ६ बाजीराव — ७ जयरामराव

रामराव: द्वारकोजीराव (दत्तक घेतले) — बाबुराव — रामराव (दत्तक घेतले)

लक्ष्मणराव: सुलतानराव — मानसिंगराव (दत्तक घेतले) — अप्पाजीराव — त्रिंबकराव (दत्तक घेतले)

राघोजीराव: १ द्वारकोजीराव (दत्तक घेतले) — २ पद्माजीराव

पद्माजीराव: पिराजीराव

पिराजीराव: १ रामराव — २ बाबुराव

रामराव (दत्तक दिले)

बाबुराव: १ द्वारकोजीराव — २ रामराव

१ गोविंदराव — २ मानसिंगराव

मानसिंगराव: हिरोजीराव — अमृतराव — बळवंतराव

बाळोजीराव: १ नारायणराव — २ मानसिंगराव

नारायणराव: १ बाळोजीराव — २ रखमाजीराव (दत्तक दिले) — ३ मानसिंगराव

बाळोजीराव: त्रिंबकराव (दत्तक दिले)

मानसिंगराव: १ नारायणराव ऊर्फ नानासाहेब (नक्कल) — २ हणमंतराव ऊर्फ नारायणराव (दत्तक दिले)

जयरामराव: रामचंद्रराव — जयरामराव

धारराव: १ बहिरजीराव — २ राघोजीराव (नक्कल) — ३ हणमंतराव

बहिरजीराव: धारराव — बहिरजीराव ( नक्कल )

हणमंतराव: १ कृष्णराव (नक्कल) — २ रामचंद्रराव

रामचंद्रराव: १ बहिरजीराव ( नक्कल ) — २ यशवंतराव

यशवंतराव: १ धारराव — २ कृष्णराव

# अंकलीकर शितोळे घराण्याची वंशावळ.



# मराठा-कुळांचा इतिहास.

## भाग ३ रा.

‘ चव्हाण ऊर्फ डफळे ’ ‘ ढवळचे पवार ’
‘ म्हसवडचे माने ’ ‘ मोरे ऊर्फ धुळप ’
व ‘ खळतकर देशमुख ’ ह्या
घराण्यांच्या कैफियती.

हें पुस्तक,

**श्रीयुत गोपाळ दाजीबा दळवी**—संपादक “ मराठामित्र ” मुंबई नं० ११.

यांनीं,

मुंबई येथें “ इंदुप्रकाश ” प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केलें.

सन १९१३ इसवी.



**किंमत १ रुपया.**

“सुखामागून जसें दुःख आणि दुःखामागून जसें सुख प्राप्त होतें, त्याचप्रमाणें प्रगतीच्या मागून अवनति व अवनतीच्या मागून प्रगति ठेवलेलीच असते.”

हें पुस्तक घर नं० ४३४, ठाकुरद्वार रोड, मुंबई येथें " इंदुप्रकाश " छापखान्यांत मालकाकरितां रा० रा० दामोदर सांवळाराम यंदे यांनीं छापिलें व रा० रा० गोपाळराव दाजीबा दळवी यांनीं भायखळा, चमेलीची वाडी येथें " मराठा-मित्र " ऑफिसांत प्रसिद्ध केलें.

'चव्हाण ऊर्फ डफळे' घराण्यांतील मान्यवर
जत संस्थानाधिपति.



श्रीमंत रामराव अमृतराव ऊर्फ आबासाहेब डफळे.
चीफ ऑफ जत.

हा

# मराठा कुळांचा इतिहास.

## भाग ३ रा.

मराठा–ज्ञातीची शिक्षण–विषयक बाबतीमधील शोचनीय स्थिति दूर करून,
तीस शिक्षणरूपी ज्ञानकिरणांच्या साह्यानें पूर्ण तेजस्वी बनविण्याबद्दल
ज्यांचे श्रम विशेष कारणीभूत होत आहेत; व जे आपलें सौजन्य,
औदार्य व निरभिमानता इत्यादि गुणांनीं सर्वत्रांस आपलेंसें करीत
आहेत; ते "**चव्हाण ऊर्फ डफळे**" घराण्यामध्यें जन्म घेणारे
मान्यवर, श्रीमंत **रामराव अमृतराव** ऊर्फ **आबासाहेब**
**डफळे**, चीफ ऑफ जत, यांस त्यांच्या अमोलिक
गुणांवर लुब्ध होऊन, हा तिसरा भाग कीं, ज्यामध्यें
त्यांच्या पूर्वजांची कैफियत प्रसिद्ध झालेली आहे
तो त्यांस अर्पण करीत आहों.

ग्रंथप्रकाशक.



# प्रस्तावना.

प्रिय बंधु, आज आपल्या हातीं " मराठा–कुळांचा इतिहास " ह्या ग्रंथाचा हा तिसरा भाग पडत आहे. ह्या भागास थोडा विलंब लागलेला आहे, यांत मुळींच संशय नाहीं; परंतु तो विलंब लागण्याचीं कारणेंही तशींच बलवत्तर आहेत. सदर इतिहासप्रसिद्धीचें काम किती त्रासाचें, यातायातीचें व खर्चाचें आहे, याची आपणांस थोडीबहुत तरी कल्पना असली, तर आपण आम्हांस सदर भाग वेळेवर प्रसिद्ध न केल्याबद्दल दोष देणार नाहीं. मूळ आमचा स्वतःचा प्रेस नसल्यामुळें, एवढा अवाढव्य ग्रंथ अगदीं कमी किंमतीमध्यें, दुसऱ्यांच्या मालकीच्या प्रेसमध्यें प्रसिद्ध करून साधणें मुळींच शक्य नसतें. बरें यदाकदाचित्, आश्रयदात्यांच्या संख्येच्या जोरावर हें काम वरील अडचण सोसूनही तडीस नेण्याचा प्रयत्न करावा, तर तिकडूनही निराशाच पदरीं येते. कारण प्रथम नांव नोंदून नंतर पुस्तकाची व्ही. पी. आल्यावर ती विनादिक्कत परत करून—आम्हांस ह्या महत्त्वाच्या कार्यीं सहाय्य करण्याऐवजीं उलट आमचाच प्रत्येकीं तीन तीन आण्यांचा जादा खर्च करविणारे हरीचे लाल जोंपर्यंत आपल्या समाजांत आहेत, तोंपर्यंत तरी आमच्याच नव्हे, परंतु सर्व सरस्वतीभक्तांच्या पदरीं अपेश हें ठेवलेलेंच आहे. आमच्या मराठासमाजामध्यें तरी असे वचनभ्रष्ट होणारे मोहरे निपजले नसतील, असें आम्हांस वाटत होतें; परंतु आमचा तो समज चुकीचा ठरला व मराठा कुळांचा इतिहास भाग २ रा ह्या ग्रंथाच्या बऱ्याचशा प्रती परत येऊन आमचें पुष्कळच नुकसान झालें. तें नुकसान भरून येण्यास बराच कालावधि लागेल; तरीही आम्हीं नाउमेद झालों नाहीं. एकवेळ हातीं घेतलेलें काम तडीस नेल्यावांचून त्यांत माघार घ्यावयाची नाहीं, असा आमचा बाणा आहे. मग त्या कार्यांत आमचें कितीही नुकसान होवो ! हा देह ज्या आपल्या ज्ञातिबांधवांच्या सेवेंत अर्पण केलेला आहे, त्या नश्वर देहाकडून समाजसेवेचें पवित्र व थोर कर्तव्य त्याच्या हयातीमध्यें अंशतः तरी व्हावें असा जो आमचा हेतु आहे, तो त्या जगन्नियंत्याच्या कृपेनें तडीस जावो व समाजसेवेचें पवित्र कार्य निश्चयानें व जोमानें तडीस नेण्यास तो विश्वचालक आम्हांस सामर्थ्यवान् करो ! अशी त्या जगचालकाच्या चरणीं आमची सप्रेम प्रार्थना आहे. त्या जगचालकाच्या प्रेरणेवरूनच आम्हीं ह्या महत्त्वाच्या कार्याच्या पूर्ण सिद्धीसाठीं " मराठामित्र प्रेस"ची संस्थापना करण्याचें योजिलें आहे. ह्या प्रेसचा एक एक शेअर वीस वीस रुपयांचा ठेविलेला आहे. तरी जर ईश्वरानें आपणांस यत्किंचित्ही सामर्थ्य दिलें असेल, तर आपण एखाद दुसरा शेअर ( भाग ) खरेदी करून ह्या ज्ञात्युद्धाराच्या पवित्र कार्यास मदत कराल अशी आशा आहे.

प्रिय बंधु ! आम्हीं आजपर्यंत " जाधव " " साळुंखे ऊर्फ पाटणकर " व " अंकलीकर शितोळे " ह्या घराण्यांच्या कैफियती दोन भागांमध्यें प्रसिद्ध केलेल्या आहेत. सदर कैफियती ऐतिहासिक माहितीनें भरपूर असून त्यांत कितपत नवीनत्व आहे, हें आपणांस सांगितलें पाहिजे असें नाहीं. त्या आपण प्रत्यक्ष वाचल्याच आहेत. शिवाय त्यांवर, श्रीयुत गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए., श्रीयुत लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे बी. ए. रा. ब. चिंतामण विनायक वैद्य एम्. ए. रा. सा. विनायक कोंडदेव ओक,

प्रो. अण्णा बाबाजी लठ्ठे एम् ए. डॉ. एम्. एच. मॅन वगैरे विद्वानांनीं आपले अनुकूल अभिप्राय दिलेले आहेत. त्याखेरीज केसरी, इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश, चिकित्सक, बकुल, प्रगति व श्री जिन-विजय वगैरे वृत्तपत्रकारांनीं तसेंच अनेक मासिकांच्या संपादकांनींही सदर भागांची वाखाणणी केलेली आहे. त्यावरून ह्या कार्याची योग्यता किती आहे ? व महाराष्ट्रांतील विद्वान् मंडळींनेंही ह्या कार्याकडे किती लक्ष वेधलें आहे, हें सहजच दिसून येईल. महाराष्ट्राचा संपूर्ण इतिहास अद्यापहि अपूर्णावस्थेमध्यें आहे. तो संपूर्ण व्हावा एतदर्थ रा. सा. दत्तात्रय बळवंत पारसनीस, रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, डॉ. सर भांडारकर, रा. सा. साने श्रीयुत खरे वगैरे प्रसिद्ध इतिहास–संशोधकांचे प्रयत्नही जारीनें सुरू आहेत. अशावेळीं ह्या मराठा-कुळांच्या इतिहासाच्या प्रसिद्धीनेंही वरील विद्वा-नांनीं आरंभिलेल्या कार्यास अंशतः सहाय्य केल्यासारखें होणारें आहे. अनेक गृहस्थांनीं अनेक मार्गांनीं प्रयत्न केला असतां हें इतिहास–प्रसिद्धीचें कार्य लांबणीवर पडावयाचें नाहीं. मात्र निरपेक्ष अंतःकरणानें खटपट करणाऱ्या व मेहनत घेणाऱ्या माणसांचीच आज महाराष्ट्रांत उणीव आहे. आम्हीं यथाशक्ति ह्या कार्यास हातभार लावीत आहोंच, तरी आमच्या मराठा–बांधवांनीं कीं, ज्यांच्या संग्रहीं आपआपल्या कुळांची ऐतिहासिक माहितीनें भरपूर अशीं कागदपत्रें असतील तीं त्यांनीं आमच्याकडे पाठवून ह्या कार्यास मदत करावी.

आजच्या ह्या तिसऱ्या भागीं "चव्हाण ऊर्फ डफळे" "ढवळचे पवार" "म्हसवडचे माने" "मोरे ऊर्फ धुळप" व "खळतकर देशमुख" वगैरे पांच इतिहासप्रसिद्ध घराण्यांच्या कैफियती प्रसिद्ध केलेल्या आहेत. ह्या कैफियती अनेक अप्रसिद्ध जुनीं कागदपत्रें, उपलब्ध साधनें, प्रचालित इतिहाससंदर्भ, अप्रकाशित पवाडे, जुन्या वंशावळी, इत्यादि साधनांवरून लिहिलेल्या आहेत. ज्या ज्या कुळांची माहिती संगतवार जुळवितां येणें शक्य होतें, त्यांची जुळविली आहे. व ज्यांची ऐतिहासिक माहितीच्या अभावीं जुळवितां येणें शक्य झालें नाहीं त्यांचीं अप्रसिद्ध पत्रें वगैरे देऊन त्या माहितीचा भावी इतिहासकारांस उपयोग व्हावा, अशा इच्छेनें प्रकाशित केलेली आहे. ह्या कैफियतींमध्यें आपणांस पुष्कळ नवीन व अप्रसिद्ध असा इतिहास आढळेल. सुप्रसिद्ध जावळीच्या मोऱ्यांची खरी व विश्वसनीय अशी वंशावळ आपल्या वाचनांत येईल. जावळीचे मोरे हेच दर्या-युद्धामध्यें नाणावलेलें महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध "धुळप" यांचेंच घराणें होय. हें आपल्या निदर्शनास येईल. ह्या कैफियतींवरून मराठावीरांनीं महाराष्ट्राची किती मोठी कामगिरी केली होती, तें सहजच आपल्या लक्षांत येईल. ह्या कुळांतील पुरुषांप्रमाणेंच अशीं मराठ्यांचीं शेंकडों कुळें आहेत कीं, ज्यांच्या मर्दुमकीचा इतिहास प्रसिद्ध भारतीय युद्धासही फिक्का पाडील. त्या सर्व कुळांचा इतिहास त्या त्या घराण्यांतील पुरुषांकडून त्यांच्या कुळांच्या हकीकतीचीं टांचणें, वंशावळी, अप्रसिद्ध कागदपत्र, सनदा व ताम्रपत्रें यांच्या नकला, तसेंच फोटो वगैरे जसजसे येत आहेत, त्याप्रमाणें आम्हीं लिहून प्रसिद्ध करीत आहों. अद्यापही ज्यांनीं आपल्या हकीकती पाठविल्या नसतील, त्यांनीं त्या त्वरित पाठविणें. मराठ्यांचा संपूर्ण इतिहास प्रकाशांत नसण्याचें कारण त्या त्या कुळांतील पुरु-षांची अनास्था होय ! त्या अनास्थेमुळेंच अनेक दंगेधोपे व धामधुमी यांमध्यें बऱ्याच ऐतिहासिक साधनांचा नाश झालेला आहे. तरी यानंतरही शिल्लक असलेलीं कागदपत्रें यांचा नाश होऊं न देतां ती प्रसिद्धीसाठीं आमच्याकडे पाठविल्यास त्यांच्याच कुळांतील पुरुषांचा कीर्तिप्रकाश उजेडांत यावयाचा आहे, हें आमच्या प्रियबांधवांनीं लक्षांत घ्यावें. शेवटीं त्या जगन्नियंत्याच्या पूर्ण कृपेनें आजचा हा तिसरा भाग शेवटास गेला, त्याचे आभार मानून ही प्रस्तावना पूर्ण करितो.

आपला नम्र सेवक,

मुंबई, ता० २१–७–१३.

**गोपाळ दाजीबा दळवी**

ग्रंथप्रकाशक.

# चव्हाण ऊर्फ डफळे घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

### अनुक्रमणिका.

# चव्हाण ऊर्फ डफळे घराण्याची कैफियत.

## भाग पहिला.

### डफळे घराण्याची पूर्वपीठिका.

महाराष्ट्रामध्यें मराठ्यांचीं जीं जीं प्राचीन व माननीय कुळें आहेत; त्यांपैकींच 'चव्हाण ऊर्फ डफळे' हें कुळ होय! ह्या कुळांतील पुरुषांचें आगमन केव्हां व कसें झालें त्यासंबंधाची माहिती कागदपत्रांच्या अभावीं उपलब्ध नाहीं, ही अत्यंत खेदाची गोष्ट होय! तरीही त्यामुळें सदर घराण्यांतील पुरुषांनीं जी मर्दुमकी प्रदर्शित केलेली आहे व आपल्या कुलाचें नांव अमर राखिलें आहे, त्यास मुळींच उणेपणा येत नाहीं. प्रथम ह्या कुळानें यवनांचें दास्य स्वीकारिलें व स्वामिनिष्ठेनें आपला सेवाधर्म यथोचित बजाविला. नंतर ह्या कुळानें स्वराज्याची सेवा केली, तीही त्यांनीं स्वामिनिष्ठेनें बजाविली; आणि सध्यां हें 'कुळ' ब्रिटिश राज्यकर्त्यांचीही सेवा पूर्ण राजनिष्ठेनें बजावित आहे. ह्या घराण्यांमध्यें केवळ पुरुषच नव्हे; परंतु स्त्रियाही राजसिंहासनावर विराजमान होणाऱ्या निपजल्या व त्यांनीं कैक वर्षें पूर्ण मुत्सद्दीगिरीनें राज्यशकट हांकिला, हें ह्या कुळामध्यें विशेष आहे. ज्या कुळामध्यें स्त्रियाही राजकार्यधुरंधर निपजल्या, त्या कुळामधील पुरुष सामान्य प्रतीचे असतील काय? सुप्रसिद्ध जिजाबाई व अहिल्याबाई यांचीं नांवें महाराष्ट्रेतिहासामध्यें देदिप्यमान ताऱ्याप्रमाणें प्रकाशित आहेत. जिजाबाईच्या उपदेशानें सुप्रसिद्ध शिवाजीसारखा महाराष्ट्रास गुलामगिरीमधून मुक्त करणारा व मराठा वीरांचें नांव चिरकाल राखणारा मोहरा उत्पन्न झाला. अहिल्याबाईसारखी राजकार्यधुरंधर व दानशूर स्त्री दुसरी कोणतीच उत्पन्न झाली नाहीं. ह्या दोन स्त्रीरत्नांची कीर्ति प्रकाशित होण्यास कारणेंही तशींच बलवत्तर झालेलीं होतीं; महाराष्ट्रामध्यें अशा प्रकारचीं अप्रसिद्ध पण कर्तबगारीनें युक्त अशीं स्त्रीरत्नें बरींच झालेलीं आहेत. सुप्रसिद्ध ताराबाई ह्या कमी योग्यतेच्या होत्या काय? ह्या स्त्रीमध्यें असामान्य धैर्य, काटकपणा, दृढनिश्चय, करारीपणा व आपल्या पक्षाची बाजू समर्थन करण्याची शक्ति अवर्णनीय अशी होती! जिनें आपल्या असामान्य धैर्यानें शाहूबरोबर विजोड संपादन करून, राज्याचे आधारस्तंभ असे मोठमोठे मुत्सद्दी वळवून घेतले व एक स्वतंत्र राज्य स्थापन केलें, तिची योग्यता केवढी मोठी असावी बरें? मराठ्यांच्या स्त्रिया पडद्यामध्यें राहणाऱ्या खऱ्या, परंतु त्या प्रसंगीं किती मर्दुमकीचीं कामें करितात, हें सुप्रसिद्ध ताराबाईच्या चरित्रावरून पूर्णपणें लक्षांत येईल. पेशव्यांसारख्या बलाढ्य शत्रूंचा बीमोड करण्याप्रीत्यर्थ ह्या बाईनें मराठी राज्याचें पुढील भवितव्य जाणून जी कंबर कसली होती, ती आपल्या हयातीपर्यंत ढिली केली नाहीं. तिनें अनेक राज्यकारस्थानें केलीं, शेंकडों मुत्सद्दीगिरीचे डावपेंच केले; परंतु तिच्या इच्छित हेतूस यश आलें नाहीं. मराठ्यांचें राज्य पेशव्यांच्या हातीं जाऊं नये म्हणून तिनें हरतऱ्हा केल्या; परंतु भवितव्यापुढें ह्या बाईचें कांहींच चाललें नाहीं. शेवटीं तीनही पेशवे मृत्यु पावतांच तीस संतोष झाला व ती "आतां मी सुखानें मरेन" असें म्हणाली. ह्या स्त्रीरत्नाचें कर्तृत्व अमोलिक होतें; त्याचप्रमाणें उमाबाई दाभाडे ह्या अमोलिक रत्नाची किंमत थोडी होती काय? ज्या स्त्रीनें स्वतःच्या प्रमुखत्वाखालीं अहमदाबाद शहर काबीज केलें, तें वीरनारीरत्न कसें असलें पाहिजे? तीही मराठ्याचीच स्त्री होतीना? तिची योग्यता थोडी होती काय? अशीं हीं मराठावीरांप्रमाणें मराठा स्त्रीरत्नेंहीं पूर्ण तेजस्वी होतीं. डफळे ऊर्फ चव्हाण घराण्यामध्येंही अशींच शूरवीर, व राज्यकार्यधुरंधर स्त्रीरत्नें निर्माण झालीं आहेत.

कृष्णा आणि भीमा नद्यांच्या मध्यें, सोलापुर जिल्ह्याच्या उत्तरेस, सांगली आणि मिरज संस्थानांच्या पश्चिमेस, बेळगांव जिल्ह्याच्या दक्षिणेस आणि विजापुर जिल्ह्याच्या पूर्वेस 'जत' ह्या नांवाचें संस्थान आहे. ह्या संस्थानाचा घेरावा ८८४ स्केअर मैलांचा असून, लोकसंख्या ६९८१४ आहे. उत्पन्न १७९६२५ असून ह्या स्टेटमध्यें सुमारें १२० गांवें आहेत. जत संस्थानच्या पश्चिमेस सुमारें १२ मैलांवर "डफळापूर" व दक्षिणेस सुमारें दहा मैलांवर 'उमराणी' हीं गांवें आहेत.

## यलदोजी चव्हाण.

डफळापूर येथील वतनदार पाटील "लखमोजी यलदोजी चव्हाण" हे ह्या घराण्याचे मूळ पुरुष होत. हे डफळापूरची पाटीलकी करून ‡शिलेदारी पेषानें रहात असत. यांचें गोत्र काश्यप, यांच्या पुत्रांनीं दौलत मिळविल्यावर यांचें चव्हाण हें आडनांव लुप्त होऊन "डफळे" असें पडलें. हे 'डफळापूर'चे राहणारे असल्यामुळें प्रसिद्धि पावतांच यांस "डफळे" असें म्हणूं लागले. अथणी तालुक्यांतील मौजे रामतीर्थ* येथील श्रीरामेश्वर देव हें यांचें कुलदैवत आहे.

## सटवाजीराव व धोंडजीराव.

मूळ लखमोजीराव यांस सटवाजीराव व धोंडजीराव असे दोन पुत्र होते. ते शूर होते. त्यांनीं इ० स० १६५० च्या सुमारास कांहीं फौज जमविली व विजापूरच्या आसपासच्या मुलखांत स्वतंत्र सत्ता चालविण्याचा उपक्रम सुरू केला; त्यामुळें बादशाही मुलखांत उपद्रव होऊं लागला, त्यावरून ह्यावेळचे विजापूरचे बादशहा सुलतान अल्ली अदीलशहा यांच्या कानीं त्यांच्या शूरत्वाच्या गोष्टी गेल्यामुळें त्यांस बोलावणें पाठविलें. त्याबरोबर ते बादशहाच्या भेटीस विजापुरीं गेले. जातेवेळीं "चिनगी साहेब" नांवाच्या अवलिया फकीराचें सटवाजीराव यांस दर्शन झालें. त्यानें "तुम्हांस यश व दौलत मिळेल, तुमच्यावर बादशहाची मर्जी प्रसन्न होईल" असा आशीर्वाद दिला. व सटवाजीराव यांच्या निशाणास काळा तुरा बांधला. या आशिर्वादाप्रमाणें पुढें सर्व गोष्टी घडून आल्यामुळें 'चिनगी साहेब' हे गुरु मानिले गेले व त्यांच्या वंशजास अद्यापही डफळे घराण्याकडून गुरूचा मान मिळत असतो.

सटवाजीराव हे विजापुरास जाऊन बादशहास भेटले. त्यावेळीं बादशहानें त्यांस आपल्या नोकरींत दाखल केलें. सटवाजीराव हे लढवय्ये व बाणेदार पुरुष असल्यामुळें त्यांनीं अनेक लढायांत यश मिळविलें. ह्या त्यांच्या कामगिरीनें खूष होऊन त्यावेळचे बादशहा शिकंदर सुलतान इब्नेअली आदिलशहा यांनीं आरबा सन १०६३ (इ० स० १६६३) या वर्षी परगणे जत, परगणे करजगी, परगणे व्हनवाड व परगणे बरडोल अशा चार परगण्यांचें देशमुखी वतन इनाम करून दिलें. यानंतरही सटवाजीरावांनीं विशेष मर्दुमकी दाखविल्यानें बादशहानें त्यांस दोनशें स्वारांची मनसब व वजिराचा हुद्दा दिला. हा हुद्दा दिल्याबद्दलचा हुकूम तारीख २१ माहे रबिलावल सन १०९२ हिजरी (इ० स० १६८०) रोजीं झाला. यानंतर सटवाजीराव यांनीं बादशहास ३,००० होन नजराणा देऊन बादशहाजवळून जकातीचे वगैरे हक्क मिळविले. हे हक्क मिळविल्याबद्दलची सनद ता. १२ मोहरम सन १०९३ हिजरी, (इ० स० १६८०) ची मिळालेली आहे.

यानंतर दिल्लीचा बादशहा औरंगजेब यानें, इ. स. १६८६ सालीं दक्षिणेंत येऊन विजापूरची बादशाही बुडविली. त्यावेळीं विजापुरच्या बादशहाच्या पदरचे बरेच सरदार दिल्लीच्या बादशहाच्या आश्रयास राहिले. पण सटवाजीरावांनीं औरंगजेबाचा आश्रय स्वीकारिला नाहीं, ते पूर्वीप्रमाणें स्वतंत्र सत्ता उपभोगूं लागले. त्यांनीं एके वेळीं बादशहाचा खजीना लुटला. त्या-

‡The Duflays were Deshmukhs of the Perguna of Jhutt, not far from Beejapoor, their original name was Chowan, and they acquired the Surname of Duflay from their Village of Duflapoor of which they were hereditary Patells. They held a Munsub, but no title from the Beejapoor Kings.

G. D. P. 74.

* हें गांव जतच्या दक्षिणेस सुमारें १४ मैलांवर आहे.

वरून बादशहांनीं त्यांस पकडून आणण्यास कांहीं लोक पाठविले; पण सटवाजीराव त्यांच्या हातीं लागले नाहींत. आपली नाचक्की होऊं नये, एतदर्थ त्या लोकांनीं सटवाजीरावांच्या ऐवजीं त्यांचे बंधु धोंडजीराव हे डफळापूरची पाटिलकी करून राहिले होते त्यांस पकडून बादशहाकडे नेलें. त्यानें त्यांस कैदेंत ठेविलें. ही बातमी सटवाजीराव यांस कळतांच त्यांनीं आपल्या बंधूच्या जीवास अपाय होऊं नये व आपल्या स्वतंत्रतेसही बादशहाकडून कांहीं हरकत होऊं नये म्हणून, बादशहाचे वजीर आसदखान यांजकडे संधान बांधिलें व त्यांच्या सल्ल्यानें बादशहास अर्ज केला. त्या अर्जांत असें लिहिलें होतें कीं, "मला शाश्वत पद व मानमरातब मिळतील तर मी बादशहाची सेवा करण्यास कबूल आहें." असा अर्ज केल्यावर त्यांची सेवा घेण्याचें पतकरिलें व मर्दुमकी दाखविण्याची आज्ञा केली. दक्षिणेकडील प्रांत काबीज करण्यासंबंधानें अशा शूर लोकांचा आपणांस किती तरी उपयोग होईल, हें वजिरानें बादशहास समजाविल्यावरून बादशहा कबूल झाला व त्यानें सटवाजीरावांस नोकरींत दाखल केलें व त्यांच्या बंधूस कैदमुक्त करून सटवाजीरावांच्या स्वाधीन केलें.

## बावाजीराव.

सटवाजीराव यांस दोन पुत्र होते. त्यांतील वडील पुत्र बावाजीराव हे शूर व कर्ते पुरुष होते. धाकटे खानाजीराव हे तरूणपणींच मृत्यु पावले. बावाजीराव हे आपली फौज घेऊन बादशाही सैन्यांत नोकरी करूं लागले.

मोंगल बादशहांची जी दक्षिण देश जिंकण्याची अत्यंत प्रबल महत्त्वाकांक्षा ती कधींही पूर्ण झालेली नव्हती. त्यांनीं आपणांकडून शक्य ते प्रयत्न केले. प्रत्येक मोंगल बादशहानें दक्षिण देश काबीज करण्यासाठीं अविश्रांत श्रम घेतले; परंतु ती त्यांची इच्छा पूर्णपणें शेवटास गेली नाहीं. रजपुतांसारख्या तेजस्वी नरवीरांसही त्यांनीं जिंकून आपल्या हुकमतीखालीं आणिलें; पण मराठा शूर वीरांपुढें त्यांनीं हात टेंकले. औरंगजेब पक्का खुनशी व हिंदुधर्मद्वेष्टा होता. त्यानें यवन बादशाही बुडविण्यास माघार घेतली नाहीं. मग मराठशाही बुडविण्याचे त्याचे प्रयत्न किती अचाट असले पाहिजेत, हें आपण अनुमानानेंच ताडलें पाहिजे. अकबरबादशहानेंही दक्षिण काबीज करण्यासंबंधानें महा प्रयास केले तरी ते त्याचे प्रयत्न फुकट गेले. जहांगीरनें थोडी खटपट केली पण त्यास यश आलें नाहीं. औरंगजेबानें प्रथम सरदार वगैरे पाठवून दक्षिण काबीज करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा तोही प्रयत्न विफल झाला. त्यावरून त्यानें स्वतः मोठी फौज बरोबर घेऊन दक्षिण बुडविण्याचा निश्चय केला. तरी त्याचा तोही प्रयत्न निष्फळ होऊन शेवटीं तो याच मोहिमेंत मृत्यु पावला. औरंगजेबांनीं दक्षिणेवर जी *स्वारी केली ती अवाढव्य अशा स्वरूपाची होती. तिची यथार्थ कल्पना यावी एतदर्थ या ठिकाणीं थोडेंसें वर्णन देत आहों:—

"कुदळी, पावडी घेतलेले हजारों लोक सर्वांपुढें रस्ता साफ करीत जात होते. त्यांच्या मागें बादशहाचा प्रचंड तोफखाना व घोडेस्वार चालत. मध्यंतरीं असंख्य उंटें, हत्ती व गाडे असून त्यांवर बादशहाचें जड जवाहीर, खजिना, सरकारी कामाचीं दप्तरें, खाण्याचे व इतर जिन्नस, कपडेलत्ते, पिण्याकरितां गंगाजल व आणखी अनेक प्रकारचें सामान भरलेलें असे. त्याच्या मागें खुद्द बादशहाची स्वारी हत्तीवर, घोड्यावर किंवा पालखींत बसून येई. बादशहाच्या मागें व पुढें खास पागेचे स्वार चालत. बादशहाच्या स्वारीपाठीमागें जनानखाना चाले. जनानखान्याबरोबर घोड्यांवर स्वार झालेल्या लढाऊ बायकांचा तांडा व एक हलका तोफखाना चालत असे. सर्वांमागून लढाऊ पायदळ येत असे. छावणीच्या मुक्कामाचें सर्व सामान दुहेरी असून पुढील मुक्काम तयार झाल्याशिवाय मागचा मुक्काम उठत नसे. बादशहाचा मुक्काम म्हणजे एकप्रती दिल्लीशहर वसत असे. सर्वांच्या मध्यभागीं बादशहाचे तंबू असून येथून सर्व भागीं जाण्याकरितां भव्य रस्ते केलेले असत. प्रत्येक रस्त्याच्या नाक्यावर तोफखान्याचा पहारा असे."

* सरदेसाईकृत मुसलमानी रियासद. पृष्ठ ७१८-१९

ह्या प्रकारचा त्याच्या स्वारीचा थाट होता. या वेळीं बादशहाच्या लष्कराची गणना एका इटली देशच्या डॉक्टर कॅरेरी या नांवाच्या गृहस्थानें प्रत्यक्ष पाहिल्यावरून केलेली होती. तो म्हणतो कीं, "त्या वेळीं बादशहाची लढाऊ फौज ६० हजार स्वार व एक लक्ष पायदळ इतकी असून, शिवाय ओझ्या-करितां ५० हजार उंटें व ३ हजार हत्ती होते; परंतु नोकर-चाकर, व्यापारी व कारागीर इत्यादि सर्व प्रकारचे लोक धरिले असतां, बादशहाबरोबर एकंदर पांच लाख मनुष्य होतें. शेवटीं त्या प्रवाशानें असाही शेरा मारिला आहे कीं, बादशहाची फौज ३ लाख स्वार व ४ लाख पायदळ इतकी होती, असें म्हण-ण्यास हरकत नाहीं. छावणीमध्यें एकंदर २५० बाजार असून तिचा विस्तार सुमारें तीस मैला-पर्यंत असे."

ह्या स्वारीबरोबर निरनिराळे अंमलदार होते. त्यांत आपले बाबाजीराव हेही होते. दक्षिण काबीज करीत करीत ज्या वेळीं, औरंगजेब साताऱ्याचा 'अजिमतारा' हा किल्ला घेण्यासाठीं आला; त्या वेळीं त्याच्या सैन्यास तो एकटा किल्ला घेण्यासंबंधानें अतोनात त्रास पडला. त्या वेळचे शिवाजी महा-राजांच्या हुकमतीखालचे किल्ले घेणें हें काम सुलभ नव्हतें. एकादेवेळीं एकादा किल्ला यांच्या हातीं मह-त्प्रयासानें लागलाच, तरी मोंगलांची पाठ होतांच त्याचा कबजा मराठ्यांकडे जात असे. अजिम-ताऱ्याची नाकेबंदी करून औरंगजेब एकसारखा चार महिने लढत होता; पण किल्ला सर होण्याचें चिन्ह दिसेना. त्या किल्ल्यावर श्री शिवाजी महा-राजांच्या तालमींतील मराठ्यांचा कुशल व पराक्रमी सरदार प्रयागजी प्रभु या नांवाचा होता. त्यानें किल्ल्याच्या संरक्षणार्थ अप्रतिम कौशल्य व वीरत्व दाखविलें. मोंगल सैन्याचा हल्ला येतांच प्रयागजी किल्ल्याच्या तटावरून मोठमोठाले दगड लोटून देई. त्यामुळें बादशाही सैन्याचा पुष्कळ नाश होई. ह्या-प्रमाणें चार महिने त्यानें किल्ला लढविला. शेवटीं मोंगल सरदार तरबीयतखान यानें किल्ल्याचे ईशान्ये-कडील मंगळाईचे बुरुजाखालीं सुरुंग लावून किल्ल्या-च्या तटास खिंडार पाडलें. त्या खिंडारांत दोन्ही पक्षांची आणीबाणीची चकमक झडली. त्या चकम-कींत बाबाजीराव डफळे हे अग्रभागीं होते. त्यांनीं आपली फौज पुढें घालून मोठ्या पराक्रमानें तो बुरूज सर केला व त्यावर आपलें निशाण लाविलें. त्यावेळेपासून त्या बुरुजास 'डफळ्या बुरूज' असें नांव पडलें आहे, (इ० स० १६९९). या लढाईंत बाबाजीराव यांना फारच जखमा झाल्या म्हणून ते आपल्या गांवीं परत जावयास निघाले; पण रस्त्यां-तच मौजें करंजें ता० खानापूर या गांवीं त्यांचा अंत झाला.

बाबाजीराव हे मोठे शूर व धाडसी पुरुष होते. त्यांचे वडील सटवाजीराव यांनीं बादशहाची नोकरी एकनिष्ठपणें करण्याचें वचन दिल्याप्रमाणें ते वागले, म्हणून बादशाहा आलमगीर (औरंगजेब) यानें सटवाजीरावांस जत, करजगी, व्हनवाड आणि बरडोल अशा चार परगण्यांचें देशमुखी वतन जें पूर्वी विजापूर बादशाहीमधून चालत होतें, तें चालू केलें. जत व करजगी हे दोन परगणे जहागिरीदाखल वंश-परंपरा इनाम चालावे म्हणून सनद करून दिली. शिवाय सहा हजारीपणाचें पद व पांच हजार स्वारांची मनसब, चौरी, मोर्चेल, डंका, निशाण, हत्ती, घोडा, नत, ऐवज व वाटखर्च याप्रमाणें दिल्याची सनद छ० १६ जिलकाद सन जिलुस राज शक ४२ (इ० स० १७००) ची करून दिलेली आहे. याप्रमाणें जहागीर मिळाल्यावर सटवाजीराव यांनीं आपल्या राजधानीचें ठाणें जतगांवीं केलें. त्या दिवसापासून हे डफळपुराहून आल्याकारणानें ह्या चव्हाण वंशास डफळे असें म्हणूं लागले. सटवाजीराव हे इ० स० १७०१ सालीं मृत्यु पावले.

## येसुबाई ऊर्फ आऊसाहेब.

सटवाजीरावांच्या हयातींत त्यांचे दोन्ही पुत्र मरण पावल्यामुळें त्यांच्या पश्चात् त्यांची वडील सून (बाबाजीराव यांचें कुटुंब) मौजें सरकुली येथील भोंसले यांची कन्या येसुबाई ऊर्फ आऊसाहेब ह्या गादीवर बसल्या. या साध्वी स्त्रीनें यथान्याय राज्यकारभार केला. रयतेकडून नियमित वसूल घेणें, वतनदारांचे हक सांभाळणें, फिर्यादी स्वतः ऐकणें या कामीं त्यांनीं फारच दक्षता

ठेविली होती. त्या पूर्ण ईश्वरभक्त होत्या. त्यांचा ओढा पुण्यकर्माकडे विशेष होता. त्यांनीं आपल्या प्रजेचें इतकें प्रेम संपादन केलेलें होतें कीं, सर्व लोक त्यांस राजकीय हक्क सांभाळण्यास पूर्णपणें मदत करीत असत. इतकेंच नव्हे, तर त्यांस देवीचा अवतार समजत. हा त्यांचा लौकिक त्या संस्थानांत अद्यापहि कायम आहे, राजवाड्यांतील एका सोप्यांत आऊसाहेबांचे मुखवटे बसविले असून, अद्यापहि त्यांची पूजा–अर्चा नित्य होत असते. या जागेस आऊसाहेबांची सदर ( सोपा ) असें म्हणतात. त्यांच्या नांवानें अद्यापहि कित्येक भाविक लोक दिव्य व नवस करितात. आऊसाहेबांनीं ५४ वर्षे राज्यकारभार केला. त्यांच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांत राजक्रांति चालली होती, परंतु यांनीं आपली जहागीर उत्तम प्रकारें सांभाळली.

येसूबाई ऊर्फ आऊसाहेबांनीं संस्थानच्या मालकी-संबंधानें आपल्या पश्चात् तंटेबखेडे होऊं नयेत म्हणून त्यांचे दीर सटवाजीराव यांच्या चौघां पुत्रांस इ० स० १७३८ सालीं ‘ असोषजहा ’ यांच्या विद्यमानें जहागिरीचे चार भाग करून दिले. त्या चौघां पुत्रांत यशवंतराव वडील म्हणून त्यांस मोठा हिस्सा दिला व त्यांनीं जत मुक्कामीं रहावें म्हणून ठराविलें. दुसरे पुत्र रामराव यांना हुलजंती ठाणें नेमून दिलें. तिसरे पुत्र भगवंतराव यांस उमराणी हें ठाणें नेमून दिलें व चौथे पुत्र मुकुंदराव यांस मौजें दरीं कोणुर हें गांव नेमून देऊन त्यांना स्वारां-बरोबर सार्वभौम सरकारचे पथकांत नोकरी करण्यास नेमिलें. याप्रमाणें श्रीमती आऊसाहेबांनीं चौघां भावांची व्यवस्था केली. तथापि ही व्यवस्था आपल्या पश्चात् कायम राहण्याविषयीं त्यांनीं सातारचे महाराज सरकारकडून मंजुरी मिळविण्यासाठीं प्रयत्न केला. त्यावेळचे सातारा येथील श्रीमंत छत्रपति शाहू महाराज यांनीं श्रीमती आऊसाहेबांचें म्हणणें मान्य करून ह्या चौघांस वारसदार मालक म्हणून कबूल केल्याबद्दलचीं पत्रें करून दिलीं, तीं पत्रें येणेंप्रमाणें:–

‘ गंगाजळ निर्मळ आऊसाहेब डफळे यांस आज्ञा केली ऐसीजे. तुम्हीं स्वामी सन्निध विनंती केली कीं, आपण वतनदार पातशाही मनसबदार पुरातन राज्यातील सेवक महत्कार्य करून सेवा करून दाखविली. प्रस्तुत आपलें म्हातारपण झालें, पोटीं पुत्रसंतान नाहीं. पुढें वृत्तीस अधिकारी पाहिजे. याकरितां शेख्याजीराव चव्हाण याचे चार नातू म्हणजे खानजीरावाचे पुत्र यांस आपले वारस म्हणोन आम्हीं कबूल केले आहेत. ता. ११ जमादिलावल सन ११५७ फसली ’–ता० २९ माहे एप्रील सन १७४८ ह्या सालची सनद करून दिली. ’

यशवंतराव, रामराव, भगवंतराव व मुकुंदराव या चौघां भावांच्या नांवें महाराज सरकारनें सनद करून दिली. तींत—

‘ येसुबाई चव्हाण यांनीं हुजूर विनंती केली कीं, खानाजीरावांच्या पोटीं तुम्हीं चौघे पुत्र आहांत सबब तुम्हांस ओटींत घातल्यास आपलें जिणे मरणेस कामास येऊन वतन अनभवून आपलें नांव राखतील ’ यावरून मनास आणून स्वामी तुम्हांवर कृपाळू होऊन तुम्हांस येसूबाईचें ओटींत घातलें आहे. तर तुम्हीं त्यांचे मनोगतानुरूप वर्तोन पुत्रत्वें सेवा करोन परंपरागत वतन अनुभवून पातशाही मनसबा व जहागीर रक्षोन वंशपरंपरेनें सुखरूप राहणें जाणिजे छ० १० माहे जमादिलाखर सूरसन सम्मान अरबेनमया व आलफ. ’

या सनदांस राजपत्रें म्हणतात.

इ० स० १७५२–५३ सालचें एक पत्र उपलब्ध झालें आहे, त्यांत येसूबाई डफळे यांनीं कसबें सांवर्डे हा गांव लुटून नेला व त्या गांवाच्या पाटलास कैद

करून नेलें होतें, त्यास सोडण्यासंबंधानें शाहूमहाराजांनीं पत्र लिहिलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

'येसूबाई डफळी यांसी आज्ञा जे, कसबा सांवर्डे हा गांव खासगीकडे असतां तुम्हीं त्या गांवास स्वारी करून गांव लुटून नेला आणि पाटलांस धरून नेला, त्यास चाळीस रुपये खंड बांधलास म्हणून विदित झालें तुम्हांस त्या गांवाशी तालुखा काय? याउपरी गांवची माल मालियेत, सुतळीचा तोडा जो नेला असेल तो देखत पत्र गांवच्या गांवास देऊन कबज घेऊन हुजूर पाठविणें. पाटील मजकुरास सोडून देणें. या कामास मल्हारजी गायकवाड हुजरे यासी देणें रुपये १०. सलास अमसैन मया व अल्फ जिलकाद.

शाहूमहाराज यांची रोजनिशी पृ० २५७

मूळ दौलत संपादक सटवाजीराव यांचे धाकटे पुत्र खानाजीराव यांचे चौघे पुत्र दौलतीचे मालक झाल्याबरोबर यशवंतराव यांनीं जतेस, रामराव, यांनीं हलजंतीस, भगवंतराव यांनीं उमराणीस, येणेंप्रमाणें ठाणीं केलीं व तेथें आपापले वाडे बांधिले. या चौघां भावांपैकीं, मुकुंदराव यांनीं आपणास थोडें उत्पन्न मिळालें त्यास आपण राजी नाहीं, म्हणून आपला हिस्सा पतकरिला नाहीं. सबब त्या हिश्याचें उत्पन्न वडील हिस्सेदार यांजकडे राहिलें. तें उत्पन्न मुकुंदरावाचे वंशजांस अद्यापही मिळालेलें नाहीं. उमराणी सरंजामाचे संपादक भगवंतराव बिन खानाजीराव हे असल्यामुळें त्यांचे कारकीर्दीपासून उमराणी सरंजामच्या इतिहासास आरंभ होतो. तथापि जतकर हुलजंतीकर येथील मालक यशवंतराव व भगवंतराव हे सख्खे बंधु असोन कित्येक बाबतींत त्यांचें ऐक्य होतें व तंटेही झालेले आहेत.

आऊसाहेबांनीं सन ११६४ फसली ( इ० स० १७५४ ) पर्यंत जतेस राहून राज्यकारभार केला. पुढें वृद्धापकाळामुळें राज्यकारभार सोडून त्या रामतीर्थ येथें श्री सोमेश्वर देवाची सेवा करण्याची इच्छा झाल्यावरून मौजे उमराणी येथें भगवंतरावाजवळ राहिल्या. कारण रामतीर्थ उमराणीपासून तीन मैलांच्या पल्ल्यावर होतें. त्याच ठिकाणीं सन ११६७ ( इ० स० १७५७ ) फसली सालीं उमराणीच्या वाड्यांत यांनीं आपला देह ठेविला. उमराणीस त्यांची एक मोठी समाधि आहे.

## यशवंतराव.

आऊसाहेब वारल्यानंतर संस्थानचे मालकीसंबंधानें डफळापूरकरांनीं बखेडा सुरू केला. मूळ दौलतसंपादक सटवाजीराव यांचे धाकटे बंधु धोंडजीराव यांचे पुत्र नानाजीराव यांची स्त्री बहिणाबाई यांनीं यशवंतराव यांस गादीवर बसूं न देतां आपण स्वतः गादीवर बसून राज्यकारभार सुरू केला. तसेंच त्यांनीं उमराणीचे वाड्यांतून भगवंतराव यांचीं सर्व माणसें बाहेर काढून त्यांचीं सनदापत्रें वगैरे कागद हिसकावून घेतले व उमराणी सरंजाम आपल्या ताब्यांत घेतला. यासंबंधें भगवंतराव यांनीं पेशवे सरकारांत फिर्याद करून चौकशी करविली. अखेरीस सुत सम्मान शितैन मया व आलफ छ १० साबान रोजीं श्रीमंत माधवराव बल्लाळ पेशवे यांनीं उमराणी वगैरे पंधरा हजार रुपयांचा सरंजाम जो भगवंतराव डफळे यांजकडे पूर्वीपासून चालत आला होता तो पुढें चालविण्याचा हुकूम केला व राऊतानिशीं इमानें इतबारें चाकरी करण्याचा करार करून घेऊन सनद करून दिली. आणि बहिणाबाई डफळे यांस याच तारखेस पेशवे सरकारकडून अशी ताकीद देण्यांत आली कीं, "उमराणी गांवचें ठाणें भगवंतरावांकडून घेऊन ठाण्याच्या सनदाही घेतल्या व पर्जन्याच्या कालीं तुम्हीं त्यांचीं मुलेंमाणसेंही बाहेर काढलीं तरी पेशजीप्रमाणें सरंजाम करार करून भगवंतराव यांस दिला आहे तरी उमराणी ठाण्याचा ऐवज जो आकारेल तो पंधरा हजारांत वजा करून बाकी ऐवजाबद्दल दुसरे गांव नेमून द्यावे" असा हुकूम झाला. "शिवाय या हुकमाचा अम्मल करून भगवंतरावांच्या ताब्यांत उमराणी ठाणें देण्याबद्दल, आणि यांस रावतानिशीं आपले दिमतीस चाकरी घ्यावी म्हणून आनंदराव भिकाजी रास्ते यांचे नांवे पेशवे सरकारांतून हुकूम झाले आहेत, ( सन १७६७ )."

## अमृतराव.

यशवंतराव हे ११७० फसली ( इ० स० १७५९ ) च्या सुमारास निवर्तले. त्यांचे पुत्र अमृतराव यांनीं बहिणाबाईजवळून गादी मिळविली. त्यांनीं पेशवे सरकारांत दावा मांडिल्यावरून त्या वेळचे बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं बहिणाबाईकडून परगणे जत व परगणे करजगी येथील मामलत काढून घेऊन अमृतराव व रामराव यांस सांगितली. तें पत्र येणेंप्रमाणेः—

"परगणे जत व परगणे करजगी येथील मामलत साल मजकुरी दूर करून अमृतराव व रामराव डफळे यांजकडे सांगितली असे. तरी संस्थानमध्यें माल मलायत वस्तभाव व हत्ती घोडीं; व गुरें वगैरे जिन्नस जरा—बजरा दरोबस्त दोन महाल ठाणीं सुद्धां मशार निल्हेचे स्वाधीन करून पावल्याचे कबज वेणें याशिवाय संस्थानसंबंधें कर्ज झालें असेल त्याचे हवाले मशार निल्हेकडे देणें. निशा करून देतील. म्हणोन बहिणाबाई डफळी यांस छ २० रजब सनद लष्कर सनद १.

इहिदे सीतेन मया व अलफ जिष

( इ० स० १७६०–६१ )

बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी, पृ० १३४

ह्यांप्रमाणें अमृतराव यांनीं बहिणाबाईजवळून गादी मिळविली. ते कर्नाटकावरील व दुसऱ्याही अनेक लढायांमध्यें पेशव्यांबरोबर आपल्या लष्करासहीत होते. त्यांच्या वेळीं पुण्याच्या रास्त्यानीं जत संस्थानच्या ताब्यांतील बिरुळ गांव काबीज केलें होतें तें अमृतरावांनीं रास्त्यांबरोबर लढून पुनः मिळविलें. ते इ० स० १८०० मध्यें मृत्यु पावले.

त्यांस दोन पुत्र होते.

## खानाजीराव.

अमृतरावांच्या दोन पुत्रांपैकीं धाकटे परशरामराव हे अल्पवयांतच वारले व वडील पुत्र खानाजीराव ( दुसरे ) हे गादीवर बसले. हेही आपल्या वडिलांप्रमाणेंच नेहमीं अनेक लढायांत पेशव्यांबरोबर असत. इ० स० १७९५ मध्यें जी खर्ड्याची सुप्रसिद्ध लढाई झाली तींत हे होते. ते इ० स० १८१६ मध्यें निवर्तले.

खानाजीराव यांस दोन स्त्रिया रेणुकाबाई व साळुबाई ह्या नांवाच्या होत्या.

## रेणुकाबाई.

खानाजीरावांच्या दोन स्त्रियांपैकीं वडील रेणुकाबाई ह्या अत्यंत हुशार होत्या. त्या खानाजीराव जिवंत असतांनांच सर्व राज्याकारभार पहात असत. खानाजीरावांच्या मृत्यूनंतर रेणुका-बाई गादीवर बसल्या. पुढें लवकरच म्हणजे इ० स० १८१८ सालीं इंग्रजसरकारनीं पेशव्यांचें राज्य खालसा केल्यावर रेणुकाबाईनीं ईस्ट इंडिया कंपनीतर्फे क्यापटन जेम्स ग्रँटसाहेब बहादूर यांजबरोबर तहनामा ( ट्रीटी ) केला. त्यांत रेणुकाबाईनें सातारचे छत्रपति महाराजांचे आज्ञेत रहावें. फौजेच्या नोकरीकरितां जत व करजगी महालाची जहागीर आहे ती पूर्णपणें रेणुकाबाईचे स्वाधीन करून कायम केली आहे. पेशवे सरकारचे वेळीं पांचशें स्वार नोकरीस ठेवण्याचा करार झाला होता. पण मुलुख खराब वगैरे कारणानें फक्त दोनशें स्वारांची नोकरी रेणुकाबाईकडून घेण्यांत येत होती. त्यापैकीं ३/४ स्वारांची नोकरी माफ होऊन फक्त पन्नास स्वारांनिशी महाराज सरकारकडे नोकरी व्हावी असा ठराव झाला. शिवाय त्यावेळीं चालू असलेली गांवें, व इनाम जमिनी, वर्षासनें, देवस्थान, धर्मादाय, रोजींदार, खैरात, नेमणुकी, दरक, हीं सर्व पुढें चालवावीं वगैरे कलमें या तहांत ठरलेलीं आहेत. रेणुकाबाई फसली सन १२३२ ( इ० स० १८२३ ) त निवर्तल्या.

**साळुबाईः**—त्यानंतर खानाजीरावांच्या धाकट्या पत्नी साळुबाई ह्या गादीवर बसल्या. पण त्यांनीं फक्त

दहा महिनेच राज्योपभोग घेतला व पुढें त्याही निवर्तल्या.

**रामरावः**—खानाजीराव यांस पुत्र नसल्यामुळें साळुबाईच्या मरणोत्तर जहागीर बेवारस ठरवून साताऱ्याच्या महाराज सरकारांनीं जप्त केली. ( इ० स० १८२४.) परंतु हुलजंतीकर रामराव विन खानाजीराव यांचे नातू रामराव नारायणराव यांनीं इ० स० १७४८ च्या राजपत्राप्रमाणें, आपण वारस असल्याचें सिद्ध केल्यावरून त्यांना इ० स० १८२४ त जत संस्थानची मालकी मिळाली. यामुळें हुलजंतीकर पहिले रामराव यांना सन १७३८ त मिळालेलें उत्पन्न जत जहागिरींत सामील झालें. रामराव हे भाद्रपद शु॥ ६ सन १८३५ रोजीं मयत झाले.

**भागिरथीबाईः**—नंतर त्यांच्या पत्नी भागिरथीबाई यांनीं राज्यकारभार चालविला. त्यांनीं साताऱ्याच्या महाराजांच्या परवानगीनें उमराणीकर भगवंतराव यांच्या घराण्यांतील भीमराव भगवंतराव डफळे यांस ता० २८ जुलै सन १८४१ रोजीं दत्तक घेतलें व त्यांचें नांव अमृतराव ठेविलें. त्यावेळीं त्यांचें वय फक्त ७ वर्षांचें होतें. ह्या भागिरथीबाई जेष्ठ व॥ ७ सन १८४५ रोजीं मरण पावल्या व तोंपर्यंत त्यांनीं स्वतः राज्यकारभार चालविला. त्यांच्या मरणोत्तर जहागिरीचा बंदोबस्त करण्याचें काम सखोजीराव सावंत यांजकडे देण्यात आलें, तें त्यांनीं अमृतरावांस पूर्ण अधिकार मिळेपर्यंत उत्तम प्रकारें बजाविलें.

**अमृतरावः**—अमृतराव वयांत आल्यावर इ० स० १८५५ त त्यांच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं. यांस पुत्रसंतान नव्हतें. फक्त एक मुलगी होती. तिचें लग्न श्रीमंत सरदार प्रतापसिंग भोंसले सातारा यांच्याशीं झालेलें होतें. ते ता० ११ जानेवारी सन १८९२ रोजीं पुणें मुक्कामीं निवर्तले. यांस लक्ष्मीबाई व आनंदीबाई या नांवाच्या दोन स्त्रिया होत्या. त्यांपैकीं वडील लक्ष्मीबाई यांच्या विनंतीवरून मे० पो० ए० साहेब बहादूर कोल्हापूर व सदर्न मराठा कंट्री यांनीं उमराणीकरांचा मूळ पुरुष भगवंतराव यांचे वंशांतील परशरामराव माधवराव डफळे यांचे चवथे पुत्र यांस जत संस्थानचे गादीस वारसदार केलें आणि त्यांना दत्तक देऊन त्यांचें नांव रामराव ऊर्फ आबासाहेब डफळे असें ठेविलें. ही गोष्ट ता० १६ जानेवारी सन १८९३ रोजीं घडली.

## रामराव ऊर्फ आबासाहेब.

त्यावेळीं त्यांचें वय सात वर्षांचें होतें. इंग्रज सरकारानें त्यांच्या शिक्षणाची उत्तम प्रकारची व्यवस्था केली. त्यांस उत्तम प्रतीच्या इंग्रज गुरूंच्या शिक्षेखालीं ६ वर्षें कोल्हापुरास ठेविण्यांत आलें. आणि त्यानंतर इ० स० १९०३ मध्यें राजकोटच्या राजकुमार कॉलेजमध्यें पाठविलें. त्या ठिकाणीं त्यांनीं तीन वर्षें अभ्यास करून उत्तमोत्तम गति मिळविली व पहिला नंबर मिळवून डिप्लोमा मिळविला. त्याचप्रमाणें अनेक शारिरिक खेळांमध्येंही प्राविण्य मिळविलें. घोडयावर बसणें, शिकार करणें, क्रिकेट, टेनिस, पोलो वगैरे खेळांत त्यांनीं प्राविण्य मिळविलें.

राजकोट कॉलेज मधील त्यांचा अभ्यासक्रम पूर्ण होतांच त्यांस ता. ११ जुलै १९०७ रोजीं संस्थानची पूर्ण मुखत्यारी देण्यांत आली. यांचें लग्न कै० वा० अक्कलकोटच्या महाराजांच्या दुसऱ्या कन्येशीं–श्रीमंत पुतळाराजा यांच्याशीं झालेलें आहे व त्यांपासून महाराजांस सरदार विजयसिंग या नांवाचें एक पुत्ररत्नही झालेलें आहे. श्रीमंत रामराव ऊर्फ आबासाहेब डफळे हे विनयशील असून फारच नम्र स्वभावाचे आहेत. त्यांच्याविषयीं प्रत्येक मराठ्यास अत्यंत अभिमान वाटत आहे. हल्लींच नागपूर मुक्कामीं जी मराठ्यांची परिषद् भरली होती, तिचें त्यांस अध्यक्षस्थान देण्यांत आलेलें होतें. त्या प्रसंगीं त्यांनीं आपल्या भाषणांत जें सौजन्य दाखविलें, तें मनन करण्यासारखें आहे. ईश्वर श्रीमंतांस सुखी ठेवो !

## उमराणीकर-डफळे.

उमराणीचे संपादक भगवंतराव यांना तीन औरस पुत्र होते. त्यांत वडील बुवाजीराव, दुसरे यशवंतराव व तिसरे राणोजीराव, वडील बुवाजीराव हे सरंजामाचे मालक झाले. त्यांनीं आपल्या धाकट्या दोन बंधूंना प्रत्येकीं पोटगी निर्वाहासाठीं सरंजाम शेरीपैकीं जमीन पाऊणचाहूर नवटांक याप्रमाणें दिली व एकेक वाडा वेगळा देऊन त्यांची राहण्याची वगैरे व्यवस्था केली. बुवाजीराव यांस दोन पुत्र होते. त्यांतील वडील परशरामराव व धाकटे भगवंतराव ऊर्फ

नानासाहेब. परशरामराव हे वडील असल्यामुळें त्यांस सरंजामाची मालकी मिळाली. त्यांनीं भगवंतराव यांस पोटगी निर्वाहाकरितां सरंजामापैकीं शेरी व देशमुखीच्या इनामजमिनी आणि राहण्यास एक वाडा देऊन त्यांची व्यवस्था केली. परशरामराव हे फसली सन १२३२ त निवर्तले. त्यावेळीं त्यांचें एकुलतें एक पुत्ररत्न नारायणराव ऊर्फ आपासाहेब हे अल्पवयी असल्यामुळें त्यांचे चुलते भगवंतराव ऊर्फ नानासाहेब यांनीं सरंजामाचा कारभार पहावा असें सातारचे छत्रपतिमहाराजांनीं ठरविलें. आणि त्यांजकडून रीतसर करारनामा लिहून घेऊन त्यांजकडे सरंजामाचा कारभार संपविला. त्यांनीं नारायणराव सज्ञान होईपर्यंत कारभार केला व फसली सन १२४२ त नारायणराव सज्ञान झाल्यावर सर्व कारभार त्यांच्या स्वाधीन केला. नारायणरावांचे अज्ञानावस्थेंत भगवंतराव यांनीं पुष्कळ लोकांस जमिनी इनाम करून दिल्या होत्या; परंतु नारायणरावांनीं सज्ञान होऊन कारभार हातीं घेतांच अनाधिकारानें दिलेल्या इनाम जमिनी परत घेतल्या. फसली सन १२३८ च्या पूर्वी गांवच्या सरकारी हिशोबांत जमिनीचें वर्णन चाहूर, १ अर्धाचाहूर, पावचाहूर, नवटाक, साडेचार टाक -॥- -।- ८९ ८४॥ सवादोन टाक याप्रमाणें लिहीत असत. परंतु अदम- ८२। साहेबाच्या कारकीर्दींत मोजणी होऊन फसलीसन १२३८ पासून चाहूर, बिघे, पांड असें लिहिण्याची पद्धत सुरू झाली. नारायणराव हे फसली सन१२७३ त निवर्तले. यांनां दोन स्त्रिया होत्या. पण संतती नव्हती. वडील स्त्री ललाबाई ह्या जत येथील सावाजीराव सावंत यांच्या कन्या. व दुसऱ्या कोल्हापूरचे विचारे यांच्या कन्या. नारायणरावांच्या पश्चात् उभयतां बायांनीं सरंजामाची वहिवाट केली. पुढें ता. ५ माहे मे सन १८७७ रोजीं ललाबाई ह्या जत मुक्कामीं मरण पावल्या व त्यानंतर तारीख १५ माहे आक्टोबर सन १८९१ रोजीं लक्ष्मीबाई ह्या कोल्हापुरीं मरण पावल्या. त्यामुळें त्या वेळचे साताऱ्याचे असिस्टंट पोलिटिकल एजंट मेहेरबान ए. सिव्हन साहेब व पोलिटिकल एजंट प्राट साहेब बहादूर यांजमध्यें उमराणी येथील सरंजाम जप्त करून जत संस्थानास जोडावा किंवा ब्रिटिश सरकारांत घ्यावा या संबंधानें पत्रव्यवहार चालून बरीच वाटाघाट सुरू झाली होती. परंतु मध्यभागाचे कमिशनर साहेब बहादुर यांचे एलीएनेशन डिपार्टमेंटमध्यें तपास करितां ही सरंजमाची देणगी मूळ इ० स० १७३८ त दिली असून पुढें भांडण उपस्थित झाल्यामुळें श्रीमंत माधवराव बल्लाळ पेशवे यांनीं पूर्ण चौकशी करून इ० स० १७६७ मध्यें पुनः सनद करून दिली आहे. असें तपासाअंती दिसून आलें. यावरून मूळ दौलत संपादक भगवंतराव डफळे ह्या वडील वारसाकडे हा सरंजाम चालावा असा हुकूम झाल्यावर साताऱ्याचे पो. ए. यांनीं परशरामराव डफळे हे वडील वारसदार असल्यामुळें त्यांच्या स्वाधीन ता. २८ माहे सपटेंबर सन १८८२ रोजी उमराणी सरंजाम करण्यांत आला. श्री. परशरामराव डफळे यांस दोन पुत्र आहेत, वडील बुवाजीराव हे तेरा वर्षांचे असून धाकटे अमृतराव हे सात वर्षांचे आहेत.

राणोजीरावांस वंश नाहीं.

मूळ दौलत संपादक भगवंतराव यांचे नातू भगवंतराव बिन बुवाजीराव यांस दोन पुत्र, वडील पुत्राचें नांव रामराव ऊर्फ भाऊसाहेब व धाकट्याचें नांव भीमराव ऊर्फ रावसाहेब. रामराव यांस दोन पुत्र वडील परशरामराव ऊर्फ दाजी साहेब ( यांसच उमरावीचा सरंजाम देण्यांत आला.) व धाकटे भगवंतराव ऊर्फ नानासाहेब. भगवंतराव ऊर्फ नानासाहेब हे ता. ९ माहे दिसेंबर १९०३ इसवी रोजीं उमराणी येथें मृत्यू पावले. त्यांस चार पुत्र आहेत. वडील दत्ताजीराव, दुसरे शंकरराव, तिसरे माधवराव व चौथे सुबराव, भीमराव यांस जत जतसंस्थानचे मालक रामराव ऊर्फ आबासाहेब यांची स्त्री भागिरथीबाई यांनीं इ० स० १८४१ त दत्तक घेऊन संस्थानचे मालक केलें.

मूळ दौलत संपादक भगवंतराव यांचे दुसरे पुत्ररत्न यशवंतराव यांस पुत्र दोन. वडील माधवराव हे ता. ११ माहे आगष्ट सन १८९० रोजीं उमराणी येथें मयत झाले. त्यांस पुत्र दोन. वडील परशरामराव ऊर्फ दाजीसाहेब व धाकटे आबासाहेब. परश-

रामराव हे ता. ३० एप्रील १९०४ रोजीं उमराणी येथें मृत्यु पावले, यांस पुत्र पांच. वडील नारायणराव ऊर्फ आप्पासाहेब. दुसरे बापुसाहेब, तिसरे बाळासाहेब हे इंपेरियल क्याडेटकोर मध्यें शिकून परिक्षा उत्तीर्ण जाहले. ते हल्लीं ब्रिटीश राज्यांत लेफटनंटच्या लष्करी हुद्यावर आहेत. चवथे बुवासाहेब हे जत संस्थानचे मालक जाहले. हेच हल्लीं जत संस्थानचा राज्य कारभार पूर्ण मुखत्यारीनें चालवीत आहेत. पांचवे दादासाहेब.

अप्पासाहेब यांस 'रावसाहेब', बाळासाहेब यांस 'प्रतापराव' व आबासाहेबांस 'पिलाजीराव' ह्या प्रमाणें पुत्र आहेत. बळवंतराव यशवंतराव हे ता० २१ माहे सप्टेंबर सन १९०२ रोजीं उमराणी येथें धनुर्वातानें मरण पावले. यांस रामराव बाबासाहेब असे पुत्र आहेत. वडील रामराव यांस बाळासाहेब व बाबासाहेब यांस प्रथम कुटुंबापासून तात्यासाहेब आणि द्वितीय कुटुंबापासून अण्णासाहेब व शंकरराव असे पुत्र आहेत.

जत संस्थानाकडून चारशें पन्नास स्वारांची सार्वभौम सरकारच्या सनदेप्रमाणें नोकरी व्हावयाची होती; ही नोकरी ज्यावेळीं सार्वभौम सरकारास लष्करचें कारण पडेल त्यावेळेपुरती होत असे. परंतु डफळे यांचा मुलूख खराब, वारंवार अवर्षणें पडून वसूल बरोबर होत नसल्यामुळें स्वारांची संख्या कमी करून फक्त २० स्वारांची नोकरी सार्वभौम सरकार घेत असत. उमराणी सरंजामाकडून वीस स्वारांची नोकरी सनदेप्रमाणें होणें योग्य होतें. परंतु तीही वरील कारणांमुळेंच कमीं झाली व स्वारांची संख्या कमी होऊन एक खासा असामी व नऊ स्वार नोकरी करीत असत. उमराणी सरंजामदारांकडील दहा स्वारांसहित जत संस्थानचे स्वारांची वरील संख्या होती. ही वहिवाट इ० स० १८१९ पर्यंत चालली. पुढें पेशव्यांचें राज्य खालसा झाल्यावर इ० स० १८२० च्या एप्रील महिन्यांत ब्रिटिश सरकाराशीं डफळे यांचा तह झाला. त्यावेळीं डफळे यांजवर मेहेरबानी करून ३ स्वारांच्या नोकरीची माफी देण्यांत आली. त्यावेळीं फक्त पन्नास स्वारांनिशीं नोकरी व्हावी व ते स्वार साताऱ्यास सतत हजर रहावेत असें ठरलें. त्याचप्रमाणें उमराणीस सरंजामदारांकडून २। स्वारांनिशीं नोकरी घेण्याचें ठरलें. त्यांत दोन स्वार ऐन जिनसी व पाव स्वाराबद्दल नक्त पगार देणेचा ठराव झाला. ह्याप्रमाणें १८२० पासून १८६६ पर्यंत निर्वेध नोकरी बजाविण्यांत आली. इ० स० १८६६ पासून ऐन जिनसी स्वारांची नोकरी घेण्याचें ब्रिटिशसरकारनीं बंद केलें आणि दरसाल प्रत्येक स्वाराबद्दल १२८ रुपये याप्रमाणें पन्नास स्वारांचा आकार ६४०० रुपये देण्याचें ठरलें. या ठरावाप्रमाणें उमराणी सरंजामदार २। स्वारांबद्दल दर साल २८८ रुपये स्वार खंडणीबद्दल हा वेळपर्यंत देत आहेत. बाकीचे जतचे संस्थानिक देत असतात.

उमराणी गांवची लोकसंख्या २५०० असून सर्व्हे सेटलमेंट होण्यापूर्वी या गांवाचा कमाल आकार ११२५० रुपये होता. इ० स० १८७९ पासून सर्व्हे सेटलमेंट जाहल्यापासून रुपये ६७१८ . कमाल आकार जाहला व हल्लीं ८५०० आहे.

येणें प्रमाणें उमराणीकर डफळे यांची कैफियत आहे. सध्या उमराणीचे सरंजामदार श्री. परशरामराव डफळे हे असून त्यांचा स्वभाव फारच मनमिळाऊ आहे. मराठ्यांबद्दल त्यांस अभिमान वाटत असून त्यांची दीन स्थिति सुधरण्याबद्दल ते अव्याहत खटपट करीत असतात.

ईश्वर या डफळे घराण्यास, वैभव, बल, आयुष्य संतती व कीर्ती देवो !

समाप्त.



# ढवळचे पवार घराण्याची कैफियत.

## भाग २ रा.

## अनुक्रमणिका.

ॐ

# ढवळचे पवार घराण्याची कैफियत.

## भाग २ रा.

### परमार ऊर्फ पवार घराण्याचे प्राचीनत्त्व.

महाराष्ट्रामध्यें मराठ्यांचीं जीं प्राचीन व थोर कुलें आहेत; त्यांपैकींच "परमार ऊर्फ पवार" हें एक घराणें आहे. ज्या घराण्यामध्यें मोठमोठे रथी, महारथी उत्पन्न होऊन, त्यांनीं आपल्या आंगच्या मर्दुमकीनें 'महाराष्ट्राची' अवर्णनीय अशी सेवा केली आहे त्या घराण्याबद्दल प्रत्येक महाराष्ट्रीयाची पूज्य बुद्धि असणें साहजिक आहे. ह्या घराण्याचें 'प्राचिनत्व' प्रस्थापित करण्यासारखी सबळ कारण जरी आज आमच्या हातीं नसलीं तरी पण, पुराणद्वारें व इतर उपलब्ध पुराव्यावरून ह्या माननीय घराण्याची पुर्वपीठिका साधार आहे, असें कोणासही समजण्यासारखें आहे.

पुराणदृष्टया ह्या घराण्याच्या उत्पत्तीची कथा अशा प्रकारची आहे कीं, "फार प्राचीनकालीं "सुमित्र" ह्या नांवाचा एक राजा होता; तो पुत्र-संताना–विरहित मृत्यू पावला. त्यावरून धर्माचें पालन करण्यासाठीं, वसिष्ठानें ब्रह्मदेवाची प्राथना केली. त्याबरोबर साक्षात् ब्रह्मदेव दर्शन देते झाले. त्यासमयीं वसिष्ठांनीं आपल्या संकटाचें त्यांस कथन केलें. त्यावरून उभयतांनींही श्री महाविष्णुची स्तुति केली. त्यावेळीं अंतरिक्षामधून अशी वाणी झाली कीं, "तुम्हीं यज्ञ करावा. त्या यज्ञामधून, माझ्याच अंशा-पासून उत्पन्न झालेला, यज्ञाचें संरक्षण करणारा एक वीर शस्त्रास्त्रांसुद्धां उत्पन्न होईल." अशा प्रकारची वाणी ऐकतांच वसिष्ठांनीं "*अर्बुद" नांवाच्या पर्वतावर यज्ञास प्रारंभ केला. त्यावेळीं यज्ञकुंडामधून "अग्निपलख किंवा अग्निपाळ" ह्या नांवाचा राजा उत्पन्न झाला. तेव्हां ब्रह्मदेवाचे मुखा-तून "परमार" अशी वाणी निघाली. त्यावरून तो 'परमार' ह्या नांवानें प्रसिद्धिस आला. त्यानें यज्ञास आलेल्या विघ्नाचें निवारण केलें व यज्ञाची सांगता केली. ह्यास वसिष्ठानें आपला मानसपुत्र कल्पून त्यास क्षत्रियधर्म शिकविला व राज्याभिषेक केला. यानें भरतखंडास सुख प्राप्त करून दिलें. त्याचीं राज्यें "जंबू" "महिष्मती नगरी" इकडे असावीं. ह्या अग्निपाळ राजाचें गोत्र वसिष्ठ, वेद धनु, शाखा वाजसेनीय, प्रवर (वसिष्ठ-शक्ति-पराशर) असून, कुलदेवता देवी कालिका, उपासना काळभैरव श्रीक्षेत्र काशीवासी, स्थान अर्बुदगड, स्थापनाधाररक्षक मारुती असें होतें." परमार ऊर्फ पवार घराण्याच्या उत्पत्तीसंबंधाची दुसरी एक कथाः—

"परमार, परिहार, सालुंके आणि चव्हाण" ह्या चार कुळांस अग्निकुळें असें म्हणतात. हीं चार कुळें इ० स० पूर्वी २०० वर्षें हिंदुस्थानांत आलीं असलीं पाहिजेत. बौद्धधर्माचा प्रसार होऊन वैदिक धर्माचा ऱ्हास होत आहे. असें अवलोकन करितांच, बौद्ध-धर्माच्या उच्चाटणासाठीं ह्या कुलांस पाचारण केलेलें असावें. ह्या कुलाच्या उत्पत्तीसंबंधीं चंदभाट यानें आपल्या रजपुत *रासामध्यें अशी हकीकत दिलेली आहे कीं, "एके काळीं क्षत्रिय अधर्मी आणि पापी होऊन प्रजेस पीडा करूं लागल्यामुळें, जमदग्निचा पुत्र परशुराम यानें एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केली. त्यावेळीं त्याच्या हातून आपलें संरक्षण व्हावें. एतदर्थ कित्येक क्षत्रिय आपणांस भाट म्हणवूं लागले. तर कित्येकांनीं स्त्रियांचा वेष घेऊन प्राण संरक्षण केला; अशारीतीनें त्यावेळीं क्षत्रियांचें संरक्षण झालें व सर्व सत्ता ब्राह्मणांच्या स्वाधीन झाली व ते राज्योप-भोग घेऊं लागले. नर्मदेच्या तीरीं महिष्मती या

* अबूचा पहाड.

* राजस्थानचा इतिहास.

नांवाचें एक नगर होतें, तेथें हैहयकार्त वीर्यार्जुन या नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें परशुरामाच्या बापास मारलें होतें. त्या राजाच्या ह्या कृतीमुळें परशुरामास क्रोध येऊन त्यानें क्षत्रियांचें निःकंदन करण्याचें आरंभिलें होतें.

ब्राह्मणांनीं राज्यकारभारास सुरवात केली खरी, परंतु शाप देणें अगर आशिर्वाद देणें हींच त्यांचीं दोन शस्त्रें असल्यामुळें, बाहुबळाच्या अभावामुळें राज्यामध्यें बेबंदशाही माजूं लागली. सबंध देशांत अज्ञान आणि अविश्वास यांचा फैलाव होऊं लागला. जुलमगारांच्या जुलमास प्रजा त्रासली. त्यांस कोठेंही आश्रय मिळेना. अशाप्रकारचें हें घोर संकट पाहून राजर्षि विश्वामित्र अत्यंत चिंतातुर झाले. क्षत्रियांस पुनरपी जिवंत करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यावेळीं 'अर्बुद' पर्वतावर अनेक धर्मनिष्ठ ऋषी तपश्चर्या करीत असत. त्याच पर्वतावर राजर्षि विश्वामित्र यांनीं तप करण्याचा आरंभ केला. दुष्टलोकांच्या जुलमानें दुःखी होऊन अबूच्या पर्वतावरील ऋषींनीं क्षीरसागरनिवासी श्रीहरीची प्रार्थना आरंभिली. त्यावेळीं परमेश्वरानें क्षत्रिय ज्ञातीस पुनरपी निर्माण करण्यासंबंधानें ऋषींस आज्ञा केली. परमेश्वराची आज्ञा होतांच ऋषींनीं अबूवरील अग्निकुंडें धुवून स्वच्छ केलीं व अनेक प्रकारचीं स्तुतिस्तोत्रें म्हणण्यास सुरवात केली. तसेंच इंद्राचें स्मरण करून एक पुतळा बनविला व त्याजवर अमृतकुंडामधील उदक छाटून त्यास जिवंत केलें व अग्निकुंडांत टाकिलें व संजिवनी मंत्र म्हणण्यास सुरवात केली.त्याच वेळीं त्या अग्निकुंडामधून अग्निच्या ज्वाळामधून एक अपूर्व मूर्ती वर आली. तिच्या उजव्या हस्तामध्यें गदा असून ती मुखानें "मार मार" हे शब्द उच्चारित होती. त्यावेळीं देवांनीं त्याचें नांव 'प्रमार' (परमार) ठेविलें. व त्यास ताबडतोब आबु, धरा (धारा) आणि उज्जनी हीं राज्यें अर्पण करण्यांत आलीं.

ह्या प्रमाणेंच चुलुक अथवा सोळंखी यांची उत्पत्ति करून त्यास अनहिलपुर पाटण येथील राज्य दिलें. नंतर तिसरा 'परिहार' उत्पन्न केला व त्यास मारवाडामधील नऊ स्थानें अर्पण केलीं.व शेवटीं चौहाण-चव्हाण याची उत्पत्ति केली व त्यास मकावती न र दिलें. ह्या अग्निकुळांनीं शत्रूंचा नाश करून जिकडे तिकडे शांतता प्रस्थापित केली."

ह्या परमार ऊर्फ पवार घराण्याचें राज्य ज्या अबूच्या पर्वतावर होतें. त्या अबूच्या पर्वतासंबंधीं एक चमत्कारिक कथा पुराणांत वर्णन केलेली आहे, ती अशी कीं, "श्री महादेवाचा" "अर्बुद" ह्या नांवाचा एक गण होता. त्यास पाय मुळींच नव्हते. एकेवेळीं असा चमत्कार झाला कीं, एक गाय चिखलांत रुतून मोठ्यानें हंबरडा फोडूं लागली. तो ध्वनी अर्बुदाच्या कानीं आला व त्यास फार वाईट वाटलें. तो मनांत म्हणूं लागला कीं, जर मला पाय असते तर मी त्या धेनूला काढून आणिली असती. पण त्याचा नाइलाज होता. जसजसा गाईचा ध्वनी त्याच्या कानीं पडे तसतसें त्यास अत्यंत दुःख होई. शेवटीं तो तसाच सरपटत त्या गाईकडे आला व जवळ जाऊन शक्य त्या उपायानें त्या गाईची चिखलांतून मुक्तता करण्याचा प्रयत्न करूं लागला. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, त्याचा प्रयत्न शेवटास न जातां उलट तोसुद्धां चिखलांत रुतला. त्याबरोबर त्यानें श्रीशंकराची आराधना आरंभिली. त्यावेळीं साक्षात् महादेव प्रसन्न होऊन त्यांनीं स्वतः गाईस चिखलांतून काढिलें व अर्बुदास म्हणाले तूं परोपकारी आहेस खरा. परंतु तुझी आयुष्यमर्यादा संपली आहे, यासाठीं तुला जें कांहीं मागणें असेल तें माग. त्यावर 'आपण निरंतर मजजवळ रहावें' हें मागणें मागितलें. तेव्हां शंकर म्हणालेः—"तूं पवतरूपानें राहशील व मीही तुजपाशींच आहे. तुझ्या ठिकाणीं जे कोणी उपासक इच्छा धरून बसतील त्यांचे हेतू त्वरित सिद्धीस जातील. व ह्या ठिकाणीं अपूर्व वनस्पतीही होतील." अशा प्रकारें कथा आढळते. ह्या अबू पर्वतावर मोठमोठीं भुयारें, खंदक, अघोरी लोकांचे थवे व चमत्कारिक देवस्थानें दृष्टीस पडतात. वसिष्ठांनीं केलेल्या यज्ञाच्या खुणांपैकीं, कित्येक अद्याप त्या त्या नांवानें प्रसिद्ध आहेत. ह्या ठिकाणींच 'आदित्यराय परमार' यानें राज्य स्थापिलें होतें.

ह्या उत्पत्तीसंबंधीं कथा ज्या ज्या पुराणांत अगर ग्रंथांत पूर्वीच्या पुरुषांनीं लिहून ठेविल्या आहेत, त्या सकृतदर्शनीं जरी असंभाव्य अशा वाटल्या, तरी

शहाण्या माणसांनीं त्यांतील मथितार्थ घेण्यास मात्र विसरूं नये. खोडसाळ व असंभाव्य असा जो भाग असेल तो रद्द करून त्या हकीकतींचा उपयोग करून घेणें इष्ट आहे. पुराणें लिहिणारांनीं तीं त्यावेळच्या समुहाच्या अभिरुचीस अनुकूल अशीं लिहिलीं असलीं पाहिजेत. त्यांतील अद्भुतरसात्मक गोष्टींवर आतां जरी आपण विश्वास ठेवीत नाहीं, तरी पण तात्विक दृष्टया त्या अद्भुत गोष्टींचें नीट मनन केल्यास आपणांस त्यांतील मथितार्थ काढतां येतो. स्वधर्मावर जी श्रद्धा आहे, ती अव्याहत टिकावी येतदर्थ अनेक थोर पुरुषांनीं प्रयत्न केलेले, आहेत. त्यांचीं वर्णनें जर त्या कालच्या पुराणकारांनीं अश्रुतपूर्व व सध्यां आपणांस असंभाव्य वाटणारीं अशीं केलीं नसतीं तर अधुनिक पुरुषांनीं त्या पुराणांतील गोष्टींवर खात्रीनें विश्वास ठेविला असता. उदाहरणार्थ पुराणांतलि राक्षसांचीं वर्णनें वाचून आपणांस कवींच्या कल्पनेची कींव आल्यासारखें वाटतें. त्यांनीं त्यांचीं वर्णनें करितांना त्यांचें तोंड ४ योजनें लांब व हात आठ योजनें लांब अशीं करून बहुजन समुहाच्या अंतःकरणांत वेदधर्मावर विश्वास न ठेवणाऱ्या लोकांविषयीं तिरस्कार उत्पन्न केला. व त्यांची भेसूर कल्पना करून त्यांस राक्षसांची उपमा दिली. व ज्यांनीं वेदधर्म रक्षण करण्यास मदत केली. त्यांस उच्चपदवीस बसविलें. पुराणकारांनीं असा हा द्राविडी प्राणायाम न करितां, त्यांचीं अचाट व असंभाव्य अशीं वर्णनें न देतां, तीं संभवनीय अशीं देऊन आपल्या मताचें समर्थन केलें असतें तरी चाललें असतें. त्यांच्या ह्या कृतीपासून पुराणांतील स्पष्ट स्वरूपाकडे ज्ञात्याचें चित्र आकर्पिलें जात नाहीं. व पुराणें हीं सर्वत्र असंभाव्य गोष्टींनीं भरलीं आहेत. अतएव तीं विश्वास ठेवण्यास योग्य नाहींत असा त्यांचा समज होत आहे. तरी आपण पुराणांतील गोष्टींचा तात्विक दृष्टया उपयोग करून घेतला पाहिजे. त्यांतील मर्म सूक्ष्मपणें लक्षांत यावें एतदर्थ कोणासही ह्या कथा वाचून मनन करावयाच्या असतील तर त्या त्यांनीं तात्विकदृष्टीनेंच मनन केल्या पाहिजेत.

परमार ऊर्फ पवार ह्या घराण्याच्या पौराणिक कथेवर जरी आपण विश्वास ठेविला नाहीं, तरी त्यांच्या प्राचिनत्वास बाध येऊं शकत नाहीं. हें कुळ-अग्निकुळ ह्या सदरा खालीं गणलें गेलें आहे. ज्या प्रमाणें 'अग्नि, 'विस्तव ' प्रखर असतो, तो कोणासही हातावर घेतां येत नाहीं. उलट तो कोपला असतां सर्व भस्मीभूतच करून टाकण्यासारखा प्रखरस्वरूपी असतो, असा जो अग्निचा स्वभाव गुणधर्म आहे, तो ह्या कुळांत पूर्णपणें असल्यामुळेंच ह्यांस 'अग्निकुळें' ही संज्ञा मिळाली असली पाहिजे. 'प्रमार' परिहार, साळुंखे आणि चव्हाण ' ह्या चार अग्निकुळांतील पुरुषांची कर्तबगारी जरी आपण अवलोकन केली तरी आपल्या नजरेस आम्हीं म्हणतो तेंच येईल. 'प्रमार, परिहार, साळुंखे आणि चव्हाण' ह्या कुळांमध्यें असे अनेक पुरुष निर्माण झालेले आहेत कीं, त्यांनीं आपल्या अश्रुतपूर्व पराक्रमानें, कर्तृत्वानें, तेजःपुंजतेनें आणि बुद्धिमत्तेनें सर्व हिंदुस्थानास अभिमान बाळगावयास लाविलें आहे. ज्या प्रमार ऊर्फ पवार घराण्यानें आपल्या आंगच्या मुदुमकीनें सर्व पृथ्वी पादाक्रांत करून उलट ती सर्वत्रांस विभागून दिली त्या पवार घराण्याची थोरवी किती वरें वर्णन करावी ? ज्या पवार कुळामध्यें 'विक्रमादित्या ' सारखे प्रसिद्ध दानशूर, विद्वान्, पराक्रमी, शूर, वीर, व परदुःखभंजन नृपती जन्मास आले; भोजराजासारखे, विद्वानांचे पोशिंदे, विद्वानांस लाखो नव्हें पण कोडो रुपये देणारे व नवरत्नांचा संग्रह करणारे विद्वान् भूपती उत्पन्न झाले; त्या कुळाबद्दल आपणांस अभिमान वाटावयास नको काय ? असे जे वीरमणी ज्या प्रमार कुलामध्यें उत्पन्न झाले त्या प्रमार कुलाची अमीशीं तुलना केल्यास वावगें होणार नाहीं.

कित्येक इतिहासकारांचें असें अनुमान आहे कीं, ह्या कुलांस 'इराणा ' मधून पाचारण केलें असावें, अगर हीं कुळें, मूळ 'आर्य ' ज्याकालीं हिंदुस्थानाच्या भागीं वसाहतीस आले, त्याकालीं आलेलीं नसून, आर्यांच्या ज्या टोळ्या निरनिराळ्या दिशांस विभागल्या गेल्या त्यांपैकीं, जी एक टोळी 'इराण ' मध्यें गेलेली होती त्या टोळीपैकीं वरील कुळांचे पुरुषांस तत्कालिन थोर पुरुषांनीं पाचारण केलें. व त्यावेळीं त्यांनीं हिंदुस्थानांत आगमन केलें. ते अग्न्यो-

पासक असल्यामुळें त्यांस अग्निकुलें म्हणतात. असेंही अनुमान केलें आहे; हीं अग्निकुळें येथें येऊन त्यांनीं आपलें वास्तव्य करितांच बुद्धधर्म उच्चाटणार्थ त्यांस त्यावेळच्या मंडळींनीं पुढारी केलें. अशा विषयीं पालीभाषेंतील ग्रंथांत लिहिलें असोन, बौद्धधर्मियांसही यांजविषयीं माहिती होती. कोणी बुद्धधर्माचा पार्श्वनाथ नांवाचा सत्पुरुष क्षत्रिय असून तक्षक कुलजात असल्यानें अशा पुण्य पुरुषाचें सर्प हें लांछन धारण करण्यांत हे मोठा अभिमान बाळगीत असत. वैदिक धर्मसंरक्षणार्थ असमर्थ झालेल्या काळीं अग्निवंश पुरातन श्रुतिधर्म स्थापण्यासाठीं ईशेच्छेनें अस्तित्वांत आला असें त्या लोकांचें म्हणणें आहे; परंतु ह्या घराण्याचा जो प्राचीनपणा वर्णिलेला आहे, त्याकडे पाहतां हें अनुमान चुकीचें ठरतें. असो.

कित्येक ठिकाणीं मराठ्यांच्या ९६ कुळांची उत्पत्ति निराळ्याच प्रकारानें दिलेली आहे "इ० स० च्या पूर्वी ३२६ वर्षे हिंदुस्थानांत चंद्रगुप्त नांवाचा महापराक्रमी राजा होऊन गेला. यानें बहार ( मगध ) प्रांतांतील नंद राजाचें राज्य मोडून त्या ठिकाणीं आपलें राज्य स्थापन केलें. व पाटलीपुत्र म्हणजे हल्लीं ज्यास 'पाटणा' असें म्हणतात तें त्यानें आपलें राजधानीचें शहर केलें. ह्या इतिहासप्रसिद्ध चंद्रगुप्तापासून सोमशर्म्यापर्यंत एकंदर सात राजे झाले. त्या वेळीं चव्हाण, मोरे, पवार, राष्ट्रकुंड, धर्मपाल, अनंग ह्याप्रमाणें सहाकुळीं अस्तित्वांत होत्या. ह्या सहाकुळांपासूनच पुढें मराठ्यांच्या* ९६ व रजपुतांच्या छत्तीस कुळी प्रचारांत आल्या." असें म्हटलेलें आहे; पण हें अनुमान साधक बाधक प्रमाणानें कितपत सत्याच्या कसोटीस पोंचेल तें सांगतां येणार नाहीं. 'प्रमार' हें नांव कसें पडलें असावें यासंबंधानें एके ठिकाणीं असा उल्लेख आढळतो कीं, 'ययाति' राजाचा पांचवा पुत्र 'पुरू' यापासून 'जरासंधा' पर्यंत व जरासंधापासून ६६ वा पुरुष 'पार्णमास' या नांवापासून 'परमार' या नांवाची उत्पत्ति झालेली आहे.'

तसेंच दुसऱ्या एका ठिकाणीं असा उल्लेख आढळतो कीं' ययातिराजाचे एकंदर पांच पुत्र; त्या सर्वांत कनिष्ठ पुत्र 'पुरु' पुरुपासून क्षेमक राजापर्यंत पुरुवंश असें भागवतामध्यें सांगितलें आहे. ते सर्व पुरु राजाचीं आपत्यें असल्यामुळें "पुरोर्युवायत्यं पौरव; पौरव याचा अपभ्रंश पवार.* " परमार हे नांव कसेंहीं उत्पन्न झालेलें असो पण त्या कुळांतील पुरुषांचें प्राचीनत्व सिद्ध होत आहे यांत मुळींच संशय नाहीं. या कुळांतील पुरुषांनीं महेश्वर, धार, मंडु, उज्जनी, चितोड, गिरिराज, अबु-चंद्रवती, मडु, परमावती, उमरकोट, बेखेर, पट्टण इत्यादि ठिकाणीं राज्यें केल्याबद्दल आधार आहेत. अन्हिलपूर येथील द्रव्यवान् व धुरंधर राजास ह्या परमार वंशजांनीं द्रव्य व पौरुष इत्यादि गुणांत मागें टाकून राज्यविस्तारांतही त्यांचा तोरा आपणांपुढें चालूं दिला नाहीं. असें उपलब्ध हकीकतीवरून दिसतें. परमार घराण्यामध्यें एकंदर ३।४ भोजराजे झाले. मुंजपुत्र भोज याविषयीं तर संशयच नाहीं. बाकीच्या ३ भोजराजांपैकीं कालिदासादि पंडित नवरत्नांचा भोक्ता भोजराजा कोणता? याविषयीं इतिहासांत अद्यापही मतभेद आहे. ह्या परमार घराण्याच्या एकंदर ३५ +शाखा असून त्यांची योग्यता मोठी आहे. त्यांपैकीं कांहीं उपलब्ध शाखा याखालीं देत आहो.

१ **सोदाः**–हिंदुस्थानांतील अरण्यांपैकीं सिंध देशांत धात येथील मांडलीक राजे.

२ **साकळः**—पुगळ व मेवाडांतील कांहीं भागाचे राजे.

३ **खैरः**—खैराळु म्हणून गायकवाड सरकारचे अंमलखालीं एक गांव आहे तेथील राजे. ( हल्लीं त्यांचें तेथें कांहीं नाहीं. )

* राजस्थानचा इतिहास.

* हिंदुस्थानामध्यें, अग्निकुळें चार. परमार, मोरे, चव्हाण, साळुंके. हीं रजपूत कुलें आहेत, विक्रम शकापूर्वी गुजराथेंत परमार कुळ आलें. हें कुळ फार जुने काळापासून अबूजवळ चंद्रावती नगरींत सत्ताधारी होतें. इ. स. ७८० पावेतों गुजराथ द्वीपकल्प मध्यें परमार राजे राज्य करीत होते. त्यांजपासून कनकसेन यानें मोठी सत्ता होती ती घेतली.

गुजराथ सर्व संग्रह पृ. ६९

\+ टॉड राजस्थान.

४ विहील:—चंद्रवतीचे राज.

५ मेपावत:—हल्लीं मेवाडांतील विजोली संस्थानचें राज्य त्यांचेच वंशाचे स्वाधीन आहे.

६ बुल्हेर:—उत्तरेकडील अरण्यांत.

७ काबे:—पूर्वी सौराष्ट्रांत ( काठेवाडांत )

८ उमठा:—उमठवाडाच्या राजांनीं मेवाडांत १२ पिढ्यांत राज्य केलें. नंतर परमारांनीं दक्षिणेंत ढवळ येथें येऊन राज्योपभोग घेतला.

९ मोरी:—प्रसिद्ध राजा चंद्रगुप्त व चितोडच्या गेहलोट वंशापूर्वीचे राणे याच शाखेंतील होत.

१० उमरा—

११ सुमरा—ह्या दोन शाखा प्रथम अरण्यांत निघून गेल्या, व हल्लीं या शाखेचे लोक मुसलमानधर्मी आहेत.

१२ रेहर—१३ धुंडा, १४ सारेटिया, १५ हरेर ( माळव्यांत ) १६ खोंडा, १७ खेजर, १८ सुगर, १९ बरकोटा, २० पुतीनी, २१ सामपाळ, २२ भींवा, २३ कालपूसर, २४ कुलमोह, २५ कोहील, २६ पूप २७ कहोरिया, २८ दंड, २९ डिवा, ३० बरहर, ३१ जिपरा, ३२ पोसर, ३३ धुंटा, ३४ रिकमव, ३५ टिका. ह्या शाखांचा शोध लागत नाहीं.

महान् विख्यात् चंदावरदाई भाट यानें आपल्या रजपूत रासा नामक ग्रंथामध्यें असें लिहिलें आहे कीं, ही सर्व पृथ्वी परमार कुलाची होती. दक्षिणेमध्यें तेलंगणात रामप्रमार ह्या नांवाचा एक चक्रवर्ती राजा होता त्यानें ती सर्वत्रांस विभागून दिली. तो म्हणतो:-

## दोहरा.

दियो दिल्ली तूंवरा, दई पट्टण चाउरा ॥
दिय संभरीचह आनन्द्रई कन्व राठोरा ॥
परिहारा मुरदेस सभाभट्टी सिंधतट ॥
दई सोरट जाधवा दई दच्छन सुभागभटा॥
चारना कच्छ दीनीधरा, भट्टीपूव भावही ॥
बनी गयो नृपति बटीधरा गिरीजा पात मालाग्रही

तुंवरांस दिल्ली, चावड्यांस पट्टण, चव्हाणांस सांभर, राठोरांस कनोज, परिहारांस मारवाड, सभावभट्टी यांस सिंधुतट, जाधवांस सोरट, भाटांस दक्षिण, चारणांस कच्छप्रांत, ह्याप्रमाणें त्या रामपरमार राजानें सर्व पृथ्वी वांटून दिली व आपण आपल्या बंधूंसह अरण्यांत शैव दिक्षा घेऊन तप करूं लागला. त्या वनांत एका राक्षसानें-दुष्ट माणसानें गोहत्या केलेली होती. त्यामुळे त्या सर्व बंधूंस त्रास होऊन ते अग्निकाष्ठें भक्षण करण्यास तयार झाले, तेव्हां नारदानीं सांगितलें कीं, " क्षत्रियांनीं धारातीर्थीं मरावें. अग्निकाष्ठें भक्षण करण्यांत अधोगति आहे. ज्यावेळीं जयचंद राजा आपल्या कन्येचें स्वयंवर करील त्यावेळीं तुलाच ( कुहर कठीर ) ती मुलगी द्यावी असें ठरेल. पण पृथ्वीराज ती कन्या हरण करून नेईल. त्या समयीं तुमचा नाश होईल. " ह्या युद्धांत हजारों क्षत्रिय योद्धे पतन पावले असें चंदभाटानें लिहिलें आहे. ' परथी तणी पवार ' ही सर्व पृथ्वी पवारांची आहे, अशी म्हण अद्यापही रजपुतांमध्यें प्रसिद्ध आहे.

बुंदेलखंडात राज्य करीत असलेला महोबाचा राजा परमार याच्याशीं पृथ्वीराजानें युद्ध केलें, त्यांत त्याचा पुत्र ब्रम्हजित परमार पतन पावला. तेव्हां त्याचें राज्य दिल्लीच्या राज्यास जोडिलें. असा एके ठिकाणीं उल्लेख आढळतो. या वरील हकीकतीवरून परमार घराण्याचा राज्यविस्तार बराच मोठा असावा अशी कल्पना करावयास जागा सांपडते

मुंजराजास ३५ पुत्र होते. त्यांचा वंश ठिकठिकाणीं आहे असें भाट लोकांनीं लिहून ठेविलेल्या खालील लेखावरून दिसून येतें.

## छपाई.

धुरपहेली दांधवां बरण वाळां भालो ॥
पैसों पुंगळ्यों वजां बारोडं बेहेलां ॥
गुंगांनें गेलडां झोडं साखेला रुपसाळा ॥
आणिंया माधा अभंग जरड जुंगां जे पाळां ॥
आपाणियादांन दुगोटियां पेहेलझुंड परमार हर॥
इतराथोक उद्योतधर बंदराव चाहड सुवर.॥ १ ॥
कांवाने क्रांग वांबळे वादूं बोडाणां ॥
हरियां हु मडं निबेंड बोटां नेतलं ओढाणा ॥
सुंधां डोडेसगाह भला मुरखेत भणीजे ॥
देणाने दुम साहवबां गजाभार गणीजे ॥
पाढायचरवेरं चूडं सभांशबळ प्रमाणिय ॥
मोटेसी खेरऊं मठमहंत वन्स पेहतीसबखाणिये

परमारांचे जे शाखाभेद झालेले आहेत ते या ठिकाणीं देत आहों:—

१ पवार, २ निंबाळकर, ३ वाघ, ४ वाघमोडे ५ वाघचवडे, ६ जगदाळे, ७ गुजर, ८ कोडग, ९ लांगडे, १० वोगे, ११ साकळे, १२ बोधे, १३ वोधे, १४ ढवळे, १५ मळे, १६ काळगे, ७१ हरणे. १८ कराळकर, १९ धारराव, २० दळवी, २१ कदम, २२ पोळवे, २३ विचारे, २४ सालव.

पौरव कुळांतील प्रसिद्ध असें हें पवार ऊर्फ परमार घराणें आहे. या घराण्यांतील पुरुषांनीं माळव्यांत वगैरे राज्यें केलेलीं आहेत, उज्जनी, धार हीं त्यांचीं मुख्य राजधानींचीं शहरें होतीं. धार ह्या शहरास धारानगर असें म्हणत असत. ह्या नगराची प्रसिद्धि भोजराजापासून झालेली आहे. त्यापूर्वी प्रसिद्ध राजा विक्रमादित्य हा अवंतीस राज्य करीत होता. त्याची अनेक माननीय गोष्टींमध्यें प्रसिद्धि आहे. तो जसा पराक्रमी होता तसाच विद्वान होता. त्यास विद्वानांची चाड होती. त्याच्या पदरीं शंकु, वररुचि, मणी, अंसुदत्त, जिष्णु, त्रिलोचन, हरी, घटखर्पर, अमरसिंह आदिकरून कवि व सत्य, वराहमिहिर, श्रुतसेन, वादरायण, मणित्थ, आणि कुमारसिंह इत्यादि ज्योतिषी होते. त्यांतील धन्वंतरी, क्षपणक, अमरसिंह, शंकू, वेतालभट्ट, घटकर्पर, कालिदास, वराहमिहिर आणि वररुचि हे नऊ पंडित होते. त्यांची गणना नवरत्नांमध्यें होत असे. त्याच्याजवळ ३०००००० पायदळ १०००००००० घोडेस्वार, २४३०० हत्ती, ४००००० नांवा होत्या. त्यानें ९५ शककर्ते राजांस जेरीस आणून आपला संवत् सुरू केला. रूम देशाच्या राजास त्यानें कैद करून आणिलें व पुनः सोडून दिलें, असें वर्णन आढळतें. परमार राजे उज्जनीस राज्य करीत होते. नंतर भोजराजानें धारानगरी ही आपली राजधानी केली. यानंतर याच वंशांतील तेविसावा राजा अवूगड येथें राज्य करीत होता; परंतु तुर्क लोकांनीं अवूवर स्वारी करून त्याचें राज्य घेतलें. त्यामुळें तो सोंदल पर्वताकडे पळून गेला. व त्याची संतति तेथेंच राज्य करीत राहिली. त्यास चार बंधु होते. त्यांचे व वानबहादूर यांचें पटेना म्हणून ते इ० स० १३३५ चे आरंभीं म्हणजे वानबहादुराचें राज्य तुर्क लोकांनीं घेण्यापूर्वी तेथून निघाले व गंगेच्या कांठीं दक्षिणेंत गेले. कित्येक दिल्लीचे पूर्वेच्या बाजूस, कांहीं माळव्यांत कांहीं उदेपूर येथें गेले, दक्षिणेंत जे गेले त्यांनीं त्या ठिकाणीं पाटिलक्यांचीं वतनें वगैरे खरेदी केलीं. कांहीं “ फलटण ” येथें आले. त्यावेळीं ह्या ठिकाणीं मनुष्यांची वस्ती नसून अरण्य होतें. तरीही त्यांनीं त्या ठिकाणीं वसाहत केली. ही मंडळी फलटणास वसाहत करावयास येण्याच्या पूर्वी बाणगंगेच्या कांठीं जीं गांवें आहेत, त्या ठिकाणीं त्यांनीं वाडे वगैरे बांधून ते राहिले होते. एक शाखा अहमदनगराजवळ हंगे या गांवीं गेली. उदेपुरास किसनसिंग ह्या नांवाचे एक पवार घराण्यांतील पुरुष शिलेदार होते. त्यांस दरबारामध्यें पहिल्या प्रतीचा मान मिळत असे, ह्या पुरुषास साबुसिंग या नांवाचा पुत्र होता. ह्या साबुसिंगापासूनच देवास व धार येथील पवार घराण्याची सुरवात आहे. श्री० तुकोजीराव महाराज पवार सेनासप्तसहस्र यांजकडून त्यांच्या घराण्याची हकीकत आल्यानंतर आम्ही ह्या वंशाची निराळी कैफियत देणार आहों—

परमार घराण्याचा मध्यंतरीचा इतिहास अभिमानास्पद असा आहे. त्याचें सिंहावलोकन केलें असतां अप्रासंगिक होणार नाहीं. हें कूल फार प्राचीन काळापासून अबू जवळील चंद्रावतीस सत्ताधारी होतें. इ० सनाच्या सातव्या शतकापर्यंत गुजराथ द्वीपकल्पामध्यें परमार राजे राज्य करीत होते. त्यांजजवळून कनकसेनानें थोडीशी सत्ता हिरावून घेतली. पालनपुराजवळ थराद आहे तें श्रीपूर भीममालचे परमार यांनीं इ० स० ११५ मध्यें वसविलेलें आहे. तें इ० स० १००० पावेतों *परमारांच्या स्वाधीन होतें. नंतर साळुंके कुळाकडे गेलें. इ० स० १०२२ त चंद्रावती नगरींत *धुंदुराज परमार राजा राज्य करीत होता, तो अनहिलवाडच्या राजाचा मांडलिक होता; परंतु त्यानें अनहिलवाडच्या राजाचा वरचष्मा कबूल न करितां तो धारचे

* गुजराथी सर्वसंग्रह.

* लोक हितवादीकृत गुजराथचा इतिहास.

भोजराजे परमार यांच्या मांडलिकत्वाखालीं राहिला होता. त्यामुळें भीमदेव सोळंखी यास राग येऊन त्यानें आपला एक कामगार विमलशा यास दंडपति ही पदवी देऊन पाठविला. त्यानें अबूवर स्वारी करून अबू काबीज करून घेतला व त्या ठिकाणीं दोन जैन मंदिरें बांधिलीं.

पुढें इ०स०११४३ त विक्रमासिंहानें विमलशापासून अबूचें राज्य हिरावून घेतलें. व आपण पुनः राज्य करूं लागला. इ० स० ११९०-९१ च्या दरम्यान अबूवर जैतसी परमार राजा राज्य करीत होता. त्याच्यावेळीं पुनः भीमदेवाबरोबर वैर उपस्थित झालें. जैतसी परमार यास सलख नांवाचा पुत्र व इच्छिनीकुमारी नांवाची सुस्वरूप कन्या होती. ती कन्या अजमीरच्या पृथ्वीराजास देण्याचें निश्चित केलें होतें. परंतु तिच्या लावण्याची बातमी ऐकतांच भीमदेवानें अमरसिंह शेवडा यास अबूगडास पाठवून तिची मागणी केली. अमरसिंह शेवडा यानें जैतसी यांस असें सांगितलें कीं, तूं आपली कन्या भीमदेवास अर्पण करून त्यास आपला जामात कर; असें न करशील तर तो भीमदेव अबूगड समुळ उपटून टाकील. जैतसी यानें प्रथम विवेकानें तें बोलणें ऐकून घेतलें, व त्यास पांच दिवस राहवून घेऊन भीमदेवास काय उत्तर द्यावें याचा तो विचार करूं लागला. परंतु राजपुत्र सलख यास ही भीमदेवाची मागणी कबूल झाली नाहीं. तो आपल्या पित्यास म्हणालाः—अबूगडचें राज्य घेतलें तर देईन, परंतु त्या जैनधर्मी भीमदेव राजाबरोबर मी आपल्या बहिणीचें लग्न लावूं देणार नाहीं. भीमदेवाचे सर्व पराक्रम मला माहीत आहेत. तो चव्हाणास मुळींच ओळखीत नाहीं. मारवाडांत एक लक्ष सैन्य तयार आहे. आपल्या अबू पहाडाच्या हुकमतीखालीं अठरा राज्यें आहेत. त्यांपैकीं आमच्या मदतीस कोणीच आलें नाहीं, तर मग आमचा साह्यकर्ता ईश्वर आहेच. ह्याप्रमाणें नकार देऊन त्या पिता-पुत्रांनीं अमरसिंहाची रवानगी केली. अमरसिंह जातांच अबूगडाचा करभार पांच आप्तसोयऱ्यांकडे संपवून ते बापलेक चव्हाणाची मदत मागण्यास गेले. ते चव्हाणास म्हणाले. "पृथ्वीराजास देऊं केलेली कन्या भीमदेव मागत आहे! केसरीचा भाग जंबुकानें न्यावा कीं काय?" हें त्यांचें भाषण ऐकून त्यांस सन्मानानें राहवून घेतलें व दिल्लीस पृथ्वीराजास हें वर्तमान लिहून कळविलें. तें वर्तमान ऐकून पृथ्वीराजानें सैन्याची तयारी केली व प्रमाराच्या मदतीस सिद्ध झाला.

इकडे अमरसिंहानें भीमदेवास वधूच्या नकाराची बातमी कळविल्यावरून त्याचें मस्तक फिरलें व कपाळास आंठ्या चढल्या; क्रोधानें त्याच्या आंगाचा थरकांप झाला. तो म्हणाला, निद्रिस्त सिंहास जागृत करणारा असा कोण आहे ? असें म्हणून त्यानें सैन्य एकत्र करण्याचा डंका वाजविण्याचा हुकूम केला.

त्यानें कच्छ आणि सौराष्ट्रच्या राजांस पत्रें लिहून पाचारण केलें! थोडक्याच दिवसांत गिरनारचा राजा, लोहाचे कटारी, वीरधवल वाघेल, रामप्रमार, पेरंभचे मालक. राणिंगझाला, शेज सारंगदेव आणि गंगडात्री वगैरे सरदार मोठी फौज घेऊन हजर झाले. त्या सरदारांस आणि त्याचप्रमाणें अमरसिंह शेवडा व जैन मंत्रेश्वर चाचिग यांस घेऊन, भीमदेव आबूगडावर गेला. आणि त्यानें तावडतोब किल्ल्यास वेढा दिला. त्यावेळीं चालुक्य आणि परमार यांजमध्यें मोठ्या निकराची लढाई चालू झाली. भूमि रक्तानें आरक्त झाली; परंतु अखेरीस परमारांनीं शत्रूस पाठ दाखवून पळ काढला. या युद्धामध्यें चालुक्यांचा जय झाला.

यानंतर भीमानें चव्हाणावर जाण्याचा विचार केला; परंतु यावेळीं त्याच्या सैन्यांत शहाण्या माणसांची उणीव नव्हती. त्यांपैकीं गोहेल सरदारानें त्यास सांगितलें कीं, आपण लढाई तहकूब ठेवावी. प्रमारांचा मोठासा अपराध नाहीं. इच्छा असेल तर कन्येविषयीं मागणी करावी. राणींग झाला म्हणाला, कीं, आपण दुसऱ्या गोष्टी बाजूस ठेवून लढाईच्या फायद्याचा विचार केला पाहिजे. ह्या आपसांतील लढाईपासून आपला कांहीं फायदा न होतां मुसलमानांची शक्ति मात्र वृद्धिंगत होईल. वीरधवल वाघेला म्हणाला, आपण चव्हाणांशीं सलोखा करून एकमतानें मुसलमान पिटाळून लाविले पाहिजेत. ह्याप्रमाणें संघशक्तीनें कामें केलीं तर आपणास पुष्कळ देश मिळून आपली कीर्तीही होईल. ह्या भाषणादर अमरसिंह शेवडा यानें आक्षेप घेतल्या-

मुळें त्यांच्या सांगण्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. तो म्हणालाः—आपलें सांगणें बरोबर आहे परंतु रजपुतांनीं अपमान सहन करणें हें त्यांस केवळ धिःकारयुक्त असतें. रजपुतानें हरएक जोखमाच्या कामांत अपमान केल्याचें वैर साधलेंच पाहिजे. त्या वेळीं त्यानें कोणताही विचार करूं नये. यासाठीं भीमदेव राजाच्या इच्छेप्रमाणें प्रमार आणि चव्हाणांवर जाऊं या त्यांस जिंकून नंतर मुसलमानांवर जाऊं ! ह्याप्रमाणें भाषण होतांच, शहाण्या मंडळींच्या भाषणांचा कांहींच परिणाम झाला नाहीं. मुसलमान ह्या संधीची वाटच पहात होते. गुजराथची फौज अजमीरावर येतांच तेही अजमीराच्या आसपास तळ देऊन बसले. हे दोन शत्रु दोन्ही बाजूंकडून आल्यामुळें चव्हाणास फिकीर पडली, त्यानें देवीची आराधना करून तिजजवळ गुर्जर व म्लेंच्छ यांच्या नाशार्थ शक्तीची याचना केली. व चंदभारोटानें शत्रूवर रात्रीच्या प्रहरीं छापा घालण्याची तयारी केली. त्याचा छापा येतांच गुर्जर लोक घाबरून गेले. ते आपआपासांमध्येंच लढूं लागले. भीमदेवाचा हत्ती मरण पावला व तो खालीं आला. त्यानें भाला घेऊन युद्ध करण्यास सुरुवात केली; परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. अखेर चालुक्यांचा पराभव झाला. त्याबरोबर चव्हाणांनीं आपला मोर्चा यवनांकडे वळविला व त्यांच्याशीं लढून त्यांसही जर्जर केलें. भीमदेवाचा पराभव झाल्यामुळें तो चव्हाणांवर दांत ओंठ खात होताच; तशांत ह्या वैरवृद्धीस दुसरें एक कारण घडून आलें. भीमदेवाचा चुलता सारंगदेव यास प्रतापसिंह, अरिसिंह वगैरे सात मोठ मोठे पराक्रमी पुत्र होते. त्यांची व भीमदेवाची कांहीं कारणावरून तेढ पडल्यावरून ते घराबाहेर पडून सोरठ देशांतील गिरनारच्या जंगलांत गेले व तेथें राहून यादवांचा मुलूख लुटूं लागले. त्यांना शिक्षा करण्याकरितां भीमदेव स्वतः गेला. त्यानें नदीकिनाऱ्यास छावणी ठोकिली. एके दिवशीं भीमदेवाचा एक माहुत हत्तीस नदीमध्यें घालून धूत होता. त्यावेळीं त्या लोकांनीं येऊन महातास मारिलें व हत्तीचें पुच्छ कापून पलायन केलें. हा आपला अपमान झाला, असें समजून भीमदेवानें हुकूम फर्माविला कीं, इतके दिवस त्यांस पकडावें इतकीच माझी इच्छा होती; परंतु आतां त्यांस मारलें तरी हरकत नाहीं. हा हुकूम ऐकून ते सातही भाऊ सौराष्ट्र देशांत गेले व अजमीरच्या चव्हाणाच्या आश्रयास राहिले. त्या ठिकाणीं ते एके दिवशीं दरबारांत बसले असतां प्रतापसिंहानें आपल्या मिशीवर ताव दिला; हा त्यानें आपला अपमान केला असें चव्हाणास वाटून तो तसाच उठला व त्यानें प्रतापसिंहास छाटून टाकलें. त्यावेळीं ते सर्व भाऊ युद्ध करूं लागले. त्यांत त्यांचा अंत झाला. हें निंद्य कृत्य पृथ्वीराजास मुळींच पसंत पडलें नाहीं. ह्या आपल्या चुलतभावाच्या वधाची बातमी भीमदेवास कळतांच त्यास अत्यंत क्रोध आला व तो आपल्या सामंतासह सोमेश्वरावर चालून आला. त्यावेळीं भयंकर युद्ध झालें. या युद्धांत सोमेश्वर पतन पावला. ह्या दुःखकारक गोष्टीचा सूड घेण्याचें पृथ्वीराजानें ठरविलें. तो भीमदेवावर चालून गेला, त्याप्रसंगीं पृथ्वीराज व भीमदेव यांचें तुंबळ युद्ध होऊन भीमदेवाचा पराभव झाला. ह्या प्रसंगीं पृथ्वीराजास प्रमार घराण्याचेंच विशेष सहाय्य होतें.

इ० स० ११९६ मध्यें कुतुबुद्दीन याचे लढाईंत ध्वसवर्ष आणि प्रल्हाद नंददेव हे दोन यशोधवल परमार राजाचे पुत्र होते. हे अबूच्या पायथ्याशीं चंद्रावती नगरींत राज्य करीत होते. ते अणहिलवाडकरांचे मांडलिक होते. याचवेळीं देवरा शाखेचे चव्हाण अजमीरास राज्य करीत होते. प्रमारांच्या चंद्रावतीचीं खिंडारें अद्यापही आबूच्या पायथ्याशीं दाखविण्यांत येतात. हल्लीं त्या ठिकाणीं मोठें जंगल वाढलेलें आहे, तरी कित्येक ठिकाणीं विहिरी वगैरे पुरून गेलेल्या दृष्टीस पडतात. चंद्रावतीच्या आसपास सांधपूर, गंबिर, चंदला, बसानार अशीं चार लहान खेडीं वसलेलीं आहेत. पालनपूर ( प्रल्हादपट्टण ) वसविणारा प्रल्हादनंदाचा भाऊ धारावर्ष यांच्या नांतवाच्या अमलांत चव्हाणांनीं चंद्रावती राजधानी जिंकून घेतली. परंतु परमार यांनीं ती त्यांजवळून पुनः घेतली. परंतु इ० स० १३०३ मध्यें बरेलीच्या लढाईंत परमारांचा नाश करून शिरोहीच्या देवरा चव्हाणांनीं अबूवर आपला पूर्ण अंमल बसविला.

इ० स० १३०० नंतर हें प्रमार घराणें गुजराथेंतून खानदेश वगैरे देशांतून फिरत फिरत नीरा नदी कांठाजवळ व देशांत डोंगराचे पायथ्याशीं जंगलांत वसाहत करून राहिलें.

## ढवळचे राजे पवार.

इ. स. १३०० सालानंतर ‘ आबू ’ येथील पवार घराण्यांतील एक पुरुष दक्षिणेंत आला, त्याचें नांव ‘ राजा रणधवल ’ हें होतें. त्यानें दक्षिणत येऊन ‘ ढवळ ’ गांव वसविला. ह्या ‘ राजा रणधवल ’ यांचे वंशजांस ढवळचे पवार असें म्हणतात. फलटण आणि ढवळ येथें काळाच्या तडाक्यांतून वांचलेलीं देवळें अद्यापहि दृष्टीस पडतात. तीं राजा रणधवल यांनीं बांधलेलीं आहेत. तसेंच ढवळ गांवीं जो त्यांचा वाडा आहे त्यांस ‘ राजाचा वाडा ’ असें ह्मणतात. ह्यावरून त्या कालीं हें ढवळच्या पवारांचें घराणें बरेंच प्रसिद्धीस आलेलें असून, पराक्रमी होतें असें दिसून येतें. ह्या घराण्याची जुनी हकीकत फारच अतिशयोक्तिची असल्यामुळें ती आम्हीं या ठिकाणीं घेतलेली नाहीं. हें ढवळ संस्थान त्यावेळीं पूर्ण जामांत असावें असें दिसतें. त्यावेळची ‘ रणधवल ’ यांची सर्व हकीकत उपलब्ध असती तर या घराण्याच्या हकीकतींत बरीच भर पडली असती. परंतु ती हकीकत उपलब्ध नसल्यामुळें आम्हांस सदर घराण्याचा संगतवार इतिहास लिहितां येत नाहीं याबद्दल दिलगीर आहों.

दक्षिणेंत ‘ दुर्गादेवी ’ नांवाचा मोठा दुष्काळ पडला होता. हा दुष्काळ सतत बारा वर्षे सुरू होता. अशा प्रकारचा भयंकर दुष्काळ हिंदुस्थानामध्यें तरी केव्हांही पडला नाहीं. ह्या दुष्काळाच्या संधीसच ‘ ढवळ ’ ची जहागीर नष्ट झाली. यवनांनीं त्या वेळच्या कुटुंबांकडून ती जहागीर घेतली व त्यामुळें ह्या कुटुंबाची वाताहात झाली. त्या वेळीं ‘ चांगोबा ’ या नांवाचें एकुलतें एक मूल मात्र शिल्लक राहिलें. अर्थात् त्या मुलाच्या संरक्षणासाठीं कांहीं दिवस तरी आपलें जहागिरीचें ठाणें सोडून हें कुटुंब दूर गेलें. तिकडे त्यांनीं बरींच वर्षे घालविलीं. इतक्या अवकाशांत यांच्या जहागिरीचा भोक्ता एक निराळाच इसम झाला. ढवळ गांवाच्या शेजारीं पांगरी ह्या नांवाचें एक गांव आहे तेथें लोखंडे या आडनांवाचे धनगर रहात होते. ते गुरें चारण्याकरितां ढवळ गांवीं येत असत; कारण त्यांच्या गांवीं चारा-पाणी मुबलक नसल्यामुळें त्यांनीं ढवळ गांवीं आपल्या शेळ्या, मेंढ्या वगैरे चारण्यास नेण्याचा परिपाठ पाडला. ह्याच लोखंड्यांकडे त्या वेळीं ‘ पांगरी ’ गांवची पाटिलकी होती. ह्या लोखंड्यांनीं अशा विनवारशी पाटिलकीचा अभिलाष धरून आस्ते आस्ते ढवळ गांवची पाटिलकी बळकाविली. जहागीर पूर्वींच यवनांनीं घेतली. आतां शिल्लक जी पाटिलकी होती, ती ही लोखंड्यांनीं बळकाविली.

ढवळच्या पवार घराण्यांतील पुरुष शूर होते. ते वारंवार मुलुखगिरीवर जात असत. त्यामुळें त्यांस आपल्या गांवीं हजर राहण्याची संधि फारच थोडी मिळत असे, व अशा प्रकरणीं लक्ष घालण्यास त्यांस वेळही नसे; त्यामुळें लोखंडे यांनीं बळकाविलेल्या पाटिलकीचा त्यांस बरेच दिवस उपभोग घ्यावयास मिळाला. व त्यांनीं आपली चालू वहिवाट प्रस्थापित केली. याच सुमारास ढवळकर पवार हे आपल्या गांवीं परत आले. त्यावेळीं आपलें वतन लोखंड्यानीं बळकाविलें आहे असें त्यांच्या नजरेस आलें. त्यावरून त्यांनीं इ० स० १६२९ त विजापूरच्या दरबारी दाद मागितली. त्यावेळीं अशा पक्षकारांस मामुल वहिवाटी प्रमाणें सत्य करणें भाग पडत असे, असें दिसतें. त्यावरून किल्ले ताथवडा येथील काजी मलिकशहा यांज समोर त्यावेळचे या घराण्याचे पुरुष झिंगोजी पवार यांनीं सत्य करून आपला हक्क प्रस्थापित केलेला आहे. त्यामुळें झिंगोजी पवार यांचा हक्क शाबीद होऊन त्यांस इ० स० १६२९ त पाटिलकीचा महजर ( हक्क ) मिळावा म्हणून हुकूम झालेला आहे.

## शिक्का.

महजर ता. छ-२५ माहे जमादिलाखर ठाने काजी मलीकशा.

१ हजरे मज्यालसी

१ शीतु मुकुंद सरदार.

१ नरसोजी वीन रत्नाजी धुमाळ.

१ नरसिंगराव बजोजी धायघोडे.

१ नरसोजी वीन रत्नाजी दिनकरराव सूर्यवंशी.

१ सोनजी कालेकर.
१ रणनवरे तीमाजी शीवदेव हुद्देदार.
१ बलवडखान बीन पीर दोस्त महंमद मोकासा मौजे ढवळ देशक.
१ काजी मलीकशा.
१ दत्तो रंगनाथ मुजमदार.
१ बालोजी बीन बहिरजी.
१ दादाजी लिंबाळकर.
१ गोजी नागनाथ दत्तो महादेव देशपांडे कुळकर्णी.
१ आसवती धुमाजी नाईक देसाई.
१ आवाजी गौड मुकदम मौजे राजोरी.
१ अवाजी नाईक गुजामली.
१ दादजी पटेल मोकदम पटेल मोकदम कसबे.
१ रावजी रणवेर मोकदम मौजे निंबोरे.
१ दादजी मोकदम मौजे उपलसे.
१ दत्ताजी डोवक मौजे मुकदम खडकी.
१ मौजे तरडक.
१ यमाजी गोंडळ.
१ महादजी मदणे बुधकसबेकर.
१ सनसेट वान्हेशींग सेट महाजन.
१ महादजी डोबक. मो. मो. दलेवाडा कदरकी.
१ गोराजी कासार.
१ तिमाजी विराजर मो. अदरकी. मौजे ढवळकर.
१ व्यंकोजी चि० बाळाशेट तुवेळीं.
१ नरूनाक तीर्थकर.
१ मालजी विठोजी गिरवी.
१ दादजी मोकदम बावकरी.
१ तिमाजी अनंत मोकदम वेकसी.
१ मुंजोजी माळी मेहेत्रे.
१ सुतार.
१ शीव महत्री कोष्टी.
१ बाकजा कोळी.
१ दादाशेट सोनार.
१ नानआक.
१ खडसाळवी कुंभार.
१ जातमल्या हज्जाम.
१ बापशेट शेरिया.
१ तुकोजी जरठा खेतवाडी.
१ भागीदरजा खाते.
१ बाडीवागेश्वरी.
१ गींगनाख तीर्थकर.
१ गणोजी पटेल मो. मो. ढवळ.
१ गोदजी अनवर मौजे सासवड.

प्रगणे फलटण सुरासन सकसीन अलफ," कारणे देतों. कृष्णाजी पटेल बीन रामजी पटेल ढवळे मोकदम मौजे ढवळ प्रांत मजकूर यांस लिहून दिला महजर ऐसाजे.

तुम्हीं हेजूरठाण्यास येऊन मालूम केले जे मौजे मजकुरची पेटेलकी मिराशी आपली असे. पेशजी थोरल्या वनगोजी नाईक देसाई यांचे वेळेस वडील खात होते. ते त्याजवर वनगोजी नाईकाच्या वेळेस दुकोळ पडला. कारने उठोन परगंदा होवून गेले. त्याजवर दरम्यान लोखंडे धनगर दर फिरोज पटेलगी खाऊं लागले. त्यावर आपण झोंबलो तरी आपणांस ठाऊक नव्हतें. याजबद्दल आजतागाईत कोणीही हाटकिले नाहीं. आपण साहेबाचे बंदगीस आपली मिराशी म्हणून जाहीर झालों असो. मुनसबी करून आपली मिराशी आपणांस महरकत कर्णे अथवा आपणास हा देणें. आपली मायभुई नव्हे आपणांस हातीं न धरो तरी आपण खोटे होऊं. तरी साहेबी दिगर करणें. कायम मुनसबी रवा देऊन निवाडा करणें म्हणोन. कीं हें आपणांस कांहीं ठाऊक नाहीं, म्हणोन नेम केला. जेख्यास खरे असेल तरी खाते होतील, आणि आपली मिराशी पटेलगी खातील. मिराशी न होतील तर खोटे होतीलच. म्हणोन जमाधारे आपले जाग्यास जातील म्हणोन नियम केला. त्याजवर मालजी व बहीरजी लोखंडे यांस पुसीलें. जे तुम्ही पटेलगी खात असतां, हल्लीं ढवळे

मजकूर येऊन उभयतां राहिले, त्यास ते आपले मिराशी मायभुई रवा करूं म्हणतात; तुम्हीं रव्यास कबूल आहां, म्हणोन त्यावरून लोखंडे मजकूर हे कबूल झाले. जेव्हां येवढा अंमल रव्या वेगळा निवाडा नव्हे, रव्याचें कारण खरें झालें, तरी पटेलगी खालील. म्हणोन त्यांणी रव्यास आपला कबूल कदम नेम उत्तर लिहून दिल्हा, त्याजवरून छ. १२ माहे जमादिलाखर रोजीं आपले नफरी ढवळे मजकूरचे बिरादर झिंगोजी बीन तिमाजी ढवळा त्याचा हातपाक करून नखें काढून हातची निशाणी लिहून हातीं खोळ घालून लाखोटा करून कोठामध्यें सरिवला. त्याबरोबर बहिरजी लोखंडा ठेविला. दुसरे रोजीं सकाळीं हर दोवादे मौजे मजकूरचे पांढरवर नेऊन तेथें लोणी सवाशेर, तेल सवाशेर कसवा पाहून नेऊन तेथें भाते लावून लोणी तेल लावलें. ते वखतीं झिंगोजी मजकूरचे हाताची खोलती काढून आंघोळ करून आणला. तेल ताम्रणांत ओतलें. त्यांत रव टाकिला. तेथवाच नफर मजकूर हात घालून रवा काढला. मग ते तेलावर पाणी टाकिलें तेव्हां तेल कडकडून उतूस गेले. त्यावर झिंगोजी मजकूरचे हातीं खालेली घालून लाखोटा बंद करून सांगाते बहिरजी लोखंडे देऊन हारदो ठाणीं यांस आणोन एक जागा आदवखान राहिले. त्याजवर तिसरे दिवशीं छ० १३ वा रोजीं सदरास झुंगोजी पाटील व बहिरजी लोखंडे असे दोघेजण सदरास आणून हातचा लाखोटा तोडून खालेती काढून हा तो पाहिला, तवा हात पाकनिक धरून म्हणूं लागले जे लहान फोड आहेत ते सुई आणोन जेथें वादी यानें दाखविले तेथें जागा टोंचून पाहिली. तेथें रघत निघाले. त्यावरून सदरहु हाजीर न्यालसी लोक म्हणूं लागले. जे हात पाक असेल रवा खरा निघाला. आतां ढवळे मजकुरचे मिरासी पटेलगी त्याचे दुमादा करून देणें म्हणोन त्यावरून तुमचे मिरासी पटेलगी तुमचे दुमादा केले असे. लेकराचे लेकरी पटेलगी खाऊन दिवण नफराई करून सुखी असो. तुम्हांस व लोखंडे यांस अर्थाअर्थी संबंध नाहीं. हा महजर लिहिलास हा जाणीजे. छ० मजकूर.

ह्याप्रमाणें दिव्य केल्यावर ढवळे पाटील यांस आपलें पाटिलकीचें वतन मिळालें व ते त्याचा निर्वेधपणें उपभोग घेऊं लागले. पुढें इ० स० १६७४ त मुधोजीराव नाईक निंबाळकर यांनीं बंड करून विजापूर दरबारांशीं युद्ध केल्यामुळें या घराण्यास ढवळगांव सोडून दुसरीकडे वसाहत करण्याचा प्रसंग आला. तेव्हां त्यांनीं नांदवळ गांवीं येऊन वसाहत केली. त्यावेळपासून ह्या घराण्याचे वंशज नांदवळगांवीं रहात आहेत.

महजराच्या पूर्वीं पवार यांचे ढवळ येथील वाडे, जमिनी व बागा लोखंडे यांच्या ताब्यांत गेल्यावेळीं, त्यांनीं एका डोंगराचे माथ्यावर सोइस्कर जागा पाहून तेथें वसाहत केली होती. ह्या डोंगरावरील जमिनी करजखोप व सोनके या गांवाच्या होत्या. त्यावरून करजखोपकर धुमाळ यांनीं तंटे सुरू केले. त्यावेळीं पवार हे एकटेच असल्यामुळें त्यांस कोणाचीही मदत नव्हती; परंतु ढवळचे हद्दींतील धायगुडे धनगर यांनीं पवार यांस स्वाभिनिष्ठेनें मदत करून धुमाळ यास मागें हटविलें. ज्या ठिकाणीं उभयतांमध्यें दोन हात झाले, त्याच ठिकाणीं वसना नदीचे कांठीं यांनीं तळ दिला. ह्या ठिकाणीं नांदुरकीचें झाड होतें. तेथें पवार यांनीं वस्ती केली. त्या ठिकाणास 'नांदवळ' हें नांव प्राप्त होऊन तें गांव पवार यांच्या वतनाचें झालें आहे.

ह्या ठिकाणीं वास्तव्य करीत असतां, पवार वंशजांपैकीं, अबाजी व निंबाजी हे शिरगांव खिंडीनें बहिणीकडे भोजनास जाऊन परत येत असतां त्यांस डोंगरांतील खिंडींत एकटे गांठून करजखोपकर धुमाळ यांनीं मारेकरी घालून ठार मारिलें. या वेळीं पवार यांजबरोबर त्यांची एक कुत्री होती. ती नांदवळ मुक्कामीं पळून आली. ही कुत्री धन्यास सोडून एकटी येणार नाहीं, अशी सर्वांची खात्री असल्यामुळें सहजीं कांहीं तरी अनिष्ट प्रकार झाला असेल, असें समजून कांहीं लोक कुत्री बरोबर निघाले व ती जिकडे जाईल तिकडे जाऊं लागले. तेव्हां कुत्रीनें खिंडींत ज्या जागीं धन्यांचा वध केला होता, त्या जागीं सर्वत्रांस नेलें, व आपण शवाजवळ उभी राहिली. आलेल्या मंडळींनीं शोकाकुल होऊन प्रेतसंस्कार केला. व त्याच ठिकाणीं कुत्रीनेंही आपला देह ठेविला. ही तिची स्वामिनिष्ठा पाहून

सर्वत्रांस आश्चर्य वाटलें. त्या ठिकाणीं तिची छत्री बांधली आहे, ती अद्याप कायम आहे.

यानंतर पवारांनीं धायगुडे धनगर यांस मदतीस घेऊन मुगुटराव धुमाळ करजखोपकर यांचें शीर कापून आणिलें व शिंग वाजवून नांदवळ गांवचे वेशींत गाडलें.

नांदवळ ह्या गांवीं जरी पवार रहात होते, तरी त्यांजकडे ढवळ गांवची पाटिलकी चालत होती. त्या वेळीं ढवळचे पाटील या नात्यानें त्यांनीं केलेले निकाल उपलब्ध आहेत.

इ० स० १६९९

१ पातशाही शीरपाव सन १०९९ मौजे ढवळ येथील पाटील कुळकर्णी चेखुला यासी जावजी शिराजी पाटील ढवळे यासी शिरपाव दिला. महादजी नाईक व देशपांडे मुकुंद पद्मनाभ व नानको बाहीर व हरी महीपत देशपांडे याचे घरीं महजरावर दाखला आहे.

१ रामजी बीन वाकोजी व साळुजी बीन रंभाजी ढवळे मुकादम मौजे ढवळ साक्ष देशपांडे व सद्रमटे यांच्या महजरावर आहे. हरी पांडुरंग देशपांडे यांचे घरीं महजरावर दाखला आहे.

श्री

ता. मोकदम मौजे ढवळ प्र. फलटण सुरू सन ११६१ वीदान दमी मौजे मजकूर साकराव ढवळी पवार पाटील मौजे मजकूर यांनीं अर्ज केलाजे, मौजे मजकुरीं आमची पासोडीबद्दल दाग आहे तो चालवयास कारणें मे. होऊन पासोडी चालविली, तीं तुम्हीं सुखरूप जाऊन पांढरीची चाकरी करावी. छ. ३ माहे सवाल.

दत्ताजी साक्ष मौजे राजोरी बीरोजी गवते.

श्री

यादी मौजे ढवळ येथील ढवळे पाटील यांच्या साक्षी महजर परगणे फलटणचे.

( इ० स० १७०० )

१ सुमासन तेन सेन व अलफ विश्वासराव नाईकवाडी ताथवडेकर याचा महजर याजवर साक्ष.

१ लाखोजी ढवळे मौजे ढवळ प्रा. शके १६११.

( इ० स० १७१२ )

१ सन १११२ मध्यें शेटे फलटणकर कीर्दी यासीनखान यांनीं महजर करून दिल्हा त्याजवर साक्ष.

१ रामजी बीन धाकोजी व साळोजी बीन रंभाजी ढवळे रा. मौजे ढवळ.

इ० सनाच्या सोळाव्या शतकापासून हें ढवळच्या पवारांचें घराणें फलटणकरांच्या पदरीं होतें, त्यानंतर तें सतराव्या शतकामध्यें शहाजी भोंसल्यांच्या पदरीं नोकरी करूं लागले. भोंसल्याच्या वेळचीं कांहीं पत्रें उपलब्द झालीं आहेत, त्यांवरून पवार घराण्यानें स्वराज्याची बरीच सेवा केलेली आहे असें दिसून येईल. व त्यावरून भोंसल्यांनीं त्यांस बारा गांव बाक्षिस दिलेले होते व निम्मी जकातही त्यांच्या फौजेच्या सरंजामास भोगत होती. अक्कलकोटकर शहाजी भोंसल्याच्या वेळीं तुळजाजी व सुलतानजी पवार हे त्यांच्या तैनातीमध्यें होते. श्री. नारायण बल्लाळ पेशवे प्रधान यांनीं महादजी नारायण गोसावी यांस पत्र पाठवून मौजे पिंपळगांव बाबद मोकासा सुरू करण्यासंबंधानें लिहिलें आहे.

हिजरी सन ११८२,

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजेश्री महादजी नारायण गोसावी यांसः–

सेवक नारायण बल्लाळ प्रधान नमस्कार. सुसलास सबैन मयातेन व अलफ, मौजे पिंपळगांव

गर्भ्याचे, तालुके हवेली, जागर मोकासा रा. तुळजाजी पवार, वसूल तानजी पवार नांदवालकर दि॥ रा. शहाजी भोंसले यांजकडे मशारनिल्हेचे तरफेचे सरंजाम फौजेचे बेगमीस चालत आहे. तर तुम्ही मौजे मजकुरांस ताकीद करून मोकासी यांचा अंमल मशार निल्हे कडे सुदामत प्रमाणें सुरळीत देणें, जाणिजे छ १४ सफर आज्ञाप्रमाण. ( लेखन सीमा. )

हिजरी सन ११८२.

आज्ञापत्र राजेश्रीपंत प्रधान,

ता० मोकदम मौजे पिंपळगांव गर्भ्याचें ता० नगर हवेली सुसलास सबैन मया व अल्लुफ मौजे मजकूर येथील मोकासा रा० तुळजाजी पवार व सुलतानजी पवार, दि० राजेश्री शहाजी भोंसले यांजकडे मशारनिल्हेचे तर्फेनें फौजेचे बेगमीस सरंजाम पेशजी पासून आहे. त्याप्रभाणें करार असे. तरी तुम्हीं मशारनिल्हे कडील कमाविसदाराशीं. राजू राहून मोकास बाबीचा अंमल मशारनिल्हेकडे सुदामतप्रमाणें सुरळीत देणें, जाणीजे छ० १४ सफर आज्ञाप्रमाण.

हिजरी सन ११८२.

मे० आजाम देशमुख व देशपांडे, तालुके पेडगांव परगणे कडवेली (त) यांसः--

नारायण बल्लाळ प्रधान सु० सलास सबैन मया व अल्लुफ मौजे मोरवाड ते० मा० येथील मोकासा देखील जकात रा. तुळजाजी पवार व सुलतानजी पवार नांदवालकर, दि० रा० शाहाजी भोंसले यांजकडेस मशार निल्हेचे तर्फे व सरंजाम फौजेचे बेगमीस पेशजीपासून आहे. त्याप्रमाणें करार आहे. तरी तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून मोकासा देखील जकातीचा अंमल सुदामतप्रमाणें मशारनिल्हेकडे सुरळीत देणें. जाणीजे छ० १४ सफर आज्ञा प्रमाण.

हिजरी सन ११८२.

आज्ञापत्र राजेश्री पंत प्रधान तालुके मोकदम मौजे मोरवाड ता० पेडगांव परगणे कडवेलीत सुा सलास सबैन मया व अलफ, मौजे मा० येथील मोकासा देखील जकात रा० तुळजाची पवार व सुलतानजी पवार नांदवालकर दि० रा० शहाजी भोंसले यांजकडे मशार निल्हेचे तर्फेनें सरंजाम फौजेचे बेगमीस पेशजीपासून आहे. त्याप्रमाणें करार आहे. तरी तुह्मीं मशार निल्हेसीस रुजूं राहून मोकासा देखील जकातीचा अंमल सुदामत प्रमाणें सुरळीत देणें. जाणिजें छ० १४ सफर

हिजरी सन ११८२.

अखंडित लक्ष्मी आलंकृत रा० रा० गंगाधर शामराव गोसावी यांसः—

सेवक नारायण बल्लाळ प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष मौजे नांदवाहाळ संमत वाघोली प्रांत वाई येथील निमे मोकासा रा० तुळजाजी पवार व सुलतानजी पवार नांदवालकर दिा रा० शहाजी भोंसले यांजकडे मशार निल्हेचे तर्फेनें फौजेचे बेगमीस पेशजीपासून आहे. तरी तुह्मीं मौजे मजकुरास ताकीद करून निमे मोकाशाचा अंमल मशार निल्हेकडे सुदामत प्रमाणें सुरळीत देणे जाणिजे. छ० १४ सफर सु० सलास सबैन मया व अलफ, बहुत काय लिहिणें.

हिजरी सन ११८२.

मे० आजाम देशमुख व देशपांडे संमत वाघोली प्रांत वाई यांसः—

नारायण बल्लाळ प्रधान सु० सलाम सबैन मया व अलफ, मौजे नांदवाहाल

संमत मजकूर येथील निमे मोकासा रा० तुळजाजी पवार. व सुलतानजी पवार, नांदवालकर दि० रा० शहाजी भोंसले यांजकडे मशार निल्हेचे तर्फेनें सरंजाम फौजेचे बेगमीस पेशजीपासून आहे, त्याप्रमाणें करार असे. तरी तुह्मी मौजे मजकुरास ताकीद करून मोकासा निमे यांचा अंमल मशारनिल्हेकडे सुदामतप्रमाणें सुरळीत देणें जाणिजे छ १४ सफर ( आज्ञाप्रमाण. )

हिजरी सन ११८२.

आज्ञापत्र राजेश्री पंतप्रधान ता० मोकदम मौजे नांदवाहाल संमत वाघोली प्रांत वाई. सु० सलास सुबैन मया व अल्लफ मौजे मजकूर येथील निमे मोकासा रा० तुळजाजी पवार व सुलतानजी पवार नांदवालकर दि० रा. शहाजी भोंसले यांजकडे मशारनिल्हेचे सरंजाम फौजेचे बेगमीस पेशजीपासून आहे. त्याप्रमाणें करार असे. तरी तुह्मीं मशारनिल्हेशी रुजू राहून निमे मोकाशाचा अंमल सुदामतप्रमाणें सुरळीत देणें, जाणिजे. छ० १४ सफर ( आज्ञाप्रमाण ) लेखनसीमा.

सदर वर लिहिलेलीं आज्ञापत्रें जकातीप्रकर्णीं आहेत, त्यावरून तुळजाजी पवार व सुलतानजी पवार हे शहाजी भोंसले यांजकडे दिमतीस असल्यावरून त्यांच्या फौजेच्या बेगमीस सदर गांवचा मोकासा व जकात देण्याची वहिवाट होती व त्या सर्व गांवची जकात मशारनिल्हे पवार यांजकडे चालत होती. परंतु पुढें श्री० माधवराव नारायण पेशवे यांच्या कारकीर्दीत त्या जकातीचा वसूल पवार यांस मिळत नसल्याबद्दल तुळाजाजी पवार व सुलतानजी पवार यांनीं पेशव्यांस वर्तमान कळविलेवरून माधवराव नारायण पेशवे यांनीं तेथील अधिकाऱ्यांस आज्ञापत्रें लिहिलीं आहेत.

हिजरी सन ११८६.

राजेश्री राणोजी नाईक निंबाळकर गोसावी यांसः—

॥ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजेश्री माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष. रा० तुळजाजी पवार व सुलतानजी पवार दि० रा० शहाजी भोंसले यांजकडे पे० सेवगांव पै० देहेबारा येथील मोकासा व निमे जकात पेशजीपासून चालत आहे. तेथील अंमल कच्चे आकाराप्रमाणें देत नाहीं, व मागील बाकी राहिली म्हणून हुजूर विदित जाहले. त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी तुम्ही देहे मजकुरास ताकीद करून सुदामतप्रमाणें कच्चे आकारबरहुकूम अंमल देणें. व मागील बाकी राहिली असेल निकाल दावत करणें. बोभाट येऊं न देणें जाणिजे. छ २९ मोहरम सु॥ समान सबैन मया व अल्लफ, बहुत काय लिहिणें. (लेखनसीमा) इ०स० १७७७।७८

हिजरी सन ११८७.

गंगाजल निर्मल सखूबाई सिंदे यांसः—

स्नेहांकित माधवराव नारायण प्रधान आशिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. रा. तुळजाजी पवार व सुलतानजी पवार दि० रा. शहाजी भोंसले यांजकडे परगणें शेवगांव पैकीं देहेबारा येथील मोकासा व निमे जकात पेशजी पासून चालत आहे. त्यास कच्या आकाराप्रमाणें मशार निल्हेकडे मोकाशाचा अंमल पावत नाहीं व मागील बाकी राहिली आहे म्हणून हुजूर विदित झालें त्यावरून हें पत्र सादर केलें असें. तरी तुम्हीं आपलें कडील कमावीसदारास ताकीद करून परगणें मजकूरचे गांवचे मोकाशाचा अंमल व निमी जकात सुदामत चालत आल्या प्रमाणें कच्च्या आकारा व मोजब निकाल करून देत जाणें.

मशार निल्हेचे कमाविसदाराकडे सुरळीत देणें व मागील बाकी राहिली असेल तिचा निकाल करून देत जाणें. तें जाणिजे. छ. २८ मोहरम सु॥ समान सबैन मया व अलफ, बहुत काय लिहिणें हे आशिर्वाद (लेखन सीमा)

श्री

छ मे० आजम देशमुख व देशपांडे, परगणे शेवगांव यांसः—

माधवराव नारायण प्रधान सु॥ समान सबैन मया व अलफ रा. तुळजाजी पवार दि॥ रा. शहाजी भोंसले यांजकडे पो॥ मजकूरपैकीं बारागांवचा मोकासा व निमे जकात पेशजीपासून चालत आहे. त्यास तुम्हीं कच्चे आकाराप्रमाणें अंमल देत नाहीं, म्हणून हुजूर विदित जाहलें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी मशार निल्हेचे कमाविसदारांकडे बारा गांवचे मोकाशाचा अंमल व निमे जकात सुदामत चालत असल्याप्रमाणें कच्चे आकारा बरहुकूम सुरळीत देणें, व मागील बाकी राहिली असेल ती येणें. जाणीजे. छ २८ मोहरम ( आज्ञाप्रमाण ) लेखन सीमा.

श्री.

छ मे० अजम देशमुख व देशपांडे तालुके पेडगांव परगणे कडवेलिंब यांसः—

माधवराव नारायण प्रधान सु० समान सबैन मया व अलफ, मौजे मारवाड तालुके मजकूर येथील जकातीचा अंमल रा० तुळजाजी पवार व सुलतानजी पवार नांदवाहालकर दि० रा० शहाजी भोंसले यांजकडे फौजेचे सरंजामास मशार निल्हेचे तर्फेनें पेशजीपासून चालत आहे, त्याप्रमाणें करार असे. तरी तुम्हीं मौजे मजकुरास ताकीद करून सदरहू अमलाचा वसूल सुदामतप्रमाणें मशारनिल्हेकडे सुरळीत देवविणें छ २६ सवाल.

हिजरी सन ११८७

आज्ञापत्र राजेश्री पंतप्रधान ताकीद मोकदम मोरवाड तालुके पेडगांव प्रांत वलीत सु० समान सबैन मया व अलफ, मौजे मजकूर येथील मोकासा देखील जकातीचा अंमल रा. तुळजाजी पवार व सुलतानजी पवार नांदवाहालकर दि॥ रा० शहाजी भोंसले यांजकडे पेशजीपासून चालत आहे, त्याप्रमाणें करार असे. तरी मशार निल्हेशीं रुजू राहून सदर अमलाचा वसूल सुदामतप्रमाणें सुरळीत देणें जाणीजे छ २६ सवाल.

अक्कलकोटकर शहाजी भोंसले यांजकडे तुळजाजी पवार हे नोकरीस होते व त्या फौजेच्या सरंजमासाठीं हे बारा गांव त्यांकडे मोकाशासाठीं दिलेले होते. हि० स० ११८९ मध्यें शहाजी भोंसल्यांनीं पत्र पाठवूनही तुळजाजीपवार हे आपल्या फौजेसुद्धां नोकरीस गेले नाहींत म्हणून त्यांच्या नांवें माधवराव नारायण प्रधान यांचें पत्र आलेलें आहे. तें पत्र येणेंप्रमाणें.

श्री.

राजेश्री तुळजाजी पवार गोसावी यांसः—

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत रा. रा. माधवराव नारायणराव प्रधान आशिर्वाद सु० समान सबैन मया व अलफ, तुम्हीं पथका सुद्धां चाकरीस येणें म्हणून एक दोन पत्रें तुम्हांस शहाजी भोंसले यांनीं पाठविलीं असतां अद्याप जबाब आला नाहीं म्हणून हुजुर विदित झालें. त्यावरून हें पत्र सादर केलें असे. तरी तुम्हीं पथका सुद्धां पत्र पावतांच निघून मशार निल्हेकडे चाकरीस लवकर जाणे जाणिजे. छ २१ रमजान.

यानंतर लवकरच शहाजीभोंसले हे निवर्तून त्यांचे चिरंजीव फत्तेसिंग भोंसले हे गादीवर बसले. त्यांच्या वेळींही पवारबंधु भोंसल्याकडे नोकरीस होते. हि० स० १२०१ मध्यें जकातीच्या अमलाबाबद एक पत्र उपलब्ध झालें आहे तेंही या ठिकाणीं देत आहों.

हिजरी सन १२०१.

छ मे० आजम देशमुख व देशपांडे परगणे शेवगांव यांसीः—

माधवराव नारायण प्रधान सु० इसने तीसैन मया व अल्लफ रा० फत्तेसिंग भोंसले यांजकडील कारकुनांनीं हुजूर विदित केलें कीं, परगणे मजकूर पैकीं देहेबारा येथील मोकासा व निमी जकात आह्मांकडील सरंजामी रा० तुळजाजी पवार यांजकडे आहे. त्यांस पवारांकड आह्मा बावत सरकारचे पट्टीचा ऐवज त्यांच्या येथें आह्मीं फडशा करून दिला, तोच त्यांनीं आह्मांपासून चाकरीचे ऐवजीं रुपये घेतले, ते ऐवजापैकीं मजकूरचे देहे-हाय—मजकूरचा अंमल साल मजकुरीं लावून दिला असतां जमीदार कचे आका।चा अंमल देत नाहीं. येविषयीं ताकीद झाली पाहिजे म्हणून त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुळजाजी पवार यांनीं आपले आमलाचा ऐवज भोंसले मशारनिल्हेस साल मजकुरी लावून दिला आहे. त्यास तुह्मीं त्यांजकडील कमाविसदाराशीं रुजू राहून देहाय मजकूरचा मोकासा व निमे जकातीचा अंमल सुदामतप्रमाणें सुरळीत देणें.

या नंतर फत्तेसिंग भोंसले यांनीं तुळजाजी पवार हे नोकरी करीत नसल्यामुळें त्यांनीं दिलेला बारा गांवचा मोकासा व जकात जप्त करण्याचा हुकूम केलेला आहे. त्यावरून पवारांनीं शिंद्याकडे नोकरी पतकरलेली असावी.

हिजरी सन १२०८.

छ मे० अजम देशमुख व देशपांडे पो शेवगांव यांसी:—

फत्तेसिंग भोसले सु० तिसाती सैन मया व अलफ पो देहायचा मोकासा देखील जकात पेशजीपासून रा० तुळजाजी पवार व सुलतानजी पवार यांजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम आहे. त्यास मशारनिल्हेकडील स्वार चाकरीस नाहींत व रा० पंतप्रधान लग्न पट्टीचा फडशा करीत नाहींत. सबब येथील जप्ती करून जप्तीचा कमावीस राजेश्री ××यांस सांगितली आहे, तरी तुम्ही यांस रुजू होऊन देहाय मजकूरचा मोकासा देखील जकातीचा अंमल मशारनिल्हेकडे सुरळीत देणें. जाणिजे. छ १२ सावान पो हुजूर मुद्रा.

ह्या पत्रावरून फत्तेसिंग भोंसले यांजकडून पवार मंडळी दौलतराव शिंदे यांजकडे नोकरीस लागली असावी असें सिद्ध होतें. कारण ते नोकरी करीत नाहींत म्हणून फत्तेसिंग भोंसले यांनीं त्यांजकडे चालत असलेलीं गांवें जप्त करण्यासंबंधानें हुकूम केलेला आहे. मध्यंतरीं इ० स० १७६१ चे सुमारास पवार बंधू आपल्या ढवळ गांवच्या पाटिलकीचा उपभोग घेऊं लागले. पुढें सुधोजी व हैबतराव पवार हे दौलतराव शिंद्याबरोबरील हिंदुस्थानांतील स्वारीहून परत आले. त्यावेळीं पुनरपा लोखंडे यांनीं ढवळ गांवची पाटिलकी बळकाविल्याचें दृष्टीस पडतांच त्यानीं त्याबद्दल तक्रार उपस्थित केली. तीवरून दौलतराव शिंदे यांनीं गणपतराव पानसे यांस ह्या तंट्याचा निकाल करणेबद्दल लिहून कळविलें आहे, तें पत्र येणेंप्रमाणें.

राजेश्री गणपतराव पानसे गोसावी यासी-

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने० दौलतराव शिंदे दंडवत, विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकिय कुशल लि० जाणे विशेष. सुधोजी व हैबतराव पवार यांनीं विदित केलें कीं, मौजे ढवळे परगणे फलटण येथील पाटीलकी, मोकदमी पेशजीपासून आपली असतां दरम्यान लोखंडे पाटीलकीचे वतन जमवितात, ये विषयींचें मनांत आणिलें पाहिजे. म्हणोन त्याजवरून हें पत्र तुम्हास लिहिलें असे, तरी पवार व लोखंडे या उभ-

यतांस वाजवी मनास आणून विल्हे करणें ये विषयींचा फिरोन बोभाट नये तें करणें. छ० २६ जिल्काद. सुमासमान तीसेन मया व अल्लफ बहुत काय लिहिणें हे विनंती.

याप्रमाणें गणपतराव पानसे यांस शिंद्याकडून पत्र आल्यानंतर इ० स० १७९८ त श्री० बाजीराव रघुनाथ प्रधान पेशवे यांनीं जानराव नाईक निंबाळकर यांसही पत्र लिहिलें आहे,तें पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें.

राजश्री जानराव नाईक निंबाळकर यांसी–

अखंडीतलक्ष्मी अलंकृत रा० रा० बाजीराव रघुनाथ प्रधान आशिरवाद उपरीं येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लीहित जाणे. वि० मुत्तम केल मुधाजी पवार यानें हुजुर विदित केलें कीं, मौजे ढवळ प्र० पलटण येथील मोकदमी पूर्वीपासून आमची असता दरम्यान महिपतराव लोखंडे यांनीं दवाई करून मोकदमीची वहिवाट करूं लागले. नंतर त्याचा व आमचा कज्जा पडून दिव्य झालें. तेथें लोखंडे खोटे झाले. त्यावरून आह्मांस महजर करून दिला, त्याप्रमाणें वहिवाट करीत होतों. उपरांत कांहीं दिवस सुधोजीनाईक निंबाळकर यांचें दंग्यांत आह्मीं परागंदा झालों नंतर लोखंडे मजकूर मोकदमेची वहिवाट करूं लागले त्यास येविषींची पंचाईत मनांत आणून उभयतांचा निवाडा होई तोंपर्यंत मोकदमी सरकारांत अमानत ठेवावयाची आज्ञा झाली पाहिजे, ह्मणून याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें आहे. मौजे मजकूरचे मोकदमीविषीं मुधोजी पवार व महिपतराव लोखंडे यांचा कज्जा लागून लोखंडे दिव्यास खोटे झाले असतां मोकदमीची वहिवाट करितात. त्यास त्याची पंचाईत चौऱ्यांशीं पलटण देशांत नेमून देणें जाणिजे. छ २ रा सुमानी सातरी सेन मया तेन अल्लफ. बहुत काय लिहिणें मोर्तब खुद०

ह्याप्रमाणें वादाचा निकाल पंचामार्फत लावावा असा बाजीराव पेशव्यांचा हुकूम झाला, परंतु त्याप्रमाणें लोखंडे हे कित्येक वर्षेपर्यंत हजर राहिले नाहींत, त्यावरून इ० स० १८०९–१० सालीं हें वतन जप्तींत ठेवावें असा त्या वेळचे सुभेदार वामनराव गोविंद यांनीं हुकूम केला.

"ता०मुकदम मौजे ढवळ प्रांत फलटण सुरुसन १२०९ बीदानहकी मौजे मजकूरचे पाटीलकी आपली म्हणून रा०मुधोजीराव पवार ढवळे हुजूर येऊन कज्जाबद्दल उभे राहिले.त्याजवरून रा० काळोजी लोखंडे यांस चिठ्ठी पाठविलीजे. तुम्ही हुजुर येणें. त्यास ते न आले सबब सरकारातोन वतन जप्त करून हुजुरून रा० तुळाजी नाइकवाडी पाठविले आहे तरी पाटीलकीचें कामकाज मशारनिल्हेचे हाते घेणें व पाटीलकीचा ईनाम व घुगरी व व पट्टी पासोडी वगैरे हक्क असतील ते व मानपान जप्त करविले असत. तरी मशारनिल्हे जप्ती करतील त्यांस करूं देणें जाणिजे. छ १५ रजब मोर्तब रुजु चिठीनवीस."

रुजु हुजुरनीस.

रा. काशीपंततात्या सुभेदार यांसीः–

अखंडीतलक्ष्मी अलंकृत राजमान्य राजेश्री जानराव नाईक निंबाळकर देशमुख दंडवत विनंती येथील कुशल जाणून मुक्काम श्रीक्षेत्र पंढरी येथें वर्तमान यथास्थित असो विशेष. मौजे ढवळ येथील जप्तीविशीं सरकारांतून चकदी घेऊन विठोजी पवार याजला पाठविले आहेत. त्यास येविशीचा बंदोबस्त व्हावा. तुम्हीं जमीनीविशींचें पत्र दिलें होतें. त्या पत्राचें उत्तर मागाहून पाठवून देतों. येणारासमवेत पत्र पाठवून संतोषवित जावें. बहुत काय लिहिणें छ ९ माहे जमादिवल लोभ करावा हे विनंती.

ह्याप्रमाणें वतन जप्त ठेवण्याबद्दल हुकूम झाला. दरम्यान पवार यांस पुनरपि हिंदुस्थानांत लढाईवर जावें लागल्यामुळें लोखंडे यांनीं त्या संधीचा लाभ घेऊन जप्तीचा हुकूम फिरवून घेतला व पुनरपि पाटिलकीचें वतन स्वाधीन करून घेतलें. परंतु त्यांजकडे सदर पाटिलकी फार दिवस राहिली नाहीं. कारण पवार हे लढाईतून परत येतांच त्यांनीं तक्रार केली त्यावरून सुभेदार वामन गोविंद आपटे यांनीं पूर्ण तपास करून ढवळच्या वतनाचे मालक पवार आहेत आणि पाटिलकी त्यांजकडे चालली पाहिजे असा हुकूम केला.

श्री.

मा० आजम देशमुख व देशपांडे प्र. फलटण यांसीः—

वामनराव गोविंद सुभेदार किल्ले संतोषगड सुमासेन आशर मयातेन अल्लफ, मौजे ढवळ प्र. मजकूर येथील पाटिलकीचे वतनाविशी पवार व लोखंडे या हरदु जणाचा खटला पडला त्याजवरून पाटिलकीचे वतनाची जप्ती करून उभयतांस पंचाईत नेमून घेण्याविशी ताकीद झाली असतां, लोखंडे वादास उभे रहात नाहीं. सबब पाटिलकीचे वतनाची मोकळीक करून पवार यांजकडे वतन चालते केलें असे. तरी मान पान व इनाम व कानू कायदे चालीप्रमाणें पवार वहिवाट करतील याजकडे चालविणें. जाणिजे. छ ५. माहे मोहरम मोर्तब खुद.

श्री.

आजम देशमुख व देशपांडे ता. ताथवड प्रांत फलटण गोसावी यांसीः—

अखंडीत लक्ष्मी अलंकृत रा. रा. वामनराव गोविंद आपटे आशिरवाद व अनुक्रमे नमस्कार. सुमा सेन आशर मयातेन व अलफ मौजे ढवळ, ता० मजकूर येथील पाटील पवार यांनीं येऊन विदित केलें कीं, मौजे मजकूरची पाटिलकी आमची असतां दरम्यान लोखंडे धनगर मौजे मजकुरी रहात होते. शहाणे म्हणून गावांत कारभार करूं लागले. तेच पुढें आमची पाटीलकी म्हणूं लागले. त्यावरून आम्हीं पेशजी पानसे यांचे कारकीर्दीत सुभा जाऊन वर्तमान समजाविलें त्याजवरून त्यांनीं मागील आमचा भोगवटा पाहून धनगर वहिवाट करीत होते. त्याची जप्ती सरकारांतून केली. पुढें पंचाईत होऊन वाजवीचें अन्वयें घडावे, तों आम्हीं हिंदुस्थानांत रोजगार निमित्त गेलों. मागें धनगर यांनीं गैरवाका सरकारांत समजाऊन पाटिलकीची मोकळीक करून वहिवाट करूं लागले. आम्हीं खटला करीत आलों, त्यास हल्लीं साहेबी आमची पंचाईत मनास आणून आमचें वतन आम्हाकडे चालू केलें पाहिजे. त्याजवरून लोखंडे मजकूर यास सुभा जाणोन पंचाईतीस उभे राहणें म्हणून ताकीद केली असतां लोखंडा पंचाईतीस उभा न राही व कागदपत्राचें साधन त्याच्यानें न पुरे. व जामीन त्यास न मिळे सबब पवार यांचे कागद पत्राचें साधन मुद्रा पाहून मनांस आणितां पाटिलकीचे वतन पूर्वापार पवार यांजकडे चालत आले. दरम्यान लोखंडे यांनीं खटला करून वतनाची वहिवाट करीत होते. हल्लीं मागील वहिवाटीप्रमाणें पाटिलकीचे वतन पवार यांजकडे चालू केलें असे, तरी कानू-कायदे व इनाम हक हक्कदारी चालत आल्याप्रमाणें चालविणें. जाणिजे. छ० १ जिल्हेज बहूत काय लिहिणें.

ह्या नंतर लोखंडे यांनीं पेशवाईचे अखेर पुनः तक्रार उपस्थित करून ग्रँटडफ साहेबांस कळविलें कीं 'आह्मीं पाटिलकीचा एकसारखा उपभोग घेत असतां, ती आह्मांकडून काढणें योग्य नाहीं' असा अर्ज केल्यावरून पंच नेमून ह्या वादाचा निकाल

करावा ' म्हणून ग्रँटडफ साहेबांनीं फरमाविलें. व उत्पन्न जप्तींत अनामत ठेविलें.

श्रीमंत महाराज छत्रपती. स्वामींचे शेवेशीं अर्जदार मोकदम मौजे नांदवळ समत वाघोली दंडवत. वि० वि० ऐसिजे. मौजे ढवळ प्रांत फलटण हा गांव आमचे पाटिलकीचें वतनदारीचा आहे. त्याची वहिवाट आम्ही शके १७४० पर्यंत करीत आलों. पुढें लोखंडे यांनीं सरकारांत गैरवाका समजाऊन आम्हांस हुजुरांत आणून उभयतांकडील वहिवाट मना करून चौकशीची आज्ञा झाली. ती चौकशी करितां दोन वर्ष जप्ती होती; परंतु चौकशीही झाली नाहीं. आणि रा० आठ्याबा चितळे यांस सांगोन आपली वहिवाट चालू केली आहे. याजकरितां स्वामींनीं कृपाळू होऊन पूर्वी समक्ष उभयतांकडे वतन चालूं नये, त्याप्रमाणें हल्लीं जप्तीहून चौकशी आज्ञा झाली पाहिजे. सु० स० १२१८ शके १७३९ इ० स०१८१७.

श्री.

आज स्वारी रा. वामनराव गोविंदराव सुभेदार किले संतोषगड ता०

संभाजी बीन शेट्याजी व सगोजी बीन हैबतजी व महिपतजी बीन भगवंतजी व भिकोजी बीन सखोजी व आनंदराव बीन शेट्याजी पवार पाटील मौजे ढवळ प्रांत फलटण सुमासब आशर मयातेन अल्लफ. तुह्मी पुणें मुकामीं विदीत केलें कीं, मौजे मजकूर येथील पाटीलकीचें वतन आपलें असतां, लोखंडे यांनीं महाली देशमुख देशपांडे यांस गैरवाका समजाऊन जबरदस्तीनें वतनाचा अनुभव करूं लागले. त्यास आमचे कागद पत्र पाहून आमचें वतन आमचेकडे चालू केलें पाहिजे, ह्मणोन त्याजवरून साल गुदस्त पाटीलकीचें वतनाची जप्ती करून लोखंडे यास व तुह्मांस पंचाईत नेमून घेण्याविशीं ताकीद झाली असतां, लोखंडे पंचाईतस उभे न राहत, सबब पाटीलकीची मोकळीक करून तुम्हाकडे वतन चालते केले असे. तरी पाटीलकीसंबंधीं मान पान व इनाम व कानु कायदा चालीप्रमाणें अनुभवून सुखरूप रहाणे जाणिजे. छ. ५ मोह मोहरम मोर्तब सुद.

श्री.

रा. देशमुख देशपांडे पा. गोत परगणे फलटण पंचाचे शेवेशा

राजीनामा वेशमे महिपतराव बिन भगवंतराव व हैबतराव बीन निंबजी ढवळे पाटील मोकदम मौजे ढवळ प्रांत मजकूर सुरू सन १२२८ कारणें समोर राजीनामा लिहून दिला ऐसा जे. आमचा व वाघोजी बीन हैबतराव लोखंडे यांचा पाटीलकी संबधे कज्जा होऊन सरकारांत आलों. सरकारांतून तुम्हांकडे पंचाइत दिल्ही. येशीपाशीं आम्हीं तुम्हास रजा वंद होऊन राजीनामा लिहून दिला असे. तरी तुम्ही धर्मता न्याय उभयतांचे कागद पत्र दाखले मुकाबले पाहणे. इनसाफ कराल त्यास राजी असो. जो दिगर करणार नाहीं. जो दिगर करूं तर देवाचें अन्यायी. हा शेवेशी राजीनामा लिहून दिला सही. ता. छ ५ माहे सफर.

ढवळे यांचें वतन सरकारनें जप्तीस ठेवून तें कुळाकडे भोगवट्यास दिलें होतें, त्याबद्दलचें एक पत्र उपलब्ध आहे. तें—

श्री.

कोल अज स्वारी रा. काशी रंगनाथ मामलेदार पेटा खटाव ता. शहाजी भोंसले बीन मलजी भोसले वस्ती मौजे ढवळ परगणे फलटण सुरू सन असरीन मयातेन अलफ.

मौजे मजकुरी येथील पाटिलकीचें वतन इनामसुद्धां सरकारांत जप्तीस आहे. त्या जमिनींत पाटस्थळ जिराईत आहे. त्या जमिनीची लागणी सालावाद किरकोळ कुळाकडे होत असत. सालमजकुरीपासून तीन सालाचे मक्त्यानें एकंदर इनामाचे जमिनीस कोल मक्ता ठरवून दिला असत. लावणीची अबादी करून कीर्द करूं, म्हणोन तुम्ही विठ्ठल कुसाजी सेखदार यांजपाशीं विनंति केली. त्यांनीं ठाण्यास पत्र लिहून पाठविलें. त्याजवरून पाटिलकीचें इनामाची जमीन चाहूर दीड, पांच बिघेची उत्पन्नाचा आकार मक्ता ठराव रु० २०० चा चांदवडी कोरे इ० स० १२३० तागाईत सन १२३२ ये तीन साले करार. साल २०० रुपयास ठरवून दिला. त्याप्रमाणें तीन साले रु० २०० प्रमाणें साल पावेतों भरणा करून पावती घेत जाणें. कोलखेरीज जास्तीचे वेठबीगार घुगरी पालवराव वगैरे तोशीस लागणार नाहीं. दरी बाब कोल असे जाणिजे. छ २२ मोर्तब खुद.

ह्या वतनाप्रकरणीं पवारांनीं शेवटीं जी कैफियत सादर केली आहे. तीवरून हें वतन पवारांचेंच होतें अशाबद्दल सरकारची खात्री झालेली आहे. ती कैफीयत येणेंप्रमाणें.

श्री

रा० देशपांडे परगणे फलटण व मोकदम मौजे गिरवी परगणे फलटण पेटा खटाव स्वामीचे शेवेशीं.

जबानी वो विठोजी बीन हैबतराव व दौलतजी बीन मलजी पवार ढवळे पा० मौजे ढवळ परगणे पलटण पेटा खटाव सुमा इ हिदे खवसेन मया तैन व अल्लफ सन १२६० फसली कारणें जबानी लिहून दिली ऐसिजे. प्रतीवादी संताजी बीन काळोजी व नरोजी बीन जोगोजी लोखंडे धनगर राहणार मौजे मजकूर याचा व आमचा मौजे मजकूर येथील पाटिलकीचें वतनाबद्दल खटला पडून आम्हीं हुजूर सातारींयांत अर्जी केल्यावरून पेठ्यास हुकूम आणिला. पेठ्याहून सरकारांनीं तुम्हांवर पंचाईत नेमून दिली आहे. त्यास मौजे मजकूरचे पाटिलकीचें वतन मानपान वगैरेसुद्धां वृत्ति आमची आहे. त्याची वहिवाट आमचेकडील पिढीपरपिढी अनुभवीत असतां दरम्यान दुष्काळ पडल्यामुळें आमचे वडील परागंदा झाले. ते माघारे गांवास आले. तों प्रतीवादीचे वडील लोखंडे धनगर गावांवर चरणी करून होते, ते आमचे वडीलाशीं पाटिलकीचें वतन आमचें म्हणून भांडूं लागले. सबब आमचे वडील लोखंडे धनगर यास सरकारांत घेऊन आले. नंतर सरकारांत ठरलें कीं रवा करावा. त्याजवरून आमचे वडील रव्यास राजी झाले तेव्हां लोखंडे धनगर यांनींही कबूल केलें कीं, ढवळे यानीं रवा केल्यास आम्हीं वृत्तीविशीं बोलणार नाहीं. असें सरकारांत लिहून दिलें. आमचे वडिलांनीं रवा केला. रव्यास आमचे वडील खरे निघाले. त्याजवरून सरकारांतून आमचे वडिलांस महजर करून दिला. आणि लोखंडे यांजपासून खोटपत्र घेतलें, आणि लोखंडे यास घालून दिले. आमचे वडील पाटिलकी करूं लागले. पुढ आमचे वडीलांकडे सरकार सेवेमुळें कांहीं अन्याय आल्यावरून बाहेर गेल. तों लोखडे धनगर गांवावर येऊन राहिले. हें वर्तमान सरकारांत समजल्यावरून सरकारांनीं कामदार पाठवून पाटिलकीचें काम चालविलें. नंतर कांहीं दिवसांनीं आमचे वडील हजर झाले. तेव्हां सरकारानें आपला

गुमासम उठवून आणि आमचे वडीलास हुकूम देऊन गावांस पाठविलें. ते वहिवाट करूं लागले. नबीसाहेबाच्या आमदानीस आमचे वडील पाटिलकी करीत असतां नान-बीचा व आमचे वडीलाचा आकस पडला कीं, तुम्हीं आमचे पाटील असतां, गनीमाशी मिळोन त्याची चाकरी करितां, ह्मणोन त्याशीं धरून आणण्याशी पाठवून आणि दोन असा-मी धरून आणितो व नागवणही घेतली व एक असामीस बेडी घालून ठेविलें. व एक असामीचें डोसकें मारिलें. ज्यास बेडी घालून ठेविलें त्यास मारावें, तों ईश्वरानें त्यास वाट दिली. तो बेडीसमेत दरवाजावाटे निघोन गेला. नंतर नबीनें दिलासा देऊन कोल करार करून आमचे वडील निवून गेले होते, त्यास गांवावर आणिलें. तें पाटिलकीची वहिवाट करीत आले. श्रीमंताचे स्वारीबरोबर आमचे वडील गेले तेथें पानपत जाहलें शंभर खाशे गेले त्यापैकीं दहाखासे माघारे घरांस आले. व वतनाबद्दल कोणी बोलण्याजोगा राहिला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं आमचे वडील यांनीं श्री. बाजीराव साहेब यांचे कानावर मजकूर घातल्यावरून साहेब यांनीं वृत्तीची जप्ती करवीली आणि स्थळांत चौकशी व्हाव. याची तों शिंदे सरकारची स्वारी हिंदुस्थानांत निघाली. तेव्हां त्यांजबरोबर आमचे मंडळींस जाणे प्राप्त, म्हणोन मंडळी निघोन गेली. घरीं कोणी राहिलें नाहीं. पुढें हाजर झाले, तों लोखंडे धनगर नेमले स्थळांत हाजर न होईल, सबब सन सब आसरेचे सालीं मामलेदार किल्ले संतोषगड यांनीं आमचे वतनाची मोकळीक करून सोडचिठी आमचे वडिलास दिली, परंतु आणखी लोखंडे धनगर यास मामलेदार यांनीं सुभ्यास नेऊन विचारितां त्याजपाशीं कागदोपत्रीं पुरावा नाहीं व स्थळां-तही हाजर राहिले नाहीं. सबब त्यांनीं आमचे वडिलांचे कागदपत्र पाहून व सही साक्षी घेऊन आमचे वृत्तीची मोकळीक करून दिली. आमचे वडील वहिवाट करीत आले. नंतर पुढें आमची मंडळी श्रीमंतांबरोबर गेली व कांहीं रोजगाराच्या खटपटींत लागले, तों लोखंडे आणखी खटपट करूं लागले, सबब आमचे वडिलांनीं मे० ग्रांटसाहेब बहादूर यांजपाशीं अर्ज केल्यावरून त्यांनीं वृत्तीची जप्ती केली आणि देशमुख व देशपांडे वगैरे यांजवर पंचाईत नेमून दिली. सरकारांतून इनामाची जप्ती होऊन दुसरे कुळांस लाविलें असतां, लोखंडे आपण करूं लागले. सबब आमचे मंडळीनें खटला केला. त्यावरून लोखंडे यांनीं मे० ग्रांटसाहेब बहादूर यांज-पाशीं आमची बहुत आदावत घालून आल्या-वर साहेबांनीं रागास यावें, असा मजकूर समजाविला. आमचे वडील तेथें होते, परंतु ते वेळेस साहेबापाशीं बोलले नाहीं, कारण कीं लोखंडे यांनीं बहुत आदावत घातली असेल, तेव्हां साहेब रागास येतील आजच बोलूं नये, म्हणोन बोलले नाहीं. घरास गेले ते तिकडेच गूंतून राहिले हे लोखंडे यांनीं पाहून आणखी वहिवाट करूं लागले. त्यावरून हल्लीं आम्हीं हुजूर सातान्यास अर्ज करून चौकशीविशीं हुकूम आणिला आहे. त्यास पूर्वापार मौजे मजकूरची वतनवृत्ति आमची आहे असें असून, विनाकारण लोखंडे धनगर खटला करून जबरीनें वहिवाट करितात त्यास येविशीं कागदोपत्रीं व भोर गांवचे मुद्दे पुर-वणी करून देऊं व मौजे मजकुरीं आमचे वडिलाची थडी व चौपाले आहेत व पेशजी-वृत्तीबद्दल सरकारांत नागवणही आमचे वडि-लानें भरली आहे, त्याचा पुरावा कागदोपत्रीं आहे. येविशीं पुरी चौकशी झाली पाहिजे. ही

जबानी लिहून दिली. सही ता. १० जानेवारी सन १८९१ इसवी दस्तुर बजाजी बलवंत हामेरा फलटण हल्लीं मुक्काम मौजे ढवळ.

सहीच्या रेघा मालकाच्या हातच्या.

१ विठोबा बीन हैबतराव पवार.

१ दौलतजी बीन मलजी.

ह्या प्रमाणें जबानी लिहून दिल्यावर वादाचा फैसला होऊन पवार यांकडे त्यांचें वतन देण्याचा हुकूम झाला.

श्री.

सरकार कंपनी इंग्रज बहादुर वि० आनंदराव कृष्ण कामदार पा। सेवगांव ता० मोकदमा नीहेहाय पो० मजकूर सु० सन आशरीन मयातेन व अल्लफ सन १२२९ फसली देहेबद्दल तपसील.

| | |
|---|---|
| १ कळ्जे हातगांव | १ मौजे सुपली |
| १ मौजे लखयापूर | १ मौजे दिंगवाडी |
| १ मौजे सोनविहिरे | १ मौजे जळगांव |

एकून देहे ६ येथील मोकासा सरकार कंपनीकडे आमल चालत होतो तो तुळजाजी पवार नि० फत्तेसिंग भोंसले यांजकडे जाती सरंजामा आहे. तो सालमजकूरपासून याचा याजकडे चालवावयाचा हुकुम वजना पट्टे जमाबवला दुजाकबला खतानहजरी पायनर साहेब बहादुर कलेक्टर याचा तारीख २४ माहे आक्टोबरचा सादर हक जाहला असे तर मोकाशाचा आमल सुदामत पवार याजकडे चालत आल्याप्रमाणें मशारनिल्हेकडे देणें जाणिजे. तारीख १२ माहे डिसेंबर सन १८१९ इ.

श्री.

शिकानकल.

ईजत आसार आनंदराव कृष्ण कामदार पो। सेवगांव बाफीयेत बाबद. आज तर्फे कपतान हाजरीघट जनरे साहेब बहादूर कलेक्टर सुभे आमदानगर सलाम ओकी तुलजाजी पवार नी।। फत्तेसिंग भोंसले यांजकडे जातीस सरंजाम पो। मा। पो।। मोकासी याचा-

| | |
|---|---|
| १ मौज हिंगणी | १ मौजे पिंपळगांव |
| १ मौजे बेलासरी | १ मौजे भारड |
| १ मौजे खामदीपुर | १ मौजे खरडे |

येत देहे सहा येथील मोकासीपण आमल चालवावयाचा हुकूम होऊन पुण्याहून सहनाची याद आली त्याजवरून हुकूम केला जातो जे पो। मा। पो। सदरी लिहिल्या गांवचा मोकाशाचा आमल चालवून व करून अनामत ठवून हुजूर करून करणें म्हणजे सबज हुजूर आणवून मापू तुम्हांस आखेरे सालीं खजानेंतून दिल्हे जाईल जाणिजे ता. २४ माहे आक्टोबर सन १८१९ ई।।

इंग्रजी सही.

ढवळगांवच्या पाटिलकीबद्दल पवार व लोखंडे यांजमध्यें आज पुष्कळ दिवस तक्रार चालत आहे व प्रस्तुतही या बाबतींत सातान्याचे कलेक्टर व मध्यविभागचे कमिशनर यांजपुढें या बाबतीचा वाद चालू आहे. त्याचा निकाल भविष्यकाळावर अवलंबून असल्यामुळें या बाबतींत अधिक विवेचन करण्याची जरूरी दिसत नाहीं. परंतु वरील हकीकतीवरून ढवळगांवच्या पाटिलकीचें वतन राजा रणढवळच्या वेळीं संपादन झालेलें असून त्याजवरील मालकी हक पवार यांचा आहे हें दिसून येईल.

इ० स० १८१९–२० सालीं ढवळगांवच्या जमिनीचा दस्त पवार यांनींच सरकारांत भरलेला आहे. त्याच्या रसीदीची नकल येणेंप्रमाणें.

सरकार कंपनी इंग्रजबहादूर

रसीद. बी. कृष्णाजी सदाशिव मामलेदार पेटा फलटण ता० मोकदम मौजे ढवळ पा० मजकूर सुमासन अशरीन मया तेन व अल्लफ मौजे मजकुराकडे सालगु० बाकीचा ऐवज

येणें त्यापैकीं गु० विठोजी ढवळ पा० रसद रोख रुपये.

१६ बिनबटा जुनाछापी. ३१ बटवाचे
३ मध्यमछापी
३२ नरमछापी

—— ——

५१ ३५

पैकीं समबट्टा.
मध्यम छापी दर प्रमाणें.
नरमाचा दर प्रमाणें.

बाकी रुपये ४९ एकूण पन्नास सव्वा पंधरा आणे पेटा मजकुरीं जमा आहेत जाणिजे. छ० २ माहे जिल्हेज मो. खु. द. इ. स. १८१७.

याखेरीज इ० स० १८१५ सालीं ढवळचे वतन पवार यांजकडे चालावें अशाबद्दल सगोआप्पा व त्यांचे वडील विटोजीराव यांच्या नांवानें हुकूम झालेले आहेत. इ० स १८५३ सालीं अर्ज केला होता तो अर्ज येणेंप्रमाणें.

सरकार कंपनी इंग्रज बहादूर.

अर्जी बाा माहातोजी बीन संताजी पाा पवार मौजे नांदवळ संवत वाघोली पेटा वांई सुमासकस खमसेन मयातेन व अलफ सन १२६२ फसली कारणें अर्जी लिहून दिली ऐसीजे. आमचे वडील भाऊपण्याचे तुळजाजी बीन सटवाजी मोकाशी यांचे नावचा सरंजाम सरकार अक्कलकोटवाले यांचे पदरीं आहे. ती हल्लीं अक्कलकोटवाले यांचे निसबतीनें कंपनी सरकारांत सोलापुर ठाण्यांत करावी लागती. परंतु तुळजोजी मजकूर हे मयत होऊन दहाबारा वर्षे झालीं ते आमचे भाऊपण छपावून तुळजोजी मजकूर आहेत असे सरकार अक्कलकोटवाले यांस समजाऊन आपण सर्व भाऊपणा हिश्याप्रमाणें सनद मयत तुळजोजी मजकूर यांचे नांवची असतां सरकारांतून घेतात; परंतु सरकार कायदा मयत सरंजामवाले हे सरकारांत मयत झाले म्हणोन समजावे. हे आमचे भाऊपण यांनीं न ऐकतां आजपर्यंत गफलतीनें सरंजामा खातात. सबब सरकारांत अर्ज केला आहे तरी याची चौकशी पाहावी. ही अर्जी लिहून दिली सही ता. सन १८५३ इसवी.

ह्या अर्जावरून या कज्याचा निकाल दिवाणी कोर्टानें करावा असा त्या वेळच्या अधिकाऱ्यांनीं हुकूम दिला आहे. त्यावरून पवार हे १९ व्या शतकांत या वादास कंटाळून नांदवळ येथें आलेले नसून ते १७ व्या शतकाच्या आरंभीं मुधोजीराव निंबाळकराच्या बंडामुळें नांदवळ येथें येऊन राहिले. अर्थात् नांदवळ मुक्कामीं पवार घराण्याचें वास्तव्य सुमारें तीनशें वर्षांपासून आहे असें स्पष्ट होतें.

फलटणकर जाहागिरदार यांच्यायेथील लेखांमध्यें असें आढळून येतें कीं, वांई देशांत जे पवार गेले ते वाघ पवार होत; परंतु त्यांचे लिहिण्याचा हेतु असा असावा कीं, वाघेश्वर हे पवारांचे कुळदैवत होतें; तें ढवळ सोडल्यावर सुटलें. त्यावरून हे वाघेश्वराचे भक्त असल्यामुळें त्यांस तसें म्हटलें असलें पाहिजे. नांदवळकर पवार यांचे उपाध्ये मात्र आपल्याला वाघ म्हणोन घेतात.

साक्रोजी महिमाजीच्यापूर्वी कोणते पुरुष साताऱ्याच्या महाराजांच्या आश्रयास राहिले होते त्यांची माहिती मिळत नाहीं. साक्रोजीवरून एक पवाडा झालेला होता. त्या पवाडयाचा आशय असा होता कीं, पाडळी येथील सावकार लोकांचें घेणें देणें नांदवळास होत होतें. त्यांचें साक्रोजीकडे घेणें देणें जास्त झाल्यामुळें सावकारानें साक्रोजीस जास्त तगादा केला. त्यावेळीं साक्रोजीस साताऱ्च्या महाराजांकडून शिलेदारी पागा चालत होती; तिचा खर्च करणें भाग पडत होतें, त्यामुळें खर्च भागून सावकारास देण्यास शिल्लक रहात नसे. जवळ तर शिल्लक नाहीं तेंव्हां देण्याची कांहीं तरी व्यवस्था करावी म्हणून साक्रोजी सावकारास म्हणाले कीं, तुमचा हिशोब घेऊन तुम्हीं उदईक प्रातःकाळीं या म्हणजे हिशोब चुकता करूं.

नांदवळ व पाडळी यांमध्यें एक डोंगराची ओळ आहे. नांदवळ वरील बाजूस व पाडळी खालील बाजूस आहे. पाडळीस जातांना डोंगरांतून खालीं आण्यास जो रस्ता आहे त्यास कडजाईचा कडा असें म्हणतात. त्या ठिकाणीं सावकार येण्याच्यापूर्वी साक्रोजी हे जाऊन बसले व सावकार येत असतां त्या उभयतांच्या, डोंगराच्या मध्यभागीं भेटी झाल्या. त्याबरोबर साक्रोजींनीं सावकारास रामराम केला व म्हणालेः–' आपली बाकी चुकती करतो ' असें म्हणून त्याच्या कुशीस भाला लाविला. त्याबरोबर सावकार प्राणाच्या आशेनें भयभीत होऊन म्हणाला. ' माझे रुपये पावले. मला मारूं नका. ' असें म्हणून तावडतोब त्यानें चोपडें काढून पावती लिहून दिली. असा त्या पवाड्याचा भावार्थ आहे. तो पवाडा उपलब्ध नाहीं तरी त्याचें जें एक चरण उपलब्ध आहे तें याखालीं देत आहोंः—

सावकाराच्या कुशीस लाविला भाला ॥
साक्रोजी बाकी निराळा झाला ॥

साक्रोजीच्या नंतर त्यांचे चिरंजीव निंबाजी व हैबतराव हे नोकऱ्या करीत आले. सगो अप्पाचे वडील हैबतराव हे होत. सगो अप्पा यांचे बंधु विठोबा, हे सातारचे महाराज छत्रपति यांजकडे नोकरी करीत होते. परंतु पुढें श्री. छत्रपतिचें राज्य दुर्दैवेंकरून नष्ट झाल्यावर एकंदर मराठ्यांस दैन्यावस्था येऊन इंग्रज सरकारची सत्ता वाढली. त्यामुळें सातारकरांच्या पदरीं असलेल्या सरदारांनीं आपआपल्या फौजा कमी केल्या. त्यावेळीं विठोबा दादा हेही घरीं बसले. तसेंच या घराण्यांतील कोणी पुरुष अक्कलकोटकरांकडे पालखीपदस्त, कोणी श्रीमंत पंतप्रतिनिधी कन्हईकर यांजकडे, कोणी भोरच्या पंतसचिवांकडे, तर कोणी जतच्या डफळ्यांकडे, कोणी राधनपुरच्या नवाबाच्या आश्रयास तर कोणी पेशव्यांकडे याप्रमाणें आपआपल्या लवाजम्यानिशीं नोकऱ्या करीत होते.

चिलो बापू यांनीं करजखोपकरांशीं शरीरसंबंध केल्यामुळें इतरानीं सूतकादि सर्व संबंध तोडून टाकिले. कारण त्या घराण्यांशीं पवारांचे पिढीजाद हाडवैर होतें, त्यामुळें चिलो बापूस नांदवळ सोडलें प्राप्त झालें. ते नांदवळ मुक्कामींहून निघून राधनपूरच्या नबाबाच्या आश्रयास गेले. त्याठिकाणीं त्यांस चाळीस घोड्यांची असामी मिळाली. त्यांनीं नबाबाच्या राज्यांतील तंटेबखेडे मोठ्या पराक्रमानें नाहींसे केले. त्या पवार बंधूंच्या नांवाचा सर्वांस वचक बसला होता. बापू यांचे नातू पणतू अद्याप तेथें आहेत. त्यांचे घोडे वगैरे कमी होऊन फक्त तीन घोड्यांची शिलेदारी होती. आतां कोणी नाहीं.

साक्रोजीच्या घराण्यांपैकीं सगोजी हैबतराव यांची जी माहिती उपलब्ध आहे, ती यानंतर देत आहों. सगोजी अप्पा हे आपल्या अल्पवयांत नौकरी करण्याच्या इराद्यानें घर सोडून साल्पेमुक्कामीं आपल्या मामास भेटण्यास आले. त्या वेळीं दहिगांवकर चव्हाण, सगोअप्पा यांचे मामा ग्वाल्हेरमुक्कामीं पदके होते ते दहीगांवसोडून ग्वाल्हेर येथें जात होते. त्यावेळीं सगो अप्पा मामास म्हणाले कीं, मी ही आपल्या बरोबर येतों. तेव्हां ते म्हणाले कीं, तुमचें वय लहान आहे, सबब तुम्हीं येण्याचें करूं नये. परंतु सगो आप्पानीं आपला हट्ट सोडला नाहीं. ते तसेच मामाबरोबर निघाले व ग्वाल्हेरमुक्कामीं जाऊन पोंहोंचले. त्या ठिकाणीं ते आपल्या नोकरीची खटपट करीत होते. इतक्यांत गोहद मुक्कामींच्या ठाकुरलोकांनीं बंड केलें तें मोडण्यासाठीं दहीगांवकर चव्हाणांस हुकूम झाला. म्हणून दहीगांवकर चव्हाण हे बंडखोरांवर हल्ला करण्यासाठीं चालते झाले. त्यावेळीं सगोअप्पा हेही त्यांजबरोबर होते. त्याठिकाणीं बंडखोरांबरोबर लढत असतां सगो आप्पा जखमी होऊन पडले. तें कोणासही माहीत नव्हतें. पुढें मुक्कामीं आल्यावर तपास करितां सगो आप्पांचा शोध लागला नाहीं. त्यामुळें धोंडीबा चव्हाण यांचे वडील, मेणा बरोबर घेऊन आप्पांच्या शोधार्थ हल्ल्याच्या ठिकाणीं गेले. त्याठिकाणीं तपास करितां त्यांस जखमी झालेल्या आप्पांचा तपास लागला व त्यांनीं त्यांस मेण्यांत घालून आणिलें. घरीं आणून जखमांस टाके वगैरे मारून औषधोपचार सुरू केला. अशा रीतीनें जोपासना करितां कांहीं दिवसांनीं सगो आप्पा बरे झाले. त्यावेळीं यजमानांकडून त्यांच्या रोजगाराची कांहीं व्यवस्था करावयाची तोंच दहिंगांव

येथील कुळकर्णी यांस दहिगांवकर चव्हाणावर उपरी नेमिलें. ह्या प्रकारामुळें चव्हाण यांस राग आला व त्यांनीं शिंदे सरकारांस विनंति केली कीं, आम्हीं कुळकर्णी यांस रामराम करणार नाहीं, यासाठीं आमचेवर त्यांची नेमणूक होऊं नये. ह्या विनंतीची बातमी मिळतांच कुळकर्णी यानें श्री० शिंदे सरकारांस भेटून झालेल्या नेमणुकींत फरक व्हावयाचा नाहीं, असें ठरवून घेतलें. त्यामुळें चव्हाणांस राग येऊन ते तेथून निघाले व पुणें मुक्कामीं आले. यावेळीं पुण्यास शेवटचे बाजीराव पेशवे हे होते. त्यांस त्यांनीं आपली सर्व हकीकत कळविली. त्याबरोबर पेशव्यांनीं त्यांस आपल्या पदरीं ठेविलें. आपली व्यवस्था होतांच चव्हाणांनीं सगो आप्पासंबंधानें श्री० बाजीराव पेशवे यांस असें सांगितलें कीं, 'आमच्या बरोबर आमचे भाचेही आहेत.' त्यांची व्यवस्था त्याचठिकाणीं व्हावयाची होती; परंतु आमच्यामुळें त्यांचें नुकसान झालें आहे, तरी त्यांचीही व्यवस्था केल्यास बरें! हें ऐकतांच श्रीमंतांनीं सगो आप्पांचीं नेमणूक मानकऱ्यांमध्यें केली. त्यानंतर पेशव्यांचें राज्य खलास झाल्यावर पेशवे ब्रह्मावर्तास गेल्यावर सगोजी आप्पा यांस पांचशें रुपये पेनशन देण्यांत आलें. त्यामुळें ते नांदवळ येथें येऊन राहिले. त्यांस पुत्र चार व कन्या दोन अशीं सहा आपत्यें होतीं १ बयाजीबुवा २ पाटीलबुवा ३ नानासाहेब ४ वामनरावजी हे चार पुत्र व कन्या जिजाबाई व काशिबाई अशा होत्या. बयाजीबुवा यांचा शरीरसंबंध वाघोलीकर भोइटे यांच्या कन्येशीं झाला. पाटिलबुवा यांचा संबंध पिसाळ्यांच्या कन्येशीं झाला. नानासाहेब यांचा संबंध भोइटे यांच्या कन्येशीं झाली. जिजाबाई यांस मानेचरे गांवकर इनामदार यांस दिल्या होत्या. काशिबाई यांस श्री० बापुसाहेब महाराज देवास यांचे मेव्हणे श्री. बाजीराव साहेब घाटगे यांस दिल्या होत्या– पुढें थोड्याकाळानें सगोजी आप्पा हे कैलासवासी झाले. यानंतर इंग्रजसरकारांनीं त्यांच्या कुटुंबास–नानीबाईस निम्मे पेनशन करून दिलें. ह्या बाई तडावळेकर खराडे यांच्या प्रसिद्ध घराण्यांपैकीं होत्या. त्यांनीं वामनराव यांचा शरीरसंबंध मुरुमकर जगताप यांच्या कन्येशीं जुळविला. पुढें कांहीं दिवसांनीं नानीबाईसाहेब ह्या वारल्या. त्यावेळीं वामनरावजी हे अज्ञान असल्यामुळें ते आपल्या बहिणीकडे म्हणजे देवास येथील सरदार बाजीराव साहेब घाडगे यांजकडे विद्याभ्यास करण्यासाठीं गेले. त्यानंतर ते श्री. आनंदराव महाराज धार यांजकडे मानकऱ्यांत नोकरीस राहिले. सरदार बाजीराव साहेब घाडगे यांस सहा कन्या, व चार पुत्र होते. चौघेही पुत्र बालपणींच वारले. मुलींपैकीं पहिली कन्या गुजाबाई यांस कोंकणांत मानकर इनामदार यांच्या येथें दिल्या. त्यांस ताराबाई घाडगे या नांवाची एक कन्या, दुसऱ्या विठाबाई यांस कृष्णराव सापकर यांस दिल्या. त्यांस श्रीमती सौ. तानीबाई शिंदे या नांवाची एक कन्या, तिसऱ्या नानीबाई यांस ग्वाल्हेर येथील सरदार दौलतराव महाडीक यांस दिल्या होत्या, त्या अल्पवयांतच वारल्यामुळें त्यांस संतती झाली नाहीं. चवथ्या छोटीबाई यांस प्रसिद्ध संस्थान अलिबाग येथील मानाजीराव आंग्रे यांस दिल्या होत्या. त्यांस सौ. जीजीबाई या नांवाच्या एक कन्या होत. यांच्या मातोश्री निवर्तल्यावर ह्या श्री. सौ. मातोश्री महाराणी **चिमणाबाई साहेब गायकवाड** बडोदें, यांजकडे रहात असत. त्या वयांत आल्यावर ह्या घराण्याच्या मालक झाल्या. मानाजीराव आंग्रे निवर्तल्यावर मध्यंतरी खोटा दत्तक उपस्थित होऊन वाद चालला होता. त्या संधींत कुलमुखत्यारिचें काम करण्याकरितां वामनराव यांच्या, आनंदराव व नानासाहेब, ह्या दोन चिरंजिवांपैकीं द्वितिय चिरंजीव नानासाहेब यांस नेमिलें होतें. हा वाद सबॉर्डिनेट जज्जापासून तों तहत मुंबई हायकोर्टापर्यंत चालला होता. त्याचा निकाल सौ. जिजीबाईस अनुकुल असा झाला. त्याबरोबर त्या आंग्रे यांच्या इस्टेटीच्या मालकीण झाल्या. त्यांनीं पुढें मुंबई हायकोर्टांत पेनशनसंबंधीं मागणी केल्यावरून त्यांस दरसाल पेनशन सुरू झालें. नंतर कांहीं दिवसांनीं जिजीबाई यांचा शरीरसंबंध श्रीमंत मल्हारराव महाराज यांचे बंधु श्री. सदाशिवराव पवार संस्थान देवास यांजबरोबर इ० स० १९०४ च्या मार्च महिन्यांत बडोदें मुक्कामीं विश्रामबागेंत मोठ्या थाटानें झाला. पांचवी कन्या श्रीमंत सौ.

**गजराबाईसाहेब** यांचा शरीरसंबंध सकल गुणैश्वर्य गुर्जराधिपति प्रभू श्रीमंत **सयाजीराव महाराज गायकवाड** सेनाखासखेल समशेर बहादूर यांच्याशीं इ० स० १८८६ सालच्या मार्गशीर्ष महिन्यांमध्यें मोठ्या समारंभानें झाला. या शरीरसंबंधामुळें घाटगे व पवार हीं घराणीं बडोदें मुक्कामीं आलीं. महाराजांनीं सरदार बाजीराव मामासाहेब घाडगे यांना सालीना नेमणूक करून दिली. तसेंच कृष्णराव जाधव, व नारायणराव घाटगे, आनंदराव पवार, व आनंदराव शिंदे या सर्वांस मानकऱ्यांच्या जागा देण्यांत आल्या.

श्री. आनंदराव पवार यांनीं गायकवाड सरकारचीं कामें दक्षतेनें केलीं. त्यामुळें श्रीमंत सयाजीराव महाराज यांनीं प्रसन्न होऊन १९०२ सालच्या आपल्या वाढदिवसाच्या दरबारांत श्री. आनंदराव पवार यांस छत्रमशालीचा बहुमान दिला. व गौरवयुक्त भाषण केलें. ते म्हणाले:—

" मानकरी आनंदराव पवार यांच्या घराण्याचा पूर्व इतिहास बहुतेक लोकांस माहीत आहे. पवारांचें घराणें मराठ्यांच्या उच्च घराण्यांत मोडतें. पूर्वीं ज्यांस परमार म्हणत, त्यांस हल्लीं पवार म्हणतात. तेव्हां त्यांचें मोठें कूळ व त्यांचें आमच्या घराण्याशीं नातें, ह्या गोष्टी मनांत आणून त्यांचा थोडा बहुमान करण्यांत आला आहे. ह्या बहुमानाचें मुख्य कारण सर्व मंडळींनीं ध्यानांत ठेवण्यासारखें आहे; तें असें कीं, पवार यांची नोकरी आमच्या सांनिध आहे. यजमानाजवळ राहून संतोषकारक सेवा करणें हें काम वाटतें तितकें सोपें नाहीं, तें फार कठीण आहे. नोकरांचे अंगीं चांगले गुण असतील तरच त्यांच्या हातून काम बरोबर होईल. जवळ राहणारीं माणसें कर्तव्यदक्ष, हुशार, चाणाक्ष, अशींच असलीं पाहिजेत. व असे असूनही ते आपली नोकरी बरोबर बजावितील तरच यजमानास सुख व्हावयाचें. यजमान जसे हुशार असतील किंवा त्यांच्या ठिकाणीं ज्या प्रकारचे गुणदोष असतील त्यामानानें जवळच्या मंडळीची नोकरी कमीज्यास्त जोखमीची होईल. अशा रीतीनें आमच्या सुखाविषयीं निरंतर काळजी बाळगून काम करणारे असे हे पवार आम्हांस आढळून आल्यामुळें त्यांस छत्रीमशाल देण्यांत येत आहे. वास्तविक हा मान विशेष आहे, असें नाहीं. मानकरी हा जो किताब आहे, तोच मोठा महत्त्वाचा आहे. मानकरी याचा अर्थ पूर्वीं लष्करी पेशाचा होता. हल्लीं जे मानकरी आहेत, त्यांच्या पूर्वजांनीं मोटमोठीं शौर्याचीं कामें केलेलीं आहेत. आज प्रसंग असता तर त्यांनींही सरदारकीचीं कामें केलीं असतीं. तसा प्रसंग जरी आज नसला तरी दिलेल्या मर्यादेंत जे लोक संतोषकारक सेवा करितात. त्यांचा बहुमान करणें अगदीं रास्त आहे; परंतु आमच्या दुर्दैवानें किंवा आंगच्या कांहीं दोषामुळें म्हणा, अशा बहुमानास पात्र मंडळी आम्हांस फारशी आढळून येत नाहींत. योग्य नोकरीचा बहुमान करण्यास आम्हीं फार उत्सुक आहों. तरी सर्व नोकर मंडळींनीं ही आमची इच्छा ध्यानांत ठेवून उत्तरोत्तर ज्यास्त बहुमान मिळविण्यास झटावें. तेणेंकरून स्वतःच्या नोकरीचें चीज होऊन आम्हांसही संतोष होईल." असें भाषण करून महाराजांनीं त्यांस बहुमान व पोषाख दिला.

श्री० सौ० मातोश्री **गजराबाई ऊर्फ चिमणाबाई महाराणीसाहेब गायकवाड** यांस, श्रीमंत **जयसिंगराव** श्रीमंत **शिवाजीराव** श्री. **धैर्यशीलराव** व श्रीमंत **इंदिराराजे** याप्रमाणें आपत्यें आहेत.

सहावी कन्या सीताबाईसाहेब यांचें लग्न श्रीमंत **संपतरावसाहेब गायकवाड** यांच्याशीं इ० स० १८९२ सालीं पुणें मुक्कामीं झालें. त्यांजला श्री० रत्नप्रभाबाई, श्री. सुभद्राबाई श्री० चंद्रप्रभाबाई व श्री. आबासाहेब अशीं चार अपत्यें आहेत. श्री. **सिताबाई** साहेब यांस इ० स० १९०२-०३ सालीं देवाज्ञा जाहली.

सांप्रत ह्या घराण्याचे थोर पुरुष श्री० आनंदराव वामनरावजी पवार हे बडोदें मुक्कामीं सकल गुणैश्वर्य श्री० सयाजीराव महाराज गायकवाड यांचे मानकरी आहेत. त्यांनीं आपल्या कर्तृत्वानें ज्यांच्या आंगीं योग्य व लायक माणसांची परीक्षा करण्याचें अलोट सामर्थ्य आहे त्या विद्वान व गुणज्ञ प्रभुंची—श्री० सयाजीरावांची—प्रीति संपादन केलेली आहे. श्री० आनंदराव

यांच्या कार्यतत्परेनें श्रीमंतांची मर्जी सुप्रसन्न राहून ते त्यांस वेळोवेळीं अनेक मार्गांनी शक्य ती मदत करून प्रोत्साहन देत असतात. महाराजांच्या ह्या प्रोत्साहन देण्याच्या पद्धतीनें त्यांच्या सेवकवर्गास आपलीं कामें तत्परतेनें करण्याचा व महाराजांकडून शाबासकी मिळविण्याचा हुरूप येत असतो. हल्लींच महाराज विलायतच्या प्रवासास गेले, त्यावेळीं श्री० आनंदराव पवार यांची, श्री० जयसिंगराव यांचा, श्री० बापुसाहेब हंडे इनामदार यांच्या कन्या श्री० शकुंतला बाई साहेब यांजबरोबर बडोदें मुक्कामीं जो विवाह झाला, त्याप्रसंगींची कार्यतत्परता वगैरे लक्षांत घेऊन महाराजांनीं त्यांस बक्षीस देऊन त्यांचा गौरव केलेला आहे. ईश्वर ह्या ढवळ- च्या पवार घराण्यांतील माननीय पुरुष श्री० आनंदराव पवार यांस यश, कीर्ति, संपत्ती, संतती, बल, व ऐश्वर्य देवो !



# म्हसवडचे माने यांची कैफियत.

## घराणें–नं० २,

### भाग ३ रा.

## माने घराण्यासंबंधानें साधारण विवेचन.

महाराष्ट्रामध्यें मराठ्यांचीं जीं थोर घराणीं आहेत, त्यांपैकींच म्हसवडचे माने यांचें घराणें आहे. ह्या माने घराण्यानें आपल्या शौर्यवीर्यादि गुणांनीं महाराष्ट्रामध्यें बरेंच अग्रस्थान पटकविलेलें होतें. हें घराणें विजापूरकरांच्या पदरीं नामांकित शिलेदारांमध्यें होतें. या वंशाचे रताजी बिन नरसिंगराव माने हे विजापूरया दरबारीं सरदार होते. त्यांनीं त्या दरबारचीं अनेक कार्यें केल्यावरून त्यांस तेथें फारच मान होता. रताजीरावांच्या मृत्यूनंतर नागोजीराव यांचा विजापूरकरांशीं बेबनाव झाल्यामुळें ते औरंगजेबाच्या पदरीं राहिले. त्यांनीं औरंगजेबास दक्षिणेंतील स्वारींत मराठ्यांचीं ठाणीं काबिज करण्यांस बरीच मदत केली होती. परंतु चंदीच्या वेळ्यामध्यें ज्याप्रमाणें सर्व मराठाबांधवांमध्यें स्वामिभक्ति व स्वदेशभक्ति यांचें वारें उपस्थित झालें होतें व त्यामुळें सर्व महाराष्ट्रांनीं एक जूट करून मोंगलांस शह देण्याचा उपक्रम आरंभिला होता, त्याप्रमाणें शिर्के यांचें संभाजीनें अगणित नुकसान केलेलें असूनही त्यांच्या अंतःकरणांत स्वामिभक्तिचा प्रादुर्भाव झाला त्याप्रमाणें नागोजीराव माने यांसही उपरति झाली. व ते स्वदेशाभिमानानें प्रेरित होऊन मराठ्यांस सामील झाले व त्यांनीं राजाराम महाराजांची जिंजीच्या वेढयामधून मुक्तता केली. ह्या नागोजीरावाच्या कामागिरीप्रीत्यर्थ राजाराम महाराजांनीं त्यांस म्हसवडची सरदेशमुखी वगैरे इनाम करून दिली. ह्या प्रसिद्ध घराण्याची हकीकत पूर्णपणें प्रकाशित होण्यासारखीं कागदपत्रें, बखरी वगैरे अस्तित्वांत आहेत, परंतु अद्याप आमच्याकडे त्या कुळांतील पुरुषांकडून कांहींच माहिती आलेली नाहीं. श्री० दादासाहेब माने तसेंच श्री० राजाराम सखाराम माने यांनीं मनावर घेतल्यास ह्या घराण्याची कैफियत प्रसिद्ध होण्यास विलंब लागणार नाहीं. श्री० दादासाहेब माने हे सध्यां बडोद्याची आपली नोकरी सोडून विश्रांति घेत आहेत. तरी आतां हा विश्रांतिचा काळ आपल्या घराण्याच्या कैफियतीची तयारी करण्यांत मानेसाहेब खर्च करतील तर महाराष्ट्रेतिहासावर प्रकाश पाडण्यासारखें महत्कृत्य त्यांच्या हातून होईल. आमच्या ह्या विनंतीचा मानेसाहेबांकडून अव्हेर होणार नाहीं, अशी आह्मांस आशा आहे. आज जी ही म्हसवडकर मान्यांची कैफियत दिलेली आहे ती म्हसवडाहून खानापुरास गेलेल्या मान्यांच्या घराण्यापैकीं जें एक घराणें आंधळी मुक्कामीं गेलें त्यांची आहे. ह्या कैफियतीमध्यें फक्त सदर घराण्याच्या वंशावळीचाच समावेश केलेला आहे. कारण इतर माहिती दर्शविणारे कागदपत्र संग्रहीं नसल्यामुळें संकलित हकीकत देतां येत नाहीं याबद्दल आम्हीं दिलगीर आहों. ह्या कैफियतीस म्हसवडचे माने यांची कैफियत घराणें नं० २ असें म्हटलेलें आहे. कारण पहिलें घराणें म्हसवडच्या प्रमुख शाखेचें आहे. तेंच प्रथम घ्यावयास पाहिजे होतें; परंतु त्या घराण्याची कैफियत आमच्या हातीं नसल्यामुळें त्या घराण्याचा मान आम्हीं राखून ठेविलेला आहे. तो त्या घराण्यांतील पुरुषांनीं आपली कैफियत प्रसिद्धीसाठीं त्वरित पाठवून देऊन रक्षण करणें. ‘माने’ हें घराणें मुळीं मानीच आहे. त्या घराण्यांतील पुरुषांनीं आपल्या मानाच्या संरक्षणासाठीं कधींही आपली मान नम्र केलेली नाहीं; मग आतांच ते करतील असें आम्हांस वाटत नाहीं.

सदर आंधळी येथें गेलेल्या म्हसवडच्या माने घराण्याची वंशावळ पाठविल्याबद्दल आमचे मित्र श्रीयुत आनंदराव हैबतराव ऊर्फ दादाराव माने यांचे आम्ही अत्यंत आभारी आहों. माने घराण्यांतील ह्या महाभावांनीं ज्याप्रमाणें आपला मान राखून घेतला, त्याप्रमाणें इतरही मराठ्यांच्या कुळांतील पुरुषांनीं आपला मान राखून घ्यावा. अशी आमची सर्वत्र मराठा बांधवांस विनंति आहे.–

## म्हसवडचे माने.

म्हसवडचे माने–यांनीं कृष्णा व भीमा या दोन नद्यां मधील सातारा जिल्ह्यांतील प्रदेश वसविला. या प्रदेशांत फार प्राचीन काळापासून झेंडे धनगरांची वस्ती असावी, असें दिसतें. मल्लारी ( मार्तंड अ० खंडोबा ) याचे कथेवरूनही तोच बोध होतो. हे लोक एका ठिकाणीं न राहतां आपल्या मेंढ्यांचा व गायींचा कळप घेऊन चाऱ्याच्या व पाण्याच्या सोयीप्रमाणें स्थान पालट करीत, म्हणूनच त्या प्रदेशांत मेंढयांच्या लेंड्यांचे मोठ मोठे ढीग दृष्टीस पडतात. कांहीं ढिगांची तर पांढरी माती बनलेली आढळते. हल्लींची गांवठाणें या मातीच्या आश्रयानेंच वसलेली आहेत. माने यांनीं जो प्रदेश वसविला त्या प्रदेशास त्यांचे नांवावरून मान देश हें नांव माने यांना माने हें नांव इसवी सन १६६५ च्या सुमारास मिळालें. तें बेदरचा बादशहा इब्राहीम बेरीदशहा यानें दिलें. तें यांचा पराक्रम, धाडस व प्राणापेक्षां मानास अधिक मानणारे आहेत, अशी खात्री करून घेऊन ' माने ' हें बहुमानाचें पद देऊन आपल्या बरोबरीचा मान दिला. बेदरच्या दरबारीं फक्त ' माने ' यांनाच बरोबरीचा मान होता, आणखी कोणासही नव्हता. बेदर नंतर हे माने विजापूरच्या राज्यांत नोकरीस राहिले.

बेदरच्या राज्याच्या आखेरीच्या वेळीं व नंतर या मान्यांची घराणीं निरनिराळ्या ठिकाणीं गेलीं. व कित्येकांनीं पाटिलकींचीं वतनें संपादन केलीं. कित्येकांनीं देसकती मिळविल्या. कांहीं इनामदार झाले. त्या काळीं पाटिलक्या व देसकती संपादन करणें म्हणजे सर्वांत श्रेष्ट प्रतीचा दर्जा संपादन करणें, अशी परिस्थित्यनुरूप समजूत होती. कारण या दर्जास त्यात्या प्रदेशापुरता राजाप्रमाणें मान होता. असें या लोकांच्या वंशावळी वगैरे कागदपत्रांवरून समजतें. गांवांतील हरएक कज्जाचा निकाल पाटिल करीत असे कज्जा विशेष भानगडीचा व महत्त्वाचा असला तर पंचामार्फत पाटिलच निकाल देत असे. पंचांत बहुतेक बलुत्यापैकीं कांहीं जणांची निवड होत असे. पंचांमार्फत निकाल झाल्यांचे कागद अद्याप लोकांजवळ पाहण्यास मिळतात.

म्हसवडाहून खानापुरास जें मान्यांचें घराणें गेलें, त्यांपैकींच एक मौजे आंधळी येथें आलें. ( हा गांव सांगली संस्थानांत असून ब्रिटिश सरकारचे हल्लींचे तासगांव तालुक्यांत अगदीं पश्चिमेस आहे. ) आंधळीचे सर्व माने विजापुरास नोकरीवर होते. हे जोंपर्यंत विजापुराकडे होते तोंपर्यंत यांचा मोठा बडेजाव होता असें लोक सांगतात. यांच्यापैकीं एक घराणें कोल्हापुराकडे नोकरीस राहून त्यांनीं चांगला पराक्रम करून ' भीम बहाद्दर ' ही पदवी मिळविली. यांचीं घराणीं रुकडी, मागूर, सांवगांव वगैरे ठिकाणीं असल्याचें समजतें.

म्हसवडाहून माहुली, रहिमतपूर, कडगांव वगैरे अनेक गांवांत हीं माने यांचीं घराणीं जाऊन वतन संपादून राहिलीं आहेत. करवीर इलाख्यातील मौजे कडगांव येथील देसाई हे मुळच म्हसवडचे मानेच होत, असें समजतें.

पुढील वंशावळ अवलोकन केली म्हणजे ' शिवाजीनें आडदांड लोकांच्या मदतीनें पुंडाई आरंभिली ' हें इतिहासांतील विधान काल्पनिक आहे, खरें नाहीं, अशी खात्री होते. सोबतच्या वंशावळी वरून पाहिलें असतां शिवाजीनें आपल्या जातीचे, आप्त असलेले व नसलेले, लढाईत कसलेले तसेंच ज्यांच्या पदरीं घोडीं, लढवय्ये लोक व इतर युद्धोपयोगी सामुग्री आहे आणि ज्यांना जमविणें अशक्य नाहीं, अशाच लोकांचा संग्रह केला. अशा लोकांच्या संग्रहाकरितां त्यांना नानाप्रकारच्या युक्त्या योजाव्या लागल्या. म्हणूनच प्रतिकूल परिस्थितींत त्यांचे हेतू पार पडत गेले. हें सोबतच्या वंशावळी वरून स्पष्ट होत आहे.

## जुने कागद पत्र.

याद वंशावळ—म्हसवडहून माने यांचें एक घराणें खानापुरास गेलें. त्यांच्यापैकीं मौजे आंधळी येथें जें आलें त्याची वंशावळ मूळ पुरुष लिंगोजी माने यास पुत्र दोन. वडील देमजी व दुसरा मेघजी.

देमजी यास पुत्र ४

१ रावजी (यानें पाटिलकी वतन पूर्ण संपादन केलें)
१ खंडोजी
१ लखमोजी
१ धावजी
—
४

वडील रावजी पाटील यांस पुत्र ४

१ ( वडील ) देमजी
१ तुळाजी
१ रताजी
१ मलजी
—
४

हे चौघे भाऊ विजापुरीं बादशाहाकडे नोकरीस होते. पैकीं देमजी व तुळाजी या दोघांना शिवाजीनें आपणाकडे वळवून घेतलें आणि देमजी याची नेमणूक कर्नाटकांत केली व तुळाजीस आपल्याजवळ ठेऊन घेतलें.

देमजी यास पुत्र २

१ ( वडील ) मुरारजी
१ रघुनाथराव
—
२

मुरारजी पाटील यास पुत्र १

१ भिकाजी
० लग
—
१

भिकाजी माने पाटील यास पुत्र ४

१ रघुनाथराव पाटील.
१ सिदोजी
१ सरूपजी
१ यशवंतराव
—
४

वडील रघुनाथराव यास पुत्र १

१ हैबतराव.
० लग
—
१

हैबतराव विन रघुनाथराव यास विजापूरचे एका सरदारानें धरून झाडास उलटें टांगून घातलें, राखेचे तोबरे दिले. चुन्याच्या पाण्यांत बुडवून चिंचेच्या फोकांनीं नित्य मार दिला, तेव्हां त्यांचा मुलगा मौजे बाळेखिंडी ( संस्थानजत ) येथें पळून गेला. तेथें त्यांचे कांहीं उत्पन्न होतें. इकडे हैबतराव यांनीं सैन्याचा खर्च दिला ( त्याची तपशीलवार यादी आहे ) बाकी मजकूर फाटून गेला आहे.

हैबतराव यांना पुत्र एक

१ खंडेराव.
० लग
—
१

खंडेराव यांना पुत्र ३

१ जिजाजीराव ( बापु )
१ हैबतराव उर्फ दादाराव
१ धोंडीबा
—
३

हे तिघे भाऊ विजापुरीं नोकरीवर होते. त्यांत हैबतराव ऊर्फ दादाराव यांचेवर कांहीं तोहमत आल्यामुळें त्यांनीं आपल्या पागेची २० घोडीं धोंडीबास बरोबर देऊन गड्यावरोबर सोलापुरास पाठविलीं. व यांना इकडे कांहीं दिवस गादीच्या बळकटींत छपवून ठेविलें होतें. पुढें एके दिवशीं सोय पाहून हे खंदकांतून युक्तिनें बाहेर पडले व सोलापुरास आपल्या घोड्यास जाऊन मिळाले. पुढें सोलापुरास राहणें नुकसानीचें होईल, असें समजून आपलीं घोडीं घेऊन मथुरेंत जाऊन राहिले. मथुरेस पोहोंचेपर्यंत निमीं घोडीं वाटेंत मेलीं व १० च शिल्लक उरलीं. तीं भाड्यानें व्यापाराकरितां मालाची ने आण करण्याच्या कामावर लावलीं, तेव्हां त्यांतून एक एक कमी झालें म्हणून स्वारी मथुरा सोडून ठाणें जिल्ह्यांत येऊन राहिली. जिजाराव यास पुत्र केदारजी हैबतराव ( दादाराव ) यांना पुत्र आनंदराव.

## श्रीमार्तंड भैरव प्रसन्न.

याद करिणा वंशावळ मौजे आंधळी कसबे विजापूर प्रांत मिरज सुर सन्न, मूळ वतन माने देवजी देकोजींचें, वतन पुरातन आम्हास प्राप्त कैसें म्हणाल तरी; आमचे मूळ ठिकाण खानापूर. देवजी दकोजी मूळ पुरुष कसालियामुळें मोडीस आले, तेव्हां आम्हांस त्यांनीं निमा भाऊ वाटा* दिला. आमचा पूर्वज लिंगो पाटील यास निमे तक्षीम भाऊ वाटा दिला, त्यास कान्हो कायदा नाहीं. लिंगो पाटलाचा पुत्र देमजी पाटील. धाकटा मेगजी पाटील. देमजी पाटलाच्या वडील बायकोस पुत्र नाहीं, याजकरितां त्यांनीं दुसरी बायको केली. तिचे पोटीं पुत्र, वडील ( १ ) रावजी पाटील झाले, त्याचे पाठीवर ( २ ) खंडोजी पाटील झाले, त्याचे पाठीवर ( ३ ) लखमोजी पाटील झाले, वडिलीसही ( ४ ) धावजी जहाला, धाकटीचे तिघे पुत्र, वडिलीसही एक पुत्र, एकूण पुत्र चौघे.

तपशील—धावजी पाटलास पुत्र आवाजी पाटील झाला. पाचोंवरी करीण रेवाई गावडी मानी, दुतर्फा वतन, एके तर्फेनें दुसरी तरफ मारून टाकली. त्यांतून रेवाई गावडी राहिली. ते आंधळीस आली. ती रावजी पाटील याचे गळां पडली कीं, 'जातीचा अभिमान तुला ! माझा वंश बुडाला ! ! अभिमानेकरून कार्य करावें,' असें ते बोलली. ते समयीं रावजी पाटलांनीं अभय दिलें. तेव्हां ते रेवाई गावडी आंधळीस सहा, चार, महिने राहिली. तेसमईं ती रुसून चालली कीं, तुमच्या हातें हें कार्य होत नाहीं, ते समयीं तिजला समजावून ठेवून घेतली. मग चौघा भावांनीं बसून मनसुबा केला कीं, हीस जाऊं द्यावें किंवा हिचा अभिमान धरून कार्य करावें ? तेव्हां ऐसे बोलले कीं, आली तेव्हांच जाती तर जाती ! आम्हीं तीस वचन देऊन आजपर्यंत हो करून घेतली; आतां तीस लावून द्यावें, तरी खामी येती ! मग एक मनसुबा करून आवाजी पाटील तिच्या ओट्यांत घातला. मग ती घेऊन आवाजीस चालली. उपरांतीक घरांत बायका, एक मूल म्हणवून बायका श्रमी होऊं लागल्या. मग तीनें वडा पावेतों पीराच्या घेऊन गेली. मग जाऊन मागती माघारें * आणली. कीं, 'हें मूल लहान, तुझ्या गांवामध्यें मारे होताती. हें मूल मारतील. तुला ना आम्हांस ! ! नाहींसें होईल ! ! ! तरी यास थोर होऊंदे, मग घेऊन जा;' असे बोलले मग ते बोलली कीं, 'माझीया मनांत ऐसेंच होतें कीं, परंतु आपलेसे करायास ऐसे आपण केलें. आतां पाटीलकीस 'पाचोंबरीस' मुतालीक देणें,' ऐसे बोलली. तेव्हां मौजे आंधळींत दोन घरें मानीयांची होती. इतलाख दोन घरें होतीं. वाडीकर यांचा सोयरा मान्या होता. त्यास बोलला कीं, आवाजी पाटील याचे मुतालिकीस पाचोंबरास जाणे. त्यानें ही गोष्ट मान्य करून मुतालिकेस गेले. त्यास रावजी पाटलाची वडील बायको हसावा§ हिचे पोटीं मूल नाहीं. मग सोनावा दुसरी केली. तिचे पोटीं सिदोजी पाटील जाहला. मग सोनावा ही मृत्यु पावली. व पुत्र तिचा सिदोजी होता तोही मृत्यु पावला. मग तिसरी बायको मुलाकरितां फुलावा केली. तेव्हां ते सोनावा तीस म्हणू लागली कीं, माझें नांव व माझ्या मुलाचें नांव ठेवावें, म्हणजे तुजला पुत्र होतील. तेव्हां ते कवूल केलें. मग एक पुत्र झाला. त्याचें परतून नांव सिदोजी ठेविलें. हा वडील पुत्र. मग त्याचे पाठीवर दुसरा पुत्र जाहला. त्याचें नाव सोनजी ठेविलें. सोनजी म्हणवून पाचारायास नये, या करितां खानाजी पाटील म्हणवूं लागले. तेव्हां रावजी पाटलाचे पाठचा भाऊ, खंडोजी पाटील. त्यास दोघो बायका केल्या, परंतु दोघीच्या पोटीं मूल नाहीं ! मग त्यांचे ओट्यांत खानाजी पाटील घातले त्याचे पाठी तिसरा पुत्र देमजी पाटील जाले. आजाचें नांव ठेविलें, 'देमजी पाटील.' याचे पाठीवर तुळाजी पाटील जाहला. तुळाजी पाटलाचे पाठीवर रताजी पाटील जाहला. रताजी पाटलाचे पाठीवर मलजी पाटील जाहला. एकून साहा पुत्र रावजी पाटील यास जाहले.

* इ० स० १६ वें शतकाचें उत्तरार्धीचे अखेर ही गोष्ट घडली असावी.

* सदरहू गांवच्या ( मौजे–आंधळी ) वायव्य दिशेस सुमारें एक मैलावर पीर व वडाचें झाड अद्याप आहे. ही लष्कराच्या तळाची जागा.

§ स्त्रियांच्या नांवापुढें 'अव्वा' हें बहुमानार्थी पद जोडण्याची कर्नाटकी चाल विजापुराकडून आली असावी. अव्वा म्हणजे आई.

वडील पुत्र सिदोजी होता तो मृत्यु पावला. त्याचे पाठीचा खानाजी पाटील हा रावजी पाटील याचे पाटीचा खंडोजी पाटील याच्या ओट्यांत घातला. पुढें चौघे पुत्र राहिले. त्यामध्यें वडील देमजी पाटील. याचे पुत्रः- वडील मुरारजी पाटील. धाकटा पुत्र रघुनाथ पाटील. देमजी पाटलाच्या पाटचा तुळाजी पाटील, याचा पुत्र कृष्णाजी पाटील. तुळाजी पाटील याचे पाटीचा रताजी पाटील, त्याचा पुत्र जोत्याजी पाटील याचे पाटीचा मलजीं पाटील. याचा पुत्र भगोजी पाटील. रावची पाटील याचे पाटीवर खंडोजी पाटील यास पुत्र नाहीं. म्हणून खानाजी पाटील त्याच्या ओट्यांत घातला. खानाजी याचा वडील पुत्र खेत्रोजी पाटील याचे पाटीवरील खंडोजी पाटील, याचे पाटीवर शहाजी पाटील. खंडोजी पाटील मृत्यु पावला. खानाजी पाटील यांनीं दुसरी बायको केली. तिच्या पोटीं जोत्याजी पाटील जाहला. वडील रावजी पाटील, त्याचे पाटचा लखमोजी पाटील. लखमोजी पाटलाचा पुत्र भिकाजी पाटील.भिकाजी पाटलाचा पुत्र गोविंदराव पाटील. आणीक वडीलीचा पुत्र धावजी पाटील. धावजी पाटलाचा पुत्र आबाजी पाटील. त्याचा पुत्र सिदोजी पाटील. ऐसा चौघा भावांचा विस्तार सांगीतला. वडील देमजी पाटील याचा विस्तार हा जाहला. त्याचे पाटीचे मेगजी पाटील............

गांवकरिणा देवजी देकोजी मूळ परुप होते. विजापुरची तसदी पडली. ते समयीं विजापुरास देवजी पाटील व रावजी पाटील यांस धरून पाच्छानीं तलफ करून नेलें. सहाशे ( ६०० ) व्हान [1]कर बांधला. तीनशे व्हान देवजी पाटलाकडे आले. तीनशें व्हान रावजी पाटलाकडे आले. त्यास रावजी पाटलांनीं तीनशे व्हानाची निशा केली. तीनशे (३००) देवजी पाटील यांस मिळेनासे झाले. तेव्हां सहा महिन्यांची मुदत करून गावास आले. यांस सहा महिने झाले. मुदत टळली. मग कसबे विसापूरच्या ठाण्यास देवजी पाटलास धरून नेलें. तेथें बंदी घातले. नित्यकाळीं मार देऊं लागले. तेव्हां त्याचे चौघे लेक होते. ते गांवांतून पळाले. पुढें त्यास आधार नाहींसा झाला. मग त्यानें विरोजी चवऱ्या खोत नाकाड्या यांस बोलावून नेले. त्यास असें म्हणूं लागला कीं, ' मजला तों रुपये मिळत नाहींत, आणि हाणमार ज्या पुत्रांसाठीं सोसावी ते आपलीयास टाकून गेले! तर आतां या पाटीलकीची अगत्य मला काय आहे!! तर आतां रावजी पाटलास सांग कीं, पूर्वीं आमच्या वडिलांनीं तुमच्या वडिलास निमा भाऊवाटा दिला होता. त्यास आतां निमे आम्हाकडे राहिला. हे आम्हीं आतां कुलकान्हो कुलबाब नागरासमेत देतों. हें तुम्ही मान करून आमचा जीव सोडविणें. हें जर तुम्ही मान कराना, तरी आम्ही दुसरीयास वतन देऊं आणि आपलीयास सोडवून घेऊं. परंतु परकीयास द्यावें, तरी भावास देतों. भाऊ तूं न कबूल करीस, तरी आपण परकीयास देतों. इतकें बोलल्या उपरी विरोजी चवऱ्या नाकाड्या खोत गांवास आला. गांवांस आलियावरी माळिच्या पुढें दारांत पासोडी टाकून आडवा पडला. मग रावजी पाटलांनीं पुसलें कीं, ' हें काय निमित्य ? ' म्हणून हातीं धरून उठविला. त्यानें मग देवजी पाटलाचा विस्तार करिणा सांगितला. तेव्हां रावजी पाटलांनीं कानास हात लाविले कीं, ' भावाचे वतन मी कैसें घेऊं ! ! ' जें तूं सांगशील तें साहित्य मी करीन, तरी भावाचें वतन आपणास घेतां येत नाहीं ! ' त्यास विरोजी चवऱ्या ऐसे बोलला कीं, ' तुम्ही साहित्य कराल. त्यास एक दमडीच्या कवड्या मिळत नाहींत. आणि मी ज्यासाठीं करावें तें टाकून पळाले. मला आतां वतनाची अगत्य नाहीं ! इताकिया उपरी तूं भाऊ, घेत नाहींस तरी आम्ही परकीयास देऊं ! ' इतकें बोललीयावरी विरोजी चवऱ्यास रावजी पाटलांनीं पुसिलें कीं, तुझ्या ध्यानास हें येतें कीं, काय ? मग त्यानें उत्तर दिलें कीं, ' वतन दुसरीकडे जाऊं देऊं नये.' तेव्हां रावजी पाटलानें मशारनिल्हे चवरीयास. सांगितलें कीं, साऱ्या भावाची खबर घेणें. तेव्हां चौघे भाऊ वेगळे निघाले होते. त्यास मेगजी पाटलाच्या लेकाची खबर घेतली. तेव्हां म्हणो लागलें कीं, ' आम्हांस वतन लागत नाहीं. जो पूर्वील ( चा ) वाटा वाडिलाचा आहे, तोच पुरे. ' मग धावजी पाटलाची खबर घेतली. तोही तेणेंप्रमाणें बोलला. मग खंडोपाटलाची खबर घेतली. तेही तसेंच बोलले.

[1] दर किंवा कर हें चांगलें कळत नाहीं.

लखमोपाटलाची खबर घेतली, त्यानेंही हेच सालजाव केला. मग बिरोजी चवरे फिरोन आला कीं, ' त्यास वतनाची आगत्य नाहीं. आणि कसीयास त्याच्या गळां पडतां ! तुह्मांसही अगत्य असली तरी घेणें ! नाहीं तरी आम्हांस तसेंच स्पष्ट सांगणें. मग तुमच्या वचनावरून देवजी पाटील परकीयास वतन देईल. आपला गळा सोडवील ! ' ऐसे साल जाव स्पष्ट बोलला. मग तीनशें व्यान त्यास देऊन सोडवून आणला. तेव्हां त्यानें निमे वतन व नागर कुलकानो कुलबाव रावजी पाटलास दिली. आतां भावाचें वतन सारें घेऊं नये, म्हणून भावास एक चावर राखला. ही खबर विजापुरी पादशहास कळली. तेव्हां रावजी पाटलास तलब करून विजापुरास नेले. तेव्हां त्यांनीं मनसुबी मनास आणिली. रास्ती वतन खरेदी करून घेतलें यांस कांहीं दूषण नाहीं. मग कांहीं दरबारी हरकी मागितली. मग दरबारी दोनशें व्हान हरकी दिली. ऐसे एकूण आठशे ( ८०० ) व्हान रावजी पाटलानें दिले. मग वस्त्रें व छत्रीचा इनाम देऊन गांवास पाठविलें.

तों गांवीं आधींच यशवंतराव भोरपी आला होता, त्यानें गांवास खेळ दिला. तो बारा उंट उडत होता. खेळ खेळून बारा उंट उडाला. तेव्हां गांवांत देणारांनीं जे देण्याचें तें दिलें. देवजी पाटील याजकडे जो चावर राखला होता, तो चावर त्यानें भोरपीयास दिला. ते समयी रावजी पाटील विजापुरीं होते. गांवांत भाऊबंदांनीं मना केलें नाहीं, अथवा त्याजपासून सोडून घेतला नाहीं, मग भोरपी गांवांतून गेला; तेव्हां रावजी पाटील विजापुराहून गांवास आले. तेव्हां हे खबर कळली. तेव्हां भावाबंदाशीं समस्ताशीं म्हटलें कीं, " वतन घेते समयीं उभे राहिला नाहीं; अथवा भोरपीयास चावर यानें दिला, तेव्हां ही तुम्ही कांहीं त्यास बोलून, चावर घेतला नाहीं ! ! ते समयीं भाऊ सारे असे बोलले कीं, " आम्हांस या वतनाची कांहीं अगत्य नाहीं ! असली तुम्हांस अगत्य तरी तुम्हीं पाहून घेणें ! " मग रावजी पाटलांनीं त्या भोरपीयास, तलास करून माघारा गांवास घेऊन आले. मग त्यास परतून खेळ दिला. मग त्यानें खेळून तदनंतर ( त्याचे खेळाबद्दल ) पादशाहांनीं वस्त्रें रावजी पाटलास केली होतीं. त्यास ती पासोडी उंचा मोलाची जर्रा (ची) होती, ती त्याच्या अंगावर घातली. (व) आणीक कांहीं कबूल केलें. मग त्यास बोलले कीं, हे चावर तूं काय करशील ? तेव्हां तो भोरपी म्हणो लागला कीं, ' याचे अगत्य मजला काय आहे ! तरी माझीयास पोटास देऊन सोडून घेणें. ' मग त्यानें बोललीयाप्रमाणें देऊन चावर सोडविला. देवजी पाटलाचें वतन निमे याजप्रमाणें रावजी पाटील यांनीं नागर व कुलकान्हो कुलबाव घेतली. यांत दुसरीयाचा तालीक नाहीं.

पूर्वींचा भाऊवाटा निमे होता त्याची वाटणी निमेत देमजी व मेगजी. वरली बग (ल) मेगजीची चौथाई, मधलेचौथाईत चौघे भाऊ मध्यें माळीमध्यें अडीच अंकणी देवजी पाटलाची, आडीच आखणी खंडोजी पाटलाची. हे ( ह्या ) माळीच्या पाठीमागें पांच आकणी माळी, ( पैकीं ) निमे रावजी पाटील अडीच आकणी, व लखमोपाटील अडीच आकणी. यांत दाटण जाहली यामुळें लखमो पाटील यांनीं रावजी पाटील याच्या हवाली केली, अडीच अकणी केली. ( लखमो पाटील यांनीं आपण ) सवता वाडा बाहीर करून घेतला.

याजप्रमाणें शेताची वाटणीः-खंडो पाटलास शेतवाडीचे शेजारी, व लक्ष्मोकडे एक पटी त्याची. व तासगांव वाटेची पटी बांबोडें वाटे पावेतो लखमो पाटलास दिली. याचप्रमाणें तिसरी पटी रावजी पाटलांनीं घेतली. ऐशा तिघा भावाच्या तीन पट्या. तेथून सालखडाचे शेत, नदीपावेतों सालखडी याचा मळा, हे देवजी पाटलाचे वाटणीचे शेत व मळा, हे रावजी पाटलाकडे आला. या उपरी देवजी देकोजीचा वंश बुडाला. चौघे लेक गांवांतून बाहेर गेले होते. त्यांतून एकाचा ( ही ) वंश नाहीं; चौघाचाही बुडाला.

या उपरी धावजी पाटील शिरटे यासी सासुरवाडीस आपले गेले; तेथ मृत्यु पावले. मग ( तेव्हां ) आबाजी पाटील ( तेथेंच ) मावळी याचे घरीं होते. मग त्यांनीं आपली मुलगी देऊन आबाजी पाटलाचें लग्न केलें. पुढें शहाणे झाले. या उपरांतीक रावजी पाटलांनीं म्हटलें कीं, भाऊ आपला मेला. त्याचें मूल परागंदा झालें, म्हणवून गांवास आणिले, आणि आणून आपल्या पाशीं ठेविलें. ( त्यावेळीं )

पाटीलकीचा कारभार रावजी पाटील याचा भाऊ धाकटा लखमो पाटील करीत होता. रावजी पाटील याचें चित्तास आलें कीं, लखमो पाटील कारभार धड करीत नाहींत. म्हणवून आबाजी पाटील यास कारभार करायास सांगितलें. त्यावरून त्यांनीं कारभार सात वर्षे केला. तेव्हां आबाजी पाटील म्हारास बोलला कीं, मीं गावांत गुंतलो; माझें शेतांत मागें कोण्ही नाहीं, तर मजला एक म्हार देणें. तेव्हां म्हार ऐसे बोलले कीं, पाटलास पुसावे. मग म्हार ( यांनीं ) येऊन रावजी पाटलाशीं सांगितलें. तेव्हां रावजी पाटील म्हणो लागले कीं, " हें आबाजीस काय बुध(द्धि) आठवली !" हें देमजी पाटलास कळलें, तरी ही गोष्ट ओंगळ सांगे ! ! ! तूं भावाचें मूल परागंदा झालेस म्हणवून मी भलतेसे ! ! ! सोयेस ( व्यवस्थेस ) लावीन म्हणतों. तुला हे बुध आठवली ! यानें तुझा परिणाम कैसा लागेल ? इतकीया उपरी म्हारास व आबाजीस ताकीद केली कीं, हें गोष्ट देमजी पाटलाच्या कानावरी न जाऊं देणें.

या नंतर देमजी पाटील व सर्व भाऊ मुलकगिरीहून घरास आले ( इ० स० १६२९ ) सुलतान महंमद अदिलशाही. या नंतर हे गोष्ट त्याच्या कानावर गेली, कीं आबाजी म्हार मागत होता. तेव्हां त्यांनीं आबाजी पाटलावरी इतराज जाहले. वडिलांनीं आम्हावरील कल्हा करायास आणिला कीं काय ! असें बोलले. वडिलाची मर्यादा मोडतां नये, म्हणवून रुसून मुलें माणसें घेऊन चौघे बंधु मिळून बोरगांवास गेले. ( शके १५५१ ) तेव्हां तेथें तीन सव्वा शेराची धारण ! पदरीं कुटुंब भारी ? सालखडायाचें शेतांत पेव भारी. * साडे सतरा खंडींयाचें होतें ! ! तें रताजी पाटील यास दाणे खावयास घेऊन या म्हणवून पाठविलें. त्यांनीं पेंव काढिलें. अर्धे पेव उपसलें होतें; अर्धे तसेंच होतें. तेव्हां आबाजी पाटील यांनीं दोहीं ( द्वाही ) दिली कीं, आम्ही ( तुम्हास ) समजावयास रावजी पाटील व आम्ही येतों, तुम्ही पेव काढूं नका. तेव्हां तें पेव टाकून रताजी पाटील बोरगांवास माघारे गेले. त्यांनीं देमजी पाटलास विदीत केलें. हे सकाळ रावजी पाटील बोरगांवास आले. बोरगांवकर तुकोजी पाटील याच्या विदमानें समजाविसी केली. "ऐसे जे ( च ) लखमो पाटील आम्ही कारभार करायास लाविला होता, तो गांवांमध्यें ढवाळी करूं लागला! म्हणोनी आबाजीस दोन दिवस करावयास लाविला होता. हे तुमचे ध्यानास येईना. तरी तुमचे तुम्ही कारमार करणें; तो आपले घरी वसेल; ऐसे म्हणवून बोलले. ( रावजी पाटील )" तुकोजी पाटलाच्या गुजारतीनें गांवांस घेऊन आले. व तुकोजी पाटीलही बोरगांवकर आला. सालखडीयाचे शेतावरणें व पेवा वरणें आले. तेव्हां आबाजी पाटलानें महारास सांगून पेव लुटाविला ( लें ). आणि दिवसा म्हार मोटा बांधुन जात होते, ते बोरगांवाहून सारेजण सालखड्याचे टेकावर आले. म्हार मोटा बांधुन जात होते, तीं दृष्टी पडले. तेव्हां तुकोजी पाटलानें जाऊन पाहिलें कीं, ह्या मोटा कशाचा जातात ? तों महारांनीं मोटा टाकून उभे राहिले. मग तुळाजी पाटलांनीं म्हारास पुसलें कीं, तुम्ही हें दाणें कोठले ( कोठें नेतां ) " म्हारांनीं सांगितलें आबाजी पाटलानें सांगून हें करविलें" त्यास ( यास्तव ) फिरगनाक म्हार ह्याचा कान कापला. सारे तेथें जमा झाले. तेव्हां साऱ्यांनीं पुसले कीं, हें काम कोण्ही केलें? म्हारांनीं जाब सांगितला कीं, आबाजी पाटलानें कराविलें.' इतक्या उपरी रावजी पाटील यांनीं इतकें ऐकून त्यास मोहेरे घालून आबाजी पाटलास चालला. ( चालविला ). देमजी पाटील व चौघे भाऊ व बोरगांवकर तुकोजी पाटील हें मागें चालले. त्यास बोरगांवकर तुकोजी पाटील असें बोलला कीं, "आज आमचा कुटुंब भारी आणि धारण या प्रकारची ! आबाजीनें

* ज्या सालखडयाच्या मळ्यांत पेव होतें ती जागा गांवापासून सुमारें १ मैल अंतरावर आहे. शिवाय ती जागा एवढी बिकट आहे कीं, तेथें दिवसा खुन झाला तरी पत्ता लागावयाचा नाहीं. म्हणून दिवसा एकटा कोणी तेथें जात नाहीं. ती जागा चोरास योग्य आश्रय स्थान आहे. अशा ठिकाणीं पेव कसें राहिलें ! देमजी हे सरदार होते या भयानें, कां लोकच तसे नीतीमान होते, आतां तर कुलपें मोडून चोऱ्या होतात ! श्री तुकारामाची मातापितरें शके १५५१ त दुष्काळांत मेलीं.

कुटुंबघात केला !। तरी हे भाऊपणा आमच्या सारख्याचा असतां तर जीवे मारतों ! ! ! " असें बोलला. मग तुळाजी पाटलांनीं साल जाब केला. ' तुम्ही सोयरे धायरे लोक, तुम्हास करितां नये. ' मग तुळाजी पाटलांनीं घोड्यावरून पाटींत (......) हाटला. ढाल फुटून पाठींत थोडें लागलें. त्यास रावजी पाटलानीं लेकास रागास येऊन दवबून राखला. आबाजी पाटील पळाला, तो गांवांत गेला. मग थोरली बायको रावजी पाटलाची हासावा ती आडवी आली. तिनें शपथ घातली, कीं पुढें येशील तर, माझ्या निरीस हात लावशील. मग उभा ी तो राहिला. मग तेथून आबाजी पाटील घरीं बसला. हे (देमजी पाटील) आपले गांवचें काम काज पाटीलकी करूं लागले. ( शके १५५२ प्रमोदनाम संवत्सर. इ० स० १६३० ).

यानंतर पाहाटेचे वाटेचे मार्गीं वाण्याचे बैल जात होते. त्यांतला मिऱ्याच्या गोणीचा एक बैल चुकून आला, तो आबाजी पाटलांनीं लोटून पेवांत टाकली. बैल सोडून दिला. मग वाणी बैल गांवात हुडकायास आला; त्यास बैल सापडला, परंतु गोणी नाहीं ! ! तेव्हां वाणी भांबावला, माझी गोणी गांवांत गेली ! त्यास असे बोलले कीं, गोणीचा ठिकाण गांवांत लागत नाहीं. गांवचा झाडा घेण्यानें ( घेऊन ) गांव पाहिले परंतु गोणीचा ( चें ) ठिकाण वाण्यास लागलें नाहीं. तेव्हां त्यानें बळकट पदर आबाजी पाटलाचा धरला, की माझी गोणी आबाजीनें नेली. असा तो भांबावून गेला. तेव्हां शिवाजीराजे यांचे पागेचे आड जावून पडला. त्यांची स्वारी कुंडलेवरून वाझरास आली (इ०स०१६४५ सुमारें) *काळे दरडीच्या टेकावर स्वारी उभी राहिली. त्यांनीं राऊत पाठवून आबाजीस धरून नेलें. नदीमध्यें आणलें. तो त्याकडे तुळाजी पाटील चाकरी होता, तेव्हां त्यास कळले. माझा भाऊ मज देखतां नेत्यात; त्यानें पाहून सोडवून घेतला. गावांत लावून दिला.

मागून राऊत गांवांत जाऊन गांवच्या वाटे न जातां, रावजी पाटलाच्या दोन घोड्या माळींत होत्या त्या सोडल्या, व चार बैल हे घेऊन गेले. पुढें दंगा झाला. व सात खडण्या झाल्या, व गांव बुडाला. मग पलसास गेले. तेथें रावजी पाटलाचे देहविसर्जन झाले. मग वतनावर येऊन माती पाटलास दिली. ( दहन केलें. ) मग पलसांत राहण्याचें अनुमान घडेनासें झालें. मग *आळसंदीस ( अळसंदास ) गेले. अबाजी पाटील शिरढ्यास गेले. मागून वाणी आळसंदास आले आहेत म्हणून स्वारी ( श्री शिवाजी महाराज ) घेऊन आला. गांवच्या वाटे न जातां पांचशे ( ५०० ) गाय देमजी पाटलाची व अडीच हजार मेंढी ( २५०० मेंढी ) व सिंगरें व पसवाईत केनीतरब व घर लुटून नेलें; व बायकाही धरून नेऊन नातेगडावर टाकल्या ( शके सुमारें १५६७ ).

मग देमजी पाटील मुलूकगिरीस गेले ( होते ) त्यास खबर कळली विजापुरी. मग त्यांनीं येऊन दत्ताजी पाटील चोरगांवकर यासी लदबदली ( रदबदली ) घालून तीस ( ३० ) ( लढाऊ ) घोडे ( शिवाजी ) राजास देऊन मुलें माणसें सोडविलीं आणि आपण राजाचे चाकर होऊन चंदीस गेले. ( इ० स० सुमारें १६४५ ) मग आबाजी पाटील शिरढ्याहून आष्टयाच्या बाजारास गेला होता. तेथें

---

* हें टेक अद्याप आहे तें लोक दाखवितात. हें टेंक व गांव याच्यामध्यें नदी आहे. हें गांवच्या इशान्येस सुमारें अर्ध्या मैलांवर आहे. शिवाजी महाराजांची त्या टेकावर राहण्यांत मोठी सावधगिरी दिसून येते. विजापूरकराचें ताब्यांतील गांव असून लढबय्या लोकांचें समजून सावधगिरी ठेवली होती.

* अळसंद हें नांव ' अलंस्यंदन ' या संस्कृत नांवाचा अपभ्रंश. अलंस्यंदन शब्दाचा अर्थ उत्तम रथ. या गांवीं रथाचे माळ या नांवाचें मैदान गांवचे उत्तरेस १ मैलावर आहे. हा गांव फार पूर्वी जैनांचा. पाटीलकी जैनाची होती. या गावीं उत्तरेस गांव कुसवाजवळ आवळेश्वरचे टेक या नांवाची विटकराची जागा आहे. हें जीनदेवालय असावें. कारण याचे पूर्वेस जैन देवालय पद्धतीची बारव विहीर होती. तिचे दगड व खडा अद्याप आहे. सदर देवळाजवळ उत्तरेस तळें होतें. त्याचा अवशेष स्पष्ट आहे. रथही जैनाचा असावा. रथाच्या माळावर रथ मोडून कुजत पडलेला होता. असें पूर्वीचे लोक सांगत होते.

वाणीयाची गांठ पडली. त्यानें धरून दिवाणाचे हवाली केला. दिवाणानें त्यास मार दिला, त्याचा जीव कळवळून पडला. मग त्यांनीं बाहेर नायकवडी याचे हवालीं केला. तों रताजी पाटील अष्ट्याच्या बाजारास गेला होता. त्यास ही खबर कळली. मग त्यानें नायकवड्यापाशीं जाऊन त्याला कांहीं ( देण्याचें ) कबूल होऊन, हे आतां ( आबाजी पाटील ) मरेल ! ! मग नायकवडी असें बोलला कीं, हें कोणाशीं नकळत रात्रीचा तूं घेऊन जा. मग तेथें चौघा मनुष्यास चार मण दाणे कबूल करून 'बोडके ऐतवड्यास' ( एक गांव ) घेऊन गेले. मौजे मजकूरचा पाटील नागोजी पाटील असें बोलला कीं, 'हा मरतो, बरें घेऊन आलास ! तरी त्याच्या घरास लावून दे.' मग आणखी चार मण गहूं मजुऱ्यास कबूल करून सिरस्यास लावून दिला.

## आतां शेताचा करिणा गांवचा.

देवजी देकोजी याचें शेत सारा सालखडा व सालखडेचा मळा. लखमोपाटलाचे शेत तासगांव वाटेपासून मौजे बांबोडे वाटेपर्यंत. ओढ्याचे खालते वाडीचे शेजारीचे शेत खंडो पाटलाचे मधले ओघळीपावेतों रावजी पाटलाचें शेत. खंडो पाटलाचें शेत. ओघळीपासून तिघा भावाच्या तीन पट्या. रावजी पाटलास देवजी देकोजी बाबत सालखड्याचा मळा व सालखड्याचें कुल शेत व वाटणीची तिसरी पट्टी इतकें शेत रावजी पाटलास. यांत ताळीक कोणाचा नाहीं. मेगजी पाटलाचे शेत काजळगोटींत. रावजी पाटलास नाथ देवापाशीं मळी, आबाजी पाटलास चांभारा शेजारी तीन आंकणांचा जागा करून दिला, आडवाचे वाडीचें रानांत शेत व बोरमळी. लखमोपाटलास जागा, वाडा. बीद धरून आलिकडे वाडा त्याचा. रावजी पाटलाचा वाडा खंडोजी पाटलाच्या माळीपावेतों. तेथून खंडोपाटलाचा वाडा. सदरहू येणेंप्रमाणें करिणा असे. दस्तुर आनंदराव मल्हार कुलकर्णी मौजे आंधळी कसबें विसापूर प्रांत मिरज यांनीं लिहली असे शके १६८३ वृषभनाम संवत्सरे भाद्रपद वद्य दशमी, सुरुसन्न–ईसन्ने शीतेन मयाव आलफ ( तारीख २३ सप्टंबर सन १७६१ इसवी ).



# श्रीज्योतिर्लिंग प्रसन्न.

यादी वंशावळ–मौजे आंधळी, कसबे इसापूर, प्रांत मिरज, इलाखा संस्थान सांगली. येथील माने पाटील भाऊपण्याची वंशावळ.

मूळ पुरुष लिंगोजी पाटील, यांना पुत्र दोन, वडील देमजी व दुसरे मेगजी पाटील. देमजी पाटील यांना दोन बायका होत्या; पहिली पलूसकर पाटलाची लेक सईबाई यांना मूल होईना म्हणून दुसरी बायको वडयेकर पाटलाची लेक केली. इजला प्रथम तीन पुत्र झाल्यानंतर पहिली बायको सईबाई इजला पुत्र झाला. हा सर्वांचे मागून धावून आला (जन्मला) म्हणून यांचे नांव धावजी असें ठेविलें. एकूण देमजी पाटील यांना चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें अनुक्रमें अशीं:—१ रावजी पाटील, २ खंडोजी पाटील, ३ लखमोजी पाटील, ४ धावजी पाटील. या चौघांचा वंश विस्तार खालीं चार सदरांत दिला आहे. या चौघांपैकीं रावजी पाटील यांनीं विजापूरचे बादशहापासून मौजे आंधळी येथील पाटीलकी वतन पूर्ण संपादन केलें.

### १ रावजी पाटील.

हे विजापूरीं नोकरीस असून यांनीं मौजे आंधळी येथील पाटीलकीचें वतन संपादिलें. यांना पुत्र सहा पैकीं १ सिदोजी हा मरण पावला व खानाजी हा खंडोजीस दत्तक दिला होता. म्हणून यांना चारच पुत्र राहिले. त्यांत वडील देमजी.

१ देमजी
२ तुळाजी
३ रताजी
४ मलजी.

—

४

देमजी हे विजापूरचे बादशहाचे सरदार होते. शिवाजी महाराजांचे तसदीमुळें विजापूरची नोकरी सोडून शिवाजीचे नोकरीस कबूल होऊन कर्नाटकांत नोकरीवर गेले तरी यानें आपले लहान दोघे भाऊ विजापूरकराकडे नोकरीस राहूं दिले.

### २ खंडोजी पाटील.

यांना दोघी बायका असून पुत्र झाला नाहीं. सबब रावजी पाटलाचा पुत्र सोनजी ऊर्फ खानाजी यास दत्तक घेतला म्हणून खंडोजीस दत्तक पुत्र एक

१ खानाजी.

खानाजी बीन खंडोजी यास पहिल्या बायकोचे तीन व दुसऱ्या बायकोचा पुत्र एक एकूण पुत्र चार.

| वडील | लहान. |
|---|---|
| १ खेत्रोजी | ४ जोतीराव. |
| २ खंडोजी | |
| ३ शहाजीराव | |

एकूण ४ (चार)

खेत्रोजी बीन खानाजी यास पुत्र तीन.

१ आपाजी
२ आम्रोजी
३ केदारजी.

खंडोजी बिन खानाजी यांस पुत्र नाहीं नकल झालें.

### ३ लखमोजी पाटील.

यांना देमजी पाटलाचे बदली कांहीं दिवस पाटीलकीचे काम रावजी पाटलानें सांगितलें होतें याना पुत्र एक.

१ भिकाजी
० लग

१

भिकाजी बिन लखमोजी यास पुत्र एक

१ गोविंदराव
० लग

१

गोविंदराव भिकाजीराव यास पुत्र एक

१ केदारजी
० लग

१

केदारजी बिन गोविंदराव यांस पुत्र एक.

१ चिलोजी
० लग

१

### ४ धावजी पाटील.

यास पुत्र एक

१ आवाजी पाटील.
० लग

—

१

आवाजी पाटील हे रेवाई गावडी मानी पाचुंबरेकरीण इजला चौघा भावांनीं एक विचार करून दत्तक दिला. यास पुत्र तीन.

१ बहीरजी
२ राणोजी
३ आंवाजी.

—

३

बहीरजी बीन आवाजी यास पुत्र एक

१ सुलतानजी
० लग

—

१

देमजी यांना पुत्र दोन
१ मुरारजी पाटील,
२ रघुनाथराव.
—
२

तुळाजी बीन रावजी हे विजापूराकडे नोकरी होतें मागाहून शिवाजीचे नोकर झाले. यांना पुत्र एक
१ कृष्णाजी.

---

रताजी बीन रावजी हे विजापूरकराकडे नौकर होते याना पुत्र एक.
१ जोत्याजी.

---

मलजी बीन रावजी हें-ही विजापुरास नौकर होते. यांना पुत्र एक
१ भगोजी.

---

मुरारजी बीन देमजी यांना पुत्र एक
१ भिकाजी पाटील

---

रघुनाथराव बिन देमजी यांना पुत्र एक
१ गोविंदराव
० लग
—
१

कृष्णाजी बीन तुळाजी यांस पुत्र दोन.
१ जोत्याजी
२ बहीरजी

जोत्याजी बिन रताजी यांस संतति नाहीं.

शाहाजी बिन खानाजी यांस पुत्र सहा.
१ जिवाजी
१ सुभानजी.
१ सुलतानजी.
१ राणोजी.
१ सिदोजी.
१ धर्माजी.
——
६

जोतीराव खानाजी यास पुत्रसंतान नाहीं.

आपाजी बीन खेत्रोजी यास पुत्र तीन.
१ लिंगोजी.
१ व्यंकोजी
१ सदोजी.
——
३

यांचा पुढील वंशाचा पत्ता कळला नाहीं.

---

आप्नोजी बीन खेत्रोजी यास पुत्र पांच.
१ बाळोजी.
२ केदारजी.
३ आवाजी.
४ आपाजी
५ रघुनाथ

यांचा पुढील वंश मिळाला नाहीं.

---

केदारजी बिन खेत्रोजी यांस पुत्र नाहीं नकल झाले

---

शिवाजी बिन शाहाजी यास स्त्रिया दोघी. पहिलेचे पुत्र दोन व दुसरीचे तीन एकूण पांच पुत्र.

| | |
|---|---|
| १ रखमाजी | १ पिराजी |
| २ सुभानजी | २ खानाजी |
| | ३ दौलतराव |
| — | — |
| २ | ३ |

एकूण ५

चिलोजी बिन केदारजी यांस पुत्र नाहीं. संतान म्हणून यानें वडील शाखेपैकीं सिदोजी बिन भिकार्जी यांचा तिसरा मुलगा मयराळजी यास दत्तक घेतला म्हणून यास दत्तक पुत्र एक.
१ मयराळजी
० लग
—
१

मयराळजी बिन चिलोजी यास पुत्र एक
१ रामजी
० लग
—
१

रामजी मयराळजी यास पुत्र तीन
१ भाऊराव
१ धोंडीबा
१ गोविंदराव
—
३

राणोजी बिन आवाजी यास पुत्र तीन
१ सुभानजी
२ गणोजी
३ धारोजी
—
३

अंबाजी बिन आवाजी यास पुत्र चार.
१ संताजी
१ खेत्रोजी
१ व्यंकोजी
१ नाराणराव.
—
४

---

सुलतानजी बहीरजी यास पुत्र चार
१ नरसिंगजी
१ भिकाजी
१ रघुजी
१ हैबतराव
—
४

सुभानजी राणोजी यास पुत्र एक
१ मुकुंदजी
० लग
—
१

गणोजी बिन राणोजी यास पुत्र दोन
१ सिदोजी
१ राणोजी
—
२

---

धारोजी राणोजी यास पुत्र एक
१ मुरारजी
० लग
—
१

भगोजी बिन मलजी यांस पुत्र पांच
१ सयाजी
२ राणोजी
३ खंडोजी
४ पाटलोजी
५ सिदोजी.

---

वडील-भिकाजी मुरारजी यास पुत्र चार
१ रघुनाथराव
२ सिदोजीराव
३ सरूपजी
४ यश-वंतराव

गोविंदराव बिन रघुनाथराव यास पुत्र एक
१ जयसिंगराव

जोत्याजी बीन कृष्णाजी यास पुत्र नाहीं. नक्कल

वहीरजी बिन कृष्णाजी यास पुत्र दोन
१ मानाजी २ रघुनाथ.

खंडो बिन भगोजी यांस पुत्र दोन
१ पाटलोजी २ रावजी

---

रघुनाथराव बिन भिकाजीराव पाटील वडील यास पुत्र एक.
१ हैबतराव पाटील.

---

सिदोजी भिकाजी यास पुत्र तीन
१ पर्वतराव
२ आंदोजी ऊर्फ आबा,
३ मैराळजी

मैराळजी यांस चिलोजी बिन केदारजी माने (तिसरी शाखा) यानें दत्तक घेतला म्हणून सिदोजीस बाकी दोन पुत्र राहिले;

सुभानजी बीन शाहाजी यास पुत्र संतान नाहीं नक्कल झाले.

---

सुलतानजी बिन शाहाजी यास पुत्र संतान नाहीं. यानें जिवाजीचा दुसरा मुलगा सुभानजी यास दत्तक घेतलें.
१ सुभानजी.

---

राणोजी बिन शहाजी यास पुत्र तीन
१ माधराव
२ गणपतराव
३ संताजी

---

सिदोजी बिन शाहाजी यांस पुत्र चार
१ शाहाजी.
२ भिकाजी.
३ सुलतानजी
४ तानाजी.

---

धर्माजी बिन शाहाजी यास पुत्र दोन २
१ सुभानजी
१ देवराव.
—
२

---

रखमाजी जिवाजी यास पुत्र दोन
१ वाघोजी
२ रामजी

---

पिराजी जिवाजी यास पुत्र दोन
१ तुकाराम
२ कुशाजी

---

खानाजी जिवाजी यास पुत्र तीन
१ विठूजी
२ पुंडलीकराव (हे मौजे येकसंबे येथें)
३ पाटलोजी

संताजी बिन आंबाजी यांस पुत्र एक
१ रामजी
० लग
—
१

---

खेत्रोजी बिन आंबाजी यास पुत्र एक
१ जिवाजी

---

व्यंकटराव आंबाजी यास पुत्र दोन
१ सिंदोजी
२ केदारजी

---

नारोजी बिन आंबाजी यास पुत्र एक
१ पाटलोजी

नरसिंगजी बिन सुलतानजी यास पुत्र दोन
१ शिवराम
२ पांडुरंग.

भिकाजी बिन सुलतानजी यास पुत्र एक
१ गोविंदराव

रघुनाथराव बिन सुलतानजी यास पुत्र एक
१ महादजी

हैबतराव सुलतानजी यांस पुत्र दोन
१ सुभानजी
२ गोपाळराव

मुकुंदराव सुभानजी यास पुत्र एक
१ आप्पाजी
० लग
—
१

सरूपजी बिन भिकाजी यास पुत्रसंतान नाहीं.

---

यशवंतराव भिकाजी यास पुत्र एक
१ दौलतराव

जयसिंगराव गोविंदराव यास पुत्र एक
१ सुभानजी

पाटलोजी बिन खंडोजी यास पुत्र एक
१ रावजी

रावजी खंडोजी यास पुत्र दोन
१ धारूजी
२ धमाजी

हैबतराव रघुनाथराव ( वडील ) यास पुत्र एक
१ खंडेराव ( आबा )

पर्वतराव सिदोजी यास पुत्र एक.
१ नागोजी ( हे विरक्त झाले गोसावी होऊन गेले )

आदोजी सिदोजी यास पुत्र चार.
१ नाना पाटील.
२ रावजी.
३ गणपतराव
४ हणमंतराव.

दौलतराव बिन यशवंतराव यास पुत्र दोन.
१ भाऊराव.
२ बाबा.

सुभानजी जयसिंगराव यास पुत्र दोन
१ नायकोजी
२ पाटलोजी

मानाजी बिन भैरजी यास पुत्र दोन.
१ ठाणाजी
२ सखाराम

दौलतराव जिवाजी यास पुत्र एक
१ निळोजी ( भिळवडी येथें )

सुभानजी सुलतानजी यास पुत्र एक
१ बुधाजी

माधवराव राणोजी यास पुत्र दोन
१ नाना
२ गुंडाजी

---

गणपतराव राणोजी यानें संताजीचा तिसरा मुलगा आकाराम यास दत्तक घेतला
१ आकाराम

---

संताजी बिन राणाजी यास तीन पुत्र
१ बाबाजी
२ सखाराम
३ आकाराम ( यास दत्तक दिलें. )

---

शहाजी बिन सिदोजी यास पुत्र एक
१ दौलतराव

---

भिकाजी बिन सिदोजी यास पुत्र एक
१ येसाजी

---

सुलतानजी बिन सिदोजी यास पुत्र एक
१ रुस्तुमराव

---

तानाजी बिन सिदोजी यास पुत्र दोन
१ सखाराम
२ पाटलोजी

सुभानजी बिन धर्माजी यास पुत्र एक
१ बळीराम

सिदोजी बिन गणोजी यास पुत्र एक
१ पांडुरंग
० लग
—
१

---

राणोजी बिन गणोजी यास पुत्र तीन
१ भाऊराव
२ बाबाजीराव
३ चंद्रोजी

मुरारजी बिन धारोजी यास पुत्र दोन
१ बाळाजी
२ नानाजी

रामजी बिन संताजी यास पुत्र तीन
१ तात्याजी
२ खंडोजी
३ आबाजी
—
३

जिवाजी बिन खेत्रोजी यास पुत्र चार
१ सखाराम
२ तुकाराम
३ रावजी
४ बाबाजी
—
४

सिदोजी बिन व्यंकटराव यास पुत्र एक
१ ज्ञानदेव.
० लग
—
१

रघुनाथराव बिन बहिरजी यास पुत्र तीन
१ निळोजी
२ जोतीबा
३ सिदोबा

रावजी बिन पाटलोज यास पुत्र एक
१ पाटलोजी

थारूजी बिन रावजी यास पुत्र एक
१ नाथा

घमाजी बिन रावजी यास पुत्र एक
१ दौलतराव

---

वडील-खंडेराव बिन हैवतराव.

यांना हैवतराव मेले तेव्हां त्यांचे जागी पाटील-कीवर नेमले (तारीख २६ जून सन १८२१ इसवी सुरू सन-इसने अशरीन मया तैन व आलफ १२२२) यास पुत्र तीन
१ जिजाजी ऊर्फ बापु.
२ हैवतराव ऊर्फ दादाराव
३ धोंडीराव

हे तिघे विजापुरास नोकर होते. याची स्वतःची पुष्कळ घोडीं होती. हैवतराव यांचेवर कांहीं तोहमत आल्यामुळें हे वीस घोडीं घेऊन फरारी झाले, हें नक्की माहीत आहे.

नानाजी आंदोजी यास पुत्र एक पुंडलीक.
१ पुंडलीक

---

रावजी अंदोजी यास पुत्र-संतान नाहीं.

देवराव धर्माजी यास पुत्र चार
१ धोंडीबा.
२ पर्वतराव.
३ नाथाजी.
४ व्यंकोजी.

---

वाघोजी बिन रखमाजी यास पुत्र एक
१ गुंडाप्पा

---

रामजी बिन रखमाजी यास पुत्र तीन.
१ गणू
२ भिकू
३ केरु

केरु हा भिलवडी येथें राहतो

तुकाराम बिन पिराजी यास पुत्र चार.
१ नाथा पाटील
२ ज्ञानु
३ पुंडलीक
४ नाना.

कुशाप्पा बिन पिराजी यास पुत्र एक.
१ मारुती.

विठू बिन खानाजी यास पुत्र

---

पुंडलीकराव बिन खानाजी यास पुत्र (एक संवे येथें)

---

पाटलू बिन खानाजी यास पुत्र तीन
१ रावजी
२ भाऊ
३ दाजी

निळोजी बिन दौलतराव हा भिलवडी येथें

केदारजी व्यंकटराव यास पुत्र दोन
१ बापूजी
२ बाळाजी

पाटलोजी बिन नारोजी यास पुत्र दोन
१ परसोजी
२ बाळाजी

गणपतराव आंदोजी यास पुत्र एक.
१ पांडुरंग.

---

हणमंतराव आंदोजी यास पुत्रसंतान नाहीं.
भाऊराव दौलतराव यास पुत्र तीन
१ गणपतराव.
२ नारायणराव.
३ रावजी.

---

बाबाजी दौलतराव यास पुत्र एक.
१ आबाजी.
नायकोजी बिन सुभानजी यास पुत्र एक
१ सिदोजी.

---

पाटलोजी बिन सुभानजी यास पुत्र दोन
१ जोतीराव.
२ गोविंदराव.

ठाणाजी बिन मानाजी यानें सखाराम मानाजी याचा वडील पुत्र बाबुराव यास दत्तक घेतलें.
१ बाबुराव.

---

सखाराम मानाजी यास पुत्र तीन.
१ बाबुराव (दत्तक दिला)
२ परसोजी.
३ बच्याराम.

---

निळोबा व जोतीबा व सिदोबा या तिघांची नक्कल झाली.

---

पाटलू बिन रावजी यास पुत्र एक
१ सकोबा.

नानाजी बिन माधवराव यांस पुत्र पांच
१ भाऊ
२ रावजी
३ श्रीपतराव
४ नारायणराव
५ गोविंदराव

---

गुंडाजी बिन माधवराव यास पुत्र तीन
१ बापूराव.
२ केशवराव
३ बळवंतराव
आकाराम बिन गणपतराव यास पुत्र एक
१ केशवराव
बाबाजी संताजी यास पुत्र नाहीं. नक्कल झाले.

---

सखाराम संताजी यास पुत्र एक
१ नाथा.
दौलतराव बिन शहाजी यास पुत्र चार.
१ तात्या
२ दाजी
३ आपा
४ बापु
—
४
हे चौघे मळगांव येथें राहतात.

येसाजी बिन भिकाजी यास पुत्र तीन
१ चंद्रोजी,
२ केशवराव
३ माधवराव.
रस्तुमराव बिन सुलतानजी यास पुत्र एक
१ दादाजी (भीमशक्ती)
सखाराम बिन तानाजी यास पुत्र एक
१ बाबाजाराव (बामणी येथें)

---

पाटलोजी बिन तानाजी यास पुत्र दोन
१ सिदोजी
२ पांडुरंग
बळीराम बिन सुभानजी याची नक्कल.
घोडोंराव देवराव यास पुत्र पांच
१ रामराव
२ माधवराव
३ सुबराव
४ आबाजी
५ केशवराव

---

पर्वतराव बिन देवराव यास पुत्र एक
१ बळीराम.
नाथाजी देवराव यास पुत्र एक
१ आप्पाजी
व्यंकाजी देवराव यास पुत्र एक
१ आबाजी
१ गुंडापा बिनें वाघोजी आणि १ गणु बिन रामजी आणि भिकु बिन रामजी या तिघास पुत्र संतान नाहीं नकुल झालें
केरू बिन रामा हा भिलवडी येथें राहतो (अज्ञान)

नाथा बिन धाकू यास पुत्र दोन.
१ रावजी
२ रामजी
—
२

दौलतराव धमाजी यास पुत्र पांच
१ नाना
२ पाटलू
३ बाबु
४ भाऊ
५ बापु
—
५

वडील

जिजीजा बिन खंडेराव यास पुत्र एक
१ केदारजी

हैबतराव ऊर्फ दादाराव यास पुत्र एक
१ आनंदराव

ज्ञातु बिन तुकाराम यास पुत्र एक
१ जोतीराव.

पुंडलीक बिन तुकाराम यास पुत्र एक
१ विठुजी

नाना बिन कुशाबा यास पुत्र

मारुती बिन कुशाबा यास पुत्र एक
१ यशवंतराव (मौजे आळसंद येथें राहतो)

दाजी बिन पाटलोजी यांस पुत्र एक
१ दत्तु (भिलवडी येथें)

रावजी बिन पाटलोजी व भाऊ बिन पाटलोजी हे दोघे भुसावळ येथें

भाऊ बिन नाना यास पुत्र एक.
१ पाडुरंग

रावजी बिन नाना याची नक्कल झालें.

श्रीपतराव बिन नाना यास एक पुत्र.
१ आनंदराव (जमखिंडी)

नारायणराव बिन नाना यास पुत्र तीन
१ आबा
२ बाबा.
३ नाना.

गोविंदराव बिन नाना यास पुत्र

बापु बिन गुंडापा यास पुत्र एक.
१ गणपतराव

केशवराव बिन गुंडापा यास पुत्र एक

धोंडजीराव हा मौजे अर्जुनी आकोळ येथें मातुलगृहीं देसाई यांचें येथें

नाथा बिन तुकाराम पाटील यास पुत्र पांच
१ आबा.
२ संतु
३ सुबराव
४ ओमाणा
५ महादेव
—
५ एकूण पांच

बाळाजी बिन गुंडापा यांस पुत्र दोन
१ दत्तु
२ यशवंतराव

केशवराव बिन आत्मा-राम यास पुत्र दोन
१ नाना
२ गणू

नाथा बिन सखाराम यास पुत्र दोन
१ तात्या.
२ बळवंतराव

चंद्रोजी बीन येसाजी यास पुत्र एक
१ गणपती

केशवराव बिन येसाजी यास पुत्र दोन
१ भाऊ
२ रावजी

दादाराव बिन रस्तुम-राव यास पुत्र तीन
१ तुकाराम
२ बाबुराव
३ ज्ञानु

रामराव धोंडीबा यांस पुत्र एक
१ भाऊराव

माधवराव बिन धोंडी-बा यास पुत्र एक
१ संताजी

सुबराव बिन धोंडीबा यास पुत्र एक
१ जोतीबा हा बोरगांव येथें राहतो.

केशवराव बिन धोंडीबा यास पुत्र एक
१ दत्ताजी

आबाजी बिन व्यंकाजी यांस पुत्र एक
१ तुकाराम

## 'मोरे उर्फ धुळप' घराण्यांतील मान्यवर.



श्रीमंत कृष्णराव रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब धुळप.

जहागीरदार व इनामदार विजयदुर्ग.

# मोरे ऊर्फ धुळप घराण्याची कैफियत.

## भाग चवथा.

## अनुक्रमणिका.

# मोरे ऊर्फ धुळप.

## भाग ४ था.

### जावळीचे मोरे व विजयदुर्गचे धुळप.

महाराष्ट्रेतिहासामध्यें जीं अनेक नररत्नें आपल्या मर्दुमकीनें, साहसानें व बुद्धिमत्तेनें प्रसिद्धीस आलेलीं आहेत, त्यांपैकीं मोरे ऊर्फ धुळप ह्या कुळांतील पुरुषांनीं बरीच आघाडी मारलेली आहे. ज्याप्रमाणें जमिनीवरील हातोहातच्या लढाईमध्यें अनेक मराठ्यांचीं कुळें प्रसिद्धीस आलेलीं आहेत; त्याचप्रमाणें दर्यावर्दी युद्धांमध्येंही ज्यांनीं आपल्या मर्दुमकीची व मुत्सद्दीपणाची कमाल केली व इंग्रजांसारख्या दर्यावर्दी युद्धांमध्यें निष्णात अशा शत्रूबरोबरही दोन हात करून समुद्रकांठच्या प्रदेशांवर आपला वरचष्मा राखिला, असें हें सुप्रसिद्ध धुळपांचें कुल आहे. आंग्रे व धुळप ह्या दुकलीमुळें मराठ्यांच्या आरमाराची त्यावेळीं फारच मोठी योग्यता गणली जात होती. मराठ्यांचें आरमार म्हणजे लहान सहान प्रस्थ नव्हतें. ह्या आरमाराच्या साह्यानें एका बाजूनें सिद्दी व दुसऱ्याबाजूनें इंग्रज, यांच्यांशीं दोन हात करून आपल्या समुद्रकांठच्या प्रांताचें संरक्षण करण्याचें काम ह्या दोन कुळांतील पुरुषांनीं अत्यंत मर्दुमकीनें बजाविलेलें आहे. मराठ्यांच्या आरमाराची त्यावेळची जर सर्व हकीकत–कागदपत्रें उपलब्द होतील, तर धुळपांच्या पराक्रमाचा अहवाल पूर्णपणें दृष्टोत्पत्तीस येईल; परंतु दुर्दैवेंकरून अद्याप तशा प्रकारचीं कांहींच चिन्हें दृष्टीस पडत नाहींत. श्री कृष्णराव रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब धुळप हे ह्या वंशाचे मोहरे सध्यां विजयदुर्गास आहेत, त्यांजकडे त्यांच्या घराण्याच्या माहितीस लागणारीं कागदपत्रें असावयास पाहिजे होतीं; परंतु त्यांजकडीलही तीं नाहींशीं झालेलीं आहेत, ही दुर्दैवाची गोष्ट होय. तरीही श्री० कृष्णराव ऊर्फ बाबासाहेब धुळप यांनीं आपल्या संग्रहीं असलेली एक जुनी वंशावळ व कांहीं पवाडे, तसेंच उपलब्ध कागदपत्र दिलेले आहेत. त्या कागदपत्रांवरूनच आजची ही धुळप घराण्याची कैफियत लिहिलेली आहे. शिवाय श्री० व्यंकटराव सुर्याजीराव धुळप,-बडोदें. यांनींही आपल्या पदरीं असलेली एक जुनी वंशावळ व एक दोन पत्रें दिलेलीं आहेत. त्यांचाही कैफियत लिहिण्याच्या कामीं उपयोग झाल्याबद्दल आम्ही उभय धुळपमहाशयांचे अत्यंत आभारी आहों. सदर वंशावळीवरून धुळप हेच सातारा जिल्ह्यांतील जावळीचे सुप्रसिद्ध मोरे होत, हें सिद्ध होत आहे. मोऱ्यांचें कुल महाराष्ट्रामध्यें श्री शिवाजी महाराजांच्या पूर्वींपासून राज्यसुख उपभोगित होतें व स्वपराक्रमानें कोंकणप्रांतीं आपलें वर्चस्व प्रस्थापित करून आदिलशाहीच्या वतीनें कारभार करीत होतें. त्यावेळीं जावळी वगैरे प्रांतीं मोऱ्यांचें अत्यंत प्राबल्य होतें. त्यांनीं त्या प्रांती वर्चस्व असलेल्या इतर घराण्यांकडून मोठ्या शर्तीनें तो प्रदेश स्वाधीन करून घेतला व पडीत जमिनींमध्यें वसाहत केल्यावरून बादशहानें त्यांस करही माफ केलेला होता. ह्या मोरे कुळानें प्रसंगास अनुलक्षून जर त्या वेळीं श्री शिवाजीमहाराजांस साह्य केलें असतें, तर त्यापासून उभयतांचे हितच झालें असतें. त्यानंतर मोऱ्यांचें राज्य जाऊन त्यांचा जो नाश झाला व वाट फुटेल तिकडे पळण्याची त्यांस पाळी आली, ती पाळी त्यांजवर न येतां ते मराठशाहीचे एक अधारस्तंभ गणले गेले असते व त्यांच्या मदतीपासून महाराजांसही मराठ्यांच्या राज्यसंस्थापनेच्या कामीं किती तरी साह्य झालें असतें. परंतु तो योग नव्हता. त्यामुळेंच ह्या घराण्याची वाताहत झाली व त्यांस आपलें नांव बदलण्याची जरूरी पडली. कारण एक वेळ आपलें नांव बद्‌ झालें कीं, पुनरपि आपण कितीही विश्वासाचीं कामें केलीं तरी विश्वास बसत नसतो. हें लक्षांत घेऊन चंद्रराव मोऱ्यांच्या वंशजांनीं आपलें आडनांव बदललें व तें योग्यच झालें. मोरे वंशांतील

शूर पुरुषांस त्यामुळें आपल्या आंगची मर्दुमकी दाखविण्याचा योग प्राप्त झाला व त्यांनीं आपण होऊन मराठशाहीस विरोध करण्याचा जो त्यांच्या वाडेलांनीं हट्ट चालविला होता, त्याची स्वामिनिष्ठेनें मराठशाहीची सेवा करून फेड केली. धन्य ते वीर धुळप ! कीं ज्यांनीं आपल्या नुकसानकर्त्यांवर उलटून न पडतां त्यांच्या इच्छित कार्यास तनमनधनें-करून मदत केली व आपल्या कुळाचा कीर्तिदुदुंभि जगभर निनादित केला.

## जावळीचे मोरे यांची पूर्वपीठिका.

ह्या मोऱ्यांचे पूर्वज हिंदुस्थानांतील चुतुरद्विप येथें रहात होते. जावळीचे मोरे यांची पूर्वपिठिका म्हटली म्हणजे ते तीन बंधु होते. त्यांपैकीं परसोजी बाजीराव व जयाजी यांनीं इ. सनाच्या चौदाव्या शतकांत जावळीप्रांतात आगमन केलेलें असावें. जावळी प्रांतीं आगमन करण्यापूर्वीं हें मोऱ्यांचें घराणें कर्नाटकामध्यें नाईक ह्मणून प्रसिद्ध होतें. यांस युसक आदिलशहानें १२००० पायदळांची सरदारी दिली व नीरा व वारणा यांजमधील प्रदेश जिंकण्यास पाठविलें. हा प्रदेश, शिर्के, गुजर, मोहिते व महाडिक ह्या मराठे सरदारांच्या ताब्यांत होता व तो मुलूख जिंकण्या-संबंधानें बराच प्रयत्न करूनही कांहींच फलनिष्पत्ती झाली नव्हती. व ते सरदारही बादशहास जुमानित नव्हते. तो मुलूख जिंकण्यास कठीण व अडचणीचा असा होता. ह्मणून कांहींच उपाय चालत नसे. त्या मुलखामध्यें मोरे यांनीं येऊन शिर्के व त्यांचे सहायक गुजर, मोहिते व महाडिक यांस मोठ्या शौर्यानें जिंकिलें. व त्याच ठिकाणीं ते वास्तव्य करून राहिले. ह्या दोन भावांपैकीं फक्त परसोजी बाजीराव यांसच पांच पुत्र होते. जयाजी यांस संतान नव्हतें व तिसराभाऊ ज्याचें नांव वंशावळींत लिहिलें नाहीं, त्यासही वंश नसावा. परसोजीस, १ हणमंतराव २ बागराव ३ कमळराव ४ सूर्याजीराव व ५ चंद्रोजीराव असे पांच पुत्र होते. जावळीमध्यें स्थिरस्थावर झाल्या-नंतर ह्या पांचही बंधूंमध्यें वडीलपणाच्या हक्कासाठीं भांडणें होऊं लागलीं. प्रत्येकास वडीलपणाचे हक्क आपणांस असावे असें वाटूं लागलें. व ह्या गोष्टीचा न्याय करण्यासाठीं हे पांचही बंधु विजापुरास बादशहाकडे गेले. त्यावेळी +फत्तेशहानें त्यांचा योग्य सन्मान केला. मोऱ्यांनीं जावळी काबीज करून त्याठिकाणीं आपली सत्ता स्थापित केली ह्मणून बादशहास *मोऱ्यांबद्दल अभिमान वाटतच होता. तशांत हे पांचही बंधु विजापुरीं जातांच बादशहानें त्यांच्या भाऊबंदकीच्या तंट्याचा निकाल करून, सर्वत्रांची समजूत केली. व यापुढें कोणीही तंटा भांडण न करितां सामोपचारानें वागावें ह्मणून सर्वांत धाकटे चंद्रराव यांच्या स्वाधीन शिक्के केले. त्याशिवाय त्या पांचही बंधूंस 'मरामती' नांवें दिलीं. हणमंतराव यांस 'हणमंतराय' बागराव यांस 'बागराय' कमळराव यांस 'कमळराय' सुर्याजीराव यांस 'सुरेराय' व चंद्रराव यांस 'चंद्रराय' अशा 'राय' म्हणजे राजे अशा पदव्यांनीं सर्वत्रांस भूषित केलें. व त्यांची रवानगी करून दिली. त्याबरोबर ते पांचही बंधु जावळीस आले. परंतु त्यांचें एकमेकांच्या मनांतील किल्मिश दूर झालें नव्हतें. 'चंद्रराव' यांजकडे शिक्के गेल्याकारणानें ते जावळीचे राजे झाले. अर्थात् वडीलपणाचा हक्क त्यांजकडे गेला. ह्यामुळें त्यांस वाईट वाटूं लागलें. सदर वंशावळीवरून मोरे यांस 'चंद्रराव' हा किताब मिळाला नसून 'राय' हा किताब मिळाला होता, असें दिसून येतें. मूळपुरुषांची ओळख पटावी एतदर्थ चंद्ररायाच्या गादीवर त्याच्या मागून बसलेल्या पुरुषांस 'चंद्रराव' असेंच म्हणत असत. त्यांचें नांव कोणीही घेत नसे. म्हणूनच शिवाजीनें जावळीचें राज्य ज्या चंद्ररावास मारून घेतलें. तो चंद्रराव कितवा तें समजण्यामध्यें बऱ्याच इतिहासज्ञांनीं चुका केलेल्या आहेत. 'राव' ह्या पदवीचा अपभ्रंश होऊन 'राय' ही पदवी प्रचारांत आलेली असावी. भाषेच्या अज्ञानामुळें रायाचे राव झाले असावेत. कारण 'राय' हा शब्द तळकोंकणामध्यें अगर महाराष्ट्रामध्यें त्यावेळीं मुळींच प्रचारांत नसल्यामुळें 'राय' ह्यापदवीच्या ऐवजीं 'राव' हा शब्द प्रचारांत आला व 'चंद्रराव' ही

---

+ हा फत्तेशहा कोण ? त्यावेळीं युसफ अदिलशहा हा बादशहा होता. त्यासच फत्तेशहा ह्मणत असत कीं काय ?

* यांचे कुळ मोराचें असल्यामुळें यांस मोरे असें ह्मणतात. असें कित्येक ठिकाणीं आढळतें.

पदवी वंशपरंपरा प्रचारांत आली. मोरे वंशास चंद्रराव ही पदवी कशी मिळाली त्यासंबंधानें ग्रंट डफनें, मोऱ्यांनीं जावळी प्रांत सर करून अद्वितीय पराक्रम दाखविल्यावरून त्यांस बादशहानें 'चंद्रराव' * ही पदवी दिली. असें म्हटलें आहे. इतिहाससंग्रहाच्या ऐतिहासिक स्फुटलेख ह्या सदरामध्यें कोणी 'यशवंता'नीं लिहिलेली जावळीकर मोरे यांची जुनी बखर प्रसिद्ध झालेली आहे. त्या बखरींत 'जावळी काबीज करण्यापूर्वीच चंद्रराव मोऱ्यानें एका मोकळ्या सोडलेल्या वाघास पूर्ण मर्दुमकीनें ठार मारल्यावरून बादशहानें त्यास त्याच्या विनंतीवरून 'आठे गांव माहाल जावळी आठरा महाल म्न्हे तळकोंकणापर्यंत जेथवर हात फावेल त्याप्रमाणें मुलुख बक्षिस दिला व हत्ती, घोडा, सिंहासन, बादली पोषाख व कडीं व मोतियांची जोडी बक्षिस दिली व राजा असा किताब दिला, असें लिहिलेलें आहे.' पण हें विसंगत दिसतें. कामागिरी केल्यावांचून बक्षिस मिळणें हें त्यावेळच्या यवन साम्राज्यांत तरी दृष्टोत्पत्तीस येत नव्हतें. मग हें संभवनीय असणें शक्य नाहीं. राज्यवृद्धीसाठीं मोऱ्यांस अशा प्रकारचें आमिष दाखविलें असावें असें म्हणावें तरीही तें त्यावेळच्या परिस्थित्यनुरूप शक्य दिसत नाहीं.

पांचही बंधु विजापुराहून जावळीस आले. त्यांनीं बेकैद असलेला मुलूख सुधरला व त्याठिकाणीं वसाहत केली म्हणून त्यांजकडून बादशहा माफक कारभार घेत असे. व प्रसंगीं ते बादशहास मदतही करीत असत. जावळीस आल्यानंतर पुनः यांचें वडीलपणाच्या हक्कासाठीं भांडण होऊं लागलें. त्यावरून त्यांनीं श्रीमहाबळेश्वरीं जाऊन श्रीदेवासमक्ष न्याय मांडिला. त्यांत पांच जणांच्या नांवें चिठ्या टाकिल्या. त्यावेळीं वडीलपणाच्या हक्काची शिक्याची चिठी चंद्रराव उर्फ चंद्रराय यांचेच नांवें आली. त्यावरून श्रीदेवासमक्ष निवाडा होऊन चंद्रराव ऊर्फ चंद्रराय यांचे स्वाधीन शिक्के करण्यांत आले. व यापुढें चंद्रराव हे जावळी येथें राहून राज्य करूं लागले; परंतु याच वेळेपासून ह्या पांचही भावांची फाटाफूट झाली. यानंतर एके ठिकाणीं राहून निभणार नाहीं असें अनुमान करून हणमंतराव हे जावळीप्रांतीच्या नाहार, खोद्रमध्यें गेले, बागराव व कमळराव हे आठगांवामध्यें राहिले व सुर्याजीराव ऊर्फ सुरेराव हे चंद्रराव यांच्याजवळ जावळीस राहिले. येणेंप्रमाणें ह्या पांचही भावांच्या अमदानीमध्यें तरी तात्पुरता ह्या तंट्याचा निकाल झाला. पण त्याचें बीज नाहींसें झालें नाहीं.

हणमंतराव जे नाहारखोद्रमध्यें गेले, त्यांस खेमाजी व चायाजी असे दोन पुत्र होते. बागराव जे आठ गांवामध्यें राहिले त्यांस प्रतापजी, व कमळराय यांस जायाजी, सुर्याजीराव-सुरेराव जे जावळीसच राहिले त्यांस दादाजी व जावळीचे राजे चंद्रराव यांस बाळाजी चंद्रराव असे पुत्र होते. हा भाऊबंदकीचा तंटा पांचही बंधुंच्या अस्तित्वापर्यंत शांत होता; परंतु हणमंतरावप्रभृती पांचही बंधु निवर्तल्यावर या वडीलपणाच्या हक्काच्या तंट्यानें पुनः उचल खाल्ली. व हणमंतरावाचे वडील पुत्र खेमाजी हणमंतराव यांनीं वडीलपणाचा हक्क बळकाविला. त्यावरून चंद्ररावाचा पुत्र बाळाजी यानें वडीलपणाच्या हक्कासाठीं कज्जा आरंभिला. ह्या कज्जाचा शेवट होण्यापूर्वीच खेमाजीराव हे मृत्यू पावले. खेमाजीरावाच्या मृत्यूमुळें ह्या तंट्यास पुनः शांतता प्राप्त झाली. खेमाजीराव यांस चायाजीराव, बाबाजीराव व रामाजीराव असे तीन पुत्र होते. पैकीं, चायाजीराव हे नाहारखोद्र मुक्कामींच राहिले. बाबाजीराव हे धवेर बंदरी गेले. व रामाजीराव हे कांदाट खोद्रयांमध्यें जाऊन राहिले.

ह्या तंट्याच्या वेळीं बाळाजी चंद्रराव जावळीकर यांनीं आपल्या सर्व भाऊबंदास अंतर देऊन बारभाई जमा केले होते. व त्यांच्याच कुमकेवर बरेच दिवस हें भाऊबंदकीचें प्रकरण थंड पडलें होतें. त्या बारभाईचीं नांवें येणें प्रमाणें:— १ गोळे (वस्ती गोळेवाडी) २ मालासरे (मालुसरे) ३ बिरमीजी ४ हंटलोटकर ५ हरचंदे ६ कलीनकर निभेगांवचे ७ देवरे देऊळ गांवकर ८ दळवी (वस्ती जावळीं) ९ कोलते १० उचाटकर (तिसरे भागाचे) ११ कुणावेकर (वस्ती बीरवाडी मध्यें निमकाडे मध्यें) १२ पारकर.

*Moray, for this service, was dignified with the title of Chander Rra; G. D. P. 71

ह्या बाळाजी चंद्ररावास दौलतजी चंद्रराव व दौलतजीस दादाजी चंद्रराव येणेंप्रमाणें पुत्र होते. 'दादाजी चंद्रराव यांचा वंश शिवाजीराजे यांच्या दंग्यात कोठें गेला तें नकळें' ह्मणून मूळ वंशावळींत लिहिलेलें आहे. यावरून शिवाजीनें ज्या चंद्रराव मोऱ्यास मारिलें, त्याचें ह्या वंशाळींत बरोबर स्पष्टीकरण केलेलें दिसून येत नाहीं व शिवाजीच्या काला बरोबर नीट मेळही जुळत नाहीं.

नाहारखोद्रमध्यें गेलेले हणमंतराव यांचे पुत्र दोन. खेमाजी व चायाजी. पैकीं खेमाजीचे पुत्र बाबाजीराव. त्याचे पुत्र दोन. रत्नोजीराव व येसोजी ऊर्फ यशवंतराव. ह्या यशवंतरावाच्या कारकीर्दीपासून मोरेवंशजांचा "राव" हा किताब लुप्त होऊन 'बाजी' हा किताब सुरू झालेला दिसून येत आहे.' ह्या ‡यशवंतरावानेंच इ० स० १५२८–२९ सालामध्यें इस्माईल आदिलशहाच्या कारकीर्दीमध्यें विजापूरच्या वतीनें बुऱ्हाण निजामशहा याजबरोबर युद्ध करून परिंड्याच्या लढाईत त्याचा पराभव केला, व त्याचें हिरवें निशाण काबीज केलें. तेंच हिरवें निशाण आदिलशहानें त्यांस बक्षिस दिलें. व यांच्या वंशजांस 'बाजी' हा किताब देण्यांत आला.

बागराव यांचा मुलगा प्रतापजीराव याचा वंश दुदुसी दुदगांव येथें आहे. कमळराव यांचा मुलगा जायाजीराव यांचा वंश बिरवाडीमध्यें आहे. सूर्याजीराव यांचा मुलगा दादाजीराव यांचा वंश वसईमध्यें आहे. आणि हणमंतराव यांचा वंश धवरे बंदरीं, व कांहीं खोर येथें आहे. यानंतर हमंतरावांचा वंश जो धवरे बंदरीं येऊन राहिला त्याची हकीकत देत आहों. बाबाजी हणमंतराव यांस १ रत्नोजीराव व २ येसोजी ऊर्फ यशवंतराव असे दोन पुत्र होते. पैकीं रत्नोजीराव यास खळोजीराव, त्यास १ चंद्रोजीराव २ भानाजीराव ३ तानाजीराव ४ कृष्णाजीराव ५ रायाजीराव असे पांच पुत्र होते. पैकीं वडील चंद्रोजीराव यांस १ प्रतापजीराव २ जानोजीराव असे दोन पुत्र होते. ह्या प्रतापजीरावाच्या कारकीर्दीमध्यें, शृंगारपुरकर सुर्वे यांनीं चढाई करून त्यांचा गांव घेतला. त्यावेळीं प्रतापजी हे विजापुरीं बादशहाकडे चालते झाले. त्यांचा विचार असा होता कीं, बादशहाकडे जाऊन शृंगारपुरकर सुर्वे यांचें हें अन्यायाचें वर्तन त्यांच्या कानीं घालावें ह्या हेतूनें ते विजापुरीं गेले; परंतु एक वर्षपर्यंत त्यांची बादशहाच्या दरबारीं मुळींच दाद लागली नाहीं. प्रतापजीराव हे विजापुरीं जातांच इकडे धवरे बंदरीं असलेले त्यांचे भाऊबंद त्यांस अंतर देऊन परागंदा झाले. व शृंगारपुरकर सुर्वे यांनीं तो गांव बळकाविला.

बादशहास आपल्या अंगची मर्दुमकी दाखविण्याच्या संधीची प्रतापजी हे वाट पहात होते; परंतु तशा प्रकारचा योग बरेच दिवस जुळून आला नाहीं, शेवटीं एके दिवशीं तो योग जुळून आला व त्यामुळें प्रतापजीचा भाग्यरवी उदय पावला.

त्यावेळीं बादशाही दरबारामध्यें अनेक जेठी (मल्ल) यांच्या कुस्त्या होत असत. ह्या कुस्त्यामध्यें जो जय मिळवील त्यास अनेक प्रकारचे मरामत (किताब) मिळून त्यांचा गौरव होत असे. त्यासंधीचा लाभ घेऊन प्रतापजी यांनीं बादशहाच्या जेठी (मल्ल) बरोबर कुस्ती करून त्यास जिंकिलें. त्यावरून प्रतापजीच्या बळाची पारख करण्यासाठीं बादशहानें त्यांच्या अंगावर एक वाघ घातला. प्रतापजी हे कमीशूर नव्हते. ह्या आणीबाणीचा प्रसंग पाहून त्या वीरानें मुळींच न डगमगतां तरवारीचा

‡ह्या यशवंतरावाविषयीं लिहितांना ग्रँटडफ म्हणतात. कीं, तो चंद्ररावाचा मुलगा यशवंतराव होता. पण हें आमच्याकडे आलेल्या वंशावळीवरून मुळींच सिद्ध होत नाहीं. पहिल्या चंद्ररावानंतरच्या दोन पिढ्यापर्यंत यशवंतराव या नांवाचा एकही पुरुष मोऱ्यांच्या वंशात झालेला नव्हता. ग्रँटडफ म्हणतातः–

His (chandrarao's) Son Yeshwant Rao, having distinguished himself in a battle fhought near Purinda with the troops of Boorahan Nizam Shah, in which he captured a green flag, was confirmed in succession to his father as Raja of Jowlee and had permission to use the standard he had won."

G. D. P. 71.

हात करून वाघाचें मुंडकें उडविलें. हें प्रतापजींचें असामान्य धैर्य व त्यांचें तरवारबाजीमधील कौशल्य अवलोकन करून बादशाहा खूप झाला. व त्यांनीं त्यांस आपल्याजवळच ठेवून घेतलें. त्यानंतर भागानगरचा बादशहा ( निजामशाहा ) चढाई करून विजापुरीं आला. त्यावेळीं प्रतापजी यांनीं शिपाईगिरीची शर्थ केली व बादशहाच्या निशाणाचा हत्ती पकडून आणला. ही त्यांची मुर्दुमकी अवलोकन करून बादशहा खूप झाला व त्यास प्रतापजीबद्दल अभिमान वाटूं लागला. त्यावेळीं बादशहानें मेहेरबान होऊन प्रतापजीस विचारलें कीं, ' तुम्हांस जें कांहीं मागणें असेल तें मागा. ' हा बादशहाचा प्रश्न ऐकून प्रतापजीनें त्या संधीचा लाभ घेतला व आपलें गांव शृंगारपुरकर सुर्वे यांनीं जबरदस्तीनें घेतल्याबद्दलचा सर्व मजकूर सांगितला. त्यावरोबर बादशहानें, प्रतापजी यांनीं ( आडव ) अचाट कामगिरी केली म्हणून त्यांस ' अधटराव ' असा मरामती किताब भर दरबारामध्यें देऊन त्यांचें गांव त्यांच्या स्वाधीन केले व प्रतापजीची तेथून रवानगी केली. ह्याप्रमाणें प्रतापजी मोरे मानसन्मान मिळवून परत गांवीं येतांच शृंगारपुरकर सुर्वे निमुटपणें चालते झाले. व प्रतापजी मोरे ऊर्फ ( अधटराव ) हे पूर्ण मुखत्यारीनें गांवाचा उपभोग घेऊं लागले. हें वर्तमान परागंदा झालेल्या भाऊबंदांस समजतांच ते पुनः गांवांत आले व आपल्या हक्कांसाठीं भांडण करूं लागले. त्या भांडणास कंटाळून प्रतापजी मोरे यांनीं पंच जमा केले व न्याय केला. आणि नूतन वाटप केलें. तेथपासून ह्या तंट्याचें मूळ नाहींसें झालें व जो तो आपआपलें उदरभरण करूं लागला.

यानंतर ह्या वंशामध्यें उत्पन्न झालेल्या पुरुषांची वंशावळी नीट लक्षांत यावी, एतदर्थ आम्ही मूळ वंशावळीवरून जी पिढीवार जंत्री तयार केलेली आहे, ती याखालीं देत आहों. ह्या जंत्रीमुळें, श्री शिवाजीमहाराजांनीं ज्या मोऱ्यांपासून जावळीचें राज्य घेतलें, ते चंद्रावमोरे कोणते ? याचा निर्णय इतिहासज्ञांस करण्यास सुलभ जावें, हाच आमचा ही जंत्री तयार करण्यांत हेतु आहे. कारण मोऱ्यांच्या घराण्यासंबंधानें निरनिराळ्या इतिहासज्ञांचीं वेगवेगळीं मतें आहेत, तीं एकस्वरूपास यावीं व ह्या घराण्याची माहिती सत्याच्या कसोटीस पोंचून जावळीचे त्यावेळचे चंद्रराव मोरे कोणते तें सिद्ध व्हावें, हाच आमचा हेतु आहे, तशी खात्री झाल्यास आमच्या श्रमाचें चीज झाल्यासारखें होईल.

## मोरे ऊर्फ धुळप ह्या घराण्याच्या वंशावळीची पिढीवार जंत्री.

यादी. वंशावळी मूळपुरुष रा. रुद्राजीबाबा धुळप मोरे व रा. दौलतजी अधटराव मोरे या उभयतांचा मूळपुरुष एक. वतणीगांव धवरेबंदर ता. खेड, सुरुसन सितेन मया व अलफ.

## परसोजी बाजीराव मोरे राजे प्रांत जावळी.

याचे मुलगे १ हणमंतराव प्रांत जावळी वस्ती चतुरद्वीप. २ बागजीराव मोरे. ३ कमळराव मोरे. ४ सुर्याजीराव मोरे. ५ राजे चंद्रराव मोरे जावळी.

१ **हणमंतराव** यांचे मुलगे १ खेमाजीराव. २ चायाजीराव ( यास मुलगा नाहीं. )

**बागजीराव** यांचे मुलगे १ प्रतापजीराव. ( यांचे वंशज दुदुसी दुदगांव येथें आहेत )

**कमळराव** यांचे मुलगे १ जायाजीराव ( यांचे वंशज बिरवाडी येथें आहेत. )

**सुर्याजीराव** यांचे मुलगे १ दादाजीराव.

**चंद्रराव मोरे** यांचे मुलगे १ बाळाजीराव.

२ **खेमाजीराव** यांचे मुलगे १ चायाजीराव, २ बाबाजीराव ३ रामाजीराव ( चायाजीराव व रामाजीराव यांस वंश नाहीं ) ( बाबाजीराव यांचा वंश धंडीपाखर येथें आहे. )

**दादाजीराव** यांचे मुलगे १ चंद्रराव.

**बाळाजीराव** यांचे मुलगे १ दौलतराव.

३ **बाबाजीराव** यांचे मुलगे १ रत्नोजीराव २ येसोजी* ऊर्फ यशवंतराव. ( याची पुढील माहिती नाहीं. )

---

* ह्या यशवंतरावानें परिंड्याच्या लढाईत निझाम बुऱ्हाणशहाचा पराभव करून त्याचें हिरवें निशाण काबीज केलें. व "बाजी" ही पदवी संपादन केली.

**चंद्रराव** याचे मुलगे १ बाळाजीराव ( यांचा वंश वसईस आहे. )

**दौलतराव** यांचे मुलगे १ दादाजीराव ( हा शिवाजी राजांचे दंग्यांत नाहींसा झाला म्हणून मूळ वंशावळींत लिहिलें आहे. )

४ **रत्नोजीराव** यांचे मुलगे १ रवळोजी.

५ **रवळोजी** याचे मुलगे १ चंद्रोजीराव २ भानाजीराव ३ तानाजीराव ४ कृष्णाजीराव ५ रायाजीराव.

६ **चंद्रोजीराव** यांचे मुलगे १ प्रतापजी § २ जानोजीराव.

**भानाजीरावचे** १ रवळोजीराव.

**तानाजीरावचे** १ गांगोजीराव.

**कृष्णाजीरावचे** १ अर्जोजीराव २ रत्नोजीराव

**रायाजीरावचे** १ माबाजीराव.

७ **प्रतापजी बाजी** यांचे १ बाजीराव २ तानाजीराव

**जानोजीराव** यांचे १ प्रतापजीराव.

**रवळोजीराव** यांचे १ रायाजीराव.

**गांगोजीराव** यांचे १ रामजीराव.

**अर्जोजीराव** यांचे १ भानाजीराव, २ हिरोजीराव.

**रत्नोजीराव** यांचे १ सोनजीराव.

**माबाजीराव** यांचे १ बापूजीराव.

८ **बाजीराव** यांचे १ भिकाजीराव[1] २ हिरोजीराव[2] ३ बापुजीराव ४ येसाजीराव.

**तानाजीराव** यांचा वंश नाहीं.

**प्रतापजीबाजी** यांचे १ सुर्याजीराव ( हे कांदोसकर ह्या नांवानें प्रसिद्ध झाले ).

**रायाजीराव** यांचे १ कृष्णाजीराव.

**रामाजीराव** यांचे १ चानजीराव.

**मानाजीराव** यांचे १ रायाजीराव २ सिदो[3]-जीराव, ३ तानाजीराव[4]

**हिरोजीराव** यांचे नाहींत.

§ ह्या पुरुषानें अधटराव हा किताब संपादन केला.

१ हे अस्तनकर म्हणवूं लागले.

२ हे आठगांवकर म्हणवूं लागले.

३,४ हे धुळप म्हणवूं लागले.

**सोनजीराव** यांचे गुणाजीराव.

**बापुजीराव** यांचे १ जानोजी.

९ **भिकाजीराव** यांचे १ तानाजीराव.

**हिरोजीराव** यांचे १ कानोजीराव २ संभाजीराव

**बापुजीराव** यांचे १ अर्जोजीराव.

**येसाजीराव** यांचे १ चानजीराव.

**सुर्याजीराव** यांचे १ अंबाजीराव २ येसाजीराव, ३ कृष्णाजीराव.

**कृष्णाजीराव** यांचे १ भानाजीराव.

**चानजीराव** यांचे १ रामाजीराव.

**रायाजीराव** यांचे १ अर्जोजी २ कृष्णाजी.

**तानाजीराव** यांचे १ लखोजी, २ व्यंकोजी, ३ बहीरजी.

**गुणाजीराव** यांचे १ रामाजीराव.

**जानोजीराव** यांचे १ राणोजी.

१० **तानाजीराव** यांचे १ टिंबाजीराव.

**कानोजीराव** यांचे १ सूर्याजीराव २ गुणाजीराव

**संभाजीराव** यांचे नाहीं.

**अर्जोजीराव** यांचे १ चानजी २ महिमाजी.

**चानजीराव** यांचे बापुजीराव.

**अंबाजीराव** यांचे १ गणोजीराव २ संक्रोजीराव

**येसाजीराव** यांचे १ त्रिंबकराव २ कृष्णाजीराव ३ सुभानजीराव.

**कृष्णाजीराव** यांचे १ बाळाजीराव.

**भानाजीराव** यांचे १ रायाजीराव.

**रामाजीराव** यांचे १ प्रतापजी.

**अर्जोजीराव** यांचे १ संताजी २ राणोजी.

**कृष्णाजीराव** यांचे १ रायाजीराव २ हरजीराव ३ रुद्राजीराव.

**लखमाजीराव** यांचे १ बाबाजीराव.

**व्यंकोजीराव** यांचे १ संभाजीराव (यांचा पत्ता नाहीं. )

**बहिरजीराव** यांचे नाहीं.

**रामाजीराव** यांचे १ अंताजीराव ( यांस संतान नाहीं. हे कैपतराव ह्या नांवानें प्रसिद्धीस आले. )

**राणोजीराव** यांचे १ चानजी.

११ **टिंबाजीराव** यांचे १ मानाजीराव.

**सूर्याजीराव** यांचे १ गोविंदराव २ कानोजीराव (यांस संतति नाहीं.)

**गुणाजीराव** यांचे १ दौलतराव २ संभाजीराव ३ यशवंतराव (यांस संतति नाहीं.)

**चानजी** यांचे नाहीं.

**महिमाजी** यांचे नाहीं.

**बापुजीराव** यांचें नाहीं.

**गणोजीराव** यांचे नाहीं.

**संक्रोजीराव** यांचे नाहीं.

**त्रिंबकराव**
**कृष्णाजीराव** } यांचे नाहीं.
**सुभानराव**

**बाळाजीराव** यांचे १ राणोजीराव २ तानोजीराव ३ भिकाजीराव ४ रायाजीराव.

**रायाजीराव** यांचे १ रामाजी.

**प्रतापजी** यांचे नाहीं.

**संताजी** यांचे नाहीं.

**राणोजी** यांचे संताजी.

**रायाजीराव** यांचे १ यल्लोजी, २ गुणाजी, ३ सिदोजी (हे तिघे बाळापूरच्या लढाईंत पडले. यांस संतति नाहीं)

**हरजीराव** यांचे १ कृष्णाजी, २ रुद्राजी, ३ जानराव, ४ भगवंतराव.

**रुद्राजीराव** यांचे नाहीं.

**बावाजी** यांचे हिरोजी.

**चानजी** यांचे नाहीं.

१२ **मानाजीराव** यांचे बाबाजीराव.

**राणोजीराव** यांचे १ आत्माजीराव २ कानोजीराव ३ येशवंतराव (यांस संतान नाहीं.)

**तानाजीराव** यांचे १ गुणाजीराव २ राजाजीराव (यांस संतान नाहीं.)

**भिकाजीराव** यांचे १ रत्नोजीराव २ येशवंतराव ३ हरजीराव (यांस संतान नाहीं.)

**रायाजीराव** यांचे १ बापुजीराव २ धोंडजीराव (ह्यांस मुलगे नाहींत.)

**रामाजी** यांचे नाहीं.

**संताजी** यांचे १ राणोजीराव, २ यशवंतराव ३ सूर्याजीराव.

**कृष्णाजी** यांचे नाहीं.

**रुद्राजी** यांचे आनंदराव (पेशव्यांच्या विजयदुर्ग येथील आरमारचे सुभे)

**जानराव** यांचे हरबाजीराव (आंग्याच्या आरमारचे सुभेदार. शिंद्यांचे जांवई).

**भगवंतराव** यांचे नाहीं.

**हिरोजी** यांचे कृष्णाजी (त्याची नक्कल.)

१३ **बाबाजीराव** यांचे १ सूर्याजीराव २ गुणाजीराव.

**राणोजी** यांचे १ गोविंदराव २ नारायणराव ३ सूर्याजीराव.

**आनंदराव** यांचे १ कृष्णराव (यांच्या अमदानींत ब्रिटिश सरकारनें विजयदुर्गचें आरमार स्वाधीन करून घेतलें.)

**हरबाजीराव** यांचे १ जानराव (हे ही पेशव्यांच्या आरमारामध्यें नांवाजलेले सरदार होते

१४ **सूर्याजीराव** यांचे १ गोविंदराव २ कानोजीराव (यांची नक्कल)

**गुणाजीराव** यांचे १ दौलतराव २ संभाजीराव ३ यशवंतराव (यांची नक्कल)

**गोविंदराव** यांचे १ सूर्याजीराव.

**रामचंद्रराव** यांचे १ माधवराव २ गणपतराव ३ महिपतराव ४ श्रीपतराव.

**कृष्णराव** यांचे १ आनंदराव, २ रघुनाथराव, ३ दौलतराव ४ विश्वासराव.

**जानराव** यांचे १ हरबाजीराव २ भगवंतराव.

१५ **सूर्याजीराव** यांचे १ गोविंदराव २ व्यंकटराव, ३ कृष्णराव ४ नारायणराव. (व्यंकटराव हे बडोदें मुक्कामीं व नारायणराव हे ग्वाल्हेर मुक्कामीं आहेत.)

**रघुनाथराव** यांचे १ कृष्णराव (विजयदुर्गचे चालू सरंजामदार.)

**आनंदराव** यांचे नाहीं.

**दौलतराव** यांचे नाहीं.

**विश्वासराव** यांचा वंश धार येथें आहे.

**हरबाजीराव** यांस मुलगे नाहींत.

**भगवंतराव** यांचे १ हरबाजीराव २ जानराव. (हरबाजीराव हे बावडे संस्थानांत आचिरणे गांवीं राहतात.)

**जानराव** मयत झाले.

ह्याप्रमाणें धुळपांची एकंदर वंशावळी दिलेली आहे. ह्या वंशावळीचा उपलब्ध इतिहासाशीं बराच मतभेद दृष्टीस पडत आहे. कित्येक इतिहासकारांनीं श्रीशिवाजी महाराजांनीं ज्या चंद्ररावास मारिलें, तो चंद्रराव मूळ चंद्रराव होता असें कल्पिलें आहे. परंतु ती त्यांची चुकी आहे. वर जो प्रतापराव चंद्रोजी कीं, ज्यानें विजापुरीं बादशहाकडे जाऊन सुर्व्यांच्या उपद्रवापासून आपलें रक्षण केलें. तो आपल्या गांवीं परत आल्यानंतर थोड्याच महिन्यांत ह्मणजे इ. स. १६५६ मध्यें जावळीकरांचें राज्य शिवाजी महाराजांनीं घेतलेलें आहे. त्यावरून मूळ चंद्ररावांचा संबंध ह्या ठिकाणीं मुळींच पोंचत नाहीं. मूळचंद्ररावापासून सात पिढ्यांपर्यंत मोऱ्यांचें राज्य जावळीस होतें. असें कांहीं बखरींत आढळतें आणि तें बरोबर आहे. त्यानंतर श्री शिवाजी महाराजांनीं मोऱ्यांस मारून त्यांचें राज्य घेतलें आहे. मोऱ्यांनीं जावळी प्रांतीं पाय ठेविल्यापासून त्यांचें राज्य नष्ट होईपर्यंत अदमासें १६० वर्षे झालीं असावींत. त्यांच्या आगमनाचा काल जरी निश्चित नाहीं, तरी ज्या युसफ आदिलशहाच्या कारकीर्दीमध्यें जावळीवर मोऱ्यांची नेमणूक झाली, त्या आदिलशहाच्या कारकीर्दीचा काळ इ० स० १४८९-१५१० पर्यंत होता. अर्थात् त्याच्या कारकीर्दीमध्यें सात आठ वर्षांनीं मोऱ्यांस पाठविलें असावें. यावरून मोऱ्यांचें जावळीस १६० वर्षे राज्य होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. व त्यांनीं सात पिढ्या राज्य केलें, त्यावरून प्रत्येक पुरुषाची सरासरी २२ वर्षांची होते आणि तीही विसंगत नाहीं. आतां प्रश्न एवढाच आहे कीं, शिवाजी महाराजांनीं ज्या चंद्ररावापासून जावळीचें राज्य घेतलें, तो चंद्रराव कोणता तें आपणांस शोधून काढिलें पाहिजे. त्यापूर्वी महाराजांस मोऱ्यांजवळून जावळी घ्यावयास कारण कोणतें झालें व प्रचलित इतिहासकारांनीं काय लिहून ठेविलें आहे तें पाहणें अगत्याचें आहे.

प्रतापजी बाजी हे विजापुराहून आल्यानंतर लवकरच जावळीच्या राज्याचा अंत झाला. त्यावेळीं श्री शिवाजी महाराजांनीं मराठ्यांचें राज्य स्थापन करण्यास सुरुवात केलेली होती. अनेक सरदारांस, किल्लेदारांस, गडकऱ्यांस, पाटलांस व त्यावेळच्या अधिकारी पुरुषांस आपणांस अनुकूल करून घेण्याचा क्रम त्यांनीं आरंभिला होता. निरनिराळे किल्ले वगैरेही बांधण्याचें काम सुरू केलें होतें. अशावेळीं मोरे हे मराठे आहेत, तेव्हां त्यांनींही आपल्या इच्छित कार्यास मदतगार व्हावें एतदर्थ महाराज खटपट करीत होते. कारण मोरे हे आदिलशाहीचे ताबेदार व एकनिष्ठ सेवक असल्यामुळें, शिवाजी महाराजांचा घांटमाथा काबीज करण्याचा हेतु मोरे हे स्वाधीन झाल्यावांचून सावर्णे मुळींच शक्य नव्हता. त्यांनीं मोऱ्यांस अनुकूल करण्याचा प्रयत्न चालविला; परंतु कोंकणपट्टीमध्यें श्री शिवाजी महाराजांच्या पूर्वीपासून मोऱ्यांचें राज्य असल्यामुळें, ते शिवाजी महाराजांच्या स्वराज्य संस्थापनेच्या कार्यांत मुळींच मदत करीत नव्हते. पण उलट त्यांची हेटाळणा करीत होते. कोंकणपट्टी काबीज करण्याच्या उद्योगास लागल्यानंतर महाराजांनीं मोऱ्यांस सांगून पाठविलें कीं, "आपण विजापुरकरांस जो कर देतां तो देण्याचें बंद करून आम्हांस द्यावा व आमचे अंकित व्हावें. हें मान्य होत नसल्यास सगळेंच उत्पन्न तुम्हीं भोगावें व आम्हांस जरूर लागेल तेव्हां पांच हजार लोक मदतीस देत जावे. तुम्हांवर कसेंहि संकट आलें तरी आम्हीं तुमची कुमक करूं." हें सामोपचाराचें बोलणें मोऱ्यांस मान्य झालें नाहीं. तशांत दुसरें एक कारण झालें; तें हें कीं, विजापुरकरांकडून बाजी शामराज हा शिवाजीचें पारिपत्य करण्यासाठीं दहा हजार लोक बरोबर घेऊन आला. तो जावळीच्या चंद्रराव मोऱ्यांच्या आश्रयानें पारघाटाजवळ दबा धरून बसला होता. त्याचा विचार महाड प्रांतामधून शिवाजी महाराज परतले कीं त्यांजवर हल्ला करावयाचा होता. परंतु हा त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. महाराजांच्या हेरांनीं ही बातमी देतांच महाराज बाजीवर तुटून पडले व त्याची त्यांनीं दाणादाण केली. त्याबरोबर तो विजापुरीं पराभव पावून चालता झाला. बाजी शामराज यास साह्य केल्याबद्दल महाराजांना मोऱ्यांची अतिशय चीड आली. शिवाय घाटमाथ्यावरील बराच प्रांत मोऱ्यांकडे होता व त्यांचें राज्य महाराजांनीं संपादिलेल्या मुलखाजवळच असल्यामुळें हा मधील कांटा काढून

टाकणें त्यांस अगत्याचें वाटलें. यावेळीं हशमगड येथें मोऱ्यांचें ठाणें होतें. तसेंच जावळी प्रांतांतील बरींच खोरीं व किल्ले त्यांच्या स्वाधीन होते. शिवाय सामोपचारानें सांगितलें असतांही ते विजापुरकरांचा पक्ष सोडिनात; हीं सर्व कारणें मोऱ्यांचा नाश करावयास महाराजांच्या पुढें उभीं राहिलीं होतीं. मोऱ्यांस काबीज केल्यानें सर्व घाटमाथा त्यांच्या कबजांत येणारा होता. परंतु त्यांजवळ दहाबारा हजार मावळ्यांचें सैन्य असल्यामुळें महाराजांच्यानें त्यांजबरोबर उघड लढाई करवेना. तसें त्यांस त्यावेळीं तरी सामर्थ्य प्राप्त झालें नव्हत. म्हणून युक्तीनें मोऱ्यांस शह देण्याचा महाराजांनीं बेत केला व तेथील किल्याची वगैरे माहिती मिळविण्यासाठीं, महाराजांनीं रघुनाथ बल्लाळ व संभाजी कावजी ह्या दोन सरदारांस सोयरीकीच्या निमित्तानें कांहीं लोकांनिशीं रवाना केलें. शिवाजीमहाराजांनीं चंद्रराव मोऱ्यांची मुलगी मागावयास पाठविलें आहे, असें कारण सांगितल्यावरून त्यांचा मोऱ्यांच्या येथें प्रवेश झाला. मोरे हेही ही गोष्ट खरीच समजले व त्यांनीं त्यांचा आदरसत्कार उत्तम प्रकारें केला. तेथील अव्यवस्था, आपसांतील फाटाफूट पाहून रघुनाथबल्लाळ यांनीं मोऱ्यांस दग्यानें ठार मारण्याचा बेत केला. त्या उभयतांनीं बेत करून महाराजांस त्या मजकुराचें पत्र लिहिलें व सैन्यासह येण्यास सुचाविलें. तो बेत महाराजांस पसंत पडून ते स्वतः राजगडावरून निघून पुरंदरास गेले व तेथून महाबळेश्वरीं आले. महाराज आल्याचें वर्तमान कळतांच रघुनाथ बल्लाळ यांनीं चंद्रराव व त्याचा भाऊ सूर्यराव यांशीं एकांती खलबत करण्याचा घाट घातला व बोलतां बोलतां अनुकूळ संधि पाहून त्यानें त्यांच्यावर कटारी चालवून त्यांस तेथल्यातेथें ठार केलें; व तावडतोब तेथून निघून किल्ल्याखालीं यावयास निघाले. ही बातमी किल्ल्यावरील लोकांस कळतांच त्यांनीं त्यांस अटकाविलें; परंतु त्यांनीं त्यांस मारून आपल्या लोकांनिशीं महाराजांस मिळाले. नंतर महाराज महाबळेश्वराहून निसरणीच्या घाटानें जावळीस गेले व हशमगडास वेढा घालून मोऱ्यांच्या लोकांबरोबर लढूं लागले. चंद्ररावाचे मुलगे बाजीराव व कृष्णराव आणि त्याचा कारभारी हणमंतराव हे मोठ्या शौर्यानें लढले. पण शेवटीं हणमंतराव रणांत पडला. हशमगड महाराजांच्या हातीं आला. बाजीराव व कृष्णराव यांस बंदिवान् करून व मोऱ्याच्या कुटुंबांतील तेथें सांपडलेल्या इतर माणसांस कैद करून पुरंदरास पाठवून दिलें. मोऱ्यांच्या मुलांस कांहीं जहागीर देऊन त्यांची चांगली व्यवस्था लावण्याचा महाराजांचा इरादा होता, परंतु त्यांनीं विजापुरकरांशीं गुप्तरीतीनें पत्रव्यवहार करून कांहीं कारस्थान केलें व पळून जाण्याचा बेत केला हे त्यांचे कागदपत्र मुद्देदस्त करून त्यांच्यापाशीं रुजवात केली व त्यांस पुण्यास नेऊन तेथें त्यांचा वध केला व मोऱ्यांच्या मुली व बायका यांस सोडून दिलें." ह्या प्रकारचा संगतवार अशा प्रकारचा प्रचलित इतिहास संदर्भ आहे. यांत जीं नांवें दिलेलीं आहेत, तीं मात्र निरनिराळ्या बखरकारांनीं व इतिहासकारांनीं वेगवेगळीं दिलेलीं आहेत. ग्रँटडफ व रायरीची बखर नुसतें चंद्ररायच म्हणत आहेत. ते कोणते चंद्रराय तें कळत नाहीं. पारसनिसांच्या इतिहाससंग्रहामध्यें ऐतिहासिक स्फुटलेख यांमध्यें जी जावळीच्या मोऱ्यांची छोटी बखर प्रसिद्ध झालेली आहे, तींत कृष्णराव म्हणत आहेत. हा नांवाचा प्रश्न सोडविणें फारच बिकट आहे. कारण आमच्या जवळील वंशावळीमध्यें जावळीच्या गादीवर जे चंद्रराव मोरे बसले ते कोणते त्याचा मुळींच उल्लेख नाहीं. फक्त मूळ चंद्ररावाचा मुलगा बाळाजीराव, त्याचा दौलतराव व त्याचा दादाजीराव अशी वंशपरंपरा दाखविली असून दादाजी हे शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीत नाहींसे झाले, असें लिहिलें आहे. परंतु त्याच वंशावळीमध्यें पुढें नवव्या पिढींतील रायाजीराव याचे मुलगे शिवाजी महाराजांच्या युद्धांत निवर्तले म्हणून लिहिलें आहे. व त्यानंतर प्रतापजी बाजीचे नातू भिकाजीराव व हिरोजीराव हेही नवव्या पिढीमधील असून त्यांनीं मूळ ठिकाणाहून निघून जाऊन आपलें नांव बदललें आहे. भिकाजीराव हे अस्तनकर व हिरोजीराव हे आठगांवकर असें म्हणवूं लागले, म्हणून उल्लेख केला आहे. तेव्हां यांचा मेळ कसा जमावा? तसेंच चंद्ररावापासून नवव्या पिढीमधील सुर्याजीराव

हे याच वेळेपासून कांदोसकर या नांवें प्रसिद्ध झाले. चंद्ररावापासून नवव्या पिढीमधील कृष्णाजीराव हे धुळप म्हणवूं लागले, असें लिहिलेलें आहे. यावरून श्री शिवाजी महाराजांनीं मोऱ्यांजवळून त्यांचें राज्य चंद्रराव मोऱ्यांच्या आठव्या पिढीमध्यें घेतलें असलें पाहिजे, यांत मुळींच संशय नाहीं. आतां त्यावेळचे राजे चंद्रराव कोणते हा एक प्रश्न आहे. तो प्रश्न आणखी कांहीं मोऱ्यांचीं जुनीं कागदपत्रें अगर पूर्ण माहितीनें भरलेली वंशावळ उपलब्ध झाल्याशिवाय सोडविणें मुळींच शक्य नाहीं. प्रचलित इतिहासज्ञांनीं त्यावेळच्या मोऱ्यांचीं जीं नांवें दिलीं आहेत, त्यांचा मेळ ह्या वंशावळीशीं मुळींच जमत नाहीं. तसेंच मूळ चंद्ररावाचे जे तीनच पुरुष दाखविले आहेत तेंही श्री शिवाजी महाराजांच्या व मोऱ्यांच्या आगमनाच्या कालाशीं विसंगत आहे. आमच्या मतें मूळ चंद्ररावाच्या पिढ्यामध्यें चार पुरुष कमी आहेत. ते पुरुष कोणत्या तरी दुसऱ्या वंशामधून दत्तक घेऊन वंश पुढें चाललेला असला पाहिजे. पण तें आम्हीं मुळींच खरें करूं शकत नाहीं. रायरीच्या बखरीमध्यें "दोन प्रहर लढाई झाली. हल्ला करून जावली हस्तगत केली. बाजीराव कृष्णराजे सांपडले. त्यांस स्त्रियांसुद्धां कैद केलें....चंद्रराव व बाजीराव मोरे बायकासुद्धां घेऊन पुण्यास आले. बाजीराव यांस अभ्यंग भोजन करवून पुण्याचे दक्षणभागीं शिरच्छेद करविला. त्याच्या कन्या होत्या, त्या आपण सोइरीक केली नाहीं" असा मजकूर आहे. तेव्हां चंद्रराव कोणते ? व बाजीराव कृष्णराजे कोणते ?

इतिहाससंग्रहांमधील जावळीच्या बखरीमध्यें 'चंद्रराव कृष्णाजी राजे मोरे' असें म्हटलेलें आहे. परंतु ह्या बखरीचा व आमच्या जवळील वंशावळीचा मुळींच मेळ जुळत नाहीं. ह्या 'यशवंता'च्या बखरीमध्यें मूळ चंद्रराव एकच होता व त्यास, प्रतापराव, गोविंदराव, दौलतराव असे सहा मुलगे होते, असें लिहिलें आहे, तें बरोबर नाहीं. त्यावरून ह्या बखरीवर विश्वास ठेवितां येत नाहीं. सभासदांच्या बखरीमध्यें 'चंद्रराव राजे मोरे हे आपला भाऊ सुर्याजीराव याजबरोबर खलबत करीत असतां त्यांस कटारीचे वार चालवून मारिलें व नंतर हणमंतराव म्हणून चंद्ररायाचा भाऊ चतुर्बंट म्हणून जावळीचा जागा होता तेथें तळ धरून राहिला. त्यास संभाजी कावजीनें मारिलें' असें लिहिलें आहे. व ग्रँटडफनेंही हेंच गृहित धरिलें आहे. रा० केळुसकर यांनीं श्रीशिवाजी महाराजांचे चरित्रांत "चंद्रराव व सूर्याजीराव हे भाऊ होते असें म्हटलें असून पुढें त्याचे मुलगे बाजीराव व कृष्णराव आणि त्याचा कारभारी हणमंतराव यांजबरोबर महाराजांचें युद्ध झालें, पण शेवटीं हणमंतराव रणांत पडले व बाजीराव कृष्णराव यांस बंदिवान करून पुण्यास नेलें व तेथें त्यांचा वध केला" असें म्हटलें आहे. शिवदिग्विजयामध्येंही हीच हकीकत दिलेली आहे. व तिचेंच अनुकरण सरदेसायांनींही आपल्या मराठा रियासतीमध्यें केलेलें आहे. आतां आम्हीं आमच्या अनुमानाप्रमाणें हा महत्त्वाचा प्रश्न सोडविण्याचें धाडस करणें हें चुकीचें होईल. तरीही आज आमच्याकडे जी मोऱ्यांची संपूर्ण वंशावळ आहे, तीवरून साधारण अनुमान करावयास हरकत नाहीं. शिवाय एखादेवेळीं पूर्ण माहितीनें भरलेलीं अशीं कागदपत्रेंही मिळण्याचा संभव आहे. जर यदाकदाचित् तशीं कागदपत्रें मिळालीं तर ह्या माहितीवर प्रकाश पडणारा आहे.

आमच्या मतें, त्या वेळचे जावळीचे राजे चंद्रराव मोरे हे रायाजीरावाचे मुलगे कृष्णराव (चंद्ररावापासून नवव्या पिढीमधील) हेच असावेत. प्रचलित इतिहासामध्यें, तसेंच बखरकारांनीं त्यांचा भाऊ सूर्याजीराव म्हणून लिहिला आहे तो त्यांचा चुलत भाऊ प्रतापजीरावांचा मुलगा सूर्याजीराव असला पाहिजे. तसेंच चंद्ररावाचे मुलगे बाजीराव व कृष्णराव असें जें म्हटलें आहे, ते कृष्णाजी बाजीचे चुलत बंधु रायाजीराव यांचे मुलगे असावेत. त्यांचीं नांवें आमच्या वंशावळींत दिलेलीं नसून तें युद्धांत मरण पावले असा उल्लेख आहे. यावरून तेच बाजीराव व कृष्णराव असावेत. ह्या युद्धाचे समकालीन पुरुष, नवव्या पिढींतील भिकाजीराव, हिरोजीराव, बापुजीराव, येसाजीराव, तसेंच कृष्णराव, सुर्याजीराव, चांदजीराव, सिदोजीराव तानाजीराव व गुणाजीराव हे होत. त्यांची पुढील पिढी जावळी मुक्कामींहून पळून नाहींसी झाली व ज्यास जशी सवड साधली तसें त्यानें आपलें मोरे हें

नांव बदललें. पैकीं सिदोजीराव व तानाजीराव हे धवडे बंदरींहून गांवशाबंदरीं ध्रुवमंडळास रहावयास गेले व त्यांनीं ध्रुवमंडळावरून आपलें गांव *धुळप असें ठेविलें. ह्या सिदोजीरावास अर्जोजी व कृष्णाजी असे दोन पुत्र होते.

कृष्णाजी धुळप यांस हरजीराव व रुद्राजीराव असे दोन पुत्र होते. पैकीं हरजीरावांस कृष्णाजीराव, रुद्राजीराव, जानराव व भगवंतराव असे चार पुत्र झाले. त्यांतील दुसरे पुत्र रुद्राजीराव यांस आनंदराव ह्या नांवाचे पुत्र होते, ह्या आनंदरावाचें नांव मराठ्यांच्या इतिहासामध्यें प्रसिद्ध असून ते पेशव्यांच्या आरमाराचे सुभे होते. त्यांनीं दर्यावर्दी युद्धामध्यें जें यश मिळविलें तें अवर्णनीय असें होतें. त्यांचेच चुलत बंधु म्हणजे पहिल्या जानरावांचे चिरंजीव हरबाजीराव धुळप हेही आंग्रे यांच्या आरमाराचे सुभेदार होते. यांस सिंदे सरकारची मुलगी केलेली होती. यांचे चिरंजीव जानराव धुळप (दुसरे) यांचीही कीर्ति आरमारविषयक कारकीर्दीमध्यें प्रमुखस्थानीं झळकत आहे. जानरावांचे पुत्र हरबाजीराव यांस सावंतवाडीकरांकडे मानकऱ्याची असामी होती. ह्या धुळप मंडळीनें आरमारप्रकर्णीं जी अवर्णनीय अशी शौर्योत्पादक कामगिरी केली आहे, तिचें विस्तारपूर्वक वर्णन उपलब्ध साधनांच्या अभावीं आम्हांस देतां येत नाहीं; याबद्दल आम्हीं अत्यंत दिलगीर आहों. तरीही आम्हांस जीं साधनें अनुकूल आहेत, त्यांवरून आम्हीं ह्या वरील पराक्रमी पुरुषांच्या मर्दुमकीची साधारण ओळख करून देण्यास तयार आहों. जर यदाकदाचित् धुळप घराण्याचे चोरीस गेलेले कागद उपलब्ध झाले तर यानंतरही आम्हीं ह्या वरील महाशयांच्या कीर्तींत अवश्य भर टाकूं—

* आमच्या जवळ असलेल्या एका वंशावळीमध्यें श्री० शिवाजी महाराजांचा ९ व्या पिढीमधील कृष्णराव यानें पराभव केल्यावरून विजापुरच्या बादशहानें त्यांस धुळप हा किताब दिला व तेथपासून या वंशास धुळप म्हणवूं लागले, असें लिहिलें आहे. परंतु ऐतिहासिकदृष्ट्या तें बरोबर नाहीं. तसेंच दुसऱ्या वंशावळीमध्यें ‘ शिवाजी महाराजांचे कारकीर्दींत दंगे झाले, तेव्हां मोरे असें म्हणतां नये, तेव्हां सिदोजी व तानाजी बाजी असे धवडे बंदरीं येथें गांवशाबंदरी नजीक ध्रुवमंडळीं तेथें राहिले. सबब धुळप असें नांव दरबारीं म्हणतात. हिरोजी बाजी आठगांव नजीक होते. तेव्हां आठगांवकर म्हणून नांवें सांगूं लागले. सूर्याजी बाजी हे कांदोसीकर म्हणून सांगूं लागले. भिकाजी बाजी अस्तनामध्यें राहिले ते अस्तनकर म्हणून म्हणवूं लागले. ’ असें लिहिलेलें आहे.

## विजयदुर्गचे धुळप.

### मराठ्यांचें आरमार.

श्रीशिवाजी महाराजांस राज्यसंस्थापनेच्या कामीं, हेटकरी व मावळे यांनीं ज्याप्रमाणें खुष्कीवरील मुलूख काबीज करण्यामध्यें मदत केलेली होती; त्याचप्रमाणें आरमारखात्यावरील दरयासारंग व मायनाक भंडारी ह्या शूरवीरांनींही दर्यायुद्धामध्यें बरीच मदत केलेली होती. खुष्कीचे मुलूख व त्यांचें संरक्षण ज्याप्रमाणें महाराजांनीं निरनिराळ्या ठिकाणीं मान्याच्या जागा पाहून किल्ले बांधून केलें; त्याचप्रमाणें समुद्रकांठच्या मुलखाचें संरक्षण आरमारामार्फत केलें. त्यांनीं पश्चिम समुद्रामध्यें कच्छच्या बंदरापासून तों कालिकतपर्यंत सर्व समुद्रकिनारा आपल्या ताब्यांत ठेविला होता; व त्याचें संरक्षण पूर्ण जोमानें केलें होतें. खुष्कीच्या लढायामध्यें ज्याप्रमाणें मराठावीरांनीं मोठमोठीं पराक्रमाचीं व अभिमानास्पद अशीं रणधुरंधरत्वाचीं कामें केलीं, त्याचप्रमाणें त्यांनीं दर्यावर्दीपणाच्या कौशल्यानें समुद्रयुद्धामध्येंही चांगलेंच शौर्य व्यक्त केलें. त्या वेळीं समुद्राकडील वर्चस्वाची मराठ्यांस किती तरी जरूरी होती. हबशी, इंग्रज, फिरंगी, फरांसीस वगैरे परकी राष्ट्रांचा हिंदुस्थानांत प्रवेश न होऊं देण्याबद्दल त्यांस डोळ्यांत तेल घालून जपावें लागत होतें, त्यांची सत्ता समूळ उखडून टाकण्यासंबंधानें ते प्रतिरोध करीत होते व हें प्रतिरोध करण्याचें काम मुख्यतः आरमाराकडूनच होत असे; म्हणूनच महाराजांनीं आपल्या कारकीर्दीमध्यें आरमाराचीही जय्यत तयारी ठेविलेली होती. ही आरमाराची तयारी महाराजांनीं केव्हांपासून केली होती, त्याचा नीटसा शोध लागत नाहीं; परंतु देशावरील

बराच भाग काबीज केल्यानंतर जेव्हां महाराजांनीं कोंकणपट्टीकडे मोर्चा वळविला, त्या वेळीं विजापूरचा बादशहा कमजोर झाल्यामुळें जंजिऱ्याचे शिद्दी, वाडीचे सावंत, जव्हारचे कोळी व इंग्रज, फिरंगी फरांसीस यांनीं बंदरकांठचीं एक एक बंदरें घेण्याचा उपक्रम सुरू केला. व त्या निमित्तानें जंजिऱ्याचा शिद्दी, जरी त्यास विजापुरकरांकडून नागोठण्यापासून बाणकोटपर्यंतचा मुलूख जहागिरीदाखल मिळाला होता, तरी इतरही बंदरें काबीज करून आपली सत्ता वाढविण्याचा प्रयत्न करीत होता. ह्या जंजिऱ्याच्या शिद्दीकडून हिंदु लोकांस अतिशय त्रास सहन करावा लागत असे. ह्या शिद्दीच्या जुलमापासून हिंदु लोकांस सोडवावें म्हणून शिवाजी महाराजांनीं कोंकणपट्टी हस्तगत करण्याचा क्रम सुरू केला व स्वतंत्र आरमार उभारलें. ह्या आरमारापासून शिवाजी महाराजांस किती तरी फायदे झाले. जंजिऱ्याच्या शिद्दीस महाराजांचा वचक वाटूं लागला. इंग्रज, फिरंगी यांजवरही दाब बसला व तेणेंकरून महाराजांची समुद्रावरील सत्ता दिवसेंदिवस बळकट बसूं लागली. हें आरमार इ० स० १६६१ मध्यें उभारलें गेलें. महाराजांनीं स्वतंत्र आरमार उभारतांच त्यांस सावंतवाडीकरांचे राम दळवी व तान सावंत हे दर्यावर्दी सरदार येऊन मिळाले. त्यांस महाराजांनीं आरमारांतील हशमांचे सुभेदार केले. सावंतांचा मुख्य खेम सावंत हा शरण आल्यामुळें त्यास कुडाळप्रांताची देशमुखी दिली. अशा प्रकारें अनुकूल परिस्थिति प्राप्त होतांच महाराजांनीं आरमाराची सुधारणा केली व जागोजाग नवीन किल्ले बांधिले आणि मोठमोठीं जहाजें बांधण्याचें सुरू केलें. कुलाबा, सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग ह्या किल्ल्यांची सुधारणा करून त्या ठिकाणीं आरमारांच्या जागा केल्या. सिंधुदुर्ग किल्ला बांधून त्या ठिकाणीं मुख्य ठाणें करण्याचें योजिलें. ह्या आरमारापासून शिवाजी महाराजांस किती तरी फायदे झाले. त्यांच्या कारकीर्दीमध्यें, " पाणियांतील तरांडी जहाजें सुमारें ३० थोर गुराब. १०० गलबतें. १५० महागिऱ्या. ५० लहान गुराब. १० होडिया. १५० लहान होडिया. ६० तारवें. २५ माल. १५ जूग. ५० मचवे " अशीं जहाजें होतीं, असें चित्रगुप्ताच्या बखरींत लिहिलें आहे.

ह्या आरमाराचे सरदार दर्यासागर, इब्राहिमखान, व मायनाक भंडारी हे होते. त्याशिवाय नेताजी पालकर, मोरोपंत पिंगळे, आण्णाजीदत्तो, रामदळवी, तानाजी सावंत, रघुनाथ बल्लाळ हे सरदारही आरमारावर लहान मोठे अधिकारी होते.

महाराजांच्या कारकीर्दीमध्यें बहुतेक कोंकणपट्टी महाराजांनीं जिंकून घेतली होती. परंतु एकटा जंजिऱ्याचा शिद्दी मात्र कमजोर झाला नाहीं. त्यास जिंकण्याचा महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीनें बेत केला. यावेळीं दादजी रघुनाथ देशपांडे यांजकडे आरमाराचें आधिपत्य देऊन जंजिऱ्यावर रवाना केलें व स्वतः संभाजीमहाराजही भरपूर सैन्यासह गेले. यावेळीं मराठ्यांनीं शिकस्त केली; परंतु त्यांस जय संपादितां आला नाहीं. ह्या स्वारीमध्यें, शिद्दी मिस्त्री, दौलतखान, मायनाक भंडारी, संताजी पवळा, गोविंदजी जाधव, गोविंद कान्हो वगैरे आरमारी सरदार होते व त्यांनीं लढण्याची पराकाष्ठा केली; पण त्यांस यश आलें नाहीं. यानंतर राजारामाच्या कारकीर्दीमध्यें मात्र ह्या मराठ्यांच्या आरमारानें आपलें रौद्र स्वरूप प्रगट केलें. राजारामाची कारकीर्द म्हणजे मराठ्यांच्या पराक्रमाची, स्वामिनिष्ठेची व अद्वितीय धैर्याची एक परीक्षाच होय ! ती परीक्षा ज्याप्रमाणें खुष्कीवर धनाजी जाधव, संताजी घोरपडे वगैरे वीरांनीं आपल्या मर्दुमकीनें दिली, त्याचप्रमाणें दर्यावर्दीयुद्धामध्यें मराठ्यांचें आरमार किती श्रेष्ठ आहे, ह्याची परीक्षा त्यावेळचे कान्होजी आंग्रे यांनीं दिली. कान्होजी आंग्रे हे शिवाजी महाराजांच्या वेळच्या आरमारावर प्रसिद्धीस आलेल्या तुकोजी आंग्र्याचा पुत्र होता. तो संभाजीच्या कारकीर्दीमध्यें आरमाराचे सुभेदार सिधोजी गुजर यांच्या हाताखालीं दुय्यम सेनापति होता. त्यानें इंग्रज, वलंदे व फिरंगी यांची सत्ता उखडून टाकण्याचा जो अवर्णनीय असा प्रयत्न केला, त्यामुळें राजाराम महाराजांनीं कान्होजीस आरमाराचा सेनापति केलें व त्यास सरखेल असा किताब दिला. ह्या कान्होजीनें मराठ्यांच्या आरमाराची उत्तम प्रकारची सुधारणा केली व तें खंबीर बनविलें. त्याच्या आरमाराची सर्व शत्रूंस भीति वाटूं लागली. इंग्रज लोक तर यास दुसरा

शिवाजीच असें म्हणत असत; यानें शिद्यास जर्जर करून सोडलें व तो वसूलही द्यावयास तयार झाला. शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीपासून राजारामाच्या कारकीर्दीपर्यंत ज्या शिद्याची रग जिरविण्याचा प्रयत्न चालविला होता, तो कान्होजी आंग्र्यानें शेवटास नेला. यावरून त्याचें प्राबल्य किती होतें, तें दिसून येत आहे. यानें परकीय राष्ट्रांतील लोकांबरोबर समुद्रामध्यें अनेक युद्धें केलीं; व अनेक जहाजें पाडाव करून आणिलीं. हा सन १७२९ त मृत्यु पावला. ह्याच्या मृत्यूनंतर त्याचा वडील पुत्र सेखोजी हा आरमाराचा अधिपति झाला. त्यास शाहू महाराजांनीं सरदारकीचीं वस्त्रें दिलीं; पण ह्या आंग्र्यांच्या कुटुंबामध्यें लवकरच विघाड उत्पन्न झाला. कान्होजीस सेखोजी व संभाजी हे औरस पुत्र असून मानाजी व तुळाजी, धोंडुजी आणि येसाजी असे राखेचे मुलगे होते. त्यांच्यामध्यें वैमनस्यें सुरू झालीं. तरी तीं सेखोजीच्या मृत्यूपर्यंत विकोपास गेलीं नाहींत. सेखोजी हा फारच दिलदार माणूस होता. त्यानें आपल्या कारकीर्दीमध्यें जंजिऱ्याच्या शिद्दीस मारून त्याची सत्ता संपुष्टांत आणिली. सेखोजी सन १७३३ त वारला. त्याबरोबर यांच्या गृहकलहानें उचल खाल्ली. सेखोजीच्या पश्चात् संभाजी हा आंग्र्याच्या सरदारीचा अधिपति झाला व त्यानें मानाजीस कुलाब्याच्या आरमाराचें काम सांगितलें; पण त्यानें मानाजी तृप्त झाला नाहीं. त्यानें पेशवे व शाहू यांजकडे संधान बांधून सरखेलचीं वस्त्रें मिळविली. त्यामुळें ह्या कलहानें भयंकर रूप धारण केलें. ते आपसांत लढूं लागले, त्यामुळें बाजीराव पेशव्यांनीं इ० स० १७३५ त संभाजीस सरखेल हा किताब व सुवर्णदुर्ग आणि मानाजीस वजारतमाब हा किताब व कुलाबा देऊन दोघांस खूप करण्याचा प्रयत्न केला; परंतु तो सिद्धीस केला नाहीं. त्यानंतर ह्या कलहाग्नीस शांत करण्याचा प्रयत्न पेशव्यांकडून मुळींच झाला नाहीं. उलट पेशव्यांनीं नवीनच आरमार तयार करून आंग्र्याचा मुलूख घेण्याचा क्रम आरंभिला.

संभाजीही कमी शूर होता असें नाहीं. त्यानें आपल्या आरमाराच्या जोरावर दाभोळ व सावंतवाडी ह्या प्रांतांवर आपली सत्ता स्थापित केली होती. हा इ० स० १७४२ त मरण पावला. त्याच्या मागून त्याचा भाऊ तुळाजी हा अधिपति झाला. त्यानें इंग्रजांस अतिशय त्रास दिला व पेशवेही त्याचे हाडवैरी बनले. इंग्रज व पेशवे यांनीं मिळून इ० स० १७५६ मध्यें विजयदुर्गावर स्वारी करून त्याच्या आरमाराचा नाश केला व इ० स० १७५६ त त्यास कैद केलें आणि आंग्र्याची समुद्रावरील सत्ता नाहींशी केली. त्यानें विजयदुर्गास आपल्या आरमाराचें ठाणें केलें. मानाजी हा पेशव्यांच्या तंत्रानें वागत असल्यामुळें कुलाबा त्याजकडे राहिला. तो इ० स० १७५९ त वारला. त्याच्या मागून त्याचा वडील मुलगा राघोजी हा अधिकारी झाला, परंतु यापुढें त्याची सत्ता नामधाऱ्याप्रमाणेंच राहिली.

## पेशव्यांचें आरमार.

पेशव्यांनीं ह्याप्रमाणें आंग्र्यांचा बीमोड करून स्वतःच्या स्वार्थासाठीं जो खटाटोप केला, तो पाहिला म्हणजे आपणास आश्चर्य वाटल्यावांचून रहावयाचें नाहीं. सदर आरमारावर मराठी साम्राज्याची जी जरब होती, ती निघून जातांच, आंग्रे कांहींसे स्वतंत्रपणें वागूं लागले असावेत. परंतु त्यांस ताळ्यावर आणण्याचें काम पेशव्यांनीं केलें असतें, तर किती तरी फायदा झाला असता. परंतु तसें न करितां चालत्या गाड्यास खीळ घालण्याचा मोठा उद्योग पेशव्यांनीं केला तो शहाणपणाचा होता असें आम्हांस तरी वाटत नाहीं. यांत पेशव्यांचा स्वार्थ ह्मणजे स्वसत्तेखालीं तें आरमार असावें असाच होता आणि तो त्यांनीं तुळाजी आंग्र्यासारख्या प्रबल सरदारास कैद करून त्याच्या आरमाराची ह्मणजे परंपरेनें मराठा साम्राज्याची लाखों रुपयांची नुकसानी केली व ह्या स्वार्थापायीं, इंग्रजांस आंग्र्यांच्यासमोर लढण्यासाठीं आपल्या जोडीस घेऊन त्यांचा लाखों रुपयांचा फायदा करून दिला. ह्यापासून पेशव्यांनीं काय मिळविलें असावें तें त्यांचें त्यांसच माहीत. ह्मणूनच आम्हीं ह्या आरमाराचे मराठ्यांचे व पेशव्यांचे असे दोन भाग केले आहेत. असो.—

पेशव्यांनीं उभारलेल्या आरमारावर एक मुख्य अधिकारी असे. त्यास सुभेदार निसबत सुभा आरमार असें म्हणत. ह्या सुभ्याच्या जागीं आरंभीं बाजीराव

बेकसे ह्या नांवाचा प्रथमारंभीं एक सुभेदार नेमिला होता. तो इ. स. १७४९ मध्यें निवर्तल्यावर त्याचा पुत्र त्रिंबकराव हा सुभेदार झाला. पुढें इ. स. १७५६ मध्यें पेशव्यांनीं विजयदुर्गास स्वतंत्र आरमार केल्या-नंतर प्रथम कोण सुभेदार होता त्याचा नामनिर्देश इतिहासामध्यें नाहीं; परंतु ह्या वेळेस अगर नारो त्रिं-बकच्या नंतर आनंदराव धुळपांचे वडील रुद्राजीराव हे ह्या आरमाराचे सुभे असावेत असें वाटतें. कारण आनंदराव धुळपांस पेशव्यांनीं लिहिलेल्या एका पत्रांत ह्यासंबंधीं उल्लेख केलेला आहे. १७६० सालीं नारो त्रिंबक हा सुभेदार होता. इ. स. १७६४ पासून ह्या मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य 'आनंदराव धुळप' ह्या शूर पुरुषाकडे आलें. आनंदराव धुळप हे दर्यावर्दीयुद्धांमध्यें अत्यंत नाणावलेले असे होते. यांनीं व त्यांच्या दुसऱ्या भाऊबंदांनीं ह्या आरमारास बऱ्याच योग्यतेस चढविलें. आंग्रे यांच्या मागें पेशव्यांनीं स्थापन केलेल्या ह्या स्वतंत्र आरमारास 'धुळपांनींच' योग्यतेस चढविलें व त्याची बोलवाला केली. धुळपांचें सर्व कुटुंबच ह्या आरमारास वाहिलेले होतें, असें म्हटलें असतां अति-शयोक्ति होणार नाहीं. आनंदराव धुळप, हरबाजी-राव धुळप, जानोजीराव धुळप, भगवंतराव धुळप, कृष्णाजी धुळप, अप्पाजी धुळप इत्यादि धुळप मंड ळीनें मराठा साम्राज्याची अवर्णनीय सेवा केलेली आहे व त्यांस त्या त्यांच्या सेवेप्रीत्यर्थ पेशवे सर-कारांतून सरंजाम, व तैनाती व बक्षिसें मिळत होतीं. आनंदराव धुळप यांची तैनात सालिना १२०० रुपयां-पासून ४००० पर्यंत वाढली होती. त्याखेरीज इतर त्यांच्या नातेवाइकांस व बंधुवर्गास पांच सहा हजारां-पर्यंत तैनाती होत्या. त्याशिवाय जो अवर्णनीय शौर्याचीं कामें करी त्यास पालखीचा सन्मान व निराळा सरंजाम मिळत असे. आनंदराव, हरबाजीराव व लक्ष्मणराव यांस पेशव्यांकडून पालख्या मिळून वस्त्रालंकार व अनेक बक्षिसें मिळालीं होतीं. धुळपांप्रमाणेंच विचारे, सुर्वे, कुवेसकर, जावकर हे आरमारी सरदारही बरेच पराक्रमी होते. त्यांसही तैनाती नेमून दिलेल्या असत.

आनंदराव धुळपांसंबंधानें माहिती देतांना रा. रा. पारसनीस हे आपल्या 'मराठ्यांचें *आरमार' ह्या पुस्तकांत म्हणतात." आरमाराच्या सुभेदाराचें मुख्य कर्तव्य म्हणजे आरमारची मरामत उत्तम ठेवून, भालें, गुराबा व गलबतें, लढाईच्या मसलतीस सदोदित तयार ठेवणें, व नवीन गलबतांची लागवड करून आरमाराचा कारखाना सुरक्षित चालविणें. लढाईची मसलद नमूद झाली तर शत्रूंच्या जहाजावर चालून जाऊन शौर्य पराक्रम करणें आणि पैदासी पुष्कळ मिळविणें. अशा रीतीनें सरकार चाकरी करून मरा-ठ्यांचा नक्ष राखणें. हें कर्तव्य मराठ्यांच्या आरमाराचे सुभेदार आनंदराव धुळप ह्यांनीं किती उत्तमप्रकारें बजाविलें, हें त्यांच्या शौर्याचे जे पोवाडे महाराष्ट्रांत अद्यापि प्रसिद्ध आहेत, त्यांवरून श्रुतच आहे.' ह्या पारसनिसांच्या उद्गारांवरून त्यावेळची आनंदरावांची दर्यायुद्धामधील कामगिरी किंती महत्त्वाची असली पाहिजे तें उघड दिसत आहे; परंतु दुर्दैवाची गोष्ट कीं, कागदपत्रांच्या अभावीं त्यावेळची त्यांची कामगिरी मुळींच उपलब्ध नाहीं. नाहीं म्हणावयास आनंदरा-वांनीं इंग्रजांबरोबरील युद्धांत जय मिळवून जो विजय संपादन केला त्यावेळच्या कामगिरीबद्दल पेशव्यांनीं आनंदरावांस लिहिलेलीं कांहीं पत्रें उपलब्ध झालेलीं आहेत. तीं पत्रें याखालीं देत आहों. त्या पत्रांवरून आनंदराव किती कर्ते व मर्द माणूस होते, व पेश-व्यांचा त्यांजवर किती विश्वास होता हें दिसून येईल.

श्री० आनंदराव धुळप यांस श्री० माधवराव नारायण प्रधान. पेशव्यांनीं एक पत्र † लिहिलेलें उप-लब्ध झालें आहे. त्या पत्रामध्यें आनंदराव यांस राघोजी आंगरे यांजबरोबर मिळून मुंबईवर स्वारी करून मुंबई लुटण्यासंबंधानें हुकूम केलेला आहे. हें पत्र शके १६९६ मार्गशीर्ष वा ७ ता० ११-१२ १७७४ चें आहे. तें येणेंप्रमाणें.

* आरमारविषयक हकीकत लिहितांना आम्हास रा० रा० पारसनीस यांच्या मराठ्यांचें आरमार ह्या पुस्तकाची बरीच मदत झालेली आहे, ह्याबद्दल आम्ही रा० पारसनीस यांचे अत्यंत आभारी आहोत.

† हें पत्र भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालामध्यें रा० पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे.

श्री.




## राजश्री आनंदराव धुळप गोसावी यांस,

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद. सुहूर सन खमस सबैन मया व अलफ. तुम्ही आरमार घेऊन रेवदंडीयाचे बाऱ्यावर आलेत म्हणून राजश्री आनंदराव राम याणीं लिहिलें त्यास तुम्ही येतेसमयीं सो × × × × मार आणिलेंच असेल; कदाचित् सुवर्णदुर्गचे आरमार आलें नसलें तरी एक माहागिरी पाठवून सुवर्णदुर्गचें आरमार आणवणें. येथून ही × × जाऊन बसलेच आहेत. आरमार सिद्ध आहे. सत्वरच येऊन पोहोंचेल तेक्षणीं सरकारचें सारें आरमार सुद्धां राजश्री राघोजी आंगरे वजारत माहासरखेल यांजकडे जाऊन ते व तुम्ही एकत्र होऊन मुंबईचे शहरांत जाऊन शहर लुटून फस्त करणें. लूट लोकांस माफ केली आहे, एविसीं सरखेल यासही पत्र लिहिलें असे; तरी हें काम आधीं करून मग वसईकडून येऊन टापूंत उतरून साष्टीस इंगरेज बसला आहे, त्याचें पारपत्य करणें. हुजुरून फौज गाडदी व हशमी लोक रवाना जाहले आहेत हे व तुम्ही एक विचारें काम (कर) णें. परस्परें संकेत करून एक लगट हला केल्यास शत्रूचा पराभव होईल यांत संशय नाहीं. यासमयीं मेहनत करून साहेब चाकरी करून दाखवावयाचे दिवस हेच आहेत. शत्रूचें पारिपत्य करावयाचा असा समय दुसरा नाहीं. या गोष्टी तुम्ही जाणतच आहां. जाणीजे छ० १७ सवाल बहुत काय लिहिणें.*




ह्या पत्रावरून इंग्रज व पेशवे यांचें बिनसलें असून उभयतांमध्यें उघड वैर उपस्थित झालेलें होतें; तें वैर बरींच वर्षें सुरू असावें असें दिसून येत. यानंतर आनंदराव धुळपांची व इंग्रजांची जी लढाई झालेली आहे, तीबद्दलचीं दोन पत्रें या खालीं दिलीं आहेत. हें युद्ध इ० स० १७८३ मध्यें झालेलें आहे.

इ० स० १७८२।८३ मध्यें इंग्रजांचें हैदराबरोबर युद्ध चालू होतें, त्यावेळीं त्या युद्धांतील मुख्य सेनापति ब्रिगेडियर जनरल म्याक्लौड व इतर अधिकारी हे पुष्कळशा युद्धसामुग्रीसह बेदनुराकडे 'रेंजर' नामक लढाऊ जहाजांतून चालले होते. मराठ्यांचा व इंग्रजांचा तह झालेला नव्हता, त्यामुळें त्यांच्या आरमारानें तें जहाज पुढें जाऊं दिलें नाहीं. त्यावेळीं त्या जहाजावर मुख्य सेनापति ले० ब्रूएन या नांवाचा एक ताज्या दमाचा इसम होता. तो लढाईस तावडतोब प्रवृत्त झाला. ही लढाई मोठी रसाकसीची झाली. तींत मराठ्यांच्या आरमारानें इंग्रज योद्धयांस आपल्या आरमाराची चांगली करामत दाखविली व त्यांचे योद्धे व जहाज पाडाव करून विजयदुर्गांत नेलें. त्या प्रसंगीं मराठ्यांनीं किती बहादुरी दर्शविली आहे, हें खालील पत्रावरून चांगलेंच निदर्शनास येईल.

'राजश्री आनंदराव धुळप सुभेदार आरमार जंजिरे विजयदुर्ग गोसावी यांसीः—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने० माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद उपरी

---

* हें पत्र भारत इ० सं० मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालामध्यें प्रसिद्ध झालेलें आहे.

येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत गेलें पाहिजे विशेष. तुम्ही छ० ९ जमादिलावलचें पत्र पाठविलें, त्यांत लिहिलें कीं, इंग्रजी तरांडीं, शिबाडें दोन, दीड घोशी बताले व तीन घोशी अरमारें जंगी दारूगोळ्यानिशीं ऐशीं हजार चापाची बंदूक, चारशें गोरा गोलंदाज व सात कौंसलदार असे विलायतेहून हैदर नाईक याचे मुलखाचे बंदोबस्ताकरितां जळमार्गें जात होते, त्यांची आमची रत्नागिरीचे मुक्कामीं छ० १ जमादिलावल सकाळचे प्रहर दिवसास गांठ पडली, आणि लढाई तोफखाना सुरू झाला. ते सायंकाळचे प्रहर दिवसापर्यंत मारामारी तोफांची चालली असतां, तरांडीं शिकस्त होत नाहींत असें समजून, सर्व लोकांचा एकजीव करून, धन्याचे पायांचें स्मरण करून, बेशक त्यांचे व आमचे तरांडयांची अडावणी केली. हातास हात मिळाल्यावर कोण कोणास मारितो अशी शुद्धि राहिली नाहीं. याप्रमाणें एक प्रहर गर्दी झाली. धन्याचें पुण्य समर्थ; तरांडीं शिकस्त केलीं. त्या गर्दींत आम्हांकडील मोठे माणस आठ असामी सरदार ठार झाले व जखमी पंधराशें असामी व नऊशें असामी आडहत्यारी व बरकंदाज ठार झाले. इंग्रजांकडील दोन हजार असामी व सांखा असामी एक ठार झाला. जखमी पांच सहाशें असामी झाले. सर्व आरमार व कौंसलदारसुद्धां जंजिरे मजकुरीं कैदी करून ठेविले आहेत. सर्फराजी करणार धनी आहेत. म्हणून विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसियास आंग्रे यांचा मुलूख आमचे वडिलांनीं घेतला, तेसमयीं तुमचे वडिलांची अठरा टोपीकरांवर सलाबत आहे, सबब, तुमचे वडिलांस ठेविलें; त्याप्रमाणें हल्लीं तुमची सलाबत पाहून वडिलांनीं तुमचें पालग्रहण केलें, त्याचें सार्थक करून दाखविलें. इंग्रज आपणांस शिपाई म्हणवितो; आणि खासे गोरे वर असतां व त्यांचीं आरमारें मोठीं असून तुम्ही प्राणांची आशा न धरितां, बेशक त्यांचे गळां जाऊन पडलां. शाबास, शाबास तुमची व तुमचे लोकांची! महाराज चाकरीस अशीं मोठ मोठीं तुम्ही कामें करण्याची उमेद धरितां, त्यांतच तुमचें स्वरूप आहे. आठ असामी सरदार ठार झाले, त्यांच्या पुत्रांच्या नांवें असाम्या होऊन जाजती तैनाती केल्या जातील. ज्यांस पुत्र नसतील त्यांस दत्तक पुत्र देऊन सरदारी चालती केली जाईल. किरकोळ लोकांच्या पुत्रांच्या असाम्या चालत्या कराव्या. ज्यांस पुत्र नसतील त्यांच्या बालपर्वेशा चालविल्या जातील. तुमचे मर्जीनें बक्षिस काय द्यावयाचें जरूर असेल ती यादी करून पाठविणें. समजून घेऊन चौकशीनें आज्ञा होईल. आम्हांकडील लोक जखमी झाले आहेत. त्यांचा बंदोबस्त जातीनें करून, खर्च लागेल तो करून बरें काय तें करणें. इंग्रजांकडील लोकांचा बंदोबस्त जुजबी करावा. तुम्हांस बहुमानाचा पोशाख खासगी कडील व शिरपेंच, मोत्यांची कंठी व कडीं पाठविलीं आहेत, हीं घेणें. इंग्रजांकडील वकील येऊन दाखल झाला आहे, त्याचा तहनामा तुमच्या विचारें केला जाईल. तुम्हीं हें काम मोठें केल्यावरून सरकारची मर्जी फार खुष होऊन, सरकार दौलतींत तुम्ही मालक आहां असें समजून संतोष झाला. रवाना छ. १३ जमादिलावल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. ( मोर्तब. ) ''

ह्या लढाईचेंच दुसरें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तेंही ह्या ठिकाणीं दिलें आहे. हीं दोन्हीं पत्रें एकाच

लढाईचीं असून वेगवेगळ्या वेळीं रवाना केलेलीं आहेत. हीं पत्रें श्री० बाबासाहेब धुळप यांच्या दफतरीं आहे.

श्री.

राजश्री आनंदराव धुळप गोसावी यांसीं:-

७ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

स्नो. माधवराव नारायण प्रधान आशिरवाद सुा सलास समानीन मया व अलफ. तुम्हीं छ० ५ जमादिलावलचे विनंतीपत्र पाठविलें, तें प्रविष्ट जाहलें. आरमाराची तयारी करून सर्व लढाऊ गलबतें वगैरे घेऊन मनुष्यासुद्धां निघोन स्वारीस गेलों. बारा भावरीया न करितां गोव्यापासून रत्नागिरीचे सुमारें बाहेर फिरत असतां छ० १ जमादिलावल इंग्रजी लढाई दुधोशी बोट एक व बतेला एक व शीवडा तीन असे पांच दागिन जंगी सरंजाम दारुगोळा व गाडद भरून मेकलोर जनरल व आणखी सात कपितान पालखीवाले कर्नाटकांत हैदरखान यांजकडील प्रांत सोडवीला त्याच्या बंदोबस्तास मुंबईहून जात होते; त्यांची गांठ रत्नागिरी नजीक पडोन प्रातःकाळचे प्रहर दिवसापासून त्यांची आमची लढाई सुरू होऊन परस्पर तोफांची मारागिरी फार जाहली व बरकंदाजीची मारागिरी केली संध्याकाळच्या प्रहरदिवसापर्यंत लढाई होत असतां आयास न ये. त्याचा लढाईचा जोम भारी. मारागिरीनें तरांडे पाडाव होत नाहीं, असें जाणोन सर्व लोकांचा एक जथ करून धन्याचे पायांचे स्मरण करून तरांड्यास आडावणी केली, ते समयीं रजेगरी व बरकंदाजीची मारागिरीची सीमाच केली. सरकारचे बरे माणूस आठ असामी ठार जाहले. तरांड्यावर पाय न लागे तेव्हां वरकड लोकांस इरी पडोन तरांड्यावर चढले. त्या गर्दीत पाऊणशें माणूस जखमी जाहलें. हत्यारांस हत्यारें मिळाल्यावर त्याजकडील एक कपितान व पंचवीस असामी ठार जाहले. तरांडे पाडाव केले असतां, बतेल्यावरील लोक कौल न घेतां बतेला लढविला. त्याजवर मारागिरी करून अडावणीस धरून पाडाव केला. मातबर लढाई होऊन पांचही दागिने पाडाव करून बंदरांत आलों. खासा जनरलास तीन जखमा आहेत व वरकडही लोक जखमी आहेत. तीस पसतीस गोरे वगैरे लोक चारशेंपर्यंत माणूस होईल. त्याचें वर्तमान जबानी मनास आणितां, विलायतेहून कर्नाटकप्रांतींचा मुलकी व फौजचा बंदोबस्त अकत्यारीनें सांगोन रवाना जाहला. त्याजबरोबर कोंशलदार घेऊन मुंबईहून जात होता, याप्रमाणें सांगतात. खासा याचें बोलणें मी आपला विचार असा जाला, हें वर्तमान मुंबईस कळावें, याजकरितां आमचें पत्र जाईसें करावें. आरमारकरी लोक जखमी आहेत. त्यांत भारी जखमा आहेत, ते वांचतां कठीण आहेत. सारांश लोकांनीं प्राणाची आस्था न धरितां, टोपीकरांचे लढवई तरांड्याची अडावणी केली. सर्फराजी करणार धनी आहेत म्हणोन विस्तारें लिहिलें, तें विदित जाहलें. ऐशास तुम्ही आरमारसुद्धां स्वारीस जाऊन इंग्रजी लढवई तरांड्याची गांठ घालून खासा जनराल व गाडदी लोक वरते असतां, त्यांचे गळां पडोन, बेमार लढाई देऊन, जनरल व सात कपितान कोंसलदार वगैरे तरांड्यावर असतां, बेलासक तरांड्याची अडावणी करून, टोपीकरांचा दारूचा मार भारी, तितका सोसून, जनराल व कपितानसुद्धां तरांडे पाडाव करून आणिले. शाबास तुमची व लोकांची ! इंग्रेजही आपल्यास शिपाई

म्हणवितो. त्यापेक्षां सरकारचे लोकांनीं मर्दुमी फार चांगली केली, मोठेंच काम केलें. त्यासही तुमचा हात पुरता समजला. तुमचे वडिलांपासून टोपीकरांवर तुमची सलाबत होती व आहे, त्याप्रमाणें तुम्हीं त्यांजवर आपली सलाबत बसविली, फार संतोष जाहला. तुम्हीं एकनिष्ठ साहेबचाकरीस तत्पर आहां, त्यास मोठीं मोठीं कामें करावयाची उमेद धरितां, यांतच तुमचें स्वरूप. चाकरी करून अधिकोत्तर धन्यापासून बरें म्हणोन घ्यावें. मोठें काम करून दाखवाल निशा आहे. सरकारचे आठ असामी सरदार ठार जाहले आणि त्यांनीं साहेबचाकरी केली. चाकरीचा शेवट केला. सरकारकामास आले. त्यांचे मागें त्यांचे मुलांचेंही चालविलें जाईल. जखमी लोक आहेत. त्यांची बरदास्त चांगली करून लौकर बरे होत तें करणें. जखमांस वगैरे खर्च लागेल तो चौकशीनें लावून निगादास्त चांगली करणें. इंग्रजांकडील जखमी असतील त्यांस कार्याकारण खर्चास लागेल तो लावणें. तुम्हीं चाकरी चांगली केली सबब तुम्हांस बहुमान खासगीचा पोशाख व कंठी पाठविली आहे. घेणें. लोकांनीं मर्दुमी केली त्यास बक्षिस द्यावयाचें; सबब कोणास बक्षिस काय द्यावयाचें, याची जरुरती तुमचे विचारें असेल त्याची याद नांवनिशीवार आकारून पाठविणें. समजोन बक्षिस देवविलें जाईल. त्याचा कागद मुंबईस जाऊन द्यावयाचा नाहीं. जाणिजे छ २२ जमादिलावल. बहुत काय लिहिणें.

## पत्रांसंबंधीं स्पष्टीकरण

भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालामध्यें रा० रा० पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं "विजयदुर्गचे धुळप" ह्या सदराखालीं धुळप घराण्याची जी माहिती दिलेली आहे, ती विसंगत असून विश्वास ठेवण्यालायक नाहीं. त्यांनीं सदर माहिती लिहितेवेळीं आपल्या जवळच्या साधनांचा विचारपूर्वक उपयोग केलेला दिसून येत नाहीं. चंद्रराव मोऱ्यापासून नवव्या पिढींत श्री शिवाजी महाराजांनीं मोऱ्यांस मारून त्यांचें जावळीचें राज्य घेतलें असावें, अशाबद्दल आम्हीं श्री० बाबासाहेब धुळप यांच्या वंशावळीच्या आधारें दाखविलें आहे. मग रा० पटवर्धन यांनीं जर हा अहवाल श्री० बाबासाहेब धुळप यांच्या जवळीलच साधनावरून लिहिला आहे, तर मग त्यांच्या व आमच्या अहवालामध्यें फरक कां असावा? आजपर्यंत ग्रँट डफ इत्यादि इतिहासकारांनीं चंद्रराव मोऱ्यांच्या कारकीर्दीसंबंधानें ज्या चुका केलेल्या आहेत, त्यांहूनही रा० पटवर्धन यांनीं बरीच मोठी घोडचूक केलेली आहे. त्यांनीं धुळप घराण्याची हकीकत देतेवेळीं मोरे घराण्याची जी पूर्वपीठिका दिलेली आहे, ती विचारपूर्वक दिलेली नाहीं. मोऱ्यांचा जावळी काबीज करण्याचा काळ पंधराव्या शतकाच्या आरंभीचा आहे. असें निश्चयपूर्वक मानण्यास हरकत नाहीं. कारण युसुफ आदिलशहाच्या कारकीर्दीचा जो काळ तोच चंद्रराव मोऱ्यांचा जावळी काबीज करण्याचा काल होय. ह्याकाळीं म्हणजे इ० स० च्या पंधराव्या शतकाच्या आरंभीं मोरे जावळीस आले. जे मोरे जावळीस आले ते परसोजी बाजिराव व जयाजी बाजीराव हे होत. ह्या दोघां बंधूंनीं जावळी प्रांत काबीज केलेला होता. पैकीं जयाजीचा वंशच नव्हता व परसोजीस पांच पुत्र होते. ह्या पांच बंधूंच्या कारकीर्दीमध्येंच त्यांस ' राय ' ही पदवी मिळालेली आहे. त्या ' राय ' पदवीचा अपभ्रंश होऊन ' राव ' ही पदवी प्रचारांत आली व त्या राव पदवीची ' चंद्रराव ' ही पदवी बनली. ह्या चंद्ररावाचा कालही युसुफ आदिलशहाच्या वेळचा आहे. तेव्हां पहिल्या पिढीच्या कारकीर्दीमध्यें श्री० शिवाजी महाराजांचें आस्तित्वच मुळीं नव्हतें, मग ते त्यांस मारून त्यांचें राज्य कसें घेणार? जावळी इ० स० १६५६ मध्यें काबीज केलेली आहे. तेव्हां ह्या मध्यंतरींच्या १५०।१६० वर्षांची वाट काय? यावरून रा० पटवर्धन यांनीं पहिल्याच

पिढीमध्यें जावळीचें राज्य शिवाजीमहाराजांनीं घेतलें, असें जें विधान केलें आहे, तें चुकीचें आहे. तसेंच मोऱ्यांचें जावळीचें राज्य घेतल्यानंतर ' मोरे घराण्यांतील मंडळी विजापूरकरांच्या आश्रयास जाऊन राहिल्याचें व तेथें बादशहाकडून ' धुळप ' असा किताब मिळाल्याचेंही जें विधान केलें आहे, तेंही चुकीचें आहे. मोऱ्यांचें जावळीचें राज्य नाहींसें होतांच मोरे विजापुरीं मुळींच गेले नाहींत. कांहीं वर्षांनीं स्थिरस्थावर झाल्यानंतर ही मंडळी स्वराज्याच्या उपयोगी पडलेली आहे. हें आमच्या जवळ असलेल्या मोरे ऊर्फ धुळप घराण्याच्या दोनही वंशावळींवरून आम्हीं सिद्ध केलेलें आहे. ह्या दोन वंशावळींपैकीं श्री० बाबासाहेब धुळप यांजकडून जी अस्सल वंशावळीची नक्कल आली आहे, तीपेक्षां रा० रा० व्यंकटराव सूर्याजीराव धुळप यांजकडील अस्सल नकलेवरून आम्हीं स्वतः नक्कल करून आणलेल्या वंशावळीवरून, मोऱ्यांचें राज्य नवव्या पिढीमध्यें गेलें हें सप्रमाणसिद्ध होत आहे. तसेंच त्या वंशाळीमध्यें ध्रुवमंडळास गेल्यानंतर धुळप हें आडनांव स्वीकारल्याबद्दल जें दर्शविलें आहे, तेंही विश्वास ठेवण्यासारखें आहे. कारण हरबाजीराव धुळप यांस एका पवाड्यामध्यें " ध्रुव " असें म्हटलें आहे. त्यावरून " ध्रुव " ह्या शब्दावरूनच हे धुळप म्हणवूं लागले असावेत. याखेरीज रा० पटवर्धन यांनीं धुळप घराण्याचीं जीं चार पत्रें संपादन केलेलीं आहेत. तींही आम्ही आजच्या कैफियतीमध्यें दिलेलीं आहेत. हीं पत्रें मौल्यवान् आहेत यांत मुळींच संशय नाहीं. ह्या चार पत्रांपैकीं चवथ्या पत्राची व रा० पारसनीस यांनीं विविधज्ञानविस्तारामधील छापलेल्या एका पत्राची अस्सल बरहुकूम नक्कल श्री० बाबासाहेब धुळप यांनीं आम्हांस दिलेली आहे. तीं दोन्हीं पत्रें आम्हीं आजच्या कैफियतीमध्यें प्रसिद्ध केलेलीं आहेत. तीं पृष्ट ७८-७९ मध्यें छापलेलीं आहेत. चवथ्या पत्रासंबंधानें थोडा मतभेद आहे. रा. पारसनीस यांनीं विविधज्ञानविस्तारमधील जें पत्र आपल्या ' मराठ्यांचें आरमार ' ह्या पुस्तकांत दिलें आहे, तें पत्र व हें पत्र एकाच लढाईच्या वेळचें आहे. त्यांच्या तारखा मात्र वेगवेगळ्या आहेत. रा० पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलेलें पत्र कीं, ज्याची अस्सल बरहुकूम नक्कल आमच्याजवळ आहे, तें आनंदराव धुळपांनीं ५ जमादिलावल रोजीं लिहिलेलें असून ही लढाई, १ जमादिलावल रोजीं झाल्याचें त्यांत ध्वनित केलें आहे व त्याचें पेशव्यांकडून १३ जमादिलावल रोजीं उत्तर गेलें आहे. व दुसरें श्री० बाबासाहेबांनीं ज्याची नक्कल आम्हांस दिलेली आहे व जें रा० पटवर्धन यांनीं अहवालामध्यें छापिलें आहे तें ७ जमादिलावल रोजीं आनंदरावांनीं लिहिलेलें असून त्याचें उत्तर २२ जमादिलावल रोजीं पेशव्यांनीं दिलेलें आहे. ह्या पत्रासंबंधानें रा० पटवर्धन यांनीं संशय प्रगट केला आहे. त्यांच्या मतें रा० पारसनीस यांच्या पत्रावर विश्वास ठेवण्यालायक तें पत्र नसावें असें वाटतें, परंतु त्यांनीं रा० पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलेलें व आपण प्रसिद्ध केलेलें हीं दोन्हीं पत्रें ताडून पाहिलीं असतीं व जरा विचार केला असता, तर त्यांस या कोड्याचा उलगडा झाला असता. हीं दोन्हीं पत्रें एकाच लढाईबद्दल आहेत. मात्र रा० पारसनीस यांनीं प्रगट केलेलें पत्र आनंदराव धुळपांनीं लढाईनंतर तावडतोब लिहिलेलें आहे. त्यांत सदर लढाईची त्रोटक हकीकत आहे व त्यानंतर दोन दिवसांनीं त्यांनीं दुसरें पत्र विस्तारपूर्वक लिहिलेलें आहे. त्यांत सदर लढाईची साग्र हकीकत वर्णिली आहे. जर ह्यांपैकीं एकच पत्र खरें मानावें तर धुळप यांच्या दफ्तरांत दोन पत्रें कशीं यावीं ? प्रथम पत्र ५ जमादिलावलचें असून त्याचें उत्तर पेशव्यांकडून आनंदराव धुळपांस १३ जमादिलावल रोजीं मिळालें आहे व दुसरें विस्तारपूर्वक लिहिलेलें पत्र ७ जमादिलावलचें असून त्याचें उत्तर पेशव्यांनीं २२ जमादिलावलला लिहिलें आहे. पहिल्या पत्राच्या वेळीं इंग्रजांचा वकील तहनाम्यासाठीं पेशव्यांकडे आलेला होता असें त्यांत लिहिलें आहे. व दुसऱ्या पत्रांत ' सर्फराजी करणार धनी आहेत. म्हणोन विस्तारें लिहिलें ' तसेंच ' त्याचा कागद मुंबईस जाऊन यायचा नाहीं ' असें लिहिलें आहे. यावरून हें दुसरें पत्र सदर लढाईचेंच असून तें सविस्तर हकीकतीचें एकंदर खुलासा काढून फुरसतीनें लिहिलेलें आहे, असें सिद्ध होतें. तसेंच ह्यावेळपर्यंत इंग्रजांशीं पेशव्यांचा तह झालेला

नसावा, हेंहा सिद्ध होत आहे. इतिहाससंशोधकांनीं हीं दोन्हीं पत्रें ताडून पाहणें. नक्कल उतरतेवेळीं तारखांचा घोटाळा झालेला असावा म्हणून रा० पटवर्धन यांचा समज चुकीचा झालेला आहे. असो. यानंतर इंग्रजाबरोबर पेशव्यांचा तह झाल्यानंतरचें एक पत्र आम्हीं याखालीं सादर करित आहों तेंही पहावें.

या लढाईनंतर आनंदराव धुळपांस जें पेशव्यांचें पत्र आलें आहे, त्यांत त्यांनीं कपतान, बोट, बतेले वगैरे सुद्धां सोडून देण्याचा हुकूम केलेला आहे. त्यावरून इंग्रजसरकाराचा व पेशव्यांचा तह झालेला असावा असें दिसून येतें. तें पत्र येणेप्रमाणें.

५१९–७९४

सलास समानीन मया व अलफ जमादिलावल ७.

आनंदराव धुळप, सुभा आरमार विजयदुर्ग, यांचे नांवें सनद कीं, साल मजकुरीं इंग्रजी बोट एक व बतेले, व शिबडीं मिळोन पांच दागिने, जंगी सामान सुद्धां, मेककेर कपितान मुंबईहून घेऊन हेट जात असतां, तुमची व त्याची गांठ पडोन, लढाई होऊन, सदरील तरांडीं कपितान सुद्धां तुम्हीं पाडाव करून आणिलीं आहेत. त्यास हल्लीं सदरील पांच दागिने, सामान सरंजाम व तरांड्यावरील कपितान वगैरे लोक सुद्धां सोडून द्यावयाची आज्ञा केली असे, तरी जराबजरा माल सुद्धां तरांडीं कपितानाचे स्वाधीन करून पोंच घेऊन कपितान वगैरे लोक सुद्धां तरांडीं सोडून देणें म्हणोन.

सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी पृष्ट ६१.

हीं पत्रें पाहतांच आपणास आनंदरावांच्या मर्दुमकीची ओळख पटेल. ह्या धुळपमंडळीनें जे पराक्रम गाजविले आहेत, ते अवर्णनीय असे आहेत. त्यांची मर्दुमकी प्रकाशांत येण्याजोगे आधार मिळाले नाहींत. हें देशाचें दुर्दैव होय ! ज्यांनीं इंग्रज, फिरंगी, फरासीस, हैदर, टिपु, हबशी यांस जर्जर करून सोडलें व त्यांची मातबरी चालूं दिली नाहीं, त्या धुळपमंडळीची खरी कर्तबगारी दृष्टीस पडण्याचा आभावा असावा, हें महाराष्ट्राचें तसेंच मराठयांचें दुर्दैव नव्हे काय ? आनंदराव धुळपांनीं मराठयांच्या आरमारामध्यें ज्या सुधारणा केल्या होत्या, त्या अवर्णनीय अशा होत्या. त्यांनीं नवीन जहाजें तयार करण्याचे, रत्नागिरी, विजयदुर्ग आणि अंजनवेली वगैरे ठिकाणीं कारखाने काढिले होते. तसेंच परकीय राष्ट्रांच्या सुधारलेल्या जहाजांचें अनुकरण करून, योग्य त्या सुधारणा केल्या होत्या. विजयदुर्गास गोदी बांधिली होती. जहाजावर तोफा, अलाण व अवदानें वगैरे चढविण्यास व उतरण्यास महिना महिना वेळ लागत असे, म्हणून टोपीकरांच्या नमुन्याचा "कळासीचा रहाट" इ० स० १७८६ सालीं त्यांनीं तयार केला होता. तसेंच मराठ्यांच्या जहाजावर 'मालमी' म्हणजे दिशा पाहण्याचें होकायंत्र, वालुकायंत्रें व दुर्बीनळ्या म्हणजे दुर्बिणी वगैरेंची व्यवस्था केलेली होती. पूर्वी नुसत्या एक नमुन्याच्याच तोफा असत, परंतु पुढें त्यांनीं गर्नाळी हातगर्नाळा, तोफा व जंबुरे यांची योजना केली व बंदुकीचा उपयोग करून गर्नाळी, गर्भछाटी अशा बंदुकीच्या गोळयाही तयार केल्या होत्या. विद्युत्प्रकाशाचें काम चंद्रज्योतीच्या साह्यानें करीत असत. जहाजांची निशाणें भिन्न भिन्न रंगाचीं असत. जहाजांचे आगमन सुचविण्यासाठीं शिंगे, कर्णे यांचे फुंकणें अगर तोफांची सरबत्ती करीत. अशा प्रकारें त्यावेळीं धुळपांनीं मराठ्यांचें आरमार त्यावेळच्या स्थितीस अनुसरून पूर्ण सुधारलेलें असें केलें होतें. सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत वाघापुर मुक्कामीं, इंग्रजांची व आनंदराव धुळपांची एक लहानशी लढाई झाली. त्या लढाईचें वर्णन भिकुबाळा नांवाच्या कवीनें पोंवाड्याच्या रूपानें पुणें मुक्कामीं केलें आहे. तो पोंवाडा याखालीं देत आहों, त्यावरून आनंदराव धुळपांचें कर्तृत्व दृष्टोत्पत्तीस येईल.

**धोशा धुळपाचा अति आनंदराव रणशूर ।**
**मारिला इंग्रज मुंबई कांपे थरथर ॥ ध्रु० ॥**

१ कीर्ती.

फाल्गून मासीं राव निघाले बाहेर ।
पाल गुलाव[1] त्यांनीं सजवुनियां आरमार ॥
ओढिले नांगर पुढें जायाचा करार ।
राहिलें वारें केला मुक्काम वाघापुर ॥
दुसऱ्या दिवशीं आलें इंग्रजांचें आरमार ।
सत्तावीस मनोरे करोनी वाहे भरपूर ॥
अभिमान भारी इंग्रजांस अहंता फार ।
रामचंद्रांनीं वधिला दशशीर[2] ॥ १ ॥
बाहिर सावध होया आहेत राहत्यारे राज्याची ।
लावली नाळ केली हंकारणी पालाची ॥
जलदी केली भर उमेद लढायाची ।
अडकलें तारूं फिरंगी रयत कोणाची ॥
हिरेहिरे मारून सोई धरिली किनाऱ्याची ।
दया संपूर्ण धुळपावर रामलिंगाची ॥
पुढें शाहुंचा जरीपटका बिनीवर ।
उडविला चांचा त्यानें ओढुनि केलें दीन मोर २
विलायत जंजीरा नवकुलपांचें तारूं ।
शिरीं हात ठेवून पाठविला दक्षण वारू ॥
घेतली गुजराथ वसई केली जेरू ।
लढुनि शिंद्याशीं पाडाव केलें डेरू ॥
कर्पींद्र भारी नऊ पालखीचे सरदारू ।
राव धुळपांनीं त्यांना मारून केलें जेरू ॥ ३
मसलत होती हैदरावर जायाची ।
बोट ओढती सातशें गारदी त्याची ।
रामप्रसाद आहे गुरूब[3] चालीची ।
लक्ष्मण धुळप ऐके न गोष्ट कोणाची ।
सोडिले मचवे लोक चढती काठीवर ।
राव ते मोठे बुद्धिवंत सरदार ।
दांतीं तृणधरुनी उडी टाकिती बाहेर ॥४॥
इंग्रजांला धास्ती नव्हती कधीं काळाची ।
अवचित गांठ पडली आनंदराव धुळपाची ।
नदी वाहसे वाहते हो अशुद्धांची[5] ।
तीन साठ शिरें उडविलीं त्यानें गोऱ्यांचीं ।
अठरा टोप्या त्यानें मारून केल्या जेर ।
घायाळ मुर्दे घुमति रात्र फार ॥ ५ ॥
रत्नागिरीचे कागद पुण्याला गेले ।
रावसाहेब वाचुनि खुशाल झाले ।
सांगे श्रीमंताला धुळपांनीं गांवाचे नक्षे केले
सत्तावीस गोरे धरुनि त्यानें आणिले ।
अट्ठावीस गोरे धरुनि त्यानें कापिले ।
डफ झांज वाजताती चावडीवर ।
पोवाडा केला पुण्यामध्यें बसूनी ।
‡ पोवाडा केला भिक्या बाळा यांनीं ॥६॥

ह्या पोवाड्यारून आनंदराव धुळपांच्या शौर्याची साधारण कल्पना होईल. आनंदराव धुळपांच्या आरमाराचा इंग्रज तसेंच गोंवेंकर फिरंगी यांस जबरदस्त शह बसलेला होता. दर्यामधून मुशाफरी करणें म्हणजे त्यावेळीं तें त्यांस मोठें संकट वाटे. आनंदराव धुळपाच्या आरमाराच्या तावडींतून सुरक्षित निघून गेलों म्हणजे मिळविली, असें त्यांस त्यावेळीं वाटल्यास नवल नाहीं. धुळपाचें आरमार कोणत्याही गलबतास आपल्या तडाक्यामधून सोडून देत नसे. मग तें गलबत इंग्रजांचें अगर फिरंग्यांचें असो. गोंवेंकर फिरंगी यांचा बतेला आनंदरावांच्या आरमारांनीं पकडून नेल्यावरून नारायण विठ्ठल फिरंगी गोंवेंकर यांचे वकील यांनीं पेशवे सरकारामध्यें दाद मागून आपला बतेला मालासुद्धां फरोक्त करण्याबद्दल विनंति केलेली आहे. ह्या विनंतीच्या पूर्वीच फिरंग्याबरोबर, पेशवे सरकारचा स्नेह झालेला असावा. तें पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें:—

५४१–( २७९ )

सीत सबैन मया व अलफ सफर १८

*नारायण विठ्ठल वकील दिमंत फिरंगी गोंवेंकर यांनीं हुजूर विदित केलें कीं, पांडुरंग

१ गलबतांचीं नांवें. २ रावण. ३ पुढें. ४ गलबतांचें नांव. ५ रक्ताची.

‡ इतिहासप्रसिद्ध स्त्रियांचे व पुरुषांचे पोवाडे पृष्ठ १५०.

*सवाईमाधवराव पेशवे यांची रोजनिशी पृ. ७८-७९.

शेणवी दवणकर यांचा बतेला बनामा नारायण प्रसाद साकीन बंदर दवण निसबत फिरंगी गोव्यांहून बतेल्यावर नारळ वगैरे जिन्नस भरून सन अर्बा सबैनांत फिरंगी याचे काफल्याबरोबर दवणेस जात असतां दर्यांत सरकारचे आरमाराची गांठ पडली. तेव्हां बतेला माल सुद्धां धरून जंजिरे विजयदुर्ग येथें धुळपांनीं आणून, खालसा करून माल सुद्धां बतेला फरोक्त केला आहे, तो देविला पाहिजे म्हणोन, त्याजवरून सरकारचा व फिरंगी यांचा स्नेह जाणोन सदरहू बतेला हांकारणीसुद्धां खेरीज माल माघारा द्यावयाचा करून हे सनद सादर केली असे; तरी, बतेला तुम्हीं फरोक्त हांकारणीसुद्धां करून त्यांची किंमत सरकार हिसेबीं जमा धरली आहे. ते बरहुकूम झडती सन अर्बा सबैन. रुपये.

४०० बतेला हांकारणी सुद्धां.
 ४० पावडया नांगर लहान २ एकूण.
 १० जंबुरा लहान एक शेराचा.

---

४५०

एकूण चाडेसारशें रुपये बतेल्यापैकीं तुम्हीं जमा धरले आहेत, ते ज्या सावकारास बतेला फरोक्त दिला आहे, त्यास आरमाराकडून सदरहू रुपये मावारे देऊन त्याजपासून हांकारणीसुद्धां बतेला आणून सरकारची जासुद जोडी पाठविली आहे, त्याचे गुजारणीनें त्यांजकडून माणूस येईल त्याचे स्वाधीन करून, पावलीयाचे कबज देणें, दवणेस बतेला न्यावयाची सोय नाहीं, सबब गोव्यांच्या बंदरीं पावता होय तो करणें म्हणोन, आनंदराव धुळप यांस.

सनद,

रवानगी यादी.

त्याच प्रमाणें गोवेंकरांची एक सरई पाडाव करून आणलेली होती, तीही देण्याबद्दल आनंदरावांस पेशवे सरकारें यांचा हुकूम झालेला आहे। तो हुकूमः—

५४२( २२९ ) सीत सबैन मयाव अलफ
रजब २०

*फिरंगी गोवेकर यांची सरई सरकारांत पाडाव झाली आहे, ती माघारीं द्यावयाचा करार करून हुजरून येशवंतराव सदाशिव कारकून पाठविले आहेत, यांचे गुजारतीनें सरई बंदरांत तरती करून सरईचें सामान जुनें सिडें व कुवें, दारें, नांगर, सुकाणूं, जें असेल तें देणें. जुन्या सामानापैकीं आरमाराकडे सामान खर्च जालें असेल, त्यापैकीं किरकोळ सामान सरई तरती करावयापुरतें देऊन, गोव्यांहून सरई न्यावयास येतील त्यांचे स्वाधीन करून बरोबर आपलीं चार गलबतें देऊन गोव्याचे बाऱ्यावर सरई पोंहचवून फिरंगी याचा जाब आणविणें, आणि हुजूर पाठविणें म्हणोन, आनंदराव धुळप, सुभा आरमार विजयदुर्ग यांस

पत्र,

रवानगी यादी.

पेशवे सरकारच्या आरमाराची इतकी दहशत होती कीं, त्यावेळीं जर कोणाही इतर सरकारास आपलीं जहाजें मुशाफरीस पाठाविणें भाग पडलें, तर त्याबद्दल पेशवे सरकारचा परवाना घ्यावा लागत असे. ह्या प्रकारचा परवाना मार्लीनस ज्वान बस्तान दिमंत वलंदेज साकीन बंदर सुरत ह्यांस पंधरा जहाजांबद्दल दोन वर्षांचा परवाना दिलेला आहे. ह्या दोन-वर्षांत आपल्या आरमाराकडून उपद्रव होणार नाहीं म्हणून अभयवचन दिलेलें आहे. तें पत्र येणेंप्रमाणें:—

५३९—( ३३ ) अर्बा सबैन मया व अलफ
जिल्काद ३०

तुह्मांकडील महंमद अरफ वकील यानें

---

* सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी, पृष्ठ ७८.

हुजूर कसबें पुणें येथील मुकामीं येऊन अर्ज केला कीं, आपलीं जहाजें

सुमार.

१० थोर जहाजें.
३ गुराब.
२ बोटी.

१५

एकूण पंधरा जहाजें अहद बंदर सुरत तहद ताल व काफ [ केप ] कुमारीपासून दर्यामध्यें आमदरफ्ती करतील, त्यास सरकारचे आरमाराचा उपद्रव लागेल, सबब साहेबीं मेहेरबान होऊन सरकारचें अभयपत्र दिल्हें पाहिजे म्हणोन; त्याजवरून तुम्हीं सरकारांत एकनिष्ठ आहां हें जाणोन अर्ज खातरेस आणून सरकारचा नजराणा करार करून हें अभयपत्र सादर केलें असे; तरी सरकार तालुक्याचें बंद राशिवाय आमदरफती करीत जाणें, इस्तक विलसन अर्बा सबैन तागाइत सन खमस सबैन अखेरसालपर्यंत दुसालांत सरकाराचे आरमाराचा उपसर्ग लागणार नाहीं, अभय असे; म्हणोन, मार्तिनस ज्वान बेस्तान निमत वलंदेज साकीन बंदर सुरत यांचे नांवें सदरहू पंधरा जहाजांस छ१जिल्काद १९कौल.

सदरहू कौलाचे अन्वयें सनदापत्रें २

*१ वलंदेज मजकूर याचे नांवें सनद कीं, सदरहू कौलसमंधें तुम्हाकडे सरासरी नजर सालमजकूरापासून दरसाल रुपये ६००० सहाहजार रुपये करार केले असे, तरी करार बमोजीब ऐवज बहिरो रघुनाथ कमाविसदार सरकार शहर सुरत यांजकडे सहाहजार रुपये दरसाल देत जाऊन जाब घेत जाणें म्हणोन. सनद.

१ आनंदराव धुळप सुभा आरमार यास पत्र कीं, दुसाला कौलाप्रमाणें पंधरा जहाजांस उपद्रव लागों न देणें म्हणोन, चिटणिसी पत्र १

२ १७

इस्तक विलसनद लष्कर, व रवानगीयादी-जहाजाचें नांव व तांडेलाचें नांव व जहाजावरील वजन लावून कौल घ्यावयाचा शिरस्ता वसई वगैरे जागा आहे, त्यास सालमजकुरीं येथें वलंदेजाकडील वकील वगैरे कोणी नाहीं, लष्करांतून यार करार होऊन आली, त्या प्रमाणें कौल बहिरो रघुनाथ कमाविसदार प्रांत सुरत यांचे हवालीं करावयाचे, यास्तव सालमजकुरास सदरहूप्रमाणें कौल दिलें आहे.

ह्या वरील पत्रांवरून आनंदरावांच्या कर्तृत्वाबद्दल प्रत्येकाची खात्री होईल.

आपल्या मर्दुमकीनें इंग्रजांसही तोंडांत बोटें घालावयास लावणारा हा ‘ धुळप ’ घराण्यांतील मोहरा इ० स० १७९५ सालीं वारला. आनंदरावांच्या मरणानें मराठ्यांच्या आरमाराचें अत्यंत नुकसान होऊन त्यास निकृष्ट दशा आली.

## रुद्राजीराव धुळप.

आनंदराव धुळप यांचे वडील रुद्राजीराव धुळप हे इ० स० १७६३ मध्यें आरमाराचे सरदार असल्याबद्दल पुरावा मिळत आहे. इ० स० १७६३ मध्यें पेशव्यांनीं हैदरावर जी स्वारी केली, त्या स्वारींत रुद्राजीरावांनीं होनावर बंदरीं अपूर्व कामगिरी केलेली आहे. त्या लढाईचें सविस्तर वृत्त न देतां फक्त धुळपांचा संबंध आला आहे, तेवढाच मजकूर या ठिकाणीं देत आहों.

“ हें पराजयाचें वर्तमान हैदरास कळतांच त्यानें धारवाड प्रांतीं मीर फैजुल्ला होता, त्यास तावडतोब +सोंध्यावर रवाना केलें. त्यानें जातांच देसायास पुन्हां हुसकून लावून प्रांतांत अंमल बसविला. आणि

*स. मा. पे. यांची रोजनिशी पृ. ७६-७७.

+ खरेकृत ए. ले. सं. पृष्ट ७१६.

शिवेश्वर, सदाशिवगड व अंकोला हे किल्ले घेऊन खोलगड नांवाचा एक मजबूत किल्ला होता त्यास वेढा घातला. तेथें निकराचें झुंज होत असतां पेशव्यांच्या आज्ञेवरून त्यांच्या आरमारावरील सरदार रुद्राजीराव धुळप हा दोन तीनशें मचवे व कांहीं मोठमोठीं लढाऊ जहाजें घेऊन होनावरच्या बंदरास आला. त्याजवळ आठ दहा हजार पायदळही होतें. तें जमिनीवर उतरवून त्यानें होनावरचा किल्ला व बंदर व भोंवतालचीं कित्येक ठाणीं काबीज केलीं होनावरच्या बंदरांत हैदराचेंही आरमार होतें. परंतु त्याचा मराठ्यांच्या आरमारापुढें कांहीं यत्न चालला नाहीं. धुळपास बिदनूरकर व सोंधेकर नायमार लोक तत्काल मिळाले. व त्या प्रांतीं त्याची सलावत बसत चालली. व हैदराचा अंमल उठत चालला; अशा विकट प्रसंगीं मीर फैजुल्लास घांटाखालीं ठेवणें अवश्य असतांही हैदरानें त्यास टाकोटाक सर्व फौजेसह बिदनुरास बोलावून नेलें ! तो जातांच सोंधेकरांनीं आपलें सर्व राज्य पुन्हां जिंकून घेतलें. ”

ह्या प्रसंगास खालील पत्रानें बळकट आधार मिळत आहे. तें पत्रही याखालीं देत आहों.

नं. ३९४.

## गोपाळरावास कर्नाटकांतील एका कारकुनाचें पत्र,—

हैदरअली व मीर जुफल्ला यांनीं कित्तूरची खंडणी करून सोंधें प्रांतीं स्वारी केली. वसई विजयदुर्गाहून रुद्राजी धुळप मातबर सरदार दहा पंधरा हजार पायदळ व शिबाडें व गुराबे अशी दोन तीनशें पर्यंत (गलबतें घेऊन) समुद्रांत जलमार्गें जाऊन बिदनुरा नजीक होनावर शहर मातबर मारून ठाणीं घेतलीं. तसेंच दुसरें शहर त्या नजीक तेंही मारून ठाणीं घातलीं. आणिकही फौज जलमार्गें येणार श्रीमंतांची आज्ञा जाहली आहे. खासा हैदर बिदनुरीं आहे. ’

ह्या पत्रावरून रुद्राजीराव धुळप हे आनंदरावांच्या पूर्वीं पेशव्यांच्या आरमाराचे सुभेदार होते. असें सिद्ध होत असून त्यांच्या वेळेपासूनच पेशव्यांच्या अरमाराचा कसा वचक बसला होता, हें स्पष्ट दृग्गोचर पडत आहे.

* खरेकृत. ऐ. ले. संग्रह पृ. ७६७.

## हरबाजीराव धुळप.

आनंदरावांच्याच समकालीन आंग्र्याच्या आरमारावर आनंदरावाचे चुलतबंधु हरबाजीराव धुळप हे सुभेदार होते. हरबाजीराव हेही कमी शूर नव्हते. प्रचलित इतिहासामध्यें आरमारविषयक कामगिरीमध्यें त्यांचें नांव प्रमुखस्थानीं झळकत आहे, परंतु त्यांची स्वतंत्र कामगिरी कळण्याजोगे पुरावे आज आमच्या जवळ नाहींत, याबद्दल आम्हीं दिलगीर आहों. ते साहसी, शूर, वीर व पहिल्या प्रतीचे काटक व दृढनिश्चयी होते. मराठ्यांच्या आंगीं जें स्वाभिमानाचें पाणी वंशपरंपरेनें खेळत आहे तें त्यांच्यांत पूर्णपणें होतें. त्यांच्याबद्दल एक पवाडा उपलब्ध झालेला आहे. तो कोणा शाहिराकडून उतरून घेतलेला श्री. बाबासाहेब धुळप यांच्या संग्रहीं होता. तो कित्येक ठिकाणीं बरोबर लागत नाहीं. व कोठेंकोठें फाटलेलाही आहे; तरी तो याखालीं दिलेला आहे. त्यांत हरबाजीरावांच्या शौर्याच्या व कामगिरीच्या अचाट गोष्टी दिलेल्या आहेत. इंग्रजांबरोबर झालेल्या लढाईचें त्यांत उत्कृष्ट वर्णन दिलेलें आहे. तसेंच कोंकणामध्यें दुष्काळ पडल्यावेळीं एक तांदळाची बोट धरून आणून ते तांदूळ सर्वत्रांस वांटून दिले व गरीबांचे आशीर्वाद घेतले, असा भाग त्या पवाड्यांत वर्णन केलेला आहे. ह्या पवाड्यांतील गंगेचा वृत्तांत राजापुर गंगामाहात्म्यातील वृत्तांतास मिळता आहे. तो गंगामाहात्म्यातील वृत्तांतही पवाडयांच्या खालीं दिलेला आहे. त्या गंगामहात्म्यामध्यें पेशव्यांनी त्यांच्या आंगावर हत्ती–चित्ता सोडल्याबद्दल वर्णन आहे. हा असा हरबाजीरावांचा द्वेष करण्याचें पेशव्यांस कोणतें कारण झालें असावें तें कळत नाहीं. हरबाजीराव हे आंग्र्यांच्या आरमाराचे सुभेदार असल्यामुळें–आंग्र्यांबद्दल पेशव्यांच्या अंतःकरणांत जी असूया होती, तिचें उट्टें हरबाजीरावांवर तर काढण्याचें मनांत आणिलें नसेलना? कांहींहीं असो; परंतु त्या तशा संकटमय, प्रसंगांतूनही हरबाजीराव हे आपल्या बहादुरीनें मुक्त झाले होते. त्यांची बहादुरी इतकी होती कीं, त्यांनीं डोहामध्यें शिरून एका बाईचें मूल मगरीच्या मुखांतून जिवंत सोडविलें होतें. अशा बहादुर पुरुषांचा गौरव करण्याऐवजीं त्याचा नाश करण्यासाठीं तत्पर होणें ही नीच-

ता नाहींका ? असो. याखालीं हरबाजीरावांचा पोवाडा व गंगामाहात्म्यांतील कथन दिलें आहे, तें वाचून आम्हीं म्हणतों यावद्दल वाचकांची खात्री होईल.

श्री.

## पोवाडा.

पुण्यप्रतापी धन्य जगामधिं धुळपराव हे कीं ॥ रणबहादुर हरबाजीराव थरथराट जन लोकीं ॥ हटी मूर्त गोमटी भोळे शंकर बोलण्यांत ॥ वक्त्र भयासुर पाहतां कंप भरे शरीरांत ॥ धुंद कैफमें बुद्धि अकडबाज शोभिवंत ॥ दिसे सांवळी तनु दोंद गणपतीचें दिसण्यांत ॥ वीर मारुती वीर उदार कर्ण तसे देत ॥ कडक स्वारी तडक जिलेबी चाले यशवंत ॥ उरा शोभतो कुरा जयाची मोठी दाहशत ॥ साहूकारी आनंदराव मर्यादा पाळीत ॥ भहिरी सुपाळ गैर (?) भापणें सोय लाविती कीं ॥ १ ॥ रंग विलासी दंग इमानी खातर धन्याची ॥ एका श्रीमंताचा घोडा अचाट होता जी ॥ धनी ऐकती कर्णी कीर्ती बसणार रावजींची ॥ वडा खंकाळ घोडा त्यावर उडून बसले जी ॥ दिला सपाटा त्या घोड्याची खोडी मोडिली जी ॥ ख्यात जयाची विख्यात निशा जाहालि खावंदाची ॥ शिरपेंच घोडा दिला तेधवां जी ॥ भगवंताचे लाल खरे हे सर्व मानिती कीं ॥ २ ॥ बाहादुर हे पाहा यशस्वी जरीपटका झुले जी ॥ जयगडच्या वाऱ्यावर मजवर (?) येती मुंबईवाले ॥ जोर इंग्रजी थोर आंगावर उठून हे पडले जी ॥ नांगर सोडुनि खासे झुंजासाठीं आडस (?) आलेजी ॥ भांडीं (?) पेटवितां सांडा गर्भ साटांचे गोळे ॥ मो-कीमाझीम जाहाली कडाड तोफांचे सुटले ॥ रागें न फिरे मागें काय.... पडले जी ॥ पटपट मडदें पडतां मनवर(?) निघूनिया गेले ॥ अशा कितीएक गलिमा मारुनी हटवीती कीं ॥ ३ ॥ जिवंत देवहि भीत व्रतांत* गंगेवरचा ऐकोजी ॥ आली नव्हती गंगा कुंडामध्यें सप्तसाच्या जी ॥ आहार करिती, बोभाट ब्राह्मण वेदघोष त्याचा ॥ जय मातोश्री गंगा उपाय हरे सकळांचा ॥ जसा भगीरथें केला सहास करार केला शरीराचा ॥ नये माउली गंगा उपाय हरे सकळांचा ॥ त्या गायमुखाखालीं बसका रावजींचा ॥ म्हणती आतां देणें लाभ तुझ्या दर्शनाचा ॥ वाहूं लागल्याविना उठेना धट निश्चयाचा ॥ भाव बाहुनी थांबे गोमुखीं वाहे लोट गंगेचा ॥ केलें स्नान दक्षणा वाटती हर्षयुक्त ब्राह्मणांसी ॥ धन्य धन्य अवतार मानिती आश्चर्य म्हणती हे अवतारी कीं ॥ ४ ॥ राव साजतें नांव जोडि हो रामलक्ष्मणाची ॥ आनंदराव हरबाजीराव धुळप बंधु जाणाजी ॥ धन्यांनिं जावें पुण्यास ऐसें आलें घडोनी गेल्यावर दुष्काळ कोंकणीं पडला येवोनी ॥ मेले कितीक गेले जाया भंगासी घरें सुनी ॥ एकनिष्ट पुण्याहुनी सहावें वर्षी आले फिरोनी ॥ जेव्हां पाहिली तेव्हां स्वारी गेली हौसेनें ॥ धरोनि आणिली बोट तांदुळ देति आनंदानें ॥ अन्नवस्त्र विपुल जाहलें दुष्काळ पळाला कीं ॥ रण० ॥ ५ ॥ वाणितात हो करणि जयाची श्रीमंत अझुनी ॥ सत्राशें सत्रा शकांत आलें घडोनी ॥ कुटे आयुष्य उटे सोडी हरबाजीराव प्राण ॥ मार्गशिर्ष शुद्ध तृतीया उत्तर आषाढा जाण ॥ मृत्यु येइ हा भृत्य शिवाचा सोमवार धन्य ॥ दोनप्रहरीं वैकुंठीं आत्मा गेला निघोनी ॥ घोळंकार कल्होळ पडे

* वृत्तांत.

आभाळ कोसळोनी ॥ दादा बापू कर्की गेलीं मूर्च्छित होऊनी ॥ शुद्ध बुडाली बुद्ध मेरु तो गेला खचोनी ॥ मोठा आकांत झाला वाईट केलें ईश्वरानें ॥ जगांतील ही सर्व रडती बापू कष्टी जो कीं ॥ ६ ॥

॥ श्री आर्या ॥

## राजापुर गंगामहात्म्यातील कथन

झाली येक बरी ही व्हावी दुसरी चरित्र माला हो ॥ प्रस्तुत ऐशा कामी प्रार्थुनि ह्मणतो सहाय काला हो ॥ १ ॥ गंगेच्या संबंधें ऐको येती कुतर्क कांहींसें ॥ अश्रद्धा वृद्धीकर ते व्हावे ऐकतांचि नाहींसे ॥ ऐसें चरित्र आहे लोकीं जें तें प्रसिद्ध बोलावें ॥ जाण्या येण्याविषई आश्चर्याचें असेंच तें गावें ॥ ३ ॥ येउनि मनांत ऐसे प्रार्थी गुरुराज माउली गाया ॥ आहे समर्थ ऐसें आर्या करुनी चरित्र सांगाया ॥ ४ ॥ ऐकावें चरित जनीं भक्त चरित्रेचि थोर महिमान ॥ वाढविती यास्तवची भक्ताचा ईश्वरास अभिमान ॥ ५ ॥ आली भक्ती साठीं प्रथम असें वर्णिलेंचि तें कविंनीं ॥ आहे महात्म्य लोकीं स्मरुनी नमितो समूळ संभवनी ॥ ६ ॥ आलीकडील अगदीं प्रसिद्ध जें थोडक्यांत ते गाऊं ॥ आधार पूर्वज्यांच्या बोलाचा सत्य तो मनी घेऊं ॥७॥ जे हे प्रसिद्ध लोकीं पुरुष असे हें चरित्र कारण हो ॥ ते ही स्मरोनि नमितो तोही जो भवनिधी निवारण हो ॥ ८ ॥ सच्चरितें भव तारक गाती लोकांत गातची गेले ॥ सत्कविवृंद असे ते स्मरुनी नमुनी चरित्र हे बोले ॥ ९ ॥ श्री मत्शिव छत्रपती सत्तें-तील नामदार सरदार ॥ सुकुलोत्पन्न असे हे झाले या चरित-दानिं सदुदार ॥ १० ॥ क्षात्रिय धुळप कुळांतील नामीं हरबाजिराव सद्वीर ॥ ज्याचे गाति पवाडे लोकांमध्यें म्हणोनि रण शूर ॥ ११ ॥ जो शूर वीर धर्मं समई रणपटु रिपू शिरें टोपी ॥ ज्याच्या वंशालाही मानें इंग्लीश काढिती टोपी ॥ १२ ॥ श्रीमंत पेशव्यांचा तोडी हत्ती फिरोन जो मागें ॥ बाणा असा जयाचा वर्णावा कां न हा तया मागें ॥ १३ ॥ ठेउनि मनांत ऐसें सोडिति चितया वरी लढाईला ॥ तो मारुनी जयानें रक्षियलें आपुल्या बढाईला ॥ १४ ॥ डोहीं शिरोनि काढी मगर मुखांतूनि बाइचें बाळ ॥ बाहेरी सजिव असें शोभे केवळ सखाचि गोपाळ ॥ १५ ॥ ज्याच्या शूरपणाच्या गोष्टी असती बहुपरी आतां ॥ जी मुख्य तीच वर्णन करणें आहे चरित्र हें गातां ॥ १६ ॥ ऐके समई आला श्री गंगेचें कारावया स्नान ॥ तेथें प्रसंग आला जो तो ऐकावया करा कान ॥ १७ ॥ होय चमत्कार असा येतां गंगा निघोनियां गेली ॥ ऐशास्तव त्या समई वीर मनीं खंतही बहू झाली ॥ १८ ॥ बसला गाय मुखाच्या वीरासन घालुनी असा खालीं ॥ घेऊनि खड्ग हातीं गंगेला कळउनी अशा बोलीं ॥ १९ ॥ घालीं स्नान मला तूं ना तरिं तुजलाचि देह हा वाली ॥ मर्यादा केली त्या कालीं गंगाचि धाउनी आली ॥ २० ॥ बसलाचि निश्चयानें वीरासन घालुनी असा शूर ॥ उसपोनि खड्ग हातें तोडुनि घेण्यास आपुलें शीर ॥ २१ ॥ गंगा न घालि जरिं तरिं घालिन गंगे स्वरक्त आंघोळी ॥ ऐकोन असा निश्चय कोण न घाली मखांत आंगोळी ४२ नाहीं विसाद बारा संगें बोलावयास त्या कालीं ॥ झाली कोणाची ही जन नयनीं आसवें तई आलीं ॥ २३ ॥ सायंकाळवरी जों मर्यादा केलीं तों वरी लोक ॥ साशंक

मनी म्हणती वीर विये गंगेचे काय हो शोक ॥ २४ ॥ भ्याली गंगाबाई आली धांवोनि घातलें स्नान ॥ जाणों मनीं म्हणे कीं कठिण असें हें नको मला दान ॥ २५ ॥ उठला वीर न निश्चय गंगेचा ओघ येउनी सुटला ॥ फिटला संशय अवघा हरबाजी ध्रुव तसाचि तो पटला ॥ २६ ॥ थोर चमत्कार असा येउनि घालोनियां तया स्नान ॥ गेली तशीच गंगा करुनी हे धन्य आपुलें स्थान ॥ २७ ॥ बनला भगीरथाचा हरबाजीराव अल्प कालीं सखा ॥ ऐसें हि म्हणायाला या कृतिवरुनी खऱ्याच येई मुखा ॥ २८ ॥ हरबाजिराव हरसा येतां गंगौघ तो शिरावरि हो ॥ त्यासमई असें जाणों वर्ण निष्ठा दि रूपका वारि हो ॥ २९ ॥ धन्यचि हा जना असा झाला त्वा नमन हें कुलाला हो । धन्य कुल सारणानें नमनानें धन्यता कुलाला हो ॥ ३० ॥ विस्तारे वर्णावी स्वकुळाची या समूळ सर्व कथा ॥ वाटे कळावयाला सच्चरिते स्तविति जनीं सुपधा ॥ ३१ ॥ परि या समई येथें कळउनि हें सार गाइलें वरतें ॥ सत्फल पिक पिकवाया आदी सद्बीज थोडकें पुरतें ॥ ३२ ॥ सत्कीचा झेंडा लावी क्षत्रिय आपुले वर्गी ॥ त्याच्या ठाण्याचें स्थळ मुख्य असें हें कळों विजयदुर्गी ॥३३॥ नामी हरबाजी हा हरसा साक्षात्तशांस दीनमन ॥ होउनियां करित असे चरित स्मरणें बहु परी नमन ॥३४॥ दुसऱ्या चित्र चरित्रा चिंतामणराव सांगलीकर हो ॥ कारण तें वर्या या गुरुराया बुद्धि चांगली कर हो॥३५॥

## जानराव धुळप.

प्रख्यात हरबाजीराव धुळप यांचे चिरंजीव जानराव हे होत. जानरावांच्या मर्दुमकीबद्दलही इतिहासांत पाहिजे तसा पुरावा नाहीं; तरी पण ह्या वीराची कामगिरी अचाट होती, यांत मुळींच संशय नाहीं. जानरावांच्या कामगिरीसंबंधानें असेच तीन पोंवाडे उपलब्ध आहेत. तेही श्री. बाबासाहेब धुळप यांच्या दप्तरीं मिळालेले आहेत. हे पोंवाडेही शाहीराकडून उतरून घेतलेले आहेत. जानराव धुळप हे विजयदुर्गचे सुभे होते. मध्यंतरीं कांहीं दिवस ते देवगड तालुक्याकडे असोवत. नंतर ते आनंदरावांच्या मरणोत्तर विजयदुर्गचे सुभे झाले असावे. यांनीं इंग्रजांबरोबर ज्या लढाया दिल्या आहेत. त्यांचें ह्या पवाड्यांत बहारीचें वर्णन आहे. तें पवाडे येथें देण्यापूर्वी. जानराव धुळप यांची उपलब्ध पत्रें देत आहों.

५४०. (१२६) खमस सबैन मया व अलफ मोहरम ११

* फरासीसाकडील राजकारणविशीं जानराव धुळप यास आज्ञा केली असे, तरी तुम्हीं तालुके देवगडाकडून ज्यासमयीं जें साहित्य धुळप मागतील तें व तिकडील खानगीस माणसें माहितगार लागतील तीं देणें, माणसें माहिगार चाकर नसल्यास दहा असामी शिपाई व दोन कारकून माहितगार ठेवून पाहून सरंजाम करून तुम्हीं व धुळप एका विचारें ह्या राजकारणास सदरहू लिहिल्याप्रमाणें साहित्य देऊन रवाना करणें. तुम्हांस मजुरा पडेल. साहित्याविशीं वारंवार सनदेचा उजूर न करणें म्हणोन बाळाजी गणेश यांचे नांवें सनद. खानगी यादी.

५४१. (१२७) खमस सबैन मया व अलफ मोहरम १२.

* जानराव धुळप याजकडे जरूरीच्या कामाकरितां तालुके रेवदंडा पैकीं चांगल्या महागिऱ्या निघालकतिच्या (?) चलाक ऐशा सुमार ४ चार देविल्या असे, तरी देणें. सदरहू पैकीं जरा चांगल्या असतील त्यास

* सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी पृ. ७७-७८

देणें. बाकी शिलकेस नसतील त्या भरतीच्या एक दोन लागतील तरी खरेदी करून देणें म्हणोन. आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांचे नांवें सनद. परवानगी रुबरू.

श्री. जानराव धुळप यांच्या कर्तबगारीनें श्रीमंत पेशवे संतुष्ट असत. ते त्यांस नेहमीं प्रोत्साहन देत असत. धन्याकडून बजाविलेल्या कामगिरीबद्दल प्रोत्साहन मिळतांच सेवकांस स्वीकृत कार्य तडीस न्यावयास उमेद येत असते. हें तत्त्व पेशवे यांच्या लक्षांत होतें यांत संशय नाहीं. अशाच प्रसंगाचें एक* पत्र याखालीं दिलें आहेः—

शके १८३५ माघ व० ७ ता. २३ फेब्रुवारी १७६४ पौ० छ १ माहे रमजान.




राजश्री जानोजी धुळप गोसावी यांसः—

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ माधवराव बल्लाळ प्रधान आर्शीर्वाद. सु॥ अर्बा सितैन मया व अलफ. तुम्ही विनंतिपत्र पाठविलें तें पावलें. अरमारची तयारी करून सात गुराबा व सोळा गलबतें घेऊन हेट दक्षिण प्रांतें स्वारीस गेलों म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशास तुम्हीं आरमारची स्वारी मातबर करावी, भारी पैदास्त व्हावी. या गोष्टीची तुम्ही उमेद राखितां व करून दाखवालच. आपली सलाबत दुसरीयावर पडोन काम होये असें पाहून मातबर स्वारीची फत्ते करणें. जाणीजे छ० २० साबान बहुत काय लिहिणें.

लेखन सीमा.

ह्या पत्राखेरीज दुसरें एक पत्र शके १६९६ फाल्गुन शु० ४ ता० ५ मार्च १७७५ चें आहे. त्यांत पेशव्यांनीं जानरावांची चौकशी केलली असून त्यांत गुजराथच्या स्वारीसंबंधाची हकीकत आहे. तसेंच श्री. दादासाहेब यांची गांठ पडल्यास त्यांस हस्तगत करून घेण्यासंबंधानें लिहिलें आहे. तें पत्र * येणें प्रमाणें.




राजश्री जानराव धुळप गोसावी यांसः—

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद. सु॥ खमस सबैन मया व अलफ. अलीकडे तुमचें पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं; तरी प्रस्तुत कोणे जागा आहे, काये करितां, तें साविस्तर लिहिणें. तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब गुजराथेंत महीपार होते. अलिकडील तीरीं राजश्री हरि बल्लाळ देखील उभयेता सरदार फौजसुद्धां होते, ते माघ वद्य द्वितीयेस महीपार त्यांचे फौजेवरी चालून गेले. तेहीं

* हें पत्र भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालामध्यें रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे.

* हें पत्र भारतइतिहाससंशोधक मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालामध्यें रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे.

पुढें आले. मातबर लढाई जाली. इकडील सर्व सरदार वो ( क ) × × × × × लढाई जमवून × × × × मर्दुमीची शर्त केली. एकडील फत्ते होऊन तिकडील मोड जाला. सदाशिव रामचंद्र, सखाराम हरी, मानाजी फाकडे, जखमी होऊन पळाले. दादासाहेबही घोड्यास पळून जाऊन तेथून × × से दिडशानिशीं जाहाजांत बसून सुरतेच्या बारियावरी आले. गोविंदराव व खंडेराव गायकवाड त्यांजकडे होते तेही पळून गेले. बाबुराव पाटणकर व गणेश विठ्ठल वगैरे दहा पांच जखमी पाडाव आणिले. पंधरा हत्ती नव तोफा व घोडे सुतरनाला वगैरे सलतनत पाडाव होऊन आलीं. फौज लष्कर सर्व घोडे सुतरनाला वगैरे सलतनत पाडाव होऊन आलीं. फौज–लष्कर सर्व लुटलें गेलें. लोक व पायेदळ तिकडील बहुत मारिले गेले. याप्रमाणें वर्तमान जालें. तुम्हांस कळावें म्हणून लिहिलें आहे. पुढें तीर्थस्वरूप सुरतेकडून जहाजांतून जलमार्गे एखादेकडे जातील येतील याची वातमी व बंदोबस्त येथास्थित असिला पाहिजे. तरी तुम्हीं आपले जागां बहुत सावध राहून त्याचे जाण्यायेण्याचे मार्ग असतील त्याचा बंदोबस्त राखून, बातमीही राखीत जाणें. वरचेवरी वर्तमान हुजूर लिहिणें, सोये पडल्यास गांठही घालणेंच; हस्तगत जाल्यास फारच उत्तम आहे. जाणिजे. छ० २ मोहरम बहुत काय लिहिणें. प्रे॥ छ० १७ जाखर ऊर्फ वैशाख वद्य ३ रविवार सन सलास समानीन.

लेखनसीमा

## धुळपांचे पोवाडे.

### पोवाडा (१)

या तळे कोकणामधी राव आंगरा होता जी। त्याणे विजयदुर्गाचा पाया घातला जी । ह्या कणक्या ( ? ) गोव्या पती (?) सारंगदुर्गाला जी । दुरून कोट हा दिसतो जंजिरा जी । सवाई जानराव धुळप मोहरा विजयदुर्गाला जी ॥ १ ॥ नित्य वाजतो चवघडा खासा वाड्याला जी । ह्या किल्ल्याची सांगतो सात घ्या ऐकून जी । हा विजयदुर्ग पींजरा(? दिसे त्रिभुवनीं सोभीवंत जी । येक अख्या केली रुद्राजीराव धुळपानें जी । चौही बंदरीं घाला लाविला भल्या मरदानें जी।
सवाई जानराव० ॥ २ ॥

रामलिंगाची (?) दया (?) धुळपरायाला जी । त्यानें आरमाराची सुभा दिला धुळप रायाला जी । पुढें चालती वैरागी जरीपटका आघाडिला जी । दोन ढाला........ बांधिला मधील जरीपटका जी । डोईवर छत्र दिसे राजमोहरा जी । असा रामलक्ष्मणाचा जोडा दोघांचा जी ॥ ३ ॥
सवाई जानराव०—

हरबाजीरावाचे कुळीं दीप लागला असे जी। जसे कासीमध्यें सूर्यबिंब उगवला जी । त्यानें आरमारचे तोफेचा भडिमार केला जी । लोकाला साखर वाटिली आनंदानें जी बापू....गर शेवक गातो सभेला जी । डपावर काविला कलगी भगवा फरारा जी ।
सवाई जान०— ॥ ४ ॥

### पोवाडा ( २ )

वेळा घटका उत्तम पाहुन केले मांडण– केले मांडण (?) । धनधान कारगीर चार शाहाणा जी ॥ वीर सुभा इसाजीपंत धनी एक दान ( शहाणा ) । पाल (?) तयार

समरजंग वसई ठिकाण जी ॥ चांच्याचे आचन काढुन जसी नागिन-जसी नागिन वरा बेडद (?) सोभे सारखी अजब रंगी जी ॥ तीन काटी उडी वर धाना(?) जी । झाजात झाज सवाई नांव साजे । समरजंग सेनामध्ये पीचे गजराज जी ॥ वींनीचे सहीझीनचे (?) झाज गेले गोवाला हो । कधी आणिला समसरजंग विजयदुर्गाला हो । झाला दंग समसरजंग ईंग्रज आला । सागरीं राहिला क्षेत्रपाल झुझाला जी ॥ पत्र आले धुळपरायासी यावें जलदीनें-यावें जलदीनें । माधवपाल, नारायणपाल, दतपाल त्याचा जी । फत्तेजंग समरजंग जाडा दोघांचा जी । अवधा सवाई समरसेर खरा बिननीचा जी ॥ थोर थोर भाऊ त्यावर मोठ मोठ गोव्याची निवडुन-शिपाई चढविले भरवसाचे जी । दारूचा भार सपाख्यांत फिरंग्यास धाक गोव्यांत जी ॥ सारे पडाव केले पाचीव (पाठविले) लोकांला पडला धाक फत्तेजंग समरजंग धाक वैराला धाक दुष्टाला । तोडामाजी नाईक........सरदार त्याला । झाला दंग समसरजंग इंग्रज आला । सागरीं राहिला क्षेत्रपाल झुझाला हो । सुभा आला धुळपरायासी यावें जलदीनें-यावें जलदीनें । सारे आरमार घेऊन गेले बंदरांतून हो । धार कूच केले रेवदंडा गेले चालून-गेले चालून । ठाण्याचा किल्ला घेतला इंग्रजानें । जी ॥ असो बरावरा ( ? ) दिसो लागला हो पुनाला (?) । असी दोन चार ढंगा त्यानें केली हो । मी नांवांचा जानराव धुळप जी ॥ आश्विन शुद्ध पाडवा दिवस । बुधवार । गोपाळगडच्या वाऱ्यावर इंग्रज राहिला हो । जाला दंग समसरजंग इंग्रज आला इंग्रज आला । सागरीं आला क्षेत्रपाल झुझाला हो । सारे पाल जवळ बोलावून मनसुबा केला । आम्हीं येतो व्यावरणा? मजत तुम्हाला । पुढें होऊन समसेरजंग हो दमाजी पडला काय कर्णी त्या कर्त्याची वारा राहिला जी । सारे पाल राहिले दूर हो । त्याची दोन झाजे जबर नाहीं आयके भांडाचा मार हो । इंग्रजास मदत ईश्वर मारगिरी करूं लागला. गोळ्यावर गोळ्या खुद झुजला समरसरजंग हो । झाला दंग समसरजंग हो इंग्रज आला । सागरीं राहिला क्षेत्रपाल झुझाला हो । टोपीवाला पुसे हटकून कोण सुभेदार । डामाजी नाईक म्हणे मीच बहादुर जी । येथे टोपीवाला आडावणीला । तुला पेसवाच्या धमक दावीतो आता जी । कपतान मनीं उमजून धनी ह्यावर । मग झट्टन पडला समसरजंगावर जी ; आता ह्याही बेडदावर(?) ह्याही बाजू देतील.......झाला दंग समसरजंग इंग्रज आला । सागरीं राहिला क्षेत्रपाल झुझाला जी । काटी फोडून उतरली ( दे ) गावीं सीमेपरवाज सुधा (?) तक्ता फोडून लेस केला जुदा जुदा जी । या या (?) बेटानो कौला लोक न येऊ म्हणती शरन । करूं पेशव्याची नामना जी । गेले वाणवाची दुकाणी आणिली हत्यारे । घाली गिरजे धाई पडला टमचाकार (?) फत्तेजंग समरजंग दिली अग्न ( आग ) लावून । तो डामाजी नाईक सरदार आपला हातुन जळाया लागला जी झाला दंग समसरजंग इंग्रज आला । सागरीं आला०—

काप ( कांहीं ) जलालेल ( जळाले ? ) दारूनें उडाले तर काय उड्या घालून गेले तकत्यावरन जी । लढाई झाली मिरया ठिकाणी-काय पळाले रत्नागिरीवरूनी जी । ते हेटक ी पटले ठार विजयदुर्गार वतनदार

जी । बाबु खंदेसी गातो पोवाडा त्याची वस्ती तळें घोसालें जी । झाला दंग समसरजंग०-

## पोवाडा ३ रा.

धोस (?) धुळपाचा-( येथील मजकूर उडून गेला आहे. ) हो । मारिला इंग्रज मुंबईचा कापे थरथरा हो । उठीवला पावडा हाकारिनी(?) केली. पालाची । हो लाविली जाळ(?) केला मुकाम वाघापुर जी॥ १॥बाहेर सावट शाफ दिसते राज्याचे (?) जी. ठोफ(?) विशाना(?) लोकास देती वाटुन जी. रत्नागिरीचे कागद पुनासी गेले जी. ( लागत नाहीं ) धुळपांनीं रक्षा केली ॥२॥

ह्या पवाड्यांवरून जानराव धुळप यांची कर्तबगारी दृष्टोत्पत्तीस येत आहे. अशा ह्या मोहोऱ्याची खरी मर्दुमकी प्रकाशांत आणण्याजोगें कागदपत्र मिळाले नाहींत, ही अत्यंत खेदाची गोष्ट होय !

धुळप घराण्यांतील बऱ्याच पुरुषांनीं आरमारप्रकर्णी मर्दुमकी गाजविलेली आहे. यशवंतराव धुळप हे हरणईच्या किल्ल्यावर होते, ते आनंदरावांचे समकालीन होते.

## कृष्णराव धुळप.

आनंदरावांच्या मृत्यूनंतर त्यांचे चिरंजीव कृष्णराव हे आरमाराचे सुभेदार झाले; परंतु त्यांच्या वेळीं पेशवाईमध्यें अंदाधुंदी चालू असून, आरमाराकडे जसें लक्ष द्यावयास पाहिजे, तसें न दिल्यामुळें त्यास निकृष्टदशा आली. त्याबरोबरच इ. स. १८१८ मध्यें इंग्रजांनीं पेशव्यांचें राज्य खालसा केलें व कोंकणप्रांतही काबीज करण्याचा उद्योग आरंभिला. त्या वेळीं कृष्णराव हे आरमाराचे सुभेदार असून, जानराव हे विजयदुर्ग जिल्ह्याचे सुभेदार असावेत. ते इंग्रजांस शरण आले; तेव्हां इंग्रजांनीं कृपाळु होऊन, त्यांच्या वंशजांस " पोलिटिकल " पेनशन करून दिलें. ज्या वेळीं विजयदुर्ग इंग्रजांच्या हातीं आलें, त्या वेळीं ४३० टन वजनाचें व १५० फूट लांबीचें आणि ३३ फूट रुंदीचें एक जहाज त्यांस मिळालें. त्या ठिकाणीं ३५५ फूट लांबीची गोदी,-जहाजें बांधण्याची जागा आणि डोलकाठ्या ठेवण्याची इमारत हीं अस्तित्वांत होतीं, असें वर्णन आढळतें. कृष्णरावांच्यानंतर त्यांचे दुसरे चिरंजीव **रघुनाथराव** हे सरंजामदार झाले. ते इ० स० १८७४ मध्यें मरण पावले. त्यानंतर सरंजामाचे अधिकारी रघुनाथरावांचे चिरंजीव हेच सध्यां ह्या धुळप कुळांतील विद्यमान वंशज श्री. **कृष्णराव रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब धुळप** विजयदुर्ग येथें असून " पोलिटिकल " पेनशनचा उपभोग घेत आहेत. त्याखेरीज सुर्याजीरावांचे चिरंजीव श्री. व्यंकटराव धुळप हे बडोदें प्रांतीं असून त्यांचे बंधु श्री. नारायणराव धुळप हे ग्वाल्हेर मुक्कामीं आहेत. जानराव धुळप यांचे चिरंजीव हरबाजीराव धुळप यांस सावंतवाडी संस्थानमध्यें मानकऱ्याची असामी मिळाली होती. तेथून त्यांस दरमहा तीनशें रुपये मिळत असत. ते निवर्तल्यावर त्यांचे बंधु भगवंतराव यांस ही नेमणूक थोडे दिवस चालली; परंतु त्यांची स्थिति नीट नसल्यामुळें नेमणूक कमी होऊन दरमहा पन्नास रुपये मिळूं लागले. श्रीमती आहिल्याबाई अक्कलकोटकर राजे भोंसले बुवासाहेब यांच्या बहीण हरबाजीरावांस केलेल्या होत्या. त्या निवर्तल्यावर ही नेमणूक नारायणराव धुळप यांस मिळत असे. येणेंप्रमाणें ह्या मोरे ऊर्फ धुळप, घराण्याची कैफियत आहे, ही कैफियत उपलब्ध साधनांवरून तयार केलेली आहे. ह्या कैफियतीमध्यें जानराव धुळप, हरबाजीराव धुळप, आनंदराव धुळप, यांनीं आरमारविषयक बजाविलेल्या अलौकिक कामगिरीचे निदर्शक असे कागदपत्र मिळाले असते, तर ह्या घराण्याची मर्दुमकी विशेष प्रकाशांत आली असती. असो

सध्यांचे ह्या धुळपघराण्याचे सरंजामदार श्रीमंत बाबासाहेब धुळप हेही आपल्या घराण्यांतील थोर पुरुषांप्रमाणेंच सर्वगुणसंपन्न असून, अनेक सुधारणेच्या कार्यांत ब्रिटिशसरकारास मदत करीत असतात. यांस आपल्या कुळाचा अभिमान असून, मराठा बांधवांच्या शोचनीय स्थितीबद्दल अत्यंत कळकळ वाटत आहे. मराठा शिक्षण-परिषदेच्या स्तुत्य कार्यांतही हे निरपेक्षपणें भाग घेत आहेत, तसेंच को-ऑपरेटिव्ह क्रेडीट सोसायटीच्या मतांचा प्रसार करण्याबद्दलही त्यांचे प्रयत्न सुरू आहेत. ईश्वर ह्या धुळपघराण्यास यश, कीर्ति, संपत्ति व संतति देवो !

# खळतकर देखमुख घराण्याची कैफियत.

## खळतकरांची पूर्वपीठिका.

मराठ्यांच्या इतिहासामध्यें प्रसिद्ध पावलेल्या अनेक मराठयांच्या कुळांपैकीं " खळतकर देशमुख " यांचेंहीं एक घराणें आहे. ह्या घराण्यास "खळतकर" हें आडनांव पडण्यापूर्वीं यांचें दुसरें आडनांव असलें पाहिजे; परंतु त्यासंबंधानें कांहींच माहिती मिळत नाहीं. पुणें प्रांतांत जेजुरी जवळ " खळद " ह्या नांवाचें एक गांव आहे, तेथील हे पाटील असल्यामुळें ह्या घराण्यास गांवाच्या नांवावरून " खळतकर " असें आडनांव पडलें.

खळद या गांवीं हे पाटीलकीचा उपभोग घेत असतां त्या गांवचे कुळकर्णी व पाटील ' खळतकर ' यांच्यामध्यें कांहीं कारणांमुळें तेढ उत्पन्न झाल्यामुळें हे तेथून जवळच असलेल्या " पेडगांव " नांवाच्या खेड्यांत जाऊन राहिले. त्याखेरीज नांदगांव ह्या ठिकाणींही खळतकरांचे वास्तव्य होतें. नांदगांव ह्या गांवची अर्धी पाटिलकी पेशवे सरकारचे हुजरे "गुंड" यांजकडे असून अर्धी खळतकरांकडे होती. " गुंड " यांनीं पेशवे सरकारांस खूष केल्यामुळें त्यांस हा गांव मिळाला होता. नांदगांवची सबंद पाटिलकी आपणांस मिळावी म्हणून नांदगांवकर व पेडगांवकर खळतकरांनीं खटपट चालविली.व तींत त्यांस पूर्ण यशही आलें. हीं खळतकरांचीं दोन्हीं घरें एक होऊन, त्यांनीं दीर्घ प्रयत्न केला व पेशवे सरकाराकडून गुंडाला, नांदगांवमधून हांकून लाविलें आणि आपण तेथील पाटीलकी संपादन केली.

यानंतर खळतकरांचें घराणें पेशव्यांचे दरबारीं मानकरी होऊन राहिलें. त्यांच्या पुरुषांनीं अनेक लढायांत भाग घेऊन, मर्दुमकीची शर्थ केलेली होती; तसेंच ते अश्वपरीक्षेंत तरबेज होते. ही त्यांची कीर्ति सर्वश्रुत होती, त्यामुळेंच ह्या घराण्याचा भाग्योदय होण्याचा समय फारच जवळ आला. एके समयीं नागपूरचे पहिले रघोजी भोंसले हे पेशवे सरकारच्या भेटीस आल्यावेळीं त्यांनीं खळतकरांच्या कीर्तीचें श्रवण करून, त्यांस आपल्या पदरीं ठेवण्याची इच्छा प्रदर्शित केली व तावडतोब पेशव्यांकडे त्यांची मागणीही केली. पेशव्यांनींही विशेष आढेवेढे न घेतां, खळतकरांस नागपूरचे राजे रघोजी भोंसले यांच्या स्वाधीन केलें. हा रघोजी राजे भोंसले यांजबरोबर पुणें प्रांतांतून आलेला " खांबोजी " खळतकर हा होय.

रघोजी भोंसल्यांनीं खांबोजी खळतकरांस नागपूरप्रांतीं आणिल्यानंतर त्यांस हिंगणघाट येथील जमेदारी, उघाई, तोरणटका, पाटपासोडी, रीठआबादी, होळी, दसरा, पोळा वगैरे प्रकरणीं सर्व मानमरातब दिले. ते हक्क इंग्रजसरकारचे राज्य होईपर्यंत ह्याच घराण्याकडे होते, इंग्रजी राज्य झाल्यानंतर, इंग्रजांनीं खळतकरांच्या वंशजांस सालीना कांहीं पेन्शन देऊन सादर व कलारी हक्क बंद केले. मानमरातब मात्र बंद केला नाहीं; परंतु त्या ठिकाणीं उत्पन्न नसल्यामुळें तेथें कोणीही रहात नसे; त्यामुळें ते हक्क आपोआपच बंद पडले.

खांबोजी यांस चार पुत्र होते. ह्या पुत्रांनींच हिंगणघाटची पेठ वसविली व तेथपासून ते तेथील जमेदार झाले. ह्या घराण्यामध्यें प्रथम देशमुखी नव्हती; परंतु ती शिवापूरचे कोंडे देशमुख यांनीं आपली मुलगी यांच्या घराण्यांत दिल्यावरून त्यांस नांव ठेवूं लागले, तेव्हां त्यानें जांवयास शिवापूरची देशमुखी आंदण देऊन खळतकरांस देशमुख केलें. यांचें गोत्र गार्ग्य. कुळदैवत ( रासुबाई ) देवी व खंडोबा. हे सांबभक्त आहेत. ह्यांचे लग्नांत देवक वेळवाचें ( वांघ ) ह्याप्रमाणें ह्या कुळाचा आचार आहे.

खांबोजीस चार पुत्र होते. पैकीं खांबोजीच्या दुसऱ्या मुलाचा मुलगा खंडेराव हे हिंगणघाट येथील जमेदार होते, तरी त्या ठिकाणीं न राहतां दिग्रस मुकामीं रहात असत. दिग्रस हें नागपूर जिल्ह्यांतील काटवल तहसिलींतील एक लहानसें गांव आहे. हें गांव भोंसल्यांच्या चलतीच्या वेळीं फारसें प्रसिद्ध नव्हतें. त्या ठिकाणीं सरकारची घोडपागा, हत्ती,

कुत्रे वगैरे असत. याच ठिकाणीं खळतकर हे नाज नगदींचा व्यापार व सावकारी करीत. हें दिग्रस गांव भोंसल्यांकडून खळतकरांस मोकासादाखल मिळालें होतें. अर्थात् हे ह्या गांवचे मोकासदार असल्यामुळें ते त्याच ठिकाणीं राहूं लागले. त्याखेरीज नागपूर येथें बुधवार पेठेंत जागोबाचे देवळाजवळ खळतकरांचे वाडे होते व तेथेंही ते प्रसंगोपात-रहात असत. दिग्रसचा बाजार खळतकरांनीच भरविला. तो हल्लीं गुरुवारीं भरतो. ह्या मोकाशाखेरीज इतरही कांहीं गांवची शेतवाडी व मोकासगिरी यांजकडे होती; परंतु पूर्वी मालगुजारांस फार नुकसान येत असल्यामुळें ह्यांनीं पुष्कळ गांवें सोडून दिलीं. ह्या दिग्रसगांवीं प्रसिद्ध साधु श्रीस्वामी आनंदानंद व श्री सरवडगीर गोसावी यांच्या समाधि आहेत. हल्लीं येथें शाळा, पोस्ट, कांजी हौस व म्याजिस्ट्रेटचें कोर्ट हीं आहेत. हें गांव जांब नदीचे कांठीं आहे. नागपूरच्या भोसल्यांकडे हें घराणें आल्यापासून त्यांनीं लष्करांत नोकरी करून अनेक कर्तबगारीचीं कामें केलीं व धन्याच्या उपयोगीं पडलें होतें; परंतु उपलब्ध इतिहासाच्या अभावामुळें खळतकरांची खरी मर्दुमकी दाखवितां येणें मुळींच शक्य नाहीं. ह्या घराण्याकडे घोडपागेचें काम होतें. तसेंच यांस नागपूरच्या दरबारांत चांगला मान मिळत असून प्रतिष्ठित मानकऱ्यांत ह्या घराण्याची योजना होती. यांच्या पदरीं खासगी हत्ती, घोडे वगैरे युद्धोपयोगीं सरंजामही होता.

## त्रिंबकराव.

खंडेरावांचे पुत्र त्रिंबकराव ऊर्फ नानासाहेब हे श्रावण वद्य ३ शके १७४७ बुधवार इ० स० १८२६ रेवती नक्षत्रीं हिंगणघाट येथें जन्मले. ह्यांचें जन्मनांव दोलाजी असें होतें. ह्यांच्या मातोश्रीचें नांव काशीबाई, ह्या खटावकर देशमुख मोहिते यांच्या कन्या होत. नानासाहेबांस तीन लहान बंधु व चिमणाबाई या नांवाची एक बहीण होती. त्रिंबकराव ऊर्फ नानासाहेब हेही कांहीं दिवस भोंसल्यांकडे नोकर होते. लवकरच यांजवर इ० स० १८४२ च्या सुमारास एक दुःखकारक प्रसंग ओढवला. त्यांचे वडील खंडेराव हे निवर्तले व नानासाहेब उघडे पडले, त्यावेळीं त्यांचें वय अवघें सोळा वर्षांचें होतें. तरीही न डगमगतां त्यांनीं आलेल्या प्रसंगास धैर्यानें टकर दिली. यांचीं चार लग्नें झालीं होतीं. त्यांतील पहिली स्त्री खंडेराव असतांनाच हिंगणघाटांत पुरानें हवेली खचल्यामुळें त्यांत दबून मरण पावली. दुसरी इ० स० १८७२ सालीं नागपूर मुक्कामीं वारली. हीस रंगूबाई ह्या नांवाची एक मुलगी होती. ती १८८२ सालीं मरण पावली. सध्यां अंजिराबाई व भागीरथीबाई ह्या दोन स्त्रिया हयात आहेत. अंजिराबाईचा जन्म हिंदुस्थानांतील चित्रकोट येथें झाला. ह्या निंबाळकरांच्या कन्या होत. यांस चिनुबाई व लहानुबाई अशा दोन मुली आहेत. भागिरथीबाईस निळकंठराव व सख्याबाई अशीं दोन अपत्यें आहेत,

नानासाहेबांची संतति वांचत नसे म्हणूनच त्यांस इतक्या स्त्रिया कराव्या लागल्या. यांच्या चवथ्या पत्नी भागिरथीबाई ह्या सातारा जिल्ह्यांतील वांगीकर गोविंदराव माहिते देशमुख यांच्या कन्या होत. आपणांस पुत्र वगैरे होऊन तो जिवंत रहावा म्हणून अंजिराबाई व नानासाहेब हीं स्वामी तुकाराम महाराज मोहपेकर यांस शरण गेलीं. तेव्हां स्वामींनीं यांस तीर्थयात्रा करून संतदर्शनें घ्यावयास आज्ञा केली. त्यावरून नानासाहेब सहकुटुंब पंढरपुरास गेले व अनेक संतांचीं दर्शनें घेतघेत तीर्थ यात्रा करीत असतां सोलापुर जिल्ह्यातील दहेगाव मुक्कामीं स्वामी परमहंस* आनंदानंद महाराज यांची गांठ पडली व त्यांनीं "तुह्मांस आतां संतती होऊन बांचेल" असा आशिर्वाद दिला.

त्यानंतर त्रिंबकरावानीं महाराजांस दिग्रस मुक्कामीं आणिलें. त्या वेळीं भागिरथीबाई ह्या चार महिन्याच्या गरोदर होत्या-नंतर महाराज काशीयात्रेस गेले. व ते परत यावयाचे पूर्वीच भागिरथीबाईस पुत्ररत्न झालें. तेच सध्यांचे श्रीमंत निळकंठराव हे होत.

* हे संन्यासी असून दिगंबर वृत्तीचे होते. मार्गशीर्ष वद्य ३ शके १८१४ दिसेंबर १८९२ रोजीं दिग्रस मुक्कामीं समाधिस्त झाले. त्यांची फारच ख्याती होती. अद्यापहि लोक त्यांस नवस करितात. मार्गशीर्ष महिन्यांत ह्या थोर सत्पुरुषाच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या थाटानें होत असतो.

## ‘ खळतकर देशमुख ’ घराण्यांतील मान्यवर.




श्री. रा. सा. निळकंठराव त्रिंबकराव उर्फ भाऊसाहेब खळतकर.

ऑनररी म्याजिस्ट्रेट व डिस्ट्रिक्ट कौन्सिल मेंबर–दिग्रस–नागपूर.

यांचा जन्म श्रावण वद्य १ शके १७९९ शुक्रवार रोजीं शततारका नक्षत्र ता० २४ आगस्ट १८७७ रोजीं झाला. बाराव्या दिवशीं महाराज काशियात्रेहून आले व त्यांनीं या मुलास मांडीवर घेऊन त्याचें ' जंगली ' असें नांव ठेविलें. व हा अल्पायुषी होणार नाहीं म्हणून आशीर्वाद दिला.

पुत्रसुखाची इच्छा पूर्ण होतांच नानासाहेबांस महदानंद झाला. ते मोठे शिवभक्त होते. तसेंच साधा पोशाख करीत असून त्यांस चहाशिवाय दुसरें कसलेंही व्यसन नव्हतें. यांनीं काटवल तहसिलींत संत्र्यांच्या बगीच्याची प्रथमच सुरुवात केली. अश्वविद्येंतही हे अत्यंत प्रवीण होते. ते सावकारी व मालगुजारीचा धंदा करीत. त्याखेरीज सरकारच्या ऑनररी म्याजिस्ट्रेटचें काम करीत. सरकारनें त्यांस दुसऱ्या वर्गाचे स्वतंत्र म्याजिस्ट्रेट सर्व काटवल तहसिलीकरितां नेमिलें होतें. तसेंच त्यांस फटके मारण्याचाही अधिकार होता. त्यांचे कोर्ट दिग्रस येथें होतें. एवढा मोठा अधिकार असूनही त्यांनीं कोणास विनाकारण त्रास दिला नाहीं. त्यांनीं एकंदर २७ वर्षे म्याजिस्ट्रेटचें काम केलें. व सन १८९६ च्या नववंर महिन्यांत त्या कामाचा राजिनामा दिला. शिवाय हे नागपूर डिस्ट्रिक्ट कौन्सिलमध्यें काटोल लोकलबोर्डाचे सरकारी मेंबर होते. अनेक अधिकारी लोकांचें यांजवर प्रेम होतें. त्यांच्या कामगिरीबद्दल त्यास अनेकांनीं सर्टिफिकिटें दिलेलीं आहेत. यांचा स्वभाव साधा असल्यामुळें यांच्या भाऊबंदांनीं निळकंठ रावांच्या जन्मापूर्वीच विभक्त राहून त्यांची बरीच इष्टेट बळकाविली. तरीही त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें त्यांचें नुकसान होऊन सावकारी बुडाली व त्यामुळें त्यांच्या प्रकृतीस धक्का बसला व वृद्धापकाळीं श्वासाची बिमारी उत्पन्न होऊन त्यांतच फाल्गुन शु. ५ शके १८२० ता० १६ मार्च १८९९ गुरुवार रोजीं बारा वाजतां ह्या थोर गृहस्थांचा अंत झाला. मरणसमयीं यांचें वय ७३ वर्षांचें होतें.

## निळकंठराव.

निळकंठराव ऊर्फ भाऊसाहेब यांजवर हा एक प्रसंगच ओढवला होता; पण त्यास इलाज नव्हता. वडिलांच्या हयातीमध्येंच यांचें बहुतेक शिक्षण झालेलें होतें, हे १० व्या वर्षी अप्पर प्रायमरी परीक्षा पास झाले. नंतर दोन वर्षें यांच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यांचा विद्याभ्यास बंद पडला. नंतर आपल्या वयाच्या १२ व्या वर्षी हे काटवल येथें इंग्रजी शिकूं लागले. तेथें तीन इयत्तेपर्यंत शिक्षण झाल्यानंतर हे नागपूर येथें शिक्षणासाठीं आले व १८९५ सालीं नागपूर भोंसला स्कूल मधून हे मिडल स्कूलची परीक्षा पास झाले.

यांचा पहिला विवाह इ. स. १८९५ सालीं खेडीकार्यात येथील मालगुजार नानोबा धुमाजी जाधव यांची कन्या गंगुबाई यांच्याशीं झाला. यांचें सासरचें नांव पार्वतीबाई असें ठेविण्यांत आलें. ह्या धर्मशील व परोपकारी आहेत. त्या पतिसेवातत्पर असून शिक्षणाकडेही त्यांचा ओढा आहे. या नंतर श्री० निळकंठराव यांचा दुसरा विवाह १९०३ सालीं पंढरपुराजवळील धासेगांव मुक्कामींचे यशवंतराव ताटे देशमुख यांच्या कन्येशीं झाला यांचें नांव सरस्वतीबाई.

वडिलांच्या हयातीच्यावेळीं व तदनंतरही भाऊबंदकीच्या कलहामुळें जरी कितीतरी नुकसान झालें होतें, तरी निळकंठराव मुळींच डगमगले नाहींत. त्यांनीं मोठ्या धैर्यानें आपली स्थिति सुधारली. आज त्यांजजवळ आठ दहा गांव मालगुजारीचे आहेत.

श्रीमंत निळकंठराव यांचा स्वभावही साधा असून, मराठा बांधवांबद्दल त्यांस अत्यंत कळकळ वाटत असते. ते ईश्वरभक्त असून चहाखेरीज त्यांस कसलेंही व्यसन नाहीं. त्यांच्यांत विशेष गोष्ट ही आहे कीं, ते मराठे असूनही ' मांसाहारी ' नाहींत. यांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ दिग्रस मुक्कामीं एक त्रिंबकराव लायब्ररी ह्या नांवाचें लहानसें वाचनालय काढिलें आहे.

निळकंठरावांनीं आपल्या वडिलांस मिळालेले सर्व सन्मान थोडक्याच वेळांत संपादन करून घेतलें. १९०१ सालीं दरबारी लोकांचे यादींत व १९०५ सालीं खास मुलाखतीचे यादींत ह्यांचें नांव दर्ज झालें. दुष्काळामध्यें यांनीं फारच मोठी कामगिरी करून गरीबांस कपडे वगैरे दिले, ह्याबद्दल सरकारनें त्यांचा गौरव केला. हे काटोल लोकलबोर्डाचे मेंबर निवडले गेले व नंतर त्याच लोकलबोर्डातर्फे नागपूर डिस्ट्रीक्ट

कौन्सीलचे मेंबर झाले. काटोल येथील व्हिक्टोरिया मेमोरिअल सब कमेटीत हे सभासद होते. महाराजाधिराज सप्तम एडवर्ड बादशहांच्या राज्याभिषेकोत्सवाचे वेळीं (१९०३) यांनीं दिग्रस येथील गरीबांस भोजन व शाळेंतील मुलांस मेवामिठाई व पुस्तकें देऊन आपली राजनिष्ठा व्यक्त केली. ता० १४ मार्च १९०४ रोजीं हे मोवाड येथील तिसऱ्या वर्गाचे स्वतंत्र ऑनररी म्याजिस्ट्रेट झाले. तसेंच हे मोवाडचे मालगुजार, नंबरदार व मुकदम आहेत. जुलै सन १९०८ मध्यें यांस दुसरे वर्गाच्या म्याजिस्ट्रेटचा अधिकार मिळाला. हल्लीं यांजकडे नरखेड, मोवाड, जलालखेडा ह्या पोलीस ठाण्यांतील व काटवल पोलीस स्टेशनांतील गांवांच्या फिर्यादी अर्ज्या व पोलीस चालीनीं तिसरे व दुसरे वर्गाच्या घेण्याचा अधिकार आहे. त्यावेळेपासून कोर्टाचें काम दिग्रसलाच होत असतें. हे काटोल येथील मालगुजारी इमारतीचे पुरस्कर्ते असून, ती व्हावी म्हणून यांचा प्रयत्न आहे. ऍग्रिकल्चरल असोसिएशनचे हे मेंबर आहेत. तसेंच यांची विद्याखात्यास मदत असून, शाळांची तपासणी करीत असतात. नागपूर डिस्ट्रिक्ट कौन्सिलमध्यें स्कूल बोर्डाचेही हे सभासद आहेत. शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांनीं व खुद्द नामदार चिफ कमिशनर यांनीं त्यांचे कित्येक वेळां आभार मानिले आहेत. यांस वाचनाचा अत्यंत नाद आहे. तसेंच ते लेखनव्यवसायीही आहेत. त्यांनीं व यशवंत गोपाळ हेडमास्तर दिग्रस यांनीं मिळून ' भीमराव चंपा ' या नांवाचें एक नाटकही लिहिलें होतें. शिवाय १९०८ मध्यें ' मराठ्यांची रूढी व सुधारणा ' ह्या नांवाचेंही एक पुस्तक लिहिलें आहे. तें पुस्तक इतक लोकप्रिय झालें आहे कीं, त्याची दुसरी आवृत्ति निघाली आहे. त्यांतील तत्त्वें प्रत्येक मराठा गृहस्थांनीं अवलंबन करण्यासारखीं आहेत. १९०६–७ सालीं हे काशियात्रेस गेले होते. तसेंच मराठा–शिक्षण-परिषदेचे हे एक सभासद आहेत. यांस इतकीं सर्व सुखें अनुकूल असूनही संततिसुख नाहीं, ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. यांच्या प्रथम पत्नी पार्वतीबाई यांस १९०२ सालीं एक मुलगी झालेली होती, पण ती उपजतांच मरण पावली. नंतर दुसऱ्या कुटुंबास १९०७–१९०९ सालीं एक मुलगा व मुलगी ह्याप्रमाणें दोन अपत्यें झालीं होतीं; पण तींही जिवंत राहिलीं नाहींत. ईश्वराची मर्जी ! !

नुक्तेच आपले परमपूज्य बादशहा पंचमजार्ज यांच्या जन्मदिवशीं ( १९१३ ) अनेक थोर गृहस्थांस सरकारनें ज्या पदव्या अर्पण केल्या, त्यावेळीं श्री० निळकंठराव भाऊसाहेब खळतकर यांची लोकोपयोगी कामगिरी पाहून सरकारनें त्यांस रावसाहेब ही बहुमानाची पदवी दिलेली आहे. सेंट्रलप्रॉव्हिन्सेसमध्यें उच्च मराठ्यांपैकीं ज्या इसमांस सरकारनें पदव्या दिलेल्या आहेत, त्यांपैकीं श्री. खळतकर हे तिसरे मराठे गृहस्थ आहेत. श्री. राजेबहाद्दूर रघोजी राजे भोंसले श्री. रा. ब. महाडीक व श्री. रा. सा. खळतकर हे ते तीन गृहस्थ होत. लोककल्याणाची प्रबल इच्छा धारण करणारांचा सरकारांकडून जो हा बहुमान होत आहे. त्याबद्दल आम्ही सरकारचें अभिनंदन करीत आहों, राजा व प्रजा यांचा निकट संबंध दृढ होण्यास ह्या पदवीधर मंडळीचा उपयोग व्हावा हाच ह्या पदव्या देण्यामध्यें सरकारचा उच्च हेतु आहे. प्रजेच्या मागण्या अगर त्यांच्या अडचणी त्या त्या भागांतील थोर माणसांनीं सरकारच्या कानांवर घालाव्या व प्रजेस इच्छितगोष्टींचा सुलभतेनें लाभ करून द्यावा, ह्यासाठींच ही योजना केलेली असते. त्या योजनेप्रमाणें श्रीं. रा. सा. खळतकर हेही प्रजाहिततत्पर होतील, अशी आम्हांस खात्री आहे.

श्री. रा. सा. निळकंठराव भाऊसाहेब खळतकर व त्यांचे वडील यांस अनेक ऑफिसर्सकडून बरींच सर्टिफिकिटें मिळालेलीं आहेत. त्यांचें एक स्वतंत्र पुस्तकच त्यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे. हें कोणास पहावयाचें असल्यास त्यांनीं अवश्य पहावें. यांच्या सर्व कुळांचें वार्षिक उत्पन्न ४०००० हजारांपर्यंत असून त्यांचें स्वतःचें उत्पन्न ५००० आहे. त्यांचा धंदा मालगुजारी, शेती, सावकारी वगैरे असून ऑनररी म्याजिस्ट्रेटचेंही काम ते करीत असतात. नागपूर प्रांतामध्यें श्री० रा० सा० निळकंठराव यांचें बरेंच वर्चस्व असून लोक त्यांच्या सौजन्यानुरुप त्यांस मान देत असतात. श्री०निळकंठराव यांस पुत्रपौत्रादि सौख्य लाभो ! असें इच्छून ही ह्या घराण्याची कैफियत पूर्ण करितों.

समाप्त.

‘ चव्हाण ऊर्फ डफळे ’ ‘ ढवळचे पवार ’ ‘ म्हसवडचे माने ’
‘ मोरे ऊर्फ धुळप ’ व ‘ खळतकर देशमुख ’
ह्या घराण्याच्या वंशावळी.

# चव्हाण ऊर्फ डफळे घराण्याची वंशावळ.

- लखमोजी बिन यलदोजी चव्हाण पाटील, मौजे डफळापूर.
  - सटवाजीराव, (देशमुखी व जहागिरीचे संपादक. यांना बायका दोन.)
    - बावाजीराव, (यांची स्त्री येसूबाई ऊर्फ आउसाहेब.) ०
    - खानाजीराव, (हे दुसऱ्या स्त्रीचे पोटीं झाले.)
      - यशवंतराव.
        - अमृतराव (पहिले.)
          - खानाजीराव. (दुसरे.) ०
          - परशरामराव. ०
      - रामराव.
        - नारायणराव.
          - रामराव ऊ. आबासाहेब.
            - ० भीमराव हे दत्तक झाले, नांव अमृतराव ठेविलें.
              - बोवासाहेब हे दत्तक झाले, नांव **रामराव** ऊ. **आबासाहेब** जत संस्थानचे चीफ.
                - प्रतापसिंह (मयत).
                - विजयसिंहराव ऊ. बाबासाहेब (युवराज)
          - यशवंतराव ऊ. दाजीसाहेब. ०
          - व्यंकटराव ऊ. रावसाहेब. ०
      - भगवंतराव (हे उमराणी सरंजामचे संपादक.)
        - बावाजीराव.
          - परशरामराव.
            - नारायणराव. ०
              - परशरामराव ऊर्फ दाजीसाहेब.
                - बावाजीराव.
                - अमृतराव ऊ. रावसाहेब.
          - भगवंतराव.
            - रामराव.
              - भगवंतराव ऊ. नानासाहेब.
                - दत्ताजीराव.
                - शंकरराव.
                - माधवराव.
                - सुबराव ऊ. आणासाहेब.
            - भीमराव (हे रामरावास दत्तक झाले.)
        - यशवंतराव.
          - माधवराव ऊर्फ रावसाहेब.
            - परशरामराव ऊ. दाजीसाहेब.
              - नारायणराव ऊ. आपासाहेब.
                - रावसाहेब.
              - बापूसाहेब.
              - बाळासाहेब.
                - प्रतापराव.
            - आबासाहेब याचा बंधू
          - बळवंतराव (पु. पृ. पहा)
        - राणोजीराव. ०
      - मुकुंदराव (यांचा वंश पुढील पृष्टीं पहा)
  - धोंडजीराव.
    - नानाजीराव, (यांचा वंश डफळापुरास आहे.)


मुकुंदराव.
लक्ष्मणराव.
सटवाजीराव.
बळवंतराव.
बावांजीराव.
मुकुंदराव. मुरारराव.
आबासाहेब. रामराव. बाबासाहेब.
लक्ष्मणराव. परशरामराव. रामराव.
सुबराव.
नानासाहेब. दादासाहेब.
बोवासाहेब ( हे दादासाहेब. विठ्ठलराव. बाळासाहेब.
दत्तक झाले. )
खानाजीराव. बळवंतराव. यशवंतराव.
तात्यासाहेब. दाजीसाहेब. लक्ष्मणराव.
तात्यासाहेब. आणासाहेब. शंकरराव. श्रीपतराव
बाळासाहेब.
बाबासाहेब.

**मौजे आंधळी, कसबे इसापूर, प्रांत मिरज, इलाखा सांगली, संस्थान सांगली येथील माने पाटील भाऊपण्याची वंशावळ. रावजी यांचा वंश. नं० १.**

- लिंगोजी पाटील.
  - देमजी.
    - रावजी. (पाटीलकीवतन संपादक.)
      - देमजी.
        - मुरारजी.
          - भिकाजी.
            - रघुनाथराव.
              - हैबतराव दादा.
                - खंडेराव.
                  - जिजाजीराव बापू.
                    - केदारजी.
                  - हैबतराव ऊ. दादाराव.
                    - आनंदराव
                  - धोंडजी. ०
            - सिदोजी.
              - पर्वतराव.
                - नागोजीबुवा.
              - आदोजी आबा.
                - नाना.
                  - पुंडलीक.
                    - महादेवराव.
                    - हंबीरराव.
                - रावजी.
                - गणपतराव.
                  - पांडुरंग.
                - हनुमंत.
              - मैराळ.
            - सरूपजी. ०
            - यशवंतराव.
              - दौलतराव.
                - भाऊराव.
                  - गणपतराव.
                    - आबाजी.
                    - कृष्णाजी.
                    - तुकाराम.
                    - ज्ञानु.
                  - नारायणराव.
                    - पांडुरंग.
                    - बळीराम.
                    - मारुती.
                    - आनंदराव.
                  - रावजी.
                    - दाजी.
                    - यशवंतराव.
                - बाबा
                  - आबाजी.
        - रघुनाथराव.
          - गोविंदराव.
            - जयसिंगराव.
    - खंडोजी.
    - लखमोजी.
    - धावजी.
  - मेगजी.

तुळाजी. रताजी. मलजी.

कृष्णाजी. जोत्याजी. भगोजी.

जोत्याजी. वहीरजी. सयाजी. राणोजी. खंडोजी. पाटलोजी. सिदोजी.

यांचा पुढील वंश कळला नाहीं. | यांचा पुढील वंश कळला नाहीं.

मानाजी. रघुनाथराव. पाटलोजी. रावजी.

सुभानजी. ठाणाजी. सखाराम. निळुजी. जोती. सिदु. रावजी. धारू. धमाजी.

नायकोजी. पाटलोजी. बाबुराव. बाबुराव. परसोजी. बचाराम. पाटलोजी. नाथा. दौलतराव.

सिदोजी. जोतीराव. गोविंदराव. ज्ञानु. काशीनाथ. सकोबा. नाना. बाबु. रावजी. भाऊ. बापू.

ज्ञानोबा. रावजी. रामजी. रामा. तुकाराम. दाजी.

## मौजे आंधळी, कसबे इसापूर, प्रांत मिरज, इलाखा सांगली, संस्थान सांगली येथील माने पाटील भाऊपण्याची वंशावळ. खंडोजी यांचा वंश. नं. २.

लिंगोजी पाटील.

देमजी. मेगजी.

रावजी. खंडोजी. लखमोजी. धावजी.

खानाजी.

खेत्रोजी. खंडोजी. शाहाजी. जोतीराव.

आपाजी. आम्रोजी. केदारजी. जिवाजी. सुभानजी. सुलतानजी. राणोजी.

याचा पुढील वंश मिळाला नाहीं.

लिंगोजी. व्यंकटराव. सिदोजी. बाळोजी. केदारजी. आबाजी. आपाजी. रघुनाथ.

यांचा पुढील वंशविस्तार कळला नाहीं. कोल्हापूर इलाख्यांतील भीमबहाद्दर माने हे मूळचे आंधळीचे, ते हल्लीं सावगांव, मांगूर, रुकडी वगैरे गांवांत आहेत; ते यांचा विस्तार आहे कीं, कोणत्या पुरुषाचे तें कळत नाहीं.

सुभानजी. — बुधाजी.

माधवराव. — नाना. गुंडापा.

भाऊ. रावजी. श्रीपतराव. नारायणराव. गोविंदराव.

पांडुरंग. आनंदराव. आबा. बाबा. नाना,

रखमाजी. सुभानजी. पिराजी. खानाजी. दौलतराव.

दत्तक दिला.

वाघोजी. रामजी. तुकाराम. कुशाबा. विठोबा. पुंडलीकराव. पाटलू. निळोजी.

यकसंबे येथें. भिलवडी येथें.

गुंडापा. नाथापाटील. ज्ञानु. पुंडलीक. नाना. मारुती.

गणू. भिकू. केरू. आबा. संतु. सुबा. ओमणा. महादु जोती. विठोबा. यशवंतराव. रावजी. भाऊ. दाजी.

भिलवडी. भुसावळ येथें.

बापु. केशव. बाळाजी.

गणपतराव. धोंडीराम. दत्ताजी. यशवंतराव.

अकोला अर्जुनी येथें


सिदोजी.
धर्माजी.
गणपतराव.
संताजी.
शहाजी.
भिकाजी.
सुलतानजी.
तानाजी.
सुभानजी.
देवराव.
आकाराम.
बाबाजी. सकाराम. आकाराम.
दौलतराव.
रस्तुमराव.
सकाराम. पाटलू.
बळीराम.
धोंडीबा. पर्वतराव. नाथाजी. व्यंकापा.
केशवराव.
नाथा.
दत्तक दिला.
बाजीराव. सिदू. पांडू.
रामराव. माधव-राव. सुभान-राव. आबाजी. केशवराव.
नाना. गणपतराव.
ताल्या. बाळाजी.
ताल्या. दाजी. आपा. बापू.
मौजे मळणगांव येथें.
यसबा.
दादाजीबुवा.
तुकाराम. बाबूराव. ज्ञानोबा.
भाऊराव. संताजी. जोतीराव.
दत्ताजी.
चंद्रु. केसू. महादू.
गणपतराव. रावजी. भाऊराव.

## मौजे आंधळी, कसबे इसापूर, प्रांत मिरज, इलाखा संस्थान सांगली येथील माने पाटील भाऊपण्याची वंशावळ.

( राघोजी यांचा वंश. नं० ३. )



## मौजे आंधळी, कसबे इसापूर, प्रांत मिरज, संस्थान सांगली येथील माने पाटील भाऊपणाची वंशावळ.

### धावजी यांचा वंश. नं. ४.

लिंगोजी पाटील.

देमजी पाटील. मेगजी.

रावजी पाटील. वतन पूर्ण संपादक. खंडोजी. लखमोजी. धावजी.

देऊबाई गावडी मानी पाचुं- वरीकरीण इजला, आवाजी दत्तक. आवाजी.

आवाजी.

बहीरजी. राणोजी. अंबाजी.

मुलतानजी. सुभानजी. गणोजी. धारोजी. संताजी. खेत्रोजी. व्यंकटराव. नारायणराव.

नरसोजी. भिकाजी. रघुजी. दैवतराव. मुकुंदजी. सिदोजी. राणोजी. मुरारजी रामजी. जिवाजी. सिदोजी. केदारजी. पाटलूजी.

शिवरामजी. पांडुरंग. महादजी. सुभानजी. गोपाळराव. सुभान- राव ऊर्फ आपाजी. पांडुरंग. बापु. तात्या. खंडोजी. आबाजी झानु. बापु. बाळाजी.

गोविंदराव. चंद्रजी. नाथाजी. केशवराव. गणपतराव. बाळाजी. नानाजी सखाराम. तुकाराम. रावजी. बाबाजी. परसु. बाळाजी.

मारुती. संताजी. हरीमाने. भाऊराव. बाबाजी. चंदोजी.

आबाजी. बापुजी. पुंडलीकबाबा.

विठोजी पाटील. पुंडलीक. कृष्णाजी. रावजी.

## खळतकरांचे घराण्याची वंशावळ.



